# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

## Vol. 19

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

## खंड १९

... आंबेडकर यांची पत्रकारिता

... १९५६




डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती
उच्च आणि तंत्रशिक्षण विभाग,
महाराष्ट्र शासन

## डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

इंग्रजीतील १७ प्रकाशित खंड

**खंड -१**

भारतातील जाती आणि इतर ११ निबंध

(आवृत्ती संपली )

**खंड-२**

मुंबई विधीमंडळामध्ये डॉ. आंबेडकर

(आवृत्ती संपली )

**खंड-३**

हिंदुत्वाचे तत्त्वज्ञान

(आवृत्ती संपली )

**खंड-४**

हिंदूधर्मातील कूटप्रश्न

रुपये ३५/-

**खंड-५**

अस्पृश्य आणि अस्पृश्यता

(आवृत्ती संपली )

**खंड-६**

रुपयाचा प्रश्न

(आवृत्ती संपली )

**खंड-७**

शूद्र पूर्वी कोण होते ?

(आवृत्ती संपली )

**खंड-८**

पाकिस्तान

(आवृत्ती संपली )

**खंड-९**

गांधी आणि काँग्रेस यांनी अस्पृश्यांचे काय केले ?

(आवृत्ती संपली )

**खंड-१०**

मजूर मंत्री डॉ. बाबासाहेब आंबेडकर

(आवृत्ती संपली )

**खंड-११**

बुध्द् आणि त्यांचा धम्म

रुपये ७०/-

**खंड-१२**

अप्रकाशित साहित्य

रुपये ९५/-

**खंड-१३**

भारतीय राज्यघटनेचे प्रमुख शिल्पकार,

डॉ. बाबासाहेब आंबेडकर

(आवृत्ती संपली )

# Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES

## VOL. 19

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे

## खंड १९

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता

## १९२०-१९२८

डब्ल्यू-२०७३- अ

'' हिंदु धर्मीयांत असलेली ही विषमता जितकी अनुपम आहे तितकीच ती निंदास्पदही आहे. कारण विषमतेनुरूप होणाऱ्या परस्परांच्या व्यवहाराचें स्वरुप हिंदुधर्माच्या शीलाला शोभण्यासारखें खास नाहीं. हिंदुधर्मात समाविष्ट होणाऱ्या जाती उच्चनीच भावनेनें प्रेरित झाल्या आहेत हें उघड आहे, हिंदू समाज हा एक मनोरा आहे व एक एक जात म्हणजे त्याचा एक एक मजलाच होय. पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं या मनोऱ्यास शिडी नाही ; आणि म्हणून एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जाण्यास मार्ग नाही. ज्या मजल्यांत ज्यांनी जन्मावे त्याच मजल्यांत त्यांनी मरावे. खालच्या मजल्यातला इसम मग तो कितीही लायक असो त्याला वरच्या मजल्यात प्रवेश नाही व वरच्या मजल्यातला माणूस मग तो कितीही नालायक असो त्याला खालच्या मजल्यात लोटून देण्याची कोणाची प्राज्ञा नाही. उघड भाषेत बोलावयाचें म्हणजे जाती जातींत असलेल्या या उच्चनीच भावना गुणावगुणांच्या पायावर झाल्या आहेत असे नाही. उच्च जातीत जन्मलेला मग तो कितीही अवगुणी असो तो उच्च म्हणावयाचा ; तसेच नीच जातींत जन्मलेला मग तो कितीही गुणी असो, तो नीचच रहावयाचा. दुसरे असें कीं, परस्परांत रोटी-बेटी व्यवहार होत नसल्यामुळे दर एक जात या जिव्हाळयाच्या संबंधात स्वयंवह म्हणजे तुटक आहे. ही निकट संबंधाची गोष्ट जरी बाजूस टाकली तरी परस्परांतील बाह्यव्यवहार अनियंत्रित असा नाही. कांहींचा व्यवहार दारापर्यंतच होतो व कांहीं जाती तर अस्पृश्य आहेत, म्हणजे त्या जातींतील माणसाचा स्पर्श झाला असता इतर जातींतील माणसास विटाळ होतो. विटाळामुळें या बहिष्कृत जातींशी इतर जातीच्या लोकांशी क्वचितच व्यवहार होतो. रोटी-बेटी व्यवहाराच्या अभावी कायम झालेल्या परकेपणांत स्पृश्यास्पृश्य भावनेंनें इतकी भर टाकली आहे की, या जाती हिंदु समाजात असून समाजाबाहेर आहेत असेंच म्हटलें पाहिजे. या व्यवस्थेमुळे हिंदुधर्मीयांचे ब्राह्मण, ब्राह्मणेतर व बहिष्कृत असे तीन वर्ग होतात. तसेंच या विषमतेच्या परिणामाकडे लक्ष दिलें तर असें दिसून येईल कीं, तिच्या पायीं विविध जातीवर विविध परिणाम झाले आहेत.



कर्मवीर भाऊराव पाटील आणि गाडगेबाबा यांच्यासमवेत डॉ. आंबेडकर




**Dr. BABASAHEB AMBEDKAR WRITINGS AND SPEECHES**
**VOL.19**

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे**
**खंड १९**

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची पत्रकारिता
# १९२०-१९२८

संपादक
**हरी नरके**
**म. ल. कासारे**
**एन. जी. कांबळे**
**अशोक गोडघाटे**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती,
महाराष्ट्र शासन,
शासकीय कुटीर क्र. १८, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०२१

Dr.Babasaheb Ambedkar Writings and Speeches
Vol.19 ( Dr Babasaheb Ambedkar Yanchi
Patrakarita) Marathi Book, Edited by Hari Narke,
and others for Dr. Babasaheb Ambedkar Source
Material Publication Committee,
Govt. of Maharashtra, Barrack No.18,
Opp.Mantralaya, Mumbai 400 021. INDIA.

The object of the present publication is to compile Dr. Babasaheb Ambedkar's Writings on a variety of topics. The State Government has brought together these writings in the form of present publication.

प्रस्तुत प्रकाशनाचा हेतू डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे विविध विषयांवरील लेखन एकत्रित करुन प्रकाशित करणे हा आहे. महाराष्ट्र शासनाने हे साहित्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे या मालिकेद्वारे प्रसिध्द् केले आहे.



प्रथमावृत्ती - : २००५

प्रती : ३०,०००

**© प्रकाशक :**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती.
महाराष्ट्र शासन, शासकीय कुटीर क्र.१८, मंत्रालयासमोर,मुंबई - ४०० ०२१.
करिता
प्रधान सचिव,
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२.

मुद्रक :-
शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.

मूल्य : रुपये २००/-

# डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधने प्रकाशन समिती

---

(१) ना. दिलीप वळसे-पाटील . . . . . . अध्यक्ष
*(मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण, वैद्यकीय शिक्षण, ऊर्जा)*

(२) श्री. सुरेश शेट्टी . . . . . . सदस्य
*(मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण, वैद्यकीय शिक्षण,*
*पर्यटन व विशेष सहाय्य)*

(३) श्री. रा. सु. गवई *(खासदार)* . . . . . . सदस्य

(४) श्री. रामदास आठवले *(खासदार)* . . . . सदस्य

(५) श्री. प्रकाश आंबेडकर *(माजी खासदार)* . . . . सदस्य

(६) प्रा. जोगेंद्र कवाडे *(आमदार)* . . . . . . सदस्य

(७) श्री. टी. एम. कांबळे *(माजी आमदार)* . . . . . . सदस्य

(८) श्री. लक्ष्मण माने *(माजी आमदार)* . . . . . . सदस्य

(९) प्रा. एन. डी. पाटील . . . . . . सदस्य

(१०) डॉ. जनार्दन वाघमारे . . . . . . सदस्य

(११) प्रा. केशव मेश्राम . . . . . . सदस्य

(१२) डॉ. यशवंत मनोहर . . . . . . सदस्य

(१३) डॉ. गंगाधर पानतावणे . . . . . . सदस्य

(१४) डॉ. एम. एल. कासारे . . . . . . सदस्य

(१५) श्री. एन. जी. कांबळे . . . . . . सदस्य

(१६) प्रा. अशोक गोडघाटे . . . . . . सदस्य

(१७) संचालक, *शासन मुद्रण, लेखन सामग्री व प्रकाशने* . . सदस्य

(१८) डॉ. जॉयस् शंकरन् . . . . . . सदस्य
*प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण.*

(१९) डॉ. एस. एन. पठाण, . . . . . . निमंत्रक
*संचालक, उच्च शिक्षण.*

(२०) श्री. हरी नरके . . . . . . सदस्य-सचिव

---

# प्रस्तावना

महाराष्ट्र शासनाचे प्रकाशन क्षेत्रातील जे उपक्रम आहेत त्यात डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे समग्र साहित्य प्रकाशित करण्याची योजना सर्वाधिक लोकप्रिय योजना ठरलेली आहे. आजवर पाच लाखांहून अधिक वाचकांनी रांगा लावून हे ग्रंथ खरेदी केलेले आहेत. जगातल्या शंभराहून अधिक देशातून या ग्रंथांना मागणी असते. आपल्या देशाच्या कानाकोप-यातून या ग्रंथांसाठी नागरिक विचारणा करीत असतात. त्यामुळे हा ग्रंथ प्रकल्प महाराष्ट्राला सर्वाधिक नावलौकिक मिळवून देणारा महत्त्वपूर्ण प्रकल्प ठरलेला आहे.

१५ मार्च १९७६ ला सुरु झालेला हा ग्रंथ प्रकल्प वाढत वाढत २१ खंडांपर्यंत जाणार असा अंदाज होता. परंतु सुधारित अंदाजानुसार आता तो दुपटीने मोठा होणार असून या मालिकेचे ४२ खंड प्रकाशित करण्याचा आराखडा शासनाने मान्य केला आहे. आजवर १८ खंड प्रकाशित झालेल्या या योजनेतील खंड १९ व २० आज प्रकाशित होत आहेत. हे दोन्ही ग्रंथ डॉ.आंबेडकरांनी विविध वर्तमानपत्रातून १९२० ते १९५६ या काळात केलेल्या लेखनाचे खंड आहेत. काही खाजगी प्रकाशकांनी डॉ.आंबेडकरांच्या वृत्तपत्रिय लेखनाचे सुटे सुटे काही ग्रंथ यापूर्वी प्रकाशित केलेले असले तरी समग्र पत्रकार डॉ.आंबेडकर या दोन खंडांनी प्रथमच वाचकांना उपलब्ध होत आहेत. यातील काही भाग 'डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक' या आम्ही प्रकाशित केलेल्या ग्रंथात आला होता. परंतु त्याची २५००० प्रतींची आवृत्ती आता संपलेली असून मूलतः तो 'डॉ.बाबासाहेब आंबेडकर आणि अस्पृश्यांची चळवळ यांच्या अभ्यासाची साधने' या मालिकेतला ग्रंथ होता. 'डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे' या मुख्य मालिकेत हे साहित्य प्रथमच प्रकाशित होत आहे. आम्ही आजवर प्रकाशित केलेल्या १८ खंडांपैकी खंड १ व ४च्या दुस-या आवृत्त्या काढाव्या लागल्या. पहिल्या खंडांची दुसरी आवृत्तीही आता संपली आहे. अठरापैकी खंड १, २, ३, ५, ६, ७,८,१०,१३,१४,१५,१६ या बारा खंडांच्या आवृत्त्या आज संपलेल्या आहेत. संदर्भ साहित्याच्या प्रकाशित झालेल्या दोन्ही खंडांच्या प्रतीही संपलेल्या आहेत. हा महाराष्ट्रातल्या प्रकाशन विश्वातला चमत्कारच मानावा लागेल. आपल्या महाराष्ट्रात सर्वसाधारणपणे एखाद्या ग्रंथांच्या १ ते ३ हजार प्रतींची आवृत्ती काढण्याची

प्रथा आहे. डॉ.आंबेडकरांच्या ग्रंथांची आमची आवृत्ती १५ ते ३० हजार प्रतींची असते. सर्वश्री,डॉ.बी.जी.कुंटे, म.भि.चिटणीस, पी.टी.बोराळे, एस्.एस्.रेगे, भालचंद्र फडके आणि वसंत मून यांच्या परिश्रमातून प्रारंभीचे खंड प्रकाशित झाले. त्यांना अन्य अभ्यासकांचेही सहाय्य लाभले. वसंतराव मून यांच्या निधनानंतर त्यांच्या संशोधकीय बैठकीत तयार झालेले हरी नरके या तरुण अभ्यासकांवर ही जबाबदारी सोपवण्यात आली. त्यांनी समर्पित वृत्तीने हया फुले आंबेडकरी साहित्य प्रकल्पासाठी स्वतःला वाहून घेतले. परिणामी गेल्या ३ वर्षात खंड १७ व १८ चे सहा भाग आणि आता खंड १९ व २० वाचकांना उपलब्ध होत आहेत. खासदार रा.सु.गवई आणि आमदार प्रा.जोगेंद्र कवाडे या ग्रंथ प्रकल्पाचा वारंवार पाठपुरावा करीत असतात. समितीचे अध्यक्ष, सर्व मान्यवर सदस्य आणि संपादक यांच्या मेहनतीमुळे हे खंड वाचकांना उपलब्ध होत आहेत. वाचक याही ग्रंथाचे प्रचंड स्वागत करतील असा मला विश्वास वाटतो.

**विलासराव देशमुख**
**मुख्यमंत्री**

# मनोगत

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे एक महान राष्ट्रीय नेते होते. त्यांच्या महापरिनिर्वाणाला २० वर्षे झाली असताना त्यांचे समग्र साहित्य प्रकाशित करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने १९७६ साली डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीची स्थापना केली. डॉ.आंबेडकरांचे वारस (पत्नी डॉ.सविता आंबेडकर आणि पुत्र श्री.यशवंत आंबेडकर) यांच्याकडून साहित्य प्रकाशनाचे अधिकार घेऊन १९७९ साली डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे खंड-१ प्रकाशित केला गेला. आजवर या २९ वर्षात समितीने बाबासाहेबांच्या साहित्याचे १८ खंड आणि संदर्भ साहित्याचे २ खंड प्रकाशित केले. चौदावा खंड २ भागात होता तर खंड सतरा आणि अठरा प्रत्येकी ३ भागांचे होते. अशाप्रकारे एकुण २५ ग्रंथ प्रकाशित झाले. या सर्वच ग्रंथांवर वाचकांच्या उडया पडल्या. एवढी तुफान लोकप्रियता शासकीय प्रकाशनांना क्वचितच मिळत असते.

नागपूरला खंड अठराच्या प्रकाशन समारंभाला मी उपस्थित होतो. त्यावेळी कार्यक्रमाच्या हॉलवर पहाटेपासून लोकांनी रांगा लावलेल्या मी बघितल्या. विक्रीला ठेवलेल्या सगळया प्रती हातोहात संपल्या. असे दृश्य मी प्रथमच पाहात होतो. वसंत मून यांच्या निधनानंतर हे काम थांबू नये यासाठी आम्ही महात्मा फुले साहित्याच्या आणि संशोधनाच्या क्षेत्रात नावाजलेले तरुण विद्वान हरी नरके यांच्याकडे बाबासाहेबांच्या साहित्याचे काम सोपवले. त्यांनीही टेल्कोसारख्या नामवंत कंपनीतील आपली मोठया अधिकार पदाची नोकरी सोडून या कामाला पूर्ण वेळ वाहून घेतले. फुले-आंबेडकर प्रकाशन समित्यांना शासनाने आजवर हंगामी स्वरुप दिले असल्याने दरवर्षी समित्यांना मुदतवाढ द्यावी लागते. या किचकट प्रक्रियेत जाणारा वेळ आणि होणारी दमछाक यांच्यामुळे संशोधन-प्रकाशन कार्याला खीळ बसते. हे सारे सतत चालणारे काम आहे. त्यामुळे डॉ.आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीचे हंगामी स्वरुप संपवून ती कायमस्वरुपी करण्यात यावी ही मागणी करुन तिचा पाठपुरावा श्री.हरी नरके यांनी केला. त्याला यश आले असून शासनाने आता डॉ.आंबेडकर आणि महात्मा फुले यांच्या साहित्याचे प्रकाशन करणा-या दोन्ही समित्यांचे कायमस्वरुपी फौंडेशनमध्ये रुपांतर करण्याचे ठरवले आहे. गेले दोन वर्षे अनेक कारणांनी प्रलंबित राहिलेल्या या मुद्दयाला आम्ही आता गती दिली आहे.

' फुले शाहू आंबेडकर ' ही विचारधारा महाराष्ट्रात शिरोधार्य मानली जाते. राजर्षी शाहूंचे विचार, भाषणे, पत्रव्यवहार, शासनादेश यांचे प्रकाशन करण्याचा श्री.हरी नरके यांनी दिलेला प्रस्ताव आम्ही स्विकारला असून त्याचेही काम लवकरच सुरु होईल. भारत सरकारने डॉ.आंबेडकरांच्या साहित्याचे विविध भारतीय भाषांमध्ये भाषांतर करुन ते ग्रंथरुपाने प्रकाशित करण्यासाठी डॉ.आंबेडकर फौडेशनची १९९१ मध्ये स्थापना केली आहे. या फौंडेशनला महाराष्ट्र शासनाने हिंदी, बंगाली, तेलगू, कन्नड आदी भारतीय भाषांतील कामांसाठी सहकार्य केले आहे. मराठी अनुवादाच्या कामासाठी फौंडेशनने महाराष्ट्र शासनाला अनुदान देऊ केले असून त्यासाठी ग्रंथ समिती कायमस्वरुपी असण्याची गरज आहे. या समितीला स्वायत्तता दिल्यास ती स्वयंपूर्ण आणि गतिमान होऊ शकेल हे लक्षात घेऊन आम्ही त्यादृष्टीने पावले टाकीत आहोत. मराठी अनुवादाला खूप मागणी असूनही समितीकडील अत्यल्प मनुष्यबळ व समितीचे हंगामी स्वरुप यासारख्या असंख्य अडचणींमुळे हे काम खूपच मागे राहिले आहे याची आम्हाला जाणिव आहे. समितीकडे एकही संशोधन सहाय्यक, संपादन सहाय्यक वा मुद्रित शोधक नसल्यामुळे या सा-याच कामांचा बोजा सदस्य सचिवांवर पडतो. पुढील खंडांची छपाई, अनुवादांचे कार्य व समितीचे अन्य नियोजित प्रकल्प या सा-यांमध्ये सध्यातरी छपाईच्या अवस्थेत असलेल्या अनुवादांच्या खंडांना अग्रक्रम देण्याचा समितीचा निर्णय आहे. समिती कायमस्वरुपी आणि स्वायत्त झाल्यानंतर बरीच कामे बाहेरुन करुन घेण्याचाही पर्याय उपलब्ध असेल व त्यामुळे प्रलंबित कामांना गती देता येईल.

६ डिसेंबर २००६ रोजी डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या महापरिनिर्वाणाला ५० वर्षे पूर्ण होत आहे. त्याआधी अधिकाधिक मराठीतील अनुवाद खंड प्रकाशित करण्याचा आमचा सर्वतोपरी प्रयत्न राहील.

मराठीतील खंड १८ला वाचकांचे अलोट प्रेम मिळाले. तसेच या एकोणीस व वीस खंडांना मिळेल असा मला विश्वास वाटतो.

**दिलिप वळसे पाटील**

मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण,वैद्यकीय
शिक्षण, आणि उर्जा, तथा अध्यक्ष
डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने
प्रकाशन समिती.

# खंड एकोणीसच्या निमित्ताने

**प्रिय वाचक,**

सप्रेम जयभीम !

डॉ.बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समितीच्या स्थापनेला नुकतीच २९ वर्षे पूर्ण झाली. या काळात समितीने डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या साहित्याचे एकुण २५ ग्रंथ प्रकाशित केले. त्यात डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे मालिकेतील १८ खंड आणि संदर्भ साहित्य मालिकेतील दोन खंड यांचा समावेश आहे. चौदावा खंड दोन भागात, तर सतरावा व अठरावा खंड प्रत्येकी ३ भागात होता. अशाप्रकारे प्रकाशित झालेल्या उपरोक्त २५ ग्रंथातील २१ इंग्रजी भाषेत तर ४ मराठी भाषेत होते. या सर्व ग्रंथांचे वाचकांनी प्रचंड स्वागत केले. देशाच्या कानाकोप-यातून आणि जगातल्या सुमारे १०० देशांतून या ग्रंथांना मागणी आली. येत आहे. आजवर १४ ग्रंथांच्या आवृत्त्या संपलेल्या आहेत. पहिल्या खंडाची तर दुसरीही आवृत्ती संपली असून चौथ्या खंडाची दुसरी आवृत्ती संपत आली आहे. भारतीय ग्रंथविश्वामध्ये ग्रंथाची आवृत्ती काढताना सामान्यपणे १००० ते ३००० प्रतींची आवृत्ती काढली जाते. संदर्भ साहित्याच्या खंड एकची (मूकनायक व बहिष्कृत भारत) आवृत्ती २५००० प्रतींची होती आणि डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणांच्या खंडाच्या (खंड १८) तिन्ही भागांच्या प्रत्येकी तीस हजार प्रती आपण छापल्या होत्या. खंड १९ व २० मध्ये प्रत्येकी तीस हजार प्रती आपण वाचकांना उपलब्ध करुन देत आहोत. या सा-या तपशिलावरुन आपल्या लक्षात येईल की आजही डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे बेस्ट सेलर आहेत. समितीने छापलेल्या पाच लाखांवर प्रतींची आजवर आपण विक्री केलेली आहे. हा वैचारिक ग्रंथांच्या विक्री विश्वातला अखिल भारतीय पातळीवरचा राष्ट्रीय उच्चांक होय.

या शासकीय प्रकल्पाद्वारे वाचकांना रास्त किमतीत ग्रंथ उपलब्ध होत असले तरी हा तोटयात चालणारा उपक्रम नाही. यातून प्रचंड नफा मिळवण्याचा महाराष्ट्र शासनाचा हेतू नसला तरीही आजवर सुमारे एक कोटींहून अधिक रुपयांचा नफा महाराष्ट्र शासनाला यातून झालेला आहे हे नमूद केले पाहिजे. असे उपक्रम म्हणजे शासनावरचा बोजा, तोटयात चालणारी योजना अशी सर्वसाधारणपणे सार्वत्रिक समजूत असते.

महाराष्ट्र शासनाला यातून मिळालेले श्रेय आणि या ग्रंथांमुळे झालेले सामाजिक प्रबोधन यांचे मूल्य हजारो कोटी रुपयांपेक्षा अधिक असल्याचे प्रतिपादन सतराव्या खंडाच्या प्रकाशन समारंभात तत्कालीन उपमुख्यमंत्री आयु.छगन भुजबळ यांनी केले होते. हे चिरकाल चालणारे काम असल्याने या समितीला कायमस्वरुपी मुदतवाढ देण्याची घोषणा याच समारंभात तत्कालीन मुख्यमंत्री आयु.सुशिलकुमार शिंदे यांनी केली होती.

समारंभानंतर पंधरवडयातच समितीच्या सर्व अडचणी सोडवण्यासाठी आयु. भुजबळ यांच्या अध्यक्षतेखाली एक बैठक घेण्यात आली होती. बैठकीला अर्थमंत्री, उच्च शिक्षण मंत्री, मुख्य सचिव, वित्त सचिव असे सर्व संबंधित मान्यवर उपस्थित होते. समितीला कायमस्वरुपी मुदतवाढ देण्यासाठी मंत्रीमंडळापुढे प्रस्ताव आणावा लागेल, तो एक आठवडयात आणू असे आश्वासन तत्कालीन उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या प्रधान सचिव श्रीमती चंद्रा अय्यंगार यांनी बैठकीत दिले होते. या घटनेला आता शंभर आठवडे उलटून गेले आहेत. अद्यापही हा प्रस्ताव मंत्रीमंडळापुढे आलेला नाही.

डॉ.बाबासाहेबांच्या साहित्याचे एकुण १४ खंड होतील असा समितीचा १९९० पर्यंत अंदाज होता. त्यानंतर मिळत गेलेल्या साहित्यामुळे ही खंड संख्या वाढून २१ पर्यंत जाणार असे दिसू लागले. हे २१ खंडांचे काम पूर्ण केल्यानंतर सदर समितीला मुदतवाढ देण्याची आवश्यकता राहणार नाही असा शासनाचा विचार असावा. दरम्यान समितीचे काम हाती घेतल्यानंतर आम्ही ही खंड संख्या २१ ऐवजी ४२ पर्यंत वाढणार असल्याचे सप्रमाण दाखवून दिले. याशिवाय यातील सर्व इंग्रजी खंडांचे मराठीत भाषांतर करणे व मराठी खंडांचे इंग्रजीत भाषांतर करणे गरजेचे असून त्याचे ४२ खंड होतील. या समग्र साहित्याचे विषयवार संपादन करुन अभ्यासकांना ते उपलब्ध करुन देण्याची गरज आहे.

सध्या मजकूर हाताशी आला, तसा खंडामध्ये समाविष्ट करण्यात आला आहे. त्यामुळे एकाच खंडात बाबासाहेबांचे विविध विषयांवरील विचार एकत्र दिले गेले आहेत. उदा.जातीव्यवस्था निर्मुलन, शिक्षण, स्त्रीपुरुष समता, आर्थिक विचार, धर्म विषयक विचार अशा विविध विषयांवरील साहित्य एकत्र झालेले आहे. त्याची विषयवार आणि कालानुक्रमे विभागणी करुन त्याचे प्रकाशन करणे आवश्यक

आहे. एकाच विषयावर डॉ.बाबासाहेब आंबेडकरांनी दोन किंवा अधिक ठिकाणी मतप्रदर्शन केले असेल आणि त्यात भिन्नता असेल तर त्यातील कोणते मत प्रमाण मानायचे असा अभ्यासकांना प्रश्न पडू शकतो. अशावेळी खुद्द डॉ.बाबासाहेबांनीच याबाबतचा निकष देऊन ठेवला आहे. त्यांनी आपल्या थॉटस ऑन लिंग्वीस्टीक स्टेटस् (भाषावार राज्यांविषयी विचार) या १९५५च्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे की, "जबाबदार माणसाला पुनर्विचार करण्याचे आणि आपले विचार बदलण्याचे धैर्य असले पाहिजे. अर्थात शिकलेले न शिकलो आहोत असे त्याच्या होण्यामागे चांगली आणि पुरेशी कारणे असणे मात्र जरुर आहेत. विचारात कधी अंतिमत: नसणे शक्य असावे." याच प्रस्तावनेत त्यांनी आपले कोणत्याही विषयावरील दोन किंवा अधिक ठिकाणच्या प्रतिपादनातील कालानुक्रमे नंतरचे असेल ते मत प्रमाण मानावे असे स्पष्ट केले आहे. त्यासाठी बाबासाहेबांच्या समग्र साहित्याची कालानुक्रमे मांडणी करणेही आवश्यक ठरते.

डॉ.बाबासाहेबांच्या सहका-यांचे डॉ.आंबेडकरविषयक लेखन, आठवणी, चळवळीचे दस्तावेज आणि समकालिनांच्या नोंदी असे मुबलक साहित्य उपलब्ध आहे. बाबासाहेबांच्या महापरिनिर्वाणानंतरही गेल्या ५० वर्षात खूप लिहिले गेले आहे. लिहिले जात आहे. या सर्व साहित्याची सविस्तर वर्णन सूची असणारा डॉ.आंबेडकर महाकोष सिद्ध करण्याचा आमचा मनोदय आहे. दरम्यानच्या काळात डॉ.बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे खंडाच्या नव्या आवृत्त्यांचेही काम चालू ठेवावे लागणारच. या सा-यांसाठी ही समिती कायमस्वरुपी असण्याची नितांत आवश्यकता आहे. वास्तविक पाहता पहिल्या २४ वर्षात या बाबींकडे कसे लक्ष गेले नाही, याचेच नवल वाटते. समितीला दरवेळी १ वर्षाची मुदत दिली जाते. ती संपण्यापूर्वी मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करावा लागतो. या प्रस्तावाच्या मान्यतेसाठी करावयाच्या प्रशासकीय बाबींमुळे मुदत संपल्यानंतर आठ दहा महिन्यांनी नविन मुदतवाढ मिळते. तोवर जेमतेम दोन चार महिने शिल्लक राहिलेले असतात. समितीच्या कार्यालयातील कर्मचा-यांच्या मुदतवाढीसाठी तर वर्षातून चार वेळा प्रस्ताव सादर करावे लागतात. कागदी घोडे नाचवण्याच्या या कामात संशोधन, प्रकाशन, अनुवाद यासारख्या सर्वाधिक महत्त्वाच्या कामांचा वेळ वाया जातो.

महाराष्ट्र शासनाच्या सुमारे पाच संस्था ग्रंथप्रकाशनाचे काम करतात. (१) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ (२) मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ (३) गॅझिटिअर (दर्शनिका) विभाग (४) राज्य मराठी विकास संस्था (५) डॉ.आंबेडकर आणि महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती, यातल्या पहिल्या चार संस्था कायमस्वरुपी आहेत. त्यांना मुदतवाढीचे सव्यापसव्य करावे लागत नाही. यातल्या राज्य मराठी विकास संस्था व साहित्य संस्कृती मंडळाला शासनाने स्वायत्तताही दिलेली आहे. उपरोक्त चारही संस्थांना दरवर्षी दिला जाणारा निधी प्रत्येकी रुपये पन्नास लाख ते पाच कोटींपर्यंत असतो. फुले-आंबेडकर समित्यांच्या वाटयाला वर्षाला प्रत्येकी रु.पाच लाखही येत नाहीत. डॉ.आंबेडकर समितीकडे २ लिपिक आणि १ सेवक आणि म.फुले समितीकडे १ लिपिक आणि १ सेवक एवढा कर्मचारी वर्ग आहे. उपरोक्त ४ संस्थांकडे प्रत्येकी २५ ते १०० एवढा कर्मचारी वर्ग आहे. फुले-आंबेडकर समित्यांकडे एकही मुद्रितशोधक, संशोधन सहाय्यक, संपादन सहाय्यक नाही. समितीच्या कामाबदद्ल अनेकांना कुतुहल असते. अनेकजण पत्राद्वारे, दूरध्वनीवरुन अथवा प्रत्यक्ष भेटीत याबाबत वारंवार विचारणा करीत असतात. त्यामुळे वाचकांना विश्वासात घेऊन थोडे हितगुज करण्यासाठी उपरोक्त स्थिती त्यांच्यापुढे मांडणे भाग पडले आहे. यात कोणाविरुध्द् तक्रार करण्याचा हेतू नाही. लोकसत्ता, लोकमत, सकाळ, सम्राट, वृत्तमानस, दि टाइम्स ऑफ इंडीया आदी वृत्तपत्रांमधून या दूरावस्थेतबाबत अनेकवार टिका झाली आहे. विधिमंडळात आमदार प्रा.जोगेंद्र कवाडे यांनी अनेकवार याबाबत चर्चा घडवून आणली आहे. समितीच्या प्रत्येक बैठकीत यावर उहापोह झालेला आहे. गेली तीनचार वर्षे आम्ही स्वत: ही परिस्थिती बदलण्यासाठी सर्व स्तरांवरुन आटोकाट प्रयत्न केलेले आहेत. त्यातून छोटेछोटे अनेक प्रश्न मार्गी लागले आहेत.

समितीच्या कार्यालयाची अवस्था अतिशय वाईट होती. तत्कालीन उच्च शिक्षणमंत्री आयु.लक्ष्मण ढोबळे यांनी यापेक्षा खेडयातील खताच्या दुकानाची अवस्था अधिक चांगली असते अशा शब्दात खेद व्यक्त केला होता. सार्वजनिक बांधकाम मंत्री ना.छगन भुजबळ यांच्या सहाय्यामुळे त्यात आता थोडीफार सुधारणा करता आली आहे. आयु.भुजबळ यांनी स्वत:च्या आमदार निधीतून समिती

कार्यालयाला तीन संगणक संच पुरवले. समितीचे ज्येष्ठ सदस्य आणि खासदार दादासाहेब तथा रा.सु.गवई यांनीही आपल्या खासदारनिधीतून एक संगणक संच देण्याची घोषणा केली आहे.

उच्चशिक्षण मंत्री हे समितीचे पदसिध्द् अध्यक्ष असतात. गेल्या दोन वर्षांत आम्हाला पाच अध्यक्ष लाभले. प्रा.लक्ष्मण ढोबळे, प्रा.जयदत्त क्षीरसागर, आयु.मनोहर नाईक, आयु.सुरेश जैन आणि दिलिप वळसे पाटील यांचे अध्यक्षतेखाली समितीने काही अडचणी सोडविण्यात यश मिळवले. समितीला मुदतवाढ देताना पूर्वी " यापुढे मुदतवाढ मिळणार नाही, तीन महिन्यात उरलेले सर्व काम आटोपावे " असे शासनादेश निघत असत. समितीचा जाहीर गौरव करणा-या मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री यांच्यापुढे सतराव्या खंडाच्या प्रकाशन समारंभात आम्ही " समितीचा कुपोषणामुळे मृत्यू ओढवण्याची भिती " जाहीरपणे व्यक्त केली होती. आयु.सुशिलकुमार शिंदे यांनी समिती कायमस्वरुपी करावी असे लेखी आदेश देऊन दोन वर्षे होत आली आहेत. शासन निर्णय प्रतिक्षाधीन आहे. कालवश वसंत मून यांनी आयुष्यभर समितीचे काम केले. ते वारले तेव्हा त्यांना दोन वर्षांचा पगार मिळालेला नव्हता. आम्ही टेल्कोतील नोकरी सोडून या कामासाठी पूर्णवेळ द्यायला लागल्यानंतर आम्हाला पहिले वेतन मिळाले ते २७ महिन्यानंतर आणि दुसरे त्यानंतर एक वर्षाने ! समितीकडून जनतेच्या फार अपेक्षा आहेत याची आम्हाला जाणीव आहे. मराठी अनुवाद लवकरात लवकर प्रकाशित व्हावेत असा तगादा लोकांकडून वारंवार येत असतो. त्यांना हया अडचणींची काहीही कल्पना नसते. महाराष्ट्र शासनाने माहितीच्या अधिकाराचा कायदा पास केला आहे. फुले आंबेडकरी जनतेला आमची ही सद्य:स्थिती माहित करुन घेण्याचा अधिकार आहे अशी आमची नम्र धारणा आहे. त्यामुळे गैरसमज होण्याचे तरी टळेल.

डॉ.बाबासाहेब आंबेडकर जन्मशताब्दी वर्षात भारत सरकारने तत्कालीन पंतप्रधान व्ही.पी.सिंग यांच्या पुढाकाराने दिल्लीत डॉ.आंबेडकर फौंडेशनची स्थापना केली. दरवर्षी या फौंडेशनला रु.२०० कोटींचा निधी दिला जातो. त्यांनी आपल्याकडून हिंदी, बंगाली, तेलगू, गुजराथी अशा प्रमुख भारतीय भाषातील अनुवादाचे काम मागून घेतले आहे. आजवर १३ भाषांतील अनुवादाचे खंड प्रकाशित झाले आहेत. मराठीचे काम आपणच चांगले करु शकू या हेतूने आपण हे काम

त्यांना दिले नाही. आपण जाणकारांकडे हे काम सोपवले. त्यातल्या वसंत मून, प्र.श्री.नेरुरकर, आ.ना.पेडणेकर या अनुवादकांचे काम पूर्ण केल्यानंतर निधन झाले आहे. गौतम शिंदे, विजय कवीमंडन, प्रा.विनोद नंद, डि.वाय.हाडेकर, डॉ.आर.के.क्षीरसागर यांनी त्यांच्याकडील अनुवादाचे काम पूर्ण करुन आमच्याकडे सुपूर्द केले आहे. हे अनुवाद तज्ज्ञांकडून तपासून घेतले असून त्यांची छपाई लवकरात लवकर करण्याचा आमचा प्रयत्न आहे. अत्यल्प मनुष्यबळ आणि उपरोक्त अडचणी यामुळे हे काम धीम्या गतीने चालू आहे. उर्वरित खंडांच्या अनुवादकांचे कामही लवकर पूर्ण व्हावे यासाठी आम्ही पाठपुरावा करीत आहोत. दरम्यान आवृत्त्या संपलेल्या ग्रंथांच्या प्रतींना खूप मागणी आहे. त्यांच्या नव्या आवृत्त्या काढण्याचेही नियोजन आम्ही केले आहे. दुसऱ्या खंडाची दुसरी आवृत्ती लवकरच उपलब्ध होईल.

१९ व्या खंडात बाबासाहेबांच्या ८७ लेखांचा समावेश असून त्यातील समकालीन संदर्भ कळण्यासाठी आवश्यक ती ४७ परिशिष्टे सोबत दिली आहेत.

२० व्या खंडात बाबासाहेबांचे ११७ लेख असून सोबत २६ परिशिष्टे दिलेली आहेत. बाबासाहेबांचे समग्र मराठी साहित्य वाचण्याकरिता अभ्यासकांनी खंड १८, १९ व २० एकत्रित वाचायला हवेत. अठराव्या खंडात आम्ही बाबासाहेबांची भाषणे छापताना मूकनायक, बहिष्कृत भारत, जनता व प्रबुध्द् भारत यामधील त्यांची भाषणे घेतली होती. त्यांची पुनरुक्ती टाळण्यासाठी या १९ व २० खंडांमध्ये या भाषणंचा समावेश केलेला नाही.

१९ व्या खंडाच्या पृष्ठ ५७९वर, व्यक्ती, संस्था, कार्यसूचीमध्ये, सहस्त्रबुध्दे, गंगाधर निळकंठ यांच्याबदद्ल माहिती देताना महाडच्या सत्याग्रह परिषदेत दि.२५ डिसेंबर,१९२७ला मनुस्मृती दहनाचा ठराव मांडून हयांच्याच हस्ते बाबासाहेब आंबेडकरांनी मनुस्मृतीचे दहन करविले होते असे नमूद करण्यात आले आहे. प्रत्यक्षात मनुस्मृती दहनाचा ठराव श्री.सहस्त्रबुध्द् यांनी मांडला असला तरी प्रत्यक्ष मनुस्मृतीचे दहन मात्र त्यांचे हस्ते करण्यात आले नसून "हा विधि सभेस जमलेल्या अस्पृश्य वर्गाच्या साधूसंतांच्या हातून करण्यात आला." (पाहा- डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक, संपा.वसंत मून, महाराष्ट्र शासन, १९९०,पृ.१६३.) या नजरचुकीबदद्ल दिलगीर आहोत.

मराठी अनुवाद आम्ही लवकरात लवकर प्रकाशित करावेत यासाठी दिल्लीच्या डॉ.आंबेडकर फौंडेशनचे प्रमुख आयु.किशोर बाबू यांनी आमच्याकडे आग्रह धरला. बहुजन समाज पक्षाचे नेते प्रा.सुरेश माने यांनी या कामी पाठपुरावा केला. संपादक आणि पत्रकार मित्र आयु.कुमार केतकर (लोकसत्ता), आयु.अरुण खोरे (सकाळ), आयु.उत्तम कांबळे (सकाळ), आयु.बबन कांबळे (सम्राट), आयु.बाबा गाडे (महानायक), विजय चोरमारे, बंधुराज लोणे, स. सो. खंडाळकर, यदु जोशी, विद्याधर दाते या सर्वांनी समितीबद्दल लेखन करून समितीच्या कामांना गती दिली.

दुबई येथील डॉ.आंबेडकर इंटरनॅशनल मिशनने एप्रिल २००४ मध्ये आम्हाला डॉ.आंबेडकर जयंती समारंभाचे प्रमुख व्याख्याते म्हणून निमंत्रित करुन मध्यपूर्वेतील आखाती देशांमध्ये आमची व्याख्याने आयोजित केली होती. दुबई , आबूधाबी, शारजा, अलयेन, कुवेत, कतार, मस्कत आदी ठिकाणचे हजारो लोक या व्याख्यानांना उपस्थित होते. डॉ.आंबेडकरांच्या विविध पैलूवरील भाषणांच्या सी.डी.काढून त्यांचा अनेक देशांमध्ये प्रसार करण्यात आला. डॉ.आंबेडकर विचारांचा प्रचार-प्रसार करण्यासाठी तळमळीने प्रेरित होऊन कार्यक्रम आयोजित करणारे आयु.डॉ.वसंत म्हस्के, आयु.रत्नाकर दंडवते, प्रा.काशीकृष्णा, आयु.संदीप कर्डक, आयु.महेंद्र रोकडे, आयु.मनिष गेडाम, आयु.धीरज गोंडाणे, आयु.सोपान शिवभक्त, आयु.मारुती खारगे आणि त्यांच्या सर्व सहका-यांचा ऋणनिर्देश केला पाहिजे.

बामसेफ हे आंबेडकरी विचारांच्या प्रचार प्रसारामध्ये अग्रेसर असलेले संघटन आहे. त्यांचे राष्ट्रीय अध्यक्ष, आयु.वामन मेश्राम, बी.डी.बोरकर, मुंबईचे डॉ. विनायक काळे आदींचे या कामाकडे बारकाईने लक्ष असते. मुंबई फ्रेंड सर्कल, बहुजन साहित्य संस्कृती कला अकादमी आणि भवतु सब्ब मंगलम् या तीन कृतिशिल युवक गटांचे डॉ. हर्षदीप कांबळे, डॉ.राहुल गजभिये, आयु.सचिन शेंडे, आयु.जयंत रामटेके, डॉ.अनूप ताकसांडे, डॉ.अमोल सूर्यवंशी, डॉ.राहुल पाटील, आयु.शुद्धोधन आहेर, अनिल पवार, सुनिल खोब्रागडे, शांतू डोळस, जितेंद्र निकाळजे, आयु.माणिक भोंगडे, धोंडिराम लोखंडे,मुलुंड, एच.आर.गवई,नेरुळ व त्यांचे कुटुंबिय यांच्याविषयीची कृतज्ञता शब्दात व्यक्त करणे कठीण आहे.

समितीचे कार्यालय मुंबईत आणि आमचे घर पुण्यात असल्याने तसेच व्याख्याने, शोधदौरे यांच्यासाठीही सतत फिरावे लागत असल्याने घरच्यांना कमी वेळ देता येतो. त्यात भर म्हणजे वर्षानुवर्षे वेतन न मिळणे यामुळे होणारा त्रास कूरकूर न करता सोसणाऱ्या कुटुंबियांबद्दलची (पत्नी संगिता, मुलगी प्रमिती, आई सोनाबाई) कृतज्ञता कोणत्या शब्दात व्यक्त करणार ?

जयसिंगपूर येथील बुद्धविहार हा दक्षिण भारतातील बौध्द् चळवळीचे महत्त्वपूर्ण केंद्र होय. कालवश भू.आ.कांबळे आणि जयसिंगपूरच्या उपासकांच्यासमवेत आम्ही आदरणीय भदंत उपगुप्त महास्थवीर यांच्या नेतृत्वाखाली १ महिन्याची संपूर्ण बौद्ध धम्मयात्रा केली. आयुष्यभर पुरणारी उर्जा या अभ्यासातून व अनुभवातून आम्हाला मिळाली. डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांना दीक्षा देणा-या संघामध्ये समाविष्ट असलेले भदंत जी.प्रज्ञानंद यांच्या भेटीत त्यांनी डॉ.आंबेडकर लेखन आणि भाषणे मालिकेची आस्थेवाईकपणे चौकशी केली. पूज्य भंतेजीनी समितीच्या कार्यालयाला भेट दिली व समितीच्या कार्याची प्रशंसा केली. महाराष्ट्र राज्य मागासवर्गीय विद्युत कर्मचारी संघटनचे आयु.एस्.पी.कांबळे, जे.जे.हॉस्पिटलचे नेत्रशल्य विशारद डॉ.तात्याबा लहाने आणि सुगावा प्रकाशनाचे प्रा.विलास वाघ यांचे अमोल मार्गदर्शन समितीच्या कामांना बळ देणारे ठरते.

समितीच्या कामांसाठी पुढील मान्यवरांनी आम्हाला लक्षणीय मदत केलेली आहे. सर्वश्री,ना.विलासराव देशमुख (मुख्यमंत्री), ना.सुशिलकुमार शिंदे (माजी मुख्यमंत्री व राज्यपाल,आंध्रप्रदेश), ना.आर.आर.पाटील (उपमुख्यमंत्री), ना.छगन भुजबळ (माजी उपमुख्यमंत्री व विद्यमान सार्वजनिक बांधकाम मंत्री), समितीचे पदसिध्द् अध्यक्ष आणि उच्च व तंत्र शिक्षण मंत्री ना. दिलीप वळसे पाटील, राज्यमंत्री ना. सुरेश शेट्टी, सामाजिक न्याय मंत्री ना. चंद्रकांत हांडोरे, विभागाच्या प्रधान सचिव डॉ.जॉयस् शंकरन्,उच्च शिक्षण विभागाचे संचालक डॉ.एस्.एस्.पठाण, सहसंचालक, प्रा.मुनव्वर अली, प्रशासन अधिकारी,आयु.वा.ग.भगत यांचे आम्ही कृतज्ञ आहोत.

मुख्यमंत्री कार्यालयाचे तत्कालीन सचिव,डॉ.संजय चहांदे, यशदाचे महासंचालक रत्नाकर गायकवाड, प्रा. रवीन्द्र चव्हाण, यवतमाळचे जिल्हाधिकारी डॉ.हर्षदीप कांबळे, वित्त विभागाचे सहसचिव आयु.सुरेश गायकवाड, उपसचिव,आयु.जयंत गायकवाड,अपंग कल्याण विभागाचे आयुक्त आयु. आर. के. गायकवाड, आदिवासी विकास विभागाचे सचिव भा.ई.नगराळे, मित्रवर्य प्रल्हाद जाधव (माहिती संचालक), सुरेश बांदीले, पोपट मलिकनेर, डॉ.अविनाश ढाकणे, श्री.संजीव जाधव, श्री.भोर, वित्त विभागाच्या कार्यासन अधिकारी श्रीमती सोनलस्मित पाटील यांच्या ऋणात राहायला आम्हाला आवडेल.

समितीचे ज्येष्ठ सदस्य, खासदार दादासाहेब तथा रा.सु.गवई म्हणजे आमचे उर्जाकेंद्रच होय. समितीच्या कामांमध्ये संपूर्ण बुडून गेलेले आमचे मार्गदर्शक म्हणून आम्ही त्यांना मानतो. त्यांची पाठपुरावा करण्याची क्षमता अपूर्व आहे. या खंडाच्या निर्मितीत त्यांचे विशेष श्रेय आहे. आम्ही त्यांचे आभारी आहोत.

आमदार प्रा.जोगेंद्र कवाडे यांनी वारंवार समितीच्या अडचणींना सभागृहात वाचा फोडली. त्यांच्या प्रयत्नामुळे प्रश्न सुटायला मदत झाली. खासदार रामदास आठवले, माजी खासदार प्रकाश आंबेडकर आणि अ.भा.मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा.केशव मेश्राम यांचा विशेष ऋणनिर्देश करायला हवा. आमचे सहकारी प्रा. कासारे, आयु. कांबळे व प्रा. गोडघाटे यांनी या खंडासाठी घेतलेल्या मेहनत आणि विस्तृत सूचीबद्दल आयु. कांबळे यांचे आभार.

डॉ.कृष्णा कांबळे, डॉ.सिध्दार्थ कांबळे, प्रा.आनंद आर.गजवे, डॉ.शैलेंद्र डी.लेंडे, प्रा.पारीश सी.भगत, दिनेश व्ही.रामटेके, प्रदीप गायकवाड, आणि प्रमोद एन्.कांबळे यांचे सहकार्य या खंडाच्या कार्यात आम्हाला मिळाले. नागपूरच्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर रिसर्च इन्स्टिटयूट कडून काही मजकूर उपलब्ध झाला.

शासन मुद्रण,लेखन सामग्री आणि प्रकाशने संचालनालयाचे प्रमुख श्री.प.ज.गोसावी, नागपूर येथील शासकीय मुद्रणालयाचे व्यवस्थापक, श्री.म.शं.गायकवाड आणि त्यांचे सर्व सहकारी यांचे आभार.

समितीचे सर्व मान्यवर सदस्य आणि सहसंचालक कार्यालयातील वरिष्ठ लिपिक श्रीमती उपरकर, समिती कार्यालयाचे श्रीमती शलाका तांबे, श्रीमती सु.मा.नेवरेकर,श्री.कमलाकर नीलवर्ण,श्री.मा.द.पाडावे.श्री.वि.अ.वैद्य यांचाही उल्लेख करायला हवा.

आयु.अप्पासाहेब रणपिसे, (दलितांची वृत्तपत्रे,१९६२), आयु.रत्नाकर गणवीर,(बहिष्कृत भारतातील अग्रलेख, बहिष्कृत भारतातील स्फूटलेख), डॉ.हरीशचंद्र निर्मळे (दलितांची नियतकालिके), प्रा. सुखराम हिवराळे, डॉ. यशवंत मनोहर, प्रा. अरुण कांबळे (जनता पत्रातील लेखः डॉ.बाबासाहेब आंबेडकर,१९९२) प्रा. गंगाधर पानतावणे (पत्रकार डॉ. आंबेडकर) यांच्या प्रयत्नाने डॉ.बाबासाहेब आंबेडकरांची पत्रकारिता आपल्यापुढे आली होती. तिचे समग्र रुप आपल्याला आमच्या या खंडांमध्ये बघता येईल.

डॉ.आंबेडकर भारतीय पत्रकारांचे अग्रणी आणि मराठी पत्रकारितेचे अग्रमानांकित पत्रपंडीत होते, याची जाणीव या खंडांनी सर्व भारतीयांमध्ये निर्माण होईल असा विश्वास वाटतो.

या ग्रंथातील उणिवा कळविल्यास पुढील आवृत्तीत त्या दुरुस्त करु. कृपया कळावे / कळवावे. अभिप्रायाच्या प्रतिक्षेत.

आपला स्नेहांकित,

**हरी नरके**

सदस्य सचिव,

डॉ. बाबसाहेब आंबेडकर चरित्र साधने

प्रकाशन समिती

# संपादकीय

आधुनिक महाराष्ट्राच्या निर्मितीमध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे कार्यकर्तृत्व हे अनन्यसाधारण स्वरुपाचे आहे. त्यांच्या कार्यकर्तृत्वाने महाराष्ट्राचा चेहरा मोहरा अंतर्बाह्य उजळून निघाला आहे. त्यांनी मराठी मानसिकतेला परिवर्तनवादी विचारांची नवीन दिशा दिली. त्यांच्या या नवविचारांमुळे महाराष्ट्रात सर्वस्पर्शी प्रबोधनपर्व उभे ठाकले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी येथे निर्माण केलेली प्रबोधनाची प्रक्रिया ही सर्वंकष स्वरुपाची होती. येथील गतानुगतिक समाजमनाला गतिशील करणारी होती. बाबासाहेबांनी निर्माण केलेली ही सामाजिक गतिशीलता केवळ महाराष्ट्रापुरती मर्यादित नाही. त्यांच्या या सामाजिक गतिशीलतेला व्यापक स्वरुपाचे भारतीय परिमाण आहे. बाबासाहेब आंबेडकर हे अखिल भारताला तेजोभान प्राप्त करून देणारे विचारवंत होते. त्यांचे लेखन व चिंतन हा आधुनिक भारतातील लेखन-चिंतनाचा महत्त्वपूर्ण आविष्कार होय.

बाबासाहेब आंबेडकरांचा लेखनाविष्कार प्रामुख्याने इंग्रजी भाषेतून प्रगट झालेला आहे. त्यांचे बहुतांश लेखन इंग्रजीत आहे. असे असले तरी त्यांनी मराठी भाषेतूनही लेखन केलेले आहे. त्यांचे मराठी लेखन संख्यात्मक दृष्टीने अल्प व मर्यादित स्वरुपाचे आहे. पण गुणात्मक दृष्टीने त्यांचे हे लेखन अत्यंत महान स्वरुपाचे आहे. बाबासाहेबांच्या मराठी लेखनातील गुणात्मकता ही इतकी मौलिक आहे की त्यामुळे त्यांचे लेखन मराठी अक्षरवाङ्मयात सहजपणे स्थान घेऊ शकते. बाबासाहेबांच्या मराठी लेखनाचे अक्षरत्व महाराष्ट्रीय समाजापर्यंत पाहिजे तितके पोचलेले नाही. त्यांचे मराठी लेखन हा काहीसा अलक्षित व दुर्लक्षित राहिलेला विषय आहे. बाबासाहेबांनी मराठीमधून वृत्तपत्रीय लेखन केले. त्यांनी मूकनायक, बहिष्कृत भारत, जनता आणि प्रबुद्ध भारत या चार वृत्तपत्रांना जन्म दिला. या वृत्तपत्रांमधून त्यांनी प्रभावीपणे नवविचारांची मांडणी केली. ही मांडणी आधुनिक महाराष्ट्राची नव्याने जडणघडण करणारी सिद्ध झाली आहे.

या एकोणिसाव्या खंडामध्ये बाबासाहेब आंबेडकरांचे मूकनायक व बहिष्कृत भारत या वृत्तपत्रांतील अग्रलेख व स्फुट लेख संग्रहित करण्यात आले आहेत. बाबासाहेबांनी मूकनायक हे वृत्तपत्र १९२० मध्ये काढले. या मूकनायकच्या रुपातून त्यांनी मूक असलेल्या दलित समाजाचे नायकत्व

स्वीकारले आणि समाजाला पहिल्याप्रथम वाचाही प्राप्त करून दिली. डॉ. बाबासाहेब उच्च शिक्षणासाठी ब्रिटनला गेल्यामुळे हे वृत्तपत्र लवकरच बंद पडले. यानंतर बाबासाहेबांनी १९२७ मध्ये बहिष्कृत भारत या वृत्तपत्राची सुरुवात केली. या वृत्तपत्राच्या माध्यमातून बाबासाहेबांचे वृत्तपत्रीय कार्यकर्तृत्व खऱ्या अर्थाने बहराला आले. मूकनायक ते प्रबुद्ध भारत असा त्यांच्या वृत्तपत्रीय लेखनाचा प्रवास उत्तरोत्तर वर्धिष्णू होणारा आहे. इ. स. १९२० ते १९२८ या आठ वर्षांच्या कालखंडातील बाबासाहेबांचे लेखन या खंडात समाविष्ट केलेले आहे. मूकनायक व बहिष्कृत भारत या वृत्तपत्रांतील विचारविश्व या ग्रंथामध्ये साकल्यपूर्वक आविष्कृत झाले आहे.

वृत्तपत्र हे विकासाचे प्रभावी साधन होय. पाश्चिमात्य संस्कृतीमधून वृत्तपत्र या देशात आले. नवविचारांच्या आविष्काराचा नवा प्रवाह या वृत्तपत्रांनी आकारास आणला. आधुनिक कालखंडात वृत्तपत्र हे स्वमत प्रतिपादनाचे व विचाराविष्काराचे अमोघ माध्यम बनले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी वृत्तपत्रांचे महत्त्व पुरते ओळखले व या माध्यमाचा लोकजागृतीकरिता प्रभावीपणे वापर केला. मूकनायकामधून त्यांचे वृत्तपत्रीय लेखन सर्वप्रथम प्रगट झाले. मूकनायकचा जन्म म्हणजे आंबेडकरी चळवळीचा मूळारंभ होय. खरे तर सोमवंशीय मित्र, हिंद नागरिक, विटाळविध्वंसक यासारखी वृत्तपत्रे मूकनायकापूर्वी निर्माण झाली होती व काळाच्या ओघात लोपही पावली होती. या वृत्तपत्रांनी दलित पतितांच्या जीवनातील व्यथा-वेदना, आकांत-आक्रोश आपापल्या मगदुराप्रमाणे मांडण्याचा प्रयत्न केला. या वृत्तपत्रांमधून आंबेडकरी पत्रकारितेचे धूसरपणे का होईना, संसूचन होते. पण आंबेडकरी पत्रकारितेची खरीखुरी नवी पहाट उदयास आली, ती मूकनायकामधूनच होय.

आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये वृत्तपत्रांनी बजावलेली भूमिका डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना चांगल्या प्रकारे ज्ञात होती. तळा-गाळातील दलित वर्गामध्ये नवजागृती आणण्यासाठी वृत्तपत्राखेरीज अन्य प्रभावी साधन कोणतेही नाही, याची त्यांना प्रकर्षाने जाणीव होत होती. एकोणिसाव्या शतकामध्ये वृत्तपत्रांच्या माध्यमातून अस्तित्वात आलेला प्रबोधनाचा विचार प्रवाह त्यांना अवगत होता. विसाव्या शतकातील प्रबोधन बाबासाहेबांना आपल्या वृत्तपत्रांमधून आकारास आणायचे होते. दलित-शोषितांच्या भाव-भावनांना वाचा फोडण्याच्या प्रयत्नातून त्यांच्या वृत्तपत्रांचा जन्म झाला. १९१९ मध्ये आलेल्या साऊथबरो कमिशनच्या वेळी आंबेडकरांना वृत्तपत्राची प्रकर्षाने आवश्यकता वाटू लागली. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांची मागणी व

दलितवर्गाची कैफियत अस्पृश्यांचा प्रतिनिधीच अंतरीच्या उमाळ्यातून मांडू शकतो, हे साऊथबरो कमिशनच्या निमित्ताने त्यांच्या लक्षात आले. हजारो वर्षाच्या मुक्या मनांना जिवंत करण्याच्या गरजेपोटी ३१ जानेवारी १९२० रोजी मूकनायक या पाक्षिकाचा जन्म झाला. छत्रपती शाहू महाराजांच्या आर्थिक मदतीमुळे या पाक्षिक वृत्तपत्राला मूर्त रूप धारण करणे शक्य झाले.

बाबासाहेब आंबेडकरांचे मूकनायक सर्व अंगांनी अर्थपूर्ण होते. या वृत्तपत्राच्या पहिल्याच अंकात त्यांनी वृत्तपत्रनिर्मितीसंबंधीची भूमिका निःसंदिग्ध स्वरुपात व्यक्त केली आहे. ते लिहितात, '' आमच्या या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढे होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास, तसेच त्यांची भावी उन्नती व तिचे मार्ग यांच्या खऱ्या स्वरुपाची चर्चा होण्यास वर्तमानपत्रासारखी अन्य भूमीच नाही. परंतु मुंबई इलाख्यात निघत असलेल्या वृत्तपत्रांकडे न्याहाळून पाहिले असता असे दिसून येईल की, त्यातील बरीचशी पत्रे विशिष्ट जातींचे हितसंबंध पाहाणारी आहेत. इतर जातींच्या हिताची त्यांना पर्वा नसते. इतकेच नव्हे तर केव्हा केव्हा त्यांना अहितकारक असेही त्यातून प्रलाप निघतात..... दीनमित्र, जागरुक, डेक्कन रयत, विजयी मराठा, ज्ञानप्रकाश, सुबोधपत्रिका वगैरे पत्रांतून बहिष्कृत समाजाच्या प्रश्नांची चर्चा वारंवार होते. परंतु ब्राह्मणेतर या संज्ञेखाली मोडत असलेल्या अनेक जातींच्या प्रश्नांचा ज्यात खल होतो ; त्यात बहिष्कृतांच्या प्रश्नांचा सांगोपांग उहापोह होण्यास पुरेशी जागा मिळणे शक्य नाही, हेही पण उघड आहे. त्यांच्या अतिबिकट स्थितीशी संलग्न असलेल्या प्रश्नांची चर्चा करण्यास एक स्वतंत्र पत्र पाहिजे हे कोणीही कबूल करील. ही उणीव भरून काढण्यासाठी या पत्राचा जन्म आहे.'' बाबासाहेबांनी वृत्तपत्राची निर्मिती प्रेरणाच या ठिकाणी व्यक्त केली आहे. वृत्तपत्रांची भूमिका ही सर्व जाती-जमातींच्या कल्याणाची असावी, या प्रकारची सार्थ अपेक्षा ते येथे विशद करतात.

बाबासाहेबांचा मूकनायक मोठ्या ध्येयनिष्ठेतून आकारास आलेला आहे. त्यांची ध्येयनिष्ठा ही समाजजागृतीची निष्ठा आहे. बाबासाहेबांची वृत्तपत्रनिर्मिती सामाजिक बांधिलकीच्या तत्त्वातून झालेली आहे. या वृत्तपत्राच्या बिरूदावलीवरून त्यांच्या वृत्तपत्राचे सामाजिक ध्येयधोरण चांगल्याप्रकारे अभिव्यक्त होते.

" काय करू आता धरूनिया भीड ।
निःशंक हे तोंड वाजविले ।।
नव्हे जगी कोणी मुकीयांचा जाण ।
सार्थक लाजून नव्हे हित ।। "

आपल्या वृत्तपत्राची ध्येयनिष्ठा प्रगट करताना बाबासाहेब संत तुकारामांच्या ओळींचा आधार घेतात. या ओळी निवडण्यात मोठे औचित्य आहे. तुकारामांच्या या अत्यंत अर्थपूर्ण ओळी बिरूदावलीच्या रूपात उद्धृत करीत बाबासाहेब मूक समाजाचे अंतर्मनच वाचकांसमोर उलगडून दाखवितात. बाबासाहेबांचा मूकनायक हा असा सर्वार्थाने समाजपरिवर्तनासाठी सिद्ध झाला आहे.

या खंडामध्ये मूकनायकातील बाबासाहेब आंबेडकरांचे महत्त्वपूर्ण लेख संपादित करण्यात आले आहेत. स्वराज्याची सर सुराज्याला नाही ! हे स्वराज्य नव्हे, हे तर आमच्यावर राज्य, स्वराज्यातील आमचे आरोहण, राष्ट्रांतील पक्ष हे लेख येथे संग्रहित केले आहेत. या लेखांतील आशयाचे अवलोकन केल्यास या लेखांची मौलिकता ध्यानात येऊ शकते. भारतीय समाजरचनेबद्दल तसेच राजकीय व्यवस्थेबद्दल बाबासाहेबांच्या कल्पना सुस्पष्ट आहेत. या लेखांच्या शीर्षकांवरून आशयतत्त्वाची निःसंदिग्ध मांडणी प्रत्ययास येते. बाबासाहेब स्वराज्याचा विचार करताना त्याचा विचार समग्र समाजाच्या उत्थानासंदर्भात करतात. म्हणूनच स्वराज्याची सर सुराज्याला नाही असे राष्ट्रीय सभेने कितीही म्हटले असले तरी स्वराज्य कोणाचे व ते कशासाठी हे कळल्याखेरीज या तत्त्वाची री आम्ही ओढू शकत नाही हे स्वच्छपणे बाबासाहेब प्रतिपादन करतात. स्वराज्याबद्दलचे बाबासाहेबांचे विचार पूर्णपणे परंपरामुक्त स्वरूपाचे आहेत. ते दलित-मुक्तीच्या व बहुजनमुक्तीच्या कल्पनेतून स्वराज्याकडे पाहतात. एतद्देशीयांचे स्वराज्य दलित-शोषित-वर्गाला आणखी गुलाम करणारे राहील, ही त्यांची शंका वास्तवदर्शी आहे. म्हणूनच ते हे स्वराज्य नव्हे, हे तर आमच्यावर राज्य असे निर्भिडपणे प्रतिपादन करू शकतात. बाबासाहेबांचे मूकनायकातील लेखन हे याप्रकारे राजकीय प्रश्नोपप्रश्नांचे साक्षेपी विश्लेषण सादर करते. बाबासाहेबांना दलित वर्गाची सामाजिक जागृती करायची होतीच, त्याचबरोबर त्यांना विशेषत्वाने राजकीय जागृतीदेखील निर्माण करायची होती. या सर्वंकष जागृतीचे प्रत्यंतर मूकनायकातील लेखांतून उत्कटपणे साकार होते.

बाबासाहेब आंबेडकरांचा मूकनायकापासून सुरू झालेला वृत्तपत्रीय लेखनाचा प्रवास बहिष्कृत भारतामध्ये विशाल रूप धारण करतो.

३ एप्रिल १९२७ पासून या बहिष्कृत भारतास सुरुवात झाली. हे बहिष्कृत भारत म्हणजे आंबेडकरी चळवळीचे सर्वार्थाने मुखपत्र होय. बाबासाहेबांच्या विचारांचा दिव्यदाहकपणा या बहिष्कृत भारतामधून मोठ्या मूल्यगर्भपणे अभिव्यक्त होतो. तत्कालीन आजकालच्या प्रश्नांपासून ते या वृत्तपत्राला प्रारंभ करतात. बाबासाहेबांच्या कालखंडातील तात्कालिक घटनाप्रसंगांपासून तर नवनवीन तत्त्वसिद्धांतांच्या मांडणीपर्यंतचा महाकाय व्याप हे लेखन तोलून धरते. या लेखनाला विधायक स्वरुपाची तत्त्वशुद्धता आहे. मूकनायकाप्रमाणेच या वृत्तपत्राला ते बिरुदावली देतात. ही बिरुदावली अत्यंत लक्षणीय स्वरुपाची आहे. ज्ञानेश्वरीच्या तिसऱ्या अध्यायातील क्र. १८९, १९०, १९१ या तीन ओव्या ते येथे उद्‌धृत करतात–

" आता कोदंड घेऊनि हाती । आरुढ पां इथे रथी ।
देई आलिंगन वीरवृत्ती । समाधाने ।।
जगी कीर्ति रुढवी । स्वधर्माचा मानु वाढवी ।।
इया भारा पासोनि सोडवी । मेदिनी हे ।।
आता पार्था निःशंकु होई । या संग्रामा चित्त देई ।
एथ हे वाचूनि काही बोलो नये ।। "

बाबासाहेबांनी उद्‌धृत केलेल्या ह्या ओळी विलक्षण अर्थगर्भ आहेत. बाबासाहेबांनी नव्या संघर्षास सिद्ध होऊ पाहणारी मनोवस्था येथे प्रभावीपणे व्यक्त होते. या ओव्या देऊन बाबासाहेब या देशातील तमाम अन्यायग्रस्तांना तसेच स्त्री-शूद्रातिशूद्रांना निकराच्या संघर्षाचा संदेश देतात.

बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारतातील अग्रलेख तसेच स्फुटलेख परिवर्तनाच्या विचारांनी झपाटलेले आहेत. या खंडामध्ये ३ एप्रिल १९२७ ते २१ डिसेंबर १९२८ या कालखंडातील बहिष्कृत भारतामधील लेख संग्रहित केलेले आहेत. महाड येथील धर्मसंगर व वरिष्ठ हिंदुंची जबाबदारी, महाड येथील धर्मसंगर व इंग्रज सरकारची जबाबदारी, महाड येथील धर्मसंगर व अस्पृश्यवर्गाचे कर्तव्य यासारख्या प्रारंभीच्या लेखांमधून बाबासाहेब येथील महाराष्ट्र भूमीवर निर्माण झालेल्या धर्मसंग्रामाचा अन्वयार्थ विजिगीषू वृत्तीने अभिव्यक्त करतात. यासोबतच अस्पृश्यता निवारणाचा पोरखेळ, दुःखात सुख, आमचे टीकाकार, महार आणि त्यांचे वतन, हिंदुंचे धर्मशास्त्र यासारखे महत्त्वपूर्ण लेख ते लिहितात व त्यातील संघर्षवादी आशयतत्त्व वाचकांच्या मनापर्यंत पोचवितात. बहिष्कृत भारतामधील बाबासाहेबांचे लेखन हे विलक्षण अर्थवाहक स्वरुपाचे आहे. हजारो वर्षांपासून तळा-गाळात पिचत

पडलेल्या मृत व मूक मनांना जागृत करण्याची अत्युत्कट क्षमता त्यातील प्रत्येक लेखामधून अभिव्यक्त होते. म्हणूनच हे लेख बाबासाहेबांच्या जागृत मनाचा ज्वलजहाल आविष्कार मानावे लागतात.

बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारतामधून साकार झालेले लेखन हे क्रांतिकारी आशयाचे आहे. हे लेखन वरपांगी सुधारणा अथवा पोकळ डागडुजी करणारे नव्हे. येथील प्रस्थापित समाजरचनेमध्ये मूलगामी परिवर्तन घडवून आणणे, हे या लेखनाचे जीवितध्येय होय. महाड येथे बाबासाहेबांनी जो चवदार तळे मुक्तीचा धर्मसंग्राम उभारला, त्या निमित्ताने ते जनप्रबोधनाची प्रक्रिया दलितवर्गाच्या अंतर्मनापर्यंत नेऊन पोचवितात. अस्पृश्य वर्गाला शेकडो वर्षांपासून गुलाम करणाऱ्या धर्मकल्पनांविरुद्ध ते रान उठवितात. येथील धर्मकल्पनांचा खोटारडेपणा ते शास्त्रशुद्ध चिकित्सेतून सिद्ध करतात. जातीयता, विषमता व अस्पृश्यता निर्माण करणाऱ्या धर्मग्रंथांचा ते खरपूस समाचार घेतात. हा समाचार खरपूस असला तरी तो तितकाच वास्तवदर्शी असतो. अस्पृश्यतेची रुढी कायदेशीर नाही हे स्पष्ट करतानाच ते अस्पृश्यता ही एक स्पृश्य लोकांची लहर आहे हे सप्रमाण सिद्ध करून दाखवितात. पिढीजाद अस्पृश्य वर्ग हिंदुस्थानाशिवाय जगाच्या पाठीवर अन्यत्र कोठेच नसल्याचे ते प्रतिपादन करतात. या अस्पृश्यतेला नष्ट करण्याचे प्रस्थापित धर्मनिष्ठांचे प्रयत्न त्यांना पोरखेळ वाटतात. अस्पृश्य वर्गाची गुलामगिरी वरिष्ठ वर्गाच्या प्रयत्नाने दूर होणार नसून ती अस्पृश्य वर्गाच्याच प्रयत्नाने नष्ट होऊ शकेल, याबद्दल बाबासाहेबांना पूर्ण खात्री आहे. म्हणूनच ते समस्त अस्पृश्य वर्गाला या लेखनाच्या माध्यमातून जागृत व जिवंत करू इच्छितात. प्रस्थापित वर्गातील विचारशून्य लोकांस विचारप्रवृत्त करणे हा या लेखनाचा आनुषंगिक उद्देश आहे. पण या लेखनाचा मध्यवर्ती उद्देश दलितवर्गाला नवी अस्मिता प्राप्त करून देणे, हा होय. नव अस्मितेची निर्मिती ही काही गोडीगुलाबीच्या नाजूकसाजूक शब्दांनी होत नसते. त्याकरिता शब्दांची अस्त्रे बनवावी लागतात. ती शस्त्रांप्रमाणे परजावी लागतात. बाबासाहेब बहिष्कृत समाजाला जितेजागते करण्यासाठी शब्दांचे वडवानळ निर्माण करतात व त्याआधारे अग्नीप्रमाणे दाहक असणारे क्रांतिकारी विचार आविष्कृत करतात.

बहिष्कृत भारतातून बाबासाहेब आंबेडकरांनी अस्पृश्य वर्गाला खितपत ठेवणाऱ्या विविध प्रथा-परंपरांचा सखोल विचार केला आहे. यासंदर्भात त्यांचे महार आणि त्यांचे वतन याबाबतचे विवेचन विशेषत्वाने विचारात घ्यावे लागते. या विषयाबाबतची आपली भूमिका बाबासाहेबांनी येथे सविस्तरपणे मांडली

आहे. अनेक लेखांतून ते या प्रश्नांची सविस्तर चर्चा-चिकित्सा करतात. या वतनातील विविध दोष व विसंगती ते तपशीलवार विशद करतात. ही महार वतन पद्धती म्हणजे अनिर्बंध स्वरुपाची वेठबिगारी व बेबंदशाही होय. हे महार वतन म्हणजे मूर्तिमंत गुलामगिरी होय, याबद्दल बाबासाहेबांना शंका वाटत नाही. काम करावे महारांनी व वतन खावे परक्यांनी ही विपरीत अवस्था ते वाचकांसमोर ठेवतात. या महार वतनामुळे महार गुलामच नव्हे तर स्वाभिमानशून्य व लाचार झाल्याचे ते स्पष्ट करतात. ज्या वतन पद्धतीपासून महार कामगारांचे तसेच महार जातीचे अपरिमित नुकसान झाले आहे, ती महार वतनपद्धती खालसा करणे त्यांना अत्यावश्यक वाटते. यासंदर्भात बाबासाहेब लिहितात, '' वतन म्हणजे महाराच्या दारातील शेवगा आहे. तो कापून काढल्याखेरीज त्यांच्या परिस्थितीत क्रांती घडणार नाही आणि त्यांच्या जीवनक्रमात अशा प्रकारची क्रांती घडल्याशिवाय महार लोक स्वतंत्रपणे उद्योग करून राहण्यास प्रवृत्त होणार नाहीत. वेसकरकी हे महाराच्या महत्त्वाकांक्षेवर मोठे दडपण आहे. वेसकरकी ही आपली अढळ बादशाही, यापेक्षा आपल्याला श्रेष्ठ असा दर्जा तो काय असावयाचा या भावनेने ग्रस्त झालेले महार आई-बाप आपल्या मुलांना वेसकरकीपेक्षा दुसरी उन्नतावस्था प्राप्त करून देण्याचा विचार मुळी आपल्या मनाला शिवूसुद्धा देत नाहीत. वेसकरकीच्या व्यवसायात सापडल्यामुळे कोणीही महार दुसरा पेशा घेण्याची इच्छा करीत नाही.......... म्हणून आम्ही म्हणतो की, खुरटलेला महार समाज वाढीस लागावा हे जर इष्ट असेल तर प्रथमतः महार वतन खालसा झाले पाहिजे.'' वतन गेल्याशिवाय महारांची सुधारणा होणे शक्य नाही, हे बाबासाहेबांना पुरते कळल्यामुळे ते याप्रकारची निर्णायक भूमिका घेतात.

बहिष्कृत भारतातील बाबासाहेबांचे लेखन समाजजीवनाच्या सर्व बाजूंना साक्षेपपूर्वक स्पर्श करणारे आहे. मानवी जीवनाशी संबंधित असणाऱ्या सर्व घटकांचा, घटना-प्रसंगांचा ते सूक्ष्मपणे मागोवा घेतात. हा मागोवा प्रत्येक घटकाच्या, घटकावयवाच्या मूळापर्यंत जाणारा असतो. नामूल लिख्यते किंचित हा त्यांच्या लेखनाचा बाणा आहे. समाजपरिवर्तनाशी संबंधीत असणारा कोणताही विषय त्यांच्या लेखणीला वर्ज्य नाही. जे जे समाजहितकारक व समाजोपयोगी आहे, ते ते विषय बाबासाहेब समर्थपणे हाताळतात. समाजविघातक कल्पनांचे उच्चाटन व समाजहितकारक संकल्पनांचे सर्जन, या दुहेरी पातळीवर त्यांचे लेखन आकारास येते. त्यांच्या लेखनाला प्रगमनशील ध्येयनिष्ठेचा ताठ कणा आहे. या ध्येयनिष्ठेच्या बळावर त्यांचे लेखन आशयतत्त्वानुरुप हवे तसे रूप धारण करीत जाते. अस्पृश्यवर्गाची

कैफियत सादर करताना हे लेखन कधी भावकोमल व व्याकुळ होते तर कधी अस्पृश्यवर्गाला आजन्म गुलाम करणाऱ्या प्रस्थापितांवर हल्ला चढविताना हे लेखन तेजाबाप्रमाणे ज्वलजहाल रूप घेते. व्यापक व सर्वस्पर्शी समाजप्रबोधनाकरिता बाबासाहेब संपूर्ण सामर्थ्यानिशी विचारसंघर्षाच्या रणांगणात उतरतात व प्रतिपक्षाला नामोहरम करून समतावादी नवमूल्यांची निर्मिती करतात. या नवमूल्यांच्या निर्मितीची महन्मंगल प्रभा बहिष्कृत भारतातील लेखनावर सर्वत्र पसरली असल्यामुळे त्यांचे हे लेखन विलक्षण वाचनीय व मननीय रूप धारण करते.

बहिष्कृत भारतातील लेखांमधून बाबासाहेबांचे अंतर्मन समग्रपणे प्रतिबिंबित झाले आहे. त्यांच्या जीवनातील भले-बुरे प्रसंग, विचारांचे उतार-चढाव, कडू-गोड आठवणी; हे सारे या लेखनातून हळूवारपणे प्रत्ययास येते. बाबासाहेबांचे संपूर्ण जीवन हे मुळात रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग या प्रकाराचे होते. त्यातल्या त्यात जनप्रबोधनार्थ वृत्तपत्र व्यवसाय सुरू केल्यामुळे आर्थिक टंचाई तर आणखीच भरीस भर म्हणून वाढली होती. बाबासाहेबांना वृत्तपत्र चालविताना किती त्याग करावा लागला, किती अडचणींना तोंड द्यावे लागले; यासंबंधात त्यांनी केलेले आत्मनिवेदन हे मूळातून पाहण्यासारखे आहे. बहिष्कृत भारताचे ऋण हे लौकिक ऋण नव्हे काय? या लेखात बाबासाहेब आपले अंत:करण मोकळे करताना लिहितात, “ प्रस्तुतच्या लेखकाने समाजकार्याप्रित्यर्थ जेवढा स्वार्थत्याग करणे त्यास शक्य होते तेवढा स्वार्थत्याग त्याने केला आहे. तो काही संस्थानिक नाही किंवा जहागीरदारही नाही. रानात नाही शेत व गावात नाही घर असे त्याच्यासंबंधी एकाने केलेले विधान सत्य आहे. काही झाले तरी म्हणण्यासारखी द्रव्यानुकूलता नसता इंग्रज सरकारने देऊ केलेली दरमहा अडीच हजार रुपयांपर्यंत वाढू शकणारी नोकरी त्याने मला नको म्हणून सांगितली. वकिलीसारख्या स्पृश्य लोकांवर अवलंबून असणाऱ्या धंद्यात विशेष किफायत मिळण्याची आशा नसतानाही केवळ समाजकार्य करण्यास मोकळीक असावी म्हणून त्याने तो पत्करिला आहे. रुढ धर्माचारातील आणि लोकाचारांतील दोषांचे निर्भयपणे आविष्करण करण्याचे भयंकर कार्य हाती घेतले असल्यामुळे, देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पत्रांकडून होत असलेल्या शिव्यांचा व शापांचा भडिमार तो एकसारखा सोशीत आहे. स्वमतांचे मंडन व तद्नुसार होईल तेवढे वर्तन करण्याचे त्याने ठरविल्यामुळे स्पृश्य वर्गातील आपल्या फार दिवसांच्या मित्रांचा दीर्घ रोष त्याने आपणावर करून घेतला आहे व जेणे करून त्याच्या धंद्यात त्यास मिळू शकणाऱ्या मदतीस तो दुरावला आहे. कवडीचा

फायदा नसताना त्याने एक वर्षाच्या आत बहिष्कृत भारताचे बऱ्या वाईट रीतीने रकाने भरुन काढून लोकजागृतीचे काम केले व ते करताना त्याने आपल्या प्रकृतीकडे, सुखाकडे, चैनीकडे व ऐषआरामाकडे न पाहता डोळ्याच्या वाती केल्या...... प्रस्तुतच्या लेखकाने जो स्वार्थत्याग केला आहे त्यात त्याने विशेष काही केले आहे असे नाही व प्रस्तुतचा लेखक तसे म्हणतही नाही.'' बाबासाहेबांचे हे आत्मनिवेदन अत्यंत व्याकुळ व करुणगंभीर स्वरुपाचे आहे. त्यांचे अंतर्मन येथे उत्युत्कटपणे अंतरीच्या उमाळ्यातून अभिव्यक्त होते.

वृत्तपत्राच्या माध्यमातून आकारास आलेला बाबासाहेब आंबेडकरांचा निबंध मराठी समाजजीवनामध्ये अत्यंत मोलाचा ठरतो. त्यांचा निबंध हा वैचारिक निबंध आहे. या निबंधाने महाराष्ट्रीय समाजजीवनाबरोबर भारतीय समाजजीवन देखील तळा-मुळापासून हलवून सोडले. भारतीय समाज विचारास त्यांनी विधायक दिशा बहाल केली. बाबासाहेबांचे समाजचिंतन हे मुळात मानवमुक्तीचे चिंतन आहे. त्यांचे समाजचिंतन हे स्थलकालाच्या तसेच देशप्रांताच्या सीमारेषा ओलांडून पुढे जाते व संपूर्ण वैश्विक जीवनाशयाला कवेत घेते. बाबासाहेबांचे समाजचिंतन विश्वोत्तीर्ण व कालोत्तीर्ण स्वरुपाचे आहे. त्यांचे सामाजिक चिंतन धर्म, अर्थ, राजकारण या सर्व घटकांचे सहसंबंध विश्लेषित करणारे आहे. हिंदूंची धर्मशास्त्रे व समाजशास्त्रे धर्ममार्तंडांच्या दृष्टिकोनातून एक असल्याचे ते प्रतिपादन करतात. बाबासाहेबांच्या मते, सामाजिक प्रश्नांचा विचार धर्मशास्त्राच्या अनुज्ञेप्रमाणे न करता तो समाजशास्त्राच्या सिद्धांताच्या आधारे करण्यात यावा. त्यामुळेच ते धर्मशास्त्राचे क्षेत्र व धर्मज्ञाचे अधिकार निश्चित करण्याची आवश्यकता विश्लेषित करतात. धर्मासाठी माणूस नसून माणसासाठी धर्म आहे, ही धर्माकडे पाहण्याची त्यांची स्वच्छ भूमिका आहे. त्यांची ही धर्मातीत व ईश्वरातीत भूमिका मानवाच्या लौकिक जीवनास अधिकाधिक समृद्ध करताना दिसते. मुक्त व आदर्श नागरिकत्वाच्या बाबासाहेबांच्या कल्पना अगदी सुस्पष्ट स्वरुपाच्या आहेत. ते लिहितात, '' कोणत्याही व्यक्तीस नागरिक म्हणविण्यास काही हक्क असावे लागतात. त्यात (१) वैयक्तिक स्वातंत्र्य, (२) वैयक्तिक संरक्षण, (३) खाजगी मालमत्ता बाळगण्याचा हक्क, (४) कायद्याच्या बाबतीत समता, (५) सद्सद्‌विवेक बुद्धीला अनुसरुन वागण्याची मोकळीक, (६) भाषणस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य, (७) सभा भरविण्याचा हक्क, (८) देशाच्या राज्यकारभारात प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क आणि (९) सरकारी नोकरी मिळविण्याचा हक्क, यांचा अंतर्भाव होतो.'' याच समाताधिष्ठित हक्कांचा पुरस्कार बाबासाहेब नंतरच्या काळात भारतीय संविधानामध्ये करताना दिसतात. त्यांचा वैचारिक निबंध हा या प्रकारे धर्मनिरपेक्ष लोकशाही मूल्यांचे संवर्धन करणारा आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे वृत्तपत्रीय योगदान हे असे क्रांतिकारी स्वरुपाचे आहे. या एकोणिसाव्या खंडामध्ये बाबासाहेबांची वृत्तपत्रीय विचारक्रांती साकल्याने ग्रथित करण्यात आली आहे. या ग्रंथात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अग्रलेख, स्फुटलेख, संदेश, लेख इत्यादी अंतर्भूत करताना त्यांनी लेखांस जी शीर्षके दिली होती, ती तशीच कायम ठेवण्यात आली आहेत. ज्या लेखांना विशेषतः स्फुटलेखांना त्यांनी शीर्षके दिली नव्हती, त्यांना संपादक मंडळाने त्यातील आशयानुरुप शीर्षके दिली आहेत. ही शीर्षके लक्षात येण्यासाठी ती इटालिकमध्ये नमूद केली आहेत. तत्कालीन महत्त्वपूर्ण घटना प्रसंगांवर भाष्य करणारी परिशिष्टे येथे विशेषत्वाने जोडलेली आहेत. बाबासाहेबांनी विचाराविष्कार करताना देश-विदेशातील अनेक विद्वान लेखकांच्या संशोधकांच्या विचार-कार्याचा उल्लेख केला आहे. तसेच विविध ऐतिहासिक, समाजशास्त्रीय तत्त्वसरणींचा, तत्त्वज्ञांच्या कार्यकर्तृत्वाचा आपल्या लेखनात परामर्श घेतला आहे. त्या व्यक्ती, संस्था यांच्या कार्याची विषयाच्या दृष्टीने माहिती होणे अगत्याचे असल्यामुळे त्यांच्या विषयीची आवश्यक ती माहिती व्यक्ती, संस्था कार्यसूची या विभागात दिलेली आहे. याचप्रमाणे डॉ. आंबेडकर यांनी आपल्या लेखनात काही महत्त्वपूर्ण घटना लक्षात घेऊन विचार प्रदर्शित केले आहेत व त्या घटनांची माहिती वृत्तपत्रातून प्रसिद्ध केली आहे. डॉ. आंबेडकरांनी काही लेखन स्वतः केले असले तरी प्रसंगानुरुप त्यांनी आपले नाव तृतीय वचनी लिहिले आहे. ही सर्व माहिती परिशिष्टात अंतर्भूत केली आहे.

**–संपादक–**

# अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका––चालू

# अनुक्रमणिका--चालू

# अनुक्रमणिका—चालू



●●●

# १
# मनोगत

जर या हिंदुस्थान देशातील सृष्ट पदार्थांच्या व मानवजातीच्या चित्रपटाकडे प्रेक्षक या नात्याने पाहिले तर, हा देश म्हणजे केवळ विषमतेचे माहेरघर आहे ; असे निःसंशय दिसेल. येथील सृष्टिपदार्थांची उपयुक्तता व विपुलता ; व त्याशी संलग्न असलेल्या अफाट जनसमूहात वसत असलेल्या दारिद्र्याची विषमता इतकी मनोवेधक आहे की, तिच्याकडे असावधपणातदेखील लक्ष गेल्याशिवाय रहाणार नाही. परंतु या विषमतेकडे लक्ष जाते न जाते तोच, या देशात वास्तव्य करणाऱ्या मानवांत नांदत असलेली, व उपरिनिर्दिष्ट धाकट्या बहिणीस लाजणारी ही थोरली विषमता दत्त म्हणून डोळयापुढे लख्ख उभी रहाते.

या हिंदी जनांत वसणारी विषमता अनेक स्वरूपाची आहे. सर्वसाधारण असलेली कायिक, व मानवकोटीच्या आद्य शाखाअन्वये उद्‌भवलेली विषमता येथेही आहेच. काळे-गोरे, उंच-ठेंगणे, नाकेले किंवा फेंदारलेले तसेच आर्य-अनार्य, गोंड-खोंड, यावनी-द्रविड, अरब व इराणी इत्यादी भेद काही ठिकाणी जागृत, तर काही ठिकाणी शमित ; व काही ठिकाणी स्थित पण आहेतच. धार्मिक विषमता कायिक व मानवकोटीच्या शाखाअन्वये येणाऱ्या विषमतेपेक्षा प्रज्वलित स्थितीत आहे व केव्हां केव्हां तर ही धार्मिक विषमता विकोपास जाऊन तिच्या पायीं रक्तपातसुद्धा होतो. हिंदु, पारसी, यहुदी, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे धार्मिक विषमतेचे तट तर आहेतच ; पण अधिक बारीक दृष्टीने पाहिल्यास हिंदुधर्मीयांत शिरलेल्या विषमतेचे स्वरुप जितके कल्पनातीत, तितकेच ते निंदास्पदही आहे.

हा मांग–हा ब्राह्मण, हा शेणवी–हा मराठा, हा महार–हा चांभार, हा कायस्थ–हा पार्शी, हा कोरी–हा वैश्य, इत्यादी भिन्न भिन्न जातींचा हिंदुधर्माच्या पोकळीत समावेश होतो. एकधर्मीयत्वाच्या भावनेपेक्षा भिन्न जातीयत्वभावनेच्या मुळया किती खोल गेल्या आहेत हे हिंदूंना सांगणे नकोच. एखाद्या युरोपीय गृहस्थाने आपण कोण ? या प्रश्नास इंग्लिश, जर्मन, फ्रेंच, इटालियन इत्यादीप्रकारचे उत्तर दिलें की समाधान होते. परंतु हिंदूंची मात्र तशी स्थिती नाही. मी हिंदू आहे या उत्तराने कुणाची तृप्ती व्हावयाची नाही. त्याला आपली जात काय ? हें सांगणें अगदी जरूर असते. म्हणजे आपली विवक्षित माणुसकी व्यक्त करण्यासाठी प्रत्येक हिंदूला आपली विषमता पदोपदी उघडकीस आणावी लागत आहे.

हिंदुधर्मीयांत असलेली ही विषमता जितकी अनुपम आहे, तितकीच ती निंदास्पदही आहे. कारण विषमतेनुरूप होणाऱ्या व्यवहाराचे स्वरूप हिंदुधर्माच्या शीलाला शोभण्यासारखे खास नाही. हिंदुधर्मात समाविष्ट होणाऱ्या जाती उच्च-नीच भावनेने प्रेरित झाल्या आहेत हे उघड आहे. हिंदुसमाज हा एक मनोरा आहे. व एक एक जात म्हणजे त्याचा एक एक मजलाच होय. पण लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे की, या मनोऱ्यास शिडी नाही. आणि म्हणून एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जाण्यास मार्ग नाही. ज्या मजल्यात ज्यांनी जन्मावे ; त्याच मजल्यात त्यांनी मरावे. खालच्या मजल्यातला इसम, मग तो कितीही लायक असो ; त्याला वरच्या मजल्यात प्रवेश नाही. व वरच्या मजल्यातला माणूस, मग तो कितीही नालायक असो ; त्याला खालच्या मजल्यात लोटून देण्याची कोणाची प्राज्ञा नाही.

उघड भाषेत बोलावयाचे म्हणजे जाती-जातीत असलेल्या या उच्च-नीच भावना, गुणावगुणांच्या पायावर झाल्या आहेत ; असे नाही. उच्च जातीत जन्मलेला, मग तो कितीही अवगुणी असो ; तो उच्च म्हणावयाचा. तसेच, नीच जातीत जन्मलेला, मग तो कितीही गुणी असो ; तो नीचच रहावयाचा. दुसरे असे की, परस्परांत रोटी-बेटी व्यवहार होत नसल्यामुळे दरएक जात या जिव्हाळ्याच्या संबंधात स्वयंवह म्हणजे तुटक आहे. ही निकटसंबंधाची गोष्ट जरी बाजूस टाकली तरी परस्परांतील बाह्य व्यवहार अनियंत्रित असा नाही. काहींचा व्यवहार दारापर्यंत होतो व कांही जाती तर अस्पृश्य आहेत. म्हणजे, त्या जातीतील माणसाचा स्पर्श झाला असता इतर जातीतील माणसांस विटाळ होतो. विटाळामुळे या बहिष्कृत जातींशी इतर जातींच्या लोकांचा क्वचितच व्यवहार होतो. रोटी-बेटी व्यवहाराच्या अभावी कायम झालेल्या परकेपणात स्पृश्यास्पृश्य भावनेने इतकी भर टाकलेली आहे की, या जाती हिंदुसमाजात असून समाजाबाहेर आहेत असेच म्हटले पाहिजे.

या व्यवस्थेमुळे हिंदुधर्मीय ब्राह्मण, ब्राह्मणेतर व बहिष्कृत असे तीन वर्ग होतात. तसेच या विषमतेच्या परिणामाकडे लक्ष दिले तर असें दिसून येईल की, तिच्या पायी विविध जातींवर विविध परिणाम झाले आहेत. सर्वात उच्च असलेल्या ब्राह्मणवर्गास आपण भूदेव आहोंत असे वाटत आहे. सर्व मानवांचा जन्म आपल्या सेवेसाठी आहे असे मानणाऱ्या भूदेवांना रूढ असलेली विषमता पोषकच आहे. आणि म्हणूनच ते आपल्या स्वनिर्मित हक्काने आपली सेवा करून घेऊन आपण राजरोसपणे व बिनदिक्कत मेवा खात आहेत. त्यांनी काही करणी केली आहे म्हणावे तर ज्ञानसंचय व धर्मशास्त्रलेखन एवढेच काय ते ! पण ते धर्मशास्त्र म्हणजे आचार-विचाराच्या प्रबल विरोधाचे कोडेच म्हणावयाचे.

हे उदात्त विचार व अनुदार आचार यांची सांगड घालणारे धर्मशास्त्रकार झिंगले होते असे वाटते ; कारण सचेतन व तशीच अचेतन वस्तू हीं सारीं ईश्वराचीं रूपें आहेत असे उपदेशिणाऱ्या तत्त्ववादीयांच्या आचारात विलक्षण विषमता दिसावी हे काही शुद्धीवर असणारांचे लक्षण नव्हे !

वेडेवाकडे कसेही असो. पण या धर्मशास्त्राची छाप लोकांवर काही कमी नाही. आपण होऊन अज्ञजन आपल्या हितशत्रूंस भूदेव म्हणून भजत आहेत हे कोण कबूल करील ? विघातक धर्मभावनेच्या शृंखलेने जखडून घेऊन, शत्रूंस मित्र समजून, तयांच्या पायी इतरेजन लीन कां झाले याचा उलगडा करावयास फार दूर जावयास नको.

अज्ञानी लोकांकडून काहीही करविता येईल ; आणि म्हणूनच ज्ञानसंचय—प्रसार नव्हे—ही ब्राह्मणांची मिरास, हे एक धर्माचे मोठे तत्त्व होऊन राहिलेले आहे. तिची महारकी मिळविण्याचे पातक इतरांनी करुं नये असे बजावीत असताही चोरून-छपून ज्ञान मिळवून सज्ञान झाल्यावर पूर्वापार चालत आलेले आचार विचार सोडल्यास स्वच्छंदाने लिहिलेले हे विघातक धर्मशास्त्र तरवारीच्या जोरावर अशा अधर्मीय (?) ब्राह्मणेतरांच्या माथी मारल्याची उदाहरणे ब्राह्मणी अमदानीत कांही कमी नाहींत.

सत्ता व ज्ञान नसल्यामुळे ब्राह्मणेतर मागासले, व त्यांची उन्नती खुंटली हे निर्विवाद आहे ; परंतु त्यांच्या दुःखात दारिद्र्याची तरी भर पडली नाही. कारण शेती, व्यापार-उदीम अथवा नोकरी करून आपला चरितार्थ चालविणें त्यांना दुरापास्त नाही. पण या सामाजिक विषमतेचा बहिष्कृत समाजावर झालेला परिणाम अति घोर आहे. दौर्बल्य, दारिद्र्य व अज्ञान या त्रिवेणीसंगमात हा अफाट बहिष्कृत समाज वाहवला असला पाहिजे हे खास !

दीर्घकाळ अंगी मुरलेल्या दास्यामुळे उद्‌भवलेली हीनता त्यांना मागे खेचीत आहे. आहे ती स्थिती योग्य आहे, यापेक्षा बरी स्थिती आपल्या नशिबी नाही ; अशा समजुतीचा विघातकपणा ह्या पतितांच्या नजरेस आणण्यास ज्ञानासारखे अंजनच नाही. पण ते अजुनही मिरची-मसाल्यासारखे विकत घ्यावे लागत आहे ; आणि दारिद्र्यामुळे ते दुर्मिळ झाले आहे. कोठे कोठे तर विकत घेऊ गेले असता ते मिळतही नाही. कारण ज्ञानमंदिरात सर्वच अस्पृश्यांचा प्रवेश होतो असें नाही.

दारिद्र्याची बोळवण करण्यास कपाळी अस्पृश्यतेचा शिक्का मारला असल्यामुळे पैका मिळविण्यास हवी तेवढी संधी किंवा मोकळीकही नाही. व्यापार-उदीम इत्यादी धंद्यांत त्यांचा क्वचितच रिघाव होतो. नशिब (अजमावून) पाहाण्यास

कोठेच जागा नसल्यामुळे त्यांना केवळ भुईचे खडे खात पडावे लागत आहे. अशा या अस्पृश्य नव्हे बहिष्कृत लोकांस निश्चितपणे खितपत पडलेले पाहून ३३ कोटी देवांस—नव्हे, ते हिंदूंचे देव—निदान अल्लास तरी कीव येत असेल. पण मनुष्यकोटीतील इतर प्राण्यांस त्यांच्याबद्दल बहुधा धिक्कारच उत्पन्न होईल. कारण माणुसकीदेखील हिरावून नेली असता जे लोक ती जिंकण्याचा प्रयत्न करीत नाहीत, ती माणसे नसून जंतूच आहेत असे म्हणावे लागते.

पण कोंडीत सापडलेल्या माणसांनी जंतुप्रमाणे राहिल्याशिवाय कसे चालेल ? असे म्हणणारे प्राप्तस्थितिप्रियलोक बहिष्कृत समाजात नाहीत असे नाही. दारिद्र्यामुळे ज्ञान नाही, ज्ञान नसल्यामुळे बल नाही. युक्तिवाद खरा आहे, पण तो लढविणारांच्या माणुसकीला कमीपणा आणणारा आहे हे विसरता कामा नये. कांडी फोडली तरच माणुसकी. अशा माणुसकीचा संचार बहिष्कृत समाजात होत आहे, हे सुचिन्हच म्हणावयाचे. प्रचलित हिंदुधर्माच्या अतिघोर अन्यायास्तव आपल्या समाजास अस्पृश्य मानण्याचे महापातक, विश्वजनक प्रभूला न जुमानता करणारे कोट्यावधी अविवेकी व दुराग्रही जन, जोपर्यन्त या देशात वावरत आहेत ; तोपर्यन्त आपला समाज निकृष्ट स्थितीमध्येच खितपत रहाणार आहे, याची जाणीव या बहिष्कृत समाजातील लोकांस बऱ्याच अंशीं झाली आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

तसेच परस्थ सरकारास आपल्या तंत्राप्रमाणे वागावे लागत आहे, याचा फायदा घेऊन, अस्पृश्य वर्गाच्या खऱ्या स्थितीविषयी वरिष्ठ हिंदूकडून त्याचा गैरसमज कसा करण्यात येत आहे हे देखील त्यांना कळून चुकले आहे. जातीभेद आणि जातीमत्सर यांनी ग्रस्त झालेल्या देशात खरे स्वराज्य नांदण्यास या बहिष्कृत वर्गास त्यांच्या स्वतंत्र प्रतिनिधींतर्फे राजकीय सत्तेचा पुरेसा भाग मिळावा या मागणीस त्यांच्या वरिष्ठांनी कसून केलेल्या विरोधाच्या खोडसाळपणाबद्दल बहिष्कृत वर्गाने तक्रार केली आहे. एवंच, राजकीय सत्ता मिळून तिच्या जोरावर सामाजिक विषमतेचे दडपण कायम करू पाहाणाऱ्यांचा कावा बहिष्कृत समाजाने ओळखला आहे, ही त्यांच्यात उपजलेल्या जागृतीची साक्ष होय.

आमच्या या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढे होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास, तसेच त्यांची भावी उन्नती व तिचे मार्ग यांच्या खऱ्या स्वरूपाची चर्चा होण्यास वर्तमानपत्रासारखी अन्य भूमीच नाही. परंतु मुंबई इलाख्यात निघत असलेल्या वृत्तपत्रांकडे न्याहाळून पाहिलें असता असें दिसून

येईल की, त्यातील बरीचशी पत्रें विशिष्ट जातींचे हितसंबंध पाहाणारी आहेत. इतर जातींच्या हिताची त्याना परवा नसते. इतकेच नव्हे तर केव्हां केव्हां त्यांना अहितकारक असेही त्यातून प्रलाप निघतात.

अशा वृत्तपत्रकारांना आमचा एवढाच इषारा आहे की, कोणतीही एखादी जात अवनत झाली ; तर तिच्या अवनतीचा चट्टा इतर जातींस बसल्याशिवाय राहाणार नाही. समाज ही एक नौकाच आहे. व ज्याप्रमाणे आगबोटीत बसून प्रवास करणाऱ्या उतारूने जाणून-बुजून इतरांचे नुकसान करावे म्हणून किंवा त्यांची त्रेधा कशी उडते ही गंमत पाहण्यासाठी म्हणा, किंवा आपल्या विनाशक स्वभावामुळे म्हणा ; जर का इतरांच्या खोलीस छिद्र पाडले, तर सर्व बोटीबरोबर त्यालाही, आधी नाही तरी मागाहून का होईना जलसमाधी ही घ्यावी लागणार आहे. त्याचप्रमाणे एका जातीचे नुकसान केल्याने, प्रत्यक्ष नव्हे, तरी अप्रत्यक्ष पणे तरी नुकसान करणाऱ्या जातीचेही नुकसान होणार आहे ; यात बिलकुल शंका नाही. म्हणूनच स्वहितसाधू पत्रांनी इतरांचे नुकसान करून आपले हित करण्याचे पढतमूर्खाचे लक्षण शिकू नये.

हा बुद्धिवाद ज्यांना कबूल आहे अशी वर्तमानपत्रे निघाली आहेत हे सुदैवच म्हणायचे. दीनमित्र, जागरूक, डेक्कन रयत, विजयी मराठा, ज्ञानप्रकाश, सुबोधपत्रिका वगैरे पत्रांतून बहिष्कृत समाजाच्या प्रश्नांची चर्चा वारंवार होते. परंतु ब्राह्मणेतर या अवडंबर संज्ञेखाली मोडत असलेल्या अनेक जातींच्या प्रश्नांचा ज्यात खल होतो ; त्यात बहिष्कृतांच्या प्रश्नांचा सांगोपांग ऊहापोह होण्यास पुरेशी जागा मिळणे शक्य नाही, हेही पण उघड आहे. त्यांच्या अतिबिकट स्थितीशी संलग्न असलेल्या प्रश्नांची वाटाघाट करण्यास एक स्वतंत्र पत्र पाहिजे हे कोणीही कबूल करील. ही उणीव भरून काढण्यासाठी या पत्राचा जन्म आहे.

खास अस्पृश्यांच्या हिताहिताची चर्चा करण्यासाठी, सोमवंशीय मित्र, हिंद नागरिक, विटाळ विध्वंसक ही पत्रे उपजली व लयही पावली. हल्ली चालू असलेले बहिष्कृत भारत कसेबसे दिवस काढीत आहे. परंतु वर्गणीदारांकडून योग्य प्रोत्साहन मिळत गेल्यास मूकनायक न डगमगता स्वजनोद्धाराचे महत्त्कार्य करण्यास योग्य पंथ दाखवील असे आश्वासन देताना ते अनुभवांती खोटे ठरणार नाही अशी खात्री बाळगून हे स्वशय निवेदन आटोपते घेतो.



---

अग्रलेख : मूकनायक, ता. ३१ जानेवारी १९२०.

# २

# टिळकांचा सत्कार

टिळक राजकीय व सामाजिक बाबतींत विसंगतपणा व्यक्त करूनच केवळ थांबले नाहींत. मागासलेल्या व अस्पृश्य वर्गाच्या उन्नतीला विरोध करण्याच्या कामीं व त्यांना कायमचें अज्ञानांधकारांत अवनतिगर्तेत ठेवण्याच्या कामींहि त्यांनीं गेलीं कित्येक वर्षे आपलें पुण्य खर्ची घातलें आहे. जातवार निवडणुकीचा प्रश्न पुढें आला नव्हता तोपर्यंत जातीभेदाचें समर्थन व गीतारहस्य समजून सांगण्याच्या मिषाने उपदेश करून त्यांनीं या वर्गाचें अकल्याण करण्याची खबरदारी घेतली व हेच वर्ग स्वतंत्र प्रतिनिधी मागूं लागतांच त्या योगाने जातिजातीत वैमनस्यें माजून जातीभेद नष्ट होणें लांबणीवर पडेल, या सबबीवर त्यांनीं त्यांचे नुकसान करण्यास कंबर कसली. कायदेमंडळांत जाऊन कुणब्याने नांगर हाकावयाचे नाहींत किंवा वाण्यांनीं तागड्या धरावयाच्या नाहींत असें म्हणणाऱ्या रा. टिळकांचा गौरव पुण्याच्या सर्व नागरिकांतर्फे हे लोक होऊं देणार नाहींत, हें समजण्याइतके दुरदर्शित्व त्यांच्या चहात्यांना असावयास पाहिजे. त्यांच्या व त्यांच्या अनुयायांच्या विरोधाला भीक न घालता पार्लमेंटरी कमिटीनें जेव्हा स्वतंत्र प्रतिनिधित्वाच्या तत्त्वाला मान्यता दिली तेव्हांच त्यांची लोकमान्यता सर्वस्वी नष्ट झाली हे त्यांच्या लक्षांत यावयास पाहिजे होतें !

ज्या दीन, हीन, दुबळ्या व असहाय्य अस्पृश्यांविषयीं प्रत्येक जाणत्या व सहृदय हिंदी माणसाचें अंतःकरण तिळतिळ तुटत आहे, त्यांची प्रतारणा करण्यासहि रा. टिळकांनीं कमी केलें नाहीं. अस्पृश्यांच्या उद्धाराला आपली सहानुभूति कमी आहे असें नाहीं, असें विलायतच्या मजूरांना उजळ तोंडानें भासवितां यावें म्हणून त्यांनीं अस्पृश्योद्धाराच्या परिषदेंत चांभाराच्या गणपतीची कथा सांगून वेळ मारून नेली ; पण या भाषणापैकीं एक अक्षरहि केसरींत न येईल अशीं त्यांनीं तजवीज केली. पुढें अस्पृश्योद्धाराच्या राजिनाम्यावर (शपथपत्रिकेवर) सही मागण्यांत आली तेव्हां त्यांनीं सर्वस्वी उडवाउडवी करण्याची जबाबदारी घेतली ती निराळीच !

समता, बंधुप्रेम व दीन देशबांधवांविषयीं सहानुभूति या सर्वच बाबतींत उघड उघड माघार खाल्लेल्या या नामधारी पुढाऱ्याचा गौरव करून वरील जगन्मान्य तत्त्वाविषयींचा आपला अनादर कोणी व्यक्त करणार असतील तर बापडे खुशाल

करोत ! मिश्रविवाहाच्या बिलास विरोध करणाऱ्या व सर्व ब्राह्मणेतरांना शिद्दी लोकांच्या जोडीस घेऊन बसविणाऱ्या ' केसरी ' च्या या मालकांना मान देऊन बहुसंख्य जनतेच्या स्वाभिमानाला पायाखाली तुडविण्यास कोणी स्वाभिमानशून्य व्यक्ति तयार होत असल्या तर खुशाल होवोत ! आमचें एवढेंच म्हणणें आहे कीं, या व्यक्तींना पुण्याच्या सर्व नागरिकांच्या नांवावर ही गोष्ट करूं द्यावयाची नाहीं, असा आमचा निश्चय आहे ; व ज्यांना तो पसंत असेल त्या सर्वांना सदर सभेस हजर राहून आपले विरुद्ध अभिप्राय जाहीर करण्याविषयीं आमची विनंती आहे.



---

विविध विचार : मूकनायक, ३१ जानेवारी १९२० आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती, सोर्स मटेरियल खंड-II, पृ. संदर्भ सूची–शुद्धीपत्रक पृ. (७).

# ३

# सोमवंशीय निराश्रित फंड

या फंडाचा नुकताच बाहेर पडलेला रिपोर्ट आमच्याकडे आला आहे. मुंबई येथे सार्वजनिक कामाचा विचार विनिमय होण्यासाठीं येथील समस्त महार मंडळीस सोईस्कर होईल असें एक मंदिर बांधण्याकरितां सदरहू फंडाची स्थापना ता. १३ नोव्हेंबर १९०९ रोजीं ' सोमवंशीय मित्रसमाजा ' चें विद्यमानें झालीं असें रिपोर्टावरून समजतें. फंडाच्या चालकांनी गर्वोक्तीनें इतर संस्था अशा प्रकारचा अहवाल सादर करीत नाहींत असें म्हटले आहे. अस्पृश्यांच्या उन्नतीसाठीं निघालेल्या सर्व संस्थांनीं आपले तपशीलवार रिपोर्ट वेळोवेळीं सादर करावे या इषाऱ्यास आमचें अनुमोदन आहे. हा इषारा फार महत्त्वाचा आहे हें निर्विवाद आहे. पैशाचा तपशीलवार हिशेब वेळोवेळीं दाखविल्याखेरीज समाजाला संस्थेच्या कार्याची सत्यता पटणें कठीण आहे. रिपोर्टाच्या अभावी पैशाची मदत करण्यास समाजातील उदार माणसें धजत नाहीं हें सर्व संस्थांनीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. इतरांना दिलेला हा इषारा सदरहू सोमवंशीय निराश्रित मंदिर फंडाच्या संस्थेनें पाळला असतां तर तो त्यांना हितावह झाला असता असें आम्हांस वाटते. फंड स्थापन झाल्यापासून आजतागायत फक्त रु. ११८३-३-७ फंड गोळा झाला आहे. त्यांतल्यात्यांत पाहूं गेलें असतां गेल्या चार वर्षांत फंडाची वाढ मुळींच झाली नाहीं. त्यांचें कारण फंड स्थापन झाल्यापासून या संस्थेनें मुळींच रिपोर्ट सादर केला नाहीं असें असावे असा आमचा समज आहे. ह्या फंडाच्या हेतूसंबंधानें अजून समाजांत एक मत नाहीं. अस्पृश्यवर्गानें उच्चवर्णीय हिंदु लोकांच्या देवळांत जाण्याचा सामाजिक हक्क मिळविण्याचा प्रयत्न करावा किंवा पैसे गोळा करून आपल्या धार्मिक हितासाठीं स्वतंत्र देऊळ बांधावे या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल आज आम्हांला देतां येत नाहीं. तेवढ्यावरून फंडाची वाढ करण्याचा प्रयत्न मात्र कमी होऊं देऊं नका. पुढेंमागें जरी फंडाचा हेतु बदलावा लागला तरी फंड असल्यानें कांहीं वावगें नाहीं ; कांहींतरी इष्टच घडवून आणतां येईल. चालकांनीं मात्र फंडाच्या कामीं निराश न होतां तो अव्याहत चालू ठेऊन त्याचा तपशीलवार रिपोर्ट देत जाणें हें बरें, अशी आमची त्यांस सूचना

आहे. कोंडाजी रामजी मास्तर, लिंबाजी तुळशीराम ओझरकर, पापूजी अंबूजी वाव्हळ, रा. कोंडीराम माणकोजी रोकडे, मारुति साबाजी गायकवाड हे या फंडाचे ट्रस्टी असून फंडाची रक्कम मुंबई सेव्हिंग्ज बँकेंत आहे असें समजतें.

● ● ●

---

विविध विचार : मूकनायक, ३१ जानेवारी १९२० आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे बहिष्कृत भारत आणि मूकनायक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती, सोर्स मटेरियल खंड-II, पृ. संदर्भ सूची–शुद्धीपत्रक पृ. (७).

# ४

# स्वराज्याची सर सुराज्याला नाही !

आजवर ज्ञात असलेल्या भूगोलाकडे राजकीय दृष्टीने पाहिलें असतां त्यांतील देशांचे आपणाला एक स्वयंशासित व दुसरा परशासित असे दोन मुख्य वर्ग करितां येतात. स्वयंशासित देशांतील कारभार त्या देशांत राहणाऱ्या लोकांकडेच असतो. पण परशासित देशाची स्थिति तशी नसते. त्यांचा राज्यकारभार परदेशांतील लोकांच्या हातीं असतो. अशा या वर्गीकरणांत हिंदुस्थान देशाचा अंतर्भाव दुसऱ्या वर्गात होतो. या देशांत रहाणारे हिंदु, मुसलमान, पारशी वगैरे लोक जरी आहेत तरी त्यांना हिंदी लोक या सर्वसाधारण नावाने संबोधितां येईल ; पण या हिंदी लोकांवर राजकीय अंमल चालविणारे लोक मात्र हिंदी नाहींत म्हणजे हिंदी लोक स्वयंशासित नाहींत. आज बरेच दिवसांपासून हिंदुस्थान हा देश परकीय अमलाखालीं आहे. हा सुपीक देश काबीज करून घेण्यास बऱ्याच जुन्या पाश्चात्य राष्ट्रांनीं अनेकवार प्रयत्न केले. रोमन व ग्रीक लोकांनींहि या दिशेनें प्रयत्न केला. तो विफल झाला, पण मुसलमान लोकांनी केलेल्या प्रयत्नांस जबर फळ आलें. जरी मुसलमान लोकांच्या हिंदुस्थानावरील स्वाऱ्यांस इ. स. ९८६ त सुरुवात झाली तरी त्यांना या देशांत कायमचे ठाणें मिळण्यास बराच अवधि लागला, पृथ्वीराज जेव्हां ११९३ मध्यें लढाईत मरण पावला तेव्हां हिंदु बादशाहीचें दिल्लीचें तक्त कायमचे मोकळें पडलें. ज्या पठाण लोकांनीं ही गादी बळकाविली त्यांचा १५२६ मध्यें पानिपत येथें मोगल लोकांचा अधिपति बाबर यानें पराभव करून दिल्ली येथें हिंदुस्थानचा बादशाहा अशी आपल्या नावानें द्वाही फिरविली. पण स्थापन होऊन दोनशें वर्षाच्या आतच दिल्लीचें हिंदुतक्त जिंकलेल्या या मुसलमानी सार्वभौम सत्तेला उतरती कळा लागली. कांहीं काळ ती सत्ता दक्षिणेंतील मराठे लोकांकडे होती, पण शेवटी ती कायमची इंग्रजांच्या हातीं गेली, व तेथें ती दैविक योजनेनें आजतागायत अबाधित आहे. अशी या देशाच्या पारतंत्र्याची पूर्वपीठिका आहे.

राज्यकारणाचे सर्वसाधारण असे दोन आद्य हेतु आहेत. एक शासन व दुसरा संस्कृति. शासन म्हणजे शिस्त अगर शांतता ठेवणें. शांततेचा भंग दोन तऱ्हेनें होऊं शकतो. परचक्रामुळे किंवा अंतस्थ अस्वस्थतेमुळे. परचक्राची बाब-आणि ती क्वचित उद्भवते-बाजूस ठेवली तर शासनांत अंतस्थ व्यवस्था ठेवणें हाच

प्रधान हेतु होऊन बसतो. कोणतेंहि राष्ट्र घेतलें तर त्यात वर्ग व तट हे असावयाचेच. इतकेच नव्हे, तर वर्गावर्गांचे, तसेच व्यक्तीचे सामाजिक, आर्थिक, राजकीय व धार्मिक हितसंबंध परस्परविरोधी असतात. अशा विरोधामुळें एका व्यक्तीनें किंवा वर्गानें आपला चांगभले करण्यासाठी दुसऱ्या व्यक्तीवर किंवा वर्गावर चढण्यास सुरवात केली किंवा जिवास घात किंवा मिळकतीस नुकसान करण्यास किंवा अन्य तऱ्हेनें अपाय करण्यास सुरवात केली तर अंतस्थ शांततेचा भंग होण्याचा संभव असतो ; आणि शांततेशिवाय सामाजिक जीवन धोक्याचें होऊन मानवांत नित्य होत असलेला कार्यक्रम बंद पडतो. अशामुळें शासन हा जरी महत्त्वाचा हेतु आहे तरी नुसतें शासन करणाऱ्या-म्हणजे प्रजेस अमुक करूं नका व करून शांतता मोडल्यास दंड होईल असें बजावणाऱ्या–राज्यपद्धतीला हल्लीच्या काळीं तारतम्यानें रानटी म्हणावी लागेल. सुधारलेल्या राष्ट्रांतील राज्य पद्धतीचा कल जितका शासनाकडे असतो तितकाच संस्कृती कडेहि असतो. आहे त्यापेक्षां प्रजेची उन्नति अधिक कशी होईल याचे मार्ग आंखणें, तिची साधनें सर्वांना सारखीं उपलब्ध करून देणें, उन्नतीस अनुकूल अशी परिस्थिति उत्पन्न करणें हा राज्य करण्याचा दुसरा हेतु शासनाइतका किंबहुना अधिक महत्त्वाचा होऊन बसला आहे.

राज्यकारणाचे हे दोन हेतु परिस्थित्यनुरूप निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या प्रमाणांत अमलांत येतात. जेथें राज्यकारभार एका विशिष्ट वर्गाचें हित होऊन बसतो, मग तो वर्ग स्वकीयांचा असो वा परकीयांचा असो, तेथें संस्कृतिपेक्षा शासनासच प्राधान्य मिळतें. कारण शांतताभंगामुळें त्यांच्या अंमलाला धोका येण्याचा संभव असतो. शांतता जरी अवश्य आहेत तरी शांततेच्या नांवाखाली जुलूम होणें अगदीं साहजिक असतें. कारण शांतता ठेवण्यास कोणाच्या तरी स्वातंत्र्याला निर्बंध घालावाच लागतो. व्यक्तीच्या स्वातंत्र्याला केव्हां निर्बंध घालावा व केव्हां घालूं नये याचा निर्णय करितांना स्वातंत्र्य आणि स्वच्छंद असा भेद केला पाहिजे. परंतु स्वातंत्र्य कायम ठेऊन त्यांचें स्वच्छंदांत पर्यवसान न होऊं देणें हें इतकें नाजुक काम आहे, की, बऱ्याच प्रसंगी स्वातंत्र्याचा उच्छृखलपणा मोडण्यासाठी स्वातंत्र्यावरच गदा येते. स्वातंत्र्य नष्ट झालें असतां शांतता रहाते पण व्यक्तिविकास होत नाही. म्हणून शासनातिशयामुळे नुकसानच होतें. दुसरा असा आक्षेप आहे की, परकीयांच्या अंमलाखाली राज्यकर्ते आपल्या जातभाईंच्या हितासाठी प्रजेच्या हिताकडे दुर्लक्ष्य करितात, नव्हे, त्याची आहुति देतात. एवंच एकाद्या देशावर दुसऱ्या देशाची सत्ता असल्यानें अंमलाखालीं असणाऱ्या लोकांचा फायदा क्वचितच होतो, हा नियम सर्व

तज्ज्ञांस संमत आहे. परंतु हिंदुस्थानांतील इंग्रजी अंमल या बाबतींत अपवाद म्हणून गणला जाईल यांत संशय नाहीं. ज्या या हिंदुस्थान देशांत अनेक परचक्रें येऊन त्यांनी लोकांना त्राहित्राहि करून सोडलें, ज्यात अनेक राजकीय बंडांमुळें प्रजेला शांतता म्हणजे मोठी दुर्मिळ चीज झाली होती, अशा ह्या त्रस्त देशाला ब्रिटिश सत्तेमुळे झालेला शांततेचा लाभ टाकाऊ म्हणतां येईल काय ? तसेंच ज्या हिंदुस्थानाचा संस्कृतीच्या दृष्टीनें रानटी लोकांत पहिला नंबर अथवा सुधारलेल्या राष्ट्रांत शेवटचा नंबर लागला असतां तो देश नूतन स्थापन होत असलेल्या राष्ट्रसंघात सामील होण्यास लायक झाला आहे ही ब्रिटिश अमदानींत झालेली त्याच्या संस्कृतीची वाढ कमी झाली असें म्हणणें सत्याच्या कसोटीस फारसें उतरेल असें वाटत नाहीं. परंतु स्वकीयांच्या अंमलाखालीं जर प्रजा संतुष्ट नसते हें अनुभवसिद्ध आहे तर परकीयांच्या अंमलाखालीं ती असंतुष्ट असल्यास त्यांत मोठेसें नवल नाहीं आणि परकीय अंमल हितावह जरी असला तरी केवळ परकीय म्हणून पारतंत्र्यांत अडकून राहिलेल्या लोकांचे लक्ष्य नेहमीं आपल्यावर हुकमत चालवणारांच्या दोषांकडे वेधलेलें असतें. याच न्यायानें आज इंग्रजी अमलाविरुद्ध बरीच चळवळ चाललीं आहे. या चळवळीच्या मुळाशीं जो हेतु आहे त्याची छाननी करणें अगदी जरूर आहे.

राष्ट्रीयसभा–जिला कॉंग्रेस असें म्हणतात ती याच चळवळीची जननी होय. ही सभा प्रतिवर्षी भरतें. तिचें ३४ वे अधिवेशन गेल्या नाताळांत अमृतसर शहरीं झालें. ही राष्ट्रीयसभा सन १८८५ मध्यें अस्तित्वांत आली व ती अस्तित्वांत येण्याची कारणें अगदीं साहजिक आहेत. कोणत्याहि देशाला आपली खरी स्थिति काय आहे हें तारतम्यानें कळतेंच. आपण श्रीमंत आहों की गरीब आहों, बरें आहोंत कीं वाईट आहोंत, ज्ञानवान आहोंत किंवा ज्ञानहीन आहोंत, गौरवर्णीय आहों की कृष्णवर्णीय आहों हें इतरांकडे नजर फेकल्याशिवाय कळत नाहीं. त्याचप्रमाणें, एका राष्ट्राला आपण इतर राष्ट्रांपेक्षा पुढारलेलें आहों किंवा मागासलेलें आहों हें कळण्यास त्याला इतर राष्ट्रांचा अभ्यासानें किंवा दळणवळणाने परिचय व्हावा लागतो. त्याशिवाय कोणाहि एकलकोंड्या राष्ट्रास तुलनेच्या अभावीं आपली निकृष्ट अशी स्थिति उत्कृष्ट आहे असें वाटून तिच्यांतच कुजत पडण्यांत वावगें वाटत नाही. या दृष्टीनें येथील लोकांना आपल्या खऱ्या स्थितीचें सापेक्षत्वानें व तुलनेनें आकलन होण्यास हिंदुस्थानाचा व इंग्रजांचा प्रजा आणि राजा या नात्यानें घडून आलेला निकट संबंध फार महत्त्वाचा आहे. इंग्रजी विद्या म्हणजे केवळ " वाघिणीचे दूध. " तें ज्यांना म्हणून प्राशन करावयास सांपडलें, त्यांच्यांत नवा उत्साह, नवीन तेज, नवीन स्फूर्ति उत्पन्न झाली. ज्यांना

म्हणून इंग्रजी विद्या संपादितां आली त्यांनीं युरोपीयन देशांच्या इतिहासाचें परिशीलन करून अनियंत्रित राजसत्तेमुळें तोटे काय होत असतात हें जाणिलें, व स्वतंत्रतेच्या कल्पना त्यांच्या मनांत घोळू लागल्या. इंग्रजी विद्येच्या प्रभावानें त्यांना राजा आणि प्रजा यांचे हक्क कळूं लागले. हें वाघिणीचें दूध पिऊन पुष्ठ झालेल्या या पिलांनीं इंग्रजांच्या सत्तेच्या विरुद्ध प्रजापक्षाच्या वतीनें भांडण्यास जारीनें सुरवात केली.

इंग्रजी राज्य जरी परकीय लोकांचे राज्य आहे तरी कांहीं सरकारी अधिकारी वजा जातां त्यांनीं प्रजापक्षाच्या या सभेस वारंवार सहानुभूति दाखविली. इतकेंच नव्हे तर खुद्द हिंदुस्थानचे माजी गव्हर्नर जनरल लॉर्ड डफरीन यांनीं तिच्या उभारणीस हातभार लावला, व आपली सहानुभूति केवळ शब्दांत न ठेवतां तिच्या मागण्यास अनुसरून आपल्या राज्यव्यवस्थेंत सुधारणा करण्यास मागें घेतलें नाही, हें त्यांस भूषणावह आहे. हा प्रजापक्ष उभारल्यापासून ब्रिटिश सरकाराने शिक्षणाच्या बाबतींत उदारबुद्धीचें धोरण स्वीकारलें आहे. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें करण्याचा क्रम सुरू केला आहे. व्यावहारिक व शास्त्रीय शिक्षणाकरितां शिष्यवृत्ति निर्माण करण्यात आल्या आहेत. आरोग्याच्या बाबतींत सरकारकडून मोठ्या प्रमाणावर पैसा खर्च होत आहे. दारूसारख्या मादक पदार्थावर कर वाढवून दारूच्या व्यसनास आळा घालण्यास, दारूचे गुत्ते बंद करण्यास किंवा दारूची विक्री नियंत्रित करण्यास सुरुवात झाली आहे. लोकांच्या तक्रारी ऐकून जंगलासंबंधी चाऱ्याची व जळाऊ लाकडांची सवलत देण्यांत येत आहे. मिठावरील कर कमी केला आहे. प्राप्तीवरील कराची किमान मर्यादा वाढविली आहे. पोलीसखात्यांतील वरिष्ठ व दुय्यम प्रतीच्या जागा व लष्करी खात्यांतील वरिष्ठ दर्जाचे हुद्दे एतद्देशीय लोकांस मिळूं लागले आहेत. मुलकी, शिक्षण इत्यादि खात्यांतील वरिष्ठ प्रतीच्या नोकऱ्या त्यांना मिळाव्या असे नुकतेंच ठरले आहे. शेतकीची सुधारणा, तसेंच पतपेढ्यांची स्थापना सरकार जोरानें करीत आहे. इतकेंच नव्हे तर, प्रजेंतील लायक व जबाबदार अशा माणसांस प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळांत घेऊन त्यांच्या सल्ल्याने कायदे ठरविले जात आहेत. प्रजापक्षाकडील माणसांना कायदेकौन्सिलांत घेण्याच्या पद्धतींतहि सरकारनें उत्तरोत्तर उदारपणाचें धोरण दर्शविलें आहे. प्रथमतः म्हणजे १८६१ सालीं जेव्हां प्रजापक्षाकडील माणसांस सरकारी कायदेकौन्सिलांत घेण्याचें तत्त्व मान्य झालें, त्या वेळेपासून तों १८९२ पर्यंत सरकारी निवडणुकींत प्रजेंतील कोणत्या माणसांना घ्यावें हें सरकारच्या आवडीनिवडीवर अवलंबून असे. पण सरकारनें निवडलेला सभासद प्रजेच्या हिताला नेहमीच जात असे, असें

नाहीं. बहुधा तो हांजी-हांजी करणारांपैकीं असे. निदान कौन्सिलातील आपली जागा कायम राखण्यासाठी सरकारची मर्जी राखावी म्हणून प्रजापक्ष सत्य असूनहि स्वार्थासाठी त्याची आहुति देत असे. आपण नेमलेले सभासद जी-हुकुम म्हणणारे आहेत, प्रजेचे हितकर्ते नव्हतं, अशा टीकेमुळें नेमणुकीच्या ऐवजीं निवडणुकीचें तत्त्व अमलांत आणलें आहे. एकूण ब्रिटिशराज्यपद्धतीचा कल वर्षोंवर्षी सुराज्यपद्धति करण्याकडे आहे हें त्यांच्या कट्ट्या शत्रूलाहि कबूल करणं भाग आहे.

प्रजापक्षाची ही राष्ट्रीय सभा ब्रिटिशराज्यपद्धति सुराज्यपद्धति करून आणण्यासाठी जन्मास आली हें जर खरें आहे तर वर निर्दिष्ट केलेल्या सुधारणा पाहून तिचें समाधान झालें पाहिजे. परंतु समाधान न होता उलट असंतोषच जास्त वाढला आहे असें दिसून येतें. याचे कारण या राष्ट्रीय सभेच्या आद्य हेतूंत झालेला बदल हेंच होय. तिला आता सुराज्य नको, कारण ' स्वराज्याची सर सुराज्याला नाहीं ' या नवीन तत्त्वानें तिच्यावर पगडा बसविला आहे. निव्वळ तत्त्वाला हरकत नाहीं पण व्यावहारिक दृष्ट्या-आणि तत्त्वापेक्षां व्यवहारच श्रेष्ठ आहे–स्वराज्य कोणाचें व तें कशासाठी हें कळल्याखेरीज या तत्त्वाची री आम्ही तरी ओढू शकत नाही. मग कोण ओढील तो ओढो बिचारा !

●●●

---

अग्रलेख : मूकनायक, ता. १४ फेब्रुवारी १९२०.

# ५

# स्वराज्याचे मातापिता

जसा ब्रह्मदेवाला आपण सृष्टि उत्पन्न केल्याबद्दल किंवा विश्वामित्राला मी प्रतिसृष्टीचा विधाता आहे याबद्दल अभिमान वाटावा तसाच मनुष्यकोटींतील प्रत्येक प्राण्यास अमुक एका गोष्टीचें मूळ कारण आपण आहों याबद्दल अभिमान वाटावा हें साहजिकच आहे. स्वराज्यवादीयांत हिंदुस्थानास मिळालेल्या स्वराज्याचें आदिकरण कोण यासंबंधाचा जो मोठा लढा उत्पन्न झाला आहे तो या न्यायास धरूनच आहे. लोकमाता बिझांट, लो. टिळक आणि लो. शास्त्री इत्यादि आपापल्या परी स्वराज्याच्या विधात्याची जागा बळकावू पहात आहेत. ''बरें झालियाचे अवघेचि सांगाती'' या संतोक्तीच्या दृष्टीने लोक टिळकांची धडपड अगदीं विपरीत आहे. दिलेलें स्वराज्य अगदीं निराशाजनक व टाकाऊ आहे असें जर लो. टिळक म्हणतात तर अस्ल्या विद्रुप मुलाचा मीच बाप असें शाबीत करून घेण्यांत काय अर्थ आहे कोण जाणे ? वासनेवरून शीलाची कल्पना होते म्हणतात ; लोकमान्यांचें शील तर कमी दर्ज्याचें नसेल ना ? लोकमाता बिझांट व लो. शास्त्री ह्यांची गोष्ट मात्र निराळी. त्यांना हें मूल आवडतें. म्हणून त्याला मांडीवर घेण्याचा त्यांचा प्रयत्न एवढा अश्लाघ्य नाहीं, तरी पण या मुलाचे आपण मातापिता आहों असें मानणें हा त्यांचा भ्रम आहे.

आमच्या मतें स्वराज्याचें बीजारोपण करणारांच्या यादींत स्वतः होऊन घेतलेल्या पुढारी या टोपण नांवाच्या ओझ्या (?) खालीं चिरडून गेलेल्या एकाहि माणसाची गणना करितां येणार नाहीं. ओरड करून मिळविण्याइतकी स्वल्प स्वराज्याची देणगी नव्हे. कितीही ओरड झाली असली तरीपण त्यामुळें स्वराज्य मिळालेंच पाहिजे होतें असें कांहीं निश्चित होत नाहीं. स्वराज्याच्या देणगींत सत्तेच्या शहाणपणाचा जेवढा भाग आहे तेवढा आरडाओरड करणारांचा खास नाहीं. स्वराज्य देत नाहीं असें जर म्हटलें असतें तर ब्रिटिशांच्या हातून तें हिसकावून घेण्यास कोणाची प्राज्ञा झाली नसती हें निर्विवाद आहे. कारण सामाजिक बाबतींत ब्राह्मणेतरांना गुलामगिरीत ठेवून ब्राह्मणांना जशी पेशवाई गाजवतां आली, तशीच किंबहुना तिच्याहिपेक्षा जास्त दरारा ठेवून हिंदवासीयांना स्वराज्य दिल्याखेरीज ब्रिटिश लोकांना हुकमत गाजवतां आली असती. पण ते तसें करूं इच्छीत नाहींत. याचा अर्थ त्यांच्यावर दडपण आहे असें नव्हे तर त्यांत

त्यांची खरी दानत आहे. स्वराज्याच्या आरंभाचा जरी इतिहास घेतला तरी असेंच दिसून येईल, कीं, स्वराज्याचा मुळचा पाया ब्रिटिशलोकांनी केवळ तत्वप्रियतेमुळेंच घातला आहे. स्थानिक स्वराज्य, तसेंच प्राव्हिंशिअल व सुप्रीम काउन्सिल यांची सुरवात करण्यास प्रजेतर्फे कोणी वकील गेला होता हे निदान इतिहासनमूद तरी नाहीं. आणि हल्लींचें स्वराज्य आजच जन्मास आलें नसून ह्याची पांचवी झाल्यास आज साठ वर्षे झाली आहेत ; म्हणूनच हें गोजीरवाणे रांगतें बाळ कोणीहि कडेवर घेतलें तरी त्याचे मातापिता ब्रिटिशलोक आहेत हें मात्र कोणी विसरूं नये.

●●●

---

विविध विचार : मूकनायक, शनिवार ता. १४ फेब्रुवारी १९२०

## ६

# बुजतील म्हणून !

गेल्या महिन्याच्या २० तारखेच्या केसरीच्या अंकांत मुंबईत न्याशनल डेमॉक्रॉटिक कंपनीच्या तर्फे प्रसिद्ध होणाऱ्या डेमोक्राट पत्राची जाहिरात दिली आहे. जेवून ढेंकर दिल्यावर यजमानास आशीर्वाद देणें हें जसें अतिथींचें कर्तव्य असतें त्याच न्यायानें केसरी पत्राने आपल्या स्फूट सूचनेत या कंपनीला शेअर्सच्या रूपानें साहाय्य करण्यास राष्ट्रीय पक्षाच्या लोकांस तसेंच आपल्या वर्गणीदारांस शिफारस केली आहे, ह्यांत कांही वावगे नाही. उलट एवढ्या मोठ्या जाहिरातीचे पैसे खाऊन त्यासंबधानें कांहीं उद्‌गार काढले नसते तर मात्र केसरीची वर्तणूक निंदास्पद झाली असती. "ब्रिटिश साम्राज्यांतर्गत पूर्ण स्वराज्य आणि सर्व बाबतींत ब्रिटिश वसाहतींच्या बरोबरीचे हक्क संपादन करण्याकरिता झटणें तसेंच अंतर्गत व्यवस्थेत समतेच्या तत्त्वावर अखिल हिंदी प्रजेच्या हितासाठी जात, वर्ग, व लिंगाचा पक्षपात न करितां झटणें " हे या पत्राचे उद्देश आहेत असें तें प्रसिद्ध करणाऱ्या कंपनीच्या उद्देशपत्रिकेंत म्हटलें आहे. " बोले तैसा चाले " न्यायानें आपले उद्देश निःपक्षपातानें सदोदित मूर्तस्वरूपांत आणण्याचा या पत्रानें प्रयत्न केला तर तें लोकादराला पात्र होईल यांत शंका नाहीं. परंतु कंपनीच्या डायरेक्टरांच्या यादीकडे लक्ष्य पुरविलें असतां हें पत्र बोलल्याप्रमाणें वागेल असें संभवत नाहीं. कारण कांहीं डायरेक्टरांना साम्राज्यांतर्गत पूर्ण स्वराज्य पाहिजे, परंतु अन्तर्गत व्यवस्थेत स्वयंनिर्णयाचें तत्त्व लावण्यास ते कबूल होतील असें त्यांच्या आजपर्यंतच्या आचाराविचारावरून तरी वाटत नाहीं. तरीपण बारा कोसांवर जमिनीला आकाश टेकलें असें दाखवून आपला हितसंबंध एकच आहे असें भासवून बहुजनसमाजाची फसगत करणाऱ्या या लोकांच्या शीलांत काय फरक पडतो हें अनुभवच सांगू शकेल. तरी या भावी डेमोक्राट पत्राचे उद्देश सांगतांना केसरीनें जो लपंडाव केला आहे तो चवाठ्यावर आणण्यासारखा आहे. ब्रिटिश साम्राज्यांतर्गत पूर्ण स्वराज्य आणि सर्व बाबतींत ब्रिटिश वसाहतींच्या बरोबरचे पूर्ण हक्क संपादन करणें हा या पत्राचा उद्देश आहे. म्हणून राष्ट्रीयपक्षाच्या लोकांस आणि तसेंच आपल्या वर्गणीदारांस या पत्रास साहाय्य करण्याकरिता केसरीनें विनंति केली आहे. अंतर्व्यवस्थेंत समतेचें तत्व लागू करणें हा जो या पत्राचा दुसरा महत्त्वाचा व तसाच स्तुत्य उद्देश आहे तो केसरीनें कां गुलदस्तांत ठेवला याचें नवल वाटतें. एकतर स्वतःस तो उद्देश पसंत

नसावा, किंवा ' राष्ट्रीय पक्षाचे लोक ' व केसरीचे वर्गणीदार त्याला बुजतील म्हणून. याशिवाय तिसरें कांहीं संभवत नाहीं. समतेच्या तत्त्वाची ज्यांना घाण येते किंवा जे त्याला बुजतात त्यांना ब्रिटिश मजूरवर्गानें गेल्या कांग्रेसला पाठविलेल्या निरोपांत मारलेला जोडा लागला नसावा असें वाटतें. निगरगट्टच की नाहीं !

● ● ●

---

विविध विचार : मूकनायक, शनिवार ता. १४ फेब्रुवारी १९२०

# ७

# मुसलमान ब्राह्मण झाले !

मिरत शहरीं ता. २०-१-१९२० रोजीं अटकेंतून सुटलेल्या अल्ली बंधूंचे मुसलमान वर्गातर्फे स्वागत करण्यांत आलें. मयूरासनावर बसवून खिलाफत कमिटी मार्फत उभय बंधूंना मानपत्र दिल्यानंतर बराफखाना मैदानावर लो. रायसाहेब पंडित सीताराम यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदुमुसलमानांची जंगी जाहीरसभा भरली होती, व त्या ठिकाणीं लो. लाला ज्योतिप्रसाद यांनीं हिंदुंतर्फे दिले जाणारें मानपत्र वाचून दाखविलें. अशा तऱ्हेनें व्यक्त केलेली हिंदुमुसलमानांमधील एकी जेवढी वाढेल तेवढी थोडीच आहे. परंतु या एकीचे पर्यवसान सहभोजनांत होईल असें कोणासहि वाटणें शक्य नव्हतें. तथापि अशक्य तें शक्य झालें आहे. या सभेंची हकीगत देताना क्रॉनिकल पत्राच्या खास बातमीदारानें असा संदेश पाठविला आहे कीं, अल्लीबंधूंच्या स्वागतप्रसंगी मिरत येथील रहिवाशी लो. लाला बुद्धप्रकाश या हिंदू गृहस्थाच्या घरीं हिंदु-मुसलमान पाहुणेमंडळी ताटास ताट लावून जेवली ! एकाच्या ताटास दुसऱ्यानें ताट लावून जेवण्यास दोघेही एकाच जातीचे असणें हिंदूधर्माला आवश्यक आहे. सहभोजनास जरूर असलेलें एकजातीयत्व उद्‌भुत करण्यास हिंदू मुसलमान झाले की मुसलमान हिंदु झाले हा एक प्रश्नच आहे. मुसलमानांना कोणाहि बरोबर सहभोजन करण्यास त्यांच्या धर्माची हरकत नसते. पण ज्या अर्थी हिंदूंना हरकत आहे त्या अर्थी मुसलमानांचे हिंदु केले असें म्हणणें भाग पडतें. हें कसें घडलें हें एक कोडेंच आहे. कारण हिंदू म्हणविण्यास हिंदू म्हणविणाऱ्यांच्या पोटींच आल्याखेरीज गत्यंतर नसतें. कदाचित् बकरीदच्या दिवशी गोवध करणार नाहीं-खाणार नाहीं, नव्हे, असा ठराव मॉसलेम लीगनें गेल्या बैठकीत पास केल्यामुळे ते हिंदू गणले गेले असतील. पण मुसलमान हिंदू झाले येवढ्यानें परिस्थितीचा खरा भावार्थ उघड होत नाही. केवळ हिंदू या धर्माच्या छत्राखालीं आल्यानें सहभोजनाचा मार्ग खुला होत नाहीं. सहभोजन करणारांत एकजातीयत्व असावें लागतें. मुसलमान हिंदू झाले तर त्यांची जात कोणती हें त्यांच्या पंक्तीस बसणाऱ्यांच्या जातीवरून ठरवितां येईल. वरील बातमीदारानें सहभोजनप्रसंगी कोणकोणत्या जातीचे हिंदू होते हें जरी दिले नाही तरी ते वरिष्ठ वर्गातील हिंदू होते असा अंदाज काढल्यास तो खोटा ठरणार नाहीं. परंतु तो खोटा आहे असा जरी आक्षेप घेतला तरी मुसलमान ब्राह्मण झाले असें म्हणण्यास कोणाचीच हरकत

पडणार नाहीं. कारण ब्राह्मणाबरोबर भोजन कोणत्याही जातीतील हिंदू मोठ्या आतुरतेनें करील हें खास. मुसलमान ब्राह्मणांच्या पंक्तीस बसले म्हणून वाईट वाटण्याइतकें धर्मवेड आमच्यांत नाहीं. पण तें पाहून पोट दुखण्याइतकी माणुसकी मात्र आमच्यांत आहे. आणि म्हणूनच घरच्यास सोडून बाहेरच्यास मिठी मारल्याचें आम्हांस वाटतें. हिंदूत गणलेल्या सहा कोटी बहिष्कृत समाजाशीं सहभोजन न करतां ब्राह्मणांनी बिनबोभाट परधर्मीयांच्या पंक्तीस बसावें हा केवढा अधमपणा ? याचें मूळ शोधून पहातां असा अधमपणा कसा घडतो हें कळेल. हा जिव्हाळ्याचा प्रश्न खास नव्हे, कारण मुसलमानांना जसे ते येवढे जिव्हाळ्याचे लेखूं लागले आहेत तसेंच ते बहिष्कृतांस परधर्मीय आहेत असें म्हणूं देत नाहींत. १९१० सालच्या खानेसुमारीचे वेळीं मुसलमान बंधुंच्या सूचनेवरून—आणि ती सूचना गैर नव्हती—बहिष्कृत लोकांस हिंदूस सर्वसाधारण असलेले कोणतेच हक्क नसल्यामुळें हिंदू या सदरांत घालूं नयें, असें घाटत होतें. त्या वेळीं बहिष्कृत लोकहि हिंदू आहेत असें मोठ्या कंठरवानें सांगण्यांत आलें. परंतु बहिष्कृत हिंदु आहेत असे म्हणणारांनी याच वर्गांतील सुप्रसिद्ध क्रिकेटपटु रा. बाळू बावाजी पालवणकर यांच्याबरोबर कांहीं वर्षापूर्वी मुंबईच्या आर्यन ब्रदरहूडच्या वार्षिक मेळाव्यांत सहभोजन केल्यामुळें धर्म बुडाला म्हणून केलेल्या कोल्हेकुईचा प्रतिध्वनि अजून मावळला नाहीं. जसें त्या प्रसंगी तसेंच या प्रसंगीं "बीजी बात नहीं ज्ञातने व्हार " असें कर्मठांच्या तोंडून आलें नाहीं याचा अर्थ सहज कळण्यासारखा आहे. एका धर्माच्या छत्राखालीं असणाऱ्या, ज्यांना वैदिक धर्म शिरसावंद्य आहे, जे अनादिकालापासून हिंदुस्थानचे रहिवाशी आहेत अशा बहिष्कृत समाजाबरोबर सहभोजन न करतां, धर्मनिष्ठ अशा हिंदूंनीं "न नीचो यवनात्परन्" "न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कंठ गतैरपि" एवढा ज्या महमदीयांविषयी त्यांना तिरस्कार होता तो सर्व विसरून जाऊन त्यांच्याशीं केलेल्या दिलजमाईच्या मुळाशीं मुसलमानांच्या पंक्तीला बसून धर्म बुडत नाहीं असें नाहीं ; पण न बुडवुन चालत नाहीं. पंक्तीला बसा, धर्म बुडवा, पण एक व्हा आणि स्वराज्य मागा अशी ब्राह्मणलोक आजकाल मुसलमानांची प्रार्थना करीत आहेत. कारण मुसलमानांनीं जर स्वराज्य हिंदूंचे राज्य होईल अशा सबबीवर नको म्हटलें तर खरोखर स्वराज्य हातचें जाईल, असा त्यांना धाक वाटतो. एकीच्या प्रीत्यर्थ सहभोजनासारखा जिव्हाळा उत्पन्न करणाऱ्या मार्गांच्या आड येणाऱ्या अनिष्ट आचारांची आहुति देणें श्रेयस्कर आहे असें आमचें ठाम मत आहे. परंतु धर्म बुडवून मुसलमानांशीं ऐक्य करण्यास झटणाऱ्या हिंदुंनीं आपल्या बहिष्कृत धर्मभाईंशीं ऐक्य करण्यास धर्माची आडकाठी आणावी यांत असलेलें मर्म "नाक दाबल्याखेरीज तोंड उघडत नाहीं" या म्हणींत सांठलें आहे हें उघड

आहे. मुसलमानांशीं एकी न केली तर स्वराज्य मिळणें अशक्य आहे. पण बहिष्कृतांशीं सहकार्य न करितां जर स्वराज्य मिळविण्यास बाध येत नाहीं तर वरिष्ठ हिंदूंनीं तरी त्यांच्याशीं ऐक्य करण्याच्या भानगडींत कां पडावें ? सहकारितेचें जहर प्यावयास लावल्याखेरीज ते पिणार नाहींत. पण एवढा धाक घालण्यास बहिष्कृतांनीं संघशक्ति उत्पन्न करावयास नको काय ? संघशक्तीवाचून बहिष्कृत लोक ब्राह्मण व्हावयाचें नाहींत.

● ● ●

---

विविध विचार : मूकनायक, ता. १४ फेब्रुवारी १९२०.

# ८

# हें स्वराज्य नव्हे, हें तर आमच्यावर राज्य !

गेल्या अंकांत राष्ट्रीय सभा-जिला काँग्रेस असें म्हणतात–तिच्या वाढत्या भुकेचा अनुवाद झाला. ब्रिटिश राज्यपद्धति सुराज्यपद्धति करण्यासाठीं जरी ती जन्मास आली तरी कालमानपरत्वें सुराज्याच्या ऐवजीं मागणी करून तिनें स्वराज्याची देणगी मिळविलीहि आहे ; व ती अवमानितां जरी येत नाहीं, तरी पण ती उपयुक्त आहे कीं नाहीं, हें ठरविणें अगदीं जरूर आहे. देणगीचा अपायकारक परिणाम कसा घडू शकतो हें ज्यांना शंकरानें भाळून जाऊन भस्मासुराला दिलेल्या देणगीनें इतरांचीच नव्हे खुद्द शंकराचीच कशी त्रेधा उडाली हें माहीत आहे त्यांना विशद करून सांगण्याची जरूरी नाहीं. म्हणूनच त्यांतील मर्म ज्यांनीं जाणलें आहे त्यांनीं या स्वराज्याच्या मागणीच्या मुळाशीं असलेल्या हेतूंचें परिशीलन करणें अगदीं आवश्यक आहे. त्याशिवाय ही देणगी साधक आहे कीं बाधक आहे, या महत्त्वाच्या प्रश्नाचा निकाल देणें जड जाईल. हें ठरविण्यास ब्रिटिश अमदानी वाईट कां ? याचा उलगडा झाला म्हणजे त्याचपक्षीं स्वराज्याच्या हेतूंचाहि उलगडा होतोच आहे. म्हणून तोच प्रश्न अग्रस्थानीं मांडून त्याची छाननी करणें बरं पडेल.

कांहीं दुराग्रही हरीचे लाल वजा जातां आतांपर्यंत झालेल्या राज्यकारभारांतील सुधारणांत कांहींच राम नाहीं असें म्हणणारे लोक या राष्ट्रीय सभेंत नाहींत हे सुदैवच म्हणावयाचें. त्यांबद्दल ही राष्ट्रीय सभा कृतज्ञ आहे कीं नाहीं हा प्रश्न निराळा ; परंतु या सभेचें समाधान कां होत नाहीं, हें निश्चित करण्यास तिच्या ठरावांत वर्षोवर्षी होत असलेल्या ब्रिटिश राज्यकारभारांतील दोषाविष्करणाकडे लक्ष्य पुरविलें असतां असें दिसून येतें कीं, ब्रिटिश अमदानींतील प्रजेचें दारिद्र्य व तिची निस्तेज मनोभूमिका हीं दोन तिच्या असंतोषाचीं महत्त्वाचीं कारणें होत. स्वराज्यवादी यांच्या प्रमाणेंच प्रजा सुखसंपन्न होऊन तिची मनोभूमिका सतेज होणें हीं मानवोन्नतीचीं आद्य कारणें आहेत असें आमचेंहि पण मत आहे. आणि त्याला स्वराज्याशिवाय दुसरा जर उपायच नाहीं तर ईश्वर करो आणि स्वराज्यवादीयांच्या तोंडांत साखर पडो असा आशावाद गाणें भाग पडतें. पण त्यांच्या तोंडांत साखर टाकण्यास आजच आम्ही तयार नाहीं. कारण '' जें जें इच्छी प्राणी तें तें पुरवी चक्रपाणी '' असें जरी साधुसंतांनीं उपदेशिलें

आहे तरी या हिंदी जनांच्या व्यवहारांत बऱ्याच गोष्टी चक्रपाणीच्या हातीं नसून त्याच्या दलालांच्या हातांत आहेत याचा आम्हास विसर पडणें शक्य नाहीं. म्हणूनच स्वराज्याचें व्यावहारिक रूपांतर काय होईल हे पहाणें इष्ट आहे.

हिंदुस्थानदेश इतर देशांच्या मानानें दरिद्रीं आहे याबद्दल मुळींच मतभेद नाहीं. वार्षिक सरासरी उत्पन्नाच्या दृष्टीनें पाहिलें असतां हिंदुस्थानदेशाची सांपत्तिक स्थिति खरोखरच शोचनीय आहे. बेल्ज्यम, डेनमार्क, फ्रान्स, जर्मनी, इटाली, स्वीडन, स्पेन, स्वित्झर्लंड, ग्रेटब्रिटन व अमेरिकन संयुक्त संस्थानांतील दरमाणसीं सरासरी वार्षिक उत्पन्नाचे लढाईपूर्वीचे आंकडे अनुक्रमें २८, ३२, २७, ३१, १२, २२, १६, १९, ३९, ४० पौंड आहेत. परंतु हिंदुस्थानसारख्या दाट वस्तीच्या देशांत दर माणसीं प्रमाण दोन पौंड पडतें. यावरून या देशाची सांपत्तिक स्थिति किती हलाखिची आहे हें निराळें सांगणें नको. ब्रिटिश सत्ता स्थापन होण्यापूर्वी हिंदुस्थान देशाचा सांपत्तिक दर्जा इतर राष्ट्रांच्या मानानें अव्वल नंबरचा होता. परंतु ब्रिटिश लोकांच्या विघातक व्यापारी धोरणामुळें अखेरचा आला आहे असें म्हणणारा एक पक्ष आहे. परंतु त्या पक्षाशीं झगडा करीत बसण्यांत अर्थ नाही. आर्थिक उन्नतीच्या राजमार्गाचा ऊहापोह करण्याचेंहि हें स्थळ नव्हे. स्वराज्याच्या अमदानींत दारिद्र्य नाहींसें करणाऱ्या स्वराज्यवादीयांनीं आंखलेल्या मार्गाची इष्टानिष्टता ठरविणें एवढेंच आजचें कर्तव्य आहे.

स्वराज्यवादीयांच्या मतें हिंदुस्थानच्या दारिद्र्याच्या मुळाशीं हिंदुस्थानास लागू केलेली अनियंत्रित व्यापारपद्धतिच आहे. व्यापारपद्धति नियंत्रित करणें हा हिंदुस्थानचें दारिद्र्य घालविण्याचा त्यांचा मुख्य मार्ग आहे, असें म्हटल्यास कोणी आक्षेप घेणार नाहीं. हा मार्ग भावतो कां भोंवतो याचा निर्णय अर्थशास्त्राच्या सिद्धांताच्याच आधारानें केला पाहिजे. जे जिन्नस आपल्याला अगदीं अल्प मोलानें तयार करण्यासारखे आहेत तेच दरेक राष्ट्रानें तयार करावे व ते इतर राष्ट्रांस विकून त्यांपासून आपणास लागणारे, पण स्वदेशीं अल्प मोलानें तयार न करितां येण्यासारखे जिन्नस विकत घेण्यांत सर्व राष्ट्रांचा फायदा आहे, हा अर्थशास्त्राचा सिद्धांत सर्वसम्मत आहे. राष्ट्रातील परस्पर व्यापाराची उभारणी याच व्यवहारसिद्ध तत्त्वावर आहे. एका देशांत उत्पन्न होणारा माल दुसऱ्या देशांत निर्गत होतो याचें कारण हेंच कीं पहिल्या देशाला दुसऱ्या देशापेक्षां तो कमी मोलानें तयार करितां येतो. त्याच प्रमाणें एका देशांत उत्पन्न होणारा माल दुसऱ्या देशांत आयात होतो याचें कारण हेंच, कीं, दुसऱ्या देशाला तोच माल पहिल्या देशापेक्षां कमी भावानें किंवा त्याच भावानें तयार करितां येत नाही. म्हणूनच स्वल्प मोलानें उत्पन्न होऊं शकणारा माल उत्पन्न करून

त्याच्या ऐवजी आपल्याला नाहीं पण परकीयांना स्वल्पांत साध्य होणारा माल घेणें ही अनियंत्रित व्यापारपद्धति सर्व अर्थशास्त्रज्ञांना मान्य आहे. यावरून जो माल आपल्याला अल्प मोलानें तयार करितां येत नाहीं तो ज्यांना तसा करितां येतो त्यांपासून विकत घेण्याऐवजीं स्वदेशींच तयार करण्याचा हेका धरल्यानें तोटाच होणार, हें निर्विवाद आहे. असें जरी आहे तरी पण हिंदुस्थानांतील स्वराज्यवादीयांस तें कबूल नाहीं. त्यांच्या मतें हिंदुस्थानांतील स्वराज्यवादीयांस तें कबूल नाही. त्यांच्या मतें हिंदुस्थानांत संपत्तीची वाढ होण्यास हल्लीं आयात होत असलेला माल हिंदुस्थानांतच तयार झाला पाहिजे. तो तयार होण्यास आयात मालावर प्रतिबंध ठेवणें किंवा जकात ठेवणें अगदीं जरूर आहे, त्याशिवाय अन्य मार्ग नाहीं, असे त्यांनी वेळोवेळीं प्रतिपादिलें आहे. प्रतिबंध ठेऊन किंवा जकात बसवून परदेशी मालाची आयात कमी झाली म्हणजे स्वदेशी माल उत्पन्न करून ही तूट भरून काढण्यास सहजीं स्थापन होणारे धंदे व कारखाने वाढून हा दरिद्री देश सधन होईल अशीं प्रवचनें सांगणाऱ्या तारवठलेल्या स्वदेशी अर्थशास्त्रज्ञांनीं नियंत्रित व्यापार पद्धतीचें पूर्ण स्वरुप पाहिलेंच नसावेंसें दिसते. पण आम्हाला तें पाहिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. परदेशी माल आयात होतो याचें कारण तो कमी किमतींत मिळतो. तसाच माल स्वदेशांत उत्पन्न होत नाहीं याचें कारण तो अधिक भावाचा पडल्यामुळें व्यापारांत परदेशी मालापुढें त्याचा टिकाव लागत नाहीं. त्याचा टिकाव लागावा म्हणून तर परदेशी मालास अटकाव करा ह्या महामंत्राचा जप चालला आहे. पण परदेशी मालास अटकाव झाल्यास लोकास अधिक भावाचा स्वदेशी माल विकत घेणें भाग पडेल याचा विचार करावा कोणीं ? परदेशी मालाच्या ऐवजीं स्वदेशी माल खपून स्वदेशी धंदे आणि कारखाने स्थायिक होतील ; परंतु त्यांपासून देशाचें कल्याण होईल असें म्हणण्याऐवजीं देशांतील भांडवलवाल्यांचें कल्याण होईल, असें म्हणणें अधिक यथार्थ होणार आहे. कारण अनियंत्रित व्यापारपद्धतींत मिळत असलेला स्वल्प भावाचा माल नियंत्रित व्यापारपद्धतींत गोरगरिबांना अधिक दाम देऊन विकत घ्यावा लागणार आहे. यांत त्यांची होणारी नागवण ' स्वदेशी ' या लाडक्या शब्दानें भरून निघेल असें मानून ते समाधान पावतील असें संभवत नाहीं. ज्यांची नागवणूक होणार त्यांत बहुतांशीं बहिष्कृतांचाच समावेश होत असल्यामुळें त्यांचा खिसा कातरून इतरांचें कल्याण करून त्यांत सर्व देशाचें कल्याण झालें असें भासविणाऱ्यांच्या हातचलाखीला ते फसून जातील असें जर स्वराज्यवादीयांस वाटत असेल तर तो त्यांचा केवळ भ्रम आहे. स्वराज्याच्या या उपायानें दारिद्र्य जाईल असें मानून स्वराज्य मागण्याइतके वेडे ते खास नाहींत. कारण सुसंपन्नतेचा हा स्वदेशी मार्ग त्यांना भोंवेलसाच भासतो.

स्वराज्यवादियांच्या एका भाकिताची फलश्रुति काय होईल याचा येथवर विचार झाला. आतां त्यांच्या दुसऱ्या भाकिताची फलश्रुति काय होईल हें पाहूं.

ब्रिटिश राज्यकारभारांतील दुसऱ्या दोषाचें विवेचन करतांना स्वराज्यवादी असा आधार देतात कीं, ज्या ज्या परिस्थितींत एका वर्गाचें किंवा व्यक्तीचें वर्चस्व इतर वर्गावर किंवा व्यक्तींवर स्थापित होतें ती ती परिस्थिति उभयांस अनर्थकारकच होते. ज्यांच्यावर अशा तऱ्हेनें वर्चस्व स्थापन होतें त्यांत स्वामित्व आलेल्या लोकांना राजे, लोकपाल, लोकनियंते, प्रजापति, भूदेव, ईश्वरांश, ईश्वरावतार, काल कारण, न्यायमूर्ति, सद्‌गुणनिधान, कृपासागर अशीं विशेषणें लावण्याचा प्रघात पडतो. उलट पक्षीं स्वामित्वाखाली आलेल्या लोकांना स्वतःस हीन, पतित, आज्ञाधारक, सेवक, किंकर अशीं विशेषणें लावून घेण्याची संवय लागते. अशा रीतीनें पराधीन झाल्यामुळें सत्ताधारी वागवतील तसें वागण्यांतच धर्म आहे अशी त्यांची दृढ समजूत होते. या पूज्य बुद्धीचीं बीजें पिढ्यानुपिढ्या होत गेलेल्या संगोपनानें मनांत बिंबल्यामुळें इतकीं बलवत्तर होतात कीं, पुढें ज्यांना पूज्य मानण्याची मनाला सवय लागली ते त्या पूज्यतेस जरी अपात्र असले तरी त्यांचा अवमान किंवा धिक्कार करण्यास मन धजत नाही. तशाच प्रकारें वर्चस्वमंडित लोकांना आपलीं स्तुतिस्तोत्रें ऐकण्याची संवय लागते, व आपण स्तुतिपात्र आहों ही भावना तिच्या पिढ्यानुपिढ्या होत गेलेल्या संगोपनानें इतकी दृढ होते कीं, अंगी कोणत्याही प्रकारचा प्रशंसनीय गुण नसतांहि आपण परमपूज्य आहों असें वाटून लोक जर वंदूं लागले नाहींत तर त्यांस दंडून वंदावयास लावण्याचा प्रयत्न करितात. अशा परिस्थितींत वरच्यांत जसा दुरभिमान उत्पन्न होतो तसाच खालच्यांचा स्वाभिमानहि नष्ट होतो. वरच्यांस ज्याप्रमाणें आज्ञा देणें हेंच कर्तव्य वाटतें त्याचप्रमाणें खालच्यांस आज्ञापालनांतच आपली इतिकर्तव्यता आहे असें वाटतें. अशा परिस्थितीमुळें वरच्यांच्या मनोभूमिकेंत काठिण्य येतें व खालच्यांची मनोभूमिका निस्तेज होऊन त्यांची आपण होऊन कांही करण्याची धमक जागच्या जागींच विरून जाते. जेथें जेथें म्हणून उच्चनीच असे स्थितिजन्य तट पडतात तेथें तेथें उच्च लोकांच्या मानसिक दास्यांत खितपत पडलेल्या नीच लोकांत व्यक्तिविकास होणें शक्य नसतें. कै. गोखले यांनीं व्यक्त केलेला ब्रिटिश राज्यकारभारांतील नव्हे तर कारभारानुषंगिक असलेला जो दुसरा दोष त्याला याचाच आधार घेतला होता. त्यांच्या मतें परकीय राज्यकारभाराच्या खर्चानें होणारें नुकसान जरी अक्षम्य ह्मणून बाजूस ठेविलें तरी परकीय राज्यकारभारानें होणारें नैतिक नुकसान अक्षम्य आहे. परकीयांच्या वर्चस्वामुळें हिंदी जनांचा मानसमोड ठेंगणा होत चालला आहे. आपण कमदर्ज्याचे आहोंत

असें सुचविणाऱ्या वातावरणांत दिवस काढावे लागत आहेत, आणि परिस्थितीला मान देण्यासाठीं त्यांच्यांतील कर्तृव्यत्वान् पुरुषांस देखील खालचा दर्जा पतकरावा लागत आहे. अशा परिस्थितींत त्यांच्यांत पूर्ण व्यक्तिविकास होणें शक्य नाही. स्वराज्याखालीं वसत असलेल्या लोकांत दिसून येत असलेल्या आत्मबलाचा प्रभाव अनुभविण्यास त्यांना संधिच नाहीं. इंग्रजांच्या राज्यकारभारांतील वर्चस्वामुळें होत असलेली खच्ची बंद पडण्यास व त्यांच्यांत स्वाभिमान उत्पन्न होण्यास स्वराज्याची आवश्यकता आहे हें कबूल करण्यास फारशी अडचण पडणार नाहीं, आणि आमच्या मतें स्वराज्याच्या या दोन कारणांत हेंच कारण सबल आहे. व्यक्तिविकास करण्याचा उपाय म्हणून स्वराज्य दिल्यास आमची ना नाहीं, परंतु जर इंग्रजी राज्याविरूद्ध घेतलेला हा आक्षेप ब्राह्मणांच्या मुखांत एकपटीनें शोभतो तर तोच आक्षेप बाह्मणी राज्याच्याविरूद्ध एखाद्या बहिष्कृतानें घेतल्यास हजार पटीनें शोभेल, यास खोटें म्हणणारा पामर सांपडेलसें दिसत नाहीं. म्हणूनच ज्या स्वराज्यवादीयांना व्यक्तिविकासाची एवढी चाड आहे व ज्यासाठी ते बंदीवासहि भोगीत आले त्यांनीं सहा कोटि बहिष्कृत लोकांस व्यक्तिविकासाचा मार्ग खुला करण्यास काय केलें आहे, असा उलट प्रश्न विचारणें भाग पडतें. जशी परकीय अमलामुळें हिंदी जनांत उद्‌भूत होत असलेली सूक्ष्म हीनता या राष्ट्रीयसभेस दिसते तशीं स्वकीयांच्या अमलामुळें या बहिष्कृत लोकांत उद्‌भूत होत असलेली हीनता कां दिसू नये ? कदाचित् ती इतकी ढोबळ आणि लखलखीत असावी कीं, तिच्या प्रखरतेमुळें ब्राह्मणांचे डोळेच दिपून जात असावेत; किंवा तिकडे पहाण्याची त्यांची इच्छाच नसावी. या दोहोंपैकीं दुसराच तर्क खरा आहे असें सिद्ध होतें. परकीयांच्या दास्यांतून मुक्त करण्यास धडपडणाऱ्या या राष्ट्रीय सभेनें स्वकीयांना स्वकीयांच्या दास्यांतून काढण्याच्या प्रयत्नांचे संशोधन केलें असतां स्पष्ट होतें कीं, त्याचें दास्य कायम करण्यासच तिचें अंग आहे. या राष्ट्रीय सभेची जेव्हां स्थापना झाली तेव्हां तिच्या कार्यक्रमाबद्दल बराच वाद उत्पन्न झाला होता. राजकीय मागण्या मागाव्या किंवा सामाजिक दास्यांत अडकून पडलेल्या देशबांधवांस सोडविण्यांचा प्रयत्न करावा हा लढा बरेच दिवस पर्यंत चालू होता, परंतु ज्या या सभेंत ब्रह्मवृंदांचा जास्त भरणा होता व आहेहि तिनें आपल्या शीलानुसार स्वकीयांचें स्वस्थापित दास्यविमोचनाचें महत्कार्य फेंटाळून लावून तें दास्य कायम ठेवण्याच्या आड येत असलेला आपल्यावरील परकीयांचा तेवढा राजकीय, शहा नाबूद करण्याचा निंद्य पण सोयिस्कर मार्ग अवलंबिला हें सर्वश्रुत आहे. ज्या कांही व्यक्तींना सामाजिक सुधारणा घडवून आणणें विशेष महत्त्वाचे वाटत होतें त्यांनां '' सामाजिक परिषद '' या नांवाची एक निराळीच संस्था स्थापावी लागली. जरी

आजतागायत या सामाजिक परिषदेच्या हेतूंचे क्षेत्र अगदीं मर्यादित होतें. म्हणजे बालविवाह, विधवाविवाह, समुद्रप्रयाण, इत्यादि ब्राह्मणांच्या सत्तेला तिळभर देखील धक्का न देणारें होतें तरी तिची राष्ट्रीय सभेकडून नेहमीं अवहेलनाच होत असे, व १८९५ सालीं तर तिचें नववें अधिवेशन जेव्हां पुणें शहरीं झालें तेव्हां पुणेकर राष्ट्रभक्तांनी नेहमींच्या पद्धतीस न जुमानतां तिला राष्ट्रीय सभेच्या मंडपांत भरून त्याला विटाळण्यास मनाई करून आपला क्षोभ व शील हीं व्यक्त केलीं. ब्रिटिशांचे राजकीय स्वामित्व जितकें वरिष्ठ हिंदूंच्या महत्त्वाकांक्षेच्या आड येत असेल त्याच्या हजारों पटींनें वरिष्ठ हिंदूचें सामाजिक व धार्मिक वर्चस्व या ६ कोटि बहिष्कृत वर्गाच्या कसें आड येत आहे हें या स्वहितसाधु अधमांना पटवून द्यावयास पाहिजे असें नाहीं. जीं सामाजिक बंधनें वरिष्ठ हिंदूस पोषक झालीं आहेत तीं, या बहिष्कृत वर्गास इतकीं मारक झालीं आहेत कीं, त्यामुळें हा वर्ग नागरिकत्वासहि दुरावला आहे. कोणत्याहि व्यक्तीस नागरिक म्हणविण्यास कांहीं हक्क असावे लागतात. त्यांत (१) वैयक्तिक स्वातंत्र्य, (२) वैयक्तिक संरक्षण, (३) खाजगी मालमत्ता बाळगण्याचा हक्क, (४) कायद्याच्या बाबतींत समता, (५) सद्सद्विवेक बुद्धीला अनुसरून वागण्याची मोकळीक, (६) भाषणस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य, (७) सभा भरविण्याचा हक्क, (८) देशाच्या राजकारभारांत प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क, आणि (९) सरकारी नौकरी मिळविण्याचा हक्क, यांचा अंतर्भाव होतो. परंतु सामाजिक बंधनामुळें वरील हक्कांतील बऱ्याच हक्कांना बहिष्कृत लोक आंचवले आहेत. ब्रिटिश आमदानींत पहिल्या दोन हक्कांची अंमलबजावणी जरी सर्वत्र होत आहे तरी केव्हां केव्हां उंच वर्णीय हिंदू अंमलदारांच्या क्षेत्रांत हें आपले हक्क नाबूद झाल्याचीं उदाहरणें या बहिष्कृत वर्गातील लोक दाखवूं शकणार नाहींत असें नाहीं. तसेंच कायद्याच्या बाबतींत सर्वच ठिकाणीं बहिष्कृत व इतर लोकांत समता ठेविली जाते हें म्हणणें सर्वांशी खरें ठरेल असेंहि वाटत नाहीं. हक्क नं. ५-६-७-८ हे जरी सर्व हिंदी लोकांना मर्यादित प्रमाणांतच दिलेले आहेत तरी ते बहिष्कृत वर्गाच्या पदरांत इतरांपेक्षां बऱ्याच कमी प्रमाणांत पडतात. मतस्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य किंवा सभा भरविण्याचा हक्क प्रस्थापित राज्यास घातक होईल ह्या रीतीनें अमलांत आणण्यास कोणासच मुभा नाहीं, त्याप्रमाणें बहिष्कृत वर्गासहि नाहीं, व ती त्यांना नकोहि आहे. तरीपण या हक्काचा त्यांनीं वरिष्ठ हिंदूचे प्रस्थापित सामाजिक दडपणाविरूद्ध उपयोग केला तर त्यांना होत असलेल्या मनाईमुळें त्यांचा जसा तोटा होतो तसा इतरांचा कांही होत नाहीं. सरकारी नौकरी मिळण्याचा हक्क असूननसून सारखाच आहे. कारण स्पर्शास्पर्शभावनेमुळें त्यांना ती मिळत नाहीं. ज्या या बहिष्कृत लोकांनीं लष्करांत भरती होऊन ब्रिटिशांस हिंदुस्थानचे

राज्य मिळवून देण्यास आपले प्राण खर्ची घातले त्याच खात्यांतून त्यांचा कशामुळें उठावा झाला हें त्यांना कळून चुकलें आहे. शिकल्यासवरल्यासहि जात लपवल्याखेरीज किंवा धर्मांतर केल्याखेरीज हा नोकरीचा सर्वसाधारण हक्क या बहिष्कृत लोकांस उपभोगितां येत नाहीं. खाजगी मालमत्ता बाळगण्याचा हक्क इंग्रजी कायद्यांत आहें; पण मनूच्या द्वाहीमुळें जर मालमत्ता मिळवितां येत नाहीं तर त्यांनीं बाळगावें काय ? अखंड दारिद्र्य ! असें असूनहि तिकडे दुर्लक्ष्य करणाऱ्यांना किंवा आहे तें वाईट नाहीं असा उपमर्द करूं पहाणाऱ्या हिंदूंना " शाठ्यं प्रति लाठ्यं " हा लोकमान्य भोपटकरांचा न्याय लागू केल्यास गैर होईल काय ?

या बहिष्कृत लोकांचा स्वकीयांकडून होत असलेला उपमर्द जितका दुःसह व क्षोभकारक आहे तितकाच ब्रिटिश राज्यपद्धतीचा कल चुकीचा व शोचनीय आहे. " जाति व रूढि यांच्यावर कायद्याचा पगडा बसविण्यास कायदे करणारी मंडळी आपल्या स्वाभाविक मर्यादेच्या आंत असली पाहिजे, व त्या मर्यादेचें उल्लंघन करून समाजाच्या मतांशी तिनें प्रत्यक्ष रीतीने विरोध करितां कामा नये " हा सर्वसाधारण नियम सरकारनें आपल्या ता. ८ आक्टोबर १८८६ च्या ठरावांत स्वतःस बंधनकारक म्हणून जाहीर केला आहे. याचा उघड अर्थ असा कीं, सामाजिक व धार्मिक बाबतींत जरी अन्याय होत असला तरी त्याच्या निवारणार्थ सरकार आपली सत्ता खर्ची घालणार नाहीं. म्हणजे आहे तें सामाजिक दडपण अबाधित चालू रहाण्यास परवानाच झाला म्हणावयाचा. कारण कांही बाबतींत राजदंड लाविल्याशिवाय सामाजिक अन्यायाचें निर्मूलन होणें दुरापास्त आहे, आणि म्हणूनच बहिष्कृतांना या राजदंडास " असून अडथळा व नसून खोळंबा " असेंच म्हणावे लागतें. उलट आपल्या हातीं असलेला हा दंड स्वराज्याच्या देणगीनें आपल्या खालच्यास बाधक होत असलेला आपला पगडा न डळमळूं देतां आपल्याला मात्र जाचक होत असलेला इंग्रजांचा कांटा काढून टाकणें हाच काय तो ज्यांचा हेतु अशांच्या हातीं दिला आहे ! याचा सारांश, स्वराज्य म्हणजे आमच्यावर राज्य होणार ! इंग्रजी राज्यांत ज्यांची बात सहन होत नव्हती त्यांची लात सोसावी लागणार ! स्वकीयांच्या सामाजिक, आर्थिक व धार्मिक जुलुमाच्या आड घातलेलें इंग्रजी सत्तेचें सुदर्शन लोपून स्वराज्याच्या वज्राचा आमच्यावर प्रत्यक्ष आघात होण्याची वेळ येणार ! म्हणूनच आम्ही म्हणतों कीं, द्याल तर असें स्वराज्य द्या कीं त्यांत थोडेंबहुत आमचेंहि राज्य आहे.



अग्रलेख : मूकनायक, ता. २८ फेब्रुवारी १९२०.

# १

# टोणगे पान्हवतील काय ?

'' न जें प्रिय, सदोष '' हा राजकारणाच्या चढाओढींतील पक्षकारांच्या उन्नतीचा एक राजमार्गच होऊन बसला आहे. विरुद्ध पक्ष हा नेहमीं अप्रिय असावयाचाच, व त्याची नाचक्की करून आपला बोलबाला वाढविण्यास त्यांच्यांतील दोष दृष्टोत्पत्तीस आणणें हा पक्षकारांचा नित्यनेम उद्योगच म्हणावयाचा. केव्हां केव्हां तर पक्षकारांत नसते दोष प्रतिपक्षाच्या अंगीं लावून त्याचें चांगले स्वरुप बीभत्स आहे असें दर्शविण्याची प्रवृत्ति-नव्हे कृतीहि–होते. याचें उदाहरण पाहिजे असल्यास ब्रिटिश राज्यपद्धतीचें राष्ट्रभक्तांकडून होत असलेलें छिद्रान्वेषण बस्स आहे. ब्रिटिश राज्यांत होत असलेल्या शिक्षणाच्या हेळसांडीचा आधार घेऊन त्याच्यावर राष्ट्रभक्तांनीं कसें तोंडसुख घेतलें हें नव्यानें सांगावयास नको. जेथें जेथें म्हणून स्वराज्य आहे तेथें तेथें प्रजेला साक्षर करण्याच्या हेतूनें प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्यांत आलें आहे, म्हणून हिंदी प्रजा साक्षर करणें असेल तर स्वराज्य मिळविल्याखेरीज गत्यंतर नाहीं असें ठासून सांगितलेलें वाचकांच्या कानांवर आलें असेलच. १९१० सालीं कायदे कौन्सिलांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें करणारें एक बिल आणलें होतें. बिलाचे पुरस्कर्ते कै. गोखले यांचा हेतु जरी प्रामाणिकपणाचा होता तरी त्यांना दुजोरा देणारे जहाल राष्ट्रभक्त अप्रामाणिकच होते असें आतां बालंबाल सिद्ध झालें आहे. या राष्ट्रीय भक्तांना सक्तीचें शिक्षण मान्य नसतां केवळ लोकांना पाहिजे आहे व सरकार सवड नाहीं म्हणून करणार नाहीं व न झाल्यानें जनता निराश होऊन सरकारबद्दल अप्रीति वाढेल व स्वराज्य सुलभ होईल या धोरणानुसारच त्यांनीं सक्तीच्या शिक्षणाची तळी उचलून धरली असावी. नाहीं तर ज्यांना प्रामाणिकपणें सक्ती पाहिजे आहे त्यांनी आपल्या हातीं सत्ता आल्याबरोबर तसें केलें असतें. कदाचित् सरकारनें सक्तीचें शिक्षण नाकारल्याबद्दल उसन्या कळकळीच्या आवेशांत वाहिलेल्या लाखोलीच्या भरांत सक्ती करण्याची संधि आली असतां आपल्याला एक तर नको असतां करावी लागेल किंवा आपलें बहिरंग जाऊन आपली बदमाषी व्यक्त होऊन आपण जनतेचे मित्र नसून तिचे हितशत्रु आहों हें स्पष्ट झाल्यावर आपल्या तोंडाला काळोखी लागेल या भवितव्यतेचा त्यांना विसर पडला असावा. पण देव तरी त्यांची परीक्षाच घ्यावयाला बसला आहे ना ! करावें काय ? ज्यांना जें अंतर्यामापासून नको होतें त्यांच्याच हातून तो तें करावयास लावितो, अशा त्याच्या

आगाध लीलेपुढें कोणाचा इलाज आहे ? मुंबई सरकारच्या ध्यानीं उभा राहून म्युनिसिपालिट्यांना आपल्या हद्दींत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्यास अनुज्ञा देणारें बिल १९१७ सालीं पास झालें. त्यांत दरेक म्युनिसिपालिटीच्या वाढत्या खर्चाचा कांहीं भाग स्वतः देण्याचीहि योजना झाली आहे. इतकी सवलत असूनहि जे लोक सक्तीचें शिक्षण नाहीं म्हणून ओरड करीत होते त्यांच्यांतील सहासातच म्युनिसिप्यालिट्यांनीं सक्ती करण्याचा निर्धार करावा हें त्यांच्यांत वसत असलेल्या शिक्षणाच्या चाडीचें द्योतक आहे. त्यांतल्या त्यांत ब्रिटिशांवर हल्ला करणाऱ्या सैनिकांत ज्या पुणेंकरांची आघाडी होतीं तेच पुणेंकर अजूनहि पिछाडीवरच आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. शिक्षण मुलांबरोबर मुलींना द्यावें कीं मागाहून द्यावें, याचाच वादविवाद करण्यांत ते गुंतले आहेत. प्रथमतः सक्तीचें शिक्षण कशाला ? आहेत त्याच शाळा सुधारा, हवेशीर करा, त्यांना बागबगीचे जोडा, व्यायामाकरितां पटांगणें वाढवा असा पुणेरी सल्ला केसरीकारानें दिला होता. हल्लीं शाळेंत जात असलेलीं मुलें वरिष्ठ हिंदूंचींच असावयाची. तेव्हां वाढतें उत्पन्न त्यांच्या सोयी करण्याकडे खर्च करावयाचें टाकून सक्तीचें शिक्षण करून मागासलेल्या व बहिष्कृत वर्गांतील मुलांना साक्षर करण्यास त्याचा अपव्यय करण्यांत काय हंशील, असें केसरीकारांना वाटल्यास नवल नाहीं. परंतु लोकलज्जेस्तव केसरीकारांनीं आपल्या ब्राह्मणी धोरणांत सुधारणा केली आहे. त्यांच्या हल्लींच्या मतें फक्त मुलांना सक्तीचें शिक्षण द्यावें, मुलींना पुढें पाहूं ! याचें कारण पैशाची तूट ! ज्या राष्ट्रीय भक्तांनीं स्त्रियांस मताधिकार द्यावा म्हणून पुरस्कार केला त्यांनींच मुलींस सक्तीचें शिक्षण मागाहून देऊं म्हणावें यांत दिसून येत असलेली विसंगतता व विचारशून्यता राष्ट्रीयभक्तांशिवाय अन्यत्र्य सांपडेल असें दिसत नाहीं. " कराच्या वाढत्या ओझ्याचें भयानक संकट राष्ट्रीय पक्षानें उभें केलें असतां मवाळांचीं कठोर अंतःकरणें त्या योगानें द्रवलीं तर नाहींतच, उलट हीं संकटें दाखविणारांची टवाळी करून व मर्मभेदक शब्दांनीं त्यांच्या काळजास घरें पाडून आपलें पाषाणमय कठोर ह्रदय मात्र त्यांनीं उघड करून दाखविलें " इत्यादि विलाप लोकसंग्रहकारांनीं काढले आहेत. आमचा कारभार आम्ही करूं, असा मर्दुमकीचा धिंगा घालणारांनीं असले बायकी बोल बोलावे हें एक नवलच होय. कारभाराच्या सौख्यांबरोबर करभाराचेंहि ओझें सोसावें लागतें, हें लोकसंग्रहकार विसरलेसें वाटतें. करभाराचें ओझें घेण्याइतकें पौरुष्य पुणेंकरांत नाहीं असें जर लोकसंग्रहारांचें मत असेल तर त्यांच्या जातभाईंनीं ब्रिटीश मुत्सद्यांना जो सल्ला देण्यास मागें घेतलें नाहीं त्याची आम्ही त्यांस आठवण करून देतों. करभार जर झेपत नसेल तर खर्चाच्या सदरांत फेरफार करा. जेथें होईल तेथें काटकसर करून इतर कमी महत्त्वाच्या

बाबतींत होत असलेला खर्च काढून शिक्षणाच्या पाठी लावा. जें उपदेशीत होतां तेंच करा. मग हरकत काय उरली ? केसरीकारांचे मात्र यानें समाधान होईल असें दिसत नाहीं. कारण त्यांना स्त्रीशिक्षणच नको आहे. पैसा नाहीं ही केवळ सबब आहे. म्हणूनच पैशाच्या प्रश्नाची त्यांनीं फारसी वाटाघाट केली नाही. पुणें म्युनिसिपल कमिटींतील एकंदर ३९ सभासदांपैकीं लोकनियुक्त सभासदांची संख्या २६ आहे. या २६ पैकीं गेल्या बैठकींत गैरहजर राहिलेले ४ सभासद वजा जातां उरलेल्या २२ पैकीं १६ सभासद मुलींच्या शिक्षणाविरुद्ध आहेत. लोकप्रतिनिधीचें मत तेंच लोकमत हें खरें असेल तर पुण्यांतील सर्व लोकमत राष्ट्रीयपक्षाचें आहे. म्हणजे मुलींच्या शिक्षणाच्या विरुद्ध आहे असें केसरीकारानें मोठ्या दिमाखानें सांगितलें आहे. '' तेव्हा लोकप्रतिनिधि '' हे जर लोकमताचे खरे आदर्श नसतील तर ' त्वमेव शरणं मम ' म्हणून कलियुगांतील कारभाराचा राजा जो मतदार त्याच्याकडे जाऊन या गोष्टीचा अखेर निकाल लावून घ्या असें राजकारणांत निष्णात असलेल्या केसरीकाराचा सल्ला आहे. हा जाडा व पोक्त सल्ला किती मानभावी आहे याची फोड करणें जरुर आहे. खर्चाचे ओझें नुसत्या मतदारावर नाहीं. अप्रत्यक्ष रीतीनें म्युनिसिपालिटीचा कर भरून ज्यांना मतदारीचा हक्क नाहीं असे कितीतरी लोक केसरीच्या सोवळ्या गांवांत असतील. मग मतदारांनाच विचारा म्हणतां तें कां ? त्यांत कांहीतरी अर्थ साधावयाचा असावा म्हणून. मुलांच्या सक्तीच्या शिक्षणाला कबूल नसणारे मतदार मुलींच्या शिक्षणाला कबूल होतील हें मुळींच संभवत नाहीं. मागासलेले व बहिष्कृत लोक प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें कर देतात. पण शिक्षण घेणाऱ्यांत वरिष्ठ वर्गांतील मुलांचाच भरणा असतो म्हणूनच लो. कवडेशास्त्री म्हणतात कीं, सक्ती कशाला ? दुसऱ्याच्या जिवावर आपली चैन होतेच आहे, शिक्षणाच्या बाबतींत आपल्या हिताची परमावधी झालीच आहे, मग वाढता कर देऊन मागासलेल्या व बहिष्कृत वर्गांची मुलें साक्षर करण्यांत काय पुरुषार्थ ? पदरच्या पैशानें पाजविलेली सुरी आपल्या प्रतिपक्षाच्या हातीं देण्यास त्यांचें मन धजत नाहीं ; पण करतील काय ? आजवर कृष्णाचें संगोपन करणारे वसुदेव आम्हीच आहोंत-इंग्रज नव्हत-असें भासवून पाळण्याच्या दोऱ्या हातांत घेतल्यानंतर जर कां त्याची दाद घेतली नाहीं तर या बहिरंग वसुदेवाच्या आंत बसत असलेलें कंसाचें अंतरंग दिसून आपली फजिती होईल म्हणून मुलांच्या शिक्षणास ते कबूल झाले, पण मुलींच्या शिक्षणाला कबूल होण्याइतकी पुण्याई त्यांच्यांत नाहीं. वरिष्ठादि हिंदुंचे धार्मिक आचारविचार, कोत्या समजुती, खुळचट व नादान संस्कार इत्यादिकांची जिवापाड जोपासना जर कोणी करीत असेल तर तो त्यांच्यांतील श्रद्धांध स्त्रीवर्गच होय. त्या स्त्रीवर्गास साक्षर करून आपल्या धार्मिक वर्चस्वाच्या इमारतीच्या

आधारस्तंभास कीड लावून घेण्यास हे मतदार टोणगे पान्हावतील हें कदापि होणें नाहीं, हें ओळखूनच ही मतलबी सूचना केसरीनें केली असावी. नाहीं तर मुलामुलींत सावत्रभाव दाखवणाऱ्या आपल्या म्हातारीस फांशी देण्याची पाळी आली असतां तिला फांशीं द्या असें म्हणणाऱ्या न्यायाधिशाचा जाणूनबुजून सल्ला घ्या असें आव्हान करण्याइतका भोळा केसरी नाहीं हें खास.

●●●

विविध-विचार : मूकनायक, शनिवार, ता. २८ फेब्रुवारी १९२०.

# १०

# यांचा ब्राह्मणवर्ण असावा खास

गेल्या दोन-तीन वर्षांत ब्रह्मवृंदांवर एक मोठी आपत्तीच ओढवली होती असें म्हणावें लागतें. अखिल जगाच्या–ब्रह्मवृंदांच्या नव्हे–रक्तानें पृथ्वीतलावर नुकताच लिहून ठेवलेल्या स्वयंनिर्णयाच्या कायद्याच्या आधारावर हिंदुस्थानावर असलेली इंग्रजी सत्ता बेकायदेशीर आहे अशी फिर्याद ब्रिटीश जनतेपुढें घेऊन जाण्याचा ब्रह्मवृंदानें निर्धार केला. एके प्रकारें न्यायप्रिय, समताप्रिय, स्वातंत्र्यप्रिय, व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वासाठीं जिनें तन मन धन खर्ची घातलें अशी ब्रिटिश जनता या फिर्यादीचा निकाल आपल्या विरुद्ध देणार नाहीं असें ब्रह्मवृंदांना वाटे. पण मधून-मधून त्यांचें मन त्यांनां खात असे. ६ कोट प्रजा, तीहि एकधार्मियत्वाच्या व एकदेशीयत्वाच्या सुतांत गोवलेली ! आपल्या वर्चस्वानें अशा जिव्हाळ्याच्या लोकांच्या माना मुरगाळून आपण गब्बर झालों ! त्यांना मानसिक, सामाजिक, धार्मिक गुलामगिरींत हजारों वर्षें ठेविलें ! नव्हे त्यांची उन्नति करणारांस विरोध केला. इंग्रज आले म्हणून बरें, नाहीं तर त्यांचे हाल कुत्र्यानें खाल्ले नसते ! अशा आपण स्वयंनिर्णयाची फिर्याद घेऊन जाणें म्हणजे '' **अहिंसा परमो धर्मः** '' असें फर्माविणाऱ्या बुद्धासमोर खाटकानें, माझ्या गायी चोरुन नेल्या त्या परत आणून देण्यास लावा, असे म्हणण्यासारखेंच आहे ! ज्यांच्या माना तुम्ही मुरगाळीत होतां त्यांच्या माना मुरगाळण्याच्या आड इंग्रजी सत्ता येते म्हणूनच तुम्हास ती नको असें जर ब्रिटीश लोकांनी आपणास विचारलें तर त्याला उत्तर काय ? एका देशाचें दुसऱ्या देशावर राज्य कां असा आपण प्रश्न पुढें मांडणार, पण त्यांनीं ' एका वर्गाचें दुसऱ्या वर्गावर साम्राज्य कां ' असा उलट प्रश्न भरसभेंत जर विचारला तर या काळोखी लागलेल्या तोंडानें आपण काय सांगावें, अशी ब्रह्मवृंदांस मोठी पंचाईत पडली ? ही काळोखी धुवून टाकून उजळ माथ्यानें आपल्यावरील इंग्रजी सत्ता काढून टाका असें मोकळ्या मनानें मांडतां यावें म्हणून आपल्या देशबांधवावर होत असलेला जुलूम काढून टाकण्यास आपली ना नाहीं असें भासविण्यासाठीं १९१७ सालीं राष्ट्रीय सभेतर्फे ब्रह्मवृन्दानें बहिष्कृतोन्नतिपर ठराव पास करवून आपला कलंक धुवून टाकिला. तसेंच १९१८ सालीं अस्पृश्यतानिवारक परिषद् भरवावयास लावून लो. टिळक व लो. नामदार खापर्डे या जोडीनें बहिष्कृतोन्नतीस ब्रह्मवृन्दाची सहानुभूति आहेसें वाचेनें दर्शविलें. चांभाराचा गणपति आपण गाडीत घेतला हा आपल्या सहानुभूतिचा पुरावा भरसभेंत

सांगून लो. टिळकांनीं सर्वांस चपापून टाकलें, व आपण बहिष्कृतांच्या आड येतों असें म्हणणारांचें तोंड बंद केलें. लो. नामदार खापर्डे " **तप्तेने तप्तायसा घटणाय योग्यम्,** " लोखंडाचे तुकडे लाल झाल्यावरच ते एकजीव होऊं शकतात, त्याचप्रमाणें तुम्ही आम्ही तापलों आहों तर आतां एकजीव होऊंया म्हणून काकुळतीस आले. परंतु काम संपल्यानंतर लो. टिळकांनीं जाहीरनाम्यावर सही करण्याचें नाकारिलें ? त्यांचेंच वळण ज्यांनीं घेतलें आहे असे लो. नामदार खापर्डे विलायतेहून स्वराज्याचें गाठोडें घेऊन आल्यानंतर ता. १७-१-१९२० रोजीं पुणे येथें तें चोरण्यास कॉंग्रेसच्या डेप्युटेशननें कशी मदत केली या विषयावर दिलेल्या जाहिर व्याख्यानांत ते म्हणाले, " राज्यसुधारणांच्या विचारांत कॉंग्रेसचे शिष्ट गेले तेव्हां इतरांनाहि जाण्याची इच्छा झाली. नेमस्त धांवले, रंगू, साळू, मैना धावल्या. अंत्यजांनाहि स्वस्थ बसवलें नाहीं. सर्वांनींच विलायतेस गर्दी करून सोडली. अंत्यजांनांहि मागावयास जागा होती. ते प्रगतीसाठीं मोठेपणा घेऊं पहात आहेत. " **ब्राह्मणोस्य मुखमासीत्** " या मंत्रानुसार रचलेल्या चातुर्वर्णाचे शेवटले भागीदार आज पहिल्या पदावर चढण्याचा प्रयत्न करीत आहेत. पायानें डोक्यावरचें भूषण धारण करण्यासारखाच हा प्रयत्न आहे. पण त्यावांचून प्रगति कशी होणार. " हे उपरोधिक बोल व अस्पृश्यता निवारक सभेंत केलेली केवीलवाणी याचना या परस्पर विरोधी शब्दावडंबरांचा जनिता एकच आहे असें कोणाहि परक्या माणसास खरें वाटणार नाहीं ; परंतु ज्यांना लो. खापर्ड्यांची नसन्‌नस ठाऊक आहे त्यांना लो. नामदार खापर्ड्यांची जिभला अशी परस्पर विरोधी वचनें वदण्यास कशी स्फुरण पावली याबद्दल मुळींच विस्मय वाटणार नाहीं. विलायतेस जाण्यासाठीं उसण्या आणलेल्या उदार विचाराच्या वाफेनें आपला मुखचंद उजळ करून घेतला तो त्यांनी आपद्धर्म म्हणूनच करून घेतला असावा. नाहींतर परत आल्यावर अंतर्यामीं दाबून धरलेल्या विचारावडंबरांचा प्रवाह सोडून देऊन आपला पूर्वीचा कलंक पुन्हां कां चढवून घेतला असता ? असें दुटप्पी वर्तन करणारे, वाऱ्यास पाठ देणारे, स्वार्थासाठीं साधूचें सोंग घेणारे, कामासाठी मामा म्हणून साधल्यास उपकाऱ्यास अपकार करणारे, सत्याचा बदला शाठ्यांत देणारे लोक कोणत्या वर्णाचे हें निराळें सांगणें नकोच. ज्यांची त्यांनींच कबुली दिली आहे. म्हणूनच लो. बाप्टिष्टा कांहींहि म्हणोंत, विलायतेचें पाणी जरी प्याला तरी ब्राह्मण जातींवर गेल्याशिवाय रहाणार नाहीं, असा इशारा बहिष्कृत वर्गास वेळींच देणें बरें.



विविध-विचार : मूकनायक, शनिवार, ता. २८ फेब्रुवारी १९२०.

# ११

# वैऱ्यांनीं कीं हो नेला कैवारी

एकाच परिस्थितीनें गांजलेल्या माणसांनी एकमेकास दाखविलेल्या सहानुभूतीचीं उदाहरणें कोणास पाहिजे असल्यास त्यानें आपला अनुभव चोखाळून पहावा, परंतु एका देशांतील लोकांनी दुसऱ्या देशांतील समदु:खीयांना सहानुभूति दाखविल्याचीं उदाहरणें क्वचितच सांपडतात. भाषा, वर्ण, संस्कृतिभिन्नत्वामुळें देशादेशाचे निरनिराळे तट झालेले दिसतात. या त्रयीच्या कुंपणानें एक देश दुसऱ्या देशाला पारखा होतो. अशा भिन्नत्वामुळें एकाचे विचार दुसऱ्याला कळणें शक्य नसतें. संस्कृति व वर्णभिन्नत्वामुळें एका देशांतील लोकांचे दुसऱ्या देशांतील लोकांशीं दळणवळण कमी असतें. परिस्थितीचें अज्ञान व दळणवळणाचा अभाव यामुळें एका देशांतील लोकांस दुसऱ्या देशांतील लोकांबद्दल सहानुभूति उत्पन्न होण्यास जागाच नसते. परंतु एकुणिसाव्या शतकापासून या बाबतींत बराच फरक पडला आहे, असें म्हणावें लागतें. परस्पर देशांत वस्तुविनिमयापासून परभाषेचें ज्ञान होऊं लागलें व त्यापासून विचारविनिमयहि होऊं लागला. वर्तमानपत्रें, आगबोटी इत्यादी साधनांनीं सर्व जगाचें संघटन झालें आहे, आणि परिस्थिति कळूं लागल्यापासून परस्परांत सहानुभूति व सहकारिताहि उद्‌भूत होऊं लागली आहे. याचें मूर्तिमंत उदाहरण विलायतेंतील मजूरपक्षानें हिंदुस्थानास स्वराज्य मिळवून देण्यास केलेली मदत ही होय. स्वयंनिर्णयाचा मार्ग व्यवहारांत आणूं नयें असें म्हणणाऱ्या आपल्या जातभाईच्या मकरदाढेंतून तो काढून त्यानीं हिंदुस्थानसारख्या परदेशाच्या लोकांस ब्रिटिश साम्राज्यास संभवणाऱ्या धोक्याची दिक्कत न बाळगितां दिला. ही त्यांची करणी जरी त्यांच्या उच्च व धवल शीलास शोभण्यासारखीच आहे तरी तिचें आम्हास सखेदाश्चर्यच वाटत होतें. भांडवलवाल्यांच्या अतिलोभानें नागावलेल्या, दारिद्र्यानें गांजलेल्या, नालायक म्हणून उपमर्दिलेल्या या विलायतेंतील मजूरलोकांनीं हिंदुस्थानांतील वरिष्ठांच्या दंडलीनें पीडलेल्या, सामाजिक, आर्थिक, व धार्मिक जीवनास आंचवलेल्या, व नागरिकत्वास दुरावलेल्या, सर्व बाबतींत खालावलेल्या या समदु:खी बहिष्कृत लोकांना सहानुभूति दाखवावयाची ती एकीकडेच राहून ज्यांनीं त्यांचें नष्टचर्य केलें अशांना मदत केली याबद्दल कोणालाही हळहळच वाटणार आहे ; परंतु विलायतेंतील मजूरपक्षाच्या हातून जी ही अक्षम्य गोष्ट घडली तीस मजुरवर्ग जबाबदार नसून बहिष्कृत वर्गच जबाबदार आहें असें म्हणावें

लागतें. बहिष्कृत वर्गानें आपल्या खऱ्या दीन स्थितीचें ज्ञान व तिचीं कारणें मजूरवर्गास कळविण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. उलट वरिष्ठ हिंदूंच्या शिष्टमंडळानें बहिष्कृत वर्गांची स्थिति आबाद आहे, फार फार तर आर्थिक विषमता जशी इंग्लंडांत तशी हिंदुस्थानांतहि आहे असें भासवून जें कांहीं वाईट आहे तें इंग्रजाचा जुलुम, दुसरें वावगें कांहीं नाहीं असें सांगून मजूरवर्गाची सहानुभूति मिळविली, तरी पण फसून न जातां हिंदुस्थानांतील आर्थिक दृष्ट्या नागावलेल्या लोकांची या बेगुमान लोकांस पर्वा करण्यास बजाविलें असावेंसें दिसतें. त्याशिवाय कांग्रेसनें गेल्या डिसेंबरांत मजूरसंघस्थापनेचा ठराव कां पास केला याचा उलगडा होत नाहीं. मजूरपक्षाची आज्ञा म्हणूनच तो पास केला गेला असावा. नाहीं तर आपल्या साऱ्या आयुष्यांत जिनें आंतरीय सामाजिक व आर्थिक गांजणुकीची चर्चा करून आपलें तोंड विटाळलें नाहीं तिनें गेल्याच वर्षी तसें विटाळावें याचें कारण काय ? विलायतेंतील मजूरपक्षानें या सोंवळ्या सभेंकडून एवढें सत्कृत्य करवून घेतलें याबद्दल हिंदुस्थानांतील सर्व मजूरलोक त्यांचे निःसंशय आभार मानतील. परंतु हिंदुस्थानांतील सामाजिक विषमता आर्थिक विषमतेपेक्षा भिन्न असून अति तीव्र आहे, हें जर विलायतेंतील मजुरवर्गास योग्य कालीं समजावून दिलें असतें तर हें स्वराज्य म्हणजे आपल्यावर होणारें राज्य कदाचित् टळलें असते. निदान स्वराज्यांत स्वतंत्र प्रतिनिधिमार्फत आपलें राज्य करून आणण्यास त्यांनी गळ घेतली असती. पण या बहिष्कृत वर्गाच्या नादानपणामुळें त्यांचा कैवारी त्यांच्या वैऱ्यांनी नेला. इतःपर तरी असें न होईल अशी खबरदारी घ्या.

● ● ●

---

विविध-विचार : मूकनायक, शनिवार, ता. २८ फेब्रुवारी १९२०.

# १२

# स्वराज्यांतील आमचें आरोहण, त्याचें प्रमाण व त्याची पद्धति

हिंदुस्थानांतील भावी स्वराज्य एकसत्तात्मक किंवा प्रजासत्तात्मक राज्य नसून प्रजा प्रतिनिधिसत्तात्मक राज्य होणार आहे, व अशा प्रकारचें स्वराज्य सुराज्य होण्यास मतदारीचा हक्क विस्तृत करून जातवार प्रतिनिधि देणें किती अगत्याचें आहे याचें विवेचन आतांपर्यंत लिहून गेलेल्या स्वराज्यावरील अग्रलेखांत केलें आहे. परंतु आमच्या वाट्यास येणारे प्रतिनिधि किती आहेत व ते कोणत्या पद्धतीनें मिळणार हें निश्चित झाल्याखेरीज जातवार प्रतिनिधीनुरूप होणाऱ्या आरोहणापासून आमचें कल्याण होईल असें मानून घेण्यास आम्हीं केव्हांहि तयार होणार नाहीं. म्हणून भावी स्वराज्यांत आमचे किती प्रतिनिधि असावेत व ते कोणत्या पद्धतीनें यावेत या प्रश्नाचा विचार या पंचम अंकी करूं.

प्रथमतः जातीजातीत प्रतिनिधींच्या वाटणीचें योग्य प्रमाण कोणत्या आधारानें ठरवितां येईल हें पाहूं. जातवार प्रतिनिधि देण्याचें कारण मागें असें सांगितलें आहे कीं मतदार लोक प्रतिनिधि निवडून देतांना उमेदवारांच्या योग्यतेकडे विशेषसें लक्ष न पुरवितां त्यांच्या जातीकडे पाहून आपलें मत देतात. धर्मानें कांही जाति श्रेष्ठ व पवित्र ठरविल्या आहेत व कांही जाती कनिष्ठ व अपवित्र ठरविल्या आहेत. स्वाभिमानशून्य खालच्या जाति वरच्या जातीस पूज्य मानितात, व शीलशून्य वरच्या जाति आपल्यास नम्रभावानें श्रेष्ठ मानणाऱ्या खालच्या जातीस नीच मानतात. अशा अन्योन्य भावनेनें प्रेरित झालेल्या लोकांचे जर आपण सर्वसाधारण स्थलवाचक मतदार संघ केले तर अशा संघाचा प्रतिनिधि म्हणून निवडून जाण्यास उभा रहाणारा उमेदवार जर ब्राह्मणेतर किंवा बहिष्कृत असला तर वरच्या जातीचे मतदार ज्याला त्याच्या जातीमुळें नीच मानीत आहेत त्याला आपलें मत देऊन प्रतिनिधिसारख्या उच्च दर्जास चढवून स्वतःची मानहानि करून घेण्याइतका उदारपणा केव्हांच दर्शविणार नाहींत. उलटपक्षी तोच उमेदवार जर ब्राह्मण असला तर वर्णाभिमानानें एकजीव झालेले ब्राह्मण लोक त्याला मत देतील यात मुळींच शंका नाहीं. पण नवलाची गोष्ट ही आहे कीं, ब्राह्मणेतर व बहिष्कृत लोक देखील त्याला आपलें मत देऊन ब्राह्मणाची सेवा करण्याची आलेली ही संधी साधून पुण्यसंचय करण्यास धांव घेतील हें खास. इतकेंच नव्हे तर

चढाओढीनें एक ब्राह्मण, एक ब्राह्मणेतर व एक बहिष्कृत असें तीन उमेदवार जर उभे राहिले तर ब्राह्मण लोक चुकुन देखील ब्राह्मणाशिवाय इतर कोणाला आपलें मत देणार नाहीत. त्यांच्या आंगीं वाणलेली ही स्वजातिहितपरायणता खरोखरच अनुकरणीय आहे. परंतु ब्राह्मणेतर व बहिष्कृत लोक अंधश्रद्धेच्या पायीं स्वज्ञातिहितास पराङ:मुख होऊन आपलें मत ब्राह्मण उमेदवारास निःसंशय देतील. ब्राह्मण वर्गाची भक्ति इतर वर्गावर नाहीं पण ब्राह्मणेतरांची व बहिष्कृतांची भक्ति ब्राह्मणावर किती आहे हें सर्वश्रुत आहेच. अशा या संघटनामुळें ब्राह्मण उमेदवार आपल्या जातीच्या मतदारांच्या बलानेंच नव्हे तर त्यांना पूज्य मानणाऱ्या ब्राह्मणेतर व बहिष्कृत मतदारांच्या बलानें ब्राह्मणेतर बहिष्कृत उमेदवारास चीत करून निवडून येण्याचा प्रबल संभव आहे. म्हणूनच होणारी कायदे कौन्सिलें एकवर्णीय होतील असें कांही विव्दानांनी भाकीत केलें आहें. ज्याप्रमाणें मादक पदार्थ सेविल्यानें सेवन करणारांचें नुकसान होतें त्याचप्रमाणें ब्राह्मणवर्गावर जडलेली ब्राह्मणेतरांची व बहिष्कृतांची श्रद्धा विनाशक आहे. श्रद्धा ही दारू इतकीच अभक्ष्यभक्ष आहे. दारू प्याल्यानें जसें त्यांचे नुकसान होतें तसेंच स्वजातीयांना टाकून ब्राह्मणाला मत देण्याकडे जी त्यांची प्रवृत्ति आहे त्या पासूनहि त्यांचे नुकसान होत आहे. या अनहितकारक प्रवृत्तिपासून परावृत्त करण्यास त्यांना जातवार प्रतिनिधि देणें अगत्याचें आहे. बऱ्याच निर्विकल्प गृहस्थांनीं वरील चिकित्सा कबूल करून जातवार प्रतिनिंधीचें तत्व मान्य केलें आहे; परंतु जातवार प्रतिनिधि जरूर असलेल्या जातीस किती प्रतिनिधि द्यावेत या संबंधाचें त्यांचें धोरण अनुदारपणाचें नसलें तरी बेअकलीपणाचें आहे. प्रतिनिधीची वाटणी कशी करावी यासाठी मागें जी वरिष्ठ सरकारने कमिटी नेमिली होती त्या कमिटीच्या रिपोर्टास वरील विधान यथातथ्य लागू पडतें असें म्हटल्यास आमच्या मतें गैर होईल असें वाटत नाही. या कमिटीनें आपल्या रिपोर्टात मुसलमान, बहिष्कृत, ख्रिश्चियन, युरोपियन इत्यादी वर्गास जातवार प्रतिनिधीचें तत्व लावावे अशी शिफारस केली आहे परंतु बहिष्कृत वर्गासारख्या बहुजनसंख्येस मुंबई इलाख्यांत एकच प्रतिनिधि द्यावा असें तिनें सुचविलें होते ! व वरिष्ठ सरकारास दया येऊन एकाचा आकडा खोडून त्यांनी दोहोंचा आकडा टाकला आहे ! आकड्यांची फेरफारी जरी झाली तरी कमिटीनें एक कां सुचविला अथवा सरकारनें दोन द्या म्हणून कां सांगितलें याची कारणें दोघांपैकी एकानेंहि सांगितलीं नाहीत. कायदे कौन्सिल जर नुसतें प्रतिनिधिसंग्रहालय असतें तर दरेक जातीचे एकेक दोन-दोन प्रतिनिधि फार झाले, अशा मतास आम्हीं केव्हांच विरोध केला नसता. वस्तुसंग्रहालयाप्रमाणें स्थलानुमानें दरेक जातीचें नमूने म्हणून कोणत्याही प्रकारचें प्रमाण न राखतां

कोण्या जातीचे अधिक व कोण्या जातीचे कमी असें प्रतिनिधि घेण्यास कांही हरकत नव्हती. पण कायदे कौन्सिलातील प्रतिनिधि प्रेक्षणार्थ स्थानापन्न केलेल्या वस्तू नसून ज्यांचे ते प्रतिनिधी आहेत त्यांच्या परिस्थितींत अदलाबदल सुनावणारे सत्ताधीश पुरूष आहेत हें कोणी विसरतां कामा नये. असले सत्ताधीश पुरूष परिस्थितींत योग्यप्रकारचा अदलाबदल करतील किंवा नाहीं हें त्या सत्ताधीश पुरुषांच्या शिलावर व स्वभावावर अवलंबून आहे. सत्ता आली म्हणजे आपण स्वतंत्र झालों असा साधारण लोकांचा समज आहे. स्वराज्यवादी देखील आपल्या हातीं सत्ता येऊन आपण स्वतंत्र झालों म्हणजे वाटेल ती सामाजिक, धार्मिक व आर्थिक सुधारणा करूं असें सांगत फिरतात; परंतु हा समज अगदींच पोरकटपणाचा आहे. मनुष्य सत्ताधीश जरी झाला तरी तो स्वतंत्र नसतो. स्वभावाच्या आधीन असल्यामुळे स्वतंत्र असूनहि तो पारतंत्र्यांत असतो. स्वभाव सांगेल त्या मार्गानें जाण्यास सत्तेमुळें तो स्वतंत्र आहे; पण स्वभावाच्या विरूद्ध जाण्यास सत्तावान् माणूस देखील अगदीं दुर्बल आहे. म्हणून सत्तेचा उपयोग कोणत्या परीनें होईल हें सर्वस्वी सत्तावान् पुरुषाच्या स्वभावावर अवलंबून रहाणार आहे. ब्राह्मणी स्वभाव ज्यांच्या आंगी बाणला आहे असें पुष्कळसें प्रतिनिधि जर कायदेकौन्सिलांत शिरले तर त्या वर्गाच्या सामाजिक व धार्मिक वर्चस्वामुळें होणारे इतर जातींचें नुकसान टाळण्यास ते आपल्या हातीं आलेली सत्ता खर्ची घालतील काय ! उलट हें वर्चस्व कायम करण्यास त्यांच्याकडून उपाय योजिले जातील असें अनुमान काढल्यास चुकींचे होणार नाहीं. हें वर्चस्व जर गेलें नाहीं तर स्वराज्य असून उपयोग काय ? व तें जर कायम झाले तर स्वराज्यासारखा दुसरा अधःपात कोणता ? स्वराज्याचें असे विपरीत परिणाम होऊं नयेत म्हणून ज्या जातींना आजची परिस्थिति जाचक होत आहे त्यांच्या हातीं ती सानुकूल करून घेण्यास पुरेशी सत्ता येईल इतके प्रतिनिधि उर्फ सत्ताधीश पुरुष त्या त्या जातींतून आले तरच स्वराज्यांपासून खरा फायदा होणार आहे. म्हणूनच जातींजातींत प्रतिनिधींची वाटणी कोणत्या तत्वावर व्हावी हा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. या प्रश्नासंबंधी लॉर्ड मोर्ले यांचे मत मननीय आहे. १९०९ सालीं मुसलमानांना किती जातवार प्रतिनिधि द्यावेत या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लावतांना ते म्हणालें " माझ्या मतें जातवार प्रतिनिधींच्या तत्त्वानुरूप कायदेकौन्सिलची रचना करितांना जातीजातींतील व्यवहार, त्यांच्या इच्छा, त्यांच्या गरजा इत्यादिकांत समतोलपणा ठेवला जाईल अशा रीतीनें त्यांच्यांत प्रतिनिधींची वाटणी झाली पाहिजे. असा समतोलपणा गणितशास्त्राच्या, भूमितीच्या किंवा तर्कशास्त्राच्या सिद्धांतानें साध्य होणार नसून त्याला व्यापकबुद्धिचा व दूरदृष्टीचाच उपयोग केला पाहिजे. माझ्या मतें प्रतिनिधींचे प्रमाण ठरवितांना

जरी वरील महत्त्वाच्या गोष्टींचा विचार करणें जरूर आहे तरी पण प्रतिनिधींच्या संख्येच्या प्रमाणाचा पाया जातींच्या परस्पर संख्येवरच उभारला पाहिजे.'' जातीची संख्या व तिच्या गरजा या दोन गोष्टीनुरूप प्रतिनिधींची संख्या ठरविल्यास जातीजातींत कलागतीचें कारण उरेल असें दिसत नाहीं. संख्येंने जात मोठी असली पण तिच्या गरजा जर फार नसतील तर त्या जातीला संख्येच्या मानाने स्वतंत्र प्रतिनिधि देणें आमच्या मतें जरूर नाही. उलटपक्षीं संख्येने जरी लहान आहे तरीपण परिस्थितीनें दडपल्यामुळें जिला अनेक गरजा भागवून घेतल्या पाहिजेत अशा जातीस तिच्या संख्येच्या प्रमाणापेक्षां जास्त प्रतिनिधि देणें इष्ट आहे. स्थूलमानानें पहातां मुंबई इलाख्यांतील (एडन खेरीज करून) ब्रिटिश हद्दीत वसत असलेल्या लोकांची संख्या १,९६,१६,४७७ आहे. त्यापैकीं, बहिष्कृत वर्गाची संख्या १६,२७,९८० आहे. संख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधी देण्याचें ठरलें तर या वर्गास शेकडा ८ प्रतिनिधी मिळाले पाहिजेत. परंतु एकंदर मुंबईच्या कायदे कौन्सिलांत ११३ प्रतिनिधि असणार म्हणजे बहिष्कृत वर्गास एकंदरींत ९ प्रतिनिधि मिळणें जरूर आहे. गरजेच्या मानानें पहातां या वर्गास त्याच्याहिपेक्षां जास्त प्रतिनिधि देणें जरूर आहे. कारण या वर्गाच्या गरजा जितक्या आहेत तितक्या गरजा इतर कोणत्याही वर्गाच्या नाहींत. असें जरी तत्वतः सिद्ध होतें तरी खरी वस्तुस्थिति याहून अगदी भिन्न आहे. पार्लमेंटरी कमिटीने बहिष्कृत वर्गास पुरेंसें प्रतिनिधि द्यावेत असें सुचविले आहे. पण '' पुरेसे '' म्हणजे किती हें ठरविणे प्रांतिक सरकारावर व वरिष्ठ सरकारावर सोंपविलें आहे. जितक्या व्यापक दृष्टीनें ही सूचना करण्यात आली आहे तितक्या व्यापक दृष्टीनें तिचा अंमल झाला आहे असें म्हणण्यास आमच्या संख्येच्या व गरजेच्या प्रमाणांत प्रतिनिधि मिळाल्याखेरीज आम्ही कधीही कबूल होणार नाहीं. या ठिकाणीं आम्हाला एक अगत्याची दुरुस्ती करणें अवश्य वाटते.–प्र्याँचाईज कमिटीनें ब्रिटिश हद्दीतील बहिष्कृत वर्गाची लोकसंख्या या इलाख्यांत ५,७७,२१६ धरली आहे. १९११ सालच्या खानेसुमारीवरून पहातां वरील आकडेवारी साफ चुकीची आहे. खानेसुमारीच्या रिपोर्टात ज्या जातींचा विटाळ पाळतात अशा जातींची संख्या १६,२७,९८० दिली आहे. या जातींचा जो वर्ग होतो त्यालाच आम्ही बहिष्कृत वर्ग असें म्हणतो. व इंग्रजींत डिस्प्रेस्डक्लासेस किंवा अनटचेबल्स असें नांव देण्यांत येतें. ही आकडेवारी कमिटीच्या आकडेवारीच्या तिपटीनें आहे. या चुकीच्या आकडेवारीनें कदाचित एक किंवा दोन प्रतिनिधि बहिष्कृत वर्गास पुरेसे आहेत असें कमिटीस व वरिष्ठ सरकारास वाटलें असावें. परंतु ही संख्या चुकीची आहे असें जाणून सरकारनें आमच्या प्रतिनिधिच्या प्रमाणांत आमच्या गरजेच्या प्रमाणांत जरी नाहीं तरी संख्येच्या

प्रमाणानुसार वाढ करून आम्हांस नऊ प्रतिनिधि द्यावेत असें आमचें निकराचें सांगणें आहे. ज्याप्रमाणें प्रांतिक कायदे कौन्सिलांत आमचे प्रतिनिधि असले पाहिजेत त्याचप्रमाणे वरिष्ठ कायदेकौन्सिलांतहि आमचे प्रतिनिधी असले पाहिजेत. कारण ज्या कांहीं बाबींशी आमचा निकटसंबंध आहे, उदाहरणार्थ हिंदू कायदा व्यापारी पद्धति इत्यादि महत्त्वाच्या बाबी वरिष्ठ सरकारनें आपल्या ताब्यांत ठेविल्या आहेत. अशा बाबतींत प्रसंगोपात सुधारणा घडवून आणण्याइतके जरी नाहीं तरी सुधारणा सुचवावयास वरील नऊजणांनी निवडून दिलेला आमचा निदान एक तरी प्रतिनिधि असला पाहिजे.

येथवर प्रतिनिधीच्या विभागणीच्या प्रमाणाचा विचार झाला. आतां त्यांच्या आरोहणच्या पद्धतीचा विचार करू. कायदे कौन्सिलांत येणारे प्रतिनिधी सरकारच्या आवडीनें किंवा मतदारांच्या निवडीनें येऊं शकतात. या दोन पद्धतीपैकी दुसरी पद्धतीच श्रेष्ठ आहे असें अनुभवांतीं सिद्ध झालें आहे. निवडणुकीच्या पद्धतीनें मतदारांत जागृति होऊन त्यांना राजकीय शिक्षण प्राप्त होतें, व निवडलेला प्रतिनिधी त्यास निवडून देणाऱ्या मतदारांस जबाबदार राहतो. उलटपक्षीं आवड करुन नेमलेले प्रतिनिधी ज्यांचे ते प्रतिनिधी म्हणून नेमले जातात त्यांना जबाबदार रहात नसून जे लोक त्यांना नेमतात अशानाच जबाबदार रहातात. आवड करून नेमलेले प्रतिनिधी ज्यांचे ते प्रतिनिधी म्हणून असतात त्यांचा वेळीप्रसंगी द्रोह करण्यास मागेंपुढें पहात नाहींत. कारण कौन्सिलांत होणारा त्यांचा शिरकाव त्यांच्या अशीलांना खुशी राखण्यावर अवलंबून नसून सरकारची बहाल मर्जी राखण्यावरच अवलंबून असतो. सरकारी धोरण व लोकांच्या इच्छा यांची नेहमीच एक दिशा असते असें फारसें घडून येत नाही. परंतु ज्यांची जागा सरकारी धोरणास मान डोलविण्यावरच अवलंबून असते त्यांच्या हातून लोककार्य होण्याचा फारसा संभव नसतो. शिवाय ज्यांचे प्रतिनिधी सरकार आवड करून घेतें ते निवडणुकीच्या व्यापारापासून होणाऱ्या राजकीय शिक्षणास आंचवून हतभाग्याप्रमाणें निर्माल्यवत होतात. एकूण निवडणुकीच्या पद्धतीपासून दुहेरी फायदा आहे. पण ज्या अर्थी भावी कायदेकौन्सिलांत आमचे प्रतिनिधी सरकार आवड करून घेणार आहे त्या अर्थी आम्हांस राजकीय शिक्षण मिळणार नसून आमच्या प्रतिनिधींपासून आमचा फारसा हित संचय होईल अशी सबळ आशा बाळगण्यास आमचें मन धजत नाहीं.

दरेक व्यक्तीस पूर्णावस्थेस येण्यास सामाजिक परिस्थिति कोणत्या प्रकारची पाहिजे हें ठरविण्याचा हक्क जेथें दरेक व्यक्तीस प्राप्त झाला आहे, अशा स्थितीस स्वराज्य हें नांव देणें यथार्थ होणार आहे. अशा प्रकारचें स्वराज्य या देशांत

नांदण्यास दरेक व्यक्तीस मतदारीचा हक्क मिळून निवडणुकीच्या पद्धतीनें संख्येच्या प्रमाणांत जातवार प्रतिनिधि दिले पाहिजेत: परंतु भावी स्वराज्यांची जी घटना होत आहे त्यावरून असें स्पष्ट होतें आहे कीं, स्वराज्याची वरील व्याख्या ज्यांनी स्वराज्याच्या घटनेंत बराचसा भाग घेतला आहे त्यांना अवगत नसावीसें दिसतें. नाहीं तर मतदारीचा हक्क संकुचित करून जातवार प्रतिनिधीस विरोध करून सामाजिकदृष्ट्या किंवा आर्थिकदृष्ट्या ज्या वर्गाचें स्वामित्व आहे त्या वर्गाचें स्वराज्यांत आरोहण करून सामाजिक व आर्थिक दृष्ट्या नागावलेल्या लोकांवर राज्य करण्यास मुबलक अवकाश देणारी स्वराज्याची घटना त्यांनी सुचविली नसती. ज्यांना स्वराज्याच्या नांवाखाली इतरांवर राज्य करावयाचें आहे त्यांना घाटत असलेली स्वराज्याची घटना कबूल असणारच. आम्ही केलेला स्वराज्याचा अर्थ जरी त्यांना नाकबूल करितां आला नाहीं तरी तो अमलांत आणून आपला आत्मघात करून घेण्याइतके खुळे ते नाहींत. म्हणून स्वार्थप्रेरित झालेल्या लोकांनी आम्ही सुचविलेल्या घटनेस जर विरोध केला तर त्यास आम्ही दूषण देऊं शकत नाही. पण आमच्या अर्थानुरूप स्वराज्याची घटना झाल्यानें निदान इंग्रज सरकारावर तर कांही अनर्थ ओढवणार नाही. आमच्या सूचनेप्रमाणें ब्राह्मणेतर व बहिष्कृतांवर होणारें हें राज्य टाळण्यास जर इंग्रज सरकारने मदत केली तर त्यांच्यावर असलेली या वर्गाची श्रद्धा अढळ राहील व ती अढळ रहाण्यात इंग्रजांचाच फायदा आहे. मग आम्ही केलेला अर्थ सार्थ होईल अशी स्वराज्याची घटना त्यांनी कां करूं नये ? अक्कल आणि अंमल यांचा काडीमोड तर झाला नाहीं ना !

●●●

---

अग्रलेख : मूकनायक, ता. २७ मार्च १९२०

# १३

## अपराध कोणता ?  द्वेष्ट्यांशीं सहकार्य

आम्ही व्यवसायबंधुधर्मानुरूप आमचा मूकनायक मराठी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या सर्व वर्तमानपत्रकारांना भेटीदाखल पाठवितो. परंतु नवलाची गोष्ट ही आहे की, उलटपक्षी आम्हास फक्त ब्राह्मणेतरांचींच पत्रे भेटीदाखल येतात. ब्राह्मणांच्या छायेखालीं असणारीं वृत्तपत्रे आम्हास भेटीदाखल येत नसल्यामुळें त्यांच्यांतून आमच्यावर कोणत्या प्रकारची टीका होते याबद्दल आम्ही नेहमीं अज्ञानदशेंत असतों. ता. २३-३-१९२० च्या ज्ञानप्रकाशांत मुकनायकांनें रा. शिंदे यांजवर केलेल्या टीकेस उत्तर आलें आहे. टीकेस प्रत्युत्तर न दिल्यानें टीकेंतील मुद्दे ज्यांच्यावर टीका केली जाते त्यांस मान्य आहेत असा वाचकांचा ग्रह होतो. व्यवसायबंधुभावानें प्रेरित होऊन जरी ज्ञानप्रकाश नित्यनेम आमच्याकडे आला नाहीं तरी आम्हास प्रत्युत्तर देण्यास सवड मिळावी म्हणून ज्ञानप्रकाशकारांनी निदान तेवढा अंक तरी आमच्याकडे पाठवावयाचा होता. पण सुदैवाने आमच्या एका मित्रानें तो आमच्याकडे आणून दिल्यामुळें प्रत्युत्तर देण्याची जी ही संधी आम्हांस मिळाली आहे त्याबद्दल आम्ही त्याचे फार आभारी आहों. आमच्या टीकेस उत्तर देण्यास लो. शिंदेच समर्थ होते. ज्या अर्थी लो. शिंदे स्वतः उत्तर देण्यास असमर्थ झाले आहेत त्या अर्थी ज्ञानप्रकाशकारांच्या उसन्या माहितीनें आमच्या आक्षेपाचें निरसन होईल असें ज्ञानप्रकाशकारांनी केव्हांच मानूं नये. डिप्रेस्ड क्लास मिशन अस्पृश्यांत नीतीची व शिक्षणाची जागृति करण्यास अस्तित्वांत आलें. या दोन्हीं दिशांनी या मिशनकडून अस्पृश्यांची किती उन्नती झाली याबद्दल पुढें केव्हां तरी सविस्तरपणे लिहिण्याचा आमचा इरादा आहे. राजकीय हक्कांसंबंधानें लो. शिंद्यांनी अस्पृश्यांचें किती कल्याण केलें आहे याबद्दलचा समज ज्ञानप्रकाशकारांना देण्यापलिकडे आज कांहीं कर्तव्य नाही. ना. कामत व सर शंकर नायर व फ्रँचाईज कमिटी यांच्याकडून अस्पृश्यांस जाददार प्रतिनिधि मिळवून देण्यास लो. शिंद्यांनीं खटपट केली अशी आमची कबुली आम्ही दिली असतांहि त्याची जाणीव आम्हास करून देण्याबद्दल ज्ञानप्रकाशकारांनीं एवढा शीण कां घेतला हें आम्हास कळत नाहीं. लो. शिंद्यांनी शीण घेऊन फायदा कां झाला नाहीं हें जर ज्ञानप्रकाशकारांनी शोधून पाहिलें असतें तर त्यांनीं जें लिहिलें तें त्यांना लिहावेसें वाटलेंच नसतें. लो. शिंद्यांना जर ज्ञानप्रकाशकार सांगतात एवढी अस्पृश्यांची कळकळ आहे आणि वरिष्ठ वर्ग त्यांची

पायमल्ली करितो असें जर त्यांना पूर्णपणें ठाऊक आहे तर त्या वरिष्ठ वर्गास स्वराज्य मिळाल्यानें आपल्या आश्रितांची गळेचेपी होणार असें दिसत असूनहि त्यांनीं जातवारप्रतिनिधीचा झेंडा आधीं का रोविला नाही ? उलटपक्षी स्वराज्याच्या वादविवादांत जेव्हां जातवार प्रतिनिधीचा प्रश्न निघाला तेव्हां त्या तत्वाला विरोध करणाऱ्या पक्षांशी खांद्यासखांदा देऊन शिंदे कसे लढले हें ज्ञानप्रकाशकारांना श्रुत असेलच. एवढेंच करून ते गप बसले नाहींत. उलटपक्षी कौन्सिलांतील लोकप्रतिनिधींकडून अस्पृश्यांचे प्रतिनिधी निवडून घेण्यांत यावेत अशा तत्वाचा त्यांनीं पुरस्कार केला. हें तत्व अस्पृश्यांची खरी कळकळ बाळगणाऱ्या गृहस्थास शोभतें कीं काय याचा विचार ज्ञानप्रकाशकारांनींच करावा. लो. शिंद्यांना तरी लाज वाटून हें तत्त्व आपलें नसून डि. क्ला. मिशनचें आहे असें ते म्हणूं लागलें. शिवस्य ह्रदयं विष्णुर्विष्णुस्य ह्रदयं शिवः असा डि. क्ला. मिशनचा व शिंद्यांचा अन्योन्य संबंध असतां वरील जें मत तें मिशनचें मत, माझें मत नव्हे असा कोटीक्रम लढऊन लो. शिंद्यांनीं आपली नामोशी टाळली, व पुनः अस्पृश्यवर्गाकरितां जातवार प्रतिनिधी मिळावेत अशा मताचा पुरस्कार करण्यास ते पुढें सरसावले. ज्या गृहस्थानें जातवार प्रतिनिधीच्या तत्त्वाचा इतका पाडाव केला की, अस्पृश्यवर्गाला अपवाद म्हणून देखील ते लागू करण्यास सरकार किंवा शीलशून्य सुशिक्षित लोक कबूल होईनातसें झाले, त्याच गृहस्थानें जातवार प्रतिनिधी द्या अशी ज्यांचा त्या तत्वाविरूद्ध प्रबल आग्रह करून दिला होता त्याच गृहस्थाशीं मागणी करणें हें धोरण व ह्रा विचारीपणा कींव करण्याजोगा नाहीं काय ? '' होता मंदिर दीप्तकूप खननी उद्योग तो कायसा '' असा हा खरा प्रकार असतांना जर ज्ञानप्रकाशकार त्याबद्दल शिंद्यांचा गौरव करूं इच्छितात तर करोत. अस्पृश्यांचे मन मात्र तितका गौरव करण्यास धजत नाहीं हा जो त्यांच्या आमच्यांत फरक आहे तो आम्ही प्रांजलपणें कबूल करितों. यांचें कारण हेंच कीं, लो. शिंद्यांच्या करणीमुळें आम्ही जातवार प्रतिनिधीस आंचवलो असें आमचें मत आहे. प्रथमतःच जर त्यांनीं जातवार प्रतिनिधीस लोकमत अनुकूल करून घेण्यास प्रयत्न केले असते तर सर्वांना जरी नाहीं तरी अस्पृश्यांना तरी जातवार प्रतिनिधी मिळाले नसते काय ? तत्वाला मुठमाती दिल्यानंतर भिकारी लो. शिंदे त्याच तत्वाला जीवदान द्या म्हणून याचना करीत सुटले. व त्या भिकेंत भर पडावी म्हणून ना. कामत व सर शंकर नायर यांच्यापुढें तोंड वेंगाडण्याची त्यांना पाळी आली. पण भिकेची हंडी शिंक्यास लागत नसते त्याप्रमाणे ती लागली नाहीं हें शिंद्यांना वाटो की न वाटो आम्हांस तरी दुर्दैव वाटतें. हें दुर्दैव शिंद्यांच्या चुकीच्या धोरणामुळे ओढवलें असें ज्ञानप्रकाशकारांस वाटत नसेल तर न वाटो. आम्हांस तरी दुसरें कांहीं कारण असेलसें संभवत नाहीं. लो. शिंदें हें अस्पृश्यांची कळकळ बाळगित नाहींत

असा आक्षेप कारण असतांहि त्यांच्यावर कोणा अस्पृश्यानें किंवा मूकनायकानेंहि केला नाहीं. त्यांच्या वर आम्ही केलेल्या टीकेस त्यांचे चुकीचे धोरणच कारणीभूत आहे. कळकळ असूनहि ज्यांचें धोरण चुकीचें असतें त्यांच्याहातून ज्यांचे कल्याण व्हावें अशी ज्यांची इच्छा असते त्यांचे अकल्याण झाल्याची उदाहरणें ज्ञानप्रकाशकारांच्या ऐकिवांत नसतील असें आम्हांस वाटत नाहीं. अशा उदाहरणापैकींच लो. शिंद्यांचें एक उदाहरण आहे असें म्हटल्यास ज्ञानप्रकाशकार हरकत घेतील तर त्याला आमचा नाइलाज आहे. ज्ञानप्रकाशकारांचा दुसरा असा कोटीक्रम आहे कीं अस्पृश्यवर्गानें वरिष्ठ वर्गाचा द्वेष केल्यास लो. शिंदे यांना तें उघड्या डोळ्यानें पहावत नाहीं, व ते लो. टिळकांचें द्वेष्टे नाहींत म्हणूनच ना आम्ही त्यांच्यावर आपले हत्यार उपसलें आहे. " समोंह सर्वभूतेषु नमे द्वेष्योस्ति न प्रिय : " हें जरी ब्रह्मपणाचें किंवा देवपणाचें लक्षण आहे तरी मानवी दृष्टीनें पहातां ज्यांनी आमचें नष्टचर्य केलें त्यांच्यावर आम्ही लोभ करीत नाहीं हें कबूल करण्यास आम्हांस कोणत्याच प्रकारची लाज वाटत नाहीं. लोभ, क्रोध, मोह, मत्सर इत्यादि वृत्ति ईश्वराच्या ठायीं असतात की नाहीं कोण जाणें ! परंतु मनुष्याच्या ठायीं त्या असतात व परिस्थितीनुसार त्या प्रबल होतात किंवा शमतात हें खास. अस्पृश्यवर्ग देखील मनुष्य प्राण्याचाच वर्ग आहे व त्यांचा द्वेष करणारांचा जर त्यांनी मत्सर केला तर त्यांच्या नीतिमत्तेची कोणी कींव करील तर ते लो. शिंदेच होत. याचें कारण लो. शिंदे हे देव झाले आहेत, किंवा त्यांची दृष्टि ब्रह्ममय झाली आहे असें नाहीं. ते अस्पृश्येतर आहेत म्हणूनच ते द्वेष करीत नाहीत. द्वेष हा खऱ्या जळजळीचा उपशम आहे. लो. शिंदे जर अस्पृश्य असते तर त्यांच्यानें द्वेष केल्याशिवाय राहावलें नसतें. अस्पृश्यांना वाहून घेऊन ते स्वतः अस्पृश्यांपैकींच एक झाले आहेत असें जें आजवर वाटत होतें तें चुकीचें आहे हें ज्ञानप्रकाशकारांनीं ध्वनित केलें हें बरें झालें. अस्पृश्यांचीं उन्नती करण्यास अस्पृश्य झाले पाहिजे यास कोणी ना म्हणणार नाहीं. तरीपण शिंदे लो. टिळकांचे द्वेष्टे नाहींत म्हणून आम्हीं त्यांच्यावर रागावलों असा जो ज्ञानप्रकाशकारांनी आपला समज करून घेतला आहे तो चुकीचा आहे. आमच्या रोषाचें मूळ कारण इतकेंच की, लो. टिळकासारख्या " शठंप्रति शाठ्यम " या तत्वाला जागणाऱ्या गृहस्थाशीं ते सहकारिता करितात. द्वेष करणें व सहकारिता न करणें या दोहोंमधलें अंतर ज्ञानप्रकाशकारांना कळणार नाहीं असें नाहीं. आमचें एवढेच म्हणणें आहे कीं, जे लोक आमच्याबद्दल सहानूभूति बाळगीत नाहीत, आमच्या उन्नतीच्या आड येतात, आमच्या हक्कांची पायमल्ली करितात अशा लोकांशी जे सहकार्य करितात त्यांच्या हातून आमचा तरणोपाय होणें तर नाहीच पण आमची दिशाभूल मात्र होणार आहे. या दिशाभुलीने लो. टिळक आमचें कार्य

करिताहेत तर आम्हांला कांहीं करावयास नको किंवा जें करितात तें बरें आहे असा भास होऊन जे कोणी आमच्यांतील स्वतंत्रतेनें, स्वावलंबनानें, व आत्मबलानें समाजाचा गाडा ओढण्यास पुढे येत आहेत ते लो. टिळकांच्या ठायीं लोलुप होऊन कर्तव्यपराङ्मुख होण्याचा संभव आहे. म्हणूनच लो. शिंद्यास आम्हीं इशारा दिला आहे. आमचा तरणोपाय होण्यास कोणाचीहि पर्वा न बाळगतां बिनदिक्कत आम्हीं आपले हक्क मागितले पाहिजेत. भीक मागून हक्क मिळत नसतात. लो. शिंद्यांना मात्र भीक मागितल्याशिवाय चालणार नाहीं. याचें कारण अस्पृश्यांशीं सहकारिता त्यांना नको. व तशी सहकारिता करण्यास त्यांचा नेहमी विरोधच असतो, हें ज्ञानप्रकाशकारास जरी माहित नसलें तरी आम्हांस पूर्णपणें माहित आहे. सहकार्य करण्याची सुबुद्धि त्यांना होईतोंपर्यंत त्यांचें अवतारकृत्य शेवटास जाईल असें वाटत नाहीं. आम्ही जें लिहिलें तें मन दुखविण्याच्या इराद्यानें लिहिले नसून केवळ, दिशाभूल झालेल्यास इशारा देणें याच उद्देशानें लिहिलें होते. तो इशारा घेऊन अस्पृश्यांच्या द्वेष्ट्यांशीं सहकार्य न करितां अस्पृश्यांशीं जर त्यांनी सहकार्य केले तर त्यांच्या हातून पुष्कळच कामगिरी होण्यासारखी आहे. परंतु हेतूचा विपर्यास करून मन दुखावल्याबद्दलचा सूड काढण्यास आमच्या कार्यांत विघ्ने आणण्यास लो. शिंदे किंवा इतर कोणीहि उद्युक्त झाल्यास त्यांना मैदान मोकळे आहे ; परंतु अशा धाकानें इशारा देण्याचें आमचें कर्तव्य आम्हीं कधीहि सोडणार नाहीं. टोणग्यांच्या मनधरणीपासून विघ्ने टळणार नसून ती वाढणार आहेत असा आमचा निरोप योग्य कालीं योग्य पुरुषास ज्ञानप्रकाशकार कळवितील अशी आशा आहे.



---

विविध-विचार : मूकनायक, शनिवार, ता. २७ मार्च १९२०.

१४

# मूळ शोधा मग वाद मिटेल.

हा हिंदुस्थान देश जातीभेदानें व धर्मभेदानें कसा ग्रस्त झाला आहे हे कांही नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. हा जातीभेद व धर्मभेद जोंपर्यंत जारी आहे तोंपर्यंत हिंदुस्थान देश स्वराज्यास नालायक आहे असें मोठ्या आढ्यतेनें सांगून इंग्रज सरकार स्वराज्यावादीयांचें तोंड बंद करीत असे. अगोदर आपल्यांतील जाती व धर्मभेद मोडून टाका मग स्वराज्य मागावयास या असें ब्रिटिश सरकारनें सांगून त्यांचा आजवर सतत हिरमोड केला. जातीभेदामुळें स्वराज्य देऊं नये असें आम्हांस केव्हांच वाटत नव्हतें. ज्यांना स्वराज्य द्यावयाचें होतें त्यांना जातीभेदाची अडचण दूर करण्यास जातवार प्रतिनिधी देऊन स्वराज्य केव्हांहि देतां आलें असतें. पण उशिरा कां होईना ज्या सरकाराला जातीभेदाची मोठी आड वाटत होती तेंच सरकार स्वराज्य देतांना जातवार प्रतिनिधी देण्यास विसरणार नाहीं असा ब्राह्मणांस धाक तर ब्राह्मणेतरांस व बहिष्कृतास आशाळूपणा वाटत होता. पण मि. मांटेग्यु साहेबांनीं आपलें मोहनी अस्त्र टाकल्याबरोबर तोच हिंदुस्थान देश स्वराज्याला लायक झाला आहे, इतकेंच नव्हे तर जातवार प्रतिनिधि स्वराज्याला विघातक आहेत अशा मतानें इंग्रज सरकार घेरलें गेलें. एकाएकी हा दृष्टीकोन कसा बदलला याबद्दल ब्राह्मणेतर व बहिष्कृत वर्गास फारच विस्मय वाटत आहे. जाती होत्या त्या कांही नाहींश्या झाल्या नाहीं. पूर्वी ज्या आड येत होत्या त्या कोणत्या विचारसरणीमुळें आतां आड येत नाहींत ही विचारसरणीहि आम्हांस अवगत नाही. जाती जाती म्हणून ओरड करणाऱ्या सरकारास जातवार प्रतिनिधी विरुद्ध झालेल्या प्रबल ग्रहापासून सोडवितां सोडवितां ब्राह्मणेतरांच्या व बहिष्कृतांच्या नाकीं नऊ आले, व आतां मोठ्या कष्टानें कोठें कोठें अपवाद म्हणून जातवार प्रतिनिधी देण्यास सरकार कबूल झालें आहे. अशा प्रकारें नजरबंद झालेल्या सरकारास शुद्धीवर आणण्यास जातीभेद आहे त्याकडे कानाडोळा करूं नका व जातवार प्रतिनिधी देऊन होणारा अनर्थ टाळा असा कंठशोष करून सांगणाऱ्यांना स्वराज्यवादी लोक देशद्रोही, आत्मघातकी इत्यादि शेलक्या शब्दांनी संबोधित आहेत. जी इंग्रजी नौकरशाही जातिभेदामुळें हिंदुलोक स्वराज्यास अपात्र आहेत असें म्हणत होती त्याच नोकरशाहीकडून स्वराज्य विषयींच्या पात्रतेचें हिंदुलोकांचे हक्क कबूल होण्याची वेळ आली असतां समाजांत ब्राह्मण ब्राह्मणेतर इत्यादि विनाकारण दुफळी करण्याचा प्रयत्न चाललेला आहे असा

आपला गैरसमज करून घेऊन अनेक दिवस दाबून धरलेला क्रोधानलाचा लोट केसरीकारांनी आपल्या ता. १६-३-१९२० च्या ज्वालामुखी अग्रलेखांतून सोडला आहे. ब्राह्मण ब्राह्मणेतर या वादांत केसरीकारांना जी मौज वाटत आहे ती ही की, ''हिंदी प्रजाजन स्वराज्यास पात्र असून त्यांना स्वराज्य मिळावें म्हणून कॉंग्रेसनें किंवा होमरूल संस्थांनी उपस्थित केलेल्या चळवळीत यांनी विशेषसा भाग घेतला नाहीं, किंवा घेतला असल्यांस आंगचोरपणानें घेतला व केव्हां केव्हां तर उघड विरोधहि केला अशा लोकांनी हें बंड उभारण्यास सुरवात केली आहे.'' ब्राह्मणांच्या व इतरांच्या दृष्टिकोनांत जो एक महत्त्वाचा फरक आहे तो जर केसरीकारांनी ओळखला असता तर त्यांना या वादांत म्हणतात तशी मौज वाटती ना. ब्राह्मणांना स्वराज्य कसें मिळेल हा प्रश्न काय तो प्रधान वाटतो. म्हणून त्यांनीं मतदारीचा हक्क कोणाला असावा अगर प्रतिनिधी कसे निवडून यावेत याबद्दल तोंड उघडून शब्द दोष देखील करून घेतला नाहीं. कारण कांही जरी झालें तरी ब्राह्मण प्रतिनिधी निवडून येणारच. इतरांना मात्र स्वराज्य मिळालें तर त्यापासून प्राप्त होणारी स्वयंसत्ता सर्व जातींत कशी विभागतां येईल कीं जेणेंकरून स्वराज्य म्हणजे ब्राह्मणी राज्य होणार नाही हा प्रश्न प्रधान वाटतो. म्हणून ते मतदारीच्या हक्काची व प्रतिनिधी निवडण्याच्या पद्धतीची अहोरात्र चर्चा करित आहेत, स्वराज्य मागितलें नाहीं याचें कारण एवढेच कीं जोंपर्यंत जाती आहेत तोंपर्यंत स्वराज्य मिळणार नाही असें इंग्रज सरकार अधिकारयुक्त वाणीनें सांगत होते. म्हणून जातीभेद काढून टाका ही मागणी आज अनेक दिवसांपासून आम्ही ब्राह्मण लोकांपाशी करीत होतो. परंतु जातिभेदहि गेला नाहीं व जातवार प्रतिनिधीहि मिळत नाहींत अशी जेव्हां बिकट वेळ येऊन ठेपली तेव्हां मात्र ब्राह्मणाप्रमाणें ओढून कातडें डोळ्यांवर घेऊं इच्छिणाऱ्या इंग्रजांस जातिभेदाच्या स्वरूपाची जाणीव करून देण्यास हिंदू समाजाचें ब्राह्मण ब्राह्मणेतर व बहिष्कृत असे तीन वर्ग करावें लागलें. हें वर्गीकरण अगदीं शाब्दिक व कृत्रिम आहे असें केसरीकारानें सिद्ध करण्याचा आव घातला आहे. लो. टिळकांनींहि ब्राह्मण ब्राह्मणेतर या विषयावर पुण्यास एक व्याख्यान दिलें. त्यांतहि ब्राह्मणेतरांत ऐक्याची भावना नाही असा अज्ञानपणाचा वाद लढविला आहे. हिंदु समाजाची रचना जन्मसिद्ध आहे गुणसिद्ध नाहीं ; व जन्मसिद्ध योग्यायोग्यता व जन्मसिद्ध पवित्रापवित्रता या दोन मूलतत्वाच्या पायावर समाजाची रचना झाली आहे हें केसरीकारहि नाकबूल करणार नाहींत. जन्मसिद्ध योग्यता व पवित्रता या दोन तत्वानुसार जर आपण हिंदुसमाजाचें वर्गीकरण केलें तर त्याचे तीन वर्ग होतात. सर्वांत योग्यतेनें श्रेष्ठ व सर्वांत पवित्र असा वर्ग म्हटला म्हणजे ब्राह्मणवर्ग होय. ज्यांची जन्मसिद्ध

योग्यता व पवित्रता ब्राह्मणाच्या खालची आहे त्यांचा ब्राह्मणेतर वर्ग होय. व जे सर्वांत जन्मसिद्ध अयोग्य व अपवित्र आहेत अशांचा जो वर्ग तो बहिष्कृत वर्ग. अशा रीतीनें जर वर्गीकरण केलें तर ब्राह्मण (वेदोक्त वर्ग) ब्राह्मणेतर (शास्त्रोक्त वर्ग) व बहिष्कृत (पुराणोक्त वर्ग) हा भेद शब्दाचा कीं भावाचा याचा निर्णय करण्यास जड जाणार नाही. ब्राह्मणेतरांत व बहिष्कृतांत समाविष्ट होणाऱ्या जातींत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं व ज्यांच्यांत रोटीबेटी व्यवहार होत नाहीं, त्यांच्यात ऐक्यभाव कसा उत्पन्न होणार ? व ऐक्याची भावना ज्यांच्यांत नाहीं त्यांचे पृथक पृथक वर्ग करणें तर्कटीपणाचें होणार नाही काय ? असा केसरीकारांचा आक्षेप आहे. रोटीबेटी व्यवहार ऐक्यभाव उत्पन्न करण्यास कारणीभूत आहे यास ना म्हणतां यावयाचें नाही ; व ब्राह्मणेतर जातींत व बहिष्कृत जातींत रोटीबेटी व्यवहार होत नाही म्हणून ते ऐक्य भावनेनें संघटीत झाले वर्ग नाहीत हें हल्लीच्यांहून भिन्न परिस्थितीत खरेहि ठरलें असतें. तरीपण दक्षिण आफ्रिकेंत वसत असलेले हिंदी लोक अनेक जातीचे व धर्माचे असल्यामुळें रोटीबेटी व्यवहाराचा अभाव असूनहि त्यांच्यांत वसत असलेली दृढ ऐक्याची भावना किती वर्णनीय आहे हें केसरीकारानीं अनेक वेळां लोकांच्या निदर्शनास आणले आहे. परस्परांत रोटीबेटी व्यवहार न करणाऱ्या आफ्रिकेतील हिंदीजनांत ऐक्याची भावना कशी प्रदीप्त झाली याचें संशोधन जर केसरीकारांनी केलें असतें तर असा विचारशून्य अग्रलेख लिहिण्याची त्यांच्यावर पाळी आली नसती हें खास. एखाद्या वस्तूंत किंवा समाजांत कितीहि पिंडभिन्नत्व असलें तरी त्याच्यावर सर्व बाजूंनीं बाहेरून आघात झाला म्हणजे त्यांतील भिन्नभाव जाऊन त्याला एकजिनसीपणा येऊन त्यांच्यांत ऐक्यभाव वाढतो हा समाजशास्त्रचा नियम सर्वसंमत आहे. रोटीबेटी व्यवहाराच्या अभावीं जागृत असणारा भिन्नभाव मावळून त्याच्या ठिकाणी ऐक्यभाव उत्पन्न होण्यास जर आफ्रिकेतील गोऱ्या लोकांच्या जुलमाचा आघात कारणीभूत झाला तर ब्राह्मणेतरांत व बहिष्कृतांत रोटीबेटी व्यवहाराच्या अभावामुळे उत्पन्न होणारा भिन्नभाव त्यास अयोग्य व अपवित्र ठरविणाऱ्या ब्राह्मणीधर्माच्या शासनाच्या आघातापुढें टिकेल, असें धरून चालणें मूर्खपणाचें होणार नाहीं काय ? आम्ही अमक्या जातीचे ही भावना ब्राह्मणेतरांत व वहिष्कृतांत आतां पूर्वीप्रमाणे जागृत नाही हें केसरीकारांचे दुर्दैवच म्हणावयाचें. आम्ही ब्राह्मणापेक्षा कमी दर्जाचे व कमी पवित्रतेचें या भावनेने ब्राह्मणेतर व बहिष्कृत वर्गात आपलें ठाणें दिलें आहे. आणि जसजशी ती भावना प्रबल होत जाणार तसतसें ब्राह्मण, ब्राह्मणेतर व बहिष्कृत हे शब्दाचे नव्हे तर भावनेचे वर्ग होत जाणार. योग्यता व अपवित्रता जन्मतः अंगी बाणल्यामुळें ब्राह्मण कसे गबर होऊन शेफारले आहेत व अयोग्यता व अपिवत्रता जन्मतः अंगी

खिळल्यामुळे ब्राह्मणेतरांची व बहिष्कृतांची कशी नागवणूक झाली आहे याची जसजसी ओळख पटत जाईल तसतसें हे भेद दृढ होऊन राष्ट्रकार्यात विघ्नें येतील हें केसरीकाराप्रमाणें आम्हासहि कबूल आहे. परंतु ज्या कारणामुळें वाद निघाला तीं कारणें दूर केल्याशिवाय वाद मिटवा म्हणून सांगणें किंवा तो मिटत नाही म्हणून डोक्यांत राख घालून वाद करणारास शिव्याशाप देणें अनुचित आहे. ब्राह्मणांच्या जन्मसिद्ध योग्यते व पवित्रतेमुळें गुणसिद्ध ब्राह्मणेतरांचे व बहिष्कृतांचे किती नुकसान झालें आहे याबद्दल केसरीशिवाय इतर कोणालाच शंका येणे शक्य नाही. तरीपण हा वाद मिटून समाजांत ऐक्य व्हावें अशी जर केसरीची प्रामाणिक इच्छा असेल तर ब्राह्मणांनीं इतरांस बुडविलें नाही अशी इतिहासविरुद्ध केसरीची मनोदेवता केसरीला साक्ष देत असली तरी ज्याअर्थी इतर लोक ती खोटी आहे असा गिल्ला करीत आहेत त्याअर्थी या वेड्यापीरांच्या म्हणण्यांत कांहीं तरी राम आहे असा संशय घेऊन जरी ब्राह्मण, ब्राह्मणेतर व बहिष्कृत या वादग्रस्त प्रश्नांच्या मुळाशीं असलेली कारणें चोखाळून पाहिल्यास केसरी सज्ञान होऊन पुढें म्हटलेला अग्रलेख हा वाद कसा मिटवावा या विषयावर आल्यानें ब्राह्मणेतरांत व बहिष्कृतांत केसरीचा जितका मान राहील व खप होईल तितका तो मिटवावा. असें लिहून होणार नाही हें जाणूनच केसरीकार या महागाईच्या दिवसांत आपली शाई, कागद व बुद्धिमत्ता खर्च करतील एवढी आशा केल्यास फार होईल काय ?

●●●

---

विविध विचार : मूकनायक, शनिवार ता. २७ मार्च १९२०.

# १५

# राष्ट्रांतील पक्ष

कोणतेहि सार्वजनिक कार्य झाले तर ते मी एकटा घडवून आणीन असे जर कोणी म्हणेल तर त्याच्या हातून कार्य तर होणार नाहीच पण समंजस लोक त्याच्या ऐटीबद्दल व अहंपणाच्या तोऱ्याबद्दल त्याची कीव केल्याशिवाय रहाणार नाहीत. मनुष्याचे विचार कितीहि उदात्त असले तरी जर कां त्याला पाठबळ नसले तर तो पंगूवत् होऊन त्याच्या विचाराचा अवतार कृतीत होणे कठीण जाते, व जोपर्यंत तसे झाले नाही तोपर्यंत उदात्त विचार असून नसून सारखेच म्हणावयाचे ; कारण विचारानुरुप जर जगाची रहाटी बदलली नाही तर मनुष्य मात्रास लाभ तो कोणता ? म्हणून कार्याच्या दृष्टीने पहाता कार्यशाली माणसांत एकदिली होऊन जूट होणे फार आवश्यक आहे. परंतु एकदिली उर्फ संयोग होण्यास सृष्टीतील निर्जीव वस्तूंत किंवा सजीव प्राण्यात समान धर्म असावा लागतो. पाणी आणि तेल, पाषाण व काष्ट धातू आणि मृत्तिका यांच्यांत जसा संयोग होत नाही, तसा व्याघ्र व शेळी, मांजर आणि उंदीर, इंग्रज व फ्रेंच, जर्मन व अमेरिकन, इटालियन व ग्रीक, पार्शी व खिश्चियन, हिंदू व मुसलमान, ब्राह्मण व ब्राह्मणेतर इत्यादिकांतहि संयोग होत नाही. " समानशील व्यसनेषु सख्यम् " हा न्याय सर्वत्र सारखा लागू पडतो. जीत व जेते, स्वामी व सेवक, श्रीमंत व दरिद्री, यांच्यांत देखील सख्य दिसून येत नाही ते याच न्यायामुळें. इंग्रज व नेटिव्ह, जहाल व मवाळ इत्यादिकांत जो संयोग होत नाहीं यांचेहि कारण त्यांच्यातील असमान धर्म हेच होय. कोणत्या पक्षाशीं आम्ही संयोगी आहों याची चर्चा करण्याचा आमचा इरादा आहे. पण ती चर्चा करण्यापूर्वी हल्लीं अस्तित्वांत असलेले पक्ष कसे उभारले गेले व त्यांचें शील काय आहे हें तपासून पाहिलें पाहिजे.

अनंतदशाचक्रांत भ्रमतां भ्रमतां इंग्रेजी सत्तेखालीं हा देश कसा आला याचा इतिहास सांगण्याचें कारण नाहीं. पडते मुसलमान व चढते मराठे यांना नमवून इंग्रजांनीं आपली सत्ता कशी प्रस्थापित केली हें सर्वश्रुत आहेच. एकच गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ती ही कीं, प्रजापक्ष म्हणून जी काहीं चीज आहे ती मात्र अगदीं नवीन असून इंग्रजी अमदानींतच तिची लागवड झाली आहे. अनेक परचक्रे या देशावरून गेलीं. मुसलमानांनीं अनेक दिवसपर्यंत आपली सत्ता या देशावर गाजवून " होतां मुसलमान कीं कापूं मान " या द्वादश अक्षरी फर्मानानुरूप हिंदूधर्मांचें निशाण जी शेंडी त्या शेंड्यांचा फन्ना फार केला. पोर्तुगीज लोकांनीं

आपलीं ठाणी बसविलीं, व अनेक लोक ख्रिस्तानुयायी केले. डच आले, फ्रेंचांनीं वसाहती केल्या, परंतु मराठ्यांनीं खाल्लेल्या उचलेखेरीज जिकडेतिकडे औदासिन्य ! प्रजेंत चेतना म्हणुन काहीं नाहीं. येईनात बापडे, आमचे काय जातें ! अशा भावनेनें खिळून गेलेली प्रजा इंग्लिश लोकांच्या अमलासंबंधानें एवढें औदासिन्य दाखवित नाहीं हे नवल नव्हे काय ? मुसलमानी किंवा मराठी राज्यासारख्या बेजबाबदार राज्याविरुद्ध प्रजेनें कधींहि तट उभारला नाहीं. तारतम्यानें पहातां मुसलमानी किंवा मराठी अमदानीपेक्षा ब्रिटिश अमदानी कितीतरी सुखावह आहे. दरेक व्यक्तीला कितीतरी स्वातंत्र्य व कितीतरी सुख प्राप्त होत आहे. असें असूनहि प्रजेनें तिच्या विरुद्ध आपला पक्ष उभारावा ही तिची अघटीत करणी सहज उमगण्यासारखी नाहीं. ज्या हिंदीजनांत जें एकप्रकारचें स्थैर्य व जी तटस्थता दृष्टीस पडत होती व ज्या स्थैर्यास व तटस्थतेस जगांतील दुसऱ्या देशांत क्वचितच उपमा सांपडेल असें वाटत होतें व ज्या तटस्थतेबद्दल सर्व पाश्चात्य राष्ट्रांत त्याची प्रसिद्धी होती ती तटस्थता व तें स्थैर्य लोपून त्याचें पर्यवसान विलक्षण अशा चैतन्यांत व्हावें हा सृष्टींतील एक चमत्कार आहे असें म्हटल्यास अतिशयक्ति होणार नाहीं. परंतु हा चमत्कार घडून येण्यास ब्रिटिश अमदानीच कारणीभूत झाली असें म्हणावें लागतें. ब्रिटिश अमदानीपूर्वी प्रजेंत ऐक्यभाव न उत्पन्न होण्यास बरीच कारणें होतीं. अनेक धर्म, अनेक जाती, अनेक भाषा इत्यादिकांमुळें प्रजा एकजीव होणें शक्य नव्हतें. तरीपण या प्रजाशकलांचें नियमन करणारी शक्ति उर्फ सरकार एकच असतें तर हिंदी प्रजा एकपट झाली असती हें खास. अमेरिकन संयुक्त संस्थानांतील लोकांत हिंदुस्थानाप्रमाणेंच भिन्न धर्म, भिन्न जाती व भिन्न भाषा आहेत. तरीपण अमेरिकन प्रजेंत ऐक्यभाव किती आहे हें नुकत्याच संपलेल्या युद्धावरून सिद्ध होत आहे. उलट युरोपांतील लोक एकधर्मीय असूनहि त्यांच्यात ऐक्याचा अभाव-नव्हे वैमनस्य-किती आहे हें नुकतेंच प्रत्ययास आलें आहे. युरोपाप्रमाणें हिंदुस्थानांतील प्रजेंत ऐक्यभाव उत्पन्न झाला नाहीं याचेंहि कारण हेंच कीं, ब्रिटिश अमदानीपूर्वी युरोपाप्रमाणें हिंदुस्थानांतहि एक सरकार नव्हतें. एका सरकारखालीं असणारे आपण नागरिक, एकाच कायद्यानें बांधले गेलेलों आपण प्रजाजन, एकाच शासनपद्धतीच्या मान्याखाली सुखदुःख अनुभविगारे आपण लोक इत्यादि भावना जागृत करून प्रजेस एकवट करण्यास एकछत्रीराज्यासारखें दुसरें महत्कारण नाहीं. हिंदी प्रजा एकवट होण्यास एकछत्री इंग्रजी अंमल जितक्या परीनें कारणीभूत झाला तितक्याच परीनें इंग्रजी भाषेचा प्रचारहि कारणीभूत झाला आहे. इंग्रजी भाषेच्या प्रचारामुळें भिन्नभिन्न प्रांताच्या लोकांत विचारविनिमय व आचारविनिमय होऊन ऐक्यभावांत भर पडली आहे. अशा प्रकारें एकवट

झालेल्या प्रजेंत वसत असलेलें आनुवंशिक औदासिन्य, स्थैर्य व तटस्थता जाऊन त्याच्या ठायीं स्वहक्काची जाणीव उत्पन्न होण्यास इंग्रजी राजकीय इतिहासाचें परिशीलन फार कामीं पडलें. प्रजा ही मेंढरें व राजा हा मेंढपाळ अशा भावनेनुसार आपल्या चैतन्याच्या दोऱ्या जो येईल त्याच्या हातांत देऊन बेगुमानपणें वर्तत असलेली प्रजा राजापेक्षां प्रजा श्रेष्ठ व राजानें राज्य करावयाचें तें प्रजेच्या अनुरोधानें करावयाचें, सारांश प्रजा हीच राजा म्हणून तिच्या चैतन्याच्या दोऱ्या तिच्याच हातात असाव्या असें ठोकून सांगणारा प्रजापक्ष इंग्रजी इतिहासाच्या परिचयाशिवाय अन्य कारणांनीं उभा राहिला असें म्हणण्यास काहीं आधार दिसत नाहीं. आतां हा प्रजापक्ष बलवत्तर होण्यास काहीं इंग्रजी अधिकाऱ्यांची दोषास्.द अमदानी कारणीभूत झाली तो प्रश्न वेगळा.

प्रथमतः इंग्रजीराज्य सुराज्य व्हावें असा या प्रजापक्षाचा हेतु होता. पण कालांतरानें सुराज्यापेक्षां स्वराज्य बरें असें या पक्षास वाटूं लागलें. हेतूंत फरक झाल्याबरोबर या प्रजापक्षाच्या दोन फळया पडल्यावर एकपक्ष निर्भेळ स्वराज्य मागूं लागला, व दुसरा पक्ष इंग्लंडवांचून आपल्यास गति नाहीं म्हणून इंग्रजी साम्राज्यांतर्गत स्वराज्य आपणास मिळालें म्हणजे बस्स असें म्हणूं लागला. निर्भेळ स्वराज्य मागणारांचा जहाल कंपू बनला. व साम्राज्यांतर्गत स्वराज्य मागणाऱ्यांना त्यांनी मवाळ असें नाव दिलें. जहाल कंपूनें निर्भेळ स्वराज्यप्राप्तीसाठीं इंग्रजी सत्ता उलथून टाकण्यास अराजकपणा अनेक प्रयत्न करून फैलाविला ; पण तोंडघशी पडून आपला मोर्चा त्यांनीं वेळींच परतविला हें देशहिताच्या दृष्टीनें त्यांनीं एक मोठें राष्ट्रकार्यच केलें असें आम्ही समजतों. जहालांत आणि मवाळांत जो एक फरक उरला आहे तो हाच कीं, जहालांच्या मतें हा देश स्वराज्यास पात्र आहे यास्तव पूर्ण स्वराज्य आम्हास आतांच द्या. मवाळांचें म्हणणें असें आहे, कीं हा देश स्वराज्यास सर्वस्वी पात्र नाहीं, यास्तव स्वराज्याचा एक एक ग्रास पचेलसा धिम्या धिम्यानें घ्या. या विचारभिन्नत्वामुळें मिळालेला स्वराज्याचा हप्ता जहालांना अगदीं टाकाऊ व पात्रतेच्या मानाने अगदी उपमर्दकारक असा वाटतो, तोच हप्ता मवाळांना पुरेसा आहे असें वाटतें. या पक्षभेदांत आमचा पक्ष कोणता असें जर कोणी विचारलें तर या दोहोंपैकीं आमचा एकही पक्ष नव्हे असें आम्हीं म्हणूं. जोपर्यंत इंग्रज लोक आम्ही राजे, आमच्या पूर्वजांनीं रक्त वेंचून हा देश काबीज केला तो आपल्या वंशजांनीं या देशावर जगावें म्हणूनच केला, राजकारणांत आमचें कल्याण हा प्रधान हेतु असून साधल्यास हिंदुस्थानचें कल्याण करावयाचें इत्यादि युक्तिवाद लढऊन प्रजापक्षाविरुद्ध आपला राजपक्ष मांडित असत तोपर्यंत जहाल आणि मवाळ या पक्षभेदांत काहीं अर्थ होता.

स्वराज्य मिळत नाहीं हा जोपर्यंत प्रश्न होता तोपर्यंत तें त्वरित मागा किंवा दमानें मागा असें म्हणणें प्रश्नास धरून होतें. पण आतां स्वराज्य मागण्याचा प्रश्नच उरला नाहीं. मिळालेलें स्वराज्य कोणत्या तत्वानुसार वापरावें हा मुख्य प्रश्न आहे. अशा प्रकारें वस्तुस्थितीची घडी मोडली असल्यामुळें जहाल आणि मवाळ हा पक्षभेद सहाजिकपणें गचाळ वाटूं लागला आहे. स्वराज्य प्राप्त होण्यास आपण स्वराज्यास लायक आहों असें सिद्ध केलें पाहिजे असें जहाल मवाळाप्रमाणें सर्वांसच वाटतें. पण आपली पात्रता कशावरून सिद्ध होईल हाच लढ्याचा प्रश्न आहे. पूर्ण स्वराज्य मिळण्याचा पक्का निश्चय हिंदुस्थाननें केल्याशिवाय हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळणार नाहीं यात उभयपक्षाचें कसें एकमत आहे हें अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंत किंवा सोलापूरच्या प्रांतिक परिषदेंत पास झालेल्या स्वराज्याच्या ठरावावरून दिसून येईल. पक्का निश्चय केल्याची खूण इंग्लंडच्या लोकांना व पार्लमेंटला कशी पटवावयाची ह्यांतच काय तो त्यांचा मतभेद आहे. जहालांना वाटते कीं, इंग्रजी अधिकाऱ्यांशीं सहकारिता केली तर त्यांचें मत यांना ग्राह्य आहे असें वाटून पूर्ण स्वराज्याचे हक्क आपल्यास देण्यास इंग्लंडचे लोक व पार्लमेंट सभा केव्हांहि तयार होणार नाहीं. उलट मवाळांच्या मतें इंग्रजी अंमलदारांशी सहकारितेनें वागल्यानें सर्वांत लवकर पूर्ण स्वराज्य मिळणार आहे. नोकरशाहीशीं हटयोग करून वा भक्तियोग करून स्वराज्यप्राप्ति होते इतके दुधखुळे जहाल मवाळांत भरले आहेत हें पाहून विद्वत्तेच्या बळावर देशाचे पुढारी म्हणून मिरवणाऱ्यांच्या विद्वत्तेची कीव केल्याखेरीज रहावत नाहीं. आमच्या मतें नोकरशाहीशीं सहकारिता करणें किंवा न करणें हा स्वराज्य प्राप्तीचा मार्ग नव्हे. जनतेशी सहकारिता करून दिलेलें स्वराज्य तिला जितक्या प्रमाणात सुखावह करून दिले जाणार आहे तितक्याच प्रमाणांत स्वराज्य प्राप्तीबद्दलची पात्रता ठरणार आहे असें आम्हास वाटतें.

" देशाचा राज्यकारभार त्याच देशांतील लोकांच्या हातीं असणें ही राज्यपद्धति अन्वर्थक असून तिच्यांत कांहीं हंशील असतो. परंतु जेंथे एका देशाचा राज्यकारभार दुसऱ्या देशांतील लोक चालवितात त्या स्थितीला राज्य हें नांव देतां येत नाहीं. कारण एका देशांतील लोक दुसऱ्या देशांतील लोकांस आपल्या अमलाखालीं ठेवतात ते केवळ आपल्या कल्याणासाठी, पैसे कमविण्यासाठीं, किंवा आपला फायदा करून घेण्यासाठी माणसांचा कळपच म्हणून ठेवितात " ह्या इंग्लिश राजकीय तत्ववेत्ता मिल्लच्या सुभाषिताची पोपटपंची जहाल मवाळ वेळीं अवेळीं करून अज्ञान जनास स्वराज्य मागण्यास उद्युक्त करितात. ज्या इंग्रजी राजकारणाच्या इतिहासावर जहाल मवाळांची एवढी भिस्त आहे त्याच

इतिहासांतील एक गोष्ट सर्वांच्या फायद्यासाठीं येथें नमूद करणें अप्रासंगिक होणार नाहीं. जशी हिंदुस्थानांतील राजकीय सत्ता ब्रिटिश लोकांच्या हातीं आहे तशी अर्धे एकोणिसावें शतक लोटून जाई तोपर्यंत इग्लंडांतील राजकीय सत्ता प्रजेच्या हातीं नसून राजाच्या हातीं होती. ती सत्ता काढून घेण्यास इंग्लंडांत जो प्रजापक्ष उभारला होता त्याचेहि व्हिग्ज व टोरीज असें दोन तट होते. हें दोन्ही पक्ष जरी राज्याची सत्ता मर्यादित करण्यास झटत होते असें जरी इतिहास प्रसिद्ध आहे तरी बहुजन समाजाचें या दोन पक्षांबद्दल काय मत होतें हें फारसें कोणाच्या ऐकिवात नाहीं. तें मत ज्यांना पूर्णपणें पहावयाचें असेल त्यांनीं प्रोफेसर ग्राहाम वॉल्स यांनी लिहिलेल्या फ्रान्सिस प्लेस याच्या चरित्राचें परिशीलन करावें. इंग्लडांतील राजकारणांत धुमाकूळ माजवलेल्या वरील दोन पक्षासंबंधानें प्लेसनें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, " बहुजन समाजाच्या मतें व्हिग्ज आणि टोरिज या दोन पक्षांत कोणताच महत्वाचा भेद नाहीं. भेद आहे तो एवढाच कीं, टोरीपक्षाला राजाची सत्ता बळकट करून तिच्या जोरावर समाजांतील श्रेष्ठ व गरीब लोकांवर चरावयास पाहिजे. व्हिग्ज पक्षाला श्रेष्ठ लोकांची सत्ता स्थापित करून राजाला व गरीब प्रजेला पायाखालीं तुडवावयास पाहिजे. " वरील मिमांसा जहाल व मवाळांना इतक्याच किंबहुना त्याच्याहिपेक्षा जास्त प्रमाणांत लागू पडते यात मुळीच संदेह नाहीं. कारण दोन्ही पक्ष जरी इंग्रजी सत्ता मर्यादित करण्यास झटत आहेत तरी जहालांना श्रेष्ठ लोकांची सत्ता स्थापित करून इंग्रजांना व गरीबांना चेंगरावेसें वाटत आहे व मवाळांना इंग्रजी सत्तेच्या आधारावर गोरगरिबांची होत असलेली पायमल्ली कायम करावयास पाहिजे. म्हणून स्वराज्याच्या उपयोगाच्या प्रश्नासंबंधानें पहातां हे दोन्ही पक्ष जितके गचाळ आहेत तितकेच जनहिताच्या दृष्टीनें विघातक आहेत. ज्यांना जनतेच्या हिताचा संचय करावयाचा आहे त्यांना ब्रिटिश सत्तेचा अभाव म्हणजे स्वराज्य अशी स्वराज्याची व्याख्या करून चालावयाचें नाहीं. व्यक्तीच्या उन्नतावस्थेस अनुरूप अशी सामाजिक स्थिति घडवून आणण्यास दिलेले स्वातंत्र्य हीच स्वराज्याची खरी व्याख्या आहे, हे मागील अग्रलेखांत ध्वनित केलें आहे. ही व्याख्या सार्थ होण्यास कोणत्या तत्वानुरूप समाजाची घटना झाली पाहिजे त्या तत्वाचें प्रतिपादन पुढील अंकीं करूं. ही व्याख्या व हीं तत्वें ज्यांना मान्य आहेत त्यांचा व आमचा एकच पक्ष आहे हें निराळें सागणें नको.



---

अग्रलेख : मूकनायक, ता. १० एप्रिल १९२०.

# १६

# शेतसाऱ्याचा प्रश्न

**(केसरीच्या ता. २८ जुलैच्या अंकात शेतसारा किती घ्यावा या मथळ्याखाली जो अग्रलेख आला आहे व तो वाचून सुचलेले विचार केसरी वाचकांपुढे मांडणे उपयुक्त होईल असे वाटल्यावरुन ते आपल्याकडे प्रसिद्धीकरिता लिहून पाठवित आहे.)**

हिंदुस्थानाच्या विपन्न देशाची मीमांसा करतांना जो वाद उत्पन्न होतो त्यात अनेक प्रकारची कारणे देण्यांत येतात. त्यांत शेतसाऱ्याची चालू पद्धत हे एक महत्वाचे कारण आहे असे म्हणणारे बरेचसे लोक आहेत व त्यात परलोकवासी बाबू रमेशचंद्र दत्त यासारख्या या विषयाचा खोल अभ्यास केलेल्या लोकांची गणणा होतं. यावरुन हे कारण किती वास्तविक आहे याची सत्यता पटते. या वादांत प्रामुख्याने दोन मुद्यांवर भर दिलेला आढळतो. पहिला मुद्दा असा आहे की, सरकारी शेतसाऱ्याचे प्रमाण शेतीच्या उत्पन्नाच्या मानाने इतके जबरदस्त आहे की, शेतसारा भागविल्यानंतर शेतकऱ्यांच्या पदरी आपल्या उपजीविकेसाठी कांहीच उरत नाही व तेणेकरुन शेतकरी हा नेहमीच दुष्काळपिडित असतो हा एक मुद्दा झाला. यावरुन शेतसारा किती घ्यावा असा प्रश्न उत्पन्न होतो दुसरा मुद्दा असा आहे की, शेतसारा हा शेतकीच्या उत्पन्नाशी जरी प्रमाणबद्ध असला तरी त्याचा भरणा उत्पन्नावर अवलंबून नाही. म्हणजे शेतकऱ्याला जरी उत्पन्न झाले नाही तरी ठराविक शेतसारा हा त्यास द्यावा लागतोच. सरकार दयाळू होऊन जर माफ करील तरच तो चुकेल. नाहीतर शेतीत उत्पन्न होवो किंवा न होवो शेतकऱ्याला शेतसारा हा काही सुटत नाही. त्याचप्रमाणे सरकारला पैशाची जरुरी असो वा नसो, शेतसारा हा दरसाल वसूल होतोच होतो. ह्या मुद्यावरुन शेतसारा हा दंड आहे किंवा कर आहे असा प्रश्न उत्पन्न होतो.

या दोनच मुद्यांवर काय ते रण माजून राहिले आहे. पण माझ्या मते या दोहोंशिवाय आणखी एक तिसरा मुद्दा आहे व तो या दोहोंपेक्षा फारच महत्त्वाचा आहे. ह्या तिसऱ्या मुद्यावरुन जो प्रश्न उद्‌भवतो तो " शेतसारा कशावर बसवावा ? " हा होय. तो शेतीच्या उत्पन्नावर बसविणे रास्त आहे हे मत इतके सर्वमान्य झाले आहे की हा प्रश्न कोणाला वादाला काढावा असे मुळी सुचत देखील

नाही. याचें प्रत्यक्ष प्रमाण आपल्या अग्रलेखातच पहावयांस सांपडते. त्यात सुरवातीसच आपण म्हटले आहे की, " जमिनदाराला दिल्या जाणाऱ्या खंडावरून शेतसारा ठरवूं नये. " असे म्हटल्यास तो कशावरुन ठरवावा याचे उत्तर दिले पाहिजे. हे उत्तर एका अर्थाने कमिटीच्या पहिल्याच प्रश्नाच्या उत्तरात येऊन गेले आहे व ते सरकारनेहि तत्वतः मान्य केले आहे. लँड रेव्हिन्यू कोडाच्या १०७ व्या कलमात शेतसारा ठरवितांना शेती जमिनीचे उत्पन्न लक्षात घ्यावे असे म्हटले आहे व ते कलम आपणांस मान्य आहे असा बहुतेक साक्षीदारांनी जबाब दिला आहे. या कलमाच्या बंधनातून निसटून जाण्याचा सरकारचा प्रयत्न चालू असल्याचे उघड दिसून येते. तथापि हे कलम कायम ठेवावे व जरुर तर त्यातील शब्द अधिक स्पष्ट व निस्संदिग्ध करावेत असाच बहुतेक सर्व साक्षीदारांचा अभिप्राय नमूद असल्याचे शेतजमिनीच्या निव्वळ उत्पन्नाच्या अंदाजावरुन कर आकारणी करावी याविषयी कमिटीत फारसा मतभेद होईलसें दिसत नाही. माझ्यामते शेतीच्या उत्पन्नावर शेतसारा बसविणें हे अत्यंत गैर व अन्यायकारक आहे. आधी शेतीचे उत्पन्न ठरविणे हे म्हणण्यासारखे सोपे नाही. खर्च वजा जातां राहील ते उत्पन्न असा ठोकताळा घेतला तरी खर्च आणि उत्पन्न ह्यांचे प्रमाण सर्वसारखेच सांपडणार नाही. कधी कधी समान प्रमाणांत उत्पन्न होण्यास असमान प्रमाणांत खर्च करावा लागतो. असा जेथे प्रसंग येईल तेथे सर्वसाधारण एकच खर्चाचा आकडा धरुन उत्पन्न आकारणें गैर होईल. परंतु ही बाब जरी सोडून दिली तरी शेतसारा शेतीच्या दर एकरी उत्पन्नावर आकारला जात असल्याने हजारो एकर लागवड करीत असून २००० रुपये कमवीत असलेला लक्षाधीश सावकार व अवघा एक एकर पेरा करुन २० रुपये मिळविणारा नांगऱ्या हे सारख्याच प्रमाणात सरकारला कर देतात. ह्या कराचे प्रमाण शेंकडा २५ असे जर धरले तर सावकार अवघा ५०० रुपये कर देतो. पण बिचाऱ्या नांगऱ्याला ५ रुपये द्यावे लागतात हा न्याय आहे काय ?

कारभाराच्या संबंधाने जे कांही नियम तज्ज्ञांना मान्य झाले आहेत त्यापैकी एक नियम असा आहे की कराचे प्रमाण कर देणाऱ्याच्या मगदुराप्रमाणे असावे आणि मगदूर ठरविताना धंद्याच्या उत्पन्नावरुन तो न ठरविता माणसाच्या ऐपतीवरुन तो ठरविला जावा. कारण प्रपंचाच्या भिन्न स्थितीमुळेच सारखे उत्पन्न असले तरी ऐपत सारखीच आहे असे म्हणता येत नाही. हा नियम अंमलात आणावयाचा तर ऐपतीवर कर बसवायचा इतकेच नव्हे तर ऐपतीच्या वाढीबरोबर कराच्या दराचे प्रमाणही वाढत ठेवावे लागते कारण ज्याची ऐपत जास्त त्या मानाने त्याचे समार्थ्य जास्त या नियमानुसार जर आपल्याकडील शेतसाऱ्याच्या पद्धतीची छाननी केली

तर तीपासून धडधडीत अन्याय होत आहे हे कोणासही नाकबूल करता यावयाचे नाही. कारण उत्पन्नाच्या दृष्टीने पाहिले असता किंवा निर्वाहाच्या दृष्टीने पाहिले असता हे उघड आहे की रुपयांतून ५०० रुपये जर गेले तर सावकाराच्या आर्थिक सामर्थ्याला काही म्हणण्यासारखा धोका पोहोचतच नाही. परंतु तेच नांगऱ्याच्या २० रुपयांतून जर ५ रुपये गेले तर त्याची उद्योग वृद्धी तर होणार नाहीच पण त्याच्या पोटाची खळगी सुद्धा भरणार नाही. कराचे समप्रमाण असल्याने हा अन्याय घडतो हे उघड आहे. वास्तविक पाहिले असता सावकाराची चढती ऐपत असल्याकारणाने त्याने द्यावयाचा कर चढत्या प्रमाणात असला पाहिजे. जोपर्यंत असे झाले नाही तोपर्यंत सावकार आणि नांगऱ्या या उभयतांत न्याय झाला असे केव्हाच म्हणता यावयाचे नाही.

वर सांगितलेल्या नियमाशिवाय सुधारलेल्या राष्ट्रांच्या कर पद्धतीत दुसरा एक सर्वसाधारण नियम दृष्टीस पडतो तो नियम असा की कर देणे हे जरी दरेक नागरिकाचे कर्तव्य आहे तरी सर्वांपासून सरसकट सारखा चोपून कर घेणे राष्ट्राच्या हितावह नाही. सर्वांचे आर्थिक सामर्थ्य सारखे असावे हे तत्व जरी अजुनही सर्वांस मान्य झालेले नाही तरी कोणाचेही आर्थिक सामर्थ्य अमुक मर्यादेच्या खाली असणे हे राष्ट्राच्या संवर्धनास घातक आहे. एवढे मात्र सर्वांस मान्य झाले आहे. या तत्वानुसार दरेक नागरिकाने सरकारला कर द्यावा हा जो नियम आहे त्यात एक महत्त्वाचा फेरफार करण्यात आला आहे.

त्या फेरफारान्वये ज्याची ऐपत अमुक एक ठराविक ऐपतीच्या खाली असेल त्यास कराच्या जाचणीतून मुक्त करण्यात येते. म्हणजे त्यास सूट मिळते. परंतु आपल्याकडील शेतसाऱ्याच्या पद्धतीत या नियमास मुळी वावच दिलेला नाही. शेतसाऱ्याच्या पद्धतीत गरीब आणि श्रीमंत हे सारखेच चरकास लावलेले दिसतात. आधीच जे दारिद्र्याने गांजलेले आहेत त्यांच्यावर पुनः कराचे ओझे देऊन गांजणे हे बुडत्याला लाथ मारुन बुडवण्याइतके घातुक व निष्ठुरपणाचे आहे. नवल आहे की, ज्या नियमाचा उल्लेख मी वर केला आहे ते नियम आपल्याकडील कारभार पद्धतीच्या गुण दोषांची जबाबदारी ज्यांच्यावर आहे त्यांना माहित नाहीत असे नाही. कारण आपल्या देशात उत्पन्नाच्या ज्या इतर बाबी आहेत त्या सर्व बाबींना ते नियम लागू केले आहेत, याला साक्ष आपल्याकडील इन्कम टॅक्सचा कायदा हा होय. असे असता शेतीच्या बाबींस ते नियम लागू न करण्याचे कारण कोणी सांगू शकेल काय ? शेतीच्या बाबतीत व इतर बाबतीत असा पक्षपात असावा व त्याकडे कोणाचे लक्ष जाऊ नये इतकेच नव्हे तर आहे तो पक्षपात योग्य व रास्त आहे असे सुज्ञांचे मत व्हावे हे शेतकऱ्यांचे

दुर्दैव नव्हे काय ? माझ्या मते शेतसाऱ्याच्या पद्धतीचे अनिष्ट परिणाम जर आपणास टाळावयाचे असतील तर आपल्याला शेतीच्या उत्पन्नावर कर बसविणे हे लँड रेव्हिन्यू कोड कलम १०७ मध्ये गोवलेले तत्व झुंगारुन देण्यात यावे याचे स्पष्टिकरण प्रो. सेलीगमन यांनी एके ठिकाणी केले आहे आणि त्यात इस्टेटीवर कर बसविण्याचे ऐवजी निव्वळ उत्पन्नावर आकारण्याचा प्रघात कसा पडत चालला आहे त्याचे विवेचन केले आहे.

ही सुधारणा आपल्याकडे घडवून आणण्यास आपल्या इन्कम-टॅक्स ॲक्टातील कलम ४ पोटकलम ३ बाब ८ रद्द करणे प्राप्त आहे व तीच कलम ६ मध्ये बाब ७ म्हणून घेतली पाहिजे. असे झाल्याने चार महत्वाचे फायदे होतील. (१) शेतीचा कर शेतीच्या उत्पन्नावर न बसवता शेतकऱ्याच्या ऐपतीवर बसविला जाईल. (२) कराचे चढते प्रमाण लागू झाल्याने गरीब व श्रीमंत शेतकऱ्यात जो अन्याय होतो तो टळेल. (३) किमान ऐपतीच्या मर्यादेच्या आतील शेतकऱ्याची कराच्या बोजापासून सुटका होईल व (४) जमिन महसुलाची बाब वसुलीच्या दृष्टीने जमाबंद न राहता तिच्या जमेत एक प्रकारचा लवचिकपणा येईल.

याशिवाय आणखी एक महत्त्वाचा फायदा होईल असे म्हणण्यास काही हरकत नाही. सर्वांना महशूर आहे की, सुधारणेचा कायदा होईतोपर्यंत शेतसारा ही बाब सर्वस्वी कार्यकारी मंत्र्याच्या ताब्यातील आहे असे धरले जात असे. सुधारणेचा कायदा झाल्यापासून ती बाब कायदेमंडळाच्या अंमलाखाली आणावी असे ठरले आहे. परंतु ती कोणत्या तऱ्हेने आणता येईल हा मोठाच प्रश्न आहे. मी सुचविलेली योजना जर घडून आली तर हा प्रश्न आपोआपच सुटतो. कारण शेतीं ही इन्कम टॅक्सच्या बाबींपैकी बाब असे ठरले म्हणजे इन्कम टॅक्सच्या इतर बाबीप्रमाणे ही बाबही कायदेमंडळाच्या अंमलाखाली सहजगत्या येईल. आता शेतसारा ही बाब प्रांतिक कायदेमंडळास सोपवून दिली असल्या कारणाने तीत व तीस लागू पडणाऱ्या दराच्या कोष्टकात फेरफार करण्याचा अधिकार प्रांतिक कायेदमंडळास आहे. असे एक कलम त्या ॲक्टात किंवा डिव्होल्युशनच्या नियमात घातले म्हणजे सर्व कार्यभाग आटोपल्यासारखा झाला.

आता कदाचित अशी शंका येईल की, शेतकऱ्यांना अशाप्रकारे सूट दिली तर सरकारचे नुकसान होईल. सूट देणे हा न्याय असेल तर सरकारचे नुकसान होते म्हणून सूट न देणे शहाणपणाचे होणार नाही. पण सूट दिल्यामुळे नुकसान होईल अशी भिती बाळगण्याचे काही कारण नाही. कराचा दर चढता केल्यामुळे श्रीमंत शेतकऱ्यांकडून हल्लीच्या पेक्षा जास्त कर घेण्यात येईल व तेणे करुन गरीब

शेतकऱ्यांना दिल्या जाणाऱ्या माफीने होणारे नुकसान भरुन निघेल. शिवाय सुटीच्या बाबतीत इन्कम टॅक्सच्या इतर बाबीला ऐपतीची जी किमान मर्यादा ठरविण्यात आली आहे तीच मर्यादा शेतीच्या बाबतीत ठेवण्याची काही जरुरी नाही त्यापेक्षा कमी मर्यादा ठेवली तरी चालेल. इतकेच नव्हे तर इन्कम टॅक्सने इतर बाबींवर जो दर बसविला आहे त्याहीपेक्षा थोडासा जास्त दर शेतबाबीवर ठेवला तर फारसा अन्याय होणार नाही. कारण ज्याप्रमाणे ऐपतदाराचे वर्गीकरण करुन निरनिराळ्या वर्गावर निरनिराळे कर बसविणे गैर होत नाही त्याचप्रमाणे ऐपतीच्या बाबीचे वर्गीकरण करुन निरनिराळ्या बाबींवर निरनिराळे कर बसविणे काही गैर नाही. अशाप्रकारचे भेदाभेद सुधारलेल्या राष्ट्राच्या कारभार पद्धतीत केलेले आपल्या नजरेस पडतात. अशा प्रकारची सुधारणा आपल्याकडील शेतसाऱ्याच्या पद्धतीत झाल्यास तूट येणार नाही. न्याय होईल व गरीब शेतकऱ्याची करांच्या भारामुळे होणारी आपदा वाचेल.

ही सुधारणा घडून येण्यास एका गोष्टीची आवश्यकता आहे व ती ही की शेतसाऱ्याच्या बाबीतील आपला दृष्टीकोन प्रथमतः बदलला पाहिजे. शेतसारा कशावर बसवावयाचा या प्रश्नासंबंधाने ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट ही की चालू पद्धतीनुसार शेतसारा हा दर एकर जमिनीवर बसवलेला कर आहे. शेतसारा शेतकरी भरतो. हे जरी खरे आहे तरी वास्तविक पाहता तो त्याच्या जमिनीपासून घेता येतो, शेतसारा हा शेतकऱ्यावर बसवलेला नाही तो जमिनीवर बसवलेला आहे. अशी आपली दृष्टी आहे. सुधारलेल्या पद्धतीचा दृष्टीकोन याच्या उलट आहे. त्या पद्धतीत शेतसारा जमिनीवर बसविलेला नसून जमिनवाहकाच्या एकंदर मगदुरावर बसविलेला असतो. या पद्धतीप्रमाणे वस्तु कर देत नाही. माणुस कर देतो असा या सुधारलेल्या दृष्टीचा रोख असतो. म्हणून या सुधारलेल्या पद्धतीत न्याय-अन्यायाचा विचार करावा लागतो. आपल्या असंस्कृत पद्धतीत वस्तु कर देते असे गृहीत धरले गेल्यामुळे न्याय-अन्याय, बरे व वाईट यांचा प्रश्नच उपस्थित होत नाही. कारण नितीचा प्रश्न मनुष्यमात्राच्या व्यवहारास काय तो उद्‌भवतो. जड वस्तूच्या समीकरणात त्याला वाव नसतो. यास्तव वस्तूवर म्हणजे जमिनीवर कर बसविणे आणि माणसावर म्हणजे शेतकऱ्यावर कर बसविणे ह्या दोन अगदी निराळ्या गोष्टी आहेत. व पहिले देखणे हे अगदी भ्रामक असून दुसरेंच काय ते सत्य आहे हा समज पटणे ही सुधारणेच्या मार्गातील पहिली पायरी आहे. ही जाणीव पटली म्हणजे पुढला मार्ग सोपा आहे. हा महत्वाचा भेद साधारण लोकांच्या ध्यानांत तर आला नाहीच पण तो तज्ज्ञांच्या देखील ध्यानांत आल्याचे माझ्या अवलोकनात नाही. हा भेद सध्या

नेमलेल्या लँड रेव्हिन्यू कमिटीचे सभासद प्रधान यांना मी एकदा विशद करुन सांगितला होता व त्याच्या नाविन्यामुळे त्याची जिज्ञासा वाढून तो कमिटीपुढे मांडण्याची संधी मिळेल अशी व्यवस्था करीन म्हणून त्यांनी मला सांगितले होते परंतु काही कारणांमुळे तो योग त्यांना जुळवून आणतां आला नाही. तरी जे विचार कमिटीपुढे मांडण्याची मला संधी मिळाली नाही ते विचार आपल्या पत्राच्या द्वारे जनतेपुढे मांडीत आहे.

●●●

---

केसरी, ता. १८ ऑगस्ट १९२५.

## १७

# बहिष्कृतांनी ब्राह्मणेतरांवर आरोप केला तर काही वावगे होणार आहे काय ?

पुणें ट्रेनिंग कॉलेजमध्ये गतवर्षापर्यंत अभ्यास करीत असलेल्या विद्यार्थ्यांस ब्राह्मण स्वयंपाक्याकडून शिजविलेलें अन्न चालत असे. या ३०/३५ वर्षांच्या जुन्या वहिवाटी विरुद्ध गेल्या साली ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांनीं चळवळ करून आपणांस ब्राह्मणाच्या हातचें जेवण खाण्यास भाग न पाडतां ब्राह्मण ब्राह्मणेतरांची जेवणाची व्यवस्था निराळी करण्यात यावी अशी मागणी केली. आपल्या मागणीस जोर यावा म्हणून ट्रेनिंग कॉलेजमध्ये शिकत असलेल्या बहिष्कृत विद्यार्थ्यांचा पाठींबा मागण्यात आला. ब्राह्मणेतरांकडून एका हॉलमध्यें तुम्ही आम्हीं शेजारी बसून पंगत करूं असें आश्वासन मिळाल्यावर बहिष्कृत विद्यार्थ्यांनीं त्यांच्या मागणीस दुजोरा दिला. नंतर वरिष्ठ अधिकारी यांजकडे या बाबतींत ब्राह्मणेतर व बहिष्कृत विद्यार्थ्यांच्या सह्यांनिशी एक दोन अर्ज रवाना झाले. त्याच सुमारास त्या काळी शिक्षण मंत्री असलेले भास्करराव जाधव यांनीं ट्रेनिंग कॉलेजला भेट दिली. त्यावेळी विचारपूस करितांना ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांनीं आमचें जेवण स्वतंत्र असावें, आम्ही बहिष्कृत विद्यार्थ्यांस भोजन हॉलमध्ये एका पंगतीस जेवावयास घेऊं व यास सर्व मागासलेल्या विद्यार्थ्यांचा पाठिंबा आहे असें जाहीर केलें. हें ऐकून शिक्षण मंत्र्यांनी तुमच्या म्हणण्याप्रमाणे लवकरच व्यवस्था करू असें आश्वासन दिलें. गेल्या सालच्या ऑगस्ट १ लीस ही जेवणाची नवीन व्यवस्था अंमलांत आली व भोजन हॉलमध्यें पडदा घालून त्याचे दोन विभाग ब्राह्मण-ब्राह्मणेतरांकरिता करण्यांत आले. पहिल्या दिवशी जेवणाची घंटी झाल्यानंतर बहिष्कृत वर्गातील विद्यार्थी अगोदर कसल्याच प्रकारची सूचना न मिळाल्याकारणानें जेव्हां ब्राह्मणेतरांकरितां राखून ठेवलेल्या हॉलमध्ये जेवणाकरितां गेले तेव्हां त्यांना आंत घेण्यांत आलें नाहीं. याचें कारण विचारितां असें सांगण्यात आलें कीं, जागा अपुरी असल्यामुळें तुम्हांस सध्यां आंत बसविता येत नाही तुम्हीं नेहमींच्या जागेंतच जेवा. यावर बहिष्कृत वर्गाच्या विद्यार्थ्यांनीं असें सुचविलें कीं, आम्हां सर्व बहिष्कृत विद्यार्थ्यांस आंत बसण्यास जागा दिल्यानें जर गर्दी होते तर आमचे कांहीं विद्यार्थी तुमच्या हॉलमध्ये बसून जेवूं द्या व तुमचे कांहीं विद्यार्थी आमच्या जागेंत बसून जेवू द्या म्हणजे तुम्हीं आम्ही केलेल्या श्रमाचें सार्थक होईल

व तुम्ही दिलेल्या सहभोजनाच्या वचनाची सत्यता पटेल. परंतु यास ब्राह्मणेतर विद्यार्थी कबूल होईनात व उलटपक्षीं तुम्ही आपापसांतच एकमेकांच्या पंक्तीस बसत नाहीं तर तुम्हाला आमच्या पंक्तीस बसण्याचा काय हक्क आहे अशी शक्कल लढवूं लागले. परंतु या युक्तीवादास देखील बहिष्कृतवर्गाच्या विद्यार्थ्यांनीं वाव राहूं दिला नाहीं. कारण लगेच नागपंचमींच्या दिवशीं बहिष्कृत समाजांत मोडणाऱ्या सर्व जातींच्या विद्यार्थ्यांनीं मोठ्या आनंदाने एका पंक्तीस बसून ब्राह्मणेतरांचे तोंड बंद केलें. तरी पण ब्राह्मणेतर विद्यार्थ्यांनीं आपला सोवळेपणा कायम ठेवून बहिष्कृत विद्यार्थ्यांस दिलेलें वचन पाळण्याचें धैर्य दाखविलें नाहीं. "देशाचें नांव व आपला गांव" ही कुटील नीतिमत्ता ब्राह्मण लोक अमलांत आणतात असा ब्राह्मणेतरांचा ब्राह्मणांवरचा नेहमींचा आरोप बहिष्कृतांनी ब्राह्मणेतरांवर जर केला तर त्यांत काहीं वावगे होणार आहे काय ? बहिष्कृत वर्गांनी ब्राह्मणेतर चळवळींत भाग घेऊन त्या चळवळीचा पुरस्कार करावा असें सांगणाऱ्या 'दीनमित्रा' च्या संपादकाला या ट्रेनिंग कॉलेजमध्ये घडलेल्या नीच प्रकाराचा आम्ही आहेर करतो.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत ता. ३ एप्रिल १९२७.

# १८

# बहिष्कृतवर्ग शेणामेणाचा नाही त्याने रणांगणांत मर्दुमकी गाजविलेली आहे

सध्यांच्या काळांत विक्षिप्त आणि प्रतिगामी विचारसरणीचे जे कांहीं पत्रकार आहेत त्यांत हिंदुसमाजाला रोटीबंद व बेटीबंद ठेवून हिंदुसंघटण व शुद्धि या चळवळी चालवाव्या असें प्रतिपादणाऱ्या पत्रकारांत 'भाला' कारांची गणना करावयास हरकत नाहीं. ब्राह्मणभोजनें, गणेशोत्सवांत टिपऱ्या बडविणाऱ्या पोरांचे मेळे आणि सोवळेपणानें इतरांपासून अलिप्त राहून आपला श्रेष्ठपणा मिरविणाऱ्या ब्राह्मणांचा कडवटपणा यांच्या जोरावर चुटकीसरशीं स्वराज्य मिळवितां येईल आणि हिंदुधर्मावरील हल्ले परतवितां येतील असें छातीठोकपणे सांगणाऱ्या खास 'लोकमान्यपंथीय' भोपटकरांची लेखणी महाड परिषदेच्या समाप्तीनंतर उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या लोकांनीं जे गुंडगिरीचे प्रताप गाजविले त्यांचे समर्थन करण्यासाठीं फुरफुरली आहे. अस्पृश्य मानलेल्या जातींविषयीं कोरडी सहानुभूति व्यक्त करून त्यांनी अस्पृश्य समाजाच्या पुढाऱ्यांना आणि अस्पृश्य मानलेल्या जातींच्या अन्यजातीय पुरस्कर्त्यांना अनाहूत उपदेश करण्याची संधी साधून घेतली आहे. 'भाला' कारांसारख्या लोकांना आम्ही स्पष्टपणें सांगतों कीं, आम्हांला आमच्या उन्नतीसाठी करावयाच्या प्रयत्नांत इतर लोकांचें साहाय्य व त्यांची सहानुभूति ही अवश्यक पाहिजे आहेच, परंतु हिंदु समाजाची पोलादी चौकटी जशीची तशी कायम ठेवून मेहेरबानीदाखल आम्हांस सवलती देऊं पहाणाऱ्या आणि आमच्या नैसगिक हक्कांना महत्त्व न देतां केवळ आपल्या धर्मगुरुत्वाचे वर्चस्व खुलून दिसावें म्हणून आम्हांला हिंदू समाजांत ठेवूं पाहणाऱ्या मतलबी व वर्चस्वलोलुप लोकांच्या सहानुभूतीची आम्हांला बिलकूल जरूरी नाहीं. अस्पृश्य मानलेल्या समाजाचे जर कोणी खरे शत्रू असतील तर ते अशा प्रकारचेच लोक होत. अज्ञान हिंदु समाजाला असलेच लोक अधिक मूर्ख बनवीत आहेत. अज्ञान समाजाच्या विचारांची आम्हांला कल्पना होऊं शकते. त्यांच्याकडून अविचाराची किंवा अत्याचाराची कृत्यें झालीं तरी तो त्यांच्या अज्ञानाचा परिणाम आहे असें आम्ही समजतों. आणि आज ना उद्यां त्यांचे विचार बदलून त्यांच्यांत समतेचे विचार उत्पन्न होऊन सर्व समाजांत एकोपा नांदेल अशी आमची खात्री आहे. परंतु सुशिक्षित 'श्वानपुच्छे' सरळ करणें प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाहि शक्य नाहीं !

अस्पृश्यांच्या उतावीळ कैवाऱ्यांनीं 'घिसाडघाई' चालविली आहे, असा 'भाला' कारांचा आरोप आहे. 'फाजील उतावळे समाजसुधारक' असें 'भाला' कार ज्यांना म्हणतात त्यांचा अपराध काय तर ते अस्पृश्यांना पाणवठे खुले ठेवावे, त्यांची अस्पृश्यता काढून टाकावी आणि त्यांना हिंदूंच्या देवालयामध्ये जाण्यास हरकत असूं नये असें प्रतिपादितात. 'आस्ते कदम' सुधारकांचे म्हणणे हें की इतर लोकांच्या मनोभावनांना बिलकूल धक्का न लावतां अस्पृश्यांनीं आपली उन्नति करून घ्यावी. कितीहि वर्षे लोटलीं तरी, 'अद्यापि अस्पृश्यता निवारण्याचा काळ आला नाही' या सबबीचा पाढा वाचावयाचा आणि दुसरीकडून अस्पृश्यांविषयीं पोकळ सहानुभूति दाखववावयाची ! हा लपंडाव यापुढें चालणें शक्य नाहीं. म्हणे, अस्पृश्यता आजकालची नाही, ती एका वर्षात जन्मास आली नाहीं, म्हणून ती एका वर्षात नष्ट होणार नाहीं, 'तेव्हां कालाची मर्यादा केव्हांहि झालें तरी सारखीच असणार !' अशा प्रकारचे कोटिक्रम लढविणारांना आमचा असा सवाल आहे कीं, राजकीय बाबतींत 'स्वराज्या' ची घिसडघाई करतांना ही तुमची अक्कल कोठें जाते ? हजार बाराशें वर्षाची तुमची गुलामगिरीची संवय एकदम कशी नाहींशी होणार ? जें पारतंत्र्य हजार बाराशें वर्षे तुम्ही भोगीत आहां तें चुटकीबरोबर कसें नाहींसें होणार ? तें नाहींसें होण्याला जागृति झाल्यापासून तितकाच म्हणजे हजार बाराशें वर्षांचा कालावधि जांवयास नको काय ? कारण, तुमच्याच म्हणण्याप्रमाणें 'कालाची मर्यादा केव्हांहि झालें तरी सारखीच असणार !' तुम्ही स्वराज्याला पात्र नाहीं ही गोष्ट तुमच्या मनोरचनेवरूनच स्पष्ट दिसते आहे. ज्या कारणांनीं तुम्हीं स्वराज्य गमावून बसलां तीं कारणें आजमितीस कायम आहेत. फार कशाला, परवांच्या महाड येथल्या दंग्यांतच तुमची स्वराज्यविषयक नालायकी शाबीद झाली आहे. तुम्ही अल्पसंख्यांक लोकांचे नागरिकत्वाचे हक्क कबूल करावयाला तयार नाहीं, गरीब दुबळ्या लोकांशीं न्यायपूर्वक वागण्याची तुमची इच्छा नाहीं, आणि हिंदुराज्य झालें असतें तर बहिष्कृत वर्गाची पुरी कम्बखती भरली असती. कलेक्टर यूरोपियन, डि.पो.सुपरिंटेंडंट यूरोपीयन आणि पोलिस इन्स्पेक्टर मुसलमान असे अधिकारी नसते आणि महाडच्या मुसलमानांनी आपआपल्या घरांतून बहिष्कृत वर्गातल्या स्त्रीपुरुषमंडळीला व मुलांना आसरा दिला नसता तर स्पृश्यवर्गीय म्हणविणाऱ्या हिंदूंनीं अत्याचारांची कमाल केली असतीं. इतकें असूनहि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे'† असें म्हणण्याला तुम्हांला शरम वाटत नाहीं. जणूं काय, स्वराज्य हा तुमचाच हक्कं जन्मसिद्ध आहे, आणि महार चांभारांना कसलेच हक्क

† ह्या वाक्याचा उच्चार लो. बाळ गंगाधर टिळकांनी वऱ्हाडातील स्वराज्याच्या मोहिमेत अकोट येथे १९१८ साली केला. पुढे हाच राष्ट्रमंत्र म्हणून टिळकानुयायी स्वराज्यवाद्यांनी सदोदित मनात जपला.–गणवीर, स्फूटलेख पृ. ४.

नाहींत ! तुम्हीं जे तुकडे तोंडावर टाकाल ते चघळीत महारचांभारांनी समाधान मानलें पाहिजे तर मग तुम्हीहि सरकार मेहरबानीने जे हक्क तुम्हालां देतें त्यांवर संतुष्ट राहून स्वस्थ कां बसत नाहीं ? धिम्मेपणाचा उपदेश तुमच्या घिसाडघाईच्या राजकीय चळवळीसहि लागू नाही काय ? घिसाडघाई नको तर ती कोठेच नको. राजकीय बाबतीत इष्ट असेल तर सामाजिक बाबतीत त्यापेक्षाही ती इष्ट आहे. राजकीय बाबतीत शर्यतीच्या घोड्याप्रमाणे धावावयाला पाहावयाचे आणि सामाजिक व धार्मिक समतेचा प्रश्न निघाला कीं, गोगलगाईपेक्षांही सावकाश चालण्यानेच खरी प्रगति होईल असें मोठ्या शिष्टपणाचा आव आणून सांगावयाचें, हें निव्वळ ढोंग आहे. या ढोंगाला अस्पृश्य केव्हांही भीक घालणार नाहींत. 'भाला' कार अस्पृश्यांविषयीं आपली सहानुभूति आहे म्हणून दाखवितात, परंतु त्या सहानुभूतिची कवडी इतकीहि किंमत नाहीं. वरकांती त्यांनीं सहानुभूति दाखविण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु त्याच लेखांत त्यांच्या पोटांतलें कालकूट बाहेर पडलें आहे. लोकांच्या मनोवृत्ति दुखवूं नका, म्हणून अस्पृश्यांना व त्यांच्या कैवाऱ्यांना उपदेश करणाऱ्या या ढोंगी लोकांना आम्हीं विचारतों, तुमच्या अठरा कोटी लोकांना तेवढ्यां मनोवृत्ति आहेत आणि सात कोटी अस्पृश्यांना मनोवृत्ति नाहींत ? आधीं लोकांवर जुलूम करून त्यांना इहलोक नरकतुल्य करावयाचा आणि मग त्यांना त्या रीतीनें वागविणें हा आपला हक्क आहे असें म्हणून त्या हक्कांना धक्का लागण्याचा संभव दिसल्याबरोबर आपल्या मनोवृत्ति दुखावल्या गेल्या म्हणून ओरड करावयाची ! तुम्हीं इंग्रजांच्या मनोवृत्तींना धक्का कां लावतां ? हिंदी लोक हे जित अतएव पारतंत्र्यांतच रहाण्यास योग्य अशी इंग्रजांची भावना आहे आणि हिंदी लोकांनी मोठमोठ्या अधिकाराच्या जागा मिळवून इंग्रजांच्या बरोबरींनें वागण्याचा प्रयत्न केल्यामुळे इंग्रजांच्या मनोवृत्ति दुखणें स्वाभाविक नाहीं काय ? लोकांच्या मनोवृत्ति दुखवूं नका असें 'परोपदेश पांडित्य' करणाऱ्या या 'देशभक्तांनी' लोकांना "तुमच्या या भावनाच चुकीच्या आहेत, माणुसकीचे हक्क सर्वांनाच मिळाले पाहिजेत, इतरांना तुच्छतेनें वागविण्याचा कोणासही हक्क नाहीं, आतांपर्यंत अन्याय झाला म्हणून चालू वहिवाटीच्या सबबीवर त्याला न्यायाचें स्वरुप प्राप्त होत नाहीं," असें स्पष्टपणें सांगून त्यांची कानउघडणी करावयास नको काय ? पण तशी कानउघडणी केली तर सवंग लोकप्रियता कशी मिळेल ? जातिवर्चस्व मिरविण्याची हौस कशी भागवितां येईल ? अज्ञ लोकांना योग्य शिकवण द्यावयाचीं नाहीं, एवढेंच नव्हे तर अज्ञलोकांचे नांव पुढें करून आपणच न्यायाच्या व योग्य चळवळीला विरोध करावयाचा, हीं महाराष्ट्रांतली गेल्या चाळीस वर्षांतली परंपरा आहे. 'भाला' कार त्याच तालमीत तयार झाले आहेत. परंतु त्यांनीं व त्यांच्या संप्रदायबंधूंनी खूप

समजून असावें कीं, हे लपंडाव यापुढें चालणार नाहींत. 'बाप दाखवा नाही तर श्राद्ध घाला' असें बहिष्कृत सांगत आहेत. अज्ञान लोकांच्या मनोभावना दुखवूं नयेत असे तुम्हांला वाटतें तर तसल्या भावनाच चुकीच्या आहेत. हें त्यांना तुम्हीं पटवून द्या. तें तुमचें कर्तव्य आहे. परंतु तें न करतां तुम्ही त्यांना उलट चिथवितां त्याअर्थी तुम्हीच खरे गुन्हेगार आहां. तुम्हीं अज्ञ लोकांच्या पाठीमागे लपूं पाहातां, परंतु आम्ही तुम्हांला खेंचून बाहेर आणल्याशिवाय राहणार नाही.

'भाला' कारांनी महाडप्रकरणावर लिहितांना देवळांच्या बाबतींत कांहीं पुराण सांगितलें आहे. पण पहिली गोष्ट ही कीं, महाडपरिषदेमध्यें जमलेल्या महारचांभारांना तेथल्या कोणत्याच देवळांत शिरावयाचे नव्हतें. गांवोगांवीं अस्पृश्यांना पाण्यासाठीं अपरिमित हाल सोसावे लागतात, म्हणून सार्वजनिक पाणवठ्याच्या जागा खुल्या असाव्या अशी त्यांची मागणी होती आणि १९२४ सालीं महाड म्युनिसिपालिटीनें जें तळें सार्वजनिक उपयोगाचें आहे असें ठरविलें होतें त्या तळ्याच्या सार्वजनिक उपयोगाचा उपक्रम परिषदेच्या निमित्ताने त्यांना करावयाचा होता, त्याप्रमाणें सर्व प्रतिनिधिमंडळी राजरोसपणे तळ्यावर गेली आणि तेथले पाणी पिऊन आली. परंतु महारचांभारांना तान्हेनें मारूं पाहणाऱ्या लोकांना ते रुचलें नाहीं. त्यांनी ह्या गोष्टीचा सूड उगविण्याच्या अधम इच्छेनें, 'महारचांभार आतां वीरेश्वराच्या देवळांतहि शिरणार आहेत' अशी खोटी हूल उठविली आणि अज्ञ लोकांना चिथविलें. अर्थात् महाडप्रकरणांत तरी देवळांत शिरण्याच्या प्रश्नाचा संबंध नाहीं. तथापि, ज्याअर्थी देवळांचा संबंध 'भाला'-कारांनी ओढूनताणून आणलाच आहे आणि ती संधि घेऊन अस्पृश्यांना एक लहानसें व्याख्यान झोडलें आहे, त्याअर्थी आम्ही स्पष्टपणें सांगतों कीं, जोपर्यंत आम्ही आपल्यास हिंदु म्हणवीत आहों आणि तुम्ही आम्हास हिंदु समजत आहांत, तोपर्यंत देवळांत जाऊन देवदर्शन घेणें हा आमचा हक्क आहे असें आम्ही समजतों. आम्हाला एकजात निराळीं देवळें नकोत. देवळांवांचून आमचें अडलेलें नाही. ज्यांना देवभक्ति करावयाची असेल त्यांना देऊळच पाहिजे असें नाहीं. सामाजिक उपासना व सामाजिक संमेलन अथवा ऐक्य यांच्यासाठी देवळे पाहिजे असतात. स्वतंत्र देवळेंच बांधावयाचीं असती तर तीं अस्पृश्य स्वतः बांधतील त्यासाठी इतरांची परवानगी नको आहे. आज ना उद्यां या प्रश्नाचा आम्ही निकाल करून घेणार आहोच. आम्हाला समाजांत समान हक्क हवेत आणि ते आम्ही **शक्य तोंवर हिंदुसमाजांत राहून आणि जरूर तर कवडीमोल ठरलेल्या हिंदुत्वावर लाथ मारून** मिळविणार आहों आणि हिंदुत्वावर पाणी सोडण्याची पाळी आली तर अर्थांत्च आम्ही देवळांच्या वाटेला जाणार नाहीं हें सांगावयास नकोच.

'भाला' कारांनीं आमच्या वर्गाला धमक्या द्यावयालाहि कमी केलेले नाहीं. 'पठाणगिरी' दाखविण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हांला दंडेली करावयाची नाहीं. परंतु आमच्यावर कित्येक शतकें जी दंडेली चालविण्यांत आलेली आहे ती यापुढें आम्ही चालूं देणार नाहीं. पठाणांना पाहून 'भाला'कारांचे जातभाई व क्षत्रिय बच्चे म्हणविणारे लोक कसे गलितवस्त्र होतात तें आम्हाला ठाऊक आहे. पठाणगिरीच दाखवावयाची असती तर बहिष्कृत वर्गानें ती यापूर्वींच दाखविली असती. देवळांत शिरण्याचा अविचार केल्यास 'अस्पृश्यांच्या पाठी सडकल्या जाण्याचा संभव आहे' असें भालू भोपटकार म्हणतात. परंतु महाड येथें अस्पृश्यवर्गांच्या पुढाऱ्यांनीं व कैवाऱ्यांनीं परिषदेच्या प्रतिनिधींना आवरलें नसतें तर साडेतीन हजार प्रतिनिधींनीं महाड गांवांत अनर्थ उडवून दिला असता आणि पठाणगिरीचा मासला खरोखरच तेथल्या हिंदु गुंडांना चाखावयाला मिळाला असता. अस्पृश्यांच्या पाठी सडकण्याच्या ऐवजीं स्पृश्य वर्गांतील लोकांचीं डोकीं ठेचलीं गेलीं असतीं, आणि अस्पृश्या विरुद्ध अज्ञ लोकांना चिथावणी देणाऱ्या लंबोदर पुढाऱ्यांनी पोटें फाडलीं गेलीं असतीं, हें भोपटकरांनीं व त्यांच्याप्रमाणें वल्गना करणाऱ्या लोकांनी जरूर लक्ष्यांत ठेवावें. वेळच आली तर बंगाल्यांतल्या नामशूद्रांनी मुसलमानांचे साहाय्य घेऊन सोंवळ्या हिंदूंची रग जिरविली तसेंहि होऊं शकेल. पाठी सडकण्याच्या वल्गना 'भाला' कारांनी घरांत बसून कराव्या. भिक्षुकांच्या सभेंत सलकड्याचे हातवारे करून **'वाचि वीर्यं द्विजानाम'** या म्हणण्याची सत्यता पटवून द्यावी परंतु बहिष्कृत वर्गाविषयीं लिहितांना यापुढें जपून लिहावें. असल्या विदूषकांच्या किंवा ढोंगी देशभक्तांच्या सहानुभूतीची आम्हांला बिलकूल जरूरी नाहीं. त्यांना आम्ही बजावून सांगतों कीं, तुमच्यावर आमचा तिळमात्र विश्वास नाहीं, तुमच्या उपदेशाला आम्ही गवताच्या काडी इतकी किंमत देत नाहीं, तुम्हांला आमच्या हक्कांचा पुरस्कार करावयाचा नसेल तर बाजूला व्हा, पण आमच्या मार्गांत आड आलां आणि अज्ञ लोकांना चिथावूं लागलां तर आम्ही तुमची सब्बूर करणार नाहीं. आमचा पक्ष न्यायाचा आहे आणि त्याकरितां आम्ही अखेरपर्यंत झगडणार. बहिष्कृतवर्ग शेणामेणाचा नाहीं. त्यानें आतांपर्यंत रणांगणांत मर्दुमकी गाजविलेली आहे, आणि भालाकारासारख्या धमक्या देणाऱ्या लोकांची मुसलमानांना किंवा युरोपीयनांना पाहून कशी गाळण उडते हें आम्हास ठाऊक आहे. आणि आमच्या पाठीं सडकण्याची धमकी देणाऱ्यांची प्रसंग पडल्यास टाळकी शेकण्यास आम्ही पर्वा करणार नाहीं. मग काय होणार असेल तें होवों.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत ता. ३ एप्रिल १९२७.

# १९

## अस्पृश्यांनी गळ्यांत जानवें घालणें हा अधर्म . . .

महाड येथील चवदार तळ्यावर सत्याग्रह केल्यामुळे स्पृश्य लोकांनी अस्पृश्यांवर जो अत्याचार केला तशाच प्रकारे इतरत्र जे अत्याचार केले जातात त्याचा पुरावा डॉ. बाबासाहेब आंबेडकर खालील प्रमाणे देतात, : संपादक.

अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या लोकांवर कसे अत्याचार होतात याचा एक दुसरा पुरावा पाहिजे असल्यास मध्यप्रांतांत एका ठिकाणीं तो नुकताच घडून आला आहे. सतनामी नांवाचा एक पंथ तिकडे असून त्या पंथामुळें अस्पृश्य समजलें जाणाऱ्या लोकांच्या राहणींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. या पंथाच्या एका चांभारानें गळ्यांत जानवें घातलें म्हणून जवळपासच्या गांवांतल्या ब्राह्मणांनी व रजपुतांनीं कट करून त्याला एकटेपणीं गांठून त्याचा खून केला, अशी बातमीं हल्लींच प्रसिद्ध झाली आहे. चांभारानें जानवें घातलें म्हणून ब्राह्मणांच्या व रजपूतांच्या धर्माच्या गळ्याला फांस कां लागावा ? अस्पृश्यांनी गळ्यांत जानवें घालणें हा अधर्म आणि ब्राह्मणांनी व रजपुतांनीं त्याला एकटा गांठून त्याचा खून करणें हा धर्म ! अशा मनोभावनांचे चोचले किती करावयाचे ? थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे ब्राह्मणक्षत्रियांचा धर्माभिमान व शौर्य हीं फक्त अस्पृश्यांवर गाजविण्यासाठीं आहेत. हे लोक युरोपीयनांचे बूट चाटतील, मुसलमानांचे नांव ऐकल्याबरोबर पळ काढतील, पण अस्पृश्यांवर वर्चस्व गाजविणें हा यांचा व यांच्या बापजाद्यांचा हक्क ! या लोकांना 'स्वराज्य' शब्द उच्चारावयाला खरें म्हटलें असतां शरम वाटली पाहिजे. गुलामांची जात आणि पुनः नाक वर आहेच !

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ एप्रिल १९२७.

# २०

# पुनश्च: हरि:ॐ !

प्रस्तुतच्या लेखकानें तारीख ३१-१-२० पासून " **मुकनायक** " या नांवाचे एक पाक्षिक वृत्तपत्र चालूं केलें होतें. सदरील वृत्तपत्रासंबंधीं आपलें मनोगत व्यक्त करितानां, त्याने पहिल्या अंकांत असें म्हटलें होतें की, " आमच्या या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढें होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास तसेंच त्यांची भावी उन्नति व तिचे मार्ग याच्या खऱ्या स्वरुपाची चर्चा होण्यास वर्तमान पत्रासारखी अन्य भूमीच नाहीं. परंतु मुंबई इलाख्यांत निघत असलेल्या वृत्तपत्रांकडे न्याहाळून पाहिलें असतां असे दिसून येईल कीं, त्यांतील बरीचशी पत्रें विशिष्ठ अशा जातीचे हितसंबंध पहाणारी आहेत. इतर जातींच्या हिताचीं त्यांना परवा नसते. इतकेंच नव्हें तर केव्हां केव्हां त्यांना अहितकारक असेंहि त्यांतून प्रलाप निघतात. अशा वृत्तपत्रकारांना आमचा एवढाच इषारा आहे कीं कोणतीही एखादी जात अवनत झाली, तर तिच्या अवनतींचा चट्टा इतर जातींस बसल्याशिवाय राहाणार नाहीं. समाज ही एक नौकाच आहे, व ज्याप्रमाणें आगबोटींत बसून प्रवास करणाऱ्या उतारूनें जाणूनबुजून इतरांचे नुकसान करावें म्हणून म्हणा किंवा त्यांची त्रेधा कशी उडते ही गम्मत पाहाण्यासाठी म्हणा किंवा आपल्या विनाशक स्वभावामुळे म्हणा, जर का इतरांच्या खोलीस छिद्र पाडलें तर सर्व बोटीबरोबर त्यालाहि आधी किंवा मागाहून जलसमाधि ही घ्यावीच लागणार आहे. त्याचप्रमाणे एका जातीचे नुकसान केल्याने, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे नुकसान करणाऱ्या जातीचेही नुकसान होणार, यांत बिलकूल शंका नाही. म्हणूनच स्वहितसाधू पत्रांनीं इतरांचें नुकसान करून आपलें हित करण्याचे पढतमूर्खांचे लक्षण शिकू नये. हा बुद्धिवाद ज्यांना कबूल आहे अशी वर्तमानपत्रे निघाली आहेत हे सुदैवच म्हणावयाचे. दीनमित्र, जागरूक, डेक्कनरयत, विजयी मराठा, ज्ञानप्रकाश, इंदुप्रकाश व सुबोधपत्रिका वगैरे पत्रातून बहिष्कृत समाजाच्या प्रश्नांची चर्चा वारंवार होते. परंतु ब्राह्मणेतर या अवडंबर संज्ञेखाली मोडत असलेल्या अनेक जातींच्या प्रश्नांचा ज्यात खल होतो, त्यांत बहिष्कृतांच्या प्रश्नांचा सांगोपांग उहापोह होण्यास पुरेशी जागा मिळणे शक्य नाही हेहि पण उघड आहे. अशा या अति बिकट स्थितिशी संलग्न असलेल्या प्रश्नांची उकल करण्यास एक स्वतंत्रच पत्र पाहिजे हे कोणीही कबूल करील. ही उणीव भरुन काढण्यासाठी या पत्राचा जन्म आहे. खास अस्पृश्यांच्या हिंताहिताची चर्चा करण्यासाठी " सोमवंशीय मित्र ", " हिंद नागरीक," "विटाळ विध्वंसक ", ही

पत्रें उपजली व लयही पावली. परंतु वर्गणीदारांकडून योग्य प्रोत्साहन मिळत गेल्यास " मूकनायक " न डगमगता स्वजनोद्धाराचें महत्कार्य करणारांस योग्य पंथ दाखविल, असें आश्वासन देताना तें अनुभवाअंति खोटे ठरणार नाहीं अशी खात्री बाळगून हें स्वाशयनिवेदन आटोपते घेतों. "

प्रस्तुतच्या लेखकानें या उताऱ्यांत जाहीर केलेला हा संकल्प फार दिवस टिकला नाहीं याबद्दल त्यास खेद वाटतो. पण हा संकल्प सिद्धीस गेला नाहीं यांत त्याचा दोष नाहीं, हें ज्यांस खरी परिस्थिति ठाऊक आहे त्यांस अवगत आहेच. पत्राचा उपक्रम सुरूं केल्यानंतर प्रस्तुतच्या लेखकास असें दिसून आलें कीं, अशा प्रकारचा लोकसेवेचा मार्ग पत्करणे झालें तर त्याकरितां कोणता तरी एखादा स्वतंत्र धंदा हस्तगत करणें अवश्य आहे. त्यास अनुसरून सुसाध्य असा ब्यारिस्टरी सारखा स्वतंत्र धंदा करतां यावा म्हणून आपला अवशेष राहिलेला अभ्यासक्रम पुरा करण्यासाठी त्यास परत विलायतेस जाणें भाग पडलें. जातांना त्यानें वृत्तपत्राच्या कार्याचीं सूत्रें कांहीं दिवस त्याच्या तालमीत राहिलेल्या एका तरुणाच्या हातीं दिली. प्रस्तुतच्या लेखकास आशा होती कीं, अभ्यासक्रम संपवून परत आल्यावर सदरील वृत्तपत्र भरभराटीस आलेलें आपल्या दृष्टीस पडेल. पण त्याच्या कमनशीबानें ती आशा व्यर्थ ठरली. कारण परत येण्यास निघण्यापूर्वीच पत्राला मूठमाती मिळाल्याची बातमी त्यास कळली. अंगीकृत कार्याचा अशा रीतीनें अल्प काळांतच नाश झालेला पाहून ज्यांचें त्यास वाईट वाटणें साहजिकच आहे. ह्या नाशांचीं कारणें जनतेपुढें मांडून त्यांच्या खरेखोटेपणाची छाननी करीत बसण्यांत प्रस्तुतच्या लेखकास काहीं अर्थ दिसत नाहीं. परंतु आज जवळ जवळ सहा वर्षाच्या कर्मलोपानंतर जुन्या स्वाध्यायास नव्या नांवाखालीं पुन्हा सुरवात प्रस्तुतचा लेखक कां करीत आहे, यासंबंधीं खुलासा केल्यास वावगें होणार नाहीं असें वाटतें.

सहा वर्षापूर्वी प्रस्तुतच्या लेखकानें " मूकनायक " पत्रास सुरवात केली तेव्हा राजकीय सुधारणेचा कायदा अमलांत यावयाचा होता. त्यास अनुसरून वृत्तपत्राची जरूरी काय आहे याचें दिग्दर्शन करताना प्रस्तुतच्या लेखकानें असें म्हटलें होतें की " जर या हिंदुस्थान देशांतील सृष्ट पदार्थांच्या व मानव जातींच्या चित्रपटाकडे प्रेक्षक या नात्यानें पाहिलें. तर हा देश म्हणजे केवळ विषमतेचें माहेरघर आहे असें निःसंशय दिसेल.

*  *  *  *

" हिंदु धर्मीयांत असलेली ही विषमता जितकी अनुपम आहे तितकीच ती निंदास्पदही आहे. कारण विषमतेनुरूप होणाऱ्या परस्परांच्या व्यवहाराचें स्वरुप हिंदुधर्माच्या शीलाला शोभण्यासारखें खास नाहीं. हिंदुधर्मात समाविष्ट होणाऱ्या जाती उच्चनीच भावनेनें प्रेरित झाल्यां आहेत हें उघड आहे, हिंदू समाज हा एक

मनोरा आहे व एक एक जात म्हणजे त्याचा एक एक मजलाच होय. पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं या मनोऱ्यास शिडी नाहीं ; आणि म्हणून एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर जाण्यास मार्ग नाहीं. ज्या मजल्यांत ज्यांनी जन्मावे त्याच मजल्यांत त्यांनी मरावे. खालच्या मजल्यातला इसम मग तो कितीही लायक असो त्याला वरच्या मजल्यात प्रवेश नाहीं व वरच्या मजल्यातला माणूस मग तो कितीहि नालायक असो त्याला खालच्या मजल्यात लोटून देण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं. उघड भाषेत बोलावयाचें म्हणजे जाती जातींत असलेल्या या उच्चनीच भावना गुणावगुणांच्या पायावर झाल्या आहेत असे नाही. उच्च जातीत जन्मलेला मग तो कितीहि अवगुणी असो तो उच्च म्हणावयाचा ; तसेच नीच जातींत जन्मलेला मग तो कितीहि गुणी असों, तो नीचच रहावयाचा. दुसरे असें कीं, परस्परांत रोटी-बेटी व्यवहार होत नसल्यामुळे दर एक जात या जिव्हाळ्याच्या संबंधांत स्वयंवह म्हणजे तुटक आहे. ही निकट संबंधाची गोष्ट जरी बाजूस टाकली तरी परस्परांतील बाह्यव्यवहार अनियंत्रित असा नाहीं. कांहींचा व्यवहार दारापर्यंतच होतो व कांहीं जाती तर अस्पृश्य आहेत, म्हणजे त्या जातींतील माणसाचा स्पर्श झाला असता इतर जातींतील माणसास विटाळ होतो. विटाळामुळें या बहिष्कृत जातींशी इतर जातीच्या लोकांशी क्वचितच व्यवहार होतो. रोटी-बेटी व्यवहाराच्या अभावीं कायम झालेल्या परकेपणांत स्पृश्यास्पृश भावनेनें इतकी भर टाकली आहे की, या जाती हिंदू समाजात असून समाजाबाहेर आहेत असेंच म्हटलें पाहिजे. या व्यवस्थेमुळें हिंदुधर्मीयांचे ब्राह्मण, ब्राह्मणेतर व बहिष्कृत असे तीन वर्ग होतात. तसेंच या विषमतेच्या परिणामाकडे लक्ष दिलें तर असें दिसून येईल कीं, तिच्या पायीं विविध जातीवर विविध परिणाम झाले आहेत. सर्वात उच्च असलेल्या ब्राह्मण वर्गास आपण भूं-देव आहो असें वाटत आहे. सर्व मानवांचा जन्म आपल्या सेवेसाठीं आहे असें मानणाऱ्या भूं-देवांना रूढ असलेलीं विषमता पोषकच आहे, आणि म्हणूनच ते आपल्या स्वनिर्मित हक्कानें इतरांपासून आपली सेवा करून घेऊन आपण राजरोसपणे व बिनदिक्कत मेवा खात आहेत. त्यांनीं कांहीं करणी केली आहे म्हणावें तर ज्ञानसंचय व धर्मशास्त्रलेखन एवढेंच काय ते ! पण तें धर्मशास्त्र म्हणजे उदात्त विचार व नीच आचार यातील प्रबल विरोधाचें कोडेंच म्हणावयाचें. सचेतन व तसेच अचेतन वस्तू हीं सारी ईश्वराची रूपे आहेत, असें उपदेशणाऱ्या तत्ववादींयांच्या विचारांत व आचारात विलक्षण विषमता दिसावी हें काहीं शुद्धीवर असणारांचे लक्षण नव्हे. वेडेवाकडे कसेहि असो पण या धर्मशास्त्राची छाप लोकांवर कांहीं कमी नाहीं. आपण होऊन अज्ञजन आपल्या हितशत्रूस भूदेव म्हणून भजत आहेत हे कोण नाकबूल करील ? विघातक

धर्मभावनेच्या शृंखलेनें जखडून घेऊन शत्रूस मित्र समजून त्यांच्यापायी इतर जन लीन कां झाले याचा उलगडा करण्यास फार दूर जावयास नको. अज्ञानी लोकाकडून कांहीहि करविता येईल आणि म्हणूनच ज्ञानसंचय-प्रसार नव्हे-ही ब्राह्मणांची मिरास हे एक धर्माचे मोठे तत्व बनवून ठेवण्यात आले आहे.

" सत्ता व ज्ञान नसल्यामुळे ब्राह्मणेतर मागासले व त्यांची उन्नति खुंटली, हे निर्विवाद आहे, परंतु त्यांच्या दुःखांत दारिद्र्याची तरी भर पडली नाही. कारण शेती, व्यापार, उदीम अथवा नोकरी करुन आपला चरितार्थ चालविणे त्यांना दुरापास्त नाही ; पण या सामाजिक विषमतेचा बहिष्कृत समाजावर झालेला परिणाम अति घोर आहे. दौर्बल्य, दारिद्र्य व अज्ञान या त्रिवेणी संगमात हा अफाट बहिष्कृत समाज वाहवत आहे हे खास. दीर्घकाल अंगी मुरलेल्या दास्यामुळें उद्‌भवलेली हीनता त्यांना मागे खेचीत आहे. आहे ती स्थिति योग्य आहे यापेक्षा बरी स्थिति आपल्या नशिबी नाही अशा समजुतीचा विघातकपणा ह्या पतितांच्या नजरेस आणण्यास ज्ञानासारखे अंजनच नाही. पण तें अंजनहि आजकाल मिरची मसाल्याप्रमाणें विकत घ्यावे लागत आहे ; आणि दारिद्र्यामुळे ते दुर्मिळ झालें आहे. कोठे कोठे तर विकत घेऊं गेलों असतां ते मिळतहि नाही, कारण ज्ञानमंदिरात सर्वच ठिकाणी अस्पृश्यांचा प्रवेश होतो असें नाही. दारिद्र्याची बोळवण करण्यास कपाळी अस्पृश्यतेचा शिक्का मारला असल्यामुळें पैका मिळविण्यास हवी तेवढी संधि किंवा मोकळीक नाही. नोकरी, व्यापार, उदीम इत्यादि धंद्यात त्यांना क्वचितच रिघाव होता ; नशीब काढण्यास कोठेच जागा नसल्यामुळे त्यांना केवळ भुईचे खडे खात पडावे लागत आहे. "

" प्रचलित हिंदू धर्माच्या अति घोर अन्यायास्तव आपल्या समाजास अस्पृश्य मानण्याचें महापातक विश्वजनक प्रभूला न जुमानता करणारे कोट्यावधि अविवेकी व दुराग्रही जन जोंपर्यंत या देशांत वावरत आहेत तोपर्यंत आपला समाज निकृष्ट स्थितीमध्येंच खितपत रहाणार आहे, याची जाणीव या बहिष्कृत समाजातील बऱ्याच लोकांस झाली आहे, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. तसेंच परस्थ सरकारास आपल्या तंत्रानें वागावे लागत आहे याचा फायदा घेऊन अस्पृश्य वर्गाच्या खऱ्या स्थितीविषयी वरिष्ठ हिंदूंकडून त्याचा कसा गैरसमज करुन देण्यांत येत आहे हें देखील त्यांना कळून चुकलें आहे. जातिभेद व जातिमत्सर यांनी ग्रस्त झालेल्या या देशांत खरें स्वराज्य नांदण्यास या बहिष्कृत वर्गास त्यांच्या स्वतंत्र प्रतिनिधीतर्फे राजकीय सत्तेचा पुरेसा भाग मिळावा या मागणीस त्यांच्या वरिष्ठांनी कसून केलेल्या विरोधाच्या खोडसाळपणाबद्दल बहिष्कृत वर्गाने तक्रार केली आहे. एवंच राजकीय सत्ता मिळवून तिच्या जोरावर सामाजिक विषमतेचे दडपण कायम करू पाहाणारांचा कावा बहिष्कृत समाजाने ओळखला आहे, ही त्यांच्यांत उपजलेल्या जागृतीची साक्ष होय. "

सुधारणेचा कायदा अंमलात येण्यापूर्वीचे हे उद्‌गार आहेत. आतां सुधारणेचा कायदा अमलांत आलेला आहे. इंग्रजांच्या हातची सत्ता काही प्रमाणांत वरिष्ठ हिंदी लोकांच्या हातीं गेली आहे. बहिष्कृत वर्गाची प्रतिनिधींच्या बाबतीत मुळी दाद न लावता ज्याप्रमाणे एखाद्या जनावराला त्याचा निर्दय धनी कसायाच्या स्वाधीन करतो त्याप्रमाणे बहिष्कृत वर्गाच्या लोकांना त्यांच्या माबाप सरकारनें वरिष्ठ हिंदी लोकांच्या स्वाधीन केलें आहे† सहा वर्षापूर्वीची स्थिति व आजची स्थिती यांची तुलना जर केली तर अस्पृश्यांची स्थिति सहा वर्षापूर्वीपेक्षा आज जास्त शोचनीय आहे यांत वानवा नाही. ही शोचनीय स्थिति जगजाहीर करुन होत असलेली हेळसांड टाळावयाची असेल व घडत असलेल्या अन्यायापासून व जुलमापासून बचाव करावयाचा असेल तर वृत्तपत्राची जरुरी सहा वर्षांपेक्षा आज अधीक तीव्र आहे हे बहिष्कृत वर्गांतील सर्व जाणत्या माणसांस कबूल करावे लागेल. शिवाय १९३० साली हिंदुस्थानच्या कायद्याची दुरुस्ती होऊन १९३० साली इंग्रजांनी आपल्या हाती राखून ठेवलेली सत्ता देखील हिंदी लोकांच्या हातीं देण्यांत येईल असा अंदाज आहे. तसें जर झालें व त्याबरोबर बहिष्कृत वर्गाच्या लोकांना जर त्यांच्या संख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी मिळाले नाहींत तर त्यांच्या उन्नतीची इतिश्री झाली असेच समजावे. कारण ब्रिटीश सरकारचें निःपक्षपाती धोरण आमच्या वरिष्ठ समाजाकडून ठेवले जाईल इतकी त्यांची मनोभूमिका शुद्ध व सात्विक बनलेली नाही. हा घोर प्रसंग जर टाळावयाचा असेल तर आतांपासूनच चळवळीस सुरवात केली पाहिजे असें प्रस्तुतच्या लेखकाचे ठाम मत झाले आहे आणि म्हणूनच त्याने आपल्या स्वाध्यायास पुन्हा प्रारंभ केला आहे. ईश्वर करो आणि या कार्यात यशप्राप्ती होवो.

●●●

† पाहा, परिशिष्ट क्रमांक-१.

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ३ एप्रिल १९२७.

# २१

# राष्ट्रीयदृष्ट्या देशाचा कारभार एका जातीच्या हातीं जाणें अनिष्ट

गेल्या मे महिन्याच्या सुमारास रेव्हिन्यूखात्यांत तीन डेप्युटी कलेक्टरच्या जागा भरावयाच्या असून गरजूंनी अर्ज करावेत अशा प्रकारची एक जाहिरांत सरकारी ग्याझेटांत प्रसिद्ध करण्यांत आली होती. वयाच्या व इतर कांही अटींशिवाय अर्जदार मुंबई युनिव्हर्सिटीचा बी. ए. असला पाहिजे अशी एक लायकीची अट ठेवण्यांत आली होती. या तीन जागा कोणकोणत्या वर्गांतील अर्जदारांस दिल्या जातील याकडे सर्वांचेंच लक्ष लागून राहिलें होते. अशा मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या जागांची जेव्हां विल्हेवाट लावण्यांत येते तेव्हां ह्या विल्हेवाटीचा प्रश्न अस्पृश्य वर्गाच्या ध्यानीं मनीं सुद्धां नसतो. त्यांच्यांत इतक्या अधिकारावर चढण्यांस लायक असा इसम नसावयाचाच. मग त्यांनी तरी या जागांच्या विल्हेवाटीची वास्तपुस्त कशाला करावी. पण याप्रसंगी वस्तुस्थिती थोडीशी निराळी होती. आणि अस्पृश्यांना वाटत होते कीं, या तीन जागांपैकी एक जागा आपल्या वाट्यास येणार खास. कारण सदरहू जागेसाठी ज्या उमेदवारांनी अर्ज केले होते त्यापैकी मि. एम्. के. जाधव हे एक होते. रा. जाधव हे अस्पृश्य वर्गापैकी एक तरुण गृहस्थ असून त्यांनी मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. ची परीक्षा ऑनर्स कोर्स घेऊन प्रसार केली आहे. वयाच्या व इतर अटींच्या दृष्टींने त्यांच्यांत कोणतेच न्यून नव्हतें. तेव्हां त्यांना एक जागा मिळेल अशी जी आशा वाटत होती ती कांही वावगी नव्हती. परंतु सर्व अर्जांचा निकाल होऊन शेवटी या तीन जागांपैकी दोन जागा मराठा जातींच्या उमेदवारांस व एक जागा मुसलमान जातीच्या उमेदवारास देण्यांत आल्या असें आतां सरकारी ग्याझेटांत जाहीर करण्यांत आलें आहे ! !

ही निराशाजनक वार्ता वाचून कोणाही अस्पृश्यास सखेदाश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नसेल, खालच्या प्रतीच्या रेव्हिन्यू व पोलीस अधिकाऱ्यांकडून खेड्यापाड्यांतील अस्पृश्य वर्गाचा किती छळ होत आहे याची कल्पना वरिष्ठ अधिकाऱ्यांस किंवा वरिष्ठ जातीच्या लोकांस होणे शक्य नाही. परंतु या छळांच्या हकीकती आम्ही वेळोवेळीं वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांच्या कानावर घातल्या आहेत व या छळापासून अस्पृश्यांची सुटका होण्यास अधिकारी वर्गात त्यांचा प्रवेश होणे अत्यंत आवश्यक

आहे याची जाणीवही आम्ही करून दिली आहे. सरकारचे अधिकारी हे लायक असलेच पाहिजेत हें आम्हीं नाकबूल करीत नाहीं. पण आमचें म्हणणें असें आहे कीं, ते नुसते लायक असून चालणार नाहींत. ते निःपक्षपातीही असले पाहिजेत. नाहींतर एखादा अधिकारी जितका लायक तितकाच जर तो पक्षपाती असला तर त्याच्या हातून लोकांचे बरें होण्याऐवजी वाईटच जास्त होईल. जातिभेदामुळें दर एक सरकारी अधिकारी आपआपल्या जातीचा पक्षपाती असलेला आणि बरेचसे अधिकारी एकाच जातीचे असले तर ते निर्धास्तपणें दुसऱ्या जातीचे अनहित करून स्वजातीचा हितसंचय करतात. असें होणे इतकें साहजिक आहे कीं तें सिद्ध करण्यास पुराव्याची जरूरी लागेल असें आम्हांस दिसत नाही. पण सरकारी नोकरी संबंधाने ही महत्त्वाची बाजू कांही स्वार्थसाधू लोक विसरतात.

राष्ट्रीयदृष्ट्या देशाचा कारभार एका जातीच्या हातीं जाणें अनिष्ट आहे असें आमचें मत आहे. मग ती जात ब्राह्मण असो, मराठा असो, किंवा मुसलमान असो. सरकार निःपक्षपाती व्हावें हें जर इष्ट असेल तर त्याला एकच उपाय आहे व तो हाच कीं, सरकारी नोकरींत सर्व जातींचे मिश्रण असावें. तसें झाल्यानें एकाचा शह दुसऱ्याला बसून कोणीच अधिकारी पक्षपात करण्यास प्रवृत्त होणार नाहीं. या दृष्टींने पाहातां रा. जाधव यांचा प्रवेश सरकारी नोकरींत होणें अत्यंत आवश्यक होतें तो झाला नाही हे सार्वजनिक हिताच्या दृष्टीने वाईट झालें हें कोणीही समंजस माणूस नाकबूल करणार नाही. केवळ अस्पृश्य लोकांच्या दृष्टीनें पाहातां झालेला प्रकार फार अनिष्ट झाला असें आम्हांस म्हणावें लागतें. मागासलेल्या लोकांत शिक्षणाचा प्रसार होत नाहीं अशी रड सरकारकडे कोणी गाईली असतां कांही तरी सबब सांगून आपल्या अंगावरील बाब अजिबात उडवून टाकण्यास तत्पर असलेलें सरकार नेहमी असा कोरडा उपदेश करिते कीं पांढरपेशे लोक ज्याप्रमाणें उच्च प्रतीचे शिक्षण संपादन करतात त्याप्रमाणें मागासलेल्या लोकांनीहि करावे. मागासलेल्या जातीस विशेष सवलती द्या वगैरे वगैरे वाद उत्पन्न झाला म्हणजे सांगण्यांत येतें कीं, विद्येची द्वारें सगळ्यांना खुली आहेत शिकण्याला कोणाची आडकाठी नाहीं. इतर शिकतात त्याप्रमाणें तुम्हीही शिका. पण अशाप्रकारें युक्तिवाद करणारें सरकार एक गोष्ट विसरतें असें दिसतें. जे लोक उच्चप्रतीचे शिक्षण घेतात ते केवळ ज्ञानाची आवड म्हणुन घेत नाहीत. असें जर असतें तर ब्राह्मणांच्या येथे बायकांच्या गळ्यांत मोहनमाळ असण्याच्या ऐवजी पुस्तकांचा मोठा संग्रह असता पण ब्राह्मणांच्या घरांत नाही अशी

वस्तु कोणती. असें जर आम्हांस कोणी विचारलें तर ती पुस्तक म्हणून आम्ही निर्भयपणे सांगू. यावरुन उघड आहे की, जे लोक शिक्षण घेतात तें फक्त शिक्षण म्हणजे एक धंदा आहे म्हणूनच घेतात. शिक्षणानें प्राप्त होणारा धंदा हेच त्यांच्या उच्च शिक्षणाचें मुख्य कारण आहे. शिक्षणानें धंदा प्राप्त झाला नाही तर फारच थोडे लोक उच्च शिक्षणाच्या भानगडीत पडतील यांत संशय नाही.

अस्पृश्य वर्गांत शिक्षणाचा प्रसार करावयाचा असेल तर त्यांच्यांतील पदवीधरांस वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्या खुल्या करण्यांत आल्या पाहिजेत. त्या जर पूर्वीप्रमाणेच बंद राहिल्या तर शिकून कांही उपयोग नाही असे समजून त्यांच्यात कोणी उच्च शिक्षण घेण्यास प्रवृत्त होणार नाही. आज जे कांही अस्पृश्य वर्गांतील तरुण आपल्या दारुण परिस्थितीशीं झगडा करून कॉलेजची पायरी चढले आहेत त्यांना आपणांस एक उच्च प्रतीचा धंदा हस्तगत होईल या आशेशिवाय दुसरें उत्तेजक असें कारण कांहींच नाही. रा. जाधव यांच्या प्रकरणाचा जो शेवट झाला त्यापासून त्यांचे व्यक्तिशः नुकसान झालेंच आहे. तेवढ्यावरच जर भागतें तरी बरें. परंतु आम्हांला जे भय वाटतें तें हें कीं, रा. जाधव यांच्यापाठीं वाट चालत असलेले अस्पृश्य विद्यार्थी आशेचा भंग झाल्यामुळे निराश होऊन पुढचा मार्ग आक्रमणें सोडून देतील. असें झालें तर या परिणामाचें खापर सरकारच्या माथी फोडल्याशिवाय गत्यंतर नाही. अस्पृश्यांच्या उन्नतीच्या संबंधात आमच्या इंग्रज सरकारच्या धोरणाचा आम्हास कांही थांगपत्ताच लागत नाही. नोकऱ्या मिळत नाहींत म्हणून अस्पृश्यांनीं जर ओरड केली तर त्यांना सरकारतर्फे सांगण्यांत येतें, ' की तुमच्यांत लायक इसम नाहींत. ' लायकीचा इसम हजर केला असतांना नोकरी कां दिली नाहीं, म्हणून कौन्सिलांत प्रश्न विचारला तर ' कारण सांगता येत नाही ' म्हणून उत्तर देण्यांत येतें. हा प्रकार विलक्षण नाहीं असें कोण म्हणेल ? खरें म्हटलें असतां अस्पृश्यांसारख्या दीनदुबळ्या समाजास लायकीची विशेष कसोशी न करता वरच्या दर्जावर चढविणें आमच्या मतें गैर होणार नाहीं. परंतु लायकी असतांना देखील जर त्यांना वरच्या दर्जाच्या जागां सरकार देत नाही तर अर्थात् अस्पृश्य वर्गाची उन्नती हें सरकारचे ध्येय नाहीं असेंच म्हणावे लागते. रा. जाधवांना जागा न देण्याचें खरें कारण सरकारनें जर सांगितलें असतें तर सरकारचें अस्पृश्यांसंबंधीचें धोरण काय आहे याचा उलगडा तरी झाला असता. सरकारदरबारी अस्पृश्यता पाळली जाणार नाहीं असे सांगणाऱ्या सरकारच्या वचनावर आमचा आजवर भरंवसा होता. पण तो अस्थानी आहे असें आम्हांस आता वाटूं लागलें आहे. रा. जाधवांना जागा देण्यांत आली नाही याचें कारण ते अस्पृश्य आहेत हेंच असावें असें आमचें ठाम मत आहे. कारण या

न्यूनतेशिवाय रा. जाधव यांच्या बाबतींत दुसरें कांहीच न्यून्य नव्हतें. अशा या दुटप्पी व दुहेरी वर्तनावरून एकच गोष्ट सिद्ध होते. ती ही कीं, सरकार जें बोलून दाखवितें तें त्याच्या मनांत नसतें. सरकारची अस्पृश्यांविषयींची सहानुभूति वरिष्ठ हिंदूंच्या सहानुभूतिप्रमाणे केवळ शाब्दिक आहे. तिच्यावर विसंबून राहिल्यानें अस्पृश्यवर्गाची केव्हांही फसगत होणार. पण या फसगतीचा शेवटी एकच परिणाम होणार आहे कीं, अस्पृश्य समाजांत सरकारविषयीं जी थोडी बहुत राजनिष्ठा आहे ती अजिबात लयास जाईल. थोडी बहुत म्हणण्याचे कारण असें कीं, गेल्या लढाईच्या घनघोर प्रसंगांत उभारली गेलेली अस्पृश्यांची १११ वी पलटण अगदीं बेदरकारपणे लढाई बंद झाल्यानंतर मोडून टाकण्यांत आल्यामुळें इंग्रज सरकारसंबंधी अस्पृश्य समाजांत नांदत असलेली राजनिष्ठा बऱ्याच अंशीं कमी झालीं आहे. रा. जाधव यांच्या बाबतींत झालेल्या अन्यायानें ती याहीपेक्षां घटणार आहे. अस्पृश्यांची हेळसांड सरकारने केल्यामुळें त्यांचें नुकसान होत आहे याची जरी इंग्रज सरकारला कळकळ वाटली नाहींतरी अस्पृश्यांत त्यामुळें वाढत असणारी अप्रीति सरकारला बाधल्याखेरीज राहणार नाहीं, असा इशारा वेळींच देणें आम्हांस अगत्याचें दिसतें. सरकारचा हा कांही चढता काळ नव्हे. पडत्या काळांत कोणचाच आधार नसतांना अस्पृश्यांच्या आधारावर आणखी कांही दिवस तरी इंग्रजसरकारला काढता येतील हें त्यांनीं विसरू नये.

सरकारी नोकरींत अस्पृश्य वर्गाचा प्रवेश होणें किती अवघड आहे हें रा. जाधव यांच्या प्रकरणावरून उघड होत आहेंच. पण यदाकदाचित शिरकाव झालाच तर त्यांना किती अन्यायानें वागविण्यात येतें याचे नुकतेंच एक उदाहरण बेळगाव जिल्ह्यांत घडून आलें आहे. रा. घटकांबळे हे अस्पृश्यवर्गापैकीं मॅट्रीकची परीक्षा पास झालेले पहिलेच गृहस्थ होत. परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनी रेव्हिन्युखात्यांत नोकरी मिळविली. पंधरा वर्षे सतत नोकरी केल्यानंतर मि. मौडन्टफर्ड कमीशनर दक्षिण भाग यांनीं रा. घटकांबळे यांची हुशारी पाहून एका शेडूल्ड पोस्ट (वरिष्ठ दर्जाची जागा) वर त्यांची नेमणूक करावी असा हुकूम केला. त्याप्रमाणें १९२६ च्या आक्टोबरच्या सुमारास रा. घटकांबळे यांना तिसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटच्या जागेवर नेमण्यांत आलें. या नवीन जागेवर कायम होण्यास " क्वालीफाईंग टेस्ट " नावाची एक परीक्षा पास व्हावी लागते व ही परीक्षा पास होण्यास नेमलेल्या अधिकाऱ्यास दोन वर्षांचा अवधि दिला जातो. परंतु रा. घटकांबळे यांना नेमून सहा महिने झाले नाहीत तोंच त्यांनी आपल्या जुन्या जागेवर जावें असा हुकूम कलेक्टरकरवी करण्यात

आला. रा. घटकांबळे यांच्या हातून नवीन जागेचे काम योग्य रीतीनें पार पाडले नाही, सबब त्यांना त्या जागेवरून खाली करण्यांत आलें असेंही म्हणणें शक्य नाही. मॅजिस्ट्रेट या नात्यानें त्यांनी जें काम केले आहे तें इतकें वाखाणण्यासारखे होतें की, आम्ही विचारपूस न करता आमच्याकडे रा. घटकांबळे यांच्या कोर्टांत केसेस चालवून अनुभव घेतलेल्या एका एल्. एल्. बी. झालेल्या उच्चवर्णाच्या वकील गृहस्थानें प्रशंसापर पत्र पाठविलें आहे. आम्हास असेंही समजतें कीं, रा. घटकांबळे यांनी मॅजिस्ट्रेट या नात्यानें जे निवाडे दिले त्यांपैकी एकांतही अपील कोर्टाने रद्दबदल केला नाही. या दोन्ही गोष्टी रा. घटकांबळे यांच्या लायकीची बिनचूक साक्ष पटविणाऱ्यांपैकी आहेत. असें असतांना रा. घटकांबळे यांस मध्येंच जुन्या जागेवर परत जाण्याचा हुकूम व्हावा हा क्षोभकारक प्रकार नव्हे काय ? रा. घटकांबळे व त्यांच्या ऐवजी ज्यांची नेमणूक झाली आहे ते गृहस्थ ह्या दोहोंमध्ये जो एक फरक आहे तो एवढाच क़ीं, या नवीन गृहस्थांची " क्वालीफाईंग टेस्ट " नांवाची परीक्षा पास झाली आहे. व रा. घटकांबळे यांची पास व्हावयाची आहे. परंतु हा फरक रा. घटकांबळे यांना आजतरी बाधक होणें शक्य नाही. दोन वर्षे पूरी होऊन जर रा. घटकांबळे परीक्षा पास झाले नसते, तर त्यांना त्या जागेवर ठेवावें की न ठेवावे हा प्रश्न उपस्थित होऊ शकला असता. पण नेमलेल्या तारखेपासून दोन वर्षे पावेंतो नुसत्या परीक्षेच्या सबबीवर कोणासही त्यांना दिलेल्या जागेवरून हालवितां येणें अशक्य आहे. कारण नियमाप्रमाणें शेडूल्ड पोस्टवर नेमलेल्या नोकरास परीक्षा पास होण्यास दोन वर्षांचा अवसर दिला जातो हें वर सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें रा. घटकांबळे यास आणखी दीडवर्ष तरी राहू द्यावयास पाहिजे होते. हा नियम इतका उघड असतांना इतका अंधार कसा चालतो याचेंच आम्हांस नवल वाटतें. ही कोणातरी कारकुनाची कारवाई आहे यांत शंका नाही. पण ही कारवाई जिल्ह्याचे अधिकारी कलेक्टर बहादूर यांनी कशी चालवूं दिली याचाच आम्हांस मोठा विस्मय वाटतो. नेटिव्ह कामगार लोक अशाप्रकारे अन्याय करण्यास मागेपुढें पाहात नाहींत म्हणून तर त्यांच्यावर इंग्रज अधिकारी असावेत असे प्रतिपादण्यांत येतें. खरें म्हटलें असतां इंग्रज अधिकारी म्हणजे केवढी मोठी खर्चाची धोंड ! त्यांच्या बेसुमार पगाराच्या ओझ्याखाली हा देश आणि त्यातल्या त्यात हा इलाखा अगदी दडपून गेला आहे. पण आमच्यात त्राण नसतांना आम्ही या ओझ्याला मान दिली आहे ती केवळ आमच्यातील कुटील लोकांच्या अनीतीच्या कारभारापासून आमचा बचाव व्हावा म्हणून. पण जेव्हा हे इंग्रज अधिकारी डोळे मिटून कारकूनाच्या समजावणीवर अवलंबून वाटेल तशा सह्या करतात, तेव्हां या सहीबहाद्दरांचा त्यांच्या पगाराच्या मानानें कांही उपयोग होतो का नाही याचा

आम्हास विचार पडतो. असाच अनुभव जर आम्हांला येऊं लागला तर इंग्रजी अधिकाऱ्यांची छाटाछाट करून हिंदीकरणाची मागणी करणारांतर्फेच आम्हांस मत द्यावे लागेल. त्याने निदान आमचा त्रास वाचला नाहीं तरी अनाठायी होणारा खर्च तरी वाचेल. हिंदीकरणाच्या विरुद्ध जरी आम्ही नाहीं तरी सर्वच युरोपीयन अधिकाऱ्यांऐवजी सर्वच हिंदी अधिकारी नेमण्यास अजून बराच काळ लोटला पाहिजे अशी आमची समजूत आहे. पण इंग्रज अधिकारी डोळेझाक करून हाताखालच्या लोकांकडून होणाऱ्या अन्यायास प्रतिबंध करणार नाहींत तर हा हिंदीकरणाचा काळ लांबणीवर टाकण्यांत काय हंशील आहे असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. तो लांबणीवर टाकण्यांत यावा असें जर इंग्रज अधिकाऱ्यांना वाटत असेल तर त्याला एकच उपाय आहे. व तो हा की, इंग्रज अधिकाऱ्यांनीं नुसत्या सह्या करण्याची संवय सोडून देऊन आपल्या कामांत दक्षता ठेवावी. म्हणून आम्हीं या प्रसंगी बेळगांव जिल्ह्याच्या कलेक्टरच्या वरच्या दर्जाच्या इंग्रज अधिकाऱ्यांस असा इशारा देतों कीं, कलेक्टरनें जरी डोळे मिटले आहेत तरी आपले डोळे उघडून रा. घटकांबळे यांना न्याय द्यावा. यांत त्यांचेंच कल्याण आहे.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २२ एप्रिल १९२७.

# २२

# आपल्या लोकांचे हित अस्पृश्यांच्या प्रतिनिधीनें विसरता कामा नये.

नवीन सुधारणेचा कायदा अंमलात आल्यानें या देशांत प्रजासत्ताक राज्यपद्धतीस सुरवात झाली असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. ही नूतन राज्यपद्धति पायाशुद्ध असावी म्हणून, या देशांतील प्रजेचे जे अनेक वर्ग आहेत त्या वर्गाचे प्रतिनिधि कशारीतीने व कोणत्या प्रमाणांत घ्यावेत यासंबंधाने बरीच वाटाघाट झाली. शेवटी कांही वर्गाचे प्रतिनिधि नेमणुकीनें, तर कांहीचे निवडणुकीने घेण्यांत आले. त्यांत अस्पृश्य वर्गाचे प्रतिनिधि नेमणुकीनें घेण्याचे ठरले. खरे म्हटले असतां अस्पृश्यांचे प्रतिनिधि सुद्धां निवडणुकीनेंच घ्यावयास पाहिजे होते ; पण तसें जरी कांहीं कारणांमुळे करतां आले नाही, तरी त्यांचे प्रतिनिधि त्यांच्या संख्येच्या व त्यांच्या परिस्थितीच्या प्रमाणांत घ्यावयास पाहिजे होते. पण दोन्ही बाबतींत त्यांची त्यांच्याविषयी कळकळ बाळगणाऱ्या सरकारने निराशा केली. प्रांतिक कौन्सिलांत जेमतेम एक एक दोन दोन प्रतिनिधि घेण्याची व्यवस्था केली होती. केंद्रीय असेंब्लीमध्यें त्यांचे प्रतिनिधि घेण्याची कांहींच व्यवस्था करण्यांत आली नव्हती व असेंब्लीच्या पहिल्या सहा वर्षाच्या कारकीर्दीत अस्पृश्यांचा एकही प्रतिनिधि नव्हता, असेंब्लींत अस्पृश्यांच्या हिताहिताचे प्रश्न उपस्थित होत नाहींत असें नाहीं. पण सरकारला अस्पृश्यांच्या मागणीची कोठे किंमत वाटते आहे ! किंमत जर वाटती तर संख्येने मुसलमान समाजाइतका व बलाने सर्वापेक्षा हतबल अशा समाजाला अगदी म्हणून अगदींच उघड्यावर कसा टाकला असता ? परंतु एकदाची आमच्या कनवाळू सरकारची आमच्या गरीब अस्पृश्य समाजावर कृपादृष्टि झाली व असेंब्लींत एक जागा अस्पृश्यांस चालू सालापासून देण्यांत आली.

ह्या बहुमानाच्या जागेवर मद्रास येथील अस्पृश्यवर्गाचे पुढारी रा. ब. एम. सी. राजा यांची नेमणूक करण्यांत आली आहे. याबद्दल मि. राजा यांचें आम्ही मन:पूर्वक अभिनंदन करितों. पण मि. राजा यांनी असेंब्लींत बजेटवर बोलतांना आपली नेमणूक केल्याबद्दल अस्पृश्यवर्गातर्फे सरकारचे आभार मानले याचें कारण मात्र आम्हांस कळत नाही. मि. राजा यांच्या अल्पसंतुष्टपणाची आम्हांस कीव येते. असेंब्लीत एकंदर १४४ सभासद आहेत त्यापैकी अस्पृश्यांना एक देऊन

सरकारने मोठें थोरलें औदार्य दाखविलें आहे असें आम्हांस वाटत नाही. उलट मुसलमान लोकांच्या प्रतिनिधिशी तुलना करता आम्हांस सरकारनें कांहींच दिलें नाहीं याबद्दल कोणाही अस्पृश्यास खेद वाटल्यावांचून राहाणार नाहीं. आमचे प्रतिनिधि आमचे न्याय्य हक्क बुडविल्याबद्दल जळफळण्या ऐवजी त्यांचा व्यक्तीशः झालेल्या अभ्युदयाबद्दल सरकारचे आभार मानण्यांतच जर गर्क होऊन जातील तर त्यांच्या हातून आमच्यावर होत असलेल्या अन्यायाची दाद कशी लागणार ? सरकारनें आम्हाला नेमलें, सरकारला आम्ही विरोध कसा करावा, अशा भावनेनें ग्रासलेल्या प्रतिनिधींना सरकार देईल त्यापेक्षां जास्त कांहीच मागतां येणार नाहीं, खरें म्हटलें असतां इतर वर्गांच्या प्रतिनिधींपेक्षा आम्हांलाच विशेष जोरानें सरकार जवळ भांडले पाहिजें. कारण सरकारच्या प्रतिगामी धोरणामुळे जितकें अस्पृश्यांचें नुकसान होतें तितकें कोणाचेंच होत नाही. ही गोष्ट आमच्या प्रतिनिधींच्या ध्यानांत येऊं नये ही मोठी खेदाची गोष्ट आहे. आपण सरकारची मर्जी संपादण्यासाठी कौन्सिलांत गेलो नाहींत, तर आपल्या लोकांचें हित करण्यासाठीं आपण गेलों आहोंत हें कोणाही प्रतिनिधीनें आणि विशेषतः अस्पृश्यांच्या प्रतिनिधीनें विसरता कामा नये. असा कणखरपणा अंगी येण्यास कौन्सिलांतील नेमणुक म्हणजे सरकारची मेहेरबानी नव्हे, तो आमचा हक्क आहे अशी दरेक प्रतिनिधीला जाणीव झाली पाहिजे. तशी जाणीव मि. राजा यांस नसावी असें दिसते. नाहीतर मि. राजा यांनी सरकारचे आभार मानण्याऐवजी अस्पृश्यांना पुरेसे प्रतिनिधि न देऊन त्यांच्या न्याय्य हक्कांकडे दुर्लक्ष केल्याबद्दल सरकारला दोष दिला असता.

एवढ्यावरून केवळ आम्हीं मि. राजा यांच्यावर टीका करण्यास सिद्ध झालों आहोंत असें कोणी मानूं नये. टीका करण्याचें कारण असें कीं, मि. राजा यांची कृतज्ञता इतक्या थराला गेली आहे कीं, सरकार फर्मावील तसें करावयाला हे तत्पर असलेले दिसतात मग त्यांत त्यांच्या जातभाईचें हित आहे किंवा नाहीं हें शोधून पाहाण्यास देखील ते थांबत नाहीत. आम्हांला आश्चर्य वाटतें कीं, मि. राजा यांनीं मिठावरील जकात १० आण्या ऐवजी १/४ रु. करावी या ठरावास असेंब्लींत अनुकूल मत दिलें. श्रीमंत लोक कराचा प्रश्न आला कीं, आपल्या वरचे ओझे गरीब लोकांवर टाकून मोकळे होतात असा नेहमीचाच अनुभव आहें. आणि सरकारही निदान हल्लीच्याकाळी श्रीमंत लोकांच्या अनुरोधानें चालतें कारण श्रीमंत लोकांना जराशी आंच लागली कीं ते सरकार भोंवती गिल्ला करावयाला सुरवात करतात. म्हणून श्रीमंत लोक व सरकार होता होईल तो कराचा बोजा गरिबांच्या माथीं मारतात. ही आपत्ती टळावी म्हणून तर गरिबांचे

कैवारी कायदे कौन्सिलात असावेत म्हणून जोराची मागणी करण्यांत येते. परंतु जर कायदे कौन्सिलांत पाठविलेलें प्रतिनिधि आपल्या कर्तव्यापेक्षा कृतज्ञतेलाच विशेष महत्व देऊं लागले तर त्यांचा गरीब जनतेला काय उपयोग ? कृतज्ञता हा मोठा गुण आहे हे आम्ही कबूल करतों. पण गुणाची वाढ मर्यादेच्या बाहेर गेली म्हणजे तो अवगुण ठरतो. त्याच न्यायानें कृतज्ञतेला सीमा असलीच पाहिजे. जर कां कृतज्ञतेसाठी देशभक्त देशाचें स्वातंत्र्य हरण करण्यास सिद्ध होणार नाहीं, किंवा एखादी पतिव्रता आपल्या पातिव्रत्याचा भंग होऊं देण्यास तयार होणार नाहीं मग कौन्सिलांतील प्रतिनिधीनेंच कृतज्ञतेच्या पायी आपल्या प्रजेच्या हिताची आहुती कां द्यावी ? बरें, मि. राजा यांनी सरकारच्या विरूद्ध मत दिलें असतें तर त्यापासून सरकारचा कांही तोटा नव्हता. मिठावरचा कर १० आणे ठरला असता तरी सरकारला खर्चाला कांही तूट पडत नव्हती. असें असतांना जर मि. राजा गरिबांवरील करांचा बोजा सरकारला कमी करावयास लावण्याचें धैर्य दाखवित नाहीत तर दुसऱ्या कोणत्या प्रसंगी ते दाखवितील म्हणून म्हणावें ? एकाच प्रसगांवरून आम्ही त्यांची पारख करूं इच्छित नाही पण अशा वर्तनानें ते आमची निराशा करतील असें भय वाटल्यावरून वेळींच इशारा देत आहोंत.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २२ एप्रिल १९२७.

# २३
# महाड येथील धर्मसंगर
# व
# वरिष्ठ हिंदूंची जबाबदारी.

कुलाबा जिल्हा बहिष्कृत परिषदेचें अधिवेशन संपल्यानंतर महाड येथील ब्राह्मण्यग्रस्त हिंदू गावगुंडांनी केलेल्या दंग्याची हकीकत आम्ही ' बहिष्कृत भारता ' च्या मागल्या अंकीं दिली होती. महाड म्युनिसिपालिटीनें सार्वजनिक ठरविलेल्या चवदार तळ्यावर पाणी भरल्यामुळे मारहाण झाली ही बाब केवळ पाण्याची सोय या दृष्टीने शुल्लक आहे, असे कदाचित म्हणतां येईल, व ' भालाकारा ' प्रमाणे ती नळ लावून अगर अन्य प्रकारचे सोंवळे उपाय योजून मिटवितां येईल. पण दुसऱ्या दृष्टीनें ही बाब शुल्लक नसून अत्यंत महत्वाची आहे. कारण एका मोठ्या प्रश्नाशीं तिचा संबंध पोहोंचतो. अस्पृश्य लोक पाणी घेण्याकरितां चवदार तळ्यावर गेले म्हणून मारामारी झाली असें म्हटल्यानें घडलेल्या प्रकाराचें खरें स्वरुप उघड होत नाही. झालेल्या प्रकाराचें खरें स्वरुप अगदी निराळें आहे. त्यास दंगा म्हणण्यापेक्षां धर्मसंगर म्हणणे जास्त यथार्थ होईल असें आमचें मत आहे. कारण हिंदुसमाजाचे घटक व हिंदुधर्माचे अनुयायी या नात्यानें, इतर हिंदु जातींच्या मानाने आपण सारख्या योग्यतेचे अधिकारी असून, आपले हक्क सारखें आहेत किंवा नाहींत, हें ठरविण्या विषयीचा प्रश्न या पाणी-प्रकरणाच्या मुळाशीं होता हें खास. या प्रश्नास महाड येथील वरिष्ठ हिंदूंनी धिंगाणा करुन नकारार्थी उत्तर दिलें हें आतां जगजाहीर झालें आहे. वरिष्ठ हिंदूंच्या या दुष्ट वर्तनाचा आम्हांस तरी मोठा अचंबा वाटतो. इतर देशांत अशा प्रकारचे धर्मसंग्राम झाले नाहींत असें नाही. परंतु ते सर्व विचारभेदामुळे झाले होते. या देशांत वैदिकधर्मानुयायी व बौद्धधर्मानुयायी, तसेंच युरोपांत हीदन व खिस्ती, खिस्ती व महंमदी यांच्यामध्ये जी धर्मयुद्धें वेळोवेळी झाली, त्यांना उभय धर्मातील विचारभेदच कारणीभूत झाला होता. परंतु, महाड येथील धर्मसंगर हिंदुधर्माच्या तत्वाविषयीं मतभेद उत्पन्न झाल्यामुळें झाला, असें म्हणता येणें शक्य नाहीं. महाड येथील धर्मसंगरांत उभयपक्षाचे लोक धर्म सांप्रदायाच्या दृष्टीने एकच होत हें निर्विवाद आहे. असें असतांना कांही धर्मबंधूंनी आपल्या दुसऱ्या धर्मबंधूस ' तुम्ही सामाजिकदृष्ट्या आमच्या खालचे आहांत ' ' तुमच्या संसर्गानें आमचा अधःपात होईल ' हें सिद्ध करण्यास दंडेली

करावी, हें पाहून कोणाही परकीय माणसास विस्मय वाटेल याबद्दल शंका नाही. पाश्चिमात्य राष्ट्रांत सामाजिक समतेस केव्हांच अधिष्ठान प्राप्त झालेलें आहे. मी इतरांच्या बरोबरीचा तर आहेच, पण त्यापेक्षा लाख दरजे बेहत्तर आहे, अशी दरेकाची भावना असते. कोण कोणाच्या वरचा नाही, व कोण कोणाच्या खालचा नाहीं, अशा समबुद्धीनें सामाजिक व्यवहारांत दरेक व्यक्तीची नांदणूक असते. मतदानाच्या हक्कांच्या विस्तृततेमुळें राजकीय समताही स्थापन करण्यात आली आहे. तेणेंकरून कोणी कोणावर राज्य करतो ही भावना नष्ट होऊन तिच्या ऐवजी आपण करू तसें राज्य ही भावना अधिष्ठित झालेली दृष्टीस पडते. इतकेंच नव्हे तर सामाजिकदृष्ट्या व राजकीयदृष्ट्या एक दुसऱ्याच्या समान असतां आर्थिकदृष्ट्या एक दुसऱ्याच्या असमान कां असावा, अशा वादास तेथें सुरवात होवून सामाजिक व राजकीय समानतेच्या पाठोपाठ आर्थिक समानता प्रस्थापित होण्याची सुचिन्हें तेथें दिसूं लागली आहेत. खरें म्हटलें असतां, खिस्ती किंवा मुसलमानी धर्मशास्त्रें हें समानतेच्या तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्यापैकीं नव्हत. त्यांच्या तत्त्वज्ञानाची मर्यादा अगदी आकुंचित आहे. सारीं माणसे ईश्वराची लेकरे आहेत व परमेश्वराच्या दृष्टीला ती समसमान आहेत एवढेंच काय तें त्यांचें सांगणें आहे. माणसें ही आपापसांत एकमेकांच्या दृष्टीने समसमान आहेत इतकें प्रतिपादण्यापर्यंत त्यांची मजल गेलेली नाही.

## हिंदु धर्माचा सिद्धांत

खिस्ती व महंमदी धर्माच्या सिद्धांतापेक्षा कितीतरी पटीनें समतेच्या तत्त्वाला पोषक आहे. माणसे ईश्वराची लेंकरें आहेत एवढ्यावरच न थांबतां ती ईश्वरांचीच रुपें आहेत असें मोठ्या निर्भीडपणे हिंदुधर्म सांगत आहे.† जेथें सारींच ईश्वराची रुपें आहेत तेथें कोणी उच्च कोणी नीच असा भेदभाव करणें शक्य नाहीं, हें त्या धर्मांचे एक महान ओजस्वी तत्त्व आहे हें कोणासही नाकबूल करतां यावयाचें नाही. समानतेचें साम्राज्य स्थापन होण्यास यापेक्षां दुसरा मोठा आधार सांपडणे कठीण दिसतें. असें असतांना जी सामाजिक समता खिस्ती व महंमदी राष्ट्रांतून दिसून येते तिचा हिंदु समाजांत कोठे मागमूसही नसावा, व ती प्रस्थापित होण्याचे पवित्र प्रयत्न चालू असतां हिंदुधर्मीय म्हणविणाऱ्या लोकांकडून अडथळा करण्यांत यावा, यावरून हिंदुधर्मीय लोकांस खऱ्या हिंदुधर्माची किती थोडी ओळख आहे हें दिसून येते.

---

†पाहा, परिशिष्ट क्रमांक–२.

एकधर्मीय लोक विधर्मी लोकांप्रमाणें एकमेकां संबंधानें अशा प्रकारें द्वैतभाव बाळगतात. याचे समर्थन करतांना हिंदुधर्माभिमानी लोक असा मुद्दा मांडतात कीं, हिंदुधर्माचीं दोन अंगे आहेत. एक तत्त्वज्ञान व दुसरें आचार. त्यापैकी तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने जरी अस्पृश्य लोक स्पृश्यांच्या समान असले तरी आचाराच्या दृष्टीने ते असमान–नव्हे–अपवित्र आहेत. म्हणून त्यांच्याशीं व्यवहार करणें, हा अधर्म होय ! रुढीर्बलीयसी असें म्हणून जर धार्मिक बाबतींत तत्त्वज्ञान झुगारून द्यावयाचें व नुसता आचार पाळावयाचा, हेंच रास्त आहे, तर राजकीय बाबतींतही तोच न्याय कां लागू नसावा ? राणीच्या जाहीरनाम्यांतील तत्त्वें अंमलात आणणें अशक्य आहे, असे जर एखाद्या कर्झनसाहेबासारख्या कट्टर साम्राज्यवाद्यानें म्हटलें असता जे लोक संतापून

## नुसतीं तत्त्वें काय चाटावयाची आहेत ?

अशी हाकाटी करून नंगा नाच नाचण्यास कमी करीत नाहींत, त्याच लोकांनी आचारात्मक धर्माला प्राधान्य देऊन वेदांत उर्फ तात्त्विक धर्म व्यवहाराला उपयोगी नाहीं असें म्हणावें हा निर्लज्जपणा नव्हे काय ? धर्माची वरीलप्रमाणें दोन अंगे आहेत हें मत जरी मान्य केलें तरी कोणत्याही धर्माचा आचारात्मक भाग त्या धर्माच्या तत्त्वज्ञांनावरच अधिष्ठित असला पाहिजे, हें विसरतां कामा नये. तसें जर नसेंल तर त्या धर्माला अंतिम ध्येय नाही असेंच म्हणावें लागेल. समाजाचा आचारात्मक धर्म जर त्या समाजाच्या विचारात्मक धर्माच्या नांगरास जखडलेला नसेल तर तो समाज होकायंत्राशिवाय समुद्रांत लोटून दिलेल्या एखाद्या जहाजाप्रमाणें कोठे वहात जाईल, व कोणत्या खडकावर आदळेल, याचा नेम नाहीं. या न्यायानें पाहांता वेदांतांत जर नीतीचे व धर्माचे सिद्धांत, सांगितलेले आहेत, व्यवहारांत जर नीतीची व धर्माची आवश्यकता असेल तर वेदांतधर्म व्यवहारोपयोगी नाहीं असें म्हणण्याऐवजी तो व्यवहारोपयोगी करण्याचे धैर्य या दुबळ्या लोकांत नाही, असेंच म्हटले पाहिजे ! आम्ही असे म्हणत नाही कीं, धर्मांतील आचार व विचार यांचा नेहमींच मिलाफ झालेला असतो. कधी कधी त्यांच्यात फारकत झालेली नजरेस येते. परंतु जेव्हां जेव्हा धर्माचे आचार त्या धर्माच्या विचारांशी विरोधी असतील तेव्हां तेव्हां धार्मिक आचारामध्यें फेरबदल करून ते धार्मिक विचारांशी सुसंगत करून घेणें अत्यंत आवश्यक आहे. खुद्द टिळकांनी एके ठिकाणी म्हटलें आहे कीं, " आचारात्मक हिंदु धर्माचे जें लक्षण वर दिलें आहे त्या खेरीज ' धारणात्धर्मः यतोऽभ्युदय निःश्रेयस-सिद्धिः स धर्मः ' अशी हिंदु धर्म शास्त्रकारांनी स्वीकारलेली धर्माची जी दुसरी तत्वे आहेत तद्नुकूल आचारात फेरफार करण्याचा हिंदू धर्मातील शिष्टांस हिंदुधर्म

शास्त्रकारांनी जो अधिकार दिलेला आहे, आणि हा अधिकार शास्त्रोक्तरीत्या बजावून स्वतःच्या उदाहरणानें परंपरागत आचारांत शिष्ट जो कांही फरक करतात तो लोकांस मान्य होऊन पुढें तो परंपरागत धर्माचाच एक भाग होत असतो. " आमच्या इकडील ब्राह्मण्यग्रस्त लोकांच्या मनाला टिळकांच्या मताचा मोठा धीर वाटतो म्हणून आम्ही टिळकांच्या नांवाचा मुद्दाम उल्लेख केला आहे. खरें ह्मटले असतां या बुद्धिवादाला कोणाचाच आधार नको. इतका तो यथार्थ आहे. तसें जर नसेल तर प्राचीन आचारांस कवटाळणें हाच धर्म होऊन बसेल ; व जे आचार श्रेयस्कर नसतील ते केव्हांच लुप्त व्हायचे नाहींत मग अस्पृश्यतेसारखे अति निंद्य व घोर रिवाज अनादिसिद्ध एवढ्याच कारणावरून अबाधित चालू राहातील. परंतु हा नवा आचारधर्म कोणी घालून द्यावयाचा ? तो शिष्ट लोकांनीं घालून द्यावयाचा आहे असें आमचे मत आहे. व तें टिळकांचेंहि होते हें वर दिलेल्या उताऱ्या वरून उघड होत आहे. तेव्हां या लोकांनीं महाडच्या प्रसंगी काय केलें, असा साहजिकच प्रश्न उद्भवतो. आम्हांस असें वाटतें कीं, तोंडानें मनुष्य ईश्वरांचे रूप आहे असें म्हणावयाचें व मनानें मात्र तो अमूक एका जातींत जन्मल्यामुळें त्यांस अपवित्र मानावयाचें हा हिंदुधर्मावर येणारा दांभिकपणाचा आरोप नाहींसा करण्यास या शिष्ट लोकांनीं प्रयत्न करावयास पाहिजे होता. अस्पृश्यांचा धिक्कार करून आपल्या उज्जल धर्माला काळिमा लावणाऱ्या पापाचरणी धर्मवेड्या लोकांच्या असल्या अधम कृत्यापासून परावर्तन करणें हें त्यांचें कर्तव्य होतें. हिंदुसमाजाची भरती अजिबात बंद झाली असून त्याला सारखी ओहोटी लागली आहे हें उघड्या डोळ्यांनीं पाहात असतां, हिंदुधर्मांत आहेत त्यांचा छळ करून लोकविग्रह करण्याचे दुष्ट प्रयत्नांस आळा घालून त्यांना न्यायानें व समतेनें वागवून लोकसंग्रह करण्याचा धडा या लोकांनी अशावेळीं घालून देणें अवश्य होतें, यास कोणी ना म्हणेल असें वाटत नाहीं. पण या शिष्ट म्हणविणाऱ्या मतिमंद लोकांनी यांपैकी एकही गोष्ट केली नाहीं. उलट, आपलें कर्तव्य बजाविण्याची वेळ आली असतांना जाणून बुजून शिंगें मोडून वासरांत शिरण्याचा नीच प्रयत्न त्यांनी केला. अस्पृश्यांनीं पाणी घेतल्यामुळें कलह करण्यावरच त्यांनी ही गोष्ट थांबविली असती तरी आम्हांस त्याचें फारसे वाईट वाटलें नसतें. आम्हाला ज्या गोष्टीचा विशेष संताप आला आहे ती या शिष्टांनीं तळ्याची शुद्धि करून प्रतिगामी धोरणांचें अवलंबन केलें. अस्पृश्य लोक निधड्या छांतीनें तळ्यावर जाऊन आपल्या देहाची पवित्रता सिद्ध करून देण्यास प्रवृत्त झालें असतां तळ्याची शुद्धी करण्यात येऊन अस्पृश्य हें अपवित्र आहेत व त्यांचा संसर्ग झाल्यानें भ्रष्टाकार होतो याचा कायमचा ठसा मारावा हाच त्यांच्या शुद्धि-समारंभाचा उद्देश होता हें उघड आहे. शुद्धि-समारंभ करणाऱ्या या पाजी लोकांनीं

## अस्पृश्य लोकांची बदनामी

केली आहे असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं ; व या बेगुमानपणें बदनामी करणाऱ्यांवर कायदेशीर इलाज कां करूं नये, असाही प्रश्न उद्‌भवतो. पण ती गोष्ट बाजूस ठेविली तरी शुद्धि करणाऱ्यांनीं एक गोष्ट सिद्ध करून दिली आहे ती हीं कीं, अस्पृश्यांनीं मुसलमान झाल्यास भ्रष्टाकाराचा प्रश्नच उरणार नाहीं. कारण मुसलमानांनीं पाणी भरले असतां भ्रष्टाकार होत नाहीं, याची साक्ष चालू वहिवाट देत आहे. या कृत्यास धर्मद्रोहाखेरीज दुसरें कोणतें नांव द्यावें हें आम्हांस सुचत नाहीं ! शुद्धि करून परधर्मांत गेलेल्यांना हिंदुधर्मांत परत आणण्याची एका हातानें खटपट करावयाची, व दुसऱ्या हातानें स्वधर्मांत असलेल्यांना चीड आणणारें वर्तन करावयाचें हें कांही शुद्धीवर असलेल्या माणसांचें लक्षण नव्हे. स्वामी श्रद्धानंद यांच्या जीवितकार्याचे हें स्मारक नसून त्या थोर पुरुषानें आरंभिलेल्या कार्याचा विचका आहे असें आम्हांस वाटतें. शुद्धि-संघटन चळवळीसंबंधीं आमचें असें मत आहे कीं, हिंदु लोकांना आजच्या काळीं शुद्धीपेक्षां संघटनेचीच विशेष जरुरी आहे. शुद्धीनें संख्याबल वाढेल हें खरें, पण आज जेथें तेथें हिंदूंना मुसलमानांपुढें हार खावी लागत आहे, याचें कारण हिंदु अल्पसंख्यांक आहेत म्हणून नव्हे. बल हें नेहमींच संख्येवर अवलंबून असतें असें नाहीं. आमच्या मतें

## खरें बल निश्चयांत आहे. समुच्चयात नाही

ज्या लोकांचा एक निश्चय झाला, मग ते अल्प संख्यांक जरी असले तरी कोणत्याहीं प्रसंगीं ते सहसा डगमगणार नाहींत. मुसलमानांचें बल तरी कशांत आहे याची चौकशी केली असतां हेंच सिद्ध होत आहे कीं, त्यांचें बल समुच्चयांत नसून ते निश्चयांत आहे. हें म्हणणे जर यथार्थ असेल तर शुद्धीपेक्षां संघटनेचीच हिंदुसमाजास विशेष जरुरी आहे, हें निर्विवाद आहे. आतां हिंदु जनतेचा एक निश्चय व्हावा असा जर संघटनेचा अंतिम हेतु असेल तर तालीम, आखाडे, इत्यादी बाह्योपचारांनीं कार्यसिद्धि व्हावयाचीं नाहीं. ज्या जातिभेदामुळें व अस्पृश्यतेमुळें हिंदुसमाजाची संघशक्ति क्षय पावली आहे, परस्परविषयक आपलेपणा नष्ट झाला आहे, एका जातीचे हितसंबंध दुसऱ्या जातींशीं विरोधी झाले आहेत, तो जातिभेद व ती अस्पृश्यता नष्ट झाल्याखेरीज एकनिश्चयात्मक बलसंवर्धनाचें कार्य घडून येणार नाहीं. पण तो जातिभेद व ती अस्पृश्यता नष्ट करण्याऐवजीं जातीजातीतील फूट व दुही कायम ठेवून संघटना करण्याऐवजी विघटना करण्यात येत आहें, हें महाड येथील घडलेल्या प्रकारावरून दिसून येत आहे.

ही हिंदुधर्मावरील आणीबाणीची वेळ असतांना या शिष्ट लोकांनीं जें निंद्य व बेजबाबदारपणाचें वर्तन केलें त्याबद्दल आम्हांस मुख्यत्वे जें लिहावयाचें आहे तें हेंच कीं, अशा प्रकारच्या होणाऱ्या

## दंग्यात विशेषतः ब्राह्मणेतर लोकच प्रामुख्याने भाग घेतात

अशी नेहमींची गत आहे. याचा अनुभव आम्हांस महाड येथें प्रत्यक्ष पाहावयास मिळाला. यांनीं महाड येथें मारामारी केलीच ; पण यांच्या जातभाईनीं गांवोगांव अस्पृश्यांचा सारखा छळ चालविलेला आहे हें आमच्याकडे येत असलेल्या बातम्यांवरून उघड होत आहे. हें लोक इतकें आडमूठे असतात कीं, मारहाण करण्यास व बायकांची विटंबना करण्यास त्यांना कांहींच वाटत नाहीं ! असमानतेचें उच्चाटण करून समानतेच्या पायावर हिंदुसमाजाची रचना करण्याकरिता अवतार घेतलेल्या ब्राह्मणेतर पक्षांत समाविष्ट असलेल्या जनतेच्या हातून असें नीच वर्तन घडावें, हें त्या पक्षाच्या उज्वल तत्त्वांना काळिमा लावणारें आहे असें आमचें स्पष्ट मत आहे. ब्राह्मणेतर पक्षासंबंधानें आमचे विचार आम्ही स्वतंत्रपणें मांडणार आहोंत. त्यावेळीं त्या पक्षाच्या जबाबदारी संबंधानें आम्हांला जें काहीं लिहावयाचें आहे तें आम्ही लिहूंच. पण महाड येथील दंग्यांत जी एक विलक्षण गोष्ट आमच्या निदर्शनास आली ती हीं कीं, खुद्द शेटजी व भटजी, गांधीटोपी व टिळकशर्ट घालून ब्राह्मण्यसंरक्षणार्थ काठ्या घेऊन पुढें आले होते. इतकेंच नव्हे तर गांवोगांवी याच लोकांनीं " आमचें तळें बाटलें, तुमच्या विहिरी सांभाळा, " असे संदेश पाठविलें व खेडोपाडीं अल्पसंख्यांक असणाऱ्या अस्पृश्यांविरुद्ध बहुसंख्यांक ब्राह्मणेतर जनतेस चिथावून दिलें ! ब्राह्मण्यसंरक्षणार्थ धांवून येणाऱ्या या शेटजी-भटजींचे त्यांच्या पराक्रमाबद्दल आम्ही अभिनंदन करतो. पण आम्हांस त्यांना एका गोष्टीची आठवण करून देणें भाग पडत आहे. ब्राह्मणेतर जातींत समाविष्ट झालेल्या जाती या हल्लीच्या काळीं तर. माकडाप्रमाणें निर्बुद्ध आहेत.

## माकडाच्या हाती कोलीत

दिल्यापासून आत्मघात होणार आहे, हें या शेटजीं-भटजींनीं पक्कें लक्षांत ठेवावें ! याच ब्राह्मणेतर जनतेनें एके काळीं घाटावरील शेटजींची नाकें कापून त्यांच्या घरादारांची राखरांगोळी केली आहे हें इतिहासप्रसिद्ध आहे. जो प्रकार घाटावर घडला तोच घांटाखालीं घडणार नाहीं, हें कोण सांगू शकेल ? जें लोक आज आपल्या हातांतील दांडे म्हणून वागत आहेत तेच उद्यां आपले काळ होतील, हें त्यांनी खूप ध्यानांत ठेवावे. नुकतेच एक वृत्त प्रसिद्ध

झाले आहे. तारीख २९-३-२७ च्या ' केसरी ' च्या अंकांत या माकडांनी आपल्या हातचें कोलींत ब्राह्मणांच्या घरांवर कसे फिरविलें याची हकीकत देऊन केसरीनें ' प्रासंगिक बोल ' या आपल्या सदराखाली आपले विचार प्रगट केले आहेत. खालील उतारा त्यांतून घेतला आहे.

७. सत्यशोधक समाजाचे † पुढारी समतेची मोठमोठी तत्वें बोलतात, पण खेड्यांपाड्यांतून सत्यशोधकी मताचें वारें शिरल्याबरोबर तेथील वातावरण जातिद्वेषानें भरून जातें, व ब्राह्मणांचं जीवित असह्य होतें. सत्यशोधकी लेखकांच्या जिभेवर बुद्ध, ख्रिस्त, गांधी इत्यादी थोर व्यक्तींचीं नांवें खेळत असतात. पण गांवोगांवी चाललेल्या द्वेषमूलक व अत्याचारी वृत्तीच्या सत्यशोधकांचा निषेध किंवा त्यांच्या दुष्कृत्यांस आळा घालण्याचा यत्किंचितही प्रयत्न हे पुढारी किंवा लेखक करीत नाहींत. यामुळे सत्यशोधक म्हणजे जातिद्वेष पसरवून अत्याचारी वृत्तीचा प्रसार करणारे असा अर्थ समाजात रूढ झाला आहे. खेडेगांवांतील सत्यशोधकांच्या उपद्रवासंबंधी दर आठवड्यास आमचेकडे तक्रारी येत असतात. त्यांत बहुतेक बाहेरून येणारा ब्राह्मणेतर शाळामास्तर हा सर्व उपद्रवास प्रेरक झालेला असतो. हा शाळामास्तर आल्यापासून एकदोन वर्षाचे आंतच गांवांत असलेल्या शांततेचे व सलोख्याचे वातावरण बिघडवून टाकतो आणि समतेच्या उच्च तत्त्वाचे ऐवजीं अत्याचारी जातीद्वेषाचें भूत गांवांत मनसोक्त थैमान करूं लागतें !

८. मासल्याकरिता या अनेक हकीकती पैकी एक हकीकत देतो. " × × गांवांत लोकसंख्या सुमारें १,००० आहे. पैकीं ३० ब्राह्मण, २०० मराठे व बाकीचे धनगर, महार वगैरे. या गांवांत सत्यसमाजाचें वारें दोन वर्षापासून खेळूं लागलें आहे. ते इतके दिवस धुमसत होतें, पण आतां त्यानें पेट घेतला आहे. सत्यसमाजिस्ट पुढारी हा तेथील शाळामास्तर आहे. गांवांतील पुष्कळसे अशिक्षित लोक त्या मास्तराच्या सांगण्याप्रमाणें वागतात. " माझी हीच शेतकऱ्यांस विनंती ! सोडा भटाची संगती " असली ब्रह्मद्वेषी गाणी मुलांच्या हाती देण्यांत येतात. ब्राह्मण, मारवाडी लोकांच्या बायकांस घराबाहेर पडणें कठिण झालें आहे. तर एखादी बाई बाहेर दिसली तर तिला मुलांकडून खडे मारवितात व ही हकीकत वर्तमान पत्रात अगर अधिकाऱ्यांस कळविण्याचा ब्राह्मणांनी प्रयत्न केल्यास गंजी जाळणें, रस्त्यांत मारहाण करणें, इत्यादी अत्याचारी प्रकार सुरू होतात. ब्राह्मणांच्या बाजूस असणाऱ्या एका मुसलमान मास्तरास ठार मारण्याच्या धमक्या देण्यांत आल्या व प्रत्यक्ष मारहाण करण्यांत

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ३.

आली. " असल्या हकीकती नांव-गांव देऊन प्रसिद्ध केल्यास अल्पसंख्य ब्राह्मणास अधिकच त्रास होण्याचा संभव असल्यामुळें वरील पत्रांतून नांव-गांव गाळलें आहे.

९. सत्यशोधक पुढारी व त्यांच्या शाब्दिक समतेच्या वाक्पाटवास भाळलेले काही अननुभवी ध्येयवादी यांचेपुढें या गोष्टी मांडूनही ते त्याबद्दल फारसा विचार करीत नाहीत, तेव्हां ब्राह्मण समाजानें या गोष्टींचा विचार करून कांही तरी धोरण निश्चित केले पाहिजे. काही खेड्यांतील ब्राह्मण लोक खेडी सोडून जातात. तर कांही या जाचांत कसेबसे दिवस कंठींत असतात. अकोल्यास भरणाऱ्या बृहन्महाराष्ट्र ब्राह्मण परिषदेनें या प्रश्नाचा विचार करणें जरूर आहे. या कामासंबंधानें एखादें मध्यवर्ती मंडळ नेमून त्यांनें सर्व ठिकाणच्या तक्रारी संबंधीचीं माहिती गोळा करावी व ती वारंवार सरकारच्या व लोकांच्या नजरेस आणावी. आणि वरिष्ठ अधिकारी चौकशी करण्यास तयार असतील तर त्यांस व्यक्तींची नांवें कळवावी. सरकारकडे केलेल्या तक्रारींचा फारसा उपयोग होत नाही हें आजपर्यंत दिसून आले आहे.

## सैतानाचे तोंडचे हे वेद

ऐकून कोणास आश्चर्य वाटणार नाही ? ज्यांना न्यायानें वागण्याची बुद्धि सुचत नाही त्यांच्यावर अन्याय झाला तर कोणाला सहानुभूति वाटणार आहे ? सर्पाचें डोकें ठेचलें तर त्याच्याबद्दल शोक कोणीं करावा ? वास्तविक पाहांता खेडोपाडी अस्पृश्य लोकही अल्पसंख्यांक आहेत ; व त्यांच्यावरही ब्राह्मणेतर जनतेकडून जोरजुलूम करण्यांत येतो. समदु:खी म्हणून ब्राह्मणांवर होत असलेल्या अत्याचारांबद्दल त्यांना वाईट वाटावयास पाहिजे ; पण आज त्यांना तसें वाटणें, शक्य नाही. जो त्यांच्यावर प्रसंग आल्यास त्यांस सहाय्य करील त्यावर प्रसंग गुदरला असतां ते त्यास सहाय्य करतील हें उघड आहे. पण या भटजींना आपल्या भीषण भविष्यकाळाची पूर्ण जाणीव कोठें झाली आहे ? तशी जाणीव झाली असती तर त्यांनी अस्पृश्यांशी अशा प्रकारचें वर्तन केलें असतें, असें मुळींच संभवत नाही. पण हा प्रश्न त्यांच्याच तरणोपायाचा असून तो त्यांनी सोडवावयाचा आहे. आम्हांला त्यांना एवढेंच सांगावयाचें आहे की, आजवर महात्मा गांधी प्रमाणे अस्पृश्यता हा हिंदुधर्मावरील मोठा कलंक आहे. असें आम्ही मानीत होतों ; पण आतां आमची दृष्टि फिरली आहे ; व तो आमच्या नरदेहावरील कलंक आहे असें आम्ही समजतों. हा हिंदुधर्मावरील कलंक आहे असें जोंपर्यंत आम्ही मानीत होतों तोंपर्यंत तो काढून टाकण्यांचे कार्य आम्हीं तुमच्यावर सोंपविलें होतें हा आमच्यावरील कलंक आहे अशी आमची

जाणीव झाल्यामुळें तो धुऊन काढण्यांचे पवित्र कार्य आता आमचें आम्हींच स्वीकारलें आहे. या कार्याच्या सिद्धिप्रीत्यर्थ आमच्यांपैकीं कांही जणांना आत्मयज्ञ करावा लागला तरी आम्ही मागेंपुढें पाहणार नाहीं. तुम्ही तळें शुद्ध करून आमची अपवित्रता सिद्ध करण्याचा महाड येथें जो नीचतम् प्रयत्न केला तसा आणखी हवा तर करा. पण आम्ही पवित्र आहों हें तुमच्याच मुखें वदवून घेतल्याखेरीज आमची शांति होणार नाही.

## तुम्हीं हिंदुधर्माला लाविलेला कलंक आम्ही आपल्या रक्ताने धुवून टाकावा

असा जर ईश्वरी नेमानेम असेल तर आम्ही स्वतःस अत्यंत भाग्यवान समजतों. व अशा पवित्र कार्याचे दूत आपण होणार आहों या भावनेनें आम्हीं निर्भय झालों आहों ; महाड येथें मारामारी होऊन अस्पृश्यांना दुखापती झाल्या याबद्दल आम्हांस मुळींच वाईट वाटत नाहीं. केवळ मारामारी या दृष्टीने जर कशांचें वाईट वाटत असेल तर ते हेच कीं, महाड येथे जमलेल्या अस्पृश्यांनी हातची संधी दवडली. त्यांनी जर मनावर घेतले असते तर तेथें वचपा काढण्यास ही संधी नामी होती. पण आम्ही मारामारी या दृष्टीने या पाणी प्रकरणाकडे मुळीच पहात नाही. आम्ही त्यास समतेच्या तत्त्वासाठी मांडलेल्या धर्मयुद्धांतील पहिले रणकंदन आहे, असें समजतों. मध्यंतरी जयापजयाचा वांटा कोणाच्या जरी हाती गेला तरी शेवटी यश आमचेंच आहे याबद्दल आम्हांला मुळींच संशय नाही. या स्वजनोद्धारांच्या, तसेंच स्वधर्मोद्धाराच्या महत्कार्यांत यशःप्राप्ति होण्यास रक्तपात होवू नये अशी आमची उत्कट इच्छा आहे. पण नाईलाज होवून ब्राह्मणपग्रस्थ लोकांच्या दुराग्रहामुळें रक्तपाताचा प्रसंगच जर ओढवला तरी आम्हीं मागें घेणार नाहीं व त्याची जबाबदारी केंव्हांही आमच्यावर असूं शकणार नाहीं हे त्यांनीं पक्कें ध्यांनात ठेवावें.



---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. २२ एप्रिल १९२७.

# २४

# असा अध:पात होण्यापेक्षा नि:पात झालेला काय वाईट ?

महाड येथील पाणी प्रकरणाविषयीची हकीकत **बहिष्कृत भारतांत** प्रसिद्ध झाली आहे. त्याचप्रमाणें इतर वर्तमान पत्रांतूनहि प्रसिद्ध झाली आहे. **बहिष्कृत भारतांत** प्रसिद्ध झालेला मजकूर व इतर वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेला मजकूर या दोहोंमध्ये एकवाक्यता नाही हें आम्हांस कबूल आहे. परंतु या दोहोंत जो थोडाबहुत फरक दिसतो त्याचीं कारणें जाणून घेण्याऐवजी त्याचा फायदा घेऊन **बहिष्कृत भारतांत जी** हकीकत प्रसिद्ध झाली नाही ती खोटी आहे असा जो कोटिक्रम **कुलाबा समाचारांने** केला आहे तो मात्र आम्हांस कबूल नाही. **कुलाबा समाचार** आपल्या ता. १६-४-२७ च्या अंकांत म्हणतो " महाडांत मार बसलेल्या महारांची संख्या किती आहे हें कोठें प्रसिद्ध झालेलें नाही. पण . . . ' शेंकडो अस्पृश्यांना ' मार बसला व तोहि ' बेदम ' हें धादांत खोटें आहे. स्वत: डॉ. आंबेडकर हेहि आपल्या ' **बहिष्कृत भारत** ' पत्रांत तसें लिहित नाहींत. मारानंतर महार मंडळी डाक बंगल्यावर डॉ. आंबेडकरांच्या भेटीस गेली. त्यांची संख्या " अदमासें शंभर " होती व त्यांत कांहीं जखमी झालेले लोक होते. " एवढेंच ते लिहितात. " " महार लोकांचें जेवण चालूं असतां वरिष्ठ वर्गानें त्यांच्यावर हल्ला करून त्यांची दाणादाण केली व शिजलेलें अन्नहि त्यांच्या पोटांत जाऊं दिले नाही. अशा बातम्या कित्येक पत्रांतून प्रसिद्ध झाल्या आहेत, त्याहि साफ खोट्या आहेत हें बहिष्कृत भारतांतील हकीकतीवरून सिद्ध होत आहे. " आमच्या पत्रांतून प्रसिद्ध झालेल्या माहितीचा आधार देऊन इतर वर्तमानपत्रांना खोटें करण्याचा हा जो कोटीक्रम कुलाबा समाचारानें लढविला आहे तो आमच्या मतें संयुक्तिक नाही. केवळ एका पत्रांत प्रसिद्ध झालेली हकीकत दुसऱ्या पत्रांत प्रसिद्ध झालेली नाही यावरूनच ती खोटी आहे असें मानणें हें जर तर्कशास्त्रास धरून आहे, तर ज्या बातम्या आम्ही प्रसिद्ध केल्या त्या बातम्या इतरांनीं प्रसिद्ध केल्या नाहींत म्हणून त्या खोट्या आहेत असा आरोप **कुलाबा समाचारानें** आमच्यावर कां केला नाहीं याचा उलगडा आम्हांस होत नाहीं. उलट आम्हीं विरेश्वराच्या देवळांत गर्दी जमण्यास सुरुवात झाली असतांना फौजदारानें येऊन जी चौकशी केली ती हकीकत अगर ब्राह्मणेतर पुढाऱ्यांची खासगी बैठक बोलावण्यांत आल्याची हकीकत जी दिली आहे ती इतर

कोणत्याच वर्तमान पत्रांत प्रसिद्ध झालेली नसतांना ती खरी आहे असें मानून तिच्यावर मोठें थोरलें भाष्य रचण्यांत आलें आहे. पूर्वग्रहानुरुप ठरलेल्या निकालांत जुळता असेल तेवढाच भाग जबानींतून घ्यावयाचा व बाकीचा खोटा म्हणून टाकून द्यावयाचा हें खरें तर्कशास्त्र नसून शुद्ध तर्कटपणा आहे. या बाबतींत आम्हांस खुलासा करावयाचा आहे तो हा की, ज्या बातमीदारांनी " विजयी मराठा " " ज्ञानप्रकाश " व " नवाकाळ " यांत ज्या बातम्या प्रसिद्ध केल्या आहेत त्या त्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिलेल्या आहेत. कारण ते बातमीदार त्या ठिकाणीं हजर असून कांहींनी झालेल्या प्रसंगाचा अनुभव घेतला आहे हें आम्हांस पक्केपणी माहित आहे. म्हणून त्यांनी दिलेली माहिती केव्हांहि अविश्वसनीय मानतां येणार नाही. झालेल्या दंग्यांत एकाच माणसास सर्व गोष्टींचें अवलोकन करणें अशक्य आहें. कांहींनीं कांहीं गोष्टी पाहिल्या. कांहींनी दुसऱ्या पाहिल्या. यामुळेंच आमच्यांत व इतर वृत्तपत्रकारांत दिलेल्या बातम्यांत फरक झाला आहे. त्या सर्वांचें एकीकरण करून, एकसूत्री हकीकत आम्हांस छापतां आली असती हें खरें आहे. पण तसें न होण्याचें कारण असेंच कीं, महाडहून परत आल्यानंतर वरील पत्राच्या बातमीदारांची व आमची भेट होण्याचा योग आला नाही. तो जर आला असता तर त्यांनी दिलेली हकीकत आम्ही जोडून छापली असती. कसेही झाले तरी जो फरक ' कुलाबा समाचारानें ' शोधून काढला आहे त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते कीं, ज्या गोष्टीची खातरजमा झाली नाहीं अशा गोष्टी प्रसिद्ध करण्याइतके बेजबाबदार पत्र **' बहिष्कृत भारत '** नाही. याशिवाय दुसरें कांहींच सिद्ध होऊं शकत नाहीं. म्हणून जिज्ञासू वाचकांनी **कुलाबा समाचाराच्या** तर्कवितर्कास बाजूस सारून आमच्या व उपरीनिर्दिष्ट पत्रांत दिलेल्या हकीकती परस्पर विरोधी नसून एकमेकांस परिपूरक आहेत असें समजून त्यांचे ग्रहण करावें.

' कुलाबा समाचारानें ' ज्याप्रमाणें आमचा आधार घेऊन इतर वर्तमानपत्रकर्त्यांना खोटें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे, त्याप्रमाणें इतर वर्तमानसाराचा आधार घेऊन आम्हांस कांहीं बाबतींत खोटें ठरविण्याचा प्रयत्न त्यानें केला आहे. आम्हीं ' मामलेदार साहेबांनी दंगा मिटविण्याच्या कामीं तत्परता दाखविली नाही ' असें जें विधान केलें आहे त्यास अनुसरून ' कुलाबा समाचार ' म्हणतो, " डॉ. आंबेडकरांचाहि रोष मामलेदारांवर दिसतोच. पण महाडांतील पुष्कळ लोकांचें मत असे आहे कीं, ता. २० मार्च रोजी महाडच्या मामलेदार, फौजदारांनी जर माथे शांत राखले नसतें व सहाजिक, चिडलेल्या महार पुढाऱ्यांस खुष करण्यासाठी गोळीबार अथवा धरपकड केली असती तर त्या दिवशीं महाडांत

अनर्थ झाल्या खेरीज राहतांना !" मामलेदारांनी गोळीबार केला असता किंवा धरपकड केली असती तर अनर्थ झाला असतां किंवा घडलेला अनर्थ टाळला असता, याबद्दल निश्चित असें मत देणें शक्य नाही. तरी पण या मार्गाचा अवलंब केला असतां अनर्थ होऊन मुडदे पडले असते हें वांचून आम्हांस तर हसूंच येते. मुसलमान लोकांसारख्या कडव्या धाडसी निश्चयाच्या लोकांसंबंधानें असलें विधान केलें असतें तर चाललें असतें. पण हिंदुप्रमाणें गरीब गाईसारख्या भेकड लोकांनीं गोळीबार केला असता किंवा धरपकड केली असतां त्यांनी मुडदे पाडलें असतें असें म्हणणें म्हणजे कोल्ह्याचें ठायीं सिंहाचें तेज आहे असे म्हणण्यासारखें हास्यास्पद आहे. पण गोळीबार केला असतां किंवा धरपकड केली असतां काय झालें असतें हा प्रश्न नाहीं. प्रश्न आहे तो असां कीं, मामलेदारांनीं दंगा मोडण्याचें कामीं तत्परतां दाखविली कीं नाहीं ? " नाहीं " म्हणून आम्ही जें विधान केलें आहें त्यांच्या सत्यतेबद्दल आम्हांस बिलकुल संशय नाही. कारण आमच्याजवळ जो पुरावा आहे, तो अगदी आमच्यामतें तरी बावनकशी आहे. तो सरकार दरबारी आम्ही सादर केला आहे. तो प्रसिद्ध करण्यास मामलेदार साहेबांची कांही हरकत नाही असे आम्हांस कळल्यास आम्ही तो जगजाहीर करूं . आरसा आहे. नाक असेल त्यांनी तोंड पाहून घ्यावें.

कुलाबा समाचारानें आम्हांस खोटे ठरविण्याचा जसा प्रयत्न केला आहे तसा प्रयत्न आमचें मुंबईतील व्यवसायबंधू रा. कोल्हटकर यांनीं जरी केलेला नाही तरी त्यांनी आपल्या चाबुकस्वार पत्राच्या ता. १६/४/१९२७ च्या अंकांत जी हकीकत प्रसिद्ध केली आहे ती वांचून आम्ही प्रसिद्ध केलेली हकीकत खरी नाहीं. अशी शंका कांहीं अशी जिज्ञासू लोकांस वाटल्यावांचून राहणार नाहीं, इतका त्यांच्यात व आमच्यांत फरक पडला आहे. चाबूकस्वारांत छापलेली बातमी एकाद्यां बातमीदारांकडून आलेली असती तर तिला आम्ही फारसें महत्व दिलें नसतें. पण चाबूकस्वार कर्त्यांनीं स्वतः दौरा काढून माहिती मिळविली आहे असें ते स्वतः सांगत असल्या कारणानें त्यांनी दिलेल्या बातमीच्या सत्यासत्यतेबद्दल विचार करणें आम्हांस अवश्य दिसतें. चाबूकस्वारांत विशेषतः ज्या दोन तीन नव्या गोष्टी प्रामुख्यानें पुढें मांडण्यात आल्या आहेत त्यांतील पहिली गोष्ट ही कीं, महाड येथे जी मारामारी झाली, ती अस्पृश्य लोकांनीं चवदार तळ्यावर पाणी भरल्यामुळें झाली नाहीं. तर ती अस्पृश्य लोक विरेश्वराच्या देवळांत शिरणार या कंडीमुळें झाली. याचा अर्थ असा असेल कीं, देवळांत शिरण्याची कंडी उठली नसती तर दंगा झाला नसता, तर ती गोष्ट साफ खोटी आहे याबद्दल आम्हांस बिलकूल संशय नाहीं. तळें बाटविल्याबद्दलच मारामारी झाली, असें जें आम्ही

म्हणतों त्याची सत्यता पटविण्यास फार दूर जावयास नको. प्रथमतः अस्पृश्य लोक देवळांत जावयाचें होते तर तळ्यावरून परत फिरल्यावर ते तडक देवळाकडे आले असते. पण देऊळ हांकेवर उरले असतांना अस्पृश्य लोक आपापल्या छावणीकडे फुटून गेले, यावरून कोणाही समंजस माणसास तर्क करता आला असता कीं, अस्पृश्य लोकांचा देवळांत शिरण्याचा इरादा नसला पाहिजे. दुसरा पुरावा असा आहे कीं, स्पृश्य लोक जर विरेश्वराच्या देवळासभोंवतीं केवळ देवळाचें संरक्षण करण्याकरितां जमले होते तर जेव्हां डॉ. आंबेडकरांचा निरोप फौजदारांनी सांगितला त्यावेळी गर्दी कां मोडली नाही ? अर्थात देवळाचें संरक्षण हा त्यांचा मुख्य हेतु नव्हता, तो जर असता तर देवळाचें संरक्षण करण्याचें कारणच उरलें नाही, हें समजल्याबरोबर ते निघून गेले नसते काय ? याशिवाय आमच्या म्हणण्याला तिसरा पुरावा आम्ही देतों. देवळा सभोंवती जमलेल्या लोकांची समजूत करण्यासाठी जेव्हां डॉ. आंबेडकरांना नेण्यात आले तेंव्हा दंग्याचे पुढारी यांनी त्यांना देवळांत शिरणार कीं काय, असा प्रश्न विचारावयास पाहिजे होता. पण त्याबद्दल त्यांनीं अवाक्षरसुद्धां काढलें नाहीं. उलट तुम्ही तळ्यावर कां गेलांत ? याच प्रश्नावर त्यांनी वाद चालू केला. यावरून काय दिसतें ? पाण्यावरूनच लोक चिडले होते, पण म्युनिसिपालिटीचा ठराव* व गावांतील स्पृश्य लोकांचा पाठिंबा या दोहोंस झिडकारून देण्याची लाज वाटल्यामुळें देवळाचें निमित्त पुढें करून तळें बाटविल्याचें उट्टें त्यांनी काढलें. या शिवाय दुसरा निष्कर्ष निघूं शकत नाहीं. थोडक्यांत सांगावयाचे तर या सर्व पुराव्याची कांहीच जरूरी नाहीं. एकाच गोष्टीवरून आमचे म्हणणें खरें ठरत आहे. जे लोक आमचें म्हणणें खोटें आहे असें म्हणतात, त्यांना आम्ही असें विचारतों कीं, तळें बाटल्यामुळें जर स्पृश्य लोकांचा क्षोभ झाला नव्हता तर मग तळ्याची शुद्धि कां करण्यांत आली ? चाबुकस्वार कर्त्यांनी ज्यांच्या पासून आपली माहिती मिळविली त्यांना हा प्रश्न करण्यास ते विसरले हें उघड आहे. परंतु त्यांनी जर तो प्रश्न केला असता तर त्यांना कळलें असतें कीं, हे अपराधी लोक आपल्या अपराधाची तीव्रता कमी करण्यासाठीं भलभलतें कोटीक्रम लढवित आहेत. कोणा एका चांभाराने उन्मत्तपणें " पाणीच प्यालो काय, पण तळ्यांत कातडेसुद्धां धुतलें " असे लोकांना छातीठोकपणे सांगितल्यामुळें राग आला. आपण अस्पृश्य आहोंत हें दाखविण्यांकरितां कांही अस्पृश्य लोकांनी बाजारपेठेंतील कलिंगडाच्या टोपल्यावर झडप घातली, अथवा स्पृश्य वर्गाच्या मुली

*हा ठराव सार्वजनिक ठिकाणे व पाणवठे या संबंधाचा होता. महाड म्युनिसिपालिटीने सुरेन्द्रनाथ टिपणीस अध्यक्ष असताना ठराव क्र. ६७/२७ दिनांक ५-१-१९२४ द्वारा महाड येथील चवदार तळे अस्पृश्यांसाठी खुले असल्याचे जाहीर केले होते.

मागितल्या इत्यादि कारणांमुळे मारामार झाली, नाहींतर झाली नसती. असें जें प्रसिद्ध करण्यांत आलें आहे, तो निव्वळ बाष्कळपणा आहे. अस्पृश्यांनी त्या दिवशी दाखविलेला धीर इतका वाखाणण्यासारखा होता कीं, विरुद्ध पक्षास आपली बाजू उजळ करून दाखविण्यात त्यांच्यावर शिंतोडे उडविल्याखेरीज गत्यंतरच नाही.

चाबुकस्वारांनी आपली माहिती स्पृश्य लोकांकडून मिळविली आहे याबद्दल कांही शंका नाहीं. हे लोक आपल्या तोंडाला लागलेली काळोखी पुसून टाकण्यासाठीं बनावट गोष्ट सांगणार हें साहजीक आहे, हें चाबुकस्वारकर्त्यांनीं ध्यानांत ठेवावयास पाहिजे होतें. परंतु याचा त्यास विसर पडल्यामुळें, खरें बाहेर येण्याऐवजी त्यांची बातमी भरमसाट विधानांनी माखली गेली आहे, उदाहरणार्थ, " त्या दिवशी प्रमुख अस्पृश्य लोकांस पोलीसच्या संरक्षणाखाली ठेवण्यांत आले ! खुद्द आंबेडकरांना पोलीसनें आपल्या संरक्षण खाली ठेविलें. . . . . ते जर दंगा करणाऱ्या लोकांच्या हातांत सांपडते तर त्यांच्या जिवावर बेतल्याखेरीज कधीही राहिलें नसतें. " वगैरे विधाने गैर समजूत करणारी तर आहेतच, पण ती खरीही नाहींत. प्रमुख अस्पृश्य लोक दंगेखोरांच्या हातांत सांपडले नव्हते, ही बातमी त्यांना कोठून मिळाली कोणजाणे. परिषदेस आलेल्या अस्पृश्य प्रतिनिधीच्या दोन छावण्या होत्या. खुद्द आंबेडकर व त्यांच्या बरोबर मुंबईहून आलेल्या प्रमुख मंडळींची छावणी विरेश्वराच्या देवळापासून फार फार तर दोनशें यार्डावरील डांक बंगल्यांत होती. शिवाय ती छावणी इतर सर्व अस्पृश्य प्रतिनिधींच्या छावणीपासून दीड मैलाच्या अंतरावर असल्याकारणाने एका छावणीवर हल्ला झाला असतां दुसऱ्या छावणीकडून कुमक येणें शक्य नव्हतें. अशा प्रकारे अगदी तुटून पडलेल्या छावणीवर हल्ला करावयास काय हरकत होती ? बरें त्या छावणीत माणसें दहाच्या वर नव्हतीं, असें असतां देखील या " शूर " लोकांना या जवळच्या छावणीकडे मोर्चा फिरविण्याचें धैर्य झालें नाहीं. शत्रूच्या टप्प्याच्या आंत हीं प्रमुख मंडळी होती इतकेंच नव्हे तर एके समयी ती त्यांच्या जबड्यांत होती. समजूत करण्यास जेव्हां डॉ. आंबेडकर व इतर प्रमुख मंडळी डांक बंगल्याच्या बाहेर आली तेव्हां ती देवळासभोंवार जमलेल्या लोकांच्या तडाख्यात नव्हती तर कोठें होती ? व आम्हांस जो अचंबा वाटतो तो हाच कीं, ज्या अस्पृश्यांतील प्रमुख लोकांच्या करणीमुळें हा तळें बाटविण्याचा क्षोभकारक प्रकार घडला, ते लोक चालून माऱ्यांत आले असतांना त्यांच्यावर हातसुद्धां उगारला गेला नाहीं ! फुटून फाटून जाणाऱ्या अस्पृश्य प्रतिनिधींवर वीरश्री गाजविणाऱ्यांचे तेज त्यांच्यापुढे कोठें नाहिसेंच झालें. अशी

वस्तुस्थिती असतांना आपल्यावर बेतेल म्हणून डॉ. आंबेडकरांना पोलीसचा आश्रय करावा लागला हें म्हणणें किती वायफळ आहे हें उघड आहे. पोलीसच्या ठाण्यावर डॉ. आंबेडकर व मुंबईच्या पाहुणे मंडळीस राहावें लागले हें खरें, पण तें या नेभळ्या लोकांच्या भयामुळें नव्हे. त्यांचे कारण अगदीं निराळें आहे, डांक बंगला १९ व २० या दोन दिवसां करतां वापर करावयास मिळाला होता. २१ तारखेस कुलाबा जिल्ह्याचे डिस्ट्रिक्ट पोलीस सुपरिनटेन्डेंट महाडास येणार असल्यामुळें ती जागा त्यांस खाली करून देणें प्राप्त होतें. मुंबईच्या प्रतिनिधीस झालेल्या गोष्टीं कायद्याच्या सूत्रांत गोवल्याखेरीज महाड सोडून मुंबईस जाणें शक्य नव्हतें. शिवाय एवढ्या सर्वांची एके ठिकाणीं व्यवस्था होईल अशी प्रशस्त जागा पाहिजे होती. अशा वेळी पोलीस ठाण्यावर रिकामी असेलेली एक खोली त्यांना देऊ केली व इतर कांही सोय नसल्याकारणानें तिचा स्विकार करावा लागला. चाबुकस्वारांत प्रसिद्ध झालेली हकीकत ही खऱ्या स्थितीचा विपर्यास आहे, हें वरील खुलाशावरून दिसून येईल. ज्याप्रमाणें चाबुकस्वारानें स्पृश्यांकडें जाऊन चौकशी केली तशीच त्यांनी महाड येथील अस्पृश्यांकडे जाऊन चौकशी केली असती तर त्यांना खऱ्या-खोट्याचा थांगपत्ता लागला असता. पण त्यांनी तसें केलें नाहीं. खरें शोधून काढण्यास सर्वस्वी खोट्यांच्या साक्षीवर अवलंबून राहिल्यानें त्यांचा दौरा निष्फळ झाला आहे असें आम्हांस कष्टानें म्हणावें लागतें.

चवदार तळ्यावर जाण्याचा निश्चय कसा ठरला व तो अंमलात आणण्यापूर्वी परिषदेच्या चालकांनी स्पृश्य हिंदुंचें मत अजमाविण्यासाठीं कोणते प्रयत्न केले याची हकिकत आम्हीं ब. भा. च्या १ ल्या अंकांत दिली आहे. त्यांत स्पृश्य हिंदूचें मत अनुकूल दिसल्यामुळें अस्पृश्य लोक तळ्यावर गेले असें आम्ही लिहिलें होतें. पण ज्या स्पृश्य हिंदूंनी ठरावाला पाठिंबा दिला तेच आतां उलटून पडले आहेत व ' मी नाही, मी नाही ' म्हणून सांपडेल त्या चोर वाटेनें निसटूं पहात आहेत. रा. जोशी यांनीं ता. १/४/२७ च्या ज्ञानप्रकाशांत एक पत्र लिहून आपली जबाबदारी टाळण्याचा जो प्रयत्न केला आहे तो या धरसोडीच्या वर्तनाचा एक दाखला आहे. रा. जोशी आपल्या पत्रांत म्हणतात, " मी माझ्या भाषणात चवदार तळ्यांचा उल्लेखसुद्धां केला नाहीं. मग माझ्या प्रोत्साहनाने " अस्पृश्यलोक तळ्यावर गेले हें विधान धादांत खोटे आहे ". आम्हीं तर असें म्हणतों कीं, अस्पृश्यलोक रा. जोशी, किंवा धारिया यांच्याच फक्त सल्ल्यानें गेले नसून सभेस

जमलेल्यां सर्व स्पृश्य लोकांच्या अनुमतीनें तें गेलें. कारण जो ठराव Δ झाला तो सभेंत मांडण्यापूर्वी जमलेल्या वरिष्ठ हिंदूंना दाखविण्यांत आला होता, व एका मिश्र विवाहाच्या कलमाशिवाय Δ तो त्या सर्वांनी मान्यहि केला होता. केवळ सर्वांना त्यावर बोलणे शक्य नसल्याकारणाने आपल्यावरील ही कामगिरी त्यांनी या दोघां मित्रांवर सोपविली. यावरून उघड आहे की, रा. जोशी व धारिया यांनी ठरावाला जो पाठिंबा दिला तो स्वतःपुरतां नसून सर्वांतर्फे दिला होता. पण हें सर्व बाजूस ठेवून रा. जोशांपुरतेच पाहिले तरी त्यांच्या प्रोत्साहनाने अस्पृश्य लोक तळ्यावर गेले नाहींत असा जो बुद्धिवाद त्यानी लढविला आहे तो वास्तविक खरा नाहीं. सभेंत जो ठराव मांडला होता तो सर्वसाधारण स्वरुपाचा होता व सार्वजनिक पाणवठ्याचा उपभोग घेण्याकरिता अस्पृश्यांना स्पृश्यांनी मदत करावी ही ठरावाची भाषा होती. अशा ठरावास जो गृहस्थ पाठिंबा देतो तो गृहस्थ पर्यायानें चवदार तळ्यावर पाणी घेण्यास अस्पृश्यांना प्रोत्साहन देणाऱ्यांपैकी ठरतो असे मानावयास काय हरकत आहे हें आम्हांस कळत नाही. ठराव सर्वसाधारण होता. अर्थात त्यांत रा. जोशांच्या महाडांतील चवदार तळ्याचा समावेश होत नव्हता असे कोणास म्हणता यावयाचे नाही. महाडांतील तळी ती मुले व इतरत्र ती कारटीं म्हणून अस्पृश्य लोक गेलेच तर चवदार तळें वगळून अन्यत्र असलेल्या तलावावर जातील असल्या भ्रामक कल्पनेने रा. जोशांनी संमती दिली असेल असे संभवत नाही. परंतु तसें जर असेल तर रा. जोशा इतका बेअक्कल माणूस म्हणजे जोशीच हें उघड आहे. मागाहून हाकाटी करण्याऐवजी ठरावास पाठिंबा देण्यापूर्वीच सर्वत्र ठिकाणच्या तळ्यावर वेतणारी गोष्ट आपल्या चवदार तळ्यावर कां वेतणार नाही, याचा रा. जोशी यांनी पूर्ण विचार करावयास पाहिजे होता ; पण हा अविचारी ब्राह्मण वीर त्यास मान्य असलेल्या निराकार तत्त्वाने तत्क्षणीच धरलेले साकाररूप पाहून इतका भेदरून गेला आहे की त्यानें आतां खोटे बोलावयास सुरवात केली आहे. रा. जोशी मोठ्या दिमाखानें लिहितात कीं, "आम्ही आपल्याबरोबर येत नाही इतकेच त्यांना (अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांना) सांगून थांबलो नाही तर मी आपल्या कांही अस्पृश्य बंधूंना असेंही सांगितलें कीं, अशा

---

Δ अधिवेशनात पास झालेला ठराव असा–" बहिष्कृत वर्गातील लोक सार्वजनिक स्थळे व पाणवठे यांचा उपयोग करून आपले नागरिकत्वाचे हक्क बजावण्याचा प्रयत्न करीत असतांना वरिष्ठ वर्गातील लोक त्यांच्याशी सर्व प्रकारचे व्यवहार बंद करून त्यांच्याविरुद्ध हरताळ जाहीर करतात. तसे न करता अशा वेळी वरिष्ठ वर्गातील लोकांनी बहिष्कृत लोकांना सक्रिय सहाय्य करावे. "

ठरावातील हे कलम पुढीलप्रमाणे होते, "क. जातिभेद मोडण्याचा उपाय म्हणून मिश्रविवाह पद्धतीचा प्रचात सुरु करावा."

दांडगाईने आपण वरिष्ठ जातीतील लोकांची सहानुभूति मात्र गमवाल.'' केवळ आपली कातडी बचाविण्यासाठी अशा प्रकारचें कांहीतरी सांगणे जरूर आहे असें जर रा. जोशांना वाटत असेल तर त्यानें तसें खुशाल म्हणावें. आम्हांस त्याची परवा नाही. जोशांची भाषा आमच्या कानात अजून दुमदुमत आहे. चला म्हणतांना जोशी म्हणाले, ''आम्ही येत नाही. तुमचे विचार ते आमचे विचार नव्हत.'' यावर अस्पृश्य पुढारी म्हणाले, ''तुमचे विचार तसे आचार नाहीत. जसे आमचे विचार, तसे आमचे आचार आहेत. तुम्ही येत नसाल तर आम्ही जातो,'' हा संवाद जशाचा तसा आम्ही दिला आहे. परंतु आमचे म्हणणे असत्य असून रा. जोशी आपले म्हणणें खरे आहे असा आग्रह धरतील तर या बाबतीत त्यांच्याशी वाद घालण्याची आम्हांस काही जरूरी दिसत नाही. कारण जोशांनी अस्पृश्यांस सांगितले म्हणून ते गेले व त्यांना जर अंदाज होता की, अशामुळे मार पडेल तर त्यांनी मोडा कां घातला नाही, असा जर अस्पृश्यांचा जोशांवर आरोप असता, तर रा. जोशांनी अशी सल्लामसलत दिली किंवा नाही हा वादाचा प्रश्न झाला असतां. पण रा. जोशांविरुद्ध जी तक्रार आहे ती अगदी निराळ्या प्रकारची आहे व ती ही की, ज्याअर्थी रा. जोशांनी ठरावाला पाठिंबा दिला त्या अर्थी त्यांनी अस्पृश्य प्रतिनिधींबरोबर तलावावर जाणे प्राप्त होते. मग मरण होवो की तरण होवो. ते त्यांनी कां केले नाही? ते आले असते तर मार वाचला असता असें मुळींच नाहीं पण रा. जोशी बोलले तसे वागले कां नाहीत ? त्यांनी अस्पृश्यांबरोबर मार खावयाचा होतां तसें त्यांनी केले असतें तर एक गोष्ट सिद्ध झाली असती की, रा. जोशी हे जातीसाठी माती खाणारे नसून तत्त्वासाठी जातीला माती देणारे आहेत.

रा. जोशी व रा. धारिया यांचा आम्ही जास्त पिच्छा पुरवू इच्छित नाहीं. त्यांच्या जातभाईकडून त्यांना गांजणूक होत असल्याबद्दलची हकिकत वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालीं आहे. रा. जोशी यांना* टाकण्याचा प्रयत्न त्यांच्या जातभाईनी केला होता परंतु तळ्याच्या शुद्धीकरितां त्यांनी संमती दिल्यामुळें तो प्रसंग टळला. तरीपण त्यांची बऱ्यावाईट शब्दांत कान उघडणी झालीच असे म्हणतात. रा. जोशी यांचे सहचारी रा. धारिया यांनाही त्यांच्या ज्ञातबंधूकडून परिषदेला हजर राहिल्याबद्दल ज्ञातीचा गुन्हा केला असें ठरवून त्यांच्याकडून दंडादाखल सव्वा रुपया घेण्यांत आला. विनाशकाले विपरित बुद्धि असे समजून हे दोन्ही गृहस्थ परिषदेत भाग घेतल्याबद्दल पश्चाताप करीत असतील. त्यांना असे वाटणें अगदी साहजिक आहे. कारण मारामारींच्या वेळीं अस्पृश्यांपेक्षा त्यांच्यावरच दंगेखोरांचा विशेष डोळा होता व ऐन दंग्याच्या भरांत ते जर

---

* पुढे 'वाळीत' शब्द असावयास हवा.–संपादक.

दंगेखोरांच्या तावडीत सांपडले असते तर त्यांच्यावर शेकल्याशिवाय राहिले नसते. आम्हांला मात्र इतकें सांगावेसें वाटतें कीं, तसें जर झालें असतें तर त्यांत कांही वाईट झाले नसतें. यांत त्यांच्या पापाचे प्रायश्चित्त भोगण्यापलिकडे विशेष कांही घडले असतें असें नाहीं. जे लोक आपली जात सोडण्यास तयार नाहीत ते आपल्या जातींच्या जुलुमापासून दुसऱ्या जातीच्या लोकांचा बचाव तो काय करणार ? चालू प्रसंग आणिबाणीचा आहे. अशावेळी बोलल्याप्रमाणें वागण्याचें धैर्य न दाखविणें, हे मोठेंच पाप आहे असे आमचे मत आहे. ज्या लोकांना अमुक एका सुधारणेचे महत्त्व पटले आहे त्या लोकांनी त्याप्रमाणें कृती करणें, हें हल्लीच्या राष्ट्राच्या प्रगतीस अत्यंत आवश्यक आहे. सुधारणा नको असे म्हणणाऱ्या प्रतिगामी लोकांत व सुधारणा हवी पण ती कालगतीवर सोंपवून बोलापलीकडे काही न करणाऱ्या प्रागतिक लोकांत विशेष अंतर आहे असे आम्हांस वाटत नाही. उलट हे दुसऱ्या धर्तीचे लोकच सुधारणेच्या मार्गातील कांटे आहेत व म्हणूनच त्यांच्यापासून कोणासही लाभ होणे शक्य नाही. या लोकांच्या चर्पटपंजरीनें दिशाभूल मात्र होतें. आपली सुधारणा करण्याकरितां हे अवतारी पुरुष झटत आहेत तेव्हां आपणांस विशेष कांही करावयास नको अशी भावना होऊन जनतेची जागृतेची ज्योत त्यांच्यामुळे मंद होते. एकीकडून सुधारणेसंबंधी आपल्या जातीशी शाब्दिक वाद घालावयास तयार असलेले हे लोक पुन्हा जातींने अडविलें कीं, जातीसाठी माती खावयाची असें म्हणून सुधारणेला मूठमाती द्यावयाला तयार. अशा लोकांच्या लुडबुडण्यामुळें फायदा न होतां घात होतो असें आमचे स्पष्ट मत आहे. अशा घातकी लोकांना आम्ही पातकी समजतो. उभयपक्षाचें अवसानघात करणाऱ्या लोकांची अशी संभावना होणेंच इष्ट आहे. आमच्या या विचारसरणीमुळें अस्पृश्य वर्गाची सहानुभूति बाळगणाऱ्या कांही स्पृश्य जातीच्या गृहस्थांना आश्चर्य वाटेल हे आम्ही जाणून आहोत परंतु चालू असलेल्या रणकंदनांत शाब्दिक सहानुभूतीची कांहीच किंमत नसल्याकारणाने आम्हांस त्याचें भय वाटत नाही. हल्लीच्या सुधारणेच्या लढ्यांत जातींची कास धरून राहणाऱ्या सुधारणावादी लोकांकडून सुधारणेचा प्रसार होणें शक्य नाही. सुधारक व सनातनी यांच्यातील वाद तत्त्वाचा असल्यामुळे सुधारक हा मुळातच स्वजातीचा शत्रू असतो. त्याने आपली जात सोडून परजातीतील समानशील माणसाशी संगनमत करून त्याचा आपला एक समाज केल्याखेरीज तत्त्वाचा जय झाल्याचे फळ त्यास कधीच दिसावयाचें नाही. जात सोडून ज्यांना आपला निभाव लागणार नाही असें वाटते त्यांनी या सुधारणेच्या भानगडीत पडूं नये. त्याच्याने सुधारणा तर होत नाहीच पण सुधारणेची विटंबना मात्र होते.

अशा रीतीने पाहिल्यास आम्हांला भालाकार खपतो. भालाकार कांही झालें तरी जुन्या परंपरेवर निष्ठा ठेवून तिला भजणारा एक माणूस आहे. आम्हांला तो खपतो याचे कारण भालाकार आमचा उघड शत्रू म्हणून वावरतो आणि त्याच्या आमच्यांत कांही आड पडदा नसल्याकारणानें आम्हांला त्यांच्याशी दोन हात करावयास सोपे जाते. पण रा. जोशी व रा. धारिया यांच्यासारखे अर्धे कच्चे लोक न धड जुने, न धड नवे, आम्हांला खपत नाहीत, त्यांच्यावर विसंबून राहतां येणें शक्य नाही. कारण उलट खाऊन हे लोक आम्हांला कधी दगा देतील याचा मुळी नेमच नाही असले मित्र नसलेले काय वाईट ? भालाकारानें ता. २८-३-१९२७ च्या अंकांत महाडच्या मारामारीबद्दल जो लेख ऐन गुरमीच्या भरांत लिहिला त्यात या हिंदु धर्माच्या कयसरनें अस्पृश्यांस निकराचा सवाल केला की, "तुम्ही देऊळ किंवा पाणवठे बाटविण्याचा प्रयत्न एकदम बंद करा. तसे न केल्यास आम्हीं तुमच्या पाठी सडकूं." आम्ही तितक्याच निकरानें बहिष्कृत भारतात उत्तर दिलें की आम्ही आपला प्रयत्न केंव्हांच बंद करणार नाही. आमच्या जो पाठी सडकील त्याची आम्ही टाळकी सडकूं. आमचा संदेश पोचल्याबरोबर हा कयसर नुसत्या शब्दाच्या गोळीबारीनें इतका भेदरून गेला कीं, लगेच पुढच्या अंकापासून अहो असें कसें होईल, झालें तर इतक्या लवकर कसे होईल वगैरे वगैरे केविलवाणे स्वर काढू लागला. एकाच हल्ल्यानें हा कयसर शिखंडीरूप धारण करून शरण आला. यावरून तो मुळातच शिखंडी असून त्यानें पहिल्या अंकांत आणलेला अविर्भाव एखाद्या नर्तकीने मागून आणलेल्या श्रृंगाराप्रमाणे उसना होता हें कोणासही दिसून येण्यासारखे आहे. हा शिखंडी आता मारामारीची भाषा सोडून बुद्धिवादांत शिरला आहे. तेव्हां आम्हीही आमची आयुधे खाली ठेवून वादविवादाच्या भाषेचें अवलंबन करीत आहोंत. रा. भालाकार यांनी जो आपला ता. ११-४-२७ च्या अंकांत बुद्धिवाद केला आहे त्यास उत्तर देण्यापूर्वी आम्ही जशाचा तसाच देत आहोंत. ते म्हणतात "महाडच्या तळ्यावर पाणी पिण्यास गेलेल्या महारमांगांपैकी कितीतरीजण असे असतील कीं, ज्यांनी आदले दिवशी ओंल्या अन्नाची भिक्षा मागितली असेल व दुसरे दिवशीही तेच केले असेल. जो इसम आपण होऊन लोकांच्या दारी जाऊन जनावरांना खाण्याला योग्य असे अन्न व कालवण पदरांत घेऊन ते खातो व भुरकतो, अशा इसमाला स्पृश्य मानणे केव्हाही शक्य नाही. अस्पृश्य बाटून मुसलमान झाल्याबरोबर तो भिक्षा मागावयाची सोडतो. त्याचप्रमाणे महारा-मांगानी स्पृश्यांच्या घरी भिक्षा मागण्याचें सोडावें म्हणजे त्यांची अस्पृश्यता अवघ्या एका पिढीत जाईल. पण अस्पृश्यांना एकीकडे भिक्षेचे आयते अन्न खावयास पाहिजे व त्याच वेळी तळ्यातही शिरावयास पाहिजे या दोन्ही गोष्टी एकदम होणें शक्य नाही. अस्पृश्यांत

मुख्यत्वेकरून महार व मांग या दोनच जाती अत्यंत घाणेरड्या आहेत. ढोर व चांभार भिक्षा मागत नाहीत. म्हणून ते उपाशी मरतात काय ? भंगी लोक उष्टे घेत नाहीत मग महारामांगानाच उष्ट्या पत्रावळीची एवढी लज्जत कां ! यासाठी श्री. आंबेडकरांना आमची अशी सूचना आहे की, आम्हांला शिव्या देण्याऐवजी स्वजातियांच्या अंगचा वरील दुर्गुण काढण्याचा प्रयत्न करा.'' महाडच्या प्रकरणामुळें भालाकारावर मोठा प्रसंग गुदरल्या सारखे झाले होते. अस्पृश्यांना कायमचे अस्पृश्य ठेवावयाचें ही त्यांची प्रबळ इच्छा पण तें कसें घडून यावें याच्या ते विचारांत होते. धमकी देऊन त्यांनी पाहिले. पण त्याने कांही वळणार नाही हें त्यांना लगेच कळले. तेव्हां अस्पृश्यांना कायमचे अस्पृश्य कोटीत जखडून टाकतां आल्यास पाहावे म्हणून त्यांनी अस्पृश्यतेची एक नवी व्याख्या टाकी लावून घडविली आहे. ''ओल्या अन्नाची भिक्षा मागणारा तो अस्पृश्य.'' अर्थात ओल्या अन्नाची भिक्षा मागण्याची बंदी करा की आम्ही तुम्हाला स्पृश्य करतो असा भालाकारांचा अस्पृश्यांना उलट सवाल आहे. अस्पृश्यांची अस्पृश्यता कायम रहावी असें इच्छिणाऱ्या भालाकारांनी अस्पृश्यतेची अशी सुलभ व्याख्या द्यावी याचे आम्हांस नवल वाटतें. ओल्या अन्नाची भिक्षा मागण्याचे अस्पृश्यांनी सोडलें तर ते स्पृश्य होतील. मग आपल्या लाडक्या हिंदुधर्माचें काय होईल असें भय भालाकारास कसें वाटलें नाहीं कोण जाणें ! कदाचित महारामांगांना ओल्या अन्नाची भिक्षा मागण्याची संवय त्यांच्या हाडीमासी खिळली असल्यामुळें ते जीव गेला तरी आपली संवय सोडणार नाहींत असा पूर्ण भरंवसा त्यास वाटला असला पाहिजे. तसे जर नसते तर त्यांनी ओल्या अन्नाची भिक्षा न मागण्याचा ठराव होतो की नाहीं याकडे आपली टक लावली नसती. खुद्द महाडच्या परिषदेंत अशा प्रकारचा ठराव झाला असतांना ठराव का झाला नाही अशाप्रकारची निंदाप्रचुर हांकाटी त्यांनी चालविली आहे याचे तरी कारण हेंच की, तसा ठराव महारामांगांच्या हातून होणार नाहीं, अशा भावनेनें भालाकार इतके ग्रस्त झाले आहेत कीं, ठराव झाला कीं न झाला, हें पहाण्याचें श्रम घेण्याची त्यांना जरूरी दिसत नाही. प्रथमतः ब्राह्मणांच्या घरचें ओलें अन्न खाल्ल्यानें खाणारा अस्पृश्य कां समजला जावा हेंच आम्हांला समजत नाही. ब्राह्मणजात इतकी अमंगल आहे की, ब्राह्मणाच्या घरी शिजलेले अन्न खाल्ले असतां खाणाराची इतकी अवनति व्हावी व त्याचा विटाळ मानला जावा हें प्रथमतःच आम्ही भालाकारांच्या तोंडून ऐकत आहोंत. आजवर ब्राह्मणजात ही पवित्र आहे असें समजून यांच्या घरी शिजलेलें अन्न खाण्यास अस्पृश्यांस कांही हरकत वाटत नव्हती. पण आतां भालाकारच जर आपली जात इतकी अपवित्र आहे की, तिच्या घरी शिजलेल्या अन्नाचे सेवन केल्याने माणसाचा अधःपात होतो म्हणतात तर अस्पृश्य लोक तो प्रकार बंद

करतील या बद्दल भालाकारांनी खात्री बाळगावी. दुसऱ्या परी पाहिले असतां ओल्या अन्नाची भिक्षा मागून खाणें हा महार मांग जातीचा कांही धंदा नव्हे. खेडेगांवी महार मांग लोक गांवांत भाकर मागतात हें खरें. पण ती भिक्षा म्हणून मागत नाहीत. ते बलुत्याचा हक्क म्हणून मागतात. पण ते ओल्या अन्नाची भिक्षा मागतात हें जरी गृहीत धरलें तरी त्यांच्याप्रमाणें इतर जातीतील लोक परघरच्या ओल्या अन्नाचें ग्रहण करितात. मराठे लोक ब्राह्मणाच्या घरी शिजलेले ओले अन्न ग्रहण करतात ही खेदाची गोष्ट या ठिकाणी उघडकीस आणणें आम्हांस प्राप्त वाटते. खुद्द पुण्यामध्ये कित्येक मराठा बाया ब्राह्मणांच्या घरी भांडी घासावयास राहतात. आणि आपल्या घरी खाणावळे ठेवितात. पण या खाणावळ्यासाठी ताजे अन्न न शिजवितां ब्राह्मणाच्या घरचे उष्टें आणून त्यांना घालतात व ते तुपाच्या लालचीने कांही किंतु न मानता खातात. परघरी शिजलेले ओलें अन्न खाण्यांत जर अस्पृश्यता साठवलेली असेल तर मराठे लोकांना अस्पृश्य म्हणावयास भालाकार तयार आहेत काय ? खुद्द भालाकाराच्या जातीतील माधुकरी मागणारे विद्यार्थी काय करतात ? ते ओल्या अन्नाची भिक्षा मागत नाहीत काय ? महारामांगांना हिणविणाऱ्या भालाकारांना ब्राह्मण जातीत ओल्या अन्नाची भिक्षा मागण्याचा प्रघात आहे हें माहित नसावें असें वाटतें परंतु आम्ही त्यांना आठवण करून देतों कीं, पंजाबांत परजातीतील लोकांकडून ओल्या अन्नाची भिक्षा आणून आपला रोजचा उदरनिर्वाह करण्याचा प्रघात ब्राह्मण कुटुंबात आहे. हे पंजाबी ब्राह्मण पुण्यातील सदाशिव पेठेच्या हौदावर गेले तर भालाकार त्यांच्या पाठी सडकण्यास पुण्यांतील गुंडांचे सेनापति होतील काय ? अस्पृश्यता नित्य नसावी पण असलीच तर नैमित्तिक असावी असें आमचें मत आहे व भालाकारही तसेच म्हणतात हें पाहून आम्हांस एक प्रकारचा आनंद वाटतो. परंतु आम्हांला एवढ्या वरूनच वाईट वाटतें कीं, भालाकार सर्वांना एकाच न्यायानें वागविण्यास तयार असलेले दिसत नाही. जर न्यायच करावयाचा झाला तर त्यांच्या व्याख्येप्रमाणें चांभार व भंगी लोकांना स्पृश्यांत गणावें लागेल. कारण ते ओल्या अन्नाची भिक्षा मागत नाहीत अशी कबुली भालाकारानीच दिलेली आहे. उलट माधुकरी मागणारे ब्राह्मण विद्यार्थी किंवा भिक्षा मागणारें पंजाबी ब्राह्मण किंवा उष्टे खाणारे पुण्यातील मराठे या सर्वांना महारा मांगाप्रमाणें अस्पृश्य मानावे लागेल. हें नवें वर्गिकरण प्रचारांत आणावयास भालाकार तयार आहेत काय ? त्यांची अस्पृश्यतेची व्याख्या प्रचारांत आणण्याचा त्यांनी हट्टच धरला तर सकल ब्रह्मवृंदांवर केवढा मोठा अनर्थ ओढवेल याची भालाकारास कल्पना असावीसें दिसत नाही. महारमांगा प्रमाणें

दरोबस्त ब्राह्मणांच्या घरी ब्राह्मण स्त्रिया पुरुषांच्या उष्ट्याचें धनी असतात हें जगजाहीर आहे. उष्टेखाणारा तो अस्पृश्य असा नियम लागू केला तर सर्व ब्राह्मणबायांना अस्पृश्य ठरवून घराबाहेर घालवून द्यावे लागेल. म्हणून भालाकारांना आमची अशी प्रेमाची सूचना आहे की, त्यांनी आपली अस्पृश्यतेची व्याख्या परत घ्यावी ; व अस्पृश्यता नित्याची करावयास त्यांनी दुसरी कांहीतरी शक्कल लढवावी. अस्पृश्यांना अपशकून करण्याकरितां स्वतःचे नाक कापून घेण्यासारखा हा अतिप्रसंग त्यांनी करूं नये. पण भालाकार आटोपतें घेतीलच असें मानतां येत नाही. ब्राह्मणी न्याय देवता न्याय निष्ठूर असल्याची ग्वाही देणे कठीण आहे. स्वतःच्या जातीला अपवादांत घालून नियमांची खच्ची करणें हा तिचा नेहमीचा प्रघात आहे. झाला ब्राह्मण भ्रष्ट । तरी तो तिही लोकी श्रेष्ठ ! असे न्यायाला धुडकावून प्रतिपादणारे भालाकार उष्टे खाऊनही ब्राह्मणीन पुन्हां स्पृश्य ती स्पृश्य असें म्हणावयास कमी करणार नाहीत असे कोणी म्हणावे ?

अस्पृश्यतेच्या नव्यानें घडलेल्या व्याख्येनें भालाकार इतके बेहोश झाले आहेत कीं, त्यांना पुन्हां आपल्या ता. २५-४-२७ च्या अंकात या जुन्या भाजीला नवी फोडणी देण्याचा उपक्रम केला आहे. पण तिच्यांत कांही स्वारस्य नसल्यामुळें तिची चव घेऊन तोंड विटाळण्याचें आम्हांस कांही कारण दिसत नाही. त्यांतली एकच गोष्ट विचारांत घेण्यासारखी आहे. भालाकार लिहितात, ''चांभार, ढोर, महार व मांग या अस्पृश्यांतील चार पोट जातीना एक पाणवठे व एक देऊळ आपसांत प्रथम करावीत, मग स्पृश्यांकडे जी कोणती मागणी या बाबतीत करावयाची असेल ती करावी.'' बोलूनचालून अस्पृश्य जाती कितीतरी अडाणी ! त्यांच्यावर एवढा मोठा बिकट प्रश्न टाकणें हे केव्हांही न्यायाचे होणार नाही. केवळ जीतच करावयाची तर तेही घडवून आणतां येईल. पण आम्हांला जे वाईट वाटतें ते हें कीं, ब्राह्मणासारख्या श्रेष्ठ जातीने अस्पृश्यांसारख्या अतिशूद्र जातीशी याचना करावी की, ''बापहो, आम्हां अवनत ब्राह्मणजातीला तुम्ही सन्मार्गाचा धडा घालून द्या. '' काय हा ब्राह्मण जातीचा अधःपात ! असा अधःपात होण्यापेक्षा निःपात झालेला काय वाईट ?

● ● ●

---

बहिष्कृत भारत, ता. ६ मे १९२७.

# २५

# महाड येथील धर्मसंगर

# व

# इंग्रज सरकारची जबाबदारी

महाड येथें अस्पृश्य लोक एका सार्वजनिक तळ्यावर पाणी घेण्याकरितां गेलें हें त्यांचें कृत्य तेथील स्पृश्य हिंदूना न खपून त्यांनी अस्पृश्य लोकांस प्रतिबंध करण्याकरितां जो दंगा केला त्यांत त्यांच्या जबाबदारीसंबंधानें आम्हांस जें वाटलें तें आम्ही गेल्या अंकांत स्पष्टपणे लिहिलें आहे. आज त्याच बाबतीत इंग्रज सरकारची जबाबदारी कोणत्या प्रकारची आहे याविषयी आम्हांस लिहावयाचें आहे. पण तसें करण्यापूर्वी वादीप्रतिवादीचें म्हणणें काय आहे व उभयतांत वादाचा मुद्दा कोणता हें प्रथम निश्चित झाले पाहिजे ;

**या वादांत अस्पृश्य लोकांचें म्हणणें असें आहे कीं, आम्हांस सार्वजनिक पाणवठे व देवालयें इत्यादिकांचा उपभोग करण्यास इतर स्पृश्य हिंदूंप्रमाणें मोकळीक असलीच पाहिजे.**

आमचे व त्यांचे या बाबतींतील हक्क समसमान आहेत. पाणवठ्यांवर व देवालयांत जर आम्ही प्रवेश केला तर तसें करणें आमचा हक्क आहे. व तो हक्क बजावतांना कोणी आम्हांस प्रतिबंध करूं नये. यास त्यांचे प्रतिवादी जे स्पृश्य लोक असें उत्तर देतात कीं, तुम्ही हिंदु जरी असलां तरी तुम्ही अपवित्र आहांत. तुमच्या वापरण्यानें पाणवठे व देवालये अशुद्ध होतात. अस्पृश्यता ही हिंदुधर्मातील एक महत्वाची रूढी आहे व ती पुरातन असून धर्मशास्त्रसंमत आहे.

**या पुरातन रूढीमुळें तुम्हां अस्पृश्यांस पाणवठ्यावर अगर देवळांत शिरण्याचा हक्क नाहीं.**

या पुरातन रूढीमुळें सार्वजनिक पाणवठ्यांचा व देवालयांचा उपयोग, तुमचा संसर्ग न होऊं देतां घेणेचा हक्क आम्हास प्राप्त झाला आहे. हिंदूंच्या सार्वजनिक पाणवठ्यांवर व देवालयांत जाण्याचा तुम्हांस रुढीपरत्वें कांही एक हक्क नसतां तेथे जाल तर त्यांत तुम्ही अतिक्रम केला असें होईल, व तेणेंकरून आमच्या हक्कास बाध येईल. तसें तुम्ही करूं नका. तुम्ही केल्यास आमच्या हक्कास धोका केल्याबद्दल आम्ही तुमचा प्रतिकार करूं. वादाचा मुद्दा निश्चित

करण्यासाठी आम्हीं जो पूर्वपक्ष व उत्तरपक्ष केला आहे तो बिनचूक आहे असें आम्हास वाटतें. या वादाचा निकाल कसा करावा यासाठी मद्रास हायकोर्टाच्या एका निकालाचा आम्ही आधार घेत आहोंत. त्याचें कारण पुढे कळेल. त्या दाव्यांत (६ मद्रास २०३) वादी प्रतिवादी हिंदु मुसलमान होते. व वादाचा मुद्दा मशिदीपुढे वाद्ये वाजविणें किंवा न वाजविणें या संबंधीचा होता. त्या दाव्यांत खालील मॅजिस्ट्रेटनें हिंदु लोकांना मशिदीपुढें वाद्यें बंद ठेवण्याचा हुकूम केला होता व त्याचें समर्थन करतांना जीं कारणें त्यानें दिलीं होतीं, त्यांत एक महत्वाचें कारण असें होतें की, मशिदीपुढें कोणीही वाद्यें वाजवू नयेत ही वहिवाट इतकी जुनी आहे कीं, तिच्या फारादिवसाच्या अस्तित्वावरून आतां तो मुसलमानांचा विशिष्ट हक्क झाला आहे. आणि तो त्यांचा हक्क शाबूद राखण्यासाठी हिंदूंना मनाई करणें गैर होणार नाही. त्यांत त्यानें असेंही म्हटलें होतें कीं, सार्वजनिक सोयींचा उपयोग कोणत्यारितीने करण्यांत यावा याचा निकाल देतांना जातीजातींतील व धर्माधर्मांतील परस्पर मनोभावनांचा व रूढींचा विचार करणें प्राप्त आहे. यावरून असें दिसून येईल कीं, स्पृश्य व अस्पृश्य यांच्यात जो वादाच्या निर्णयाचा मुद्दा वर दिला आहे तोच या हिंदु मुसलमानांच्या दाव्यांतील मुद्दा होता, व म्हणूनच त्याचा आधार आम्हीं घेतला आहे. अर्थात् या दाव्यांत जी विचारसरणी हायकोर्टाकडून मांडण्यात आली तीच विचारसरणी स्पृश्य व अस्पृश्य यांच्यातील मुद्यास लागू पडेल यास वानवा नाहीं. हिंदु मुसलमानांच्या या दाव्यात खालच्या मॅजिस्ट्रेटनें जी विचारसरणी मांडली होती त्यास उत्तर देतांना मद्रास हायकोर्टाचे चीफ जस्टिस न्यायमूर्ती टर्नर यांनीं जें विवेचन केलें आहे तें इतके समर्पक आहे कीं, तें वाचून वरील मुद्याचा फोलकटपणा सहज लक्षांत येतो. न्यायमूर्ती म्हणतात, " माझ्या समजुतीप्रमाणें अशा प्रकारचे जातिविशिष्ट हक्क प्रस्थापित करण्यास रूढीचा आधार यापूर्वी कोर्टांत केव्हांच सांगण्यात आलेला नव्हता. मद्रास इलाखा केव्हांही सर्वस्वी मुसलमानांच्या हस्तगत झाला नसल्याकारणानें तशा प्रकारची (मशिदीपुढें वाद्यें बंद करण्याची) रूढी सर्वत्र प्रस्थापित झाली असेल असें मानणें निराधार होईल. एवढें असूं शकेल की, ज्या ज्या प्रांतीं मुसलमानांचे वर्चस्व होतें त्या त्या प्रांती मुसलमान लोकांनी राज्यकर्ते म्हणून आपल्या धर्मातील विशिष्ट प्रकारच्या आचारास व रूढीस हिंदुसारख्या पराजित लोकांस मान्य करावयास लाविलें असेल. या बाबतींत मला जें सांगावयाचें आहे तें हें की, अशा प्रकारचे विशिष्ट हक्क जे केवळ धर्माच्या व जातीच्या रूढीच्या बलावर मागण्यांत येतात ह्या हक्कांचा उगम अशा काळी झाला होता की, त्याकाळीं राज्यकर्ते आपल्या धर्मास कायद्याचें स्वरूप देण्यास मागें पुढें पहात नसत. पण सर्वांना समान हक्क व धर्माच्या बाबतींत तटस्थपणा या ज्या दोन महत्वाच्या तत्त्वावर ब्रिटीश अमदानी

उभारली गेली आहे त्या तत्वाशी वरील प्रकारची रूढी अगदी विसंगत आहे. सार्वजनिक रस्त्यावरून एका जातीस जाण्यास दुसऱ्या जातीने प्रतिबंध केला तर ती गोष्ट ब्रिटीश अमदानीत केव्हांही खपली जाणार नाही. मलबार येथील पारिया लोकांस कोर्टांत येण्यास कोणीही मज्जाव करीत नाही याचेंही कारण हेंच आहे. हा शिरस्ता नवा आहे ; परंतु ज्या तत्वाच्या पायावर ब्रिटीश अमदानी उभारली गेली आहे त्या तत्वामुळें जुन्या रूढीचे उच्चाटण झालें आहे हेंही पण तितकेंच खरें आहे. बेबंदशाही बंद होऊन कायदेशीर राज्यपद्धती अमलांत येते तेव्हां अशाप्रकारचे फेरबदल अमलांत येतात. व ते फेरबदल विचारी लोकांस कबूल होण्यासारखे असले पाहिजेत हेंही खरें आहे. परंतु एका पंथाच्या लोकांच्या दुराग्रहास वश होऊन कायदा बाजूस सारतां येत नाही हेंही ह्या बरोबर लक्षात ठेविलें पाहिजे. आणि यदा कदाचित जुन्या रूढीच्या अबाधितपणामुळें एकदा हक्क निर्माण झाला आहे असें जरी सिद्ध झाले तरी तो हक्क न्यायाच्या दरबारांत मान्य होण्यापूर्वी ज्या रूढीच्या आधारावर त्याची उभारणी झालेली आहे ती रूढी वाजवी आहे किंवा गैरवाजवी आहे हें निश्चित झालें पाहिजे. म्हणून एकादा मनुष्य आपले सार्वजनिक बाबतीतील जन्मजात हक्क उपभोगांत आणीत असतां दुसरा त्यास रूढीचा आधार देऊन प्रतिबंध करण्याचा आपणांस हक्क आहे असें म्हणूं लागला तर त्याचें म्हणणें ग्राह्य आहे किंवा अग्राह्य आहे हें त्यानें आधार दिलेल्या रूढीच्या योग्यायोग्यतेवर सर्वस्वी अवलंबून राहील. '' वरील मार्मिक विवेचनावरून एवढें सिद्ध होत आहे कीं, रूढींने हक्क प्राप्त होतात हें म्हणणें सर्वथैव खोटें आहे असें जरी म्हणतां यावयाचें नाही तरी केवळ बहुता दिवसांच्या रूढीने नेहमींच हक्क प्राप्त होतात हें म्हणणेंही सर्वथैव खरें नाही. रूढीनें हक्क प्राप्त होतात की होत नाहीत हें सर्वस्वी रूढीच्या कायदेशीरपणावर अवलंबून आहे. वरील विवेचन स्पृश्य व अस्पृश्य जातीतील वादास लागूं केलें तर वादाच्या निर्णयात जो मुद्दा निर्माण होतो तो हाच की, **अस्पृश्यतेची रूढी कायद्यास संमत आहे काय ?** जे लोक ती कायदेशीर आहे असें म्हणतात त्यांना न्यायकोर्टानी वेळोवेळी दिलेल्या निकालांची माहिती नसावी हें उघड आहे. आज ज्याप्रमाणें स्पृश्य लोक आज अस्पृश्य लोकांस पाणवठे व देवळें यावर प्रवेश करण्यास बंदी करतात त्याप्रमाणें पूर्वी एके काळी याच रूढीच्या आधारावर स्पृश्य लोक अस्पृश्य लोकांस रस्त्यावरून फिरण्यासही मनाई करण्याचा आपणांस हक्क आहे असें म्हणत असत परंतु न्यायकोर्टानेंही रूढी बेकायदेशीर आहे असें ठरवून त्यांचें म्हणणें नाकबूल केलें. कांही वर्षापूर्वी मद्रास इलाख्यांत तिनीवेल्ली येथे अस्पृश्य लोकांना प्रेतें घेऊन अमूक एका रस्त्यानें स्मशानभूमीकडे नेतांना स्पृश्य हिंदु कडून हरकत करण्यांत आली होती. परंतु

कोर्टानें स्पृश्यहिंदूचा दुसऱ्या एका दाव्यात वैष्णव ब्राह्मणांच्या दोन शाखांमध्यें सार्वजनिक रस्त्यावरून मिरवणुक काढण्याच्या बाबतींत आपापसांत वाद उपस्थित झाला होता. त्या वादाचा निकाल देतांना कोर्टानें खालील उद्गार काढले होते. " वादी ज्या रूढीचा आधार देतात ती रूढी रास्त आहे असें आम्हास वाटत नाही. मलबार प्रांती एकादा नायर जातीचा गृहस्थ रस्त्यावरून चालला असतां चिरूमन जातीसारख्या अस्पृश्य जातीच्या माणसानें त्यावर सावली न पडेल यास्तव रस्ता सोडून बाजूनें गेलें पाहिजे अशी रूढी आहे. परंतु त्याने तसे न केल्यामुळें त्याला तसें करण्यास कायद्यानें भाग पाडावे म्हणून नायर जातीच्या माणसानें दावा आणला व आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ प्रचलित रूढीचा आधार दिला. तर ती रुढी कोर्टात कॅव्हांही मान्य करतां यावयाची नाहीं " ज्या निकालांत वरील उद्गार काढण्यांत आले होते त्या निकालावर प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्यांत आले होते व तेथेंही मद्रास हायकोर्टची विचारसरणी सर्वथैव योग्य आहे असा निकाल देण्यांत आला.

## जो न्याय सार्वजनिक रस्त्यास लागू आहे तोच न्याय सार्वजनिक पाणवठे व देवालयें यांसही लागू असला पाहिजे

असें आमचें म्हणणें आहे. जी रूढी अस्पृश्यांना रस्ता बंद करूं शकत नाही ती रूढी त्यांना सार्वजनिक पाणवठे व देवालयें कशी बंद करू शकेल ? पण आमचा तर्क लढावण्यापेक्षा कोर्टाच्या निकालाचा आधार देणें बरें असें वाटल्यावरून आम्हीं सार्वजनिक रस्त्याच्या बाबतींत जसे न्यायकोर्टाचे आधार दिले आहेत त्याचप्रमाणें आम्हीं पाणवठे व देवालयें यांच्या बाबतींतही देत आहोंत. पाणवठ्याच्या बाबतींत लाहोर हायकोर्टाने गतसाली एक महत्वाचा निकाल देऊन अस्पृश्यांना पाणवठ्यावर जाण्यास रूढीच्या आधारावर प्रतिबंध करतां येणार नाहीं असें ठरविलें आहे. त्या खटल्यात खजनचंद व गर्जासींग या दोन चांभार गृहस्थांनी लुधियाना जिल्ह्यांतील खन्ना या शहरांत एका सार्वजनिक विहिरीवर पाणी भरण्याचा त्यांनी आग्रह धरिला. प्रथमतः स्पृश्य लोकांनी त्यांच्याविरुद्ध कोर्टातून मनाई हुकूम आणण्याचा उपक्रम केला. मॅजिस्ट्रेटनें त्यांना स्वतःच्या खर्चानें स्पृश्य जातीतील भिस्ती ठेवून त्याच्याहस्तें पाणी प्यावें असें ठरविलें त्याप्रमाणें त्यांनी भिस्ती ठेविला. पण दोन महिने काम करून भिस्त्यानें काम बंद केले. त्यानंतर खजनचंद व गर्जासींग यांनी स्वतःच पाणी भरण्यास सुरवात केली. त्यामुळें पुन्हा खळबळ उडून कोर्टाकडे प्रकरण गेलें. त्यात सरदार अमरसिंग नांवाच्या मॅजिस्ट्रेटने शांतता राखण्यास त्यांच्यापासून जामीन घेतलें व जामीन न दिल्यास एक वर्षाची साधी

कैद भोगावी लागेल असें फर्माविलें. या हूकूमाविरुद्ध हायकोर्टाकडे अर्ज करण्यांत आला. अर्ज रद्द करतांना जे उद्गार हायकोर्टानें काढलें ते ध्यानांत घेण्यासारखें आहेत. न्यायमूर्ति हॅरिसन यांनी असें सांगितलें कीं, " या चांभार गृहस्थांस जे स्पृश्य लोक सार्वजनिक विहीरीचें पाणी घेण्यास हरकत करितात त्यांची संख्या अगदी अल्प आहे. सर्व स्पृश्य लोकांचा त्यांच्यात भरणा नाहीं परंतु तसें जरी नसेल आणि सर्वच स्पृश्य लोकांची हरकत असेल तरी कोर्टानें जो निकाल दिला आहे तोच देणें त्यास प्राप्त आहे. सार्वजनिक विहिरीवर या दोन चांभार गृहस्थांचा पाणी भरण्याचा हक्क आहे. व अशा कायद्यास अनुसरून आपले हक्क बजावित असणाऱ्या लोकांस मनाई हुकूम करण्याऐवजी जे लोक त्यांना आपले हक्क बजावण्यास हरकत करतात त्यांच्या विरुद्धच मनाई हुकूम काढला पाहिजे होता ". देवालयाच्या बाबतीतही अशाच प्रकारचा एक निकाल (४१ मद्रास ९८०) मद्रास हायकोर्टानें दिला आहे. तेथील एका शूद्र जातीतील लोकांनी ज्यांचा देवळांत जाण्याचा प्रघात नव्हता व ज्यांना अस्पृश्य मानण्यांत येत असे-देवळांत गेल्यामुळे देऊळ बाटलें असा देवळाच्या पुजाऱ्यांनी फौजदारी कोर्टात त्यांच्यावर खटला केला होता. त्यांत खालच्या कोर्टानें त्यांना शिक्षा केली होती. परंतु हायकोर्टाकडे अपील केल्यावरून तो निकाल फिरविण्यांत आला. व हे लोक जरी रूढी परत्वें यापूर्वी देवळांत गेले नाहीत हे जरी खरें असलें तरी आज ते देवळांत गेले म्हणून देऊळ बाटलें अशी तक्रार कोणास करतां येणार नाही असें फर्माविले. वर जें विवेचन केलें आहे व जे कायद्याचे आधार दिले आहेत त्यावरून जी गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, अस्पृश्य समाजाचें म्हणणें खरें आहे. व स्पृश्य समाजाचें म्हणणें खोटें आहे.

## अस्पृश्यतेची रूढी कायदेशीर नाहीं.

त्या रूढीनें स्पृश्य समाजास अस्पृश्य समाजाविरुद्ध कोणतेच हक्क प्राप्त झालेले नाहीत. व अस्पृश्यांचे हक्क केवळ वहिवाट नाहीं म्हणून नष्ट झालेले नाहींत.

**सार्वजनिक बाबतींतील व्यक्तिमात्राचा हक्क हा कोणास कांहीं सनद देऊन निर्मित करावयाचा नसतो. तो दरेकाच्या अंगीं कायमचा वसत असतो. त्याच्या वहिवाटींत जरी खंड पडला असला, तरी तेवढ्यावरून तो हिरावला जात नाहीं.**

एखादा मनुष्य पूर्वी एखाद्या रस्त्यावरून कधी गेला नाहीं म्हणून त्यास पुढें त्या रस्त्यावरून जातां येणार नाहीं हें म्हणणें जितकें मूर्खपणाचें होणार आहे तितकेंच तो एखाद्या सार्वजनिक पाणवठ्यावर अथवा देवालयांत पूर्वी कधी गेला नाहीं म्हणून त्यास आतां जातां येणार नाहीं हें म्हणणें मूर्खपणाचें होणार आहे.

येथवर जे विवेचन केले आहे त्यावरून असें सिद्ध होत आहे कीं, अस्पृश्य लोक चवदार तळ्यावर गेले त्यांत त्यांनी कोणत्याच प्रकारचा अतिक्रम केला असें म्हणण्यास कायद्याचा मुळींच आधार नाहीं. चवदार तळ्यावरच काय पण वीरेश्वराच्या देवळांत ते जरी गेले असते तरी त्यांनी बेकायदेशीर कृत्य केले असें कोणासही म्हणतां आलें नसतें. अपराध आहे तो सर्व स्पृश्य लोकांचा आहे. त्यांना कोणत्याच प्रकारचा कायदेशीर हक्क नसतांना त्यांनीं अस्पृश्य लोकांस ते आपलें वाजवी हक्क बजावीत असतां बेकायदेशीरपणें विरोध केला. कायदेशीरपणें आपले हक्क बजावणाऱ्या लोकांस बेकायदेशीरपणें करणाऱ्या लोकांच्या त्रासापासून त्यांचे संरक्षण करून त्यांचे वाजवी हक्क बजावण्यास मदत करणें हें सरकारचें आद्य कर्तव्य आहे. सर्वांना आपआपले हक्क समानतेनें उपभोगितां यावें व कोणा एकास शिरजोर होऊन दुसऱ्याचे हक्क जोर जुलूम करून बुडवितां येऊं नये म्हणून तर सर्वांचें आकलन करण्यासारखी सर्व शक्तिमान संस्था जिला आपण सरकार म्हणतो ती स्थापन करण्यांत येते. ती जर कां कर्तव्यपराङ्‌गमुख झाली तर समाजाच्या अस्तित्वास धोका पोहोंचल्याशिवाय राहणार नाहीं. महाड येथील दंग्यांत सांपडलेल्या दंगेखोर लोकांस योग्य शासन होईल अशी आम्हांस आशा आहे. सार्वजनिक हक्कासंबंधी वाद व दांडगाई केली असतां आपणांस पाहिजे तसे हक्क मिळतील अशी जी अडाणी लोकांची समजुत असते ती समजुत दंग्याचें मूळ कारण असते.

**व दंगे मोडण्याचे योग्य उपाय म्हटले म्हणजे हक्कासंबंधीं निःपक्षपातीपणानें न्याय करणें व केलाला न्याय कोणाची भीड मुर्वत न धरितां जरूर पडल्यास कडक रितीनें अमलांत आणणें हेंच होत.**

न्याय देण्याचे कामीं समता व निःपक्षपातीपणा व अंमलबजावणीच्या कामी निग्रह व कडकपणा सरकारच्या अंगी अवश्य पाहिजे. सारखा न्याय व कडक अंमल करण्यास सरकार समर्थ आहे इतकेंच नव्हें तर तसें करण्यास सरकार कधीहीं माघार घ्यावयाचें नाहीं अशी जर गुंडलोकांची खात्री होईल, तर महाड येथे झालेले अशाप्रकारचे दंगे नामशेष होतील याबद्दल आम्हांस मुळींच शंका नाही.

हा महाड पुरता प्रश्न झाला. पण यापुढें अशाप्रकारचे प्रसंग न येतील अशी कांही तरी व्यवस्था करणें प्राप्त आहे.

**दंगा होऊन शिक्षा होण्यापेक्षां दंगा न होऊं देणे हेंच अधिक श्रेयस्कर आहे**

हें कोणीहीं नाकबूल करणार नाही. गुन्हा झाल्याखेरीज कोणासहिं शिक्षा करावयाची नाही हा कायद्याचा सर्व मान्य नियम आहे. व व्यक्तीचें स्वातंत्र्य व

संरक्षण इतक्या परीनें त्यावर अवलंबून आहे की त्या नियमाच्या महत्वाबद्दल दुमत होणें शक्य नाही. प्रत्यक्षपणें गुन्हा झाला नसतां केवळ गुन्हा होण्याचा संभव आहे अशा संशयावरून कायद्याची जरब लागूं करण्याचा नियम जर अमलांत आलां तर व्यक्तीमात्राच्या जिवितास मोठा धोका पोहोंचणार आहे. " कोण दिवस येईल कैसा। नाही जिवाचा भरंवसा " अशा भावनेनें लोक नेहमी चिंताग्रस्त राहतील व त्यांची स्थिति मोठी दु:सह होऊन न्यायाचे ऐवजी जुलमाचे प्रस्थ माजेल. परंतु रोग झाल्यानंतर औषधोपचार करण्यापेक्षा रोगच होणार नाहीं अशी व्यवस्था करणें अधिक बरे. हा आरोग्य शास्त्राचा नियम आहे. व तोच काहीं प्रसंगी न्यायशास्त्रास लागूं करणें अनुचित होणार नाहीं. अशा रितीनें पाहिल्यास गुन्हा घडेतो पर्यंत थांबणें महाअनर्थास कारणीभूत होण्याचा संभव आहे. बैल दवडुनी बांधिला झोपा। किंवा होता मंदीर दीप्त कूप खननी उद्योग तो कायसा ।। या म्हणण्या प्रमाणें अत्यंत अविचारपणाचें कृत्य होणार आहे. तसें होऊन शांततेचा भंग न होईल म्हणून वेळीच उपाय योजण्याचे अधिकार कायद्यानें प्रस्थापित करणें समाजाच्या सुरक्षिततेस अत्यंत आवश्यक आहे. हिंदुस्तानात सर्वत्र लागू असणाऱ्या क्रि. प्रो. कोडाच्या १४४ व्या कलमांत अशा प्रकारची तरतूद करून ठेवण्यांत आली आहे, ही शांतताप्रिय लोकांच्या दृष्टीनें तरी समाधानाची गोष्ट आहे. त्या कलमान्वयें, अमूक एका प्रकारच्या वर्तनानें शांततेचा भंग होण्याचा रंग आहे असें अधिकार असलेल्या मॅजिस्ट्रेटाची खातरजमा झाल्यास त्यास अशा प्रकारचें दुर्वर्तन करणाऱ्यास तसें दुर्वर्तन न करण्याची ताकीद देण्याचा अधिकार दिलेला आहे. व जो अशा हुकुमाचें उल्लंघन करील तर त्यास पिनलकोडच्या १८८ कलमान्वयें शिक्षा होईल. अशी ही एकंदर कायद्याची व्यवस्था आहे. क्रि. प्रो. कोडाचे १४४ व्या कलमाचा मुख्य हेतू काय आहे याबद्दल बराच गैरसमज पसरलेला दिसतो. त्या कलमाचा तेव्हां आद्य हेतु काय आहे याचें स्पष्टीकरण करणें प्राप्त आहे. न्यायमूर्ती टर्नर, ज्यांचें नांव या लेखांत या पूर्वी येऊन गेलें आहे त्यांनीं या कलमाविषयी आपलें मत देतानां असें म्हटलें आहे कीं, " मॅजिस्ट्रेटला मनाई हुकूम देण्याचा प्रसंग येईल तर त्यांनी आपल्या अधिकाराचा उपयोग हक्क संरक्षणार्थ करावा. हक्क तहकुबीकरतां करूं नये. कायदेशीर कृत्यास मनाई न करता बेकायदेशीर कृत्यच मना करावें. कायदेशीर हक्काची बजावणी करतांना दंगा उपस्थित होईल असें मॅजिस्ट्रेटला वाटले तर त्या बरोबर दंगा कोणाकडून उपस्थित होईल हें ही त्याला कळणार नाहीं असें नाहीं. म्हणून अशा प्रसंगी ज्यांच्या हातून शांततेचा भंग होण्याचा संभव आहे त्यांच्याकडून जामीन घेणें हें मॅजिस्ट्रेटचें कर्तव्य आहे". ह्यावरून हें कलम मुख्यतः न्याय हक्क अमलांत आणण्यास मदत व्हावी या

अर्थी याजिलेलें आहे. हें उघड आहे. शांतता राखणें हा त्याचा हेतु त्या मानानें गौण आहे. म्हणून आम्हांला असें वाटतें कीं, **सरकारनें वरील १४४ व्या कलमाचा उपयोग करावा.** या कलमाचा उपयोग करतांना हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं, अस्पृश्य लोकांना आपले हक्क उपयोगांत आणावयास स्पृश्य लोक प्रत्यक्षपणें तसेंच अप्रत्यक्षपणें प्रतिकार करितात. हे लोक प्रत्यक्षपणें दंडेली तर करतातच पण अप्रत्यक्षपणें त्यांचे जीवित कठीण करुन त्यांना जेरीस आणतात. व त्यांना आपल्या हक्काची अंमलबजावणी करण्यास अवसर देत नाहींत. अस्पृश्य लोक मेलेली जनावरें खातात व भाकरी मागतात अशा प्रकारें त्यांना हिणविण्यांत येतें. व हेच स्पृश्य लोक अस्पृश्य लोकांनी असली भलतीं कामें करावयाचें सोडून दिलें तर आपला अपमान झाला असें समजून कट करुन त्यांना गांव बंद करतात, बाजार बंद करतात, त्यांची मोलमजुरी बंद करतात, इतकेंच नव्हें तर कांही खुसपट काढून तंटेबखेडे करतात. अशा प्रकारें अस्पृश्य लोकांना त्राही त्राही करून त्यांना जुन्या नव्या मार्गापासून परावृत्त करून ताळ्यावर आणण्याचा निंद्य प्रयत्न करितात. अस्पृश्यांचे हक्क बजावण्याचे बाबतींत जर त्यांना पूर्णपणें सरकारास साह्य करावयाचें असेल तर स्पृश्यांकडून होणाऱ्या प्रतिकाराच्या अशा अप्रत्यक्ष प्रकारास देखील आळा बसेल इतक्या व्यापक प्रमाणांत वरील १४४ वे कलम अमलांत आणावें लागेल. वरील उपाययोजना लागूं करण्याचें ठरलें तर सार्वजनिक पाणवठे व देवालयें या ठिकाणी वरील कलमान्वयें एक सर्व साधारण जाहीरनामा प्रसिद्ध करावा म्हणजे तो जनतेंतील सर्व लोकांस लागूं होईल. त्याजबरोबर स्थानिक ब्राह्मण्यग्रस्त पुढाऱ्यांचे हात जामीनहि घेतले पाहिजेत. ही गोष्ट विशेष महत्वाची आहे. कारण नेहमीच्या अनुभवाप्रमाणें कांही कर्मठ लोक अज्ञ समाजाच्या धर्म भावनेचा फायदा घेऊन त्यास चिथावून देतात, व आपण नामानिराळे होतात. या बदमाषगिरीला आळा घालण्यास त्यांचे जामीन घेणें हा सोपासाधा तसाच अत्यंत जरूरीचा व गुणकारक असा उपाय आहे. त्याबरोबर अस्पृश्यांशी व्यवहार न करणाऱ्या व्यापाऱ्यांस विशेष प्रकारची ताकीद देणें आवश्यक आहे. ह्या कलमान्वयें जो हुकूम करण्यांत येतो त्याची मुदत साधारणतः दोनच महिने असते. पण तेवढ्यानें भागणार नाहीं असें आमचें मत आहे. अस्पृश्यतेची भावना फार जुनी आहे तीं कायमची नष्ट होऊन स्पृश्य लोक अस्पृश्य लोकांबरोबर सलोख्यानें वागूं लागण्यास बरेच दिवस जावे लागतील. यामुळे मनाई हुकूम निरंतरचा असावयास पाहिजे. १४४ व्या कलमांत निरंतरचा हुकूम करण्याचा अधिकार स्थानिक सरकारास दिलेला आहे. तो अधिकार त्यांनी उपयोगांत आणावा अशी आमची सूचना आहे.

ही आमची सूचना मान्य करून सरकार ती विलंब न करतां अमलांत आणील किंवा नाहीं याबद्दल आम्हांस थोडीशी शंका येते. आमचे इंग्रज सरकार प्रतिगामी जरी नसलें तरी बरेच धिम्मे आहे. मार्च ऑन करण्याऐवजी होतां होईल तो मार्कटाईम करण्याचें अवलक्षण त्याच्या अंगी अगदी खिळून गेलें आहे. व सामाजिक प्रश्न आला कीं, त्याचे पायच लटके पडतात. हें भय उघड करून सांगण्याचें कारण असें की, स्पृश्य लोकांप्रमाणें इंग्रज अधिकाऱ्यांतही आम्हांस शिष्टाचारानें कांहीं दिवस तरी वागा असा उपदेश करणारे लोक आढळले आहेत. चालू वहिवाटींनें ज्या गोष्टी अस्पृश्य लोकांस करण्याचा प्रघात नाहीं त्या गोष्टी त्यांना हक्कानें करतां येणार नाहींत असे जे स्पृश्य लोक म्हणतात त्यांना शिष्टाचार व कायदा यांतील भेद कळत नाहीं. पण आमच्या इंग्रज सरकारनें मात्र तशी भूल करूं नये. ज्याप्रमाणें आपल्या शेजाऱ्याशीं नीट बोलावें, तो आजारी पडला तर त्याची विचारपूस करावी, तो अडचणीत असतां त्यास द्रव्यद्वारा मदत करावी या गोष्टी शिष्टाचाराच्या आहेत, तसेंच स्पृश्य लोंक आपणांपेक्षां विशेष पवित्र व सन्मान्य आहेत त्यांचे सेवक म्हणून अस्पृश्यांनी त्यांच्या खांदास खांदा लाउं नये, देवळांत किंवा तळ्यावर जाऊन ती अशुद्ध करून त्यांचीं मनें दुखवूं नयेत, त्यांस लवून दुरून मुजरा करावा, त्याच्याप्रमाणेंच पोषाक करून त्यांची बरोबरी करण्याची हांव धरूं नये वगैरे वगैरे गोष्टी शिष्टाचाराच्या असतील. परंतु शिष्टाचार म्हणून त्या अस्पृश्य लोकांवर केव्हांही लावतां येणार नाहींत. आमच्या इंग्रज अधिकाऱ्यास आम्हांस स्पष्टपणें असें सांगावयाचें आहे की, या बाबतीत स्पृश्य व अस्पृश्य यांच्या मधील लढ्यांत हिंदु व मुसलमानांच्या लढ्यांत जी विचार सरणी टिळकांनी मांडली होती तीच विचारसरणी अमलांत आणेली पाहिजे. हिंदुमुसलमानांच्या वादांत शिष्टाचार पाळावयाचा किंवा कायदा पाळावयाचा या विषयीं लिहितांना टिळकांनी असें सांगितलें आहे की " शिष्टाचार सक्तीनें अमलांत आणणें हें सरकारचें काम नव्हें. इतकेंच नाहीं तर सरकारकडे गेलें असतां कायद्याप्रमाणेच न्याय व्हावयाचा अशी जोपर्यंत लोकांची समज आहे तो पर्यंतच ते सौजन्यानें काम करण्यास तयार असतात." आमचे म्हणणें यापेक्षां निराळें नाहीं. आधी अस्पृश्यांना जे त्यांचे कायदेशीर हक्क आहेत ते द्या. मग शिष्टाचाराची भाषा बोलूं. जी विचार सरणी स्पृश्यलोकांनी मुसलमानांस लागू करावी असें म्हणतात तीच अस्पृश्यांच्या बाबतीत इंग्रज अधिकाऱ्यांनी स्पृश्यलोकांत लागूं केली तर त्यांना कोणी दोष देऊं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. म्हणून शिष्टाचाराप्रमाणें स्पृश्य लोकांस वचकून अथवा भिऊन अस्पृश्य लोकांना आपले हक्क सोडून द्या अथवा त्याच्या मनोभावनेनुरूप ते सांगतील तशा प्रकारच्या निर्बंधास कबूल व्हा असा कमकुवत पणाचा सल्ला

यांनी अस्पृश्यांस देऊं नये. स्पृश्यांच्या इच्छेप्रमाणें वागल्याशिवाय अस्पृश्यांस जर गत्यंतरच नाहीं तर मग इंग्रज सरकारचे राज्य असण्याची बिलकूल जरूरी नाहीं. अस्पृश्य लोक जाऊन स्पृश्यांच्या पाया पडतील व ते देतील ते घेतील. पण इंग्रज सरकारास आम्ही असें निक्षून सांगतो कीं ती

## पूर्वीची स्थिती आतां उरलेली नाहीं.

अस्पृश्यलोक पूर्वी इतके हताश किंवा नाउमेद राहिले नाहीत. आपलें अभिजात हक्क प्रस्थापित करण्याचा त्यांनी धाडसी निश्चय केला आहे. व त्यांना प्रतिबंध करणाऱ्यास प्रतिकार करण्याची त्यांची धमक आहे. तरी तुम्ही दोन्ही वर्गास न्यायानें व निःपक्षपातानें वागविणें अत्यंत जरूर आहे. स्पृश्य व अस्पृश्य या लोकांतील सार्वजनिक हक्काच्या अमंलबजावणीच्या बाबतींत यापूर्वी तंटे बखेडे झाले नाहीत ही गोष्ट खरी. तरीपण अस्पृश्य लोकांत ज्ञानाची वाढ झपाट्यानें होत आहे. जुन्या धर्म समजुती त्यांच्यातून नष्ट होत आहेत. आपण वरच्या लोकांच्या जोड्यांत वागणारे आहोंत, त्यांच्या उष्ट्या घासाचे धनी आहोंत, ही सेवक व याचकधर्म दर्शविणारी भावना आतां त्यांच्यात उरलेली नाहीं. धर्मानें घालून दिलेली खालची पायरी ओलांडून वरच्या पायरीवर इतरांच्या बरोबरीनें उभें राहण्याचा त्यांनी निश्चय केला आहे. अशा स्थितीत डोळेझांक न करतां व शिष्टाचार न सांगतां त्यांस आपले हक्क बजावण्यास जी कायदेशीर मदत करतां येण्यासारखी आहे ती अवश्य करावीं असें इंग्रज सरकारास आमचें निकडीचें सांगणें आहे. महाड येथें स्पृश्यांची आगळीक, दांडगाई व अन्याय जीं अस्पृश्यांनी सहन करून घेतली ती फक्त सरकार योग्य हक्कांचें संरक्षण करील या आशेवरच घेतली. ती आशा जर व्यर्थ ठरली तर अर्थातच महाड येथें त्यांनीं जी शांतता ठेविली तशी दुसऱ्या प्रसंगी ठेवतां येणें शक्य होणार नाही व आत्मसंरक्षणार्थ त्यांना अखेर हातांत काठ्या घेणे भाग पडेल. ज्ञान व लाचारी ही एकवट होऊन त्यांची ठिणगी पडण्यापूर्वीच सरकारनें आपली जबाबदारी ओळखावी हेंच उचित आहे. अशा प्रकारची ठिणगी पडली तर हा कलहाग्नि किती पेट घेईल याचा नेम नाही. तो अनावर होण्यापूर्वीच विझेल अशी व्यवस्था करणें शहाण्या सरकारचे आद्य कर्तव्य आहे.

शेवटी दोन गोष्टींचा विचार करणें बाकी राहिलें आहे. तो करूं. प्रथम **हें कोणी करावें ?** स्थानिक संस्थानांनी करावें किंवा स्थानिक सरकारनें करावें असा प्रश्न उद्भवतो. सार्वजनिक सोयीं अस्पृश्य वर्गास खुल्या असाव्या हा रा. बोले † यांचा ठराव सरकारनें मान्य केला याबद्दल आम्ही त्यास धन्यवाद

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक-४.

देतों. परंतु ही गोष्ट स्वतः करण्याऐवजी लोकलबोर्डे व म्युनसिपालिट्या यांच्यासारख्या स्थानिक संस्थांवर सोपवून दिली याचे आम्हांस सखेदाश्चर्य वाटतें. या देशांतील स्थानिक संस्थांत ज्या लोकांचा भरणा विशेषतः होतो ते लोक इतक्या कोत्याबुद्धीचे व जुन्यामताचे आहेत की, त्यांच्या हातून अस्पृश्यांना सार्वजनिक सोयीचीं ठिकाणें खुलीकरण्याची आवश्यकता भासमान होण्यास शेंकडों वर्षे लागतील. त्यांच्या बुद्धिचा विकास होई तों पर्यंत अस्पृश्यांना त्यांचे हक्क बजावण्यास वाट पाहावयास लावणें इंग्रजसरकार सारख्या सामर्थ्यवान सरकार लाजीम नाहीं. ठराव पास झाल्यास सहा वर्षे लोटली परंतु ज्या स्थानिक संस्थांनी त्याची अंमलबजावणी केली असेल अशा संस्था हाताच्या बोटावर देखील मोजण्या इतक्या नाहीत. आपल्या प्रजेपैकी एवढ्या मोठ्या प्रजाजनाचे हक्क प्रतिगामी धोरणाच्या स्थानिक संस्थांवर अवलंबून न ठेविता त्याची जबाबदारी स्वतः स्थानिक सरकारनें आपल्या शिरावर घ्यावीं हें कर्तव्यतेच्या दृष्टिनें त्यांस भूषणावह आहे. तेव्हां सार्वजनिक ठिकाणें खुली करण्याची जबाबदारी स्वतः स्थानिक सरकार आपल्या आंगावर घेईल अशी आम्हांस बळकट आशा आहे. '' सार्वजनिक ठिकाणें कोणती '' हा या ठिकाणी दुसरा विचारांत घेण्यासारखा प्रश्न आहे. सार्वजनिक म्हणजे सरकारी असा कांही लोक सार्वजनिक या शब्दाचा संकुचित अर्थ करून अस्पृश्यांस बरीचशी तळी व देवळें बंद करण्याचा उपक्रम करतील हें आम्हीं जाणून आहों. कारण सरकारी खर्चाने चालू असलेली तळी व देवालये फारच थोडी आहेत. पण सार्वजनिक या शब्दाचा अर्थ असा करता येत नाही हे विचाराअंती कळून येण्यासारखे आहे. सर्वांच्या उपयोगाकरितां तें सार्वजनिक हाच सार्वजनिक या शब्दांचा खरा अर्थ आहे. मग ती सार्वजनिक व्यवस्था सरकारी असो, बिनसरकारी असो किंवा निमसरकारी असो. एकाद्या सद्‌गृहस्थानें एकादे देऊळ बांधलें अगर तळे बांधलें व तें अमुक एका समाजाच्या सोईसाठीं म्हणून बांधलें तर तें सार्वजनिक आहे असेंच धरलें जाईल व त्या समाजांतील दरेक व्यक्तीस त्याचा उपभोग करण्याचा अधिकार प्राप्त होईल. कोणाही गृहस्थाने आपल्या मिळकतीतून एकादे कार्य उभारिले व तें कार्य लोकोत्तर आहे किंवा देवोत्तर आहे असें जाहीर केलें तर तें कार्य ज्याच्यासाठी लोकोत्तर किंवा देवोत्तर करण्यांत आलें असेल त्यांना त्याचा उपभोग घेण्याचा सर्वसामान्य हक्क प्राप्त होतो व खुद्द मालकासही त्यास वापर करण्यास प्रतिबंध करतां येत नाहीं. उदाहरणार्थ पंढरपूर येथील विठोबाचे देवालय ज्या कोणी बांधले असेल तें देवोत्तर कार्य जर वैष्णवपंथी लोकांकरिता योजिलेलें असेल तर दरेक वैष्णवपंथी माणसास तेथें जाण्याचा हक्क आहे. मग तो वैष्णवपंथी माणूस ब्राम्हण असो की मांग असो. त्यांचे हक्क समसमान आहेत. नुकत्याच

झालेल्या सकलात विरुद्ध बेला (२८ बॉंबे लॉ. रीपोर्टर पा. १६१) यांत प्रिव्ही कौन्सिलने जो निकाल दिला आहे त्याचा बारकाईने विचार केल्यास आम्ही सार्वजनिक या शद्बाचा केलेला अर्थ वाजवी आहे याची खात्री होईल.

स्पृश्य व अस्पृश्य या समाजांत महाड येथें जो वाद उद्‌भवला त्यांत सरकारच्या जबाबदारीविषयी आम्हांस आमचें मत स्पष्टपणें व खुलासेवार मांडतां यावे म्हणून या विषयाचे विवेचन आम्हीं विशेष विस्तृत प्रमाणावर केलें आहे. त्यांत अस्पृश्य लोकांचे मागणें न्यायाचें व हक्कांचे आहे असे आम्हीं सिद्ध करुन दिलें आहे. कोणत्या सोयीस सार्वजनिक म्हणतां येईल यांचेंही दिग्दर्शन आम्हीं केलें आहे. अस्पृश्यांना या सार्वजनिक सोयीचा उपयोग करुन घेण्याचा हक्काच्या बाबतीत मदत करण्यास कशा प्रकारची उपाय योजना केली पाहिजें हेंही आम्हीं सुचविलें आहे. आतां सरकार या बाबतींत काय करते याकडेच आमचे डोळे लागून राहिले आहेत. शेवटी सरकारने अशा प्रसंगी स्पृश्य लोकांस दुखवूं नये म्हणून अस्पृश्यांस मदत करण्याचें टाकलें तर सरकारचा दीर्घ बाहु पक्षघाताने लुळा पडला आहे ही समजूत बळावत गेल्याने जो अनर्थ ओढवेल याची जाणीव सरकारला करुन देण्यासाठी जो इशारा न्यायमूर्ती टर्नर यांनी दिला होता त्याची आठवण करुन देऊन हा हातीं घेतलेला विषय आम्ही पूरा करित आहोंत. न्यायमूर्ति टर्नर म्हणतात, " कायदेशीर हक्काचे सरकारनें संरक्षण न करतां उलट त्यासच प्रतिबंध केल्यास लोकांची अशी समजुत होते की, ज्या जमावाकडून दंगा होण्याचा संभव आहे त्यांच्यापुढे अधिकाऱ्यांचे कांहीच चालत नाहीं. अर्थातच आपल्यां हक्काच्या शाबिती करतां कोर्टाचे उंबरठे चढण्यापेक्षां दंगा करण्याचा देखावा करणेच अधिक फलदायक ठरेल. बहुजन समाजाची ज्यावेळी अशा प्रकारची समजुत होऊं लागेल त्यावेळी कायदेशीर हक्काची बजावणी करणाऱ्यांना सरकारी संरक्षण देण्यांस जितका धोका आहे त्यापेक्षां तसले संरक्षण देत नाहीं म्हणण्यांत अधिक भयंकर धोका आहे. "

खिस्ती झालेल्या अस्पृश्यांचे सार्वजनिक हक्कांचे सरकार संरक्षण करतें हें दुसरीकडे दिलेल्या नगर येथील पाणी प्रकरणावरुन † सिद्ध होत आहे. हिंदु धर्मास धरुन राहिलेल्या अस्पृश्यांस तसें संरक्षण मिळतें किवा नाहीं हें आतां पाहणें आहे.

● ● ●

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक-५.

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ६ मे १९२७.

# २६

# ब्राह्मणेतरांना अस्पृश्यांचे शत्रु दाखवून ब्राह्मणांना अस्पृश्य मित्र गणतील हा समज चुकीचा

हिंदूंच्या तरणोपायाची जशी स्वामी श्रद्धानंदजी सारख्या महात्म्यांना अहर्निश चिंता पडली आहे तशी ब्राह्मणांच्या तरणोपायाची नेहमी चिंता वाहाणारे लोक आहेत आणि म्हणूनच हिंदू संघटनेबरोबर ब्राह्मण संघटना चालू आहे. या महाराष्ट्रांतील ब्राह्मण संघटनेचें अध्वर्यु पुण्याचे रा. माटे हे आहेत. ब्रह्मवृंदांच्या वाटेतील कांटे जाऊन त्यांचा कारभार सुखाचा होवो एवढीच काय ती त्यांची इच्छा ! व त्यासाठी महार हाती सांपडले नाहीत तरी चांभार, मांगांना हाती धरण्यास ते कचरत नाहींत. उलट अशा कामीं ते तत्पर असतात. कारण अशा मसलतीनें ब्राह्मणांना अस्पृश्यांचा आधार मिळतो व ब्राह्मणेतरांपेक्षां ब्राह्मणवर्ग अस्पृश्यता निवारण्याचें कामीं जास्त उपयोगी पडतो, अशी फुशारकी मारावयास सांपडते. ' एक पंथ दो काज ' हा माट्यांचा हेतु नसून ' दो पंथ एक काज ' हाच त्यांचा खरा हेतु आहे, हें आम्हांस ठाऊक आहे. तसें जर नसतें तर अस्पृश्यता निवारकवाल्या माट्यांनीं महाडला जाऊन जो खटाटोप केला तो कशाला केला असता ? तो कांहीं अस्पृश्यांचा कैवार घेऊन किंवा त्यांची बाजू मांडावी म्हणून केलेला नाहीं हें उघड आहे. फक्त अस्पृश्यांनीं शेटजी भटजींवर केलेले आरोप वृथा आहेत हें त्यांना दाखवावयाचे होतें. ही भावना रा. माटे यांच्या मनांत नसती तर त्यांनी महाडची वाट धरिली असती किंवा नाहीं याबद्दल आम्हांस शंका आहे. कसेंही असो. मोठ्या कष्टानें मिळविलेली माहिती रा. माटे यांनी बुधवार, ता. ४ मे रोजी पुणें येथें शिवाजी मंदिरांत व्याख्यानरुपानें निवेदन केली. महाड येथील घडलेल्या प्रकाराच्या खरेखोटेपणाबद्दल आम्हांस जें कांहीं सांगावयाचें होतें तें सर्व आम्हीं सांगून टाकल्यामुळे माटे व दाते यांनी प्रसिद्ध केलेल्या माहितीसंबंधी लिहिण्याची आम्हांस कांहीं गरज भासत नाहीं. आम्हांस इतकेंच सांगावेसें वाटतें कीं, शेटजीभटजींनी मारामारीत भाग घेतला नाहीं असें जें माटे व दाते यांनी जाहीर केलें आहे तें साफ खोटें आहे. जी गोष्ट आम्हीं स्वत: डोळ्यांनी पाहिली तिच्या खरेपणाविरुद्ध कोणी कांहींही सांगितलें तरी त्या बाबतीतील आमचें मत कधींही बदलणार नाही. ब्राह्मणांनी मारामारींत भाग

घेतला होता, इतकेंच नव्हे तर या बाबतींचे सारें खलबत एका ब्राह्मण वकिलाच्या घरीं झाले हें आम्हीं पुरतेपणी जाणून आहोत. अस्पृश्यांनी केलेले आरोप खोटे आहेत हें दाखविण्यासाठी रा. माटे यांनी जो पहिला मुद्दा मांडिला आहे तो असा की, भानुदास कांबळ्याच्या बायकोला मारलें नाही असें कांबळेच म्हणतो तर तिला मारली असे म्हणणारे लबाड नाहींत काय ? भानुदास कांबळे यांच्या बायकोला मारली किंवा नाही या मुद्यावर रा. कांबळे यांची साक्ष घेण्यास आम्हीं बिलकूल तयार नाही कारण ज्यानें आपली बायकापोरें शत्रूच्या टापूंत सोडून आपला दोन टन वजनाचा देह बचावण्यासाठी पोलीस ठाण्याचा आश्रय केला व त्यांचे काय झालें याची तीन चार दिवस पर्यंत वास्तपुस्तही केली नाही त्या पशूला सत्याची काय चाड असणार ! पण रा. माट्यांना आपल्या हकिकतीच्या खरेपणाबद्दल एवढा विश्वास वाटतो तर सभेत महाडच्या परिषदेला हजर असून झालेला प्रकार डोळ्यांनी पाहणाऱ्या लोकांनी खरी हकीकत सांगण्यास आपणांस अवसर द्यावा अशी विनंती केली असतांना देखील ती कां अमान्य करण्यांत आली ? या एका गोष्टीवरूनच माट्यांचे हकिकतीत किती खरेपणा असेल याचा सुज्ञांनी तर्क करावा. दुसरी गोष्ट रा. माटे यांनी पुढें आणिली आहे ती ही की, शेटजी भटजीनीं मारामारीत तर भाग घेतलाच नाही पण परिषदेपूर्वी व मारामारीनंतर अस्पृश्यांना सहाय्यच केलें व अशा सहाय्यकार्यांत महाड म्यु. पालिटीचे अध्यक्ष रा. टिपणीस यांचा नामनिर्देश केला आहे. पण दुसरीकडे छापलेल्या टिपणीसांच्या पत्रांतच † " मी अस्पृश्यांना मदत केली नाही " अशी कबुली दिली आहे. शितावरून भाताची परीक्षा होते तशी टिपणीसांसंबंधीच्या विधानानें माट्यांची हकिकत कितपत खरी आहे, याचा निकाल सहज होऊं शकतो. एवढी खोटी गोष्ट अगदी खरी म्हणून माट्यांनी कशी दडपून दिली याबद्दल कोणासही विस्मयच वाटेल. पण तसें होणें अगदी साहजिक आहे. चोरालां सारें जगच चोर वाटतें ; तसें रा. माट्यांना वाटलें असेल की, टिपणीसांनी मदत केली हें जरी खोटें असलें तरी काय टिपणीस तसें म्हणतील ! फुकाचा लौकिक पदरी पडत असतां तो कोण दूर लोटून देईल ? पण रा. टिपणीस यांनी माट्यांचा खोटेपणा चव्हाट्यावर आणण्यासाठी जी सत्यप्रियता दाखविली त्याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करतों. आपल्या तंगड्या आपल्याच गळ्यांत आल्यावर आतां रा. माटे हे काय शक्कल लढवितात तें पाहूं.

---

†पाहा परिशिष्ट ६.

महाड येथें घडलेल्या पाणी प्रकरणासंबंधी अनेक वृत्तपत्रांनीं आपआपलें विचार प्रगट केले. पण त्याबाबतींत केसरी कांही लिहील असे आम्हांस केव्हांच वाटलें नव्हतें. जेथे इतर वर्तमानपत्रांनी सदरील प्रकरणांची माहिती देण्याकरितां आपल्या पत्राचे दोन दोन चार चार कालम खर्ची घातले तीच बातमी अवघ्या ५० ओळीत आटवून शेवटी '' झाला हे प्रकार अत्यंत गर्हणीय झाला. '' इतकें म्हणून ज्यानें विषयाची समाप्ती केली, तो केसरी पुन्हां या प्रश्नावर कांहीं लिहील हें अगदी असंभव्य होतें. कारण, सामाजिक सुधारणेच्या कार्याला विरोध करावयाचा हा केसरीचा नेहमीचा बाणा ! त्या बाण्याला बट्टा लागेल असें कृत्य केसरी केव्हांच करीत नाही, व त्याशीं विसंगत असलेल्या लेखास अगर मजकुरास सहसा जागा देत नाहीं. परिस्थितीत बराचसा बदल झाल्यामुळे केसरीच्या दृष्टींत थोडासा फरक झाला आहे खरा. मुसलमान लोकांच्या तडाक्यांत आपला निभाव लागणार नाहीं या भयामुळें व स्वराज्याची मागणी उजळ माथ्यानें मागतां यावी या इच्छेमुळें केसरी आतां पूर्वीप्रमाणें अस्पृश्यता निवारणास विरोध करीत नाहीं, व त्यासंबंधीं इतरांचे लेखांस जागा देतो. पण ' सुंभ जळलें तरी पीळ जात नाही ' तसें केसरीनें आपला बाणा कायमच ठेविला आहे. दुसऱ्यांचे लेख केसरी छापतो पण स्वतः कधीं कांहीं लिहीतो कां ? जणू लिहिलेंच तर लिहिणाराचे हात झडतील ! इतकेंच नव्हे तर अस्पृश्यांना उत्तेजनपर कृति केसरी आपल्याकडून चुकून देखील घडूं देत नाही. आम्हांस पक्कें आठवतें कीं, जेव्हा १९१९ साली आम्ही ' मूकनायक ' पत्र सुरू केलें तेव्हां केसरीला आमची जाहिरात फुकट छापा अशी विनंति केली होती. पण ती धुडकावून लावण्यांत आली ! तद्नंतर ' तुमचा आकार देतों, छापा ', असें लिहिल्यावर जागा रिकामी नाहीं, असें उत्तर देण्यात आलें ! इतकेंच नव्हें तर अभिप्रायही दिला नाहीं व परत भेटही दिली नाहीं. केसरीच्या अभिप्रायास आम्ही तीन दमड्यांचींही किंमत देत नाहीं. राष्ट्राचा उत्कर्ष करूं पाहणाऱ्या या पत्रानें एकाद्या ब्राह्मणेतर लेखकासंबंधीं प्रशंसापर उद्‌गार केव्हांही काढलेले नाहीत. ब्राह्मणापेक्षां ब्राह्मणेतर गुणानें श्रेष्ठ आहेत असें म्हटल्यानें आपल्या पुर्वजांसहीत आपण रौरव नरकांत पडूं असें ज्यांना नेहमीचें भय वाटतें ते आमच्या सारख्या अस्पृश्य जातींतील माणसाने चालविलेल्या पत्राचा योग्य शब्दांत उल्लेख करतील याची आशा करणें नको. पण परत भेटीच्या सौजन्याला देखील केसरी उणा पडला होता हें सहसा कोणासही खरे वाटणार नाही. पण आम्हांस मात्र त्याची कल्पना होती. कारण केसरीचें ह्रदय आम्हांस पूर्णपणें अवगत आहे. एकमेकांचें विचार एकमेकांस कळावे व वादास तोंड लागून त्याचा निकाल व्हावा एवढाच काय तो भेटी परतभेटीचा उपयोग आहे. पण केसरीला वाटलें आपणांत व

मूकनायकांत जर असा भेटी परतभेटीचा संबंध ठेवला तर तो मांगाला ब्राह्मणानें आपली मुलगी दिल्यानें घडणाऱ्या प्रतिलोम संबंधाप्रमाणें कमीपणाचा होणार ! यांची योग्यता ती काय, यांना परत भेट देऊन यांचे आमचें नसतें नातें जोडून घ्यावयाचे काय म्हणून, वगैरे वगैरे अहंभावनेनें पछाडल्यामुळें केसरी परत भेटीला आला नाही. जुनी गोष्ट कशाला ? आम्ही ' बहिष्कृत भारत ' सुरू केल्यापासून आमच्या पत्राचे अंक नियमितपणे आम्ही केसरीकडे व्यवसाय बंधू या नात्यानें पाठवित असतों. पण आमच्या सौजन्याची फेड म्हणून गेल्या केसरीच्या अंकांत कोणासही न दिसेल अशा एका कोन्याकोपऱ्यांत पोच तेवढी दिली आहे. पुन्हां अभिप्राय नाही तो नाहींच ! जेथे वाटेल त्या खरकट्या मरकट्या पत्रावर अगर नासक्या कुसक्या जिनसांवर अभिप्राय देण्याचा केसरीचा प्रघात आहे तेथें बहिष्कृत भारतावर अभिप्राय देऊ नये यांत केसरीचा दिमाख नाही तर काय आहे. पण केसरीचा हा दिमाख फार दिवस चालावयाचा नाही. घमेंड जिरण्याची वेळ आतां जवळ येऊन ठेपली आहे. तसें जर नसतें तर केसरी परत भेटीला कां आला असता अगर त्याला महाडच्या पाणी प्रकरणाच्या बाबतींत कां वाचा फुटली असती ?

' हत्ती चलता है कुत्ता भुकता है ' असा चढेलपणा ठेवून इतःपर चालावयाचें नाहीं, म्हणून तर तारीख ३/५/१९२७ च्या अंकांत केसरीनें आपल्या स्फूट सुचनांत महाडच्या पाणी प्रकरणावर आपले विचार प्रगट केले आहेत. अस्पृश्यता निवारक मंडळाच्या माटे मास्तरांनीं व हिंदु महासभेच्या दात्यांनी चवकशी करून जी माहिती केसरीला पुरविली तीवरून केसरी म्हणतो कीं, मारामारींत ब्राह्मणेतरांनीच भाग घेतला होता. शेटजीभटजीनी मारामारीत भाग तर घेतला नाहींच, पण अस्पृश्यांना सभेच्या कामी तसेंच मारामारीनंतर मदतच केली. यास्तव शेटजीभटजींना शिव्याशाप देणाऱ्यां अस्पृश्यांनी आपली दिशाभूल होऊं देऊं नये, असा केसरीचा पोक्तपणाचा सल्ला आहे. शेटजीभटजींना जबाबदार धरण्यांत आम्ही दिशा भूल करीत आहोंत असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. परंतु शेटजीभटजींनी मारामारींत भाग घेतला नसून फक्त ब्राह्मणेतरांनीच भाग घेतला होता हें खोटें विधान जरी खरें मानलें तरी त्याबद्दल केसरीनें काय सांगितलें आहे ? ब्राह्मणेतरांची कान-उघाडणी केली आहे किंवा अस्पृश्यतानिवारणार्थ एकादा उपाय सुचविला आहे ? मुळींच नाहीं. एवढ्या मोठ्या प्रश्नावर लिहितांना केसरीसारख्या पत्रांनें लोकांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालावयास पाहिजे होतें. बदललेल्या मनूंत आपण कसें वागलें पाहिजे याचा खुलासा करून अज्ञ जनतेची समजूत करून द्यावयास पाहिजे होती. पण त्यांच्या लिहिण्यांत

उदार कल्पनेची कोठें छटाही दिसत नाहीं. उलट त्यांनें जें लिहिलें आहें तें अगदी कोत्या बुद्धीचें निदर्शक आहे. त्यांत शेटजी भटजींची वकिली करण्याचा क्षुद्र हेतु आहे, इतकेंच नव्हे तर शुद्ध आगलावेपणा आहे. असें कां, याचा तपास केला असतां असें दिसून येईल कीं, अस्पृश्यतानिवारण्याचे बाबतींत साऊथ आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांना अस्पृश्यतानिवारणाची जितकी कळकळ आहे त्याहून जास्त कळकळ केसरीला नाहीं. दोघानांहि अस्पृश्यता घालवावयास नको. उलट आपल्या स्वार्थी धोरणाला एक कारण म्हणून तिची होईल तितकी जोपासना करण्याकडे यांचें लक्ष ! हिंदी लोकांनीं समान हक्क मागितले कीं, साऊथ आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांनीं अस्पृश्यतेच्या अन्यायाचें घोडें दामटलेंच ! तसेंच ब्रह्मणेतरांनीं ब्राह्मणांशी समान हक्क मागितले कीं, केसरीनें तुम्हीं अस्पृश्यांना विरोध करतां मग तुम्हाला आमच्या बरोबरीनें हक्क मागण्याचा काय अधिकार असा प्रश्न केलाच. !

ब्राह्मणेतरांच्या सबबीवर केसरी कंपुंतील लोकांस अस्पृश्यता निवारण्याचे बाबतीत आपले कर्तव्य टाळण्यास कसा सोपा मंत्र सांपडला आहे हे अनुभवसिद्ध आहे. दिवेकर शास्त्र्यांसारखे लोक सांगतात की, अस्पृश्यांना देवळात व पाणवठ्यावर घ्यावयास आम्हां ब्राह्मणांस कांही हरकत नाही. पण ब्राह्मणेतर लोकांना तें खपत नाही. हिंदुसमाजांस लोकसंग्रह व्हावा म्हणून तर अस्पृश्यांना जवळ करावयाचें. पण त्यांच्यासारख्या अल्पसंख्यांक लोकांना जवळ केल्यानें ब्राह्मणेतरांसारखे बहुसंख्यांक लोक फुटून हिंदुसमाजाच्या बाहेर जातील ! मग आम्हीं अस्पृश्यांना जवळ करून काय करावें ? केसरी म्हणतो आम्ही जवळ करावयास तयार आहोंत. तुमचे शत्रू आहेत ते ब्राह्मणेतर. त्यांच्याशी तुम्ही जें भांडण भांडावयाचें तें भांडा. आम्हाला काय सांगतां ?

ब्राह्मणेतरांचे हे केवळ बुजगावणें आहे. ज्याला कांहीं करावयाचें नाही तो हें पुढें करतोच. पण ज्यांच्या मनांत करावयाचें आहे त्यांना ते आड येत नाहींत याबद्दल आमची खातरी आहे. हें नुकतेंच बदलापूर येथे झालेल्या शिवजयंतीच्या वेळी[Δ] एका साध्या भिक्षुकाने सिद्ध करून दिलें आहे. बदलापूर येथें हिंदु

---

[Δ] बदलापूर जि. ठाणे येथे दि. ३ मे १९२७ ला त्रिशत सांवत्सरिक श्रीशिवाजी उत्सव डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. शिवाजी महाराजांच्या आंगच्या निरनिराळ्या गुणावर बाबासाहेबांनी अत्यंत परिणामकारक एक तासभर भाषण केले. शेवटी ते म्हणाले, " ज्या शिवाजीने आपल्या लोकोत्तर गुणाने राज्य मिळविले ते त्यांचे राज्य चिरकाल का टिकले नाही याचे कारण हेच की, त्या राज्याचा अभिमान सर्वांना सारखाच नव्हता. एक राजा गेला व त्या ठिकाणी दुसरा राजा आला तरी लोकांच्या नित्याच्या व्यवहारात काहीच फरक होत नसे.–पाहा, खंड १८, भाग-१, भाषण क्रमांक-८ पृ.५१-५२.

मुसलमानांत तेढ उत्पन्न झालेली आहे हें सर्वश्रुत आहेच. तेव्हा तेथील हिंदु समाजांत संघटना होऊन स्पृश्य अस्पृश्य भेदाभेद नाहीसा व्हावा यास्तव हा उत्सव मुद्दाम डॉ. आंबेडकरांचे अध्यक्षतेखाली घडवून आणावा, असा स्थानिक हिंदु पुढाऱ्यांनीं निश्चय केला, व ही कामगिरी बदलापूरचे पालयेशास्त्री यांजवर सोंपविण्यांत आली. परंतु डॉ. आंबेडकरांची उतरण्याची सोय कोठें करावी हा एक त्यांतला मोठा अडचणीचा प्रश्न होता. त्याची जबाबदारी आपण घेऊं म्हणून बदलापूर येथील एका प्रमुख गृहस्थानें आश्वासन दिलें होतें असें म्हणतात. पण शेवटी पालये शास्त्री यांजवरच ती जबाबदारी येऊन पडली. ती जबाबदारी पार पाडतांना पालये शास्त्री यांनी जे धैर्य दाखविलें तें वाखाणण्यासारखें आहे. डॉक्टर आंबेडकरांना आपल्या घरी पाहुणे म्हणून ठेवून घेतल्यानें आपल्या भिक्षुकीच्या धंद्यावर काय परिणाम होईल याचा त्यांना पूर्ण अंदाज होता. शिवाय आपले प्रतिस्पर्धी चित्पावन भिक्षुक ब्राह्मणेतरासारख्या अडाणी यजमानांस तुमचा भिक्षुक भ्रष्ट झाला असें सांगून फितुर करण्यास मागें पुढें पाहणार नाहीत हें ते जाणून होतेच. तेव्हां त्यांनी आपल्या दहा वीस गांवच्या यजमानास बोलाविलें व त्यांच्यापुढें आंबेडकरांचें मी आपल्या घरी आदरातिथ्य केल्यास तुम्हांला कांही हरकत आहे का ? असा प्रश्न मांडला. त्यावर जमलेल्या सर्व ब्राह्मणेतरांनी " तुम्ही तिकडे आम्ही ; तुम्हांला हरकत नाहीं तर आम्हांलाहि नाही. " असें उत्तर दिलें. अशापरी आपल्या अधिकाराचा उपयोग करून एका कर्मठ ब्राह्मणाने अस्पृश्यांबरोबर आपल्या घरी सहभोजन केले व या कामीं ब्राह्मणांनीं ब्राह्मणेतरांची समजूत केली तर ब्राह्मणेतर आड येत नाहींत असें सिद्ध करून दिलें.

केसरीपुढें या बिचाऱ्या भिक्षुकाची कांहीच मातब्बरी नाही. केसरी हें एक महाराष्ट्रांतले नाणावलेलें पत्र आहे. हल्ली जरी तें खालावलेले आहे तरी ' हिंग गेला पण वास राहिला ' या म्हणीप्रमाणे त्याचें नांव अजून आहे. व बरेचसे लोक आपलें धोरण व आपली मतें केसरीच्या धोरणावरून व मतांवरून ठरवितात. अर्थात केसरीने जर जोराने उपदेश केला तर जसा पालये शास्त्र्यांसारख्या भिक्षुकांनी त्यांच्या अंकित असलेल्या ब्राह्मणेतर जनतेला योग्य वळण लावण्याचा प्रयत्न केला तसा प्रयत्न इतर भिक्षुकही करतील याबद्दल आम्हांस बिलकूल संशय नाही. जी गोष्ट एका साध्या भिक्षुकाने करून दाखविली ती करा म्हणून सांगायचे धर्य केसरींत कोठे आहे ! छूं म्हणून अंगावर कुत्रा सोडणारा अगर सुटला असतां त्यास आवरून न धरणारा कुत्र्याचा धनी दोषी ठरत नाही, कुत्राच दोषी ठरतो हे केसरींचें सांगणे अगदी हास्यास्पद आहे. प्रसंग विशेषीं आम्ही ब्राह्मणेतरांविरुद्ध लिहितों म्हणून ब्राह्मणेतरांत

ब्राह्मण्याची ज्योत प्रज्वलित करण्याची जबाबदारी कोणावर आहे याबद्दल आमच्या मनांत शंका आहे असें मात्र कोणी मानूं नये. अस्पृश्य व ब्राह्मणेतर यांच्यात दुही व फूट पडली असतां आपल्या अधिकाराचा सदुपयोग करून तो मिटविण्याचा प्रयत्न करण्याऐवजी ब्राह्मणेतर तुमचे शत्रु आहेत येवढेंच दाखवून देण्यापुरते श्रम घेणाऱ्या ब्राह्मण लोकांना अस्पृश्य लोक आपले मित्र म्हणून गणतील असा समज करून घेणे चुकीचें आहे.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत ता. २० मे १९२७.

## २७

# महारांनी सर्व अस्पृश्यांचे हक्क प्रस्थापित करण्यासाठी आपल्या रक्ताचे सिंचन केले

ब्राह्मण अस्पृश्यांना जवळ करावयास तयार आहेत. तुमचे शत्रु आहेत ते ब्राह्मणेतर असे ठरविण्याचा केसरीने जो प्रयत्न चालविला तसाच प्रयत्न मांग जातीचेही पुढारी करीत असल्याचे विचार डॉ. बाबासाहेब आंबेडकर खालीलप्रमाणे प्रदर्शित केले आहेत—संपादक.

अपवाद म्हणून एका माणसाचा उल्लेख करणें भाग आहे. अस्पृश्य समाजांतील मांग जातीचे पुढारी रा. सकट यांचे धोरण बाकीच्या अस्पृश्य जातीच्या पुढाऱ्यांहून नेहमीच भिन्न असतें. याचें कारण अगदी उघड आहे. बाकीचे अस्पृश्य पुढारी आपली मतें आपणच बनवितात. पण रा. सकट यांची मतें माटे मास्तर यांजकडून तयार होऊन येतात. ब्राह्मणांत अस्पृश्यता निवारणाची सोंगें घेऊन मिरविणाऱ्या लोकांपैकी माटे मास्तर हे एक आहेत. रा. सकटांची मतें माट्यांच्या मुशीतून ओतली गेली असल्यामुळें त्यांना सहजी ब्राह्मणी ठेवण येते. म्हणूनच ब्राह्मण लोक अस्पृश्यांचे खरे कैवारी असून ब्राह्मणेतर लोकच अस्पृश्यांचे खरे वैरी आहेत असा ते नेहमी ब्रह्मघोष करीत असतात. ब्राह्मणेतर आड येतात हें आह्मांसहि कबूल आहे. पण ब्राह्मण कधींच आड येत नाहींत असें मात्र आम्हास प्रामाणीकपणें म्हणता येत नाहीं. आपल्या पुढाऱ्यांच्या नांवाचा जप करतां करतां रा. सकट हें आतां आपल्या पुढाऱ्यांत इतके विलीन होऊन गेले आहेत कीं, स्वजातीचें हित कोठें आहे हें पहाण्याइतका आपलेपणा त्यांच्यांत उरलेला दिसत नाहीं. भाल्याच्या ता. २-५-१९२७ च्या अंकांत या मांगजातीच्या पुढाऱ्यानें एक पत्र लिहिलें आहे की, " महार लोक मांगांना कमी लेखतात, त्यांना आपल्या विहिरीवर पाणी भरूं देत नाहींत. आणि त्यांचा नवरा घोड्यावर बसून रस्त्यांतून जाऊं देत नाहींत. तेव्हां प्रथम महार लोकांनी मांग लोकांना समसमान लेखावें, मग स्पृश्य हिंदूंशीं समानतेचा झगडा करावा. " रा. सकटांचा महारांवरचा आरोप खरा असेल. पण तेवढ्यावरून चवदार तळ्यावर पाणी भरण्याचा अधिकार तसेंच इतर सार्वजनिक हक्क प्राप्त करून घेण्याचा अधिकार महार लोकांस पोहोंचत नाहीं, हें त्यांचें म्हणणें अगदी नादानपणाचें आहे. घरधनी आपल्या घरांत मला शीरू देत नाहीं म्हणून घरधन्यास घराचा कब्जा घेण्यास माझी

हरकत आहे असें म्हणून एखादा शेजारी अडथळा करू लागला तर त्यांचें म्हणणें ऐकून घेण्या ऐवजीं कोणीही झाला तरी त्याचें तोंडच रंगवील. महार लोकांविरुद्ध मांग लोकांनी अशा प्रकारच्या तक्रारी केल्या तर जे कायदेशीर हक्क महार लोकांना मिळाले पाहिजेत ते हक्क आपण बुडवूं शकूं असा जर रा. सकट यांचा अंदाज असेल तर रा. सकट म्हणजे एक खुळे गृहस्थ आहेत असेंच मानावें लागेल. महार लोक जर अन्याय करित असले तर त्यांना ठिकाणावर आणण्याचा प्रयत्न रा. सकट यांनी करावा. त्यांत त्यांना महारांचे पुढारी सर्व प्रकारची मदत करतील, असें आम्ही अभिवचन देतों. पण महार लोक मांग लोकांना भावाप्रमाणे लेखित नाहींत म्हणून ब्राह्मणांशी संगनमत करून महारांच्या न्याय्य हक्कांवर गदा आणण्याचा प्रयत्न रा. सकट हे जर करतील तर ते निष्फळ होणार आहेत हें आम्हीं आधीच सांगतों. पण केवळ मांग लोकांच्या हिताच्या दृष्टीनें जरी पाहिलें तरी महार लोक आपणांस बंधुभावाच्या नात्यानें वागविण्यास तयार नाहींत, या सबबीवर मांग लोकांनीं वरिष्ठ हिंदूंशीं आपल्या हक्काचें भांडण भांडावयास पुढे येऊं नये ही कोणत्या शहाण्याची रीत आहे हें आम्हांस कळत नाहीं. चवदार तळ्यावर जाऊन पाणी घेणें हा अस्पृश्य मानलेल्या दरएक जातीचा कायदेशीर हक्क आहे. तो हक्क प्रस्थापित करण्यासाठीं प्रत्येक अस्पृश्य जातीनें आपलें सर्वस्व खर्च करणें प्राप्त आहे. खरें पाहिलें असतां महार लोकांनी मांग लोकांना जर म्हटलें कीं, " कार्य सर्वांचें; त्यासाठीं आम्हींच कां मरावें ? " तर त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. शिवाय आम्हीं आपल्या प्रयत्नानें खुलें केलेलें तळें उपयोगांत आणून आयत्या पिठावर रेघा ओढणारे तुम्हीं कोण, असें हिणवितां येण्यासारखें असतांहि महार लोकांनी तसा भाव कधी दर्शविला नाहीं. उलट महार लोकांनीं सर्व अस्पृश्य जातींचा हक्क प्रस्थापित करण्यासाठीं आपल्या रक्ताचें सिंचन केलें हा महार जातीचा मांग जातीवर उपकार झाला नाहीं असे कोण म्हणेल ? पण मांग जातीचें हित पहाण्यापेक्षां ब्राह्मण जातीचें हित पहाण्यांत गुंतून गेलेल्या मांग जातीच्या पुढाऱ्यास हें कळावें कसें ? खरा मांग जर असता तर तो महाराशीं समान हक्क मागण्या ऐवजी त्याने ब्राह्मणाशीं समान हक्क मागितले असते. एकाद्या महाराशी रा. सकट यांच्या जातभाईचा सोईरसंबंध झाला तर फार तर मांग लोक महारांच्या समान दर्जाचे होतील. पण सकटांचा सोईरसंबंध जर भालाकारांच्या जातभाईशी झाला तर मांग लोक महारांपेक्षा श्रेष्ठ दर्जाचे होतील हें उघड आहे. मग ज्यापासून महारांपेक्षां मांग लोक श्रेष्ठ होतील अशी मागणी करण्याऐवजी सार्वजनिक पाणवठें अस्पृश्यांना खुले करण्याच्या कामांत रा. सकटांनी विरोध करावा हें कशाचें लक्षण आहे ? आमच्या मतें हें, परवशतेचें लक्षण आहे. रा. सकट हे पुण्यांत

ब्राह्मण लोकांनीं स्थापन केलेल्या अस्पृश्यता निवारक मंडळाचे पगारी प्रचारक आहेत. रा. सकट यांनी अवस मागून किंवा ' दे दान सुटे गिराण ' म्हणून स्वतंत्र राहणीचा अवलंब केला असतां तरी त्यांना आपल्या मातंग ज्ञातीची बाजू निर्भिडपणें मांडता आली असती. पण ब्राह्मणांचे मीठ खाऊन त्यांच्या हिताच्या विरुद्ध जाणें रा. सकटांना शक्य नाहीं. ब्राह्मणानें पाळले पोसलेला कोणताही अस्पृश्य जातींतील माणूस अस्पृश्यांचे पुढारीपण घेण्यास नालायकच ठरेल, असें आमचें प्रामाणिक मत आहे. तोच न्याय मांगाचे पुढारी म्हणविणारे रा. सकट यांस लागू आहे. या जाणीवेनेंच कीं काय रा. सकट यांनीं कांहीं दिवसांपूर्वी चालविलेल्या आपल्या मातंगबंधू पत्रांत मांगांचा पुढारी अजून यावयाचा आहे असे म्हटलें होतें. हें खरें असो, असेंच आम्हीं इच्छितों. मात्र त्या पुढाऱ्यानें येतांना आपल्या जन्मदात्या आईबापापासून पुरेशी शिदोरी संगाती आणावी, येवढीच त्याला आमची अगाऊ सूचना आहे. नाहीं तर पोटासाठीं स्वतःची अक्कल विकण्याची पाळी त्या बिचाऱ्यावर यावयाची !

सगळेच लोक भालाकाराप्रमाणें नादान नाहींत हें कबूल करण्यास आम्हांस आनंद वाटतो. दुसरीकडे ज्या दोन ब्राह्मण गृहस्थांचे पत्र† आम्ही छापलें आहे. त्यांना महाड येथें घडलेल्या प्रसंगाचा हिंदुसमाजावर काय परिणाम होईल याची भालाकारापेक्षां जास्त जाणीव आहे. म्हणून त्यांच्या म्हणण्याचा आम्हांस विशेष आदरपूर्वक विचार करावा असें वाटतें. हिंदुसमाजांतच राहून होतां होईल तों आपली उन्नति करून घ्यावी, असें या दोन मित्रांप्रमाणें आमचेंहि मत आहे. तसेंच स्पृश्य व अस्पृश्य यांच्यांत समानता प्रस्थापित झाली नाहीं तर अस्पृश्य लोक धर्मांतर केल्याशिवाय राहणार नाहींत ही वस्तुस्थितीहि आमच्या प्रमाणें आमच्या मित्रांसहि कबूल आहे, असें असतांना आम्हांस ' रामराम ' म्हणून अभिवंदन करणें योग्य आहे काय, असा आमच्या या दोन मित्रांस आमचा प्रेमाचा सवाल आहे. आमच्या मतें एकतर त्यांनी आम्हांस नमस्कार घालावयाचा होता. नाहीं तर जोहार तरी म्हणावयाचें होतें. या दोहोंत कांहीं तरी अर्थ आहे. पण ' रामराम ' असा मर्तिकाचा शब्द त्यांनी आम्हांसंबंधी वापरावयाचा नव्हता तो शब्द मराठे लोकांना खपतो. पण अस्पृश्यांतील महार लोकांस खपत नाहीं. त्यांनीं आपलें क्षत्रियत्व, जोहारासारख्या अभिवंदनपर शब्दांत कां होईना, कायम राखलें आहे. या बाबीतील आमचा आग्रह उगाच कांहीतरी पोरकटपणाचा आहे असें मात्र आमच्या या मित्रांनीं मानूं नये. आज हिंदुसंघटनेच्या आड जर कोणती एकादी गोष्ट येत असेल तर ती ब्राह्मणांच्या अंगात मुरलेली अहंमन्यता. ही

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ७.

अहंमन्यता आमच्या सदय मित्रांतहि वास करीत आहे हें त्यांनी आम्हांस नमस्कार लिहीण्याऐवजी रामराम लिहीला यावरून उघड होत आहे. ब्राह्मणांशिवाय इतरांस नमस्कार करावयाचा नाही ही रूढी या अहंमन्यतेचे व्यक्त रूप आहे. आणि ब्राह्मण्य आहे तें तिच्यांतच आहे. आमच्या मित्रांनीं जी चूक केली ती बुद्धिपुरःसर केली नसून रूढीमुळेंच ती त्यांच्या हातून झाली असावी हें आम्ही ओळखून आहोंत. पण ज्या ब्राह्मणांना आपला पोकळ श्रेष्ठपणा सोडून इतरांशी समानतेनें वागावयाचें असेल त्यांनीं ही अहंमन्यतादर्शक रूढी बदलली पाहिजे. बाब दिसावयाला लहान पण परिणामी मोठी असें वाटल्यावरून ही चिकित्सा करणें भाग पडलें आहे. ब्राह्मण्याचा त्याग करणाऱ्या लोकांतूनहि ब्राह्मण्याचें समूळ उच्चाटण होणें कसे कठीण होतें हें यावरून दिसून येतें.

●●●

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत ता. २० मे १९२७.

# २८
# महाड येथील धर्मसंगर
# व
# अस्पृश्य वर्गाची जबाबदारी.

गेल्या दोन अंकात महाड येथील पाणी प्रकरणाच्या बाबतीत स्पृश्य हिंदूंचें तसेंच सरकारचें कर्तव्य काय आहे याचा उहापोह आम्हीं केला आहे. आज आमच्या अस्पृश्य बंधूनीं या बाबतींत काय केलें पाहिजे याचें दिग्दर्शन करण्याचें आम्हीं योजिलें आहें.

महाडचें चवदार तळें हें सार्वजनिक आहे. त्यावर सर्व जातींच्या लोकांस निर्विघ्नपणें पाणीं भरतां येतें. कोणी कोणाला हरकत करीत नाहीं. पण त्याच तळ्यावर महार, मांग, चांभार व ढोर इत्यादि जातींच्या लोकांनी पाणी भरलें असता ते स्पृश्य हिंदूस खपत नाहीं हें महाड येथील प्रकारावरून सिद्ध झाले आहें.

## असें कां होतें ?

याचा जर आमच्या ज्ञातिबंधूनीं पुरतेपणीं विचार केला तर त्यांना कळून येईल कीं, हिंदुधर्मात त्यांना अपवित्र मानण्यात येतें. त्यांचा स्पर्श झाला असतां हिंदुधर्मीय मनुष्य ओवळा होतो व त्याची अशुद्धता घालविण्यासाठीं त्यास सचैल स्नान करणें प्राप्त होतें. कांही ठिकाणीं तर त्यांची नुसती सावली पडली तरी देखील दोष घडतो व त्याचा परिहार करण्यास स्नान करावें लागतें. ही शुद्धाशुद्धतेची भावना कारणबद्ध असती तर तिच्याविरुद्ध कोणास फारसें काहीं म्हणतां आलें नसतें. एखादी स्त्री रजस्वला असेल तर ती त्या स्थितींत असेपर्यंत तिनें कोणास स्पर्श करूं नये हें म्हणणे मान्य करतां येईल. जो कोणी अमंगल असेल त्यानें तो त्या स्थितींत असेंपर्यंत शुचिर्भूत माणसास शिवूं नये यासही ना म्हणता येणार नाही. पण या जातीच्या लोकांनी स्पर्श केला असतां तो कां चालूं नये, याची संयुक्तिक अशी कारणमीमांसा कोणीच देऊं शकत नाहीं. या जातीचे लोक अमंगल राहातात म्हणून त्यांचा स्पर्श होणें निषिद्ध मानण्यात येतें असें जे सांगतात त्यांना या जातींत ज्या लोकांची राहणी स्वच्छपणाची आहे त्यांचा स्पर्श तरी कोठें खपतो आहे ? या जातीचे लोक अभक्ष्य भक्षण करतात म्हणून त्यांना दूर ठेवण्यांत येतें हें कारण देखील या कामी अपुरें पडतें. या जातीत असें

कितीतरी लोक आहेत की, जे मद्यमासाला कधी शिवत देखील नाहींत. तरीपण गोमांस भक्षक अस्पृश्यांप्रमाणें त्यांनाही दूरच ठेवण्यांत येतें. शिवाय स्पर्श हा भक्ष्याभक्ष्य यावर अवलंबून आहें असे जर म्हणावे तर मुसलमानांसारख्या अभक्ष्य अन्न खाणाऱ्या लोकास अस्पृश्य म्हणण्याची कोणा हिंदूची छाती होत नाहीं. सारांश,

## अस्पृश्यता ही एक स्पृश्य लोकांची लहर आहे

असे म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आम्ही तुम्हांला अस्पृश्य मानतों म्हणून तुम्ही अस्पृश्य, या स्पृश्य लोकांच्या लहरीशिवाय अस्पृश्यतेला दुसरे कारणच दिसत नाहीं. या आपल्या लहरीला लोक रूढी म्हणतात व रूढीला कायदा मानून ते ती अस्पृश्यांवर जबरदस्तीनें लादण्याचा प्रयत्न करतात.

अस्पृश्यता निवारण्याचे बाबतींत एक विस्मयकारक गोष्ट दिसून येते ती ही कीं, या रूढीच्या संबंधांत अस्पृश्यांचे लोकमत काय आहे याची कोणी विचारपूस देखील करीत नाहींत. उलट

## स्पृश्य जातींचे लोकमत अजून तयार नाहीं

सबब त्यांचें लोकमत तयार होईपर्यंत तुम्हीं अस्पृश्य राहिलें पाहिजे असें अगदी खुशाल सांगण्यांत येतें.

जी गोष्ट लोकांस पसत नाहीं, जिला लोकांचा विरोध आहे, ती राज्यकर्त्यांनीं जुलूमानें, सक्तीनें अगर आग्रहानें लोकांवर लादूं नये असा राजकारणांत सरकारास बजावून सांगणारा एक पक्ष या देशांत आहे. बंगालची फाळणी कर्झन साहेबानें केली ही गोष्ट राज्यकारभार सुलभ व्हावा या दृष्टीनें कांही वावगी नव्हती, परंतु अशा प्रकारच्या फाळणीस बंगाली लोकमत अगदी विरूद्ध होतें व त्यास न जुमानतां इंग्रज सरकारनें जेव्हां आपलें म्हणणें शेवटास नेलें तेव्हां सरकार लोकमताला जुमानीत नाहीं म्हणून टिळकसारख्या राष्ट्रीय बाण्याच्या जहालानें टीकेंचें अस्त्र सोडून केवढा गहजब केला हें सर्वश्रुत आहेच. शेवटी इंग्रज सरकारनेंही राज्य चालविणें तें लोकमताला धरूनच चालविलें पाहिजें हें तत्त्व मान्य करून बंगालची फाळणी रद्द केली व आपला मोठेपणा बाजूस ठेवून सरकार अखेर लोकमतास शरण गेलें व मनलज्जेनें जरी नसलें तरी जनलज्जेनें आपण लोकमतानुवर्ती आहोंत असें सिद्ध करून दिलें. लोकमताचा हा विजय झाला हें चांगलेंच झालें. पण या ऐतिहासिक गोष्टीच्या स्मरणानें आम्हांस आनंद न होता, तिडीक येते ती एवढ्यामुळेंच कीं सरकारास लोकमताप्रमाणें वागावयास सांगणारे लोक स्वतः अगदी निर्लज्जपणे अस्पृश्यांचे लोकमतास पायांखाली तुडवितात. लोकमताकडे लक्ष देऊन अधिकाराचा उपयोग करावयाचा ह्या

तत्त्वाचा पुरस्कार करणाऱ्या लोकांनी अस्पृश्य जनता अस्पृश्यतेची रूढी चालूं राखण्यास कबूल नाहीं असें दिसून आल्याबरोबर त्या अनिष्ट रूढीचा त्याग करावयास आपण सिद्ध आहोंत असें जाहीर करणें क्रमप्राप्त होतें. ज्याप्रमाणें बंगाली लोकांचें मत बंगालच्या फाळणीविरूद्ध होतें त्याप्रमाणें साऱ्या अस्पृश्य लोकांचे लोकमत अस्पृश्यतेच्या रुढीच्या विरुद्ध आहे. बंगालची फाळणी करणें न करणें हें बंगाली लोकमतावर अवलंबून राहिलें पाहिजें असें जे छातीठोकपणें सांगत होते त्याच लोकांनी अस्पृश्यता ठेवणें न ठेवणें हें अस्पृश्यांच्या लोकमतावर अवलंबून राहावें असें कां कबूल करूं नये ? पण या दृष्टीनें या प्रश्नाकडे कोणीच पहात नाहींत. स्वार्थ इतका बलवत्तर आहे कीं, आपल्या पायाखाली काय जळतें इकडे चांगल्या माणसांचें सुद्धां लक्ष जात नाहीं. ज्या प्रसंगी इतरांस जें तो करावयास लावतो तें तसा प्रसंग स्वतःवर आला असतां तो करण्याचें कसे टाळतों याचा हा एक उत्तम मासला आहे. कसेंही असो, अस्पृश्य हिंदूंचें लोकमत अस्पृश्यता निवारण्यास प्रतिकूल आहे ही गोष्ट अस्पृश्य लोकांनी ध्यानांत घेतली पाहिजें.

## तें अनुकूल कसें करतां येईल ?

हा अस्पृश्य जनतेपुढें मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे व तो सोडविण्यास त्यांनी योग्य ती उपाययोजना केली पाहिजे. परंतु ही उपाययोजना निश्चित करण्यापूर्वी स्पृश्य लोकांच्या भावना दगडासारख्या कठीण कां झाल्या आहेत याचें पूर्ण आकलन होणें अत्यावश्यक आहें.

कोणत्याही समाजात स्वतः विचार न करितां दुसऱ्याच्या विचारानें वागणारे असे लोक असतातच. धर्मोपदेशक सांगेल तो धर्म, वडील सांगतील ती आज्ञा, अधिकारी सांगेल तो हुकूम, मित्र देईल तो सल्ला मान्य करुन आपला व्यवहार चालविणारे असंख्य प्राणी या भूपृष्ठावर आढळून येतात. मग तो धर्म, ती आज्ञा, तो हुकूम व तो सल्ला योग्य आहे किंवा अयोग्य आहे, स्वार्थमूलक आहे किंवा निःस्वार्थ बुद्धीचा आहे याचा विचार करण्याची जबाबदारी हे निर्बुद्ध प्राणी आपल्या अंगावर केव्हांच घेत नाहींत. जसे स्वतः विचार न करतां दुसऱ्याच्या विचारानें वागणारे विचारशून्य लोक असतात तसेच विचार करूनही त्याप्रमाणें आचार न ठेवणारें लोकही दर एक समाजांत असतातच. नुसता विचार करून तो गांठीस बांधून ठेवण्यास कांहींच खर्च होत नाहीं. कोमल हृदयाच्या कुबेरासही जगांतल्या संपत्तीची वांटणी विषम प्रमाणांत होऊं नये हें तत्व पटतें. वतनदार जोशीही जोशी असावा तर तो पारंगत असावा हें म्हणणें मान्य करतों. त्याप्रमाणें मागासलेल्या वर्गाला पुढें आणण्याकरितां सरकारी नोकरीत पहिली जागा त्यास

द्यावी हा विचार पुढारलेल्या वर्गाच्या लोकांस नाकबूल नाही. पण खुद्द कुबेरावर आपली संपत्ती समसमान वांटून देण्याचा प्रसंग आला किंवा हुशार मांग जातीचा जोशी लाभला असतां आपली वृत्ति त्यास अर्पण करण्याचा कठीण योग वतनदार जोश्यांवर गुदरला किंवा स्वतःला आंचवून मागासलेल्यास जागा देण्याची पाळी एखाद्या पुढारलेल्यावर आली तर या तिघांचेही तोंड वासेल यांत शंका नाहीं. हा मनुष्य स्वभाव ध्यानांत घेतला म्हणजे अस्पृश्य लोक एवढा अट्टाहास करीत असतां स्पृश्य लोकांना त्याचें कांहींच कां वाटत नाहीं याचा उलगडा सहज होईल. स्पृश्य समाजांत विचारशून्य लोक आहेत तसेच आचारशून्य लोक आहेत. विचारशून्य लोक अंधपरंपरेमुळे अस्पृश्यता बरी की वाईट याचा विचारच करीत नाहींत. आचारशून्य लोक अस्पृश्यता वाईट आहे हा विचार मान्य करतात पण मोठेपणाच्या स्वार्थाला बळी पडल्यामुळें त्यांच्या हातून विचाराप्रमाणें आचरण होत नाहीं.

अशा प्रकारें रोगाचें निदान कळून आलें असतांना अंधपरंपरेमुळें व स्वार्थामुळें आमच्या म्हणण्याचा प्रकाश ज्यांच्या डोक्यांत पडत नाहीं त्यास ताळ्यावर आणण्यास आम्ही कोणता उपाय योजिला पाहिजे एवढाच काय तो प्रश्न उरतो. आमच्या मतें स्पृश्य हिंदूंच्या वागणुकींत फेरबदल घडवून आणावयाचा असेल तर प्रथमतः त्यांच्यांतील

## विचारशून्य लोकांस विचार करणें भाग पाडलें पाहिजें.

पण विचार हा कांही एखाद्या ज्वालामुखींप्रमाणें आपोआप पेट घेत नाहीं. तो कांहीं कारणपरत्वेंच प्रज्वलित होतो. ज्यांच्यांत विचारजागृति करावयाची असेल त्यांना विचार करण्यास कारण घडवून आणलें पाहिजें हें आमच्या अस्पृश्य बंधूंनीं विसरतां कामा नये. रूढ मार्गानें जाणारा वाटसरू जोपर्यंत रस्ता सरळ आहे, त्याला वाटा फुटल्या नाहीत, तोपर्यंत डोळे झांकून कांहीं एक विचार न करतां चाल चालत असतो. त्याला विचारपूस करण्याची जरुरीच नसते. पण जेव्हां कां रस्त्याला वाटा फुटलेल्या दिसतात तेव्हां तो थबकतो, गोंधळून जातो आणि यांतील आपल्या मुक्कामावर नेणारा मार्ग कोणता याचा तो विचार करावयास लागतो. यांवरून उघड आहे कीं, रूढ झालेल्या मार्गात हरकत उत्पन्न झाली नाहीं, अडथळा भासला नाहीं, तोपर्यंत कोणीही आपल्या पुर्वापारच्या रूढ मार्गाच्या बरे वाईटपणाबद्दल विचार करण्यास प्रवर्त होत नाहीं. हाच न्याय स्पृश्य लोकांतील विचारशून्य लोकांस लागूं केला तर असें दिसून येईल कीं, अस्पृश्यतेची रूढी चालूं राहिली याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे अस्पृश्य लोकांनी त्या रूढीस कधींच हरकत घेतली नाही हेंच होय. त्यांनीं जर हरकत घेतली असती तर स्पृश्य लोकांस अस्पृश्यतेच्या कल्पना कधींच बदलाव्या लागल्या असत्यां. वाईट

कोणतें हें त्यापासून भोगाव्या लागणाऱ्या अखेर परिणामावरून दरेकाच्या ध्यानांत येतेंच, आणि म्हणूनच खोटे ग्रह व वाईट समजुती व्यवहारांत फार दिवस टिकत नाहींत. पण कांहीं ठिकाणीं कृती आणि तिचे परिणाम यांचा धागा दोरा इतका लांबचा असतों कीं, आपण जी कृती करतों तिचे परिणाम कोणतें हेंच आधीं प्रत्यक्षपणें कळत नाहीं, आणि तेणेंकरुन आपल्या कृतीच्या बरें वाईटपणाचा विचार करण्याची जरूरीच कृती करणारास भासत नाहीं. जातीभेद व अस्पृश्यता याविषयीं तरी असेंच आहे, या रूढी परिणामी वाईट आहेत याचा प्रत्यक्ष अनुभव स्पृश्य लोकांस कधीच न आल्यामुळें त्या टिकून राहिल्या आहेत. आगीतल्या धगीस तुच्छ मानून जिभेवर घेणाऱ्यास ती जशी त्याच्या जीभेस फोड आणून आपली कदर करण्यास लावतें तसें अस्पृश्य लोक त्यांना अस्पृश्य म्हणणारांची जीभ उपटते तर कोणी कोणाला अस्पृश्य म्हणतेचना. महाडच्या परिषदेचें महत्व जें कांहीं आहे तें आमच्या मतें यांतच आहे. तिनें स्पृश्य लोकांस अस्पृश्यतेच्या रूढीचा एक कटू अनुभव आणून दिला आहे. त्यामुळें स्पृश्य लोक आतां विचार करूं लागतील कीं, अस्पृश्यता पाळणें हा जरी धर्म असला तरी तो पाळणें सुळावरच्या पोळीप्रमाणें कठीण काम आहे. आजवर अस्पृश्यता सहज पाळतां येत होती; तिला कांहीं लागत नव्हते ; पण यापुढें ती पाळावयाची झाली तर तिच्यासाठी कांहींना आपले प्राण खर्ची घालावे लागतील हें स्पृश्य लोकांनीं ताडलें असेलच. कारण महाड येथें जरी अस्पृश्यांनीं स्पृश्यांवर हात उगारला नाहीं तरी यापुढें होणाऱ्या प्रसंगात अस्पृश्य लोक प्रतिकार न करतां केवळ माराचे धनी होऊन राहतील हें मानणें चुकीचें होणार आहे. तेव्हां आमच्या अस्पृश्य बंधूंस आमचा असा सल्ला आहे की, त्यांनीं महाड येथें जो उपक्रम केला तसाच उपक्रम सर्वत्र सुरू करावा, अशा प्रकारच्या

## प्रतिकार योगाशिवाय भागणार नाही.

नाही तर स्पृश्य लोकांतील विचारशून्य लोक अस्पृश्यतेच्या रूढीच्या बरें वाईटपणाबद्दल विचार करावयासच लागणार नाहीत आणि हजारों वर्षाची जुनी अस्पृश्यता आणखी हजारों वर्षे राहील.

## विचारी लोकांना विचाराप्रमाणें आचरण करावयास लाविलें पाहिजे,

हा अस्पृश्यता निवारण्याच्या कार्यक्रमाचा दुसरा महत्वाचा भाग आहे. जे लोक विचार करूनही त्याप्रमाणें आचरण ठेवीत नाहीत त्यांना ताळ्यावर आणण्याचा उपाय विचारशून्य लोकांस विचार करावयास लावण्याच्या उपायापेक्षां केव्हांही भिन्न असणारच. लोकमत फिरविणें आणि व्यवहारांत

सत्ताधारी लोकांच्या वागणुकींत बदल घडवून आणणें या दोन्हीं गोष्टींत फार अंतर आहे. ज्या ठिकाणी मनुष्याच्या मताचा त्याच्या स्वार्थाशी कांही संबंध नसतो तेथें त्याच्या मतांत फेरबदल घडवून आणण्यास वादविवाद, चर्चा, उहापोह इत्यादि सामोपचाराचे उपाय बस्स होतात. पण ज्या ठिकाणीं मनुष्याच्या मताचा त्याच्या स्वार्थाशी संबंध असतो, त्या ठिकाणी त्याच्या स्वार्थास चट्टा बसल्याखेरीज नुसत्या सामदामानें त्याची वागणूक बदलत नाही. हा व्यवहारांतील सामान्य नियम आहे. याची साक्ष कोणीही देऊं शकेल. हा न्याय स्पृश्य हिंदूंतील विचारी लोकांस लागूं केल्याखेरीज ते विचाराप्रमाणें आचरण करण्यास प्रवृत्त होणार नाहींत. या दिशेनें पहातां स्पृश्य हिंदूंच्या हितास चट्टा बसेल असें आपणांस कांहीं करतां येण्यासारखें आहे काय, हे अस्पृश्य समाजानें अवश्य शोधून पाहिलें पाहिजे. स्पृश्य लोक सधन आहेत, अस्पृश्य लोक दरिद्री आहेत. स्पृश्य लोक बहुसंख्यांक आहेत, अस्पृश्य अल्पसंख्यांक आहेत. स्पृश्य लोकांचे हातांत सत्ता आहे, अस्पृश्य लोक अगदीं सत्ताहीन आहेत. यावरून साधारण माणसास असेंच वाटेल कीं, स्पृश्यांचे अस्पृश्यांवाचून चालण्यासारखें आहे. पण अस्पृश्यांचें स्पृश्यांवाचून चालणें शक्य नाहीं. असें असतां स्पृश्य हिंदूंच्या हितास चट्टा बसविण्याचा प्रयोग करून काय होतें, हें पहाण्याच्या भानगडींत अस्पृश्य लोक पडले तर आपलें हासे करून घेतील. इतकेंच नाहीं तर तोंडघशी पडतील, असें कुचेष्टेखोर लोकांनाच काय पण अस्पृश्यांनाही वाटण्यासारखें आहे. पण ही स्पृश्य व अस्पृश्य लोकांच्या बलाबलाची पाहणी अगदीं वरवरची आहे हें आमच्या अस्पृश्य बंधूंनीं ध्यानांत घ्यावें. संसारिकदृष्ट्या पहाणी करणारांना अस्पृश्य समाजाच्या खऱ्या सामर्थ्याचा थांगपत्ता केव्हांच लागावयाचा नाहीं. म्हणून आमच्या अस्पृश्य बंधूंनां तसेंच आमच्या स्पृश्य हिंदूंनां आम्ही इशारा देत आहोंत कीं, अस्पृश्य लोक कांहीं बाबतीत जरी बलहीन असले तरी सर्वच बाबतींत ते दुर्बल आहेत असा गैरसमज कोणीच करून घेऊं नये. आज हिंदुधर्मावर अस्पृश्य लोकांनीं बहिष्कार पुकारला व मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली तर हिंदु समाजाचें काय होईल याचा स्पृश्य हिंदूंनीं अवश्य विचार करावा. अस्पृश्य लोकांनीं धर्मांतर केलें तर त्यांत काय वाईट झालें. निर्भेळ स्वराज्य मिळण्याऐवजीं फार तर वसाहतींचे स्वराज्य मिळेल असें बऱ्याच सनातन धर्मवादी लोकांचे मत आहे हें आम्ही जाणून आहोंत. परंतु असें म्हणणारांनीं या प्रश्नाचा खोल विचार केला आहे असें आम्हांस वाटत नाहीं. या लोकांना जाणीव नाहीं कीं, चालूं असलेला वाद हा स्वराज्याचा वाद नसून हिंदुमुसलमानांच्या संस्कृतींचा संग्राम आहे. त्यांत अस्पृश्यांची कुमक त्यांच्या संख्येच्या मानानें फार महत्त्वाची आहे. आज अस्पृश्य लोक हिंदूंचें हिंदु जर राहिले तरच आर्यधर्माची संस्कृति या देशांत निभवणार

आहे. उलट ते जर हिंदूंचे मुसलमान झाले तर या देशांत आर्यसंस्कृतीचा पाडाव होऊन यावनी संस्कृतीचें प्राबल्य होणार आहे. आणि या घडामोडी घडवून आणण्याचे सामर्थ्य एकट्या अस्पृश्यवर्गांत आहे, दुसऱ्या कोणात नाहीं, यांत बिलकूल संदेह नाहीं. मुसलमानांना आपल्याशिवाय जय नाहीं व हिंदूंना आपल्याशिवाय गति नाहीं एवढेंच जर आमच्या अस्पृश्यबंधूंनी ध्यानात घेतलें तर त्यांच्या आंगीं केवढे मोठें सामर्थ्य सांठविलेलें आहे याची त्यांना कल्पना होईल व या सामर्थ्याचा त्यांनी अशा आणीबाणीच्या प्रसंगीं उपयोग केला आणि त्यांस बहिष्कृत करणाऱ्या स्पृश्यहिंदुसमाजावर त्यांनीं बहिष्कार घातला तर त्यांना या बेगुमान स्पृश्य लोकांस सहज ठिकाणावर आणतां येईल. ही शक्ति कांहीं थोडी थोडकी नाहीं. तिची ओळख झाली व तिचा अशापरीं उपयोग केला तर स्पृश्य लोक वठणीवर येण्यास मुळीच अवसर लागणार नाहीं अशी आमची ठाम समजूत आहे. म्हणून आमच्या अस्पृश्य बंधूंस आमची आग्रहाची सूचना आहे कीं, त्यांनीं आपली ही शक्ति अकर्तव्यतेच्या डेऱ्यांत पुरून न ठेवतां हा

**बहिष्कार योग अंमलात आणावा**

यांत मागें पुढें पाहूं नये.

आम्हीं हे जें दोन उपाय सुचविले आहेत त्याबद्दल कांहीं स्पृश्य लोक आम्हांस अविचारी म्हणतील हें आम्हीं जाणून आहों. पण त्यांना आमचा सवाल आहे कीं, अस्पृश्य लोकांनीं हें उपाय योजूं नयेत तर त्यांनीं करावें तरीं काय ? सर्व लोकांचें एक बील होऊन अस्पृश्यांनीं आपलें म्हणणे स्पृश्य लोकांपुढें मांडावें हा जुना नेमस्तपणाचा शिरस्ता आहे पण आज २५/३० वर्षांच्या चळवळीच्या इतिहांसापासून अत्यंत महत्त्वाची जी गोष्ट निष्पन्न झाली आहे ती ही कीं, अस्पृश्यांचें म्हणणें कितीही संयुक्तिक असलें, त्यांचीं गाऱ्हाणी कितीही साधार असली, त्यांच्या मागण्या कितीही न्यायाच्या असल्या, त्यास कितीही लोकांची सम्मती असली व त्या त्यांनी स्पृश्य हिंदूपुढे कितीही नेमस्तपणे मांडल्या, तरी त्यांच्याकडे लक्ष न देतां केवळ सत्तेच्या जोरावर अस्पृश्यांच्या लोकमताची पायमल्ली करून स्पृश्य हिंदु आपला हेका तडीस नेतात. असें असतांना जे अस्पृश्य लोकांना तुम्ही प्रतिकार योग अथवा बहिष्कार योग स्वीकारुं नका असा उपदेश करतात, त्यांना काय म्हणावें हेंच आम्हांस कळत नाहीं. अस्पृश्यता हजारों वर्षापासून चालत आली आहे तर आणखी शंभर वर्षे राहिली तर काय हरकत आहे, असा साळसुदपणाचा सल्ला हे लोक देत असतात पण आम्हांला या लोकांस स्पष्टपणें सांगणें आहे कीं,

## अन्यायाला परंपरा नाही.

तो चालत आला आहे म्हणून तो आणखी पुढे चालू राहावा ही विचारसरणी रानवट माणसांची आहे. आमच्याप्रमाणे ज्याला न्यायाची चाड आहे, तो केव्हांही हेंच म्हणेल कीं, आहे तो जर अन्याय आहे, तर तो इतक्या दिवस चालू आहे. यामुळेच त्याला यापुढे राहू देणें शक्य नाहीं. अस्पृश्यता हें एवढें मोठें पाप व एवढा मोठा अन्याय आहें कीं, तिचें उच्चाटण आतां, या घडीस झालें पाहिजें. ही आमची विचारसरणी आहे. ती मान्य करून तिला अनुरूप असें जर कोणी कांही उपाय सुचविलें तर आम्हीं त्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करूं. पण आमची खातरी आहें कीं, अस्पृश्यतेचें विलंब न लागता उच्चाटण करावयाचें असेल तर आम्ही सुचविलेल्या उपायांसारखें दुसरे गुणकारी उपाय सांपडणें कठीण आहे. फुकट व्याख्यानें झोडण्यांत, अथवा मोठमोठाल्या परिषदा भरवून अघळपघळ ठराव पास करण्यांत कांही हंशील नाहीं. हे उपाय जे लोक स्वभावानें लोकमतानुवर्ति आहेत त्यांच्याकरितां सांगितलें आहेत. पण गतानुगतिक लोकांस जागृत करण्यास अग्नीचा डागच दिला पाहिजे, त्याशिवाय ते शुद्धीवर येणार नाहींत. कागदी खेळ कितीही वर्षे खेळलों तरी या लोकांच्या डोक्यांत कधीं प्रकाश पडावयाचा नाहीं, व कसलाच परिणाम होणार नाहीं. अस्पृश्यतेपायीं जेव्हां स्पृश्य लोकांचीं डोकीं फुटतील तेव्हांच आत्मयज्ञ करण्याइतकें पुण्य अस्पृश्यता पाळण्यांत आहे किंवा नाहीं, याचा ते विचार करूं लागतील. जागृति करण्याचा हा महत्वाचा कार्यभाग प्रतिकार योगाशिवाय दुसऱ्या अल्पस्वल्प उपायांनी कधींच उरकला जाणार नाहीं. आम्हीं बहिष्कार योग सुचविला हें पाहून तर कांहीं स्पृश्य लोकांचें पित्त खवळेल, हें आम्हांला माहीत आहे. पण आम्हीं त्याची बिलकूल पर्वा करीत नाहीं. आम्हांला हिंदुधर्माची किंमत नाहीं. आम्हांला किंमत आहे ती माणुसकीची, ती माणुसकी आम्हाला हिंदुधर्मांत राहून मिळती तर हिंदुसमाजावर बहिष्कार घालावा असा उपदेश आम्हीं केला नसता. हिंदुधर्माची तत्त्वें फार मोठीं आहेत. पण उदात्त तत्त्वांच्या मनोराज्यांत गढून जाऊन व्यवहाराला विसरणाऱ्या शाळेतील पोराप्रमाणें आम्ही मूर्ख नाहीं. आणि यदाकदाचित हिंदुसमाजानें आमची माणुसकी ओळखलीच तर ती आमच्या माणुसकीच्या स्वयंसिद्धतेमुळे ओळखणार नसून परिस्थितीजन्य अपरिहार्यत्वामुळेंच ओळखणार आहे. हें आम्हीं पक्केपणी जाणून आहोंत. हिंदुसमाज झाला काय किंवा इतर समाज झाला काय तो परिस्थितीचा दास असणे अगदीं स्वाभाविक आहे. परिस्थितीची प्रत्यक्ष जाचणी किंवा तीव्र टोंचणी सुरू झाल्याखेरीज समाज आपल्या रूढ व्यवहारांत सहसा फिरवाफिरव करीत नाही. ही समाजाची सहज प्रवृत्ति ओळखून टिळक म्हणत असत कीं,

" सुधारणा फुकाफुकी घडत नसतात, समाजास कोणती गोष्ट आपल्या उत्कर्षाच्या आड येते हें प्रत्यक्ष कळावें लागतें. आणि तें कळलें म्हणजे समाज आपोआपच हे अडथळे दूर करण्यास प्रवृत्त होतो." अस्पृश्यता आपल्या उत्कर्षाच्या आड येते याचा प्रत्यक्ष अनुभव हिंदुसमाजाच्या अनुभवाला आणून देण्यास बहिष्कार योगाशिवाय दुसरें साधन अस्पृश्य वर्गाचे हाती कोणतें आहे ? आहे त्याचा देखील उपयोग त्यांनीं करूं नये तर स्पृश्यांच्या लहरीला रुचेल तसें त्यांनी रहावें काय ! आम्हीं तरी बहिष्कार योगाचा मार्ग सुचविला आहे तो टिळकांचा मार्ग आहे. फरक इतकाच की त्यानी तो राजकारण प्रसंगी योजीला होता. आम्ही तो समाजकारणप्रसंगीं योजावा म्हणून सांगत आहोत. असें असतांना शंभरांतून एकाला ज्या राजसत्तेची आंच लागते तिंचा नायनाट करण्यासाठी टिळकांनीं तिच्यावर बहिष्कार योग पुकारावा व त्याला सर्वांनीं माना डोलवाव्या आणि ज्या धार्मिक सत्तेच्या अग्नीत दरेक अस्पृश्यांची माणूसकी जळून खाक झाली आहे तिच्या विरुद्ध अस्पृश्यांनी बहिष्कार पुकारावा असा आम्हीं सल्ला दिला असतां आम्हांला दूषण देण्यांत यावें हा कोठला न्याय ? आमच्या या मित्रास आमचें असें सांगणें आहे कीं, तुम्हीं आमचे कितीही जरी हितचिंतक असला तरी प्रस्तुत प्रकरणी सनातनधर्मी म्हणून, सनातन धर्मांचे आधार म्हणून व सनातन धर्माचे अधिकारी म्हणून या कामीं आम्हास उपदेश करण्यास तुम्ही अपात्र आहांत. कारण हा प्रश्न अधिकाराचा, जातीचा, स्वार्थाचा व मनोधर्माचा आहे. विद्येचा, ज्ञानाचा अगर बुद्धीचा नव्हे. हा तुमच्या आंगचा दोष परिस्थितीप्रमाणें तुमच्यांत सहज उत्पन्न झाला आहे हें ओळखून तुम्ही आम्हांस उपदेश करण्याच्या भानगडीत पडूं नका. व जर पडाल तर आम्हांस नेमस्तपणाच्या बाहेर जाऊं नका असा सांगण्याऐवजी आपल्या स्पृश्य बांधवांस असा उपदेश करा कीं, " अस्पृश्य लोक आतां निकरावर येऊं लागले आहेत. करितां आपली सहानुभूति कृतींनें व्यक्त होईल असा मार्ग धरा ". असा उपदेश जोपर्यंत तुम्ही करीत नाहीं तोंपर्यंत हा नेमस्तपणाचा मार्ग फलदायक होईल, अशा तऱ्हेची खोटी आशा दाखवून किंवा थापा मारून तुम्हांस अस्पृश्यांच्या प्रगतीचा ओघ खुंटविणें किंवा बंद पाडणें आतां अगदी अशक्य आहे. आम्ही हवा तसा हंबरडा फोडावा, आकाश पाताळ एक करावें, आणि आमचे मागणें न्याय असतांही तिकडे साफ दुर्लक्ष करून केवळ मनगटाच्या जोरावर आहे तसें आणखी कांहीं दिवस चालूं द्या असें बेशरमपणें पुन्हां आम्हांस सांगावें हें कांही ठीक नाहीं. कोणी कांहीही म्हणो पण हा अन्याय आणखी एक दिवसही सहन करण्यास आम्ही तयार नाहीं, मग पिढ्या दोन पिढ्याची गोष्टच नको.

हजारों वर्षाची अस्पृश्यता चुटकी सरशी नष्ट करण्यांस अस्पृश्य लोक प्रवृत्त झालें आहेत हें पाहून कांहीं स्पृश्य लोकांस हसूं येईल हें आम्ही जाणून आहों. पण त्यांच्या हसण्यानें आम्हाला मुळींच खंती वाटत नाही. कारण आम्हीं सांगितलेलें उपाय इतके तीव्र व जालीम आहेत कीं, त्यांनी स्पृश्य लोकांच्या वित्तासच नव्हे तर त्यांच्या जीवितासही त्यामुळें धक्का पोहोंचणार आहे ? इतक्या जालीम उपायानें कोण शरण येणार नाही ? आम्हाला तर असें वाटतें की दोन्ही योगाचा डब्बल गोळीबार करण्याचे कारण नाहीं. गनीम इतका कमकुवत आहे की बहिष्कार योग मागें ठेऊन सुरवातीस प्रतिकार योगच आरंभीला तरी देखील कार्यभाग होण्यासारखा आहे. आणि तोहि फार दिवस करावा लागणार नाही. '' तप्तेन तप्तायसा घटणाय योग्यम्. '' लोखंडाचे दोन तुकडे तापून सारखे लाल झालें कीं ते एक होण्यास विलंब लागत नाहीं. तसेंच योगास प्रतियोग भेटला कीं उभयपक्षांत समेट झालाच म्हणून समजावें. प्रश्न एवढाच आहे कीं आमच्या अस्पृश्य बंधूंच्या हातून

## हा कठीण योग तडीस जाईल काय ?

या ठिकाणीं आमच्या अस्पृश्य बंधूंस एका गोष्टीची आठवण करुन देणें आम्हांस क्रमप्राप्त आहे. वनपर्वात धर्मराजास भीमानें सांगितलें आहे की, स्वतःचें राज्य नष्ट झालें असतां तें ' दे ग बाई जोगवा ' म्हणून मिळत नसतें. भिक्षा मागणें हा ब्राह्मणांचा धर्म आहे. क्षत्रियांचा नव्हें. या करितां भिक्षा मागणें सोडून दे. तेजाचा आश्रय कर, म्हणजे तुझे हेतु साध्य होतील. नुसत्या धर्मबुद्धीनें कांहीं होणार नाही. आमच्या मतें हीच नीति अस्पृश्यवर्गास सांगण्याची वेळ आतां आली आहे. रडणें, भिक्षा मागणें किंवा इतरांच्या धर्मबुद्धीवर अवलंबुन राहणें, यानें हरण केलेलें स्वत्व परत येत नसतें. ज्यांनें त्यानें आपल्या तेजानेच तें साध्य केलें पाहिजे. आम्ही जो प्रतिकार योग सांगितला तो योग बिकट आहे खरा, आणि योगास प्रतियोग होईल हेंही आम्ही जाणून आंहों. पण आपण प्रतिकार केला असतां स्पृश्य लोक त्यास प्रत्युत्तर देतील म्हणून आमच्या अस्पृश्य बंधूंनीं भिऊन जातां कामा नयें. ते जर प्रतिकार करतील, तर त्यांचा प्रतिकार करण्यास त्यांनी सिद्ध झालें पाहिजें. त्या शिवाय भागणार नाही. आमच्या अस्पृश्य बंधूंनीं

## या कामी आपलें तेज प्रकट केलें पाहिजे

एवढें पथ्य जर त्यांनीं सांभाळिलें तर आम्ही दिलेली मात्रा विफल होणार नाहीं, याबद्दल त्यांनी निःशंक राहावें.

महाडच्या पाणी प्रकरणावर लिहीलेली ही लेख माला पुरी करण्यापुर्वी आमच्या अस्पृश्य बंधूंस जे सांगणें आहें तें हें की ब्रह्मराक्षस लागतो तो भित्यापाठींच लागतो. सर्वशक्तिमान देवाला बळी द्यावयाचा झाला तर त्या कामीं व्याघ्रादि हिंस्त्र पशूंचा कोणी उपयोग करीत नाहीत. त्यांच्याऐवजी गरीब बिचाऱ्या कोंबड्यां-बकऱ्यांचा बली देण्यांत येतो.

आजच्या अस्पृश्य लोक कोंबड्या बकऱ्याप्रमाणें बली देण्यासारखे मेष राशीचे आहेत असें आम्हांस बिलकूल वाटत नाहीं. त्यांच्या पूर्वजांची तरी सिंह रास होती याची इतिहास साक्ष देत आहे. तसें जर नसतें तर नागेवाडीच्या महजूर सेटी बिन नागनाक महारांत एवढें तेज कोठून आलें असतें की, ज्या तेजामुळें राजारामाच्या सांगण्याप्रमाणें आपल्या पाटीलकीसाठी धारदिव्य करून कोणाचीहि कुमक न घेतां मोंगलांच्या ताब्यांत असलेला वैराटगड त्यांच्यापासून जिंकून त्यांने परत मराठ्यांच्या राज्यास जोडून दिला ! घरांत जेवणाच्या पंगतींत तसा समरात शूरांच्या पंगतीत जातीभेद पाळला जावा असा आग्रह धरणाऱ्या ब्राह्मण्यग्रस्त सरदारांनी ज्याचा गोट बाजुस काढावा म्हणून तक्रार केली पण ज्यानें हिरोजी पाटणकरासारख्या सरदाराकडून ' ज्याची तरवार खंबीर तो हंबीर ' असें वदवून घेऊन आपला गोट सर्वांच्या मध्यें राहण्याचा मान शाबूद राखीला व शेवटी खर्ड्याच्या लढाईत ज्यानें पठाणांच्या हातून परशुराम भाऊचा प्राण वाचविण्यांत अप्रतिम शौर्य दाखवून त्याला महार म्हणून तिरस्कार करणाऱ्या सरदारास खाली पाहावयास लावलें तो शिदनाक महार सिंह राशीचा नव्हता असें कोण म्हणेल ? पावन खिंडीच्या तोंडाशी मूठभर मावळ्यांच्या सहाय्यानें विजापुरच्या प्रचंड इस्लाम सेनेचा धुव्वा उडविणाऱ्या बाजी प्रभु देशपांड्याप्रमाणें जो रायनाक महार रायगडावर मोर्चेबंदी करून १५ दिवसपर्यंत इंग्रज बहादुरांशीं निकरांची झुंज करून गडाचें रक्षण करतां करतां जिवानीशीं गेला तो रायनाक बाजी मेष राशीचा होता काय ? तसेंच पेशवाईला[Δ] अखेरची मूठमाती देतांना ज्यांचे पूर्वज धारातीर्थी पडले व ज्यांची नांवें कोरेगावच्या जयस्तंभावर[†] कोरून ठेवण्यांत आली आहेत त्या वीरांची रास सिंह राशीशिवाय दुसरी कोणती असूं शकणार ? ज्यांच्या पूर्वजांनीं अस्पृश्यतेचें दाट कवच फोडून आपल्या तेजानें व पराक्रमानें होत्याचें नव्हतें केलें त्यांच्या वंशजांना साधा प्रतिकार योग दुर्धर होईल काय ? आह्माला तसें मुळीच वाटत नाही. त्यांच्यांत तेज आहे. जें नाही ती जाणीव. म्हणून सांप्रतच्या अस्पृश्यांपैकी ज्यांना आपण कोण, आपले

---

Δ पाहा, परिशिष्ट क्रमांक ८.

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ९.

खरें आत्मस्वरूप कोणतें याची ओळख पटली असेल त्यांनी आपल्या कुळास लागलेला बट्टा धुवून काढण्यास नुकत्याच प्रारंभ झालेल्या धर्म संगरांत उभे ठाकण्यास सिद्ध व्हावें व आपल्या इतर ज्ञातिबांधवांस स्वकुलोद्धाराचा व मानव धर्मोद्धाराचा धडा घालून द्यावा.

भले कुलवंत म्हणावें । तेहीं वेगीं हजीर व्हावे ।
हजीर न होतां कष्टावें । लागेल पुढें ।।

अशी काळ त्यांना श्रीसमर्थाच्या भाषेंत हांक मारुन सांगत आहे. आम्हांस आशा आहे की, ही काळाची हांक व्यर्थ जाणार नाहीं.

●●●

---

अग्रलेख : बहिस्कृत भारत ता. २० मे १९२७.

# २९

# इथलाच वर्णभेद विलायतेला गेला तर . . . . .त्याबद्दल कां तक्रार करण्यात यावी ?

एके काळी हिंदूलोकांत परदेशगमन निषिद्ध मानलें जात असें. पण विलायतचा वारा खाऊन मोठ्या मोठ्या पदव्या मिळवून परत आलेल्यांची जी चहा होते तशी आपली व्हावी म्हणून प्रायश्चिताला न भितां हिंदुस्थानांतून अनेक विद्यार्थी विलायती शिक्षणाचा आस्वाद घेण्याकरितां परदेशगमन करतात. त्यांतील बरेच खुद्द विलायतेस जातात व जेथें म्हणून विश्व विद्यालयें आहेत तेथें तेथें विखुरलेले असतात. त्यापैकी एडिनबरो येथें रहात असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांनी नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे कीं तेथील रहिवाशी त्यांना अस्पृश्याप्रमाणें वागवितात. त्यांना कांही खाणावळींत मज्जाव आहे. युनिव्हर्सिटीत जे अनेक नाच तमाशे होतात त्यांतहि त्यांना घेण्यांत येत नाही. वगैरे वगैरे प्रकारचा त्यांच्यावर बहिष्कार टाकण्यांत आला आहे. हा बहिष्कार किती तीव्र आहे व परदेशांतील आपल्या चिमुकल्या समाजात तो किती कडक रितीनें भासमान होत आहे याची कल्पना हिंदुस्थानांतील लोकांस होणें शक्य नाहीं असें ते अगदी केविलवाण्या शब्दांत जाहीर करित आहेत. ही विलायतेस जाणारी मुलें म्हणजे बऱ्याच अंशी श्रीमंतांची पोरें असतात. त्यांनी खेळत खेळतच अभ्यास करावयाचा असतो व तशाच प्रकारची त्यांची चालचलणूक असते. त्यांच्याबद्दल फारशी सहानुभूति वाटण्याचे कारण नाही. शिवाय वर्णभेदावर जगणाऱ्या लोकांनी वर्णभेदाविरुद्ध तक्रार केली तर त्यांची दाद कोण घेणार. हिंदुस्थानांतील गोरे स्पृश्य व काळे अस्पृश्य हा तरी वर्णभेद यांचाच आहे. आणि हा वर्णभेद यांना इतका मानवलेला आहे कीं, अस्पृश्यांना स्पृश्यांच्या कोणत्याच व्यवस्थेंत थारा मिळत नाहीं व हा अन्याय आहे असें हे लोक केव्हांच कबूल करीत नाहींत. मग इथलाच वर्णभेद विलायतेला आणि येथूनच गेलेल्या वर्णाश्रमी लोकांच्या पदरांत घातला गेला तर त्याबद्दल कां तक्रार करण्यांत यावी ? वर्णाश्रम उत्तम आहे तर त्याचा प्रसार हिंदुस्थानाच्या बाहेर होत आहे त्याबद्दल हिंदुधर्माभिमान्यांस नको का आनंद व्हावयाला ? वर्णाश्रमांत वाढलेल्या या पोरांना वर्णाश्रम व्यवहारांत आलेला पाहून संताप यावा ही मोठी नवलाची गोष्ट आहे ! पहिला नंबर लागत असेल

तर वर्णाश्रम हवा ; पण शेवटचा लागत असेल तर नको असा काही प्रकार नसेल ना ! हिंदुस्थानांत पहिला नंबर लागला म्हणून सर्वच ठिकाणी पहिला नंबर लागेल अशी अशा धरून वर्णाश्रमाचा आग्रह धरणाऱ्या लोकांना आतां जरा अक्कल आली तर येईल.

●●●

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत ता. ३ जून १९२७.

# ३०

# सार्वजनिक सोईचा उपयोग करूं देणें हा कायद्याचा प्रश्न आहे, शिष्टाचाराचा नव्हे

अक्कलेचे अन्न भालाकाराच्या कधी पचनी पडेल असें दिसत नाहीं. अर्ध्या हळकुंडाने पिवळें होणें कांही अशक्य नाही. प्रश्न आहे मूळ कांतीचा. पण भालाकारासारख्या काळ्या कंदुकाला मणभर हळदीचे कोटिंग दिलें म्हणून काय तो पिवळा होणार आहे ? रंग चढलाच तर तो हिरवा होईल. अशा अपरिपक्व भालाकारानें जो कोटिक्रम लढविला होता त्यास आम्हास जें काय उत्तर द्यावयाचें होतें तें गेल्या अंकांत देऊन टाकलें आहे. पुन्हा पुन्हा तोचतो कोटिक्रम करीत बसणाराच्या पाणचटपणास उत्तर देऊन आम्ही आपल्या पत्राची बहुमोल जागा अडवूं इच्छित नाही. वकिलीची परीक्षा पसार करून गोळा केलेली ज्ञानाची पुंजी दोन अंकांतच संपून गेल्यावर पाटीपुस्तकाची नुसती तोंड ओळख असणाऱ्या मांग पुढाऱ्यांची अक्कल उसनी घेऊन एक नवा कोटिक्रम भाल्यानें तिसऱ्या अंकांत केला होता. त्याचीही वासलात आम्हीं लाविली आहे. आता भालाकाराच्या युक्तिवादा संबंधाने विशेष कांही लिहिण्यांचें कारण नाही. फक्त शेवटी झडती म्हणून एका गोष्टीचा खुलासा करणें जरूर आहे. आणि तेवढ्यापुरतें आज आम्हीं लिहीत आहोत. भालाकाराने जी पिरपीर चालविली आहें तिच्यांत अस्पृश्य वर्गाच्या मागण्यांच्या विपर्यास करण्यांत येत आहे. अस्पृश्य लोक सहपान, सहभोजन व मिश्रविवाह इत्यादि हक्क मागत आहेत असें भलतेंच एक कुभांड त्यानें रचिलें आहे. अस्पृश्य वर्गाच्या मागण्या काय आहेत याची फोड आम्ही "बहिष्कृत भारताच्या" दुसऱ्या अंकांतील अग्रलेखात केली आहे. त्यांत शिष्टाचारान्वयें इष्ट वाटणारी देवाण घेवाण व कायद्यानें प्राप्त होणारे हक्क या दोहोंतील फरक आम्ही सर्वांच्या नजरेस आणून दिला आहे. सहपान, सहभोजन व मिश्रविवाह या गोष्टी शिष्टाचाराच्या आहेत हें आम्ही स्वतःच कबूल केलें आहे. कोणाही ब्राह्मणानें स्वधर्मीय जिव्या मांगाला आपली मुलगी देण्यापेक्षां विधर्मीय जैनुद्दीनास देऊन त्याला आपला घरजांवई करून घेतला तर त्याबद्दल जिव्या मांगाला अशा राष्ट्रीय ब्राह्मणावर कांही दावा करता येणार नाही. कारण कोणी कोणाला मुलगी द्यावी, कोणी कोणाच्या पंगतीला बसावें हा शिष्टाचाराचा प्रश्न आहे. पण सार्वजनिक सोईचा उपयोग करणें हा कायद्याचा प्रश्न आहे.

व तेवढ्या पुरती आमची मागणी आहे. सार्वजनिक तलावांचा., देवळांचा उपयोग करणें, करूं देणे हा कायद्याचा प्रश्न आहे, शिष्टाचाराचा नव्हे. त्यांत कोणी हरकत केली तर त्याबद्दल जावडेकर भटजीस आणि जैनुद्दीन मौलवीस दावा करण्यास जितका अधिकार आहे तितकाच अधिकार जिव्या मांगास आहे.

हे कायदेशीर हक्क उपभोगीत असतां सर्वांनाच सर्वांशी सहचार करणें प्राप्त आहे. असें करणें ज्यांना खपत नाही त्यांनी आपले काळें तोंड घेऊन देशत्याग करावा अगर समुद्रांत उडी घालून आपला नायनाट करून घ्यावा. शिष्टाचार व कायदा यांतील भेद इतका उघडा आहे की कोणाही सामान्य बुद्धीच्या माणसास कळण्यासारखा आहे. पण भालाकारांत सामान्य माणसाची तरी बुद्धि कोठे आहे ? आणि जरी असली तरी ज्यानें सारें आयुष्य कुचेष्टा करण्यांत घालविले अशा दुर्बुद्धीला खरा अर्थ समजून घेण्यास लागणारें शील कोठून असणार ! ज्याची विचारशक्ति पशूंच्या विचारशक्तीहून जास्त दूरवर गेलेली नाहीं व जो खऱ्या शीलाला पारखा झाला आहे अशा खडकाला शिव्याशापाचे अगर सुविचाराचे कितीही स्नान घातलें म्हणून त्याच्या अंतर्यामांत काही ओलावा उत्पन्न होणार आहे काय ? कुत्र्याचे शेपूट नळींत घातलें तरी तें सरळ होणार नाही. विरडीला जाणारें ढोर कांही केले तरी गेल्याशिवाय राहाणार नाही. तीच गत भालाकाराची आहे. मग या शिंगे लाउन शहाण्यांत मोडू पहाणाऱ्या मूर्खांबरोबर लागण्यांत काय अर्थ आहे ?

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ जून १९२७.

# ३१

# . . . . तर त्यांनी आधीं शहाणपण शिकले पाहिजे

मुंबईतील महार व मांग यांच्यांत झालेल्या सहभोजनासंबंधींचे एक पत्र† या अंकात दुसरीकडे छापले आहे. आम्ही अस्पृश्यवर्गातर्फे कायद्यानें प्राप्त होणाऱ्या हक्कांपेक्षा जास्त कांहीं मागत नाहीं पण इतरांना हक्क देतांना कायदेशीर हक्कच नव्हे तर शिष्टाचारावर अवलंबून असणारे हक्क देखील तुम्ही तुमच्या खालीं असतील त्यांना द्या असें अस्पृश्य वर्गास सांगणें हें आमचे कर्तव्य आहे असें आम्ही समजतों. म्हणून सहभोजनांत भाग घेणाऱ्या महारबंधूचें आम्ही अभिनंदन करतों. त्यांना विरोध करणाऱ्या महार लोकांना त्याच पत्रांत खरमरीत उत्तर मिळालेंच आहे. तेव्हां विशेष लिहिण्याची जरूरी नाहीं. महारांतील ब्राह्मण्य जरी क्षम्य असलें तरी तें पापच आहे. त्याची तरफदारी कोणी शहाणा करणार नाहीं. हे ब्राह्मण्याचे भूत ज्या महार लोकांत असेल त्यांनी तें आपल्यांतून जितक्या लवकर घालवून देतां येईल तितक्या लवकर घालवून देणें बरें. त्याचबरोबर मांग लोकांनींहि हें ध्यानांत ठेवावें कीं, टाळी एका हातानें वाजत नसते. आम्हांला ठाऊक आहे कीं, जे मांग पुढारी मांग जातींत जागृति करण्याकरितां दौरा काढतात ते मांगांना महारा विरुद्ध उठविण्याचा प्रयत्न करतात. कित्येक ठिकाणीं महाराचे हातचे आपण खाणार नाहीं अशा बेलभंडार घेऊन आणाशपथा मांग लोकांना त्यांच्या पुढाऱ्यांनीं घ्यावयास लावल्याचें आमच्या कानांवर आलें आहे. महारांच्या घरचें न खाण्याच्या शपथा मांग लोकांनीं सर्रास वाहील्या तर त्या पासून आम्हाला आनंदच आहे. पण त्या पेक्षां कोणत्याच जातीच्या हातचें आपण खाणार नाहीं अशा शपथा त्यांनी वाहील्या तर अधिक बरें ; कारण अशानें मांग लोकांतील जागृति केवळ महारांचा द्वेष करण्याकरितां होत नसून मांग जातीची उन्नति करण्याकरतां होत आहे या बद्दल कोणास शंका वाटणार नाहीं. यास्तव इतर कोणत्याहि जातीचें उष्टे खा पण महार जातीचें खाऊं नका असा क्षूद्र बुद्धीचा उपदेश करणाऱ्या मांग पुढाऱ्यांना आमची अशी सूचना आहे कीं, महारामांगांमध्यें सहभोजन सुरु व्हावें अशी जर त्यांची इच्छा असेल तर त्यांनी आधीं शहाणपण शिकले पाहिजे.



---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक-१०.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ जून १९२७.

# ३२

## ब्राह्मणांच्या हातचें शिक्षण या काळांत कोणासच चालणें शक्य नाही.

मुंबई इलाख्यांतील शिक्षण खात्याचा १९२४-२५ सालचा अहवाल नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यांत ट्रेनिंग कॉलेजांत ज्या लोकांचा १९२४-२५ साली प्रवेश झाला त्या लोकांच्या जातवारीचा तपशील खालील प्रमाणे केला आहे.

| | ब्राह्मण व तत्सम जाती | मराठा व तत्सम जाती | अस्पृश्य व तत्सम जाती |
|---|---|---|---|
| पूर्व भाग | १२३ | १४२ | ७ |
| मध्य भाग | २१९ | २९३ | ३५ |
| दक्षिण भाग | ९ | ३१ | ४ |
| एकूण | ३५१ | ४६६ | ४६ |

या इलाख्यांतील लोकसंख्येत ब्राह्मण व तत्सम जातींचे लोक शेकडा ९, मराठा व तत्सम जातींचे लोक शेकडा ५७ व अस्पृश्य व तत्सम जातींचे लोक शेकडा २३ आहेत. लोक संख्येच्या प्रमाणावरून जर पाहिले तर ब्राह्मण व तत्सम जातींना ७६, मराठी व तत्सम जातींना ५१०, अस्पृश्य व तत्सम जातींना २६७ अशा जागा अनुक्रमें ट्रेनिंग कॉलेजात मिळावयास पाहिजे होत्या. या दृष्टीनें पाहिलें तर मराठा व तत्सम जातींचा वा बाबतीत म्हणण्या सारखा काही तोटा झालेला दिसत नाही. पण अस्पृश्य वर्गाचा सारा हिस्सा ब्राह्मण लोकांनी गिळंकृत केलेला दिसतो ! आमच्या मतें ही गोष्ट अत्यंत विपरित आहे. स्पृश्य लोकांस हजारों धंदे मोकळे आहेत. वाटेल त्या रितीने त्यांना आपले पोट भरता येण्यासारखे आहे. पण अस्पृश्य वर्गातील लोकांस शिक्षकाच्या धंद्यासारखा साधा, सोपा, सुसाध्य असा दुसरा धंदा नाही. पण त्यांतही त्यांचा प्रवेश होऊ नये म्हणजे अन्यायाची कमाल झाली असेंच म्हटलें पाहिजे. धंद्याच्या दृष्टीनें तर हा अन्याय आहेच पण सामाजिक दृष्ट्या देखील शिक्षक वर्गांत अस्पृश्य लोकां ऐवजीं ब्राह्मण लोकांचा भरणा होणें आमच्या मतें अगदी अनिष्ट आहे. शिक्षक वर्ग हा राष्ट्रांतील सारथी वर्ग आहे. कारण त्यांच्या हाती शिक्षणाच्या दोऱ्या असतात. यास्तव शिक्षक कोण असावा या सारखा समाजहितांच्या दृष्टीनें दुसरा

महत्त्वाचा प्रश्न नाहीं. जे लोक इतरांना जनावरां पेक्षांहीं कमी लेखतात, इतरांबद्दल ज्यांच्या मनात सदैव तिरस्कार आणि इतरांच्या बुद्धिमतेबद्दल ज्यांच्या मनात सदैव शंका अशा लोकांच्या हाती शिक्षण देऊन समाजाचें वाटोळे आणखी किती दिवस करावयाचे ! शाळेमध्ये नुसत्या बाराखड्या शिकवावयाच्या असत्या तर ती गोष्ट निराळी ; पण शाळेत मुलांची मने सुसंस्कृत करून त्यांना समाजहितास योग्य असें वळण लावावयाचे असतें. शाळा म्हणजे उत्तम नागरिक तयार करण्याचें कारखाने आहेत. अर्थात या कारखान्याचा फोरमन जितका शहाणा असेल तितका उत्तम माल कारखान्यांतून बाहेर पडणार आहे. शाळा म्हणजे कांही हिंदु उपहार गृह नव्हे की त्यांत ब्राह्मण भट्यारी ठेवला की भागलें. ब्राह्मणांच्या हातचें अन्न जरी सर्वांना चालत असलें तरी ब्राह्मणांच्या हातचें शिक्षण या काळांत कोणासच चालणें शक्य नाही. तरी सरकारने याचा पुरता विचार करावा व ट्रेनिग कॉलेजांत अस्पृश्यांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणांत जागा द्याव्यात. सुधारणा करतां आली नाही म्हणून न्याय देखील करूं नये काय ?

• • •

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ जून १९२७.

# ३३

# अशा दुष्ट व पापी लोकांच्या पारिपत्यासाठी पिनल कोडांत नवे कलम कां नसावे ?

काठेवाडांत लाठी म्हणून एक खेडेगांव आहे. त्या गांवांत जेठालाल माणसूर परमार नावांचे एक अस्पृश्य शाळा मास्तर राहतात. त्या बिचाऱ्यावर जो एक अनिवार प्रसंग गुदरला त्याची हकिकत नुकतीच प्रसिद्ध झालीं आहे. या गृहस्थाची बायको गेल्या ५ एप्रील रोजीं बाळंतीण झाली. आणि लगेच दोन दिवसांनी ती आजारी पडली. जवळच धांगध्रा येथें प्राणजीवन नांवाचा डॉक्टर होता. त्याला आणण्या करितां मास्तर त्याजकडे गेले, आणि आपल्या बरोबर चला म्हणून विनंती केली. "मी धेडवाड्यांत येणार नाहीं व धेडजातींच्या रोग्यास तपासून स्वतःस विटाळून घेणार नाही" असें म्हणून त्या बिचाऱ्याला त्यानें झिडकारुन लावलें. नंतर त्यानें त्या शहरच्या नगरशेटकडे या डॉक्टरवर आपले वजन खर्च करा म्हणून विनंती केली. नगर शेटच्या भीडेनें डॉक्टर महाशय कबुल झाले, परंतु "मी या अस्पृश्याच्या घरांत येणार नाही; त्या बाईला बाहेर आणीत असाल तर तिला पाहीन." अशी अट घातली. या दुर्दैवी शिक्षकांने ती अट कबूल करून दोन रुपये फी वर तो डॉक्टरला घरी घेऊन गेला. डॉक्टर आल्यानंतर दोन दिवस आपल्या जिवाशीं झगडत अंथरूणावर पडलेल्या त्या बाळंतीण बाईस रात्री ८ वाजता घराबाहेर आणले. डॉक्टरने आपलें उष्णता मापक यंत्र काढलें पण अंगास तो लावीना किंवा तिच्या नवऱ्याच्या हातांत देईना. जवळच्या एका मुसलमानाला मध्यस्थ म्हणून उभा केल्यानंतर कोठें डॉक्टर रोग्याची परीक्षा करण्यास तयार झाला. पहिल्यांदा तें यंत्र डॉक्टरने मुसलमानाच्या हातीं दिले, त्यांने त्या बाईच्या नवऱ्याच्या हातीं दिलें, त्यानें तें आपल्या बायकोच्या अंगाला लावले. काम झाल्यानंतर पुन्हा तें त्यानें मुसलमानाच्या हातांत दिलें व शेवटी मुसलमानाच्या हातून डॉक्टरने घेतलें. दिव्याच्या अंधुक प्रकाशांत यंत्रावरचा तापाची मर्यादा दाखविणारा आंकडा डॉक्टरने वाचला. अंगाला हात न लावतांच निमोनिया झाला आहे म्हणून सांगितले. फी घेतली आणि औषध पाठवितो असे सांगून निघून गेला. नंतर पुढें सहा तासांनी त्या बाईचे प्राणोत्क्रमण झालें ! डॉक्टरच्या ह्या अमानुष कृतीची हकिकत वाचून कोणास तिडीक येणार नाही ? डॉक्टरची करणी म्हणजे

स्पर्शास्पर्श भावनेचा अतिरेक आहे. स्पर्शास्पर्श भावनेनें पछाडलेला हिंदु किती निर्दय असूं शकतो याचें हें एक हृदयस्पर्शी उदाहरण आहे. गाईसारख्या जनावराचा गळा कापूं नका म्हणून हंबरडा फोडणाऱ्या हिंदूच्या अंतःकरणाला प्रत्यक्ष डोळ्यासमोर प्राणांतिक स्थितीत असलेल्या एका स्त्रीला पाहून दयेचा, करुणेचा लवमात्र पाझर फुटूं नये या मनोवृत्ती सारखी मनोवृत्ति हिंदू जाती खेरीज अन्य कोणत्याच मानव जातींत दिसावयाची नाहीं ! याचें कारण अगदी उघड आहे. हिंदूंना गोब्राह्मणाशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट वंदनीय नाही. व हा महामंत्र उपजतांच त्यांना दिला जात असल्याकारणानें त्यांचा हा विलक्षण स्वभाव सहज बनून जातो. ज्या धर्माची कल्पना या घोर मनोवृत्तीस प्रसवते त्याचा नायनाट झाल्या खेरीज हिंदूच्या क्षुद्र मनोभावना केव्हांच लयास जाणार नाहींत. जे स्पृश्यांतील मूर्ख लोक अस्पृश्यांनी आपली शुद्धी करून घेतली पाहिजे असा मोठा टेंभा मिरवून सांगत फिरतात त्यांनीं या गोष्टीवरून खरें अशुद्ध कोण याचा विचार करावा. आतां बाई वारल्याचें विशेष नाहीं. आलेल्या डॉक्टरनें जें करावयाचें तें केलें असतें तरी देखील जें होणार तें टळलें नसतें. पण अशा करणीमुळें रोगी मरण्यासारखा नसतांही मरावयाचा. तेव्हां अशा मनोवृत्तीला कांहीं इलाज करतां आल्यास तो करणें अवश्य आहे. पाश्चिमात्य राष्ट्रांत वैद्यकीचा धंदा इतका जनकारणी मानला जातो की, वैद्याला कोणत्याहि वेळी कोठेंही बोलावलें असतां गेलें पाहिजे असा या धंद्याचा शिष्टाचार आहे. व त्या शिष्टाचाराची अंमलबजावणी वैद्य लोकांची जी संस्था असते ती मार्फत होते. या देशांत पाश्चिमात्य वैद्यकीचा अभ्यास करून पारंगत झालेले जे लोक आहेत त्यांनीही हा शिष्टाचार मान्य केला आहे. पण असें असूनही जो डॉक्टर तो पाळीत नाहीं त्याच्या निंद्य वर्तनाचे नियंत्रण अन्य उपायांनी करणें अवश्य आहे. एकादी गोष्ट करणें हें ज्याचें कर्तव्य असून तें तो करित नाही व त्याचे न करण्यानें दुसऱ्याचें नुकसान झालें तर त्यात गुन्हा होतो अशा तत्वाची अनेक कलमें पिनल कोडांत आहेत. मग अशा दुष्ट व पापी लोकांच्या पारिपत्यासाठी पिनल कोडांत एकादें नवें कलम कां घालण्यांत येऊं नये ?



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ जून १९२७.

# ३४

# अस्पृश्यता निवारणाचा पोरखेळ

अस्पृश्यतेची कल्पना हिंदू धर्मांतच काय ती आहे असें नाहीं. हिंदू धर्माप्रमाणे इतर धर्मांतही ती आढळते. यहुदी धर्मांत प्रेताला शिवल्याने मनुष्य ओंवळा होतो असें सांगितलें आहे. त्या धर्मात यज्ञांतील मांस सोवळ्याने भक्षण करण्याची चाल होती. व तसला सोवळा माणूस इतर ओवळ्या माणसाला अस्पृश्य मानीत असे. सुवेराचा व विटाळशीपणाचा विटाळ यहुदी धर्मात सांगितला आहे इतकेंच नव्हे तर कोणत्याहि कारणामुळें एकाद्या यहुदी माणसाच्या शरिरांतून रक्तस्त्राव होत असता त्यास अस्पृश्य मानावें अशीही पण यहुदी धर्माची अनुज्ञा आहे. पारशी धर्मातही अस्पृश्यतेची कल्पना असलेली दिसून येते. पारशी धर्मग्रंथाच्या दृष्टींनें पाहातां कोणताही मनुष्य खालील तीन कारणांमुळे " ताबू " (अस्पृश्य) होऊ शकतो. (१) मृताला शिवलें असतां ; (२) विटाळशीपणामध्ये स्त्रिया असतां व (३) वरील अस्पृश्यांस स्पर्श केला असतां. हिंदु धर्माप्रमाणेच या दोन धर्मात अस्पृश्यतेच्या कल्पनेचा प्रादुर्भाव झाला असतांही हिंदुधर्मांतच अस्पृश्य वर्ग कां निर्माण झाला व यहुदी व पार्शी धर्मात कां झाला नाहीं, हिंदु धर्मातील अस्पृश्यता ही त्रिकालिक कां ठरली व इतर धर्मात ती तत्कालिक कां ठरली, तसेंच इतर धर्मांत या अस्पृश्यतारुपी बहिष्कारांतून मुक्त होण्यास कसा मार्ग ठेवला होता व हिंदु धर्माने तो कां ठेवला नाही इत्यादि प्रश्न चर्चा करण्यासारखे आहेत व त्यांची केव्हां तरी एकदां चर्चा करण्याचा आमचा मानस आहे. आज फक्त अस्पृश्यता निवारणाच्या प्रयत्नाचा आढावा काढण्यांचें आम्ही योजिलें आहे. आणि त्यासाठी ऐवढें सांगणें बस्स आहे कीं, अस्पृश्यतेच्या कल्पना जरी सर्व देशांतून व धर्मांतून आढळून येतात तरी

## पिढीजाद अस्पृश्य वर्ग हिंदुस्तानाशिवाय अन्यत्र कोठेंच नाहीं

या पिढीजाद अस्पृश्य वर्गास स्पृश्य करून घेण्यास या देशांत कांहीच प्रयत्न झाला नाहीं असें म्हणतां येत नाहीं. या बाबतीत जे प्रयत्न झाले त्यांचे कालमानपरत्वें दोन भाग करतां येतील. (१) प्राचीन काळांतील प्रयत्न, व (२) आधुनिक काळांतील प्रयत्न. प्राचीनकाळी प्रथमतः गौतमबुद्धानें अस्पृश्यता निवारणाची मुहूर्त मेढ रोंविली. वेदांतांत जरी समता प्रतिपादन केलेली होती

तरी पण कर्मठ लोकांच्या प्राबल्यामुळे वेदांतांतील या तत्वाला व्यवहारांत कोठेच ठाव नव्हता. कर्मठांच्या छापामुळे धर्माच्या नांवाखाली समता व प्रीति असावयाची ती एकीकडेच राहून त्याठिकाणी जातिभेदाची विषमता व हिंसा चालू झाली. या विषमतेचें व हिंसेचें खंडण करण्यासाठींच बुद्धाचा अवतार झाला व त्यानें सर्वांवर आत्मवत् दृष्टि ठेवणें, दुसऱ्यास कोणत्याही प्रकारें दुःख न देणें याचा उपदेश केला. इतकेच नव्हे तर सर्व मनुष्यांमध्ये असलेलें नैसर्गिक एकजिनसीपण व्यवहारांत उतरविलें. याला एकच पुरावा पुरे आहे. हिंदुधर्मातील भिक्षुवर्ग फक्त ब्राह्मण जाती पैकीच असूं शकतो. पण बुद्धानें आपल्या भिक्षुवर्गात सर्व जातीच्या लोकांस स्थळ दिलें होतें. स्थविर नांवाच्या एका भंग्यास बुद्धानें आपल्या भिक्षुवर्गात घेतल्याची कथा सुप्रसिद्ध आहेच. बुद्ध धर्माचा पाडाव होऊन जेव्हा हिंदुधर्माची घडी पुन्हा बसविण्यांत आली तेव्हां अर्थातच बुद्धाने आरंभिलेल्या अस्पृश्यता निवारण्याच्या कार्याची पिच्छेहाट झाली व अद्वैतपंथ स्थापन करणारे शंकराचार्य यांनी व्यावहारिक व पारमार्थिक असे आचरणाचे व सत्याचे दोन भेद करुन समतेचा प्रकार हा काय तो पारमार्थिक दशेपुरता आहे असें ठरविले. समतेच्या तत्वाला अशापरी मर्यादा घातली गेल्यामुळें व्यवहार दशेंतील भेदाभेद वाढत गेला, व त्यास आळा घालण्याची जरूरी शंकराचार्यास किंवा त्यांचें अनुयायी मध्वाचार्य व वल्लभाचार्य यांस वाटली नाहीं. परंतु विशिष्टद्वैत पंथाचे आद्य प्रवर्तक श्रीरामानुजाचार्य यांनीं मात्र या बाबतींत उत्कृष्ट कामगिरी केली. हिंदुधर्मांत समताभावाचा जर कोणी जोराचा पुरस्कार केला असेल व अमलांत आणला असेल तर तो या आचार्यांनीच होय. खुद्द रामानुजाचार्यांचा गुरू ब्राह्मण नव्हता. त्यांनी कांचीपूर्णनामक ब्राह्मणेतराला गुरू केलें. इतकेंच नव्हे तर त्यांच्या जुन्या चालीच्या बायकोनें कांचीपूर्ण जेवल्यानंतर जागा शुद्ध करून त्याचा अपमान केला यामुळे संतप्त होऊन त्यांनें आपल्या बायकोला घराबाहेर घालवून दिलें, व आपण संन्यासी बनला. पुढे संन्यासाश्रम घेऊन उपदेश करूं लागल्यानंतर कुंभकोन येथें त्यांचा विजय झाल्यावर ते तिरुवल्ली येथे गेलें. तेथें त्यांचा मुक्काम असतां एका चांडाळ स्त्रीशी त्यांचा संवाद झाला व त्यांत त्यांना असें आढळलें कीं, तिची मानसिक उन्नति बरीच झालेली आहे. तेव्हां सर्वांदेखत ते म्हणाले " हे ! चांडाळ स्त्रीये ! मला क्षमा कर. तूं माझ्यापेक्षां जास्त पवित्र आहेस " असें म्हणून तिला त्यांनी आपल्या पंथाची दीक्षा तत्काल दिली आणि तिची मूर्ति करून तेथील देवालयांमध्ये स्थापन केली. तिची मूर्ति अजूनही तेथील देवालयांमध्ये दाखविली जाते. व सर्व भाविक लोक तिची भक्तिभावानें पूजा करितात. धनुर्दास हा तर अस्पृश्यच होता. परंतु रामानुजाचार्यांनीं त्याला आपला शिष्य केलें व

त्यावर आचार्यांचा इतका लोभ होता की नदीवर स्नानाला जातांना ते आपल्या दाशरथी नामक ब्राह्मण शिष्याच्या खांद्यावर हात टाकून जात परंतु स्नान करून परत येतांना दाशरथीच्या खांद्यावर हात न ठेवता ते धनुर्दासाच्या खांद्यावर हात ठेऊन येत. असें करण्यांत अस्पृश्यतेचा उघडपणें इनकार करण्याचा त्यांचा हेतु होता हें उघड आहे. यादवगिरीवर नारायणाचें देऊळ श्रीरामनुजाचार्यांनी जेव्हां बांधिलें तेव्हां त्यांत सर्व अस्पृश्य जातींच्या लोकांचा प्रवेश व्हावा अशी योजना आचार्यांनी करून ठेवली होती. देवळाजवळील तळ्यामध्ये सर्व अंत्यजांना स्नान करण्याची परवानगी असे व त्यांना देवळांत देवदर्शनाला जाण्याची मोकळीक असे. सध्यां ही आज्ञा फक्त उत्सवाच्या दिवसा पुरतीच नियमित केली गेली आहे हें खरे; पण त्यावरून मूळ आचार्यांचा उद्देश किती समतेचा होता हें कळून येतें. आचार्यांनीं आपल्या संप्रदायाचा प्रसार करण्यासाठी सातशें मठ स्थापिले होते. परंतु त्यांच्याकडून मूळ आचार्यांनें आरंभिलेले अंत्यजोद्धाराचें काम फारशें झालें नाही. नाहीं म्हणावयास रामानुजाचार्यांपासून पांचवे आचार्य रामानंद यांनी अस्पृश्यतानिवारणाचे बाबतींत बरीचशी कामगिरी केली. ज्या बारा शिष्यांच्या हातून त्यांनी आपला कार्यक्रम चालविला होता ते सर्व हीन मानलेल्या जातींचे होते. रामानुज सांप्रदायाने ज्याप्रमाणें स्पर्शास्पर्श भेद नष्ट करण्याचा प्रयत्न केला त्याचप्रमाणें, चैतन्य सांप्रदायानेंही केला, किंबहुना सर्वात जास्त प्रमाणांत केला असें सुद्धां म्हणता येईल. ज्याप्रमाणें रामानुजाचार्यांनीं ठिकठिकाणची पवित्र देवालयें अंत्यजांना मोकळी केली त्याचप्रमाणे या चैतन्य गुरुनें जगन्नाथाचें देऊळ सर्व लोकांना मोकळे करुन दिलें. आज अनेक वर्षापासून जगन्नाथाच्या देवळामध्यें सर्व लोक सारखे आहेत असें उघडपणें मानण्यांत येत आहे. खाण्यापिण्यामध्यें व नुसत्या स्पर्शामध्यें कोणत्याही जातीच्या माणसाला दूर केलें जात नाहीं. ओवळेंपणा मानावयाचाच नाहीं अशी तेथील पद्धत आहे. सर्व जातीच्या लोकांचा-अंत्यजांचा सुद्धां-प्रवेश जगन्नाथाजवळ सारख्यां रितीनें होत आहे. सर्व जातीचे व सर्व मताचे लोक आपला जन्मतः उच्चनीच भाव विसरून जर कोणत्या देवापुढें जमत असतील तर तो पुरीमधील जगन्नाथच होय. या सर्व प्रयत्नांचा फारसा परिणाम झालेला नाही. बुद्धधर्माच्या विरुद्ध जी मन प्रवृत्ति एकदां जोरावली ती पुन्हां जातिभेदाकडे झुकूं लागली. तिला योग्य चलन न मिळाल्यामुळें ती उत्तरोउत्तर जास्त जास्त दृढ होत गेली व शेवटी ती इतक्या थराला पोहोंचली कीं पूर्वीच्या चार वर्णांच्या चार पाच हजार जाती व पोटजाती झाल्या. बुद्ध प्रतिपादित बंधुत्व जाऊन प्रत्येक

जात निराळी व ती मधील पोट भेद निराळे असा तुटकपणा आला व सोंवळ्याओंवळ्याच्या कल्पना इतक्या वाढल्या कीं पुढे सोळाव्या शतकांत साधुसंतांनीं सत्यशोधकी कुऱ्हाडीचे किती तरी घाव घातले तरी अस्पृश्यतारूपी फोंफावलेला वृक्ष त्यांच्या हातून तोडला गेला तर नाहींच पण त्याचें पान सुद्धा त्यांच्यानें हाललें नाहीं.

आधुनिक काळांतील अस्पृश्यता निवारणाच्या प्रयत्नास इंग्रजी अमदानीपासून सुरवात झाली आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाही. या कालांतील पहिला सुधारक म्हणजे राजा राममोहनराय. सती वगैरे सारखे अनिष्ट सामाजिक आचार राजा राममोहनराय यांच्या प्रयत्नानें बंद झाले ही गोष्ट खरी आहे तरी पण सामाजिक प्रश्नांपेक्षा धार्मिक प्रश्नांवरच त्यांचा विशेष भर होता हें निर्विवाद आहे. जोंपर्यंत धार्मिक मतांचा, खरें खोटेपणाचा विचार चालू होता तोंपर्यंत सामाजिक प्रश्नांकडे कोणाचेंच लक्ष वेधलें नव्हतें. राजकीय चळवळ जेव्हां सुरूं झाली तेव्हां सामाजिक प्रश्न पुढें येत चाललें. कारण सामाजिक पुनर्घटनेचा प्रश्न हिंदुलोकांनी हातीं घेतल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्याचे चमचाभर पाणीसुद्धां हिंदु राष्ट्राच्या पचनी पडणार नाहीं. उलटी होईल ! असें बजावून सांगणारा एक पक्ष होता. नुसती राजकीय चळवळ करावी म्हणणारांनीं राष्ट्रीय सभा* स्थापन केली व सामाजिक सुधारणेची चिंता वाहणाऱ्यांनी राष्ट्रीय सभेच्या तोडीला म्हणा किंवा जोडीला म्हणा सामाजिक परिषद स्थापन केली. या दोन पक्षांत आधी काय ? सामाजिक की राजकीय या प्रश्नावर कांहीं वर्षे वाद चालूं होता. त्यात आधीं राजकीय म्हणणाऱ्या लोकांचा पराजय झाला असता तर अस्पृश्यते सारखा सामाजिक प्रश्न लवकर सुटण्याचा मार्गाला लागला असता. पण त्यात आधी सामाजिक म्हणणाऱ्या लोकांचाच पराभव झाला. माात्र तेवढ्यावरून आधी सामाजिक हा पक्ष मुळांतच कमकुवत असावा असे मानणें चुकीचें होणार आहे. या पक्षाच्या पराजयाचें कारण म्हणजे जातिवाचक प्रश्नांना सामाजिक स्वरूप देण्यांत आलें हेंच होय. सामाजिक प्रश्न अनेक कारणांमुळें उद्भवतात. कांही अनिष्ट कुलाचारामुळे उद्भवतात; कांही अनिष्ट देशाचारामुळें उद्भवतात. ज्यांचा उगम कुलाचारांत असतो त्यांची व्याप्ती त्या कुलांतील लोकांपुरतीच असते. व ज्यांचा उगम देशाचारांत होतो ते प्रश्न अखिल जनतेचे प्रश्न होऊन बसतात. पण सामाजिक परिषदवाल्या सुधारकांना हा भेद कळला नाहीं. आणि म्हणूनच जातीभेद व स्पर्शास्पर्श भेद इत्यादि सर्वजनव्यापी प्रश्नांस विसरून जाऊन विधवांचें वपन, गतभर्तृकांचें पाट व पोरपणांतील लग्नें अशा कुलवाचक प्रश्नांवरच त्यांनीं रणें पाडली. हे प्रश्न

सामाजिक असले तरी ते राजकीय मागणीच्या आड येऊं शकत नाहींत आणि म्हणूनच कै. तेलंगप्रभृती सारख्या विलक्षण लोकांना सामाजिक परिषदवाल्यांचा बुद्धीवाद पसंत पडला नाहीं. पण तोच त्यांनी जातीभेद व अस्पृश्यता अशा सामाजिक अन्यायांचा आधार घेतला असता तर तेलंगाना नव्हे कोणलाहि त्यांना निरूत्तर करतां आलें नसतें. पण त्यांची दृष्टि कुलाचाराच्या पलिकडे गेली नाही. स्वजातीच्या लोकांची शुद्धता करण्यांत त्यांनी सारा वेळ घालविला. आणि सामाजिक सुधारणेचा जप करूनही जातीभेद व स्पर्शास्पर्श भेद होता तसा ठेवून गेले.

या आधुनिक काळांतील सामाजिक परिषद वाल्यांच्या जागीं आतां नवीन सुधारणावादी उत्पन्न झाले आहेत. जुन्यांची जशी सामाजिक परिषद होती तशी नव्यांची हिंदु महासभा ! या हिंदु महासभेंचें उगम स्थान म्हणजे आर्यांचे मूळ वसतिस्थान जे पंजाब तें होय. १९०९ च्या सुमारास जेव्हां मुसलमानांनीं कॉंग्रेस मधून फुटून जाऊन मुसलमान वर्ग सुसंघटित करण्याच्या उद्देशानें मुस्लिम लीग* काढली तेव्हां योगास प्रतियोग म्हणून

## पंजाब हिंदुसभा

या नावांची एक संस्था प्रस्थापित केली गेली. स्थापन झाल्यापासून चार वर्षे पावेंतो या संस्थेच्या कार्यांचे क्षेत्र पंजाबापुरतेंच होतें. पण १९१३ सालीं ही संस्था आपल्या प्रांताची सरहद्द ओलांडून अंबाला येथें भरविण्यांत आली. व त्या ठिकाणीं असा ठराव करण्यांत आला कीं, हिंदु समाजाच्या प्रश्नांची वाटाघाट करण्यासाठी अखिल हिंदु जनांची १९१५ सालीं एक परिषद हरिद्वार येथें भरविण्यांत यावी. त्या प्रमाणे महाराज मुनिंद्रचंद्र नंदी यांच्या अध्यक्षतेखाली एक सभा झाली व त्या सभेंत पंजाब हिंदु सभेच्या ऐवजीं

## सर्व देशीक हिंदु सभा

या नांवाची एक संस्था स्थापन करण्यांत आली. संस्थेचा मुख्य उद्देश हिंदु समाजास संघटित करून त्यास एकरूप व एकजीव करणें हा होता. सभेला महाराज कासिम बझार यांच्यांसारखे अध्यक्ष, तीन शंकराचार्य धरून तेरा उपाध्यक्ष, लाला सुखवीरसींग सारखे सेक्रेटरी व चार मदत सेक्रेटरी आणि निरनिराळ्या प्रांतातून नियोजित केलेले पन्नास सल्लागार नियोजित केले होतें. एवढया मोठ्या डामडौलानें स्थापित केलेल्या सर्व देशीक हिंदु सभेच्या हातून हिंदु समाजाच्या पुनःर्घटनेचे कार्य यशस्वी रितीनें पार पडेल असें सर्वांसच वाटत होतें. पण इंग्रज पाणाड्याच्या हातून गंगेची सुटका करून तीच्या

पाण्याचा ओघ हरिद्वारपर्यंत अखंड जावा, मुसलमान कसाबांच्या हातून गाईचा गळा सोडवावा, आणि हिंदु समाजास राजकारणांत त्याच्या संख्येच्या प्रमाणांत त्यास हक्क द्यावे वगैरे प्रश्नांसंबंधीं सरकारकडे दाद मागविण्यापलिकडे या संस्थेंनें प्रत्यक्ष अशी कोणतीच कामगिरी केली नाहीं. सामाजिक सुधारणेचा कोणताच असा उपक्रम या संस्थेच्या हातून झाला नाही. नाही म्हणावयास अस्पृश्यता निवारणासंबंधी केवळ लोकमत अजमाविण्याच्या हेतूनें एक पत्रक तिनें काढलें होतें. पण ज्या अर्थी पटेलच्या मिश्रविवाहाच्या बिलाला या सभेंनें विरोध केला होता, त्या अर्थी अस्पृश्यता निवारणाचे बाबतींत तिच्यांनें कोणती कामगिरी झाली असती याचा अंदाज करतां येण्यासारखा आहे. १९१८ साली या सभेची पांचवी व शेवटची बैठक कॉंग्रेस बरोबर दिल्ली येथें राजा रामपालसिंग यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली होती. तेथील तिची कामगिरीही वाचाळते पलिकडे गेलेली नव्हती. जातवार प्रतिनिधींच्या तत्वास विरोध, गोवधाची कायद्यानें बंदी आणि जर्मन युद्धांत हिंदी लोकांनीं केलेल्या मदतीबद्दल इकडून विलायतेंत नेलेले जुने संस्कृत ग्रंथ व पुराण्या वस्तु यांचा हिंदुस्थानास परत अहेर, या व अशा प्रकारच्या सरकारास विनंत्या व आयुर्वेदाकडे दुर्लक्ष केल्यामुळें सरकारची कानउघडणी ह्यातच तिचें कार्य व तिचा अवतार हीं दोन्हीं संपुष्टांत आली. पुढची दोन तीन वर्षे रौलत बिलाचा नाच व खिलापतीचा पिंगा घालण्यांत गेली. पुढे सन १९२१ साली हरिद्वार येथे जेव्हां तिचें अधिवेशन भरविण्यांत आलें, तेव्हां तेथें या

**सर्व देशीक हिंदुसभेचें रूपांतर होऊन ती हिंदु महासभा या नावांनें प्रगट झाली.**

या हिंदु महासभेची कांही किरकोळ अधिवेशनें भरल्यानंतर तिचें सर्वात मोठे असे एक अधिवेशन बनारस येथें १९२३ सालच्या ऑगस्ट महिन्यांत भरविण्यांत आलें. त्या ठिकाणी हिंदु समाजाच्या अनेक रोगांवर कोणकोणते उपाय योजावें हें ठराव रूपानें निश्चित करण्यांत आले होते.राष्ट्रीय कांग्रेसनें सामाजिक सुधारणेचा प्रश्न हातीं घेतला नाहीं याबद्दल सर्व अस्पृश्य वर्ग दिलगीर होता, व १९१७ सालच्या कांग्रेसच्या ठरावानेंहीं कोणाचें समाधान झालें नव्हतें. कारण त्या ठरावांत रडत्याची आसवें पुसण्यापलिकडे कांही मर्म नव्हतें हें सर्वांस ठाऊक होतें. पण १९२३ सालापासून कॉंग्रेसच्या बेफिकिरीबद्दल अस्पृश्य वर्गास पर्वाप्रमाणें विषाद वाटत नसें. हिंदु समाजानेंच आपला प्रश्न हातीं घेतला आहे तेव्हां कॉंग्रेस ओस पडूं दे असें म्हणून बऱ्याच अस्पृश्यांना धीर आला होता. मालवियांसारख्या कट्ट्या धर्माभिमान्याने दु:खाश्रु गाळून हिंदू महासभेच्या

प्रतिनिधीस अस्पृश्यता निवारण करण्यास चालना दिली ती महासभा अस्पृश्यतेचा प्रश्न सोडविल्याशिवाय रहाणार नाही असे वाटणें अगदीं सहाजिकच होते. पण या हिंदुमहासभेची तीच गत झालेली दिसते. आणि तिची कार्यक्षमता शब्दापलिकडे जाणार नाही, असें म्हणण्यास कांही हरकत वाटत नाहीं. हिंदु महासभेवरील हा आरोप आमचा नाहीं. तो आरोप स्वामी श्रद्धानंद यानींच केलेला आहे. पूर्वी दोन महिने हिंदु महासभेच्या निष्क्रियतेस कंटाळून त्यांनी जो राजीनामा दिला त्यांत त्यांनी स्पष्टपणे म्हटले आहे कीं, '' हिंदुमहासभेला आपले ठराव अमलांत आणावयाची उत्कंठा लागलेली दिसत नाहीं ; इतकेच नव्हे तर जे जे सभासद तिचे ठराव अमलांत आणण्यास उद्युक्त होतात त्यांच्या मार्गात अडचणी उत्पन्न करण्याचा ती प्रयत्न करते. हा आशेचा भंग म्हणजे कडेलोट नव्हे तर काय ? प्राचीन समाज सुधारकांचे हातून अस्पृश्यता निवारण झाले नाहीं तरी तें क्षम्य आहे. ते केवळ माणुसकीच्या स्वयंसिद्धतेवर भर देऊन अस्पृश्यता नष्ट करण्याच्या मार्गाला लागले होते. आधुनिक कालांतील परिषदवाल्यांनी जी अस्पृश्यांची उपेक्षा केली तिचें कारण वर दिलेच आहे. पण अस्पृश्यता निवारणाची खरी कळकळ असूनहि ते अचल राहिले असते तरी त्यांचें करणें दूषणास्पद झाले नसतें. अस्पृश्यता फार तर स्वराज्याच्या आड येईल असें त्यांना भय होतें. पण त्याला भिऊन त्यांनी अस्पृश्यता काढली नसती तर आपण कट्टे स्वराज्यवादी नाहींत हें फार तर त्यांना कबूल करावें लागलें असते. पण त्यांत लाज कसली ! कारण तसे असेल तर आम्हांस स्वराज्यच नको असें म्हणणारे अगणिक लोक अजूनहि आहेत. पारतंत्र्याची जाचणी इतकी तीव्र नाही व यामुळे एवढा त्याग करावयास सुधारकही तयार झाले नाहीत तर त्यांचा विशेष अपराध आहे असें म्हणतां येणार नाही. हिंदुमहासभेची गोष्ट या सर्वांहून अगदी निराळी आहे. परिस्थितीची जाचणी तिला जितकी आहे तितकी दुसऱ्या कोणालाच नव्हती. हिंदु महासभेपूर्वीच्या होऊन गेलेल्या सुधारकांस अस्पृश्यता निवारणाचें अपरिहार्यत्व भासलें नव्हतें. पण ऐन संकटाच्या भोवऱ्यांत सांपडलेल्या लोकांनी हिंदु धर्मास वाचविण्यास ही संस्था निर्माण केली आहे. व तिच्या चालकांस पुरतेपणी ठाऊक आहे कीं, हिंदु समाजाची संघटणा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. परंतु कलकत्ता, दिल्ली, लाहोर, रावळपिंडी, कोहाट, सोलापूर, गुलबर्गा इत्यादि स्थळीं घडलेल्या हिंदु मुसलमानांच्या दंग्यांत हिंदूंची जी वाताहात झाली ती उघड्या डोळ्यांनीं पहात असतां देखील हिंदु महासभेनें आपले डोळे मिटावेत यापेक्षा हिंदूंच्या दैवाचा दुसरा दुर्विपाक तो कोणता ? इज्जत उरली

नाहीं, मान उरला नाहीं, त्राण राहिला नाही व प्राण जाण्याची वेळ जवळ आली असतां देखील केवळ आत्मसंरक्षणाचा उपाय म्हणून तरी आपल्या स्वधर्मबांधवांस जवळ करण्याची बुद्धि या हिंदु महासभेस होऊं नये म्हणजे नवल नव्हे काय ? इतर राष्ट्रे मेलीं पण आमच्या वर्णाश्रम धर्मामुळे आम्ही जगलों अशी फुशारकी मारणाऱ्या लोकांनी आपण

## जगलों ते कसे जगलों

याचा कधी विचार केला आहे काय ? जगण्याचे अनेक मार्ग आहेत पण ते सारेच सारख्या मान्यतेचे आहेत असें नाहीं. शत्रू आला असतां त्यावर चाल करून त्याचा पाडाव करणें हा जगण्याचा एक मार्ग आहे. तसेंच त्याला शरण जाऊन तो घालील त्या अटीवर जगणें हा जगण्याचा दुसरा मार्ग आहे. दोहोंपैकी कोणत्याही मार्गाने गेलें असतां जगणें होतेंच. पण एका परीचे जगणे दुसऱ्या परीच्या जगण्यापेक्षां फार निराळया तऱ्हेचे असते. एक मानवाचें जिणे आहे. दुसरे किड्याचें जिणें आहे. पण धर्माच्या अतिरेकानें वेडावलेल्या लोकांना हा शूरांचा धर्म सांगून काय उपयोग ? नरकांतल्या किड्याप्रमाणे ज्यांनी हजारों वर्षे घालविली त्यांना मानवाच्या जिण्याची काय चाड आहे ? धर्माच्या नांवावर अस्पृश्यतेसारखी अनेक सामाजिक अन्यायांची टेंगळे व गळवें हिंदु जनांच्या अंगावर वाढलेलीं आहेत. व त्यामुळे हिंदु संस्कृतीचें आणि हिंदूंच्या चारित्र्याचें स्वरूप कोणा त्रयस्थांला साहजिक ओंगळ आणि हिडिसवाणें दिसतें. इतकेंच नव्हे तर अस्पृश्यतेच्या सामाजिक अन्यायाचें गळुं डोंगराएवढें वाढलें असून त्याच्या पायीं हिंदु समाज आजवर कण्हत कुंथत कसा बसा मार्ग कंठीत होता. पण आतां हें गळूं इतकें बळावलें आहे की हिंदु समाजाच्या हृदयाच्या प्राण क्रियेला देखील त्याची कळ पोहोचून हिंदु समाज मरून पडण्याची वेळ आली आहे. अशा काळीं हें गळूं फोडून टाकण्यासाठी कोणीतरी हाती नस्तर घेणें अवश्य होतें : पण जेथें स्वतः वैदूलाच गळवें झाली आहेत आणि नस्तर चालविलें असता आपलीच धार्मिक धमनी दुखवली जाईल, असें ज्याला भय वाटतें तो वैदु समाजावर नस्तर चालविण्यास कसा तयार होईल ! हिंदु महासभा ही पं. मदन मोहन मालवीया सारख्या महत्वाकांक्षीं ब्राह्मण्यग्रस्त भिक्षुकांची संस्था आहे. जोपर्यंत ती त्यांच्या कक्षेंत आहे तोपर्यंत अस्पृश्यता निवारणार्थ ती कांहीं करील अशी आशा धरणें व्यर्थ आहे. हिंदु महासभेच्या निष्क्रियतेबद्दल आम्हांस उदास वाटत नाही. कारण तिची आम्हांस केव्हांच आस नव्हती. हिंदु महासभा अस्पृश्यता निवारणात कांहीं करणार नाहीं असे जरी आम्हांस वाटत होतें तरी ती अस्पृश्यतेच्या दृढीकरणास कारणीभूत होईल असें आम्हांस केव्हांच वाटलें

नव्हतें. पण तसेंच एक खेदकारक कृत्य मुंबई प्रांतिक हिंदु महासभेच्या माटुंगा शाखेच्या हातून घडण्याचा कुयोग जवळ येऊन ठेपला आहे. हिंदु महासभेच्या माटुंगा शाखेने नुकतेंच एक विनंती पत्र काढलें आहे. त्यांत माटुंगा येथें हिंदु महासभेतर्फे एक देऊळ बांधण्यात येणार आहे असें जाहीर केलें आहे. व त्या कामी जनतेनें त्यांस द्रव्यद्वारा मदत करावी अशी मागणी करण्यांत आली आहे. मुंबई शहरांत हजारों देवळें असतांना हिंदुमहासभेनें आहेत त्यांत आणखी भर टाकावी याबद्दल कोणाही समंजस माणसास खेदच वाटेल. पण पत्रकांत देऊळ बांधण्याचा जो हेतु दिला आहे तो वाचून तर हिंदुसमाजाचें ऐक्य चिंतणारा कोणीही माणूस भांबावून गेल्याशिवाय राहणार नाही. हें नवें देऊळ बांधावयाचा हेतु असा कीं, जुन्या देवळांचा धर्म अगदी विपरित आहे. अस्पृश्यांसारख्या देवदर्शनास भुकेलेल्या लोकांना ती आंत घेत नाहींत व देवाकडे ढुंकून न पाहणाऱ्या लोकांकरितां ती सदोदित खुली असतात. माटुंगा येथें बांधण्यात येणाऱ्या देवळाचा धर्म यापेक्षां निराळा असणार. तें स्पृश्य व अस्पृश्य यांना सारखेंच खुले राहणार आहे.

## नव्या धर्माचें नवें देऊळ

हीं कल्पना छानदार आहे. पण अस्पृश्यता निवारणाचा नवा उपाय म्हणून जर तो अस्तित्वांत येत असेल तर त्याच्यापासून खरें अस्पृश्यता निवारण न होतां अस्पृश्यता निवारणाचा पोरखेळ मात्र होईल असें आम्ही स्पष्टपणें म्हणतों. ज्याच्या मनांत ही कल्पना उद्‌भवली त्यांना एकतर अस्पृश्य लोक हिंदूंच्या देवळांत जाण्याचा इतका आग्रह कां धरितात हें पुरतेपणी लक्षांत आले नसावें. किंवा नव्या धर्माचीं नवीं देवळें बांधल्यानें अस्पृश्यतेचा प्रश्न सोडविला जाईल असे तरी त्यांस वाटलें असलें पाहिजे. अस्पृश्यांतील जे लोक देवळांत जाण्याचा प्रयत्न करित आहेत ते केवळ अस्पृश्य लोक देवदर्शनावांचून तडफडताहेत म्हणून नव्हे. खऱ्या तत्वाचें शोधन करण्यासाठी चिकित्सकपणाची टाकी घेऊन भिक्षुकशाहीनें रचलेल्या पौराणिक कथांच्या डोंगराच्या कपऱ्या कपऱ्या उडविणारे बुद्धिप्रधान लोक अस्पृश्यांत आहेत. ते दगडाच्या देवाला आलिंगन देण्यासाठी साऱ्या अस्पृश्य वर्गास आपलें सर्वस्व खर्च करण्यास सांगतील असे मानणे हे अज्ञानपणाचें लक्षण आहे. अस्पृश्यांना देवळांत जावयाचे आहे ते केवळ त्यांना स्पृश्यांच्या बरोबरीने आपला हक्क बजावावयाचा आहे म्हणून. ज्या कोणास या बाबतीत कांहीं प्रयत्न करणें असेल तो त्यानी या दिशेने करावा. निराळी देवळें बांधण्याच्या भरीला पडूं नये. त्यानें अस्पृश्यांची तर तृप्ती व्हावयाची नाहीच पण त्यानें अस्पृश्यताही जावयाची नाही. निराळी व्यवस्था करण्यानें जर अस्पृश्य

लोक स्पृश्य होते तर महारवाडे, मांगवाडे, चांभारवाडे व ढोरवाडे हे आज अनादिकालापासून वेगळेच आहेत. त्याचा परिणाम काय झाला आहे याचें जागती ज्योत उदाहरण डोळ्यापुढे असतां निराळें देऊळ बांधल्यानें अस्पृश्यता निवारण होईल असे म्हणणे शुद्ध पोरकटपणा नव्हे काय ? या पोरकट लोकांनी अस्पृश्यता निवारणाचा जो पोरखेळ चालविला आहे त्यांत निराळी देवळें, निराळ्या विहिरी, हें अस्पृश्यता घालविण्याचे उपाय आहेत म्हणून सांगण्यांत येतें. नशीब बिचाऱ्या अस्पृश्यांचे, की त्यांच्यासाठी निराळे रस्ते, निराळ्या ट्रामगाड्या, निराळ्या आगगाड्या, आगबोटी व मोटारी, निराळी कोर्टे व कचेऱ्या सुचविण्यांत येत नाहींत !

या निराळ्या देऊळवाल्यांची अशी एक शक्कल आहे कीं, नवीन देवळें स्पृश्य व अस्पृश्य या दोहोंसही खुलीं राहणार असल्याकारणानें ती संयुक्त देवळें होतील. व तेथे स्पृश्य व अस्पृश्यांची मिळणी झाल्यानें अस्पृश्यता नाहिंशी होण्याच्या मार्गाला लागेल. या शक्कलबाज लोकांस आम्ही असें विचारतों की, स्पृश्य लोक येतीलच अशी हमी कोण घेतो ? साऱ्या मुंबईत हिंदु महासभेचे देवळाशिवाय हिंदूंना दुसरे देऊळच नसतें तर अस्पृश्यांना खुलें केलेल्या देवळांत स्पृश्यलोक निरुपायास्तव येतील असें मानतां आलें असतें. पण तशी स्थिती नाहीं. जेथें घरांपेक्षां देवळें जास्त आहेत तेथें अनेक शुद्ध देवळें सोडून बाटग्या देवळांत स्पृश्य लोक येतील असें म्हणणारांना आम्ही असें सुचवितो की नवे देऊळ बांधून हा अनुभव विकत घेण्याची कांही जरूरी नाहीं. मुंबईत अस्पृश्यांपैकी चांभार लोकांचे एक विठोबारुक्माईचें देऊळ आहे व त्यांत स्पृश्य लोकांना पुजेस जाण्यास कोणाची हरकत नाही. पण आज वीस वर्षाच्या अवधीत स्पृश्य जातीनें त्याचा उपयोग केल्याचे आमच्या ऐकिवांत नाही. निराळें देऊळ बांधल्यानें चांभारलोक स्पृश्य तर झाले नाहीतच पण बिचारा पांडुरंग आपल्या रुक्मिणीसह अस्पृश्य मात्र झाला. हाच प्रकार हिंदुमहासभेच्या देवळाचा होणार याबद्दल आमच्या मनांत बिलकूल शंका नाही.

निराळी देवळें हा प्रथमदर्शनी स्पृश्य व अस्पृश्यांमधील एकीकरणाचा मार्ग आहे असे दिसलें तरी अखेर त्यापासून दुराकरण होणार आहे यांत कांहीं संशय नाही. निराळी व्यवस्था करणे हा नड भागविण्याचा मार्ग आहे तो अस्पृश्यता निवारणाचा मार्ग नव्हे. अस्पृश्यता निवारणाचा मार्ग म्हणजे आहेत त्या सर्वाजनिक व्यवस्था सर्वांना खुल्या करणें हाच होय,

## दुसरें सर्व मार्ग झूट आहेत

पण हा मार्ग हिंदु महासभेच्या चालकांना केव्हांच पटणार नाही. हिंदु महासभाही भिक्षुकशाहीची सुधारलेली आवृत्ति आहे. ज्या भिक्षुकशाहीनें आपले वैशिष्ट्य कायम राखण्यासाठी तनमन वेंचलें व हिंदु हिंदुत वर्णभेद, संस्कारभेद, मंत्रभेद, तंत्रभेद, इत्यादि प्रकारचा दुजेपणा माजविला ; इतकेच नव्हे तर, तो दुजेपणा मोडून हिंदु समाजास एकरुपी करणारांवर अनेक वेळां ग्रामण्यें केलीं त्या भिंक्षुकशाहीला निराळे देऊळ बांधण्याचा मार्ग सुचावा हे तिच्या नेहमीच्या वादास धरूनच आहे. निराळ्या देवळाच्या कल्पनेत स्वतःचा सोवळेपणा कायम ठेवून अस्पृश्यांच्या तोंडावरून हात फिरविण्याचा मतलबी कावा आहे हे अस्पृश्य लोक ओळखून आहेत. या मतलबी लोकांस आम्ही असे सांगतों की, आमचा देवळांत प्रवेश होण्यास अवधी लागला तरी त्याला आमची हरकत नाहीं. पण केवळ अवधी लागतो म्हणून निराळी देवळें आम्हांस नकोत. बंद असलेली देवळे आम्ही केव्हां तरी खुली करून घेऊं. पण तुमचें एक निराळें देऊळ आम्हांला लाभलें तरी त्या एकामुळें देवळें आज आम्हांस बंद आहेत ती केव्हांच खुली होणार नाहींत व आमची अस्पृश्यता आहे तशीच राहील.

हा बुद्धिवाद हिंदुमहासभेस पटो वा न पटो, पण मुंबई येथील डिप्रेस्ड इंडिया ॲसोसिएशनला तरी पटला पाहिजे होता. पण तसें दिसत नाहीं. ही संस्था अस्पृश्य वर्गाची आहे. या संस्थेचा उगम वऱ्हाडांत झाला आहे व तेथें तिचें मुख्य ठाणें आहे. मोठ्या बायाप्रमाणे संचार करीत करीत ती मुंबईत येऊन दाखल झाली व येथें तिनें आपली एक शाखा उघडली आहे. तिचे चालकत्व ज्या भोसले नांवाच्या इसमाकडे सोंपिवण्यांत आलें आहे त्याच्यांत संस्था चालविण्यास अवश्य असणारी फंडगिरी ओतप्रोत आहे. बाकी या संस्थेच्या कार्यकारी मंडळीत जबाबदार लोकांची अशी वानवाच आहे. कांहीं जोगडे, कांही गंजड, कांही अर्ध शिकलेले महत्वाकांक्षी, कांही पोटभरू आणि मानास हापापलेले पण कोठेंच थारा नसलेले असे अस्पृश्यांतील कांहीं लोक व स्पृश्यांतील सनातनधर्मी आणि लब्धप्रतिष्ठित, तें खपवून घेणारे वावदूक या उभयतांच्या जुळणीनें हिचा कारभार चालतो. खोटें जाहीर करण्याला तर ती केव्हांच डरत नाही. आणि धडधडीत संस्थेचे अध्यक्ष यांच्या डोळयांत धूळ टाकून त्यांना एक सांगून दुसरेच करण्यास तिला कांहींच वाटत नाहीं. यावरून या संस्थेच्या कामावर किती विश्वास ठेवावा हें कोणीही सांगू शकेल. अशा संस्थेच्या हातून अस्पृश्यांचे कल्याण होईल असें ज्यास वाटत असेल त्यास खुशाल वाटो. आम्हांस तसें मुळींच वाटत नाहीं. या संस्थेनें आज कांहीं दिवसांपासून मुंबईत अस्पृश्य वर्गासाठी एक मंदीर बांधण्याचा

उपक्रम चालविला आहे व त्यासाठी चार आण्याची डोईपट्टी एक स्वयंसेवकांचा तांडा लावून वसूल करण्यांत येत आहे. अस्पृश्य लोक स्पृश्यांच्या देवळांत शिरण्याचा प्रयत्न करीत असतां जी संस्था निराळीं देवळें बांधण्याचा उपक्रम करते ती संस्था म्हणजे एक मूर्खांचा कंपू आहे, असे म्हणण्यास काय हरकत आहे ? अशा लोकाना फांसावर दिलें तरी ते कार्य पुण्यप्रदच ठरेल इतके हें निंद्यकृत्य आहे. अस्पृश्यवर्गाची सर्वांगीण उन्नति करण्याचें काम इतकें अफाट आहे की त्यासाठी हजारों संस्था जरी निघाल्या तरी त्या हव्यात पण अशी बेवकूब कामें हाती घेणाऱ्या संस्था नसलेल्या पत्करल्या. त्यांच्यापासून समाजाचा कांही लाभ तर नाहींच पण उलट तोटा मात्र होतो. तेव्हां अशा विघातक संस्थांपासून अस्पृश्य बंधूंनीं दूर रहावें यांतच त्यांचे कल्याण आहे ; नाहीं तर परके लोक जसा अस्पृश्यता निवारणाच्या कार्याचा पोरखेळ करीत आहेत तसा ते आपल्या कार्याचा आपणच पोरखेळ करून घेतील. व त्यापासून होणाऱ्या आत्मघाताच्या पापाचें त्यांना धनी व्हावें लागेल.



अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता ३ जून १९२७.

# ३५

# जातिभेदाची इमारत उध्वस्त करण्यासाठी प्रथमतः बेटीबंदीवरतीं गदा घातली पाहिजे

पंडित मदनमोहन मालवीय यांना आपला प्रांत सोडून प्रकृतीच्या स्वास्थासाठीं बेंगलोर मुक्कामीं जावें लागलें आहे, व हल्ली ते म. गांधीबरोबर रहात आहेत. बेंगलोरला जातांना त्यांनी वाटेंत कांही दिवसांकरितां म्हैसूर येथें मुक्काम केला होता. म्हैसूर मुक्कामीं असतांना त्यांचा व जुन्या शास्त्रीपंडितांचा अस्पृश्यतानिवारणासंबंधीं मोठा वादविवाद झाला. त्यांत मालवीयांचा विजय झाला, असें वृत्तपत्रीं जाहीर झालें आहे. पराभूत झालेले शास्त्रीपंडित स्तब्ध न बसतां पं. मालवीय यांच्या सांगण्याप्रमाणे अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यास लागले आहेत हें वाचून बरेच लोक पं. मालवीय यांनी अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत जे श्रम केले आहेत त्याबद्दल त्यांना धन्यवाद देत असतील. परंतु या सर्वांवर विरजण पडावें म्हणूनच कीं काय त्यांचे व्याही रा. लक्ष्मीकांत भट यांनीं पं. मालवीय यांची एक अंदरकी बात चव्हाट्यावर आणली आहे. रा. लक्ष्मीकांत भट यांची मुलगी पं. मदनमोहन यांच्या मुलास दिलेली आहे. या मुलीशिवाय रा. भट यांना दुसरी एक मुलगी आहे. परंतु घरच्या गरीबीमुळें या मुलीस स्वजातींतील वर मिळणें कठीण झालें. यास्तव रा. भट यांना आपल्या मुलीस परजातींतील एका बॅरिस्टरास देणें भाग पडलें. या कृत्यांत सुधारणेची कांस धरलेले आपले व्याही पं. मालवीय आपणास साहाय्य करतील असें रा. भट यांस वाटलें असावें. पण झाला तो प्रकार अगदीं अपेक्षेच्या उलट झाला ! हा मिश्रविवाह झाल्याबरोबर गंगातीरीं पं. मालवीय यांच्याच अध्यक्षतेखाली एक जातीची सभा भरविण्यांत आली. त्या सभेंत रा. भट यांस वाळीत टाकण्यांत आलें. व सर्व प्रकारचा जातिसंबंध तोडून टाकण्यांत आला. हा प्रकार झाल्यानंतर लौकरच रा. भट यांच्या मातोश्री निवर्तल्या. त्या प्रसंगी पं. मालवीय याच्या घरीं पुनः पंचायत बसविण्यांत आली ; व जो कोणी रा. भट यांच्या मातोश्रीच्या शवाला खांद घालून घाटावर जाईल त्यास समाजबाह्य करण्यांत येईल, असा ठराव पसार करण्यांत आला ! त्यामुळें रा. भट यांच्या मातुश्रीच्या स्मशानयात्रेस त्यांच्या जातभाईपैकीं कोणींच आलें नाहीं. तद्नंतर रा. भट त्यांच्या पत्नि दुखण्यानें आसन्नमरण असतांना आईची व मुलीची शेवटची भेट व्हावी म्हणून रा. भट यांनी आपल्या मुलीस म्हणजे पं. मालवीय यांच्या सूनबाईस माहेरी पाठवावें, अशी विनवणी

केली. परंतु अस्पृश्यांसाठी टिपें गाळणाऱ्या पंडितजींच्या हृदयाला मूळीच पाझर फुटला नाही ! इतकेंच नव्हें तर पं. कपीलदेव मालवीय व सत्यनारायण मालवीय यांनी रा. भट यांच्याशीं व्यवहार ठेवल्यामुळें त्यांनाहि बहिष्कृत करण्यांत आलेलें आहे ! हा सर्व प्रकार पाहून रा. भट हे अगदी भांबावून गेलेले आहेत, व आपले व्याही पं. मालवीय बोलतात काय आणि करतात काय याचें सखेद आश्यर्य वाटून हिंदूमहासभेसारख्या Δ संस्थेस चालना देणाऱ्या मालवीयजींनीं हिंदुसमाज-संघटनेसंबंधी आपलें खरें मत काय हें एकदांचे जाहीर करावें, असें त्यांस आव्हान केलें आहे. लाला लजपतराय हे सामाजिक व राजकीय बाबतींत सारख्याच प्रमाणांत जहालपणा प्रतिपादणारे पुढारी म्हणून त्यांचा एकेकाळी लौकिक असें. पण अलीकडे त्यांना सामाजिक सुधारणेचा तीव्रता विशेषशी भासत नाहीं हें ज्यांनीं त्यांची अलीकडील कारकीर्द चोखाळून पाहिली असेल त्यांना विशद करून सांगण्याची जरूरीं नाहीं. अस्पृश्यतेला नसता भेसूर रंग देण्यांत येतो, ब्राह्मणेतर चळवळ राष्ट्रविघातक आहे, वगैरे वगैरे जीर्णमतवाद्यांचे विचार त्यांचे तोंडून निघाल्याचें सर्वश्रुत आहेच. असें असूनहि लाला लजपतराय यांना देखील पं. मालवीय यांच्या वर्तनाबद्दल अचंबा वाटत आहे, व रा. भट यांनीं केलेली विधानें खरीं असल्यास पं. मालवीय यांनीं हिंदुमहासभेपासून आपला संबंध तोडून टाकावा असा अभिप्राय त्यांच्या "पीपल्स" नांवाच्या पत्रांत त्यांनी दिला आहे. खरें म्हटलें असतां स्वामी श्रद्धानंद यांनीं जेव्हा हिंदुमहासभेचा राजिनामा दिला त्याच वेळीं त्यांचा राजिनामा न घेतां पं. मालवीय यांचीच हिंदुमहासभेंतून हकालपट्टी करावयास पाहिजे होती. पण वेळोवेळी अस्पृश्यतेसाठी नक्राश्रू गाळून लोकांची फसवणूक झाल्यामुळें हिंदुसंघटनेच्या बाबतींत हिंदुमहासभेस पंडितजीनें लुली केली आहे हें कबूल करण्यास बऱ्याच लोकांस धैर्य होत नाहीं. आतां तरी हिंदुसमाजाचें संघटन व्हावें अशी ज्यांची मनापासून इच्छा असेल त्यांनीं अशा ढोंगी माणसांच्या हातून हिंदुमहासभेची सुटका करावी. त्याशिवाय गत्यंतर नाहीं.

---

Δ मोर्लेमिंटो सुधारणामुळे वर्चस्व प्राप्त झालेल्या मुसलमानांच्या विरोधात प्रथमतः पंजाबात हिंदुसभेची स्थापना झाली. फेरोजपूर येथे १९१४ साली झालेल्या सभेच्या ६ व्या अधिवेशनात अखिल भारतीय स्तरावर हिंदुसभा स्थापन करण्याचा विचार निश्चित झाला. कुंभमेळ्याच्या वेळी हरिद्वार येथे १९१५ ला कासिमबजारचे महाराज सर महिंद्रचन्द्र नंदी यांच्या अध्यक्षतेखाली हिंदुमहासभेचे पहिले अधिवेशन झाले. विषयनियामक समितीत पं. मदन मोहन मालवीय, लाला मुन्शीराम, मोतीलाल घोष, लाला हंसराज, सर तेजबहादूर सप्रू, म. गांधी हे पुढारी व नारायण मोरेश्वर पटवर्धन या नावाचे एक महाराष्ट्रीय गृहस्थही होते.

जातिभेद मोडण्यास पं. मालवीय जरी तयार नसले तरी स्पर्शास्पर्शभेद दूर करण्यात ते तयार असतां आम्ही तेवढ्या बाबीपुरता देखील त्यांचा उपयोग करून घेण्याऐवजीं हिंदुसंघटनेच्या कार्यांतून त्यांना खड्यासारखें निवडून टाका असें सांगण्यांत आमची चूक होत आहे असें कांही लोक म्हणतील, पण या बाबतींत आम्ही चुकत आहोंत असें आम्हांस मुळींच वाटत नाही. जातिभेद व स्पर्शास्पर्शभेद ते एकाच पदार्थाचे दोन प्रकार आहेत हें खरें ; दोहोंच्या बुडाशीं माणुसकीसंबंधी भिन्नभाव ही एकच गोष्ट असली तरी पण ब्राह्मणेतरांतली माणुसकी हीनकस तर अस्पृश्यांची मलीन, ही जातिभेद व स्पर्शास्पर्शभेद या दोहोंत मोठी तफावत आहें. यामुळें जातिभेद विसरून जाणें एकपटीनें कठीण असलें तर स्पर्शास्पर्शभेद विसरून जाणें लाखोपटीने कठीण आहे. वस्तुस्थिति अशा प्रकारची असतांना जातिभेद मोडण्यास ज्या पं. मालवीयांचा धीर होत नाही ते अस्पृश्यतानिवारणास कंबर कसतील या म्हणण्यावर आमचा मुळींच विश्वास बसत नाहीं. जातिभेद हा स्पर्शास्पर्शभेदापेक्षां कितीतरी जवळचा पल्ला आहे. परंतु ज्यास एवढ्या जवळचें मकान गाठतां येत नाहीं तो एवढ्या दूरची मजल मारील हें म्हणणें हास्यास्पद आहे. पडलंकेला जाणारानें आधीं लंकेला जाण्याची सिद्धता दाखविली पाहिजे.

बेटीव्यवहार सुरु झाल्याशिवाय जातीभेद मोडणार नाही, ही विचारसरणी जातीभेद मोडावा असें प्रतिपादन करणाऱ्या लोकांना मान्य आहे. पण आस्ते कदम म्हणून आधी जातिजातींत रोटीव्यवहार सुरू करावा असा त्यापैकी बऱ्याच लोकांचा आग्रह दिसतो. तो झाल्यानें जातिभेद लयास जाईलच असें सांगतां येत नाहीं. खुद्द ब्राह्मण जातीत अशा अनेक जाति आहेत कीं, ज्यांत परस्पर रोटीव्यवहार होत असतो. पण अशा प्रकारचा रोटीव्यवहार आज अनेक वर्षांपासून चालत आला असतांहि त्यांच्यातील भेदाची भावना नष्ट झालेली दिसत नाहीं. यावरून एक गोष्ट स्पष्ट होत आहे कीं, नुसता रोटीव्यवहार सुरू झाला तर तेवढ्यानें जातिभेदाचे उच्चाटन होत नाहीं. कारण रोटीव्यवहार जरी सुरू झाला तरी बेटीव्यवहाराचा भेद शिल्लक राहून जातिभेदाच्या वृक्षाचा परिपोष व्हावयाचा तो होतोच. बेसुमार वाढलेलें निवडुंगाचें कांटेरी कुपण जर नको असेल तर त्याची छाटाछाट करून कार्यभाग होणार नाहीं. तें सर्व मुळापासून उपटून टाकलें पाहिजे. तशीच गोष्ट जातिभेदाची आहे. जातिभेदाच्या इमारतीचा पाया बेटीबंदीवरतींच उभारलेला आहे. रोटीबंदीवरतीं उभारलेला नाहीं. तेव्हां जातिभेदाची इमारत उध्वस्त करून टाकावयाची असेल तर प्रथमतः बेटीबंदीवरतीं गदा घातली पाहिजे.



आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ३६

# हिंदु-मुसलमानांची तेढ मिटविण्यास उपाय

हिंदु व मुसलमान यांच्यांत आजकाल जीं रणें माजून राहिलीं आहेत त्यांना आळा कसा घालतां येईल याबद्दल आज सर्वत्र विचारविनिमय चालू आहे. परंतु कोणत्या प्रकारचा उपाय योजिला असतां गुण येईल याची खात्री कोणी देऊं शकत नाहीं. हा प्रश्न इतक्या भानगडीचा कां व्हावा याचा पूर्णपणें विचार केला असतां असें दिसून येतें कीं, हिंदु व मुसलमान यांचा संबंध कोणत्या प्रकारचा आहे याचें खरें स्वरुप लोकांच्या ध्यानात पूर्णपणें आलेलें दिसत नाहीं. हिंदु व मुसलमान यांच्यांतील नात्यागोत्यास कोणी कसल्याहि नांवानें संबोधिलें तरी तो संबंध एक प्रकारचा जातिभेदच आहे असें आमचें मत आहे. रोटीबंद, बेटीबंद हीं जातिभेदाचीं मुख्य लक्षणें आहेत. यावरून पाहतां जसा ब्राह्मण व मराठा यांच्यात रोटी-बेटी व्यवहार होत नाही तसा ब्राह्मण व मुसलमान यांच्यांतहि होत नाही. ब्राह्मण व मराठा हा जर जातिभेद आहे तर हिंदु व मुसलमान हा देखील जातिभेद आहे, असेंच मानिलें पाहिजें. हा मुद्दा एकदां मान्य झाला म्हणजे हिंदु मुसलमानांची तेढ मिटविण्यास कोणता उपाय योजावा याविषयीं पंचाईत पडणार नाही. कारण हिंदुतील जातिभेद मोडण्यास जो उपाय सांगितला जातो तोच उपाय हिंदु मुसलमानांतील भेद मोडण्यास अमलांत आणला पाहिजे. जातिभेद मोडण्यास जसा मिश्रविवाह होणें अवश्य आहे तसा हिंदु मुसलमानांतील जातिभेद मोडण्यास त्यांच्यांतहि मिश्रविवाह झालेच पाहिजेत. हें मत आमचेंच नसून डॉ. रवींद्रनाथ टागोर† यांचेंहि पण तेंच मत आहे. अशा दृष्टीनें पहातां, कु. मालिनीबाई पाणंदीकर, बी. ए.,बी.टी. या हिंदु मुलीचा गुलाबखान बशिरुद्दीनखान बी. ए., बी. टी. या मुसलमान गृहस्थाबरोबर झालेला विवाह अत्यंत महत्वाचा आहे. कु. मालिनीबाई या हिंदु समाजांतील सारस्वत जातीपैकी असून पु. लो. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या मुलीची मुलगी म्हणजे नात होत. या कामीं मालिनीबाईंनी जो धीर दाखविला तो त्यांना साजेसाच आहे. त्यांचा जन्मच पुनर्विवाहित दांपत्याच्या पोटी झालेला आहे. त्यांच्या मातोश्री व त्यांचे वडील रा. पाणंदीकर यांचा विवाह हा महाराष्ट्रांतील पहिलाच पुनर्विवाह होय. अर्थात् माशांच्या पिल्लांना ज्याप्रमाणे पोहावयास शिकवावें

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ११.

लागत नाहीं, त्याचप्रमाणें मालिनीबाईला सुधारणेची शिकवण देण्याचें कांहीं कारण नाहीं. तसें जर नसतें तर मालिनीबाईनीं ही सामाजिक सुधारणेंतील अगदीं लांबची उडी घेतलीच नसती.

हिंदु मुलसमानांतील भेदाभेद नष्ट होण्यापुरताच अशा मिश्रविवाहाचा फायदा आहे असें नाही. हिंदुमहासभेला प्रिय असलेल्या शुद्धीकरणाच्या दृष्टीनेंहि त्यास महत्त्व आहे. मालिनीबाई मुसलमानांच्या गोटांत गेली असें म्हणून तिचा उपहास करणारा एक पक्ष निर्माण झाला आहे. या पक्षाची समजूत अशी आहे कीं, गांधर्व विवाह असो किंवा ब्राह्म विवाह असो, त्यांत वरपक्षाचा वरचढपणा नेहमींच राहणार. अशा स्थितींत मालिनीबाइचें गुलाबखान यांच्याशीं एकदां लग्न होऊन गेल्यावर पुढें मागें मालिनीबाईनें कुंकु लावूं नये व हिंदु पद्धतीचा पोषाख करूं नये अशी जर खानसाहेबांची लहर लागली तर पुढें काय ? परंतु वरपक्षाचा नेहमींच वरचढपणा राहतो असें कशावरून ? कौटुंबिक कार्यक्रमाच्या चरकांत सांपडल्यावर वधुपक्षाचें वरपक्षावर कांहींच चालत नाहीं, असें म्हणणें सत्यास धरून होईल असें आम्हांस मुळींच वाटत नाही. फार दूर कशाला ? हिंदुंतील पुरुषवर्गाला अमूक एक सामाजिक सुधारणा तुम्ही कां घडवून आणीत नाहीं, असा प्रश्न केला असतां, 'बायकांपुढे आमचें कांहीं चालत नाहीं,' असा उघडा जबाब मिळतो. यापेक्षा वधुपक्षाच्या वरचढपणाचा दुसरा पुरावा कोणता पाहिजे ? आम्ही तर असें म्हणतों कीं, या विवाहापोटी मालिनीबाईवर हिंदु पद्धतीचा त्याग करण्याचा प्रसंग येण्याऐवजी खानसाहेबावरच मुसलमान पद्धतीचा त्याग करण्याचा प्रसंग येईल. हा केवळ तर्क नसून त्याला ऐतिहासिक पुरावा देतां येण्यासारखा आहे. हिंदु मुसलमानांतील हा कांही पहिलाच विवाह नव्हे. या पूर्वी मोंगल बादशहांनीं हिंदु मुलीशीं विवाह केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. परंतु त्या मिश्रविवाहांत मोंगल बादशहाच हिंदु झाले, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण वधुपक्षाच्या वरचढपणामुळें उदारमतवादी अकबरबादशहा पासून पुढें कोणाहि मोंगल बादशहाची-नव्हे, कडव्या औरंगजेबाची सुद्धा सुंता झाली नव्हती !असाच परिणाम मालिनीबाईच्या लग्नाचा होणार नाहीं कशावरून ? आणि असें जर झालें तर हिंदूंच्या गोटांतून एक बाई गेली, असा शोक करण्याची हिंदु समाजावर पाळी येण्याऐवज़ी मुसलमान समाजांतून एक पुरुष हिंदु स्त्रीच्या प्रेमरज्जुने बद्ध होऊन आपल्या समाजात आला म्हणून त्यास आनंद होईल. आतां या दोहोंपैकी परिणामी कोणती गोष्ट घडून येईल, हें सर्वस्वी हिंदु समाजाच्या वर्तणुकीवर अवलंबून आहे. हिंदु समाजानें या दांपत्यास जर सहनशीलतेनें वागवून हिंदू समाजांत मोडण्यास अवसर दिला तर या मिश्रविवाहाचा परिणाम

खानसाहेबांच्या हिंदुकरणांत होईल. उलट जर त्यांचा छळ करण्यांत आला तर त्याचा परिणाम मालिनीबाईच्या मुसलमानीकरणांत होईल. दुर्दैवानें परिणामी दुसरीच गोष्ट घडून आली तर त्यांत मालीनीबाईचा दोष न होतां हिंदुसमाजाचाच दोष होईल. कांहीहि झालें तरी मालिनीबाईनें हिंदु समाजाची ध्वजा परधर्माच्या मोहल्ल्यांत रोंवून पर्यायाने हिंदु महासभेच्या शुद्धीच्या कार्यास मदत केली, याबद्दल हिंदुधर्माची वाढ व्हावी असें इच्छिणारा दरेक हिंदु त्यांचे अभिनंदनच करील. ज्या युवतींनें एवढें धैर्य दाखविलें तिचा बाप अगदी जहाल सुधारक असेल असा समज कोणाचा झाला असतां तर त्यांत कांही आश्चर्य वाटण्याजोगें नाही. पण मालिनीबाईची धडाडी तिचे वडील रा. पाणंदीकर यांच्यांत मुळीच नाहीं असे मोठ्या कष्टानें आम्हास म्हणावें लागते. ता. २२ मेच्या "विविधवृत्तांत" अस्पृश्यतानिवारण या मथळ्याखाली रा. पाणंदीकर यांचे अस्पृश्यता निवारणावर कांही स्फुट विचार प्रसिद्ध झाले आहेत. ते वाचून कोणाचीहि निराशा झाल्यावांचून राहणार नाहीं. रा. पाणंदीकर लिहितात" अस्पृश्यता निवारण्याचे जे अनेक उपाय माझ्या मतें फलद्रूप होऊं शकतील ते संक्षेपानें मी खाली नमूद करतों. (१) शास्त्रतःच आम्ही अंत्यज आहोंत, ही जी अस्पृश्य समाजाची दृढमूल समजूत, ती हळूहळू दूर केली पाहिजे. (२) या अस्पृश्य वर्गातील आपापसांतील अस्पृश्यता अगदीं पहिल्यानें दूर केली पाहिजे. (३) विरोधभाव जागृत न करितां जे जे हक्क प्राप्त होतील त्यांचा उपकारबुद्धीनें गाजाबाजा न करितां फायदा करून घेतला पाहिजे. (४) स्वच्छ अंग व स्वच्छ कपडे वापरण्याची संवय संपादन केली पाहिजे. (५) चांगल्या शिक्षणाचा फायदा करून घेतला पाहिजे. या कामी या वर्गाकरितां स्वतंत्र शाळा स्थापन केल्या पाहिजेत. इतर वर्गांच्या शाळांतूनच आम्हांस शिक्षण मिळालें पाहिजे, हा आग्रह सोडून दिला पाहिजे. कारण या आग्रहानें निष्कारण विरोधभाव मात्र उत्पन्न होतो. याप्रमाणे क्रमशः सुधारणा घडवून आणल्या म्हणजे अस्पृश्यता सहज निघून जाईल असा भरंवसा वाटतो." रा. पाणंदीकर यांनी "पुष्कळ अनुभवानें व दीर्घमनाने" जे उपाय शोधून काढले आहेत ते ज्यांनी पुण्याचे भोपटकर, माटे, केसरीकार आणि त्यांच्या कंपूंतील लोक यांचे या बाबतींतले लेख वाचले असतील त्यांना त्यांत कांही नवें आहे असें वाटणार नाहीं. त्यांतील बऱ्याच मुद्याचे यापूर्वी बहिष्कृत भारतांतून खंडण केलेलें आहे. तेव्हा त्यांच्या फोलपणाबद्दल आणखी लिहिण्याची जरूरी नाहीं. एकाच गोष्टीचा आम्हास विस्मय वाटतो. ती गोष्ट ही कीं, रा. पाणंदीकरांसारख्या सुधारकानें अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत धार्मिक मनोवृत्ती न दुखवतील अशी खबरदारी घेण्यास सुचवून लोक आपखुशीनें ज्या थोड्या हक्काच्या तुकड्यांची मेहेरबानीनें भिक्षा घालतील त्याबद्दल त्यांचे पुष्कळसे आभार मानून भांडण न करतां

आस्ते आस्तें त्यांच्यांत दृढमूल झालेली आपल्यासंबंधीची समजूत घालविण्याचा प्रयत्न अस्पृश्य लोकांनी अगदी धीरे धीरे करावा, असे सांगणें हें होय. वर वर पाहाणारांना हा उपदेश मोठ्या कळकळीचा आहे असें वाटेल. पण जराशी आंत दृष्टि फेंकून त्यांच्या समग्र लेखांचे तात्पर्य ग्रहण करण्याचा प्रयत्न करतांच सुधारक म्हणवून घेणाऱ्या रा. पाणंदीकरांत व एखाद्या साध्या भोळ्या सनातन धर्मवाद्यात कांहींच फरक नाहीं असें दिसून येईल. धार्मिक मनोवृत्ती न दुखविण्यांचा त्यांचा उपदेश तर "करून करून भागली आणि देवपुजेला लागली" अशाच प्रकारचा आहे. कां कीं, लोकांच्या धार्मिक मनोवृत्तीची एवढी काळजी बाळगणाऱ्या या गृहस्थानीं स्वतः पुनर्विवाह करून त्याच लोकांच्या मनोवृत्ति कां दुखविल्या ? कां विधवा-पुनर्विवाह हा धार्मिक मनोवृत्ति दुखविणारा विषयच नव्हें ? कां त्यांनी केलेला पुनर्विवाह हा एक शास्त्रसंमत विधि होय, असे लोक समजले ? कां आतां मुलेबाळें होऊन ती भार्यामृत झाल्यावर म्हातारपणी त्या कृत्याबद्दल उपरति होऊन प्रायश्चित्ताखातर म्हणून ते आतां इतरांना वरील प्रकारचा साळसूदपणाचा उपदेश करतात ? जो एका तोंडाने आपण अंत्यज आहोंत अशी भावना अस्पृश्य वर्गानें आपल्यांतून काढून टाकांवी असें सांगतो व त्याच तोंडीं अस्पृश्यांनीं स्पृश्य वर्गाच्या शाळांतून आम्हांस शिक्षण मिळालें पाहिजे असा आग्रह धरतां कामा नये असें बजावतो त्याच्या ठायीं अस्पृश्यता निवारणाची कळकळ किती असेल याची जबरदस्त शंका येते. असें करा पण तसें नको, हें घ्या पण तें मागूं नका, येथवर या ; पण पुढें जाऊं नका ; अशा पण परंतुच्या पक्षांतर बोधक उभयान्वयी अव्ययाच्या जाळ्यांत गुरफटून गेलेला सुधारक खरा सुधारक नसून फक्त नामधारी सुधारक होय असेच म्हटलें पाहिजे. रा. पाणंदीकरांच्या वर्तनापासून बोध घ्यावयाचा तो हा कीं सुधारक म्हणून टेंभा मिरविणारे स्पृश्य लोक आणीबाणीचे वेळीं आपली पगडी फिरवितात आणि अस्पृश्यांची फसगत करतात.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ३७

# पेशवाई जर असती तर शिक्षा कोणाला झाली असती ?

महाडचा खटला ता. ६ जून पासून अलिबाग येथें डिस्ट्रिक्ट म्याजिस्ट्रेट मि. हूड यांच्या समोर चालून त्याचा त्यांनीं ता. २१ जून रोजीं कोर्टानें निकाल दिला. खटल्यांत एकदंर ९ आरोपी होते. त्यांपैकी ४ आरोपींना निर्दोष म्हणून सोडून देण्यांत आलें व बाकीच्या ५ आरोपींना पीनलकोड कलम १४७,१४९, ४५१ व ३२३ याखाली गुन्हेगार ठरवून प्रत्येकीं चार महिने सक्त मजुरीची शिक्षा सुनावली गेली. शिक्षा झालेल्या आरोपींतर्फे अपील करण्यांत येणार आहे असें कळतें. या अपीलाचा व त्यावर प्रसंगविशेषीं तपासणी अर्ज हायकोर्टाकडे झाला तर त्याचा निकाल झाल्यावर या खटल्याची संपूर्ण हकीकत पुरवणीपत्रकाच्या रूपानें आम्ही छापून काढणार आहोंत. खटल्याच्या निकाला वरून अस्पृश्यांचा जय झाला असें आम्हास वाटतें. तथापि कांही स्पृश्य व ब-याचशा अस्पृश्य लोकांना वाईट वाटत असल्याचें आमच्या कांनीं आलें आहे. सर्वच आरोपींना शिक्षा होईल अशी ज्यांची अपेक्षा होती त्यांना असें वाटणें अगदीं सहाजिकच आहे. मग आमच्या या कष्टी झालेल्या मित्रांस आम्ही असें विचारतों कीं पेशवाई † जर असती तर चवदार तळ्याच्या बाबतींत शिक्षा कोणाला झाली असती ? आमची खात्री आहे कीं आरोपींना धर्मवीर म्हणून सोडून देण्यात आलें असतें व डॉ. आंबेडकरांसह इतर अस्पृश्यांना धर्म बुडविला म्हणून हत्तीच्या पायाशी बांधून मारले असते ! तसें न होतां ब्रिटीश न्यायदेवतेनें अस्पृश्यांचा हक्क कबूल करून आरोपींपैकीं ५ जणांना शिक्षा केल्या हें त्या मानानें काय थोडें झालें ? आतां जे आरोपी सुटले ते खरोखरच निर्दोष होते कीं काय हा प्रश्न अलाहिदा आहे. मि. हूड साहेबांनीं दिलेल्या निकालपत्रकाची नक्कल आमच्या हातीं आली नाहीं. तेव्हां त्याच्या कायदेशीरपणाबद्दल लिहिणें आज शक्य नाही. तरीपण जो पुरावा झाला आहे त्यावरून सुटलेल्या आरोपींपैकी कांहीं जणांस तरी शिक्षा झालीच पाहिजे होती असें आमचें मत आहे. खटल्यांत सरकार फिर्यादी असल्यामुळें सरकारला सुटलेल्या आरोपीविरुद्ध अपील करण्याचा हक्क आहे. तो हक्क सरकारनें या वेळी बजावावा अशी आमची

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ८.

सरकारला सूचना आहे. हा खटला किती महत्त्वाचा आहे हें आम्ही सरकारला सांगण्यांचीं जरुरी नाहीं. अशा वेळीं जर हा अधिकार उपयोगांत आणला नाहीं तर मग तो केव्हां आणतां येईल ?

● ● ●

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

## ३८

# स्पृश्यांतील स्वार्थसाधु अस्पृश्यांच्या वाटेला जाणार नाहींत, तर त्यांच्यात फूट पडणार नाही

" स्वधर्म " पत्राच्या ता. ९ जूनच्या अंकांत महाडच्या पाणी प्रकरणावर एक अग्रलेख लिहिण्यांत आला आहे. हे प्रकरण घडून २॥–३ महिने लोटल्यावर यासंबंधीं कोणी कांहीं लिहील असें आम्हांस मुळींच वाटलें नव्हतें. कधीच नाही त्यापेक्षां उशिरा कां होईना या न्यायानें स्वधर्मकारानीं या बाबतींत आपली लेखणी चालविली हें योग्यच झालें. कारण " स्वधर्म " पत्र म्हणजे डॉ. कूर्तकोटीच्या मठाचें मुखपत्र होय. डॉ. कूर्तकोटी म्हणजे हिंदु धर्माचे जगद्‌गुरू. त्यांच्या पत्रानें जर महाड प्रकरणाचा खल करूं नये तर मग कोणत्या पत्रानें तो करावा ? इतक्या उशिरानें होत असलेलीं ही चर्चा निर्दोष होईल अशी अपेक्षा करणें अगदीं साहजिक होतें. पण स्वधर्मकाराच्या चर्चेचा प्रकार अगदींच विपरीत दिसतो. स्वधर्मकार लिहितात, " हा दंगा झाल्यानंतर त्या संबंधी ज्या निरनिराळ्या हकीकती प्रसिद्ध झाल्या त्यांपैकी पुणे हिंदू सभेनें जी प्रसिद्ध केली ती आम्हीं विशेष विश्वसनीय मानतों, कारण अस्पृश्योद्धारार्थ आजन्म खटपट करणाऱ्या माणसांनी व अस्पृश्योद्धाराचेंच काम करणाऱ्या संस्थेकडून, मुद्दाम महाडपर्यंत जाऊनयेऊन ती प्रसिद्ध केलेली आहे. बॅ. आंबेडकरांची हकीकत वस्तुतः सर्वापेक्षां विश्वसनीय धरावयास पाहिजे होती ; व तसेंच आम्हीं केलें असतें, परंतु त्यांनी दिलेल्या माहितीचा प्रत्यक्षाशीं विरोध येत असल्यामुळें व ती देतांना कोणाहि निःपक्षपाती माणसाला सहज ओळखून येईल, असा जातिद्वेष भरलेला असल्यामुळें त्यांची माहिती पुराव्याला धरता येत नाहीं. " आमची बातमी स्वधर्मकार पुराव्याला धरीत नाहींत. यांत आम्हांला विशेष नवल वाटत नाहीं. जातिभेदामुळें हिंदुस्थानांतील न्यायदानपद्धती किती मलीन झालेली आहे याचा अनुभव आम्हांस नित्याचा आहे. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद सुरू झाल्यापासून तर न्यायाधीश आपल्या जातीवर जाईल या भयाचें भूत या प्रांतांत पक्षकारांपुढें कायमचें नाचू लागले आहे ; आणि म्हणून आमचा दावा या न्यायाधिशाकडून काढून दुसरा कोणातरी परधर्मीय न्यायाधिशाकडे द्यावा, अशा प्रकारचे अर्ज हायकोर्टाकडे सतत करण्यांत येतात. स्वधर्मकारांनीं माटे यांनीं प्रसिद्ध केलेली हकीकत मान्य करण्यांतही हिच हीन मनोवृत्ति व्यक्त केली आहे. अशा प्रकारचा

पक्षपात करणें हें शंकराचार्याच्या मुखपत्रास शोभतें कीं नाहीं, याचा विचार स्वधर्मकारांनी अवश्य करावा. कारण माट्यांची महाडची हकीकत सपशेल खोटी आहे असें आम्ही गेल्याच्या मागील अंकांत सिद्ध करून दिलें होतें. त्यांत महाड म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रा. टिपणीस यांजविषयी केलेल्या विधानाचा खोटेपणा आम्ही माट्यांच्या पदरांत घातला होता. आज माट्यांच्या दुसऱ्या एका विधानाचा असत्यपणा आम्ही सिद्ध करून देत आहों. रा. माटे यांनीं आपल्या हकीकतींत असें प्रसिद्ध केलें होतें कीं, एका बाईवर हात टाकल्याची जी गोष्ट अस्पृश्य लोकांनी जाहीर केली होती ती गोष्ट खोटी असून त्यासंबंधीं आपण बाईच्या आप्तेष्टांजवळ चौकशी केली आहे. हें विधान किती असत्य आहे, हें ज्यांस पहावयाचें असेल त्यांनीं आजच्या अंकांत दुसरीकडे खुद्द त्या बाईच्या नवऱ्याचें पत्र † छापलें आहे, तें अवश्य वाचून पहावें. सुशिक्षित म्हणविणाऱ्या माट्यांसारख्या मास्तर गृहस्थांनीं असत्य गोष्टी चारचौघांपुढे बिनदिक्कत सत्य म्हणून मांडाव्यात यासारखें दुसरे निंद्य वर्तन असूं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. माट्यांच्या विरुद्ध आलेला हा पुरावा खोटा असल्यास तो खोडून टाकण्यास त्यांनीं पुढें यावयास पाहिजे होतें. पण तसें न करतां माटे मूग गिळून स्वस्थ बसले आहेत यावरून खोट्याचा वांटा कोणाच्या पदरांत येतो हें स्वधर्मकारांनी ओळखावयास पाहिजे होतें. पण तसें न करतां उलट अनेक अस्पृश्य विद्यार्थी रा. माटे यांनी तयार केलेले आहेत ते केव्हांना केव्हां बोलते होतील व डॉ. आंबेडकरांना माटे ही काय अजब चीज आहे हें दाखवून देतील, अशी दर्पोक्ति केली आहे. रा. माटे यांनी तयार केलेले अस्पृश्य विद्यार्थी कोणते व किती आहेत, याची आम्हास माहिती नाहीं. तथापि त्यांच्या कच्छपी लागलेल्या अस्पृश्य विद्यार्थ्यांपैकी रा. पांडुरंग नथूजी राजभोज हे एक होते. पण त्यांनी तर रा. माट्यांची तरफदारी करण्याऐवजी माट्यांच्या खोटेपणाबद्दल त्यांच्यावर जोराचा हल्ला केलेला आहे, हें ता. ८ मेच्या ज्ञानप्रकाशांत लिहिलेल्या त्यांच्या पत्रावरून उघड होत आहे. ईश्वर करो आणि सगळेच चेले माट्यावर न उलटोत !

स्वधर्मकार लिहितात कीं, माटे यांनी आपला जन्म अस्पृश्योद्धार करण्यांत घालविलेला आहे. असेलही. माट्यांच्या अस्पृश्योद्धारांसंबंधी लिहिण्याची पूर्वी आम्हास जरुरी वाटली नव्हती. परंतु स्वधर्मकारांनी ज्याअर्थी हा प्रश्न उपस्थित केला आहे त्याअर्थी त्यासंबंधी दोन शब्द लिहिणें जरूर दिसतें. अस्पृश्योद्धाराच्या कामीं आपलें आयुष्य खर्ची घालणाऱ्या सद्गृहस्थांमध्यें

---

†पाहा, परिशिष्ट १२.

आमच्या माहितीप्रमाणे माट्यांचे व त्यांच्या अस्पृश्यता निवारक मंडळाचे नांव अगदी अलीकडेंच झळकूं लागलें आहे. कोणतेंहि काम करावयांचें झालें तर तें त्यांच्या अस्पृश्यतानिवारक मंडळाच्या नांवाने होत असतें. या मंडळाच्या संबंधी विशेष नवलाची गोष्ट म्हणजे ही की, या मंडळातर्फे कांही करावयांचे झालें तर ते सेक्रेटरींने ठरवावयाचें, अध्यक्षानें त्यावर सही करावयाची आणि अस्पृश्यतानिवारक मंडळाच्या नांवानें प्रसिद्ध करावयाचें ! व अस्पृश्यतानिवारक मंडळाचें मत म्हणजे अस्पृश्य वर्गाचें मत असे जगाला भासवावयाचें. खरें पाहिलें असतां, या अस्पृश्यतानिवारक मंडळाला ना सभासद ना वर्गणी ! एक अध्यक्ष ; एक सेक्रेटरी, या दोन जिवांवर त्याची उडी. त्यांतहि, ज्या माट्यांच्या नांवाने स्वधर्मकार एवढी घंटा वाजवीत आहेत त्या माट्यांनी अस्पृश्यतानिवारणाप्रीत्यर्थ प्रत्यक्ष अशी कोणती गोष्ट करून दाखविली आहे, हेंही स्वधर्मकार सांगत नाहींत. का माट्यांनीं कोणा अस्पृश्याबरोबर रोटीव्यवहार करून दाखविला आहे का बेटीव्यवहार करून दाखविला आहे ? माट्यांनीं केलें आहे तरी काय, हें एकदा स्पष्ट झालें असतें म्हणजे त्यांच्याबद्दल शंकाकुशंका घेण्यास तरी कोणास कारण उरलें नसतें. आम्हांस जी माहिती उपलब्ध झाली आहे ती अशी कीं, माटे हे एवढे सोवळे गृहस्थ आहेत की, त्यांनीं आपल्या घरांतील एक खोली अस्पृश्यांच्या स्वागताकारणें निराळीच काढून ठेविली आहे. अस्पृश्यांना आपल्या घरांतील दुसऱ्या खोलींत ते कधींच घेऊन जात नाहींत, व अस्पृश्य लोक या खोलींत बसले असतांना जर एखादा स्पृश्य पाहुणा आला तर त्याला अस्पृश्य खोलींत न आणतां आपणच बाहेर जाऊन त्यांची मुलाखत घेतात. आमची ही बातमी खोटी असल्यास आम्हीं ती परत घेऊं. पण ती माट्यांच्या येथें जावयेव असणाऱ्या एका अस्पृश्य मित्राकडून मिळालेली आहे. सबब ती खरी असणें शक्य आहे. आम्ही आपलें माट्याविषयींचें मत जें इतक्या स्पष्टपणें मांडलें आहे याचें कारण असें कीं, आम्हांला अस्पृश्योद्धाराच्या कामीं पडणाऱ्या लोकांची निवडानिवड करावयाची आहे. व खऱ्याला जवळ करून खोट्याला घरपर्यंत पोहोंचवावयाचें आहे. माट्यांनीं अस्पृश्यतानिवारण्याचें सोंग कशाकरितां आणलें आहे, हें आम्ही एकदां विशद करून सांगितलें आहे. आमचें म्हणणें अगदींच निराधार नाहीं, हें माट्यांनीं नुक्तिच भरवलेल्या मातंगपरिषदेची जी हकीकत † दुसरीकडे छापली आहे तिच्यावरून दिसून येईलच. अल्प बुद्धीचे लोक नेहमी परबुद्धीनें वागणारे असतातच. त्यांना हाताशीं धरून कोणीहि स्वार्थसाधु माणूस त्यांच्या समाजांत बुद्धिभेदाचें पातक करूं शकतो अशा प्रकारचा बुद्धिभेद अस्पृश्यांत दिसतो, या गोष्टीवर अवलंबून् केसरीनें अस्पृश्यांत फाटाफूट झाली म्हणून आनंदाने टाळ्या

† पाहा, परिशिष्ट १३.

पिटल्या आहेत. पण केसरीनें आपला राक्षसी आनंद व्यक्त करण्यापूर्वी मांगपरिषदेची दुसरी बाजू अवश्य वाचून पहावी, म्हणजे फूट कशी पडते, याचा सहज खुलासा होईल. आमची खात्री आहे की, जर स्पृश्य लोकांतील स्वार्थसाधु लोक अस्पृश्यांच्या वाटेस जाणार नाहींत, तर त्यांच्यांत कधींच फूट पडणार नाहीं. अर्थाचा अनर्थ करून, वस्तुस्थितीचा विपर्यास करून, एकमेकांची मनें एकमेकांविषयी कलुषित केल्यामुळेंच फाटाफूट होते. तसें होऊं नये म्हणून रा. मात्यांना आमची अशी सूचना आहे कीं, अस्पृश्यांवरील आपलें प्रेम, खोटें असो वा खरें असो, आपण त्यांना आतां स्वतःचा संसार स्वतःच करण्यास मुभा द्या ! आपलें प्रेम खोटें असेल, तर आपण दूर होण्यांत आपला प्रामाणिकपणा आहे. आपलें प्रेम खरें असेल, तर दूर होणें हें आपले कर्तव्य आहे. मूल किती जरी लाडकें असलें तरी त्यास सदोदित खांद्यावर घेतल्यानें तें पांगळें होतें. त्याला सोडून दिल्यानें तें ठेचाळेल हें खरेंपण अखेर तें स्वतःच्या पायावर उभे रहावयास शिकेल, व स्वतंत्र होईल. तसें झालें तर रा. सकटांना कधी तरी अध्यक्ष होतां येईल. नाही तर परिषद रा. सकटांच्या जातवाल्यांची आणि अध्यक्ष रा. मात्यांच्या जातवाल्यांचे, असा गुलामगिरीचा शिरिस्ता नेहमींचाच पडून जावयाचा !

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ३९

## आपलेपणाची साक्ष दे नाहीं तर पाणी सोड

अस्पृश्य वर्गाशीं वागतांना स्पृश्य लोक किती अमानुषपणें वागतात याची एक हृदयभेदक कहाणी नुक्तीच प्रसिद्ध झाली आहे. इंदोर व ग्वाल्हेर संस्थानांत बळहाई नांवाची एक अस्पृश्य जात आहे. होळीच्या सणांत या बळहाई जातींतील स्त्रियांचे डोळे बांधून त्यांची गांवांतून धिंड काढण्यांत येते, व स्पृश्य लोकांकडून त्यांच्यावर घाण टाकण्यांत येते. या घाणीच्या माऱ्यानें बेदम होऊन त्या बिचाऱ्या बायांनी दीनवाणीनें आम्हांला सोडा म्हणून धाय मोकलली तरी स्पृश्य लोक त्यांची सुटका न करतां ज्यास्तच घाण टाकून त्यांची मजा पहातात. या धुळवडीच्या प्रकारास "झुंबराबिगार" असें म्हणतात. व असें करणें हा गांवकऱ्यांचा हक्क आहे, असें तिकडे मानण्यांत येतें. या बळहाई लोकांत सामाजिक जागृतीस सुरुवात झाली आहे ; व त्यामुळें आपल्या स्त्रियांची होत असलेली विटंबना या लोकांस न खपून त्यांनी या वर्षी "झुंबराबिगार" झुगारून दिली. त्यामुळें स्पृश्य लोक चिडून जाऊन त्यांनी या बळहाई लोकांचा अमानुष छळ चालविला आहे. कांहीं ठिकाणी त्यांना बेदम मार देण्यांत येत आहे, त्यांचे पाणी बंद करण्यांत येत आहे, त्यांना मोलमजुरी न देण्याचा सर्वांकडून कट करण्यांत आलेला आहे. आणि कांही ठिकाणी त्यांची घरेंही जाळण्यांत आलेली आहेत. या छळामुळें हे बळहाई लोक इतके त्रस्त झाले आहेत कीं, त्यांना आपली कायमची वस्ति सोडून मार्ग दिसेल तिकडे निघून जाणें भाग पडलें आहे. हा छळ जनतेतर्फे होत आहे असेंच नव्हे. तर त्यात वरील संस्थानातील अधिकारीहि सामील आहेत !! असाच एक प्रकार मलबार प्रांतांत घडून आला आहे. मलबारप्रांतांत अस्पृश्य लोकांनी फक्त पितळेचे दागिने घातले पाहिजे असा शिरस्ता आहे. गेल्या मे महिन्याच्या अखेरीस मानूर मुक्कामी अस्पृश्यांची एक सभा भरविण्यांत आली होती. त्या ठिकाणीं मलबारांतील अस्पृश्य जातींने पितळेचे दागिने घालण्याचे सोडून देऊन सोन्याचे दागिने घालण्याचा प्रघात पाडावा असा ठराव झाला. शुभस्य शीघ्रम् या न्यायाने सभा संपल्यानंतर कांहीं अस्पृश्य स्त्रियांस सभेच्या चालकांकडून पुतळ्यावजा सोन्याचे दागिने देण्यांत आले. एवढ्यावरून स्पृश्य हिंदू चिडून जाऊन त्यांनी अस्पृश्य लोकांस मोलमजुरी न देण्याचा संप केला आहे. असाच परिणाम महाडच्या परिषदेचाहि होत आहे, ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे. महाडच्या परिषदेंत भाकर मागणें,

मृतमांसाहार करणें, वगैरे वगैरे अनिष्ट चाली बंद करण्याबद्दल ठराव झालें होते. हे ठराव इतक्या लौकर अमलांत येतील, हें आम्हास स्वप्नांतसुद्धां वाटलें नव्हतें. पण यक्षिणीची कांडी फिरावी त्याप्रमाणे कुलाबा जिल्ह्यांत भाकर मागणें, व मृतमांसाहार करणे बंद झाले आहे. परंतु ज्या गावांत असा नवा कार्यक्रम सुरू झाला आहे त्या गांवांत अस्पृश्यांवर मोठा कहर उडून गेलेला आहे † कांही ठिकाणी त्यांना गावांतून येण्याजाण्याची बंदी झाली आहे, कांहीं ठिकाणी गावांतील लोकांनीं कट करून अस्पृश्यांकडे खंडानें असलेल्या जमिनी काढून घेण्यांत आल्या आहेत, अशापरी अस्पृश्यांना जेरीस आणून जुन्या हीन चालीची बोद त्यांच्या मर्जीविरुद्ध त्यांच्या पाठीवर लादण्यांत येत आहे. हा सर्व प्रकार पाहून वाचून कोणाहि सुज्ञ माणसास आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. अस्पृश्य वर्गांतील लोक स्वच्छ रहात नाहींत, उष्ट्या अन्नाची भिक्षा मागतात व मृत जनावरांचे मांस खातात यामुळें त्यांना अस्पृश्य मानण्यांत येतें असें स्पृश्य लोक नेहमींच मोठ्या दिमाखानें सांगतात, व अशा प्रकारचे अमंगलआचार सोडून दिल्याशिवाय अस्पृश्य लोकांस स्पृश्य मानतां येणार नाहीं असा उपदेश नेहमीं करण्यांत येतो. अस्पृश्य जनता जेव्हां अज्ञानांधकारानें अगदीं व्यापली होती त्यावेळी अशा प्रकारच्या उपदेशाची जरूरी होती. परंतु हल्लीच्या काळीं सर्व अस्पृश्य जनता खडबडून जागी झाली आहे. ज्या चालीरीतींच्या पायीं तीस हीनत्व पदरीं आलें आहे त्यांना एकदम फाटा देण्यास ती सिद्ध झाली आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, अस्पृश्य लोक ज्या स्पृश्य लोकांच्या सांगण्यावरुन आपली राहणी सुधारण्याचा प्रयत्न करीत आहेत तेच स्पृश्य लोक अस्पृश्य लोकांच्या कार्यांत विनाकारण कांटे पसरीत आहेत. अस्पृश्य वर्गातील लोकांनी 'आम्हांस अस्पृश्य कां मानण्यांत येते' असा प्रश्न केला असतां, 'तुम्ही लोक अभक्ष्य खाता, अमंगल बोलतां व अस्वच्छ रहातां, यास्तव आम्ही तुम्हांस शिवून कसें घ्यावें ?' अशा अडवणुकीच्या गोष्टी स्पृश्य लोक करतात आतां तेच अस्पृश्य लोक आपखुषीने आपले सर्व आचार-विचार बदलण्यास सिद्ध झाले असतां ते त्यांनीं बदलूं नयेत म्हणून त्यांच्याविरूद्ध आपल्यांत जेवढी कांहीं शक्ति असेल ती सर्व खर्ची घालून स्वतःच्या उन्नतीसाठीं झटणाऱ्या असहाय अस्पृश्यांची दैना करून त्यांना ठरविलेल्या पायरीच्या वर पाऊल टाकूं द्यावयाचें नाहीं, हा जो स्पृश्य लोकांनी निश्चय केलेला दिसतो तो पाहून कोणाही सुज्ञ माणसास आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाहीं जेथे केवळ अस्पृश्य लोक कोणाचें कांहीं नुकसान न करतां आपल्या बऱ्याच्या गोष्टी करण्यास झटत असतात, तेथे 'तुम्ही माजलांत' असें म्हणून हिंदु मामलेदारानें त्यांच्या तक्रारींची दाद घेऊं नये, हिंदू सावकारांनी

† पाहा, परिशिष्ट क्रमांक १४.

त्यांची उसनवारी बंद करावी, हिंदु मारवाड्यानें त्यांना कर्ज देऊं नये, व हिंदु जमिनदारांनी आपल्या जमिनी त्यांच्याकडे लावूं नयेत, हा अस्पृश्योद्धाराचा प्रकार इतिहासांत नमूद करण्यासारखा आहे. खरें म्हटलें असतां, अस्पृश्य जनता किती तरी मूढ ! जुन्या चालीरितींच्या भूताने तिला इतक्या दिवसांपासून पछाडलें आहे कीं, उपदेशाची धुनी किती जरी दिली तरी तिचा कांहीं उपयोग होईल किंवा नांही, याची नेहमींच जबरदस्त शंका असते. अशा परिस्थितीत फटक्यासारखा गूण आला हें पाहून अस्पृश्योद्वारा प्रित्यर्थ झटणाऱ्या सर्व लोकांस आनंदच वाटावयास पाहिजे होता. पण तसें न होता, त्यांचा उलट चित्तक्षोभ व्हावा, यावरून येवढी गोष्ट स्पष्ट होत आहे कीं, स्पृश्य लोकांना अस्पृश्यता घालवावयाची नसून अस्पृश्यांना अस्पृश्यच ठेवावयाचें आहे. 'रहाणी सुधारल्याशिवाय आम्ही तुम्हांस घरांत घेणार नाहीं,' म्हणून सांगावयाचे आणि रहाणी सुधारण्याचा प्रयत्न करीत असतां 'पायरी सुटते' म्हणून चढत असलेल्या माणसास लाथ मारून खालीं पाडावयाचें, या निंद्य वर्तनाचा दुसरा अर्थ काय करावयाचा, हें आम्हांस कळत नाहीं.

स्मृतिकार मनु याच्या मताप्रमाणे हिंदु समाजांतील व्यक्तिमात्रास अष्टधिकार असूं शकतात. परंतु "भगवान" मनुनें या अष्टाधिकारांची विभागणी आपल्या मर्जीनुरुप केल्यामुळें या अधिकारांपैकी बरेच ब्राह्मण वर्गांकरितां राखून ठेवले, व बाकीचे उरले ते ब्राह्मणेतरांना देऊन टाकले. अस्पृश्यांना मात्र कांहींच मिळालें नाहीं. ज्याला जसे अधिकार दिले त्याला तदनुरुप रहाणीही "भगवान" मनूनें सांगितलेली आहे. अष्टाधिकारांपैकीं कोणतेच अधिकार अस्पृश्यांना नसल्यामुळें त्यांच्यासाठी मनूनें अगदीच हलक्या प्रतीची रहाणी सांगितलेली आहे, हें ज्या कोणी मनुस्मृतीचे † अवलोकन केलें असेल त्याला कळून येण्यासारखे आहे. अस्पृश्यांनी आपली रहाणी सुधारण्याचा प्रयत्न करणें म्हणजे अष्टाधिकारांचे धनी होऊं पहाणें असेंच होय. अर्थात् स्पृश्य लोकांनी त्यांना या चढाओढींत विरोध करावा, हें अगदी साहाजिक आहे. पण हा सर्व प्रकार "भगवान" मनुच्या शिकवणीचा आहे हें निर्विवाद आहे. वरील कारणांमुळे आम्हांला प्रसंगविशेषीं नाईलाजास्तव मनुस्मृतीवर टीका करण्याची जरूर पडते. पण याबद्दल आमचे व्यवसायबंधु प्रबोधकार यांचा आमच्यावर रोष झालेला आहे. तो इतका कीं, ते आपलें पत्र आमच्या भेटीस पाठविणार नाहींत असें म्हणतात. ते म्हणतात कीं, आम्हीं शिवराळपणा करतों. त्यांनी आमच्यावर जो शिवराळपणाचा आरोप केलेला

† पाहा, परिशिष्ट क्रमांक १५.

आहे, त्यांत किती तथ्य आहे, हें दुसरीकडे छापलेल्या इतर वर्तमानपत्रकर्त्यांच्या अभिप्रायावरून† वाचकांनींच ठरवावे. " प्रबोध " पत्राच्या संपादक महाशयास आमची अशी सूचना आहे की, शिवराळपणाचा आरोप जरी खरा असला तरी त्यांत मोठा अपराध आहे असें आम्हास वाटत नाही. समाजांत म्हण पडली आहे कीं, तोंडाळ बरी पण * * * नको शिवराळपणा चालेल पण शीलशुन्यता चालणार नाहीं. "प्रबोध" पत्राच्या संपादकाची विचारशुद्धि जितक्या उच्च प्रतीची आहे अशी ते शेखी मिरवितात, तितक्याच उच्च प्रतीची त्यांची जर विचारशुद्धि असती तर आम्हास उपदेश करण्याचा त्यांना अधिकार आहे, असें आम्हीं मान्य केले असतें,परंतु त्यांची विचारशुद्धी किती हीन वृत्तीची आहे याचें प्रत्यंतर त्यांनीं दिलेल्या अभिप्रायांतच पहावयास मिळते. संपादक महाशय म्हणतात. "हिंदुस्थानांत ज्या काळामध्ये औषधालाहि मुसलमान किंवा ख्रिस्ती नव्हता त्या काळांतील अस्पृश्यतेची गोष्ट एका प्रकारें वेगळी होती पण आजच्या सारख्या काळामध्ये विधर्मी व गोमांसभक्षक असे लोक स्पृश्य समजण्यांत येत असतां रामकृष्णास भजणारे व गाईलाहि पूज्य मानणारे असे स्वधर्मीयच लोक पुरातन कालाप्रमाणें अस्पृश्यच मानण्यांत यावेत, हा अन्याय यापुढे चालू रहाणें केव्हांहि इष्ट नाहीं." वरील उद्गारांवरून संपादक महाशय अस्पृश्यता काढणार, ही केवळ अस्पृश्यता म्हणजे अनीति किंवा अधर्म आहे म्हणून नव्हे, तर मुसलमान लोक टपून बसले आहेत म्हणून ! जर या देशांतून मुसलमान लोकांची ब्याद निघून गेली तर अस्पृश्यांची माणुसकी ओळखण्यास हे संपादक महाशय तयार होणार नाहींत. अस्पृश्यता निवारणा सारख्या पवित्र कार्यास आपदधर्माच्या कोटींत बसविणारानीं त्रिशुद्धीच्या आवश्यकतेचा पाढा दुसऱ्यास वाचून दाखववा हें नवल नव्हे काय ?

केवळ मुसलमानांच्या बडग्यामुळेंच अस्पृश्यता नष्ट करणें इष्ट आहे, हें सनातन धर्मीच कबूल करीत असतांना अस्पृश्य लोकांस तुम्ही मुसलमान धर्म स्वीकारा, असा उपदेश केला तर त्यांत डॉ. उद्‌गांवकरांना कां राग यावा, हें आम्हांस कळत नाहीं. सदरहू डॉक्टर महाशयांनी रणगर्जनेच्या ता. ६-६-२७ च्या अंकात "अस्पृश्यतानिवारणावर डॉ. आंबेडकरांचा तोडगा, " या मथळ्याखाली एक लांबलचक लेख प्रसिद्ध केला आहे. सदरील लेखांत बहिष्कृत भारताच्या ता. २० मेच्या अंकातील "अस्पृश्यवर्गांची जबाबदारी," या अग्रलेखावर ही स्वारी तुटून पडली आहे. आम्ही आपल्या अग्रलेखांत जी "बेलगामी भाषा," व जे "अविवेकी विचार" गांडले होते ते त्यांना न खपल्यामुळे "सुज्ञ मनुष्य अविवेकाचा दास होऊन आपली जबाबदारी झुगारुन देऊ वाटेल तसे बरळूं लागतो–तेव्हां त्या माणसाला जागें केंलें, त्याला विवेकाची मात्रा पाजली तर रागानें, त्वेषानें धुंद झालेली त्याची

† पाहा, परिशिष्ट क्रमांक १६.

दृष्टि निवळण्याचा संभव असतो," अशा भावनेनें प्रेरित होऊन त्यांनी आमच्या अग्रलेखावर लिहिण्याचे श्रम घेतले आहेत. या श्रमाबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. आम्हांला विवेकाची मात्रा पाजण्याइतकी वैद्यकी डॉ. उदगांवकरांच्या पदरीं असो कीं नसो, आम्हीं कोणाच्याहि हातून मात्रा घेण्यास तयार आहोंत. मात्र मात्रा ही मातरा नसली म्हणजे झालें. डॉ. उदगांवकरांची मात्रा पाहूं गेलें असतां फोलकट मातराच आहे. तिच्यांत कांहीं राम दिसत नाही. आम्हीं सांगितलेल्या दोन योगापैकीं प्रतिकारयोग डॉ. उदगावकरांस पसंत आंहे, हें आम्ही आमचें सुदैव समजतों. नाहींतर प्रतिकार योगाची शिकवण, हें देखील पाप आहे असे त्यांनी सांगितले तर काय घ्या ! बहिष्कार योगानें मात्र डॉ. महाशयांचे पित्त खवळलें आहे. खरें म्हटले असतां, तसें व्हावयाचें कांही कारण दिसत नाहीं. उदगांवकर स्वतःच लिहितात कीं, "डॉक्टरसाहेबांनी सात कोटी अस्पृश्य समाज आपल्या शब्दावर नाचेल अशी आशा धरूं नये." या गोष्टीवर डॉ. उदगावकरांचा जर पक्का विश्वास असेल आणि आमचे पुढारीच नव्हत असें अस्पृश्य वर्गाच्या तोंडून म्हणवून घेण्याचा प्रसंग डॉ. आंबेडकरांवर येणार आहे, याची सुस्वप्नें जर आज उद्गांवकरांना पडत असतील तर डॉ. आंबेडकर म्हणजे एका वेडापीर आहे व त्याच्या बडबडण्यावर लक्ष न देतां त्यांना स्वस्थ बसतां आलें असतें. असो आम्ही धर्मांतर करावयास सांगितलें तर लोक आमचे पुढारीपण काढून घेतील, असें भय दाखवून जर आम्हांस स्तब्ध बसविण्याचा डॉ. उदगांवकरांचा इरादा असेल तर डॉ. उदगांवकरांना आमच्या स्वभावाची ओळख पटल नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. सात कोटी अस्पृश्य आमच्या शब्दावर नाचतील, असे आम्हीं केव्हांच मानलें नव्हतें. पण तेवढ्यावरून आम्हांस जें सांगावयाचें किंवा करावयाचें तें सांगितल्याशिवाय किंवा केल्याशिवाय आम्ही कदापि राहणार नाही! आम्ही स्वतःला पुढारी म्हणून समजत नाहीं. आणि लोक समजत असले तर अनुयायांनी पाऊल टाकलें किंवा नाहीं. याची वाट पहात उभें राहणाऱ्या पुढाऱ्यांपैकीं भेकड पुढारी आम्ही नव्हत. हें डॉ. उदगावकरांनी ध्यानांत ठेवावें. तसेंच आमच्यांत व आमच्या अस्पृश्य बंधूंत मतभेद होऊन आमचें पुढारीपण जरी नष्ट झालें तरी त्यांचें आम्हांस लवमात्रहि वाईट वाटणार नाहीं. कारण सवंग लोकप्रियता मिळविण्याकरितां लोकांना जें रुचेल तेंच सांगावें, अशा प्रकारचें दांभिकपणाचें आमचें धोरण नसून आपल्याला जें खरें वाटतें तेंच बोलावें हे आमचें प्रामाणिक मत आहे. असो. बहिष्कार योग हा उपाय लो. टिळकांचा आहे, असें आम्हीं म्हटलें, त्याबद्दल डॉ. महाशयांस तर मोठेंच हंसें कोसळलें आहे. आमची खात्री आहे कीं, डॉ. महाशयांना आमचें लिहिणें कळण्याइतकी बुद्धिमता असती तर हंसूं येण्याऐवजी त्यांना रडें कोसळलें असतें ;

व म्हणालें असतें कीं, '' लोकमान्य ! तुम्हीं हें काय केलेंत ? राजकारणांत इंग्रज प्रभूविरुद्ध सांगितलेल्या तुमच्या मात्रा हे अस्पृश्य लोक समाजकारणांत स्पृश्य लोकांवर चालवूं पहात आहेत. '' बरें झालें कीं, लोकमान्यांच्या चेल्यांत पुरती अक्कल नाहीं. असती तर त्यांनीं लोकमान्यांच्या नांवानें खडे फोडले असते. तथापि, डॉ. उदगांवकरांच्या लेखांतील टवाळकीवजा मजकूर बाजूस टाकला तरी बहिष्कार योग सांगण्यांत आमचा अविवेक कसा झाला, हें डॉ. महाशयांनी कोठेंच दाखवून दिलें नाहीं. अस्पृश्य समाजास धर्म सोडण्याचा उपदेश '' आत्मघातकी '' आहे, असें डॉ. महाशय म्हणतात. पण नुसतें म्हणून काय उपयोग ? हिंदु समाजांत राहिल्यानें अस्पृश्य समाजांचे काय साधतें, व बाहेर गेल्यानें काय बुडतें, याचा ऊहापोह जर त्यांनी केला असता तर आमची चूक आमच्या ध्यानांत आली असती. पण डॉ. महाशय करतात काय ? पदरी कांहीं अस्पृश्यता निवारणांचे पुण्य असतें तर तें जनतेपुढें त्यांनी मांडिलें असतें. महाडला जो अत्याचार झाला त्याबद्दल डॉ. महाशयांनी आपल्या हिंदु महासभेतर्फे निषेध केला असता, तर तो तरी आज सांगतां आला असतां. पण तेवढें हि करण्याची बुद्धि म्हणा किंवा हिम्मत म्हणा डॉ. उदगांवकरांनी दाखविली नाहीं. मग कोणत्या तोंडानें परधर्मात जाल तर फसाल, असें ते अस्पृश्यांना सांगतात, तें आम्हास कळत नाहीं. न जाणों, हिंदुमहासभेचे चिटणीस होणें हीच त्यांच्या अस्पृश्यतानिवारणाची साक्ष असेल, किंवा हिंदु धर्मांची महान तत्वें हीच आपली दौलत, असे समजून अस्पृश्य लोकांनी हिंदु धर्मावर सदासर्वदा फिदा रहावें, अशी त्यांची समजूत असेल. पण असल्या शुष्क गोष्टींनीं किंवा नुसत्या शब्दांच्या कोटीक्रमानें आमची समजूत व्हावयाची नाही. डॉ. उदगांवकर व त्यांच्या विचाराचे जे लोक आहेत कीं, ज्यांना आम्ही धर्मांतर करतों, या म्हणण्याची चीड येते, त्या सर्वांना आमचें असें निक्षून सांगणें आहें कीं, बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर, असें म्हणणाऱ्या भिक्षुकाप्रमाणें आपलेपणाची साक्ष दे नाहीं तर पाणी सोड ही आमची मागणी आहे. तुमची नुसती नासकी बडबड आम्हांला नको आहे.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ४०

# आतां हातीं लेखणी धरिली तरी आयुष्यांत तरवार व बंदूक धरिली नाही असे नाहीं

ही वेळ परीक्षेची आहे. म्हणूनच स्पृश्य लोकांपैकीं ज्या कोणास अस्पृश्यता निवारणाच्या बाबतींत काहीं बोलावयाचे असेल तर कृतीच्या बाहेर त्यांनी आपल्या शब्दांची मजल जाऊं देऊं नये. हें बरें नाही तर मुंबईत नुक्तेच फणसवाडींत स्थापन झालेल्या देवालयाच्या चालकांची जशी परीक्षा घेण्यांत आली तशींच इतरांचीही घेण्यात येईल. पुण्याच्या लोकांना देवळें बांधण्याची मोठी हौस आहे असें म्हणतात. पण त्याला कांही तरी कारण आहे. असें सांगतात कीं, पुण्यांतील लोकांस इतर शहरांतील लोकापेक्षां लघुशंकेचें व्यसन मोठे दांडगे आहे ; व त्याच्या निरसनार्थ जागोजाग जशी व्यवस्था असावयास पाहिजे होती तशी पुर्वीच्याकाळीं नसल्यामुळें लघुशंकेनें पीडीत झालेले लोक कोठें तरी पोट मोकळें करीत असत. त्यामुळें आसपासच्या घरवाल्यांस या घाणीपासून पुष्कळ त्रास होत असे. आपल्या घराशेजारीं अशी कोणी घाण करुं नये म्हणून बिचाऱ्या घरवाल्यांनी पुष्कळ प्रयत्न केले, पण ते सारे निष्फळ झाले. अशा विवंचनेंत असतांना कोणा एका घरवाल्याला अशी कल्पना सुचली कीं, ज्या गल्लीत लोक लघुशंका करतात त्या गल्लींत जर देवळें बांधण्यांत आलीं तर असल्या घाणीपासून आपली सुटका होईल. कारण देवळासारख्या पवित्र जागेनजीक असला घाणेरडा प्रकार करण्यास कोणास उचित वाटत नाहीं. ताबडतोब ही कल्पना साऱ्या पुण्याभर पसरली, आणि कोठें " कचकाऊन म्हसोबा " तर कोठें " सोट्या म्हसोबा " कोठें " खुन्या मुरलीधर " तर कोठें चिमण्यागणपती, कोठें बटाट्या मारुती तर कोठें भांग्या मारुती वगैरे वगैरे अनन्वित नावांच्या देवांची देवळें झालीं. पुण्याचें कसेंहि असो पण अशी आपत्ति कांहीं मुंबईच्या लोकांवर कोसळली नव्हती. यास्तव दहा लक्ष रुपये खर्च करुन हें नवे देऊळ कशाकरितां बांधण्यांत आलें, व त्यास " प्रतिवादी भयंकर मठ " हें भेसूर नांव कां देण्यांत आलें हा कांही थोड्या लोकांपुरता कां होईना वादाचा प्रश्न होऊन राहिला होता. त्यांतल्यात्यांत हें देवालय सर्व हिंदू लोकांस खुलें ठेवण्यांत येणार आहे, असे मुंबईतील " हिंदुस्तान " पत्राच्या ता. १० जूनच्या अंकांत प्रसिद्ध झालें होतें. मठांतील अस्पृश्यता निराकारणप्रिय लोकांनी ही बातमी डॉ. आंबेडकरांच्या

निदर्शनास आणून दिली. तेव्हां, ही गोष्ट कसाला लावावी, व त्यासाठीं मठाच्या अधिपतीची भेंट घ्यावी असे ठरलें. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर यांनी मठाधिपतीस भेटावयास केव्हां यावें, याबद्दल विचारपूस केली. व रविवार ता. १२ जून १९२७ रोजी संध्यांकाळीं ६ वाजतां आल्यास भेट होईल, असा टेलिफोनवरुन निरोप आला. त्याप्रमाणे डॉ. आंबेडकर, रा. शिवतरकर यांच्यासह, सदरहू देवळांत गेले. मठाधिपतीची भेंट कशी होईल, याची चौकशी करीत असतां ओळखीच्या कोणी एका उपद्व्याप्यानें देवळांतील एका पंड्याचे कान फुंकले. त्याबरोबर '' अस्पृश्य लोक देवळांत शिरले ! '' '' अस्पृश्य लोक देवळांत शिरले ! '' असा एकच हलकल्लोळ उडाला. व डॉ. आंबेडकर व रा. शिवतरकर यांच्यावर जमलेल्या लोकांनी एकच गिल्ला केला. '' आम्ही आमंत्रणानें आलों आहोंत, तुम्हांला काय करावयांचे असेल तें करा ! आम्ही हटणार नाहीं ! '' असें रोखठोक सांगून जर या प्रसंगाला धीराने तोंड देण्यांत आलें नसतें, किंवा किंचित भित्रेपणा दाखविण्यांत आला असता तर हें प्रकरण हातघाईवर येऊन त्याचें पर्यवसान मारामारींत झाले असतें. तथापि ज्या सद्‌गृहस्थांनीं वृत्तपत्रीं प्रसिद्ध झालेली माहिती डॉ. आंबेडकरांच्या निदर्शनास आणली होती ते गृहस्थ अचानक तेथें आल्यामुळें गर्दीतील कांहीं लोकांनीं त्यांच्यावर हात टाकला ! इतक्यात मठाधिपतीच्या सेक्रेटरीस ही गोष्ट कोणीशी जाऊन कळविल्यावर ते तेथें आले व त्यांनीं गोंगाट थांबविला ; व '' मठाधिपतीची व आपली पुनः केव्हांतरी भेट करून देऊं. '' असें सांगून डॉ. आंबेडकरांना परतून लाविलें. आम्ही आपला पत्ता त्यांना दिला होता, व त्यांच्या उत्तराची आम्ही वाट पहात आहोंत. कांहीं मुदतीत जर आम्हाला उत्तर आलें नाहीं तर या बाबतींत अस्पृश्यांचे हक्क संरक्षित करण्याकरितां जी उपाययोजना सुचेल ती आम्ही अमलांत आणूं. या बोलघेवड्या लोकांचा असा पिच्छा पुरविल्याशिवाय तें बोलाप्रमाणे कृति करण्यास कदापि सिद्ध होणार नाहींत.

मुंबईतील अस्पृश्य लोकांस आपला देवळांत प्रवेश करून देण्यास ही उत्तम संधी सांपडली आहे. तिचा उपयोग करून घेण्यास त्यांनीं सिद्ध व्हावें अशी आमची त्यांस आग्रहाची सूचना आहे. त्या सूचनेचा ते पूर्ण विचार करतील अशी आम्हाला आशा आहे. मुंबईतील जे कांहीं अस्पृश्य लोक निराळें देऊळ बांधण्याचा उपक्रम करीत आहेत, त्यांना आमचें या बाबतींतील काय मत आहे, हें आम्हीं सांगून टाकलेंच आहे. त्यांपैकीं जे कांहीं म्होरके आहेत त्यांनीं आमच्या म्हणण्याचा पूर्णपणें विचार केल्याशिवाय आम्ही अस्पृश्य लोकांस धर्मान्तर करण्यास सांगतों, याचा आधार घेऊन आमच्या धोरणास '' भागुभाई '' हें विशेषण लाविलें आहे. आमच्या बापजाद्यांनीं शिपाईगिरीच केली. तरवार व बंदूक

याखेरीज दुसऱ्या कशास हात लावला नाही, हें कोणासही सांगावयास नको. आम्ही आतां जरी हातीं लेखणी धरिली आहे, तरी सुद्धां आपल्या आयुष्यांत तरवार व बंदूक केव्हांच हाती धरिली नाहीं असें नाहीं. ज्यांच्या बापजाद्यांनीं कोयतासुद्धा हातीं धरिला नाहीं त्यांच्या शूरत्वाच्या वल्गना एखाद्या पेद्रुच्या वल्गनेप्रमाणेंच निरर्थक समजल्या जातील. पण वादाच्या या आनुवंशिक बाजूकडे दुर्लक्ष केलें तरी खरें शौर्य कशांत आहे ? निराळें देऊळ बांधण्यांत काय ? याला जर शौर्य म्हणतां येईल तर " जी, तुमच्या जोड्यांत राहणारा मी, वर कसा येऊं ? इथेंच बसतों. " असें म्हणणाऱ्या जुन्या मुर्दाड लोकांना पराक्रमी वीर म्हणावें लागेल ! निरनिराळ्या देवळाची भीक ताज्या दमाचा, नव्या रक्ताचा अस्पृश्य कधींच मागणार नाहीं. तो आज ना उद्यां देवळांत जाईल. पण भागुबाईला तिचें काय होय ? तिचें बिचारीचें निराळ्या देवळाशिवाय कसें चालणार ? अशा लोकांना आमचें म्हणणें मान्य नसेल तर त्यांनीं निराळें देऊळ बांधावें, पण मग आम्हा अस्पृश्यांचें नांव सांगूं नये.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

## ४१

# आमच्या जवळ उत्तर तयार आहे

मुंबईच्या डी. सी. मिशनच्या पुण्याच्या शाखेकडून आमच्याकडे प्रसिद्धीकरतां एक पत्र आलें आहे. ते रा. पाताडे, सुभेदार घाडगे व रा. गायकवाड या त्रिमूर्तीच्या सहीचें आहे. या पत्रास पुण्याच्या शाखेच्या ताब्यांत ज्या इमारती आहेत त्या इमारतींचा उपयोग राहण्याकडे होतो, अशी जी वारंवार टीका होते, त्या टीकेला उत्तर म्हणून लिहिलें आहे. हें पत्र छापण्यास आम्हास कांहींच हरकत नाहीं. परंतु त्याबरोबर आम्हास त्या पत्रांतील मुद्यांवर टीका केल्याशिवाय गत्यंतर नाहीं व टीकेनें मिशनचें जास्त नुकसान होण्याचा संभव असल्यामुळें आम्ही पत्र छापावयाचेंच मागे ठेवलें आहे. आम्ही टीकेला प्रवृत्त होऊं नये म्हणूनच कीं काय आम्हाला रा. पाताडे व सुभेदार घाटगे यांच्या सहीचें दुसरे बागुलबोवावजा पत्र आलें आहे. त्यांत महाडच्या दंग्याची हकीकत आम्ही प्रसिद्ध करणार आहोंत व त्यांत तुमच्या चुका आम्ही चवठ्यावर आणणार आहोंत असें लिहिलें आहे. रा. पाताडे व सुभेदार घाटगे यांना आमची अशी सूचना आहे कीं त्यांनी उभा केलेल्या बागुलबुवाला भिऊन आम्ही गप बसूं असें त्यांनीं स्वप्नांत देखील आणू नये. त्यांच्या पत्रावर आम्हीं टीका केल्यास त्यांना कांहीं हरकत नाही असें जर त्यांनीं आम्हास कळविलें तर आम्ही त्यांचे पत्र विलंब न लावितां प्रसिद्ध करूं. महाडच्या बाबतीत संशोधन करून रा. पाताडे व सुभेदार घाडगे यांनी जे दोष शोधून काढले आहेत त्यांना आमच्या जवळ उत्तर तयार आहे हें या द्वय बंधुंनी ध्यानांत ठेवावे. त्यांचा रिपोर्ट प्रसिद्ध होण्याची आम्ही वाट पाहत आहोंत.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ४२

## हिंदुंच्या शारिरीक ऱ्हासाचे कारण

हिंदुस्थान देशाचा ऱ्हास झाला तो सर्वच परी झाला. त्यांतल्या त्यांत हिंदु लोकांचा जो शारिरीक ऱ्हास झाला तसा ऱ्हास कोणत्याच बाबतींत झाला नाहीं असें आमचें मत आहे. मुंबई येथील ओरिएन्टल विमा कंपनीनें या विषयावर नुकतेच एक लहानसें पण माहितीपूर्ण पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत हिंदू लोकांची शरीरयष्टि युरोपियन लोकांच्या मानानें किती कमी दर्जाची आहे हें पुराव्यानिशीं सिद्ध करून दिलें आहे. फार दिवस होत असलेला हा शारिरीक ऱ्हास या पुढें कसा टळेल, या प्रश्नाकडे देशहितेच्छु लोकांचे लक्ष जावें हे साहजिकच आहे. यास्तव, ज्या सद्‌गृहस्थांनीं गेल्या मे महिन्यांत पुणें येथे महाराष्ट्र शारिरीक परिषद भरवून आणली त्यांचे आभार मानणें अत्यंत आवश्यक आहे. तथापि, एका गोष्टीबद्दल खेद व्यक्त करणें आम्हांस जरूर वाटतें. सदरहू परिषदेंत एकदंर ६ ठराव पास करण्यांत आले. पास झालेले ठराव उपयुक्त आहेत, याबद्दल संशय नाहीं. पंरतु सभेंत बालविवाहनिषेधप्रदर्शक ठराव पास करण्यांत आला नाहीं. याचें आम्हास नवल वाटतें. शारिरीक ऱ्हासाची अनेक कारणें असूं शकतील. पण आम्हास असें वाटतें कीं, बालविवाह हें हिंदूलोकांच्या शारिरीक ऱ्हासाचें एक महत्त्वाचें कारण आहे. सन १८७१ सालीं बाबू केशव चंद्रसेन यांनीं हिंदूंचा शारिरीक ऱ्हास कां झाला ? व तो कशानें थोपेल ? या विषयासंबंधीं अनेक नामांकित डॉक्टर लोकांचीं मतें मागविलीं होतीं. त्यांत सर्व डॉक्टर लोकांनी एकच निर्णय दिला. तो हा कीं शारिरीक ऱ्हासाचा अनर्थ एका बालविवाहाच्या पद्धतीमुळे ओढवला आहे ; व तो टाळण्यास मुलीचें लग्न सोळा वर्षांच्या आंत होऊं नये असेच जवळ जवळ सर्वांचें मत पडलें. जोर काढून किंवा कसरत करून मनुष्य शरीर कमवूं शकेल. पण मुळीं शरीरांतच जर कस नसेल तर कमाई कसली होणार ? या दृष्टीनें पहातां, परिषदेंचें कार्य अपुरें झालें असें म्हणावें लागतें. आतां, विवाहाची वयोमर्यादा ठरविणें हा धार्मिक प्रश्न आहे असें मानलें गेलें असल्यामुळें आपण त्यांत हात घालू नये असें परिषदेच्या चालकांस वाटून त्यांनीं हा महत्वाचा प्रश्न सोडून दिला असावा, आणि तसेंच जर असेल तर परिषदेच्या योगानें हिंदु जनाचें शारीरिक बलसंवर्धन होईल, अशी आशा करणें व्यर्थ आहे. हिंदु लोकांत धर्माची भावना इतक्या भयंकर प्रमाणांत पसरली गेली

आहे कीं, वाटेल ती गोष्ट धर्माच्या सदरांत आणण्यास कोणासहि कष्ट पडत नाहींत. आणि धार्मिक गोष्टींत हात घालावयाचा नाहीं, या सबबीवर कोणत्याच प्रकारची सुधारणा करणें जड जातें. अशा परिस्थितींत धर्माला योग्य ती मर्यादा घालून समाजसुधारणेचें कार्य सुलभ करणें हें प्रत्येक सुधारणावाद्याचें आद्य कर्तव्य आहे. तें कर्तव्य पार पाडण्यास ज्यांच्या अंगांत धैर्य नाहीं, त्यांच्या हातून सुधारणा घडून येतील, असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. आमच्या या सूचनेचा शारीरिक परिषद पुढील खेपेस विचार करील, अशी आम्हास उमेद आहे.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

## ४३

# दुःखांत सुख

जगांत अनेक धर्म आहेत. प्रत्येक धर्मांतील अनुयायांत नानाप्रकारचे भेद दिसून येतात. कोणी गरीब, कोणी श्रीमंत, कोणी ज्ञानी तर कोणी अज्ञानी हे सामान्य भेद सर्व धर्मांत आहेत. त्याचप्रमाणें कांहीं व्यवसायपरत्वें पडलेले विशिष्ट भेदही एकाच धर्मांतील अनुयायांत दिसून येतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र, हे भेद हिंदु धर्मांतच आहेत असें नाहीं. ते ख्रिश्चन व मुसलमान धर्मांतही दिसून येतात. वरील सामान्य तसेंच विशिष्ट प्रकारचे भेद सर्वत्र सारखे असल्यामुळें हिंदु समाजांत पडूं पाहणारे तट इतर समाजांत पडलेल्या तटांसारखेच असतील, असा साधारणपणे समज होणें अगदीं शक्य आहे. तरी पण हिंदुसमाजात आज जो ब्राह्मण-ब्राह्मणेतर तट कितीएक दिवसांपासून पडला आहे, तो तट कांहीं अंशीं अगदीं अपूर्वसा आहे ; इतका कीं, त्याला अन्यत्र साम्य सांपडणे कठीण आहे. यूरोपांत ज्या अनेक चळवळी झाल्या त्यांच्या नांवांत राजा-राजेतर, पोप-पोपेतर, श्रीमंत-श्रीमंतेतर असा फरक जरी केला तरी अशा नामांतरापासून **ब्राह्मणेतर चळवळीचें रहस्य** कळणें, सुलभ होईल असें आम्हांस वाटत नाहीं. याचे कारण असें कीं, ज्या भेदावर ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाची उभारणी झाली आहे तो भेद इतर धर्मांत नसून फक्त हिंदुधर्मांतच काय तो आहे. तो भेद हा कीं, इतर धर्मांतील अनुयायांत जे भेद दिसून येतात ते गुणभेद विभागशः या तत्वाच्या पोटीं उत्पन्न झालेले आहेत. त्याच तत्वावरून साहजिकपणें पडणाऱ्या उभ्या भेदाच्या तटबंद्या हिंदुसमाजात आहेतच. पण त्याशिवाय जन्मजाति विभागशः या तत्वानुरूप पडणाऱ्या आडव्या भेदाच्या ज्या अनेक तटबंद्या हिंदुसमाजांत दिसतात त्या दुसऱ्या कोणत्याच समाजांत दिसत नाहींत. या दुहेरी विभागणीनुसार गुणभेदाच्या उभ्या तटबंदीमुळेच एकाच वर्गांत येणारे लोक जातिभेदाच्या आडव्या तटबंदीमुळे पृथक् पृथक् होऊन बसले आहेत. दृष्टांताच्या रूपाने सांगावयाचें झाल्यास असें सांगता येईल कीं, धनभेदानुरूप वर्गीकरण केलें तर श्रीमंत व गरीब असा गुणभेद सर्व समाजांत होऊं शकतो. पण इतर समाजांत जशी येथे या भेदाची मर्यादा संपते तशी ती हिंदुसमाजांत संपत नाही. हिंदुसमाजांत या भेदाला आणखी पुढे एक शेपुंट शिल्लक राहतें ; व श्रीमंत ब्राह्मण व श्रीमंत महार, ब्राह्मण मजूर व महार मजूर असा जसा दुसरा भेदभाव करतां येतो तसा भेदभाव, करावयास अन्यत्र कोठेंच

वाव सापडत नाहीं. अन्य समाजातील वर्गवारी एकेरी तत्वावर आली असल्याकारणांने तेथील सामाजिक चळवळींचा रोख उभे भेद नष्ट करण्याकडे असतो. परंतु ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीचे तसें नाहीं. तिचा सारा मारा हिंदु समाजातील आडव्या भेदाच्या तटबंदीवर आहे.

हिंदु समाजांत या आडव्या तटबंद्या कधीं व कशा पडल्या याचा उहापोह आज आम्हांस करावयाचा नाहीं. आज इतकेंच सांगितले म्हणजे बस्स आहे कीं, ऋग्वेद काळानंतर जेव्हा **ब्रह्मदेव बाळंत झाला** तेव्हांच ब्राह्मण जातिवाचक करंटीं कारटीं जन्मास आलीं ; व त्यांनीं आपल्याभोंवती प्रथमतः तटबंदी केली. ही तटबंदी झाल्याबरोबर ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा भेदभाव जन्मास आला व गुणभेद विभागशः हें तत्त्व अजिबाद गाडलें जाऊन त्याच्याऐवजीं जातिभेद विभागशः हें तत्त्व प्रस्थापित करण्यांत आलें. पुढें कालानुसार ब्राह्मण जातीसाठीं जसा ब्रह्मदेव बाळंत झाला तसा ब्राह्मणेतरांतहि जे अनेक वर्गभेद होते, त्या वर्गांनीं कोणा ना कोणास बाळंतपणाच्या वेदना सहन करावयास लावून आपण अमूक एका ऋषीपासून उत्पन्न झालों, असें मानून इतर वर्गांपासून भिन्न आहोंत, अशी भावना दृढमूल करून घेतली व ब्राह्मणवर्गाप्रमाणे दरेक वर्गानें आपल्याभोंवतीं तट बांधण्याच्या कामास सुरवात केली. या तटबंदीचा मूळ हेतु इतरांपासून आपण अलग आहोंत, एवढे दर्शविण्यापुरताच असता तरी बरें झालें असतें. परंतु ज्या ब्राह्मणवर्गानें प्रथमतः तटबंदी करण्यास सुरवात केली त्या ब्राह्मणवर्गाचा तटबंदी करण्याचा मुख्य हेतु इतरापेक्षां आपण श्रेष्ठ आहोंत हें दाखविण्याचा होता, हें निर्विवाद आहे. ब्राह्मणेतर लोकांत समाविष्ट होणाऱ्या वर्गांनीं जेव्हां या तटबंदीच्या पद्धतीचें अनुकरण केलें तेव्हां त्यांत अंतर्भूत झालेल्या श्रेष्ठ कनिष्ट भावनेचेंहि सहजगत्या त्यांच्याकडून अनुकरण झालें. या तटबंदीमुळें हिंदु समाजात सर्वत्र अशी भावना पसरली कीं, दरेक जातीस आपण दुसऱ्या जातींपासून अगदी भिन्न आहोंत, इतकेंच नव्हे तर कोणत्या ना कोणत्या इतर जातींपेक्षां आपली जात श्रेष्ठ आहे, या भावनेनें साऱ्या जाती अगदीं पिडून गेलेल्या दिसतात. ब्राह्मण्याची व्याख्या कोणी कशीहि करो. **जन्मजात उच्चनीच भाव हीच ब्राह्मण्याची खरी व्याख्या** आहें असें आम्हांस वाटतें व तशाच अर्थी या शब्दाचा आम्हीं उपयोग करणार आहोंत.

ब्राह्मण्याचा उगम झाल्यापासून ब्राह्मणेतर जनतेनें त्याच्याविरुद्ध झगडा मांडला होता हें ज्यांनीं प्राचीन इतिहासाचें अवलोकन केलें असेल त्यांना सहज कळून येण्यासारखें आहे. परंतु, हल्लींच्या काळीं या वादाला जितकें निकराचें स्वरूप आलें आहे, तितकें यापूर्वी केव्हाच आलेले नव्हते. पूर्वीच्या काळी हिंदु

समाजाच्या वर्गवारी घड्या गुणभेद विभागशः किंवा जातिभेद विभागशः या दोहोंपैकीं कोणत्याहि पाटावर घातल्या तरी त्या सारख्याच पडत. दोन्हीं प्रकारच्या घड्यांत तिडेंबाकें फारसें कोठें होत नसे. याचें कारण जाती जशा जन्मानें श्रेष्ठ तशा गुणानेंहि श्रेष्ठ असत, व जन्मानें कनिष्ट तशा गुणानेंहि कनिष्ट असत. यावरुन श्रेष्ठ जातींचे श्रेष्ठ गुण व कनिष्ट जातींतील कनिष्ट गुण यांची ही सांगड, हा कांही दैविक प्रकार होता, असें कोणी मानूं नये. कनिष्ट मानलेल्या जाती गुणानेंहि कनिष्ट राहिल्या याचें मुख्य कारण असें कीं, त्यांना गुणवान् होण्याची कायदेशीर बंदी करण्यांत आलेली होती. हें मनुस्मृतीसारख्या स्मृतिग्रंथावरून सर्वांस कळून येण्यासारखें आहे. पण इंग्रजी अमदानीत या बंदीचा साफ उच्छेद होऊन गेल्यामुळें समाजाची पूर्वीची घडी बिघडून गेली ; व ब्राह्मणाच्या पोटीं गुणहीन शूद्रवृत्तीची संतति आणि शूद्रांच्या पोटीं गुणवान् ब्राह्मणवृत्तीची संतति जन्माला येऊं लागली. अशापरी गुणाचा आणि जातीचा प्रत्यक्ष विरोध उत्पन्न झाला असल्यामुळें ब्राह्मणेतर चळवळीला आज एवढा जोर आलेला दिसत आहे. हा विरोध नष्ट करण्यास ब्राह्मण्याचा नायनाट होणें अगदी अवश्य आहे. ब्राह्मण्यापासून हिंदुसमाजाचें किती अपरिमित नुकसान झालें आहे हें सर्वांस कळून चुकलें आहे. या ब्राह्मण्यामुळें ब्राह्मणेतर जनतेस विद्येची द्वारें बंद करण्यांत येऊन त्यांना अडाणी ठेवण्यांत आलें. वेदांसारखे धार्मिक ग्रंथसुद्धां वाचण्याची बंदी करण्यांत आली. जातीशिवाय गति नाहीं, या आकुंचित तत्वज्ञानाचे अमंगल जीवन जनतेस पाजून अखिल जनतेच्या मनोभावना अनुदार करण्यांत आल्या. श्रेष्ठ व कनिष्ट हा भेदभाव जन्मावरून ठरवून वैयक्तिक उन्नतीला व सुधारणेला अवश्य लागणारा अवसर नाहींसा करण्यात आला. विधीपुढें यत्न विफल आहे, या शिकवणीनें सर्वांची गति खुंटवून टाकली. धर्मभोळेपणा वाढवून खऱ्या धर्माचे ज्ञान होऊं दिलें नाहीं. सोंवळ्याओवळ्याच्या व शिवाशिवीच्या कल्पना पसरवून लोकांना माणूसकीसारख्या अमोल वस्तूचा धिक्कार करण्यास शिकविलें. ब्रिटिश साम्राज्यांतील आंग्लाईमुळें या देशाचें आत्यंतिक नुकसान झाले आहे, असें जें मोठ्या भडक रंगांत नेहमीं सांगतात त्यांना ब्राह्मणाईपासून हिंदू समाजाचें किती नुकसान झालें आहे याची नीटशी कल्पना असावी असें दिसत नाहीं. आमच्या मतें आंग्लाई व ब्राह्मणाई या हिंदी जनतेच्या आंगाला लागलेल्या दोन जळवा आहेत, व त्या एकसारख्या हिंदुलोकांच्या रक्ताचा शोष करीत आहेत. आंग्लाई सत्तेनें लोकांना देहानें गुलाम बनविलें, तर ब्राह्मणाईनें जनतेच्या आत्म्याला गुलाम करुन ठेविलें. आंग्लाईनें हिंदुस्थानातील संपत्तीचें शोषण केलें तर ब्राह्मणाईनें स्वाभिमानासारख्या आत्मिक संपत्तीचे हरण केलें आहे. असें असता, सर्व प्रकारच्या उन्नतिकारक चळवळींना आपल्याशा

करून टाकणाऱ्या ब्राह्मण लोकांनीं ब्राह्मणेतर चळवळींत पडूं नये, ही नवलाची गोष्ट नव्हे काय ? ब्राह्मण लोक सर्व प्रकारच्या चळवळींत धडाडीनें भाग घेतात. राजकीय चळवळ हें तर त्यांचे जीवनच आहे. एक वेळ त्यांना जेवण न मिळालें तरी चालेल. पण दिवसाच्या चोवीस तासांतून राजकारणाच्या ताकाचा एखादा भुरका जर त्यांना मिळाला नाहीं तर त्यांना अमांशाची पीडा होण्याचा संभव असतो. सामाजिक सुधारणेच्या चळवळींतहि त्यांचें अंग असतें. विधदाविवाह, बालविवाह, केशवपन, वगैरे सामाजिक प्रश्नांसंबंधीं त्यांनीं आस्था दाखविली आहे. मजूर वर्गाच्या वतीनें भांडवलशाहीशीं वाद घालणाऱ्या चळवळीचें ते पुरस्कर्ते होऊ शकतात–नव्हे तर बोल्शेविझम् व कॉम्युनिझमसारख्या आर्थिक हितसंबंधांत क्रांति घडवून आणणाऱ्या चळवळी या देशांत आणून त्या पाडाला लावण्यास ब्राह्मणच कारणीभूत झाले आहेत. असें असतां फक्त ब्राह्मण्यविध्वंसनाच्या शुभ कार्यातच त्यांना भाग घेण्याची इच्छा होत नाहीं. इतकेंच नव्हें, तर ब्राह्मण्यापासून होणाऱ्या अनिष्ट परिणामासंबंधीं ब्राह्मण लोकांस कोणी जबाबदार धरलें, तर **ज्याचा त्याचा ब्राह्मणावर कटाक्ष कां ?** असा उलटा सवाल ते करतात. " ब्राह्मणांना जें वर्चस्व प्राप्त झाले तें त्यांच्या करामतीमुळें . . . ज्यास शहाणपण व सामर्थ्य आहे, त्यांना दुसऱ्यांवर आपलें वर्चस्व बसवावेंसे वाटतें व त्यांस तें बसवितांहि येतें . . . . . . ब्राह्मणांनीं धर्मवर्चस्व मिळविलें तें लोकांच्या माना कापून नव्हें, तर शुद्ध मन बळानें ब्राह्मणांनी दुसऱ्या जातींस अज्ञानाच्या अंधकारांत चांचपत ठेंचा खाण्यास लाविलें . . . . . हें . . . . . स्वाभाविक दिसतें . . . . . शहाणपणा अंगीं असल्यावर त्यापासून आपलें हित करून घेण्याचा कोण प्रयत्न करीत नाही ? एकाच्या अज्ञानाचा फायदा दुसऱ्यास मिळाला नाहीं, असें कोठें झालें नाहीं ? धर्माची किल्ली एकदां हातीं सापडून लोकांची मनें वश करून घेतां आल्यावर धर्माधिकाऱ्यांनीं हरेक प्रकारचा अंमल त्यांच्यावर चालविण्याची खटपट केल्याचीं उदाहरणें प्रत्येक देशाच्या इतिहासात सांपडतात. . . . . बळी तो कान पिळी अशी एक जगाची राहटी आहे . . . . . " अशा प्रकारची एकाद्या धर्मलंडाची भाषा *केसरीसारख्या थोर पत्रानें ब्राह्मण जातीच्या आपमतलबी धोरणाचें समर्थन करण्याकरितां जनाची किंवा मनाची कांहींच लाज न धरतां काढली आहे. महाडच्या प्रकरणांत जेव्हां आम्हीं शेटजी भटजींस दोष दिला तेव्हां देखील अस्पृश्यता निवारणाचा मक्ता ब्राह्मणांनींच घेतला आहे काय,

---

*केसरी दि. १५ व २२ मार्च १८८१ " ज्याचा त्याचा ब्राह्मणांवर कटाक्ष का ? " या शिर्षकाचा लेख विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी केसरीत लिहिला, त्यातील हा काही भाग. पाहा, " विष्णुपदी : तृतीय खंड "–संपादक श्री. ना. बनहट्टी, द्वि. आ. १९७४ सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे, नागपूर. पृ. १७५-१८०.

अशाच प्रकारचा उलटा सवाल आमच्यावर करण्यांत आला. ब्राह्मण वर्गानें आमच्या हिताची एकादी गोष्ट केली नाहीं तर त्यांना दोष देण्याचा अधिकार आम्हांस नाहीं हें आम्ही कबूल करितों. तथापि ब्राह्मण वर्गावर आम्ही जो आरोप केला तो **ब्राह्मण वर्ग हा सर्व जनतेचा पुढारी वर्ग** आहे असें समजूनच केला होता. आमच्या मतें समाजाची रचना त्याचप्रमाणें त्याची उन्नति अथवा अवनति बऱ्याच अंशीं पुढारी वर्गाच्या शिकवणीवरच अवलंबून असते. पुढाऱ्यांच्या शिकवणींप्रमाणें समाजाला वळण लागतें. सबब समाजाच्या गुणावगुणाबद्दल पुढारी वर्गच जबाबदार धरला जातो. दरेक समाजांत कांहीं सामान्य आणि कांहीं सन्मान्य असे लोक असतात. तसेंच कांहीं समाज सामान्य व कांहीं सन्मान्य गणले जातात. ज्याप्रमाणें एखाद्या सामान्य व सन्मान्य अशा दोन व्यक्तींत कलह सुरू झाला तर तो कलह शमविण्याची जबाबदारी भांडणाऱ्या व्यक्तींपैकीं जो अधिक सन्मान्य असतो त्याच्यावरच लादण्यांत येते. त्याच न्यायानें ब्राह्मण-ब्राह्मणेतरांत सुरू असलेल्या वादाचें तोंड बंद करण्याची जबाबदारी ब्राह्मण वर्गावरच येते. कारण हिंदु समाजाचें पुढारीपण फार प्राचीनकाळापासून ब्राह्मण वर्गाकडे आलेलें आहे, हें कोणासही नाकबूल करतां यावयाचें नाहीं. यास्तव या पुढारीपणाच्या अनुषंगें जी जबाबदारी ब्राह्मण वर्गावर येऊन पडते, ती जबाबदारी पार पाडण्याचा मनःपूर्वक प्रयत्न जर त्यांनीं केला नाही, तर त्यापासून त्यांच्यावर होणाऱ्या आरोपास तो वृथारोप आहे, असें त्यांस केव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं. आपण हिंदु समाजाचे पुढारी आहोंत, ब्राह्मण वर्गास मान हवा असेल तर त्याने आपली जबाबदारी ओळखली पाहिजे ; व जबाबदारी नको असेल तर पुढारीपण सोडून शूद्रांत किंवा अतिशूद्रांत सामील झालें पाहिजे. याशिवाय त्यांच्यावरील दोषारोप टळणार नाहीं.

ब्राह्मणांना या बाबतींत आम्ही जबाबदार कां धरतों याचा एथवर खुलासा केला आहे. आतां याबरोबर दुसराहि असा प्रश्न उद्‌भवतों कीं, जर ब्राह्मण लोक ब्राह्मण्य विध्वंसनासाठीं पुढें आले नाहींत, तर दुसऱ्या कोणीच या बाबतीत कांहीच करू नये काय ? आमच्या मतें ब्राह्मण्यविध्वसंनाची जबाबदारी सर्वांवर जरी सारख्या प्रमाणात नसली, तरी कोणत्याही वर्गास या जबाबदारीतून सुटणें शक्य नाहीं. कारण ब्राह्मण्य हें सर्वव्यापी परमेश्वराप्रमाणें हिंदुस्थानांतील स्थिरचर सृष्टि व्यापून उरलें आहे. बरेचसे अस्पृश्य, असंख्य ब्राह्मणेतर व अगणित ब्राह्मण ज्ञानतः अज्ञानतः या ब्राह्मण्याचे उपासक आहेत. ब्राह्मण, ब्राह्मणेतर व अस्पृश्य या ब्राह्मण्यानें भरलेल्या गाडग्याच्या उतरंडी आहेत. अस्पृश्यांच्या

खांद्यावर ब्राह्मणेतर व ब्राह्मणेतरांच्या खांद्यावर ब्राह्मण, अशा या उतरंडी एकमेकांस लागून आहेत. यांत बिचाऱ्या अस्पृश्यांना दोघांचें ओझें सहन करावें लागत आहे. असें असल्यामुळें ब्राह्मण-ब्राह्मणेतरांपैकीं कोणीहि एकानें अस्पृश्यांच्या खांद्यावर बसून वाट चालण्याऐवजीं खालीं उतरून आपल्या पाऊलीं चालूं लागल्यास अस्पृश्यावरील हा दुहेरी भार हलका होणार नाहीं काय ? एकानें दुसऱ्याची वाट पाहण्याची कांहीं जरूरी नाहीं. ब्राह्मण लोक जर खालीं उतरण्यास बळकुबळीस आले, म्हणून ब्राह्मणेतरांनीं खाली उतरण्याचा ममताळूपणा दाखवूं नये काय ? ब्राह्मण्याच्या अमंगल गंगेचा उगम ब्राह्मण वर्गांतूनच झाला असला, तरी तिच्या पुढें मोठें व खोल होत गेलेल्या पात्रांतून अनेक लोक वाहून जावयास लागले, तर उगमाचे लोक तिचा प्रवाह थांबवित नाहींत, एवढ्यावरून मध्यावर राहणाऱ्या लोकांनी देखील बांध घालूं नये, यास न्याय म्हणता येईल काय ? आमच्या ब्राह्मणेतरबंधूंनी या दृष्टीनें या प्रश्नाचा जितका विचार करावयास पाहिजे होता, तितका विचार केलेला दिसत नाहीं ही आमच्या मतें मोठ्या दु:खाची गोष्ट आहे. ब्राह्मणेतर पक्षाच्या तत्त्वांविरुद्ध एखादी गोष्ट ब्राह्मणेतर जनतेच्या हातून घडली, तर अशा गोष्टी ब्राह्मण लोक आम्हांस करावयास लावतात व आपण नामानिराळे होतात असा युक्तिवाद ब्राह्मणेतर पक्षाकडून नेहमींच करण्यांत येतो. असे होत असेल हें आम्हांस कबूल करण्यास कांही हरकत दिसत नाहीं. पण हरप्रसंगीं आम्हीं परप्रत्ययनेय आहोंत, दुष्कृत्याची जबाबदारी टाळण्याचा प्रकार आम्हास तरी मोठा विलक्षण दिसतो. नेहमीं दुसऱ्यांकडे बोट करून ' करता करविता ब्राह्मण वेगळाच आहे, मी फक्त निमित्ताला कारण आहें , ' असे म्हणून दरेक ब्राह्मणेतर अपराधी आपणास दोषमुक्त करून घेऊं म्हणेल तर सामान्य लोक त्याला वेड्यांत काढतील ; परंतु ब्राह्मणेतर पक्षातील लोकांस ही सबब लढविण्याची इतकी जबरदस्त संवय लागून गेली आहे कीं, या संवयीनें हा एवढा मोठा महाराष्ट्रातील बलाढ्य पक्ष अकर्तृत्वशील होतो कीं काय, याचा आम्हास मोठा धाक वाटूं लागला होता. व महाडच्या दंग्याच्या बाबतींत ब्राह्मणेतर पत्रांतून जी चर्चा झाली, ती वाचून तर आमची निराशा झाली होती, हें आम्हीं उघडपणें कबूल करतों. मारामारींत शेटजी भटजींनीं भाग घेतला होता, हा मुद्दा प्रस्थापित करण्यावरच ब्राह्मणेतर पत्रांच्या लेखनाचा कटाक्ष होता. आमच्या मतें या मुद्यावर भर देण्याचें कांहींच कारण नव्हतें. दंग्यांत कोणी भाग घेतला, हा प्रश्न आमच्या मतें अगदीं गौण होता व त्यावर रण माजवावयाची कोणाची इच्छा असल्यास आम्ही अजूनहि-खटल्यातील शेटजी भटजी आरोपी सुटले असतांहि-असें निक्षून सांगतों कीं, शेटजी भटजींनीं या मारामारींत भाग घेतला होता. एवढ्यानें जर ब्राह्मणेतर

पक्षांचें समाधान होत असेल तर आम्ही त्यांच्या तर्फे या वादांत साक्ष देण्यास तयार आहोंत. ब्राह्मणेतर जनतेनें यांत भाग घेतला होता, तो केवळ ब्राह्मणांच्या सांगण्यावरून घेतला होता, या विधानांनींहि ब्राह्मणेतर पक्षाचें भागत असेल, तर तेहि कबुल करण्यास आमची हरकत नाहीं. परंतु या एवढ्यावरूनच ब्राह्मणेतर पक्ष कृतार्थ झाला असें होत असेल तर **ब्राह्मणेतर पक्षाचे कार्य कोणतें** याचे आम्हास गुढ पडते. ब्राह्मणेतर पक्षाची जरूरी आहे ती केवळ ब्राह्मण्यनाशासाठी, ब्राह्मण लोक पुढें येत नाहींत म्हणून त्यांना सुळावर देण्यासाठी आहे असें आम्हास वाटत नाहीं. आजवर ब्राह्मणेतरांतील ब्राह्मण्य घालविण्यास ब्राह्मणांनी कांहीच केलें नाही म्हणून तें घालविण्याची जबाबदारी आपली आपणच घ्यावी, हाच या ब्राह्मणेतर पक्षाचा मुख्य हेतु असला पाहिजे. व याच दृष्टीनें आम्ही ब्राह्मणेतर पक्षाच्या हालचालीकडे पहात असतों. आम्हाला अपेक्षा होती कीं, आमचे ब्राह्मणेतर बंधु आपली या बाबतींतील जबाबदारी ओळखून आपल्या ज्ञातिबंधूंस अशा दुराचारापासून परावृत्त करण्याचा कांहीं तरी विधायक कार्यक्रम आंखतील. पण तें कांहीं न करतां जें केलें तें ब्राह्मणांनीं केलें व आम्हीं जें केलें तें त्यांच्या सांगण्यावरून केलें, अशी कैफियत देऊन ते नामानिराळे झालें. पण या सबबीचें बिचाऱ्या अस्पृश्यांना काय होय ? त्यांना विघ्न झालें हें खरें ! विघ्न केलें, तें आपल्या अक्कल हुशारीनें केलें किंवा दुसऱ्यांच्या चिथावणीवरून केलें ही बाब क्षुल्लक आहे. शिक्षेच्या शमनार्थ फार तर तिचा उपयोग होईल. पण तिच्यावर भिस्त ठेवून दोषमुक्ततेची अपेक्षा आमच्या ब्राह्मणेतर बंधूंनीं करावी हें आमच्या मतें अगदीं कोत्या बुद्धीचें निदर्शक आहे.

दुःखांत सुख एकच, व तें हें कीं, आमचे मित्र रा. जवळकर व जेधे या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं " चवदार " तळ्याच्या बाबतींत महाड येथे अस्पृश्यांबरोबर सत्याग्रह करण्याची तयारी दाखविलेली आहे, हें होय. या आश्वासनाबद्दल आम्हीं त्यांचें आभारी आहोंत. पण त्यांच्याहिपेक्षां वऱ्हाडांतील आमच्या ब्राह्मणेतर बंधूंचे आम्ही विशेष आभारी आहोंत. आमच्या मुंबईकर ब्राह्मणेतर बंधूपेक्षां वऱ्हाडांतील ब्राह्मणेतर बंधूंना अस्पृश्यतानिवारणाची जास्त कळकळ आहे, हें उभय प्रांतांतील ब्राह्मणेतर पक्षांची पत्रें वाचणाऱ्या वाचकांस सांगावयास नको. आमची खात्री आहे कीं, रा. जेधे व जवळकर हे जर वऱ्हाडांत गेले नसते तर त्यांना ही कल्पनाच सुचली नसती. कसेंहि असो, ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं या कामीं सक्रीय सहानुभूति दाखविण्याचें मनांत आणलें आहे ही गोष्ट ब्राह्मणेतर चळवळीला भूषणावह आहे. **महाडला सत्याग्रह** करण्याचा आमचा मानस आम्हीं यापूर्वीच जाहीर केला आहे, हें आमच्या बहिष्कृत भारताच्या दुसऱ्या अंकांतील अग्रलेखावरून स्पष्टपणें दिसून येईल. हा मार्ग अडीअडचणीचा आहे, असें बरेच लोक आम्हांस सांगत आहेत. आम्हीं " फाजील ऊतावळेपणा करीत आहोंत ", " स्पृश्य वर्गाच्या

परंपरागत भावनांना जुमानीत नाहीं '', ''उद्दिष्ट गांठण्यासाठीं वीर मारुतीचें अनुकरण करून शंभर कोसांचें उड्डाण एकाच उडींत करण्याची महत्त्वाकांक्षा धरीत आहोंत '', ''कित्येक शतकांच्या रूढींची तटबंदी एकदम सुरुंगानें उडवून देण्याचा अट्टाहास करीत आहोंत.'' वगैरे प्रलाप काढून कांहीं स्पृश्य लोक आम्हांस भेडसावीत आहेत, व आमच्या निश्चयापासून आम्हास परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत आहेत. पण असल्या भेडसावण्याला आम्ही कदापि भीक घालणार नाहीं. नुसत्या शाब्दिक वादविवादानें किंवा ज्ञानाच्या प्रसारानें अस्पृश्यता निवारण होण्याची आम्हास आशा असती, तर आम्ही वरील बुद्धिवाद कदाचित् कबूल केला असता. पण शस्त्रप्रयोगाशिवाय साध्या युक्तिवादाच्या किंवा ज्ञानाच्या मलमपट्ट्यांनी हा रोग हटणार नाही, ही गोष्ट अनुभवसिद्ध असतांना शस्त्र प्रयोग करण्यास मनाची निष्ठुरता न दाखविणे, यांत खरी कार्यक्षमता नसून मनाचा दुबळेपणा आहे, असें आम्हांस वाटतें. या दुबळेपणाच्या पापाचे आपण धनी होउं नये, अशी आमची मनोदेवता आम्हास आज्ञापित असल्यामुळे आम्ही महाड येथे पुनः '' चवदार '' तळ्यावर जाण्याचा शक्य तितक्या लौकर उपक्रम करणार आहोंत. महाड येथील हा भावी सत्याग्रह कसा करावा, याविषयीं रा. जवळकर व जेधे या उभयतांनीं जें मत प्रतिपादन केलें आहे,† तें मत आम्हास ग्राह्य आहे. तरी पण एका महत्वाच्या गोष्टींत त्यांचा आणि आमचा मतभेद आहे, हें आम्हास नमूद करणें जरूर वाटतें. रा. जेधे व जवळकर यांनी अशी अट घातली आहे कीं, या सत्याग्रहांत ''कोणत्याहि ब्राह्मण जातींतील गृहस्थास सामील करण्यांत येऊं नये.'' ही अट आम्हांस केव्हांच मान्य करतां येणार नाही. आम्ही ब्राह्मणांच्या विरुद्ध नाहीं. ही गोष्ट आम्ही जाहीर करूं इच्छितों. आमचा कटाक्ष ब्राह्मण्यावर आहे. ब्राह्मणलोक आमचे वैरी नसून ब्राह्मण्यग्रस्त लोक आमचे वैरी आहेत, असें आम्हीं समजतों. या भावनेनें प्रेरित झाल्यामुळे ब्राह्मण्यग्रस्त ब्राह्मणेतर हा आम्हाला दूरचा वाटतो व ब्राह्मण्यरहित ब्राह्मण आम्हास जवळचा वाटतो. आमच्या मनाची ठेवण अशा तऱ्हेची असल्यामुळे आम्ही योजिलेल्या सत्याग्रहांत दरेक व्यक्तीस मुभा आहे. मग ती व्यक्ति, कोणत्याहि जातींतील असो. ज्यास ब्राह्मण्य नको असेल, तोच या खटाटोपींत पडेल. येथें निवडानिवड करण्याची आम्हांस कांही जरुरीच दिसत नाहीं.

● ● ●

---

† पहा, परिशिष्ट-१७

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# ४४

## व्यक्तीला जरूर ते स्वातंत्र्य प्राप्त झाले नाही तर त्याचे नैतिक परिणाम व्यक्ती व समाज यांच्यावर सारखेच अनिष्ट होतात

मुसलमान लोक खाण्यापिण्याच्या बाबतींत जरी मोठे रंगेल असले तरी रमजान महिन्यांतील त्यांचे उपोषण फारच कडकडीत असतें. उपोषणकालांत पाणी पिण्याची सुद्धा मनाई असते. इतकेंच नव्हे तर आवंढा देखील परतण्याची त्यांना मनाई असते. एका फकिराची गोष्ट सांगतात कीं, त्याला उपास करणें प्राप्त होतें. पण उपासाचा कडकपणा त्याला अगदी असह्य वाटे. तेव्हां पाण्याचा घुटका तर प्यावयास मिळावा, पण लोकांना ते कळू नये अशी एक युक्ति शोधून काढण्याच्या विचारास तो लागला. त्यावर त्याला अशी एक कल्पना सुचली कीं, आपण रोज नदीवर स्नानाला जावें व पाण्यांत बुडी मारून आंत एक घुटका घेऊन वर यावें म्हणजे तहानही भागेल आणि आपण उपास मोडला असें कोणाला कळणारहि नाही. ही नामी युक्ति त्याला इतकी पसंत पडली की, त्यानें हें मानभावी स्नान आपल्या दिनचर्येतील एक नित्याचा क्रम करून ठेविला. बऱ्याच दिवसांच्या अनुभवानें ही अंदरकी बात कोणासच कळणार नाहीं, अशी त्याची खातरजमा झाल्यामुळें "मैं करता हूं, ओ खुदाभी देखता नहीं" असें तो लोकांस सांगत फिरत असे. परंतु पाप कधीं ना कधीं उघडकीस येते, या लोकानुभवाप्रमाणे हा फकीर एके दिवशी पाण्याचा घुटका घेण्यास नदींत उतरला असता एक शिंगटीचा मासा त्यांच्या तोंडात गेला. झटक्यासरशी मासा तोंडात आल्यामुळे पाण्याबरोबर मासा गिळण्याचा प्रयत्न त्यानें केला. पण मासा मोठा व कांटेरी असल्यामुळें तो जो फकिराच्या गळ्यांत अडकला तो आंतही जाईना व बाहेरही निघेना. अशा स्थितींत आपल्या पापाची साक्ष बरोबर घेऊन त्या फकिरास नदीबाहेर शहरांत यावें लागलें. व शेवटीं "मैं करतां हूं ओ खुदाभी नहीं देखता," असें मोठ्या दिमाखानें म्हणणाऱ्या या फकिराची लफंगेगिरी चव्हाट्यावर आली.

असाच कांहींसा प्रकार ह. भ. प. पांगारकर बुवा यांचा झाला, असें आम्हांस वाटतें. रा. पांगारकर हे कांही दिवसांपूर्वी बडोद्याला गेले असतां. त्यांना तेथील रहिवाशीं श्री. विनायक वाकसकर या कायस्थ प्रभू जातीच्या गृहस्थानें फराळांचे आमंत्रण दिलें. तें पांगारकर बुवा यांनीं स्वीकारिलें. त्याप्रमाणे

पांगारकर बुवा जातीनें ब्राह्मण असतां या कायस्थ गृहस्थाच्या घरीं जाऊन जेवलें† परंतु ही गोष्ट बडोद्याचे प्रोफेसर जोशी यांनी पुण्याच्या ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध केली; व पांगारकर बुवांनी जें मनोधैर्य दाखविलें त्याबद्दल त्यांचें अभिनंदनही केलें. परंतु या अभिनंदनानें आनंदित होण्याऐवजीं पांगारकर बुवांनी उलट खाऊन प्रायाश्चित्त घेतले या प्रायाश्चित प्रकरणांत पांगारकर बुवांनी खोटा कोटिक्रम न लढवितां सरळपणा दाखविला आहे, असें भासवून कांहीं जुन्या मताचे लोक त्यांचे गुण गात आहेत. परंतु प्रायाश्चित घेण्याची जीं कारणें पांगारकरांनी दिली आहेत, तीं ध्यानांत घेतां पांगारकर नुसता लपंडाव करीत आहेत असेच म्हणावें लागतें. "ज्या अर्थी वाकसकरांच्या सलगीचे प्रोफेसर जोशी आपण जेवलों असें जाहीर करतात, त्या अर्थी त्यांची समजूत खरी धरून आपण जुन्या समजुतीच्या लोकांसाठी प्रायाश्चित घेत आहों," असें श्री. पांगारकर हे लिहितात. जुन्या लोकांच्या समजुतीसाठीं प्रायाश्चित घेणें हें हल्लीच्या काळांत मोठें निंद्य कृत्य आहे असें आम्हांस वाटतें. पुष्कळसे सुधारणावादी लोक अडलें कीं प्रायश्चित घेण्यास नेहमी तयार असतात. व उलट असेंही म्हणतात कीं "अहो! प्रायाश्चित घेतलें तरी आम्ही ही गोष्ट पुन्हां करणार नाहीं, अशांतला कांहीं भाग नव्हें!" या मताचे लोक सुधारणावादी असतील पण त्यांच्या वर्तनाचा हा प्रकार आम्हांस अगदी गैर वाटतो. प्रायाश्चित्त घेणें याचा अर्थ जी गोष्ट आपण केली ती गोष्ट वाईट आहे अशी कबुली देणें हा होय. याशिवाय प्रायाश्चिताला दुसरा कांहीं अर्थ असणें संभवत नाहीं. जो खरा सुधारक आहे, ज्याला आपण करतों तें रास्त आहे अशी ज्याची दृढ भावना आहे, त्यानें अडल्यास प्रायश्चित घेणें यांत दुटप्पीपणा होत नसला तरी मनाचा दुबळेपणा होतो हें खास. प्रायश्चित्त घेण्यानें तें घेणाऱ्या लोकांच्या स्वभावाचा कमकुवतपणा दिसतोच. पण त्यामुळें सुधारणेची पिछेहाटहि होते. अडल्या पडल्याला सुधारणावादी लोक प्रायश्चित घेण्यास तयार झाल्यास जुन्या मताच्या लोकांना आपल्या आचाराविचारांत फेरबदल करण्याची केव्हांच जरूरी वाटणार नाहीं. उलट सुधारणावादी लोक प्रायश्चित घेतात म्हणजे आपणांस शरण येतात या जाणिवेनें तें सुधारणांना तुच्छ मानतात. व आमचेच खरें असा टेंभा मिरवून जुन्यालाच घट्ट धरून बसतात. रा. पांगारकर हे सुधारणावादी नसले तरी भागवत धर्मी आहेत. व भागवतधर्मात झालेल्या अनेक संतांची चरित्रेंही त्यांनी लिहिली आहेत. यावरून ते किती कट्टे भागवत् धर्मी असावेत हें कोणालाही विषद करून सांगण्याची जरूरी नाहीं. आमच्या मतें सुधारणावाद्यांनी प्रायश्चित घेणें जसे

† ही घटना ता. ९ जून १९२७ रोजी घडली.

निंद्य आहे, तसेंच भागवत् धर्मीयांनीहि सहभोजनाकारणें प्रायश्चित घेणें निंद्य आहे. कारण भागवतधर्माला कांहीं भेदभावच नाहीं. इतकेंच नव्हे तर काला हा भागवतधर्माचे मुख्य अंग आहे. रा. वाकसकर यांच्याबरोबर झालेलें पांगारकरांचे सहभोजन हा तरी कालाच होता. मग भागवतधर्मी पांगारकरांना त्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याचें काय कारण होतें, हें आम्हांस कळत नाहीं. आतां रा. पांगारकर हे कर्मठ आहेत असें धरून जरी चाललें तरी त्यांचें वर्तन प्रामाणिकपणाचें आहे असें म्हणणें शक्य नाहीं. रा. पांगारकर असें म्हणतात कीं आपण गेलों तें फराळाचें आमंत्रण होतें म्हणून गेलों. फराळासाठीं निर्लेपाचे पदार्थ असतात. आणि परजातीच्या हातच्या निर्लेपाच्या वस्तु सेवन करण्यांत अधर्म होत नाहीं असे रा. पांगारकरांचे म्हणणें आहे. परंतु ह्या दोन्ही म्हणण्यांत कांहीं अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाहीं. निर्लेपाचे पदार्थ केव्हां व कधी खावे या संबंधीचा शास्त्राधार अगदी उघडा आहे. ब्राह्मण पुरुषास स्नान केल्याशिवाय भोजन करणें निषिद्ध आहे. परंतु स्नान वगैरे प्रातःविधि उरकण्यास वेळ लागल्यास भोजनाच्या रमण्यांत रममाण होणाऱ्या ब्रह्मवृंदांची उपासमार होऊ नये म्हणून पाण्यांत न शिजविलेले पदार्थ-त्यालाच निर्लेपाचे पदार्थ असें म्हणतात-स्नानापूर्वी खाण्याची मुभा शास्त्रानें त्यांना ठेविली आहे. याचा अर्थ असा नव्हें कीं अब्राह्मणजातीच्या घरचे निर्लेपाचे पदार्थ ब्राह्मणानें खुशाल खावेत. आतां परजातीच्या हातचे निर्लेपाचे पदार्थ खाणें निषिद्ध नाहीं असें जें पांगारकरांचे मत आहे तें खरें आहे, असें जरी धरलें तरी फराळ म्हणजे निर्लेपाचे पदार्थ हें पांगारकरांस कसें वाटलें हें मोठेंच नवल आहे. कारण ब्राह्मणजातीत संध्याकाळच्या जेवणाला सर्वत्र फराळ हाच शब्द लावतात. हे सर्वश्रुत आहे. असे असताना पांगारकरांना फराळ या शब्दाचा गूढ अर्थ कळला नाहीं हें असंभवनीय आहे. फराळ शब्दाच्या गूढ अर्थांकडे त्यांनीं लक्ष दिलें असतें तर त्यांना ही चूक टाळतां आली असती. असो न जावें पण गेले! आता गेल्यावर तरी आपणांपुढें पात्रावर काय वाढलें आहे हें पाहून मग ग्रहण करावयाचें होतें. जेवणांत वरणभात, श्रीखंड, पुऱ्या, इत्यादिं पदार्थ वाढले होते असें रा. जोशी यांनी आपल्या पत्रांत जाहीर केलें आहे. अर्थात् आपली फसवणूक झाली असें पांगारकर जर म्हणतात तर निर्लेपाच्या पदार्थाऐवजी दुसरेच पदार्थ पात्रांत आलेले पाहून पांगारकर पंक्तीतून उठून जावयाचे होते. तसें जर त्यांनीं केलें असतें तर त्यांना प्रायश्चित्त घेण्याची पाळी आली नसती व त्यांचा प्रामाणिकपणाहि व्यक्त झाला असता. पण कायस्थाच्या घरीं गेल्यावर पात्रावर वरणभात आला असतां जो ब्राह्मण गृहस्थ यथेच्छ भुरके मारतो त्यानें, तुम्ही असें कां केलें ? अशी पृच्छा केली असतां आपली फसगत झाली असें म्हणतो, त्याच्या

सोदेगिरीला सीमा राहिली नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. एक तर पांगारकरांनी वाकसकरांकडे जेवावयास जावयाचे नव्हतें, व गेलेच तर ते निभवून दाखवावयाचें होतें. पण नीतिमत्तेचा मक्ता घेतलेल्या या ब्राह्मणांना अप्रामाणिक युक्तिवाद करण्याची इतकी घाणेरडी संवय जडलेली असतें कीं, आम्हाला केव्हां केव्हां त्याचा मोठा किळस येतो. हा सर्व प्रकार वाचून आमची अशी समजूत झाली आहे की, रा. पांगारकर व वाकसकर यांचा मोठा घरोबा असावा ; व पांगारकरांनी वाकसकराकडे जेवल्याचे यापूर्वी अनेक प्रसंग येऊन गेलेले असावेत. रा. जोशी यांनी जर ही जेवणाची बातमी फोडली नसती तर या स्वारीनें ज्याप्रमाणे यापूर्वी वाकसकरांचे अन्न खावून साफ पचवून टाकलें तसें या प्रसंगीहि केलें असतें, व प्रायश्चित्ताचा प्रसंग टाळला असता. पण जोशांनी रमजान महिन्यांतील फकिराप्रमाणे पांगारकरांची गत करून सोडली. तेव्हां "मैं करता हूं, ओ खुदा देखता हैं" असें प्रत्यक्ष सिद्ध झाल्यावर या स्वारीला शेण खाण्याशिवाय गत्यंतर उरलें नाही. एरवी प्रायाश्चित्ताची त्यांना फारशी दिक्कत होती असे दिसत नाही.

रा. पांगारकरांवर जो प्रसंग आला तो आत्मिक बल व मनोधैर्य नसल्यामुळे आला. पुष्कळच थोड्या ब्राह्मण लोकांत मनोधैर्य असतें. तेव्हा तें रा. पांगारकरांत नसलें तर त्यांत त्यांचा विशेष दोष आहे असें म्हणवत नाही. यास्तव पुण्याच्या कांही ब्राह्मण लोकांनी एक नवें उपहार गृह उघडण्याचें जें मनोधैर्य दाखविलें आहे, ते पाहून आम्हास आनंद वाटल्याखेरीज राहत नाहीं. या उपहारगृहासंबंधी माहिती देतांना ता. ७ जून १९२७ च्या मुंबईच्या टाईम्स पत्राच्या पुण्याच्या बातमीदारानें असें कळविलें आहे कीं, या भावी उपहारगृहांत बकऱ्या कोंबड्यांचे मांस व अंडी वगैरे पदार्थ विक्रीस ठेवण्यांत येणार आहेत. हें नवें उपहारगृह काढण्याचा हेतू या बातमीदाराच्या माहितीप्रमाणे असा आहे कीं, ब्राह्मण जातींतील रोग्यांस डॉक्टरकडून कोंबड्या बकऱ्यांच्या मांसाचे खाद्य नियोजित केलें जातें, तेव्हां घरच्या भानगडींमुळे रोग्यांची मोठीच हरकत होऊन रोगी दगावण्याचा मोठा संभव असतो. ही हरकत पार पडावी म्हणून हें नवें उपहारगृह उघडण्यांत येणार आहे. या बातमीदारानें असेंहि कळविले आहे कीं, सदरहू उपहारगृहास चांगला आश्रय मिळाल्यास त्यांत पुढें उत्तम प्रकारची दारूहि विक्रीस ठेवण्यांत येणार आहे. ज्या ब्राह्मण गृहस्थांनी ही योजना रूजूं घातली आहे, त्यांचा हा उद्योग स्तुत्य आहे असें आम्हांस वाटतें. एक तर ब्राह्मण जात अगदींच छोटी. त्यांत ती म्हणजे हिंदु धर्माचा प्राण. ती जर एखाद्या साथींत सांपडली आणि मासाहारानें जगेल असे डॉक्टरनें सांगितले तर कोणीहि कोंबडें-बकरेंच काय पण आपला रेडा मारूनहि ब्राह्मण रोग्याचा जीव जगवील. परंतु अब्राह्मणाच्या हातचें ब्राह्मण जातीस खातां येत नसल्यामुळे त्या जातींना या बाबतीत ब्राह्मण जातीची सेवा करण्याचा लाभ घेतां येत नाही. ही

ब्राह्मण-अब्राह्मण या उभय पक्षांच्या दृष्टींने मोठी खेदाची गोष्ट होती. अशा परिस्थितींत कांही ब्राह्मण लोकांनींच हें काम अंगावर घेऊन ब्राह्मण रोग्यास दीर्घायु करण्याचें हें जें देशकार्य आरंभिले आहें, त्याबद्दल सारी अब्राह्मण जनता त्यांची सदैव ऋणीच राहील. पण दुसऱ्याहि एका दृष्टीनें हा उद्योग स्तुत्य आंहे असें आम्हांस वाटतें. समाजाच्या अस्तित्वासाठी समाजबंधने जरी आवश्यक असलीं, तरी व्यक्तीच्या परिपोषाला अशी बंधने बाधक होतात. जोंपर्यंत समाजाचे मत आणि व्यक्तींचे मत यांत एकतानता असते. तोंपर्यंत लढा उत्पन्न होत नाही. परंतु जेव्हां समाजाच्या मतांत आणि व्यक्तीच्या मनांत भिन्नता दिसून येते तेव्हां ओढाताण सुरू होते, आणि व्यक्तीला जरूर तें स्वातंत्र्य जर प्राप्त झालें नाही तर त्याचे नैतिक परिणाम उभयतांवर सारखेच अनिष्ट होतात. त्यांतल्या त्यांत सामाजिक बंधनानें व्यक्तीचा कोंडमारा झाला म्हणजे ज्या गोष्टी मनापासून कराव्याशा वाटतात, परंतु त्या समाज उघडपणें करू देत नाहीं, त्याच गोष्टी मनुष्य छपवून करावयास लागतो. अशा प्रकारची संवय माणसांस एकदां जडली म्हणजे तो सहजच दांभिक वृत्तीचा, दुहेरी वर्तनाचा, असत्य बोलणारा, अप्रामाणिक मनुष्य बनतो. ब्राह्मण समाजाची बंधनें विशेष कडकडीत असल्यामुळें अशा प्रकारच्या लोकांची पैदास त्या समाजांत विशेष प्रमाणांत होते. वरून शाकाहार करणारे पण चोरून दररोज मांसाहार करणारे पापी लोक ब्राह्मणवर्गात असंख्य सांपडतील. या उपहारगृहानें अशा लोकांची संख्या कमी होण्यास मदत होईल म्हणून त्याच्या चालकांचे आभार मानणें इष्ट आहे.



आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ४५

# ब्राह्मणबंधुंनी परकीयांचें नाही तर नाहीं पण स्वकीयांचे तरी ऐकावे

चोरटा व्यवहार करण्याची संवय येवढाच दोष आजच्या ब्राह्मणवर्गात आहे असें मात्र कोणी समजूं नये. व ज्यांनी श्री. सरलादेवी चौधराणी यांनी दक्षिण हैदराबाद येथें भरलेल्या सहाव्या सामाजिक परीषदेच्या अध्यक्षपदावरून जें मोकळ्या मनानें भाषण केलें तें वाचून तर कोणासच तसें वाटणार नाहीं. श्री. सरलादेवी चौधराणी यांनी आपल्या भाषणांत असें सांगितले की, "मी ब्राह्मण कुलांत जन्म घेतला म्हणून माझ्या वाडवडलांना दोष देणें जरी मला उचित नसलें तरी सध्याच्या हिंदु समाजाला लागलेली उतरती कळा पाहिली म्हणजे समाजाची काळजी वाहून समाजसुधारणा करण्याचें आपलें कर्तव्य पाळण्यास ब्राह्मण विसरले याबद्दल मात्र सर्व ब्राह्मणांना दोष दिल्याशिवाय मी राहणार नाही ...... प्रचलित ब्राह्मण जातीतील स्त्री पुरुषांस शारीरिक स्वच्छता किंवा बुद्धीचा विकास यातच ब्राह्मण्य आहे अशी जी खोटी शिकवण दिली जाते, तिच्या ऐवजी ब्राह्मण्य म्हणजे अस्वच्छाला प्रेमेंकरून जवळ करण्याची सदयता, अपवित्राला पवित्र करण्याची उत्कंठा, असंस्कृताला सुसंस्कृत करून त्याला मनानें, बुद्धींने आपलेसारखा करण्याचा उद्योग अशी शिकवण देणें अवश्य आहे. समाजात चालना देण्याचें जें ब्राह्मणांचे कर्तव्य तें ब्राह्मण वर्गाच्या हातून होत नाही. हिंदुस्थानांतील मुळच्या रहिवाशांवर आर्य संस्कृतीचें आवरण घालून ज्या अगस्ति ऋषीने त्यांना आर्य बनविले त्या अगस्तीचा शुद्धीकरणाचा धडा गिरविण्यास ब्राह्मण लोक विसरले आहेत. आपला अवतार कशाकरतां आहे याची ब्राह्मणवर्गास अजीबाद भुल पडली आहे. इतकी की, बहुजन समाजात ज्ञानप्रसार करून त्यास सुशिक्षित करणें हा त्यांचा मुख्य धर्म असतां जे कोणी ब्राह्मण खालच्या वर्गाशी मिळून मिसळून वागतात त्यांची धर्मकार्ये करतात व त्यांना शिक्षण देण्याचा प्रयत्न करतात त्यांच्यावर ब्राह्मणवर्गाकडून बहिष्कार घालण्यांत येतो व त्यांचा अन्य तऱ्हेनें छळ होतो ! हा ब्राह्मणवर्गाच्या इतिकर्तव्यतेंत केवढा मोठा विपरीत फरक घडून आला आहे ! खरें म्हटले असतां एकाद्या ब्राह्मणानें जर बहुजन समाजातील एकाद्या व्यक्तीस अगर वर्गास शिक्षण देण्याचें अगर त्यांचें धर्मकार्य करण्याचें नाकारलें तर तो अधर्मी म्हणून त्याला दोषी ठरविणें योग्य होईल. अरेरे ! आज

ब्राह्मणांचा जितका अध:पात झाला आहे तितका अध:पात एकाद्या अंत्यजाचा देखील झालेला नाही. शहाणपणा, दुरदर्शीपणा, निष्काम कर्म, इत्यादि गुणास ब्राह्मणवर्ग इतका पारखा झाला आहे कीं सामाजिक सुधारणा घडवून आणणाऱ्या लोकांनीं प्रथमतः ब्राह्मण जातीची सुधारणा करण्याकरितां एक मंडळ प्रस्थापित करणें अत्यावश्यक आहे. ब्राह्मण जातीची अधोगति इतकी झाली आहे. कीं त्यांचें पुनर्जीवन करण्याची जितकी जरूरी आहे तितकी जरूरी इतर कोणत्याहि जातीस नाहीं असें म्हणणें सर्वस्वी यथार्थ होईल. हिंदु समाजाच्या सारेगम स्वरामधल्या 'सा' ची जागा ब्राह्मण वर्गाची आहे. ही 'सा' ची किल्ली जर बिघडली तर सारा रागच बिघेडल हें उघड आहे. ह्या किल्लीचा सूर आधीं ताळ्यावर आणला पाहिजे व तो आणण्यास ब्राह्मणवर्गास त्याची अधोगतीची व कर्तव्याची जाणीव करून दिली पाहिजे. ज्याची दृष्टी व्यापक आहे, ज्याच्या मनांत समाजांतील सर्व व्यक्तींविषयीं सारखें प्रेम नांदत आहे आणि ज्याच्या धर्मशास्त्रांत सर्वांच्या उन्नतीला सारखा वाव ठेवण्यांत आला आहे असाच माणूस धर्माधिकारी होण्यास पात्र आहे. ब्राह्मणपद हें जन्मप्राप्त आहे, तें जन्माव्यतिरिक्त कोणास प्राप्त होऊं नये हा निर्बंध दूर करणे अवश्य आहे. ब्राह्मणपद हें तपाचें फळ आहे, हा पुरातन कालचा नियमच पुन्हां अमलांत आणणें अवश्य आहे. ब्राह्मण आईबापांच्या पोटीं जन्मला व जो अब्राह्मणांचे धंदे करतो तो जरी ब्राह्मण म्हणाला तरी त्याची ब्राह्मणेतरांत गणना झाली पाहिजे. धनाचा लोभ सोडून परोपकारार्थ देह झिजविणें हा ब्राह्मणांचा खरा धर्म आहे. परंतु तो धर्म सोडून जो ब्राह्मण धनाचा अगर मदाचा उपासक झाला असेल त्या ब्राह्मणानें आपलें ब्राह्मणपद सोडून ब्राह्मणधर्म आचरणाऱ्या वैश्याला अगर शुद्राला तें मोकळे करून दिलें पाहिजे. चालू मन्वंतरांत धंद्यांच्या आधारावर समाजाचें वर्गीकरण करणें अवश्य आहे व ज्यांची वृत्ति समाजसेवेची आहे अशाच लोकांना ब्राह्मण हें नामाभिधान देऊन बाकींच्यापासून तें हिसकावून घेतलें पाहिजे.'' आम्ही आज इतके दिवस ब्राह्मणवर्गासंबंधी जें लिहित होतो तें श्री. सरलादेवी यांनी इतक्या उत्तम तऱ्हेनें आणि स्पष्ट शब्दांत सांगितले याबद्दल आम्हांस आनंद वाटतो. आमच्या ब्राह्मणबंधूस परकीयांचे नाहीं तर नाहीं पण स्वकीयांचे तरी ऐका येवढेंच आम्ही सांगतों.



आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ४६

# संकुचित ध्येय स्त्रीवर्गापुढें ठेवणें अनुदारपणाचे द्योतक

हिंदु लोकांत स्त्री म्हणजे एक पुरुषाच्या चैनीची वस्तु आहे असा सर्वसाधारण समज आहे. आणि पुरुषांच्या इच्छेनुसार स्त्रियांनी वागावें अशी सर्वांची समजूत असते. स्त्री म्हणजे चैनीची वस्तु समजली गेल्यामुळें तिच्या शरीराला वस्त्रप्रावरणांनीं व दागदागिन्यांनी शृंगारण्यांत बऱ्याच धनाचा व प्रेमाचा व्यय होतो हें खरें. तथापि माणूस समजून तिला कोणत्याच प्रकारचे हक्क हिंदु धर्मांत देण्यांत आलेले नाहींत. जड जिवाची जोपासना करण्यास संपत्तीचा वारसा तिला नाहीं तो नाहींच. पण शिक्षण घेऊन मन सुसंस्कृत करण्याचा अधिकारहि तिला नाहीं. आमच्या शास्त्रांत गाईला आत्मा आहे असें सांगून ख्रिस्ती लोकांना लाजवूं पाहाणारें हिंदु लोक स्त्रीला आत्मा आहे असें जरी मानीत असले तरी कृतीनें तसें दाखवित नव्हते हें खरे. आतां कोठें त्यांना हें उमगत आहे, परंतु त्यांतहि त्यांचें ध्येय मोठेंसें उच्च नाहीं. स्त्रियांनी गृहलक्ष्मी तेवढें व्हावें ! त्याच्या पुढें स्त्रियांच्या प्रगतीची मजल जाऊं नये ! ही मर्यादा अबला-उन्नति प्रीत्यर्थ झटणाऱ्या बऱ्याच सुधारकांनी आपल्यापुढें ठेविल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. आमच्या मतें अशा प्रकारचें संकुचित ध्येय स्त्रीवर्गापुढें ठेवणें अनुदारपणाचें द्योतक आहे. दरेक व्यक्तिमात्राला पूर्णावस्थेस जाण्यास समाजानें अवसर दिला पाहिजे हें तत्त्व जर एकदां मान्य झालें तर मग स्त्रियांच्यापुढें असलें हलकें ध्येय ठेवण्यांत यावें याचें आम्हांस नवल वाटतें. एका इंग्लिश तत्त्ववेत्त्यानें असें सांगितले आहे कीं, ध्येयप्राप्ति न होणें हा कांही गुन्हा नाहीं ; पण कमी प्रतीचें ध्येय डोळ्यापुढें ठेवणें हा मात्र मोठाच गुन्हा आहे. या न्यायानें पाहतां सर शंकर नायर यांनीं ता. १७ जून रोजी पुणें येथील हिंदी महिलापीठाच्या पदवीदानसमारंभाचे वेळीं विद्यार्थीनींना जे चार उपदेशाचे शब्द सांगितले ते फार महत्त्वाचे होते. सर शंकर नायर यांच्या उपदेशांतील महत्त्वाचा भाग म्हणजे आपल्या हिंदी स्त्रियांनी देखील त्यांच्या अमेरिकन, चिनी, टर्की, रशियन वगैरे भगिनींप्रमाणे स्वातंत्र्याविषयीं चळवळ करून पुरुषांच्या बरोबरीचे हक्क मिळवावे हा होता. उपरिनिर्दिष्ट देशांतील स्त्रीपुरुषांमध्ये ज्या भांडाभांडी सध्या चालू आहेत, त्यांचा आधार देऊन, तिकडील स्त्रियांचा आदर्श जशाचा तसा आपल्या स्त्रियांच्या पुढें ठेवणें अविचारांचे

होईल असें कांही विचारी माणसांस वाटणें शक्य आहे. कारण त्यांच्या मतें नोकऱ्यांमध्यें, धंद्यांमध्यें तिकडील स्त्रीपुरुषांत जी सध्या स्पर्धा चालूं आहे तिचे अनिष्ट परिणाम आपण ढळढळित पाहात असतां तशा प्रकारच्या चळवळी इकडे सुरू करा म्हणणें इष्ट नाहीं. या त्यांच्या म्हणण्यांत कांहीं तथ्यांश आहे असें आम्हांस वाटत नाही. पुरुषांपुरुषांत सर्वत्र स्पर्धा चालू आहे. तशी ती हिंदुस्तानांतहि चालू आहे. अशी स्पर्धा चालू नये म्हणून तर वर्णाश्रम धर्माची कल्पना अस्तित्वांत आली, अशी आमची ठाम समजूत आहे. ब्राह्मणाच्या पदाची अभिलाषा धरून क्षत्रियांनीं त्यांच्यावर मात करूं नये, क्षत्रिय होण्याची महत्वाकांक्षा धरून वैश्यांनीं व शूद्रांनीं त्यांच्याशीं झगडा करूं नये, व अतिशूद्रांनीं तर देतील त्यावर आपलें कार्य भागवावें, एकमेकांच्या पदाला एकमेकांकडून ढका लागूं नये व ज्याचे त्याचें पद अचल व अढळ रहावें हाच वर्णाश्रम धर्मांचा मुख्य हेतु आंहे. पण आजकाल विशिष्ट जातीची विशिष्ट प्रकारची मक्तेगिरी लयास जाऊन ब्राह्मण लोक हाडें नाहींतर जोडे विकण्याचा धंदा राजरोसपणें करून सर्वात खालचे असे जे अतिशुद्र त्यांच्यांशी स्पर्धा करीत आहेत. क्षत्रिय लोक आपली मर्यादा सोडून पुरोहितपणा आपणांस प्राप्त व्हावा म्हणून ब्राह्मणांशीं हेवा देवा करीत आहेत. तसेंच अतिशूद्र लोकहि धर्मानें घालून दिलेली मर्यादा उल्लंघून प्रोफेसरी, डॉक्टरी, वकीली वगैरे करून त्रैवर्णिकांच्या तोंडचा घांस आपल्याकडे ओढून घेत आहेत. पुरुषापुरुषांत हा लढा चालला असतां व कांहीं ठिकाणीं तो विकोपासहि गेला असतां तो थांबवा व एकमेकांना एकमेकांची बरोबरी करूं नका असा उपदेश केल्याचें आमच्या कानांवर नाहीं. हा लढा जर चालतो व त्यापासून अनिष्ट परिणाम होण्याचें कोणासही भय वाटत नाहीं तर त्या लढ्यांत स्त्रियांचा असा एक नवा प्रतिपक्ष उभा राहिला तर राष्ट्र रसातळास जाईल असे कां वाटावें कोण जाणें. अशा लढ्यांतून योग्य माणूस स्त्री अगर पुरूष योग्य जागीं येऊन राष्ट्राचा अभ्युदय होईल हेंच खरें आहे. सर शंकर यांनी स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा सांगितला, तो असा कीं, युरोप, अमेरिका, रशिया, चीन, इत्यादि देशांत स्त्रियांसाठीं निराळीं विद्यापीठे, शाळा व कॉलेजें कमी होऊं लागलीं आहेत तेव्हां हिंदुस्थानातहि स्त्रियांच्या शिक्षणासाठीं निराळ्या शाळा, निराळीं कॉलेजें नकोत. स्त्रियांचे शिक्षण पुरूषांच्या बरोबर एकत्र असलें पाहिजे. स्त्रियांचें व पुरुषांचें शिक्षण एकत्र होऊं नये याला आधार देतांना पुराणमतवादी लोक असें सांगतात कीं, स्त्रियांचा विनय आणि पुरुषांची

नीतिमत्ता शाबूत राखण्यासाठीं वयाच्या ७ वर्षांनंतर त्यांना वेगवेगळें शिक्षण देण्यांत यावें. ७ व्या वर्षांनंतर शारीरिक व मानसिक स्थितीमध्यें पालट होऊं लागतो, म्हणून अशा वेळीं मुलामुलींना वेगळें ठेवणें अवश्य आहे. वेगवेगळे ठेवून नीतिमत्तेचा परिपोष करण्याचा हा प्रकार आम्हास तरी मोठा विलक्षण दिसतो. एखाद्या तरुणास निर्जन वनांत, हिमालयासारख्या पर्वताच्या आसमंतात जर डांबून ठेविलें तर तो आजन्म ब्रह्मचारी राहील याबद्दल कांहीं वानवा नाहीं. त्याचप्रमाणे एखाद्या नवयौवन स्त्रीस तुरुंगाच्या आंत कोंडून ठेविलें व तिला कोणाचा संसर्ग होऊ दिला नाहीं, तर ती देखील आजन्म साध्वी होऊं शकेल. पण अशांच्या नीतिमत्तेची कवडी इतकीहि किंमत आहे, असें आम्हास वाटत नाहीं. स्त्रियांच्या सहवासांत राहून जो पुरुष आपलें मन ताब्यांत ठेवूं शकतो व पुरुषांच्या सहवासांत राहून जी स्त्री आपलें पाऊल वांकडे पडणार नाहीं अशी खबरदारी घेऊं शकते, त्यांनाच आमच्या मतें नीतिमान् म्हणतां येईल. आतां वेगळें ठेवण्यानें जर नीतिमत्तेचा परिपोष होतो, हें जर खरें असेल, तर त्यांचें प्रत्यंतर मुसलमान पुरुषांच्या वर्तनात आपणांस दिसलें पाहिजे. कारण मुसलमान समाजात स्त्रीपुरुषांमध्ये गोषापद्धतीमुळें स्नेहभावाचें पाणी इतकें दुभंग झालें आहे की, आईला मुलाचें व बहिणीला भावाचें तोंड पहाणें अशक्य जातें. परंतु वास्तविक प्रकार किती उलट आहे हें कोणास सांगावयास नको. हिंदू लोकापेक्षां मुसलमान लोकांत स्त्रियांविषयीं अगदी हलक्या प्रतीच्या मनोभावना वास करीत असतात, ही गोष्ट सर्वांच्याच अनुभवाची आहे. आतां मुसलमान लोकांतच स्त्रियांविषयी अनुदार बुद्धि विशेष प्रमाणांत जागृत असावी व हिंदूंत ती नसावी याचें कारण शोधून पाहिलें असतां असें दिसून येईल की मुसलमान लोकांत हिंदूइतका स्त्रीपुरुषांचा मिलाफही नाहीं. तसा जर होता तर त्यांच्यांत असल्या हलक्या प्रतीच्या भावना जागृत होत्याच ना. परंतु ही गोष्ट अंगी बाणावयास उभयपक्षांचा सहवास होणें अत्यंत जरूर आहे. जेथें जेथें अशा प्रकारचा सहवास घडत नाही तेथें तेथें स्त्रियांविषयी पुरूषांच्या मनांत अनुदार भावना जागृत असणें अगदी सहाजिक आहे. कारण जी गोष्ट दुर्मिळ, दुष्प्राप्य व दु:साध्य असते ती आपल्या झपाट्यांत आल्याबरोबर तिच्यावर चवताळून जाणे हा मनाचा धर्म आहे. त्याविरुद्ध क्वचितच कोणास जातां येईल. उलट तीच गोष्ट नेहमींच्या परिचयाची असेल तर ती आपल्या सांनिध्यांत जरी आली तरी तिच्याबद्दल मन विशेषसें अधीर होत नाहीं. स्त्रीपुरुषांची नीतिमत्ता जर

वाढवावयाची असेल तर त्यांचा सहवास जितका जास्त होईल तितका अवश्य घडवून आणला पाहिजे. पृथक् पृथक् ठेवल्यानें अनीतीचा अग्नी शांत न होतां जास्त भडकणार आहे, हें कोणीहि विसरूं नये. अशा दृष्टीनें पहातां सर शंकर नायर यांनीं एकत्र शिक्षणाचा जो उपदेश केला तो नीतिमत्तेला पोषकच आहे, असें म्हणणे प्राप्त आहे.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ४७

# स्वाभिमान म्हणजे परापमान नव्हे

गेल्या अंकांत आम्ही मुंबई येथें फणसवाडींत नवीन स्थापन झालेल्या प्रतिवादी भयंकर मठ नांवाच्या देवळांत कसे गेलों याची सविस्तर हकीकत दिली होती. आतां केसरीच्या गेल्या दोन अंकांत या मठाकडून त्या बाबतींत खुलासा प्रसिद्ध झाला आहे. त्यांत मठाधिपतींनीं आपण आंबेडकरांना बोलावलेंच नाहीं असें खोटेच जाहीर केलें नाहीं, हे आम्ही आपलें नशीब समजतों. भेटीस या म्हणून आपण कळविलें होतें हें त्यांनी प्रांजलपणें कबूल केलें ही त्यांची थोरवी म्हणावयाची. आतां "टेलिफोन मधून आम्ही कोणासहि या असें कळविलें नव्हतें" असें जें मठाधिपतीनें जाहिर केलें आहे त्यांत मठाधिपतीनें स्वतः या, असा टेलिफोन केला नाहीं, असें म्हणण्याचा हेतू असेल, तर तें खरें आहे. ज्या गृहस्थानें आमचा कार्ड नेला, त्यांनेंच आम्हाला टेलिफोन केला हेंच आमचें म्हणणें आहे. मठाधिपतीनें केला असें आम्ही केव्हांच म्हणालों नव्हतों. मठाधिपतीनें आपण टेलिफोन केला नाहीं असें जें लिहिलें तें केवळ कर्मठ लोक आपल्यावर उदारपणाचा आरोप करतील या भयास्तव लिहिलें आहे तेव्हां त्यांत विशेष महत्त्व नाहीं. महत्व मात्र दोन गोष्टींना आहे. आंबेडकर अस्पृश्य आहेत हें मागाहून कळलें ; तें अगोदर कळलें असतें तर त्यांना परवानगी देण्यांत आली नसती असे मठाधिपतीचें म्हणणें आहे. यावर मठाधिपतींना आमचा असा प्रश्न आहे कीं. अस्पृश्यांना देवळांत प्रवेश होऊं दिल्यानें जर देऊळ बाटते तर कोणता माणूस अस्पृश्य आहे व कोणता नाहीं हें आगाऊ ओळखण्याचे कांहीतरी अचूक साधन शोधून काढणें धर्मसंरक्षणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. कारण एकादा अस्पृश्य माणूस आपण अस्पृश्य आहोंत असें सांगावयास कबूल झाला नाहीं किंवा तो अस्पृश्य आहे याचें बिंग कोणा उपद्व्यापी ब्राह्मण्यग्रस्तानें जर फोडलें नाहीं तर तो खुशाल देवळांत रिता शिरून देवाला भेटूनच काय पण स्वामीच्या उरावर लाथ मारूनहि भरला बाहेर निघेल व देऊळ बाटलें असें स्वामीस कळूनहि येणार नाहीं. असले प्रकार हजारों घडत असतील ; व दुसरीकडे जें एक पत्र † छापलें आहे त्यावरून असें घडत असावें असें दिसतें. नकळत आलेला अस्पृश्य देऊळ भ्रष्ट करीत नाहीं, पण सांगून सवरून आलेला अस्पृश्य मात्र भ्रष्टाकारास

---

† पाहा, परिशिष्ट-१८.

कारणीभूत होऊं शकतो ही विचारसरणी तर आम्हाला अगदींच नादानपणाची दिसते. धर्म खरोखरींच जर पाळावयाचा असेल तर मग अस्पृश्य कोणत्याहि स्वरूपात आत न येईल अशी व्यवस्था मठाधिपतीनीं अवश्य करून घ्यावयास पाहिजे. मागें पेशवाईंत अस्पृश्य कोण हें ताबडतोब ओळखतां यावें म्हणून अस्पृश्यांच्या गळ्यांत काळा दोरा बांधण्याची सक्ती करण्यांत येत असे. हें काळें जानवें अस्पृश्यांच्या गळ्यांत पुन्हा अडकविण्यास इंग्रज सरकारकडून सक्ती करण्यांत यावी असा जर विनंति अर्ज मठाधिपतीने केला व त्यांत यश आलें तर त्यांना अस्पृश्यांच्या अतिक्रमणापासून हिंदुधर्माचें संरक्षण केल्याचें पुण्य लाभेल आणि अखिल हिंदु जनता त्यांना दुवा देईल. वारंवार देऊळ धूत बसण्याचा बायकीपणा करण्यापेक्षां अशाप्रकारें कायमचा कांटा काढणें हेंच खऱ्या मुत्सुद्देगिरीचें व पुरुषपणाचें लक्षण आहे असें आम्हास वाटतें. तरी मठाधिपतीनें इकडे अवश्य लक्ष द्यावें. दुसरें असें कीं आंबेडकरांच्या प्रवेशानें भ्रष्ट झालेलें देऊळ आपण शुद्ध केलें आहे, असा शंखनाद मठाधिपतीनें चालविला आहे. सनातनधर्मी लोकांची समजूत करण्याच्या इराद्यानें देवळाचें शुद्धीकरण झालें हें योग्यच आहे असें मठाधिपतीस वाटणें साहजीक आहे. परंतु या शुद्धीकरणाचा अस्पृश्य जनतेच्या मनावर काय परिणाम होईल याचा विचार मठाधिपतींने केला असावा असें दिसत नाहीं. हिंदु समाज हा वर्णाश्रमी समाज आहे. या वर्णाश्रमाच्या योगें खोट्या वर्णाविमानाचें प्रस्थ जिकडे तिकडें माजलेलें आपल्या दृष्टीस पडतें. आपण कितीहि मूर्ख असलों तरी श्रेष्ठवर्णांतील कोणालाच त्याचें कांहीं वाटत नाहीं; व मूर्खाचें शहाणे होण्याचा देखील कोणी विशेषसा प्रयत्न करीत नाही. जन्मामुळें ज्यांचें जातिविशिष्ट श्रेष्ठत्व मानलें जात आहे त्यांनीं तरी गुण अगर कर्मविशिष्ट खरें खुरें श्रेष्ठत्व संपादन करण्याची यातायात कां करावी ? उलट कनिष्ठ वर्णाचे जे लोक आहेत त्यांच्या मध्यें मात्र जागृति झाल्या दिवसापासून गुण अगर कर्मविशिष्ट खरें खुरें श्रेष्ठत्व संपादन करण्याचे प्रयत्न जारीनें चालू आहेत. अस्पृश्य वर्ग अशा जागृत अवस्थेत आला असतांना वर्णाभिमान्यांनीं त्यांची मनें न दुखवतील अशा बेतानें आपल्या वर्णाभिमानाला योग्य ती मर्यादा घालणें अवश्य आहे. कोणीहि आपला स्वाभिमान, कुलाभिमान, जात्यभिमान हवा तर धरावा. पण स्वाभिमान म्हणजे परापमान नव्हे ही गोष्ट क्षणभरहि विसरूं नये. आपण जातीनें अलग आहोंत असें कोणी हवें त्यानें समजावें. पण इतर जातीपेक्षां आपण श्रेष्ठ आहोंत असे समजून आपला श्रेष्ठपणा इतर जातीस भासवून त्यांचीं मनें दुखवूं नयेत. नाहींतर दुखावलेला सर्प जसा दंश करण्यास विसरत नाहीं तसा दुखावलेला माणूस सूड घेण्यास विसरणार नाही. देवळाची शुद्धी करून मठाधिपतीनें सर्व अस्पृश्य जनतेचा

भयंकर अपमान करून त्यांची मनें क्षुब्ध केली आहेत. पदोपदी अपमान झाल्याचा काय परिणाम होतो हे आम्हीं सांगण्याचें कारण नाहीं. आज जे लोक राजकारणांत जहाल आहेत ते जहाल होण्याचें कारण पूर्वी कधी कोणा युरोपियनानें त्यांचा अपमान केला असावा हेंच होय. याची साक्ष आमच्याशिवाय दुसरे पुष्कळहि देऊं शकतील. युरोपियन गृहस्थानें स्पृश्य गृहस्थाचा अपमान केला तर तो जहाल होतो. असे म्हणणारांनी जर स्पृश्यानें अस्पृश्याचा अपमान केला तर तो पाया पडेल असें मानून आपली भूल करून घेऊ नये. अशा अपमानानें स्पृश्य अस्पृश्यांत मारामारी, खुनाखुनी झाली नाही तर मिळविली असेंच म्हणावें लागेल.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ४८

## बिचाऱ्या बावळट जाती ब्राह्मण्याच्या उपासक असल्यामुळें खुळया धर्मसमजुतीनें आपल्या अर्थास आंचवल्या

मागे एकदां नागपुरांत कॉलेजांत शिकत असलेल्या एका महार विद्यार्थ्याने कॉलेजमध्यें येऊन प्रिन्सिपाल जवळ घरीं जाण्यास रजा मागितली ; व सांगितलें कीं ब्राह्मणांशीं आमचें भांडण झालें आहे. एकाद्या ब्राह्मणाचा जरी खून करूं शकलों तरी माझ्या जन्माचें सार्थक झालें असें मी समजेन. दुखावलेला अस्पृश्य तरुण कोणत्या थराला जातो याचा हा दाखला आहे. त्यांतल्या त्यांत दुखावलेला तरुण अस्पृश्य जर सुशिक्षित असला तर त्याच्या मनांत काय येतें हें वरील उदाहरणावरून सिद्ध होत आहे. लाहोर येथील एका चांभार जातीच्या मुलाचा अशाच प्रकारचा अपमान झाला व त्याच्याहि मनांत वरील महार विद्यार्थ्यांच्या मनांत आलेले विचार आले असल्यास नवल नाहीं. पण त्याच्या क्रोधाग्नीवर लवकरच सामदंडाचें पाणी पडल्यामुळें तो शांत झाला ही आनंदाची गोष्ट आहे. हा चांभार विद्यार्थी गेल्या जून महिन्यांत मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाला व पुढील अभ्यासाकरिता लाहोर येथील दयानंद कॉलेजांत त्यानें आपलें नांव दाखल केलें. काहीं कारणामुळें सदरहु कॉलेजला जोडून असलेल्या विद्यार्थ्रीवसतिगृहांत त्याला राहणें भाग झालें. परंतु सदरहु वसतिगृहांतील शंभर स्वयंपाक्यांनी चांभार मुलास आपण वाढणार नाहीं व त्याचें उष्टें काढणार नाहीं अशी तक्रार केली. सदरहु कॉलेज आर्य समाजाचें आहे व आर्यसमाज जातिभेदजन्य उच्चनीय भाव बाळगीत नाहीं वगैरे प्रकारची शिकवणूक या बिथरलेल्या ब्राह्मण्यग्रस्त स्वयंपाक्यांना कॉलेजच्या प्रिन्सिपालनें देऊन पाहिलीं. पण कांहीं केल्या स्वयंपाक्यांच्या डोक्यांत प्रकाश पडेना. तेव्हां त्यांनीं संप केला व चांभार मुलाला काढा नाहींतर आम्हीं काम सोडून जाऊं अशी धमकी प्रिन्सिपाल साहेबांस दिली. अशा प्रकारे पवित्र्यावर आलेल्या स्वयंपाक्यांचा प्रश्न वसतिगृहाच्या कमीटीकडे सोपविण्यांत आला. व कमिटीनें स्वयंपाक्यांनाच कामावरून कमी करावें असा फैसला दिला. या निकालाबद्दल कॉलेजच्या तत्त्वनिष्ठ चालकांचें अभिनंदन करणें प्राप्त आहे. हिंदुधर्मांतील ज्या हलके धंदे करणाऱ्या कांहीं शुद्र जाती आहेत त्यांना आपल्यांतील ब्राह्मण्याची इतकी मगरूरी

असते कीं, अस्पृश्य जातींतील माणसांचा पैसा घेऊनहि काम करण्याचें त्या जाती नाकारतात. धोबी म्हणतो मी कपडे धुणार नाहीं, न्हावी म्हणतो मी हजामत करणार नाहीं, चौघडेवाला म्हणतो मी वाजवणार नाहीं ! हें कां तर पैसे देत नाहींत म्हणून नव्हें, तर अस्पृश्यांची सेवा केल्यानें आपली मानखंडना होते म्हणून ! या लोकांना मान गुणावर अवलंबून आहे जातीवर नाहीं याची शिकवण कोणी तरी, केव्हांतरी द्यावयास पाहिजे होती. ती दयानंद कॉलेजच्या व्यवस्थापकांनीं दिली हें बरें झालें. कुळाचा मिथ्याभिमान धरून गुणवानास हिणवू पाहणाऱ्या गुणहीनांना अशा प्रकारची अद्दल घडणें योग्य आहे. आम्हांस वाईट वाटतें तें इतकेंच कीं, या बिचाऱ्या बावळट जाती ब्राह्मण्याच्या उपासक असल्यामुळें खुळया धर्मसमजुतीनें आपल्या अर्थास आंचवल्या आहेत. पण या निराधार झालेल्या स्वयंपाक्याची चिंता करण्याचें कोणालाच कारण नाही. स्वार्थाची पर्वा न करितां धर्माचें रक्षण केल्यामुळें त्यांची पाठ थोपटणारे ' भालाकार ' त्यांना जन्मभर पोसणार आहेत म्हणतात !

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ४९

# . . . . . .त्यांनीं मुसलमानांचे सदैव ऋणी राहिलें पाहिजे.

खान-पाणंदीकर विवाहामुळें हिंदु मुसलमानांचें संघटण कसें सुलभ होईल या विषयीचें आमचें मत गेल्या अंकीं* आम्हीं जाहीर केलेंच आहे. जवळ जवळ सारी स्पृश्य जनता आमच्या मताच्या विरुद्ध आहे असें दिसतें. आतां हा विवाह जरी हिंदु-मुसलमानांच्या संघटणेस कारणीभूत झाला नाहीं तरी स्पृश्य-अस्पृश्यांच्या संघटणेस कारणीभूत होईल असें वाटतें. कारण या विवाहानें चिडून गेलेले स्पृश्य लोक असें म्हणूं लागले आहेत कीं " मालिनीनें महाराबरोबर विवाह केला असता तरी आम्हीं कांहीं म्हणालों नसतों. " ही भाषा हिंदुलोकांच्या तोंडांतून येणें किती अशक्य आहे हें सर्वांसच अवगत आहे. ती आली याला कारण पीर पावला हेंच होय. हिंदुलोकांतर्फे होत असलेल्या अस्पृश्योद्धारासाठीं त्यांनीं मुसलमानांचें सदैव ऋणी राहिलें पाहिजे, असें जें आम्ही म्हणतो याला आतां कोणास ना म्हणतां येईल काय ?

● ● ●

---

* पहा पृष्ठ क्र. १६५-१६८.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

५०

# आप घरीं बाटा, बाप घरींहि बाटा !

मुंबई इलाख्यांतील शिक्षणखात्याचा अहवाल जो कोणी काळजीपूर्वक वाचून पाहील व त्याचें मनन करील त्याला या इलाख्यांतील शिक्षणाच्या प्रसाराचा प्रकार पाहून आश्चर्य वाटल्या वांचून राहणार नाहीं. शिक्षणाच्या प्रसाराचा हिशोब देण्याकरितां या इलाख्यांतील प्रजेचे चार विभाग करण्यांत आले आहेत. (१) पुढारलेला वर्ग, अथवा ब्राह्मण व तत्सम जाती, (२) मध्यम वर्ग अथवा मराठा व तत्सम जाती, (३) कनिष्ठ वर्ग अथवा अस्पृश्य व तत्सम जाती, आणि (४) मुसलमान वर्ग. लोकसंख्येच्या मानानें पाहिलें तर मराठा व तत्सम जाती यांचा पहिला, अस्पृश्य व तत्सम जातींचा दुसरा, मुसलमान वर्गाचा तिसरा आणि ब्राह्मण व तत्सम जातीचा चवथा नंबर लागेल. शिक्षणप्रसाराच्या दृष्टीनेंहि असाच अनुक्रम लागावयास पाहिजे. पण खरा प्रकार अगदीं उलट आहे. मराठा व तत्सम जातींचा लोकसंख्येच्या मानानें पहिला नंबर लागतो. पण उच्च शिक्षणांत तसाच दुय्यम व प्राथमिक शिक्षणांत त्यांचा तिसरा नंबर आहे. अस्पृश्य व तत्सम जातींचा लोकसंख्येच्या मानानें दुसरा नंबर लागतो. पण उच्च शिक्षणांत तसाच दुय्यम व प्राथमिक शिक्षणांत त्यांचा नंबर चवथा म्हणजे शेवटचा आहे. मुसलमान वर्गाचा लोकसंख्येच्या मानानें तिसरा नंबर आहे. परंतु उच्च शिक्षणांत तसाच दुय्यम व प्राथमिक शिक्षणांत त्यांचा नंबर दुसरा म्हणजे मराठा व तत्सम जाती व अस्पृश्य व तत्सम जाती यांच्यावरचा आहे ! या सर्वांना कळस म्हणून समजल्या जाणाऱ्या ब्राह्मण व तत्सम जातींचा लोकसंख्येच्या मानानें चवथा म्हणजे शेवटचा नंबर लागतो. पण नवलावा हा कीं या चिमुकल्या जातींनी उच्च शिक्षणांत तसेंच दुय्यम व प्राथमिक शिक्षणांत पहिला नंबर पटकाविला आहे. या इलाख्यांतील शिक्षणप्रसाराच्या अध्यायांतील ही कथा विस्मयकारक आहेच. पण वर जी निरनिराळ्या जातींची शिक्षणांतील नंबरवारी दिली आहे तिच्यावरून एका वर्गानें दुसऱ्या वर्गास किती टांगांनीं मारलें आहे याचा बोध होणें शक्य नाहीं. तें कळण्यास दरेक वर्गांत किती अंतर पडलें

आहे याची इत्थंभूत कल्पना झाली पाहिजे. ती व्हावी म्हणून गतसालीं प्रसिद्ध झालेल्या अहवालावरून खालील आंकडे आम्ही देत आहोंत.

**प्राथमिक शिक्षण**

| वर्ग | सदर वर्गाच्या दर हजारी लोकसंख्येशीं त्या वर्गातील विद्यार्थ्यांचे प्रमाण |
|---|---|
| ब्राह्मण व तत्सम जाती .. .. .. | ११९ |
| मुसलमान .. .. .. .. | ९२ |
| मराठा व तत्सम जाती .. .. .. | ३८ |
| अस्पृश्य व तत्सम जाती .. .. .. | १८ |

**दुय्यम शिक्षण**

| वर्ग | सदर वर्गाच्या दर एक लाख लोकसंख्येशीं त्या वर्गातील विद्यार्थ्यांचे प्रमाण |
|---|---|
| ब्राह्मण व तत्सम जाती .. .. .. | ३,००० |
| मुसलमान .. .. .. .. | ५०० |
| मराठा व तत्सम जाती .. .. .. | १४० |
| अस्पृश्य व तत्सम जाती .. .. .. | १४ |

**उच्च शिक्षण**

| वर्ग | सदर वर्गाच्या दर दोन लाख लोकसंख्येशीं त्या वर्गातील विद्यार्थ्यांचे प्रमाण |
|---|---|
| ब्राह्मण व तत्सम जाती .. .. .. | १,००० |
| मुसलमान .. .. .. .. | ५२ |
| मराठा व तत्सम जाती .. .. .. | १४ |
| अस्पृश्य व तत्सम जाती .. .. .. | ० |

वरील आंकडे जे मनन करील त्याला सहज कळून येईल कीं पहिल्या व शेवटच्या वर्गांत केवढें मोठें भयंकर अंतर पडलें आहे !!! शिक्षणाच्या शर्यतींत धावणाऱ्या या घोड्यांत एवढे अंतर पडलें आहे कीं पहिल्यास शेवटचा दिसत नाहीं

व शेवटच्यास पहिला दिसत नाहीं. त्यांतल्या त्यात ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं मुसलमान लोक जे कांही थोडक्या दिवसांपूर्वी सर्वांच्या नव्हे अस्पृश्यांच्याहि पिछाडीस होते त्यांनीं आज इतकें अंतर छाटले आहे कीं नुसते मराठ्यांना व अस्पृश्यांना मागें टाकलें आहे असेंच नव्हे तर ब्राह्मणांना देखील ते गांठीत आले आहेत. तीन मागासलेल्या वर्गांपैकीं एकानें आणि तोहि गाढ निद्रेत घोरत पडत असलेल्या वर्गांने खडखडून जागे व्हावें व घोडदौड करून सर्वांस मागें टाकावें हा आश्चर्यकारक परिणाम कसा घडला हा प्रश्न विचारांत घेण्यासारखा आहे. मुसलमान लोकांच्या शिक्षणप्रगतीचें मुख्य कारण म्हणजे सरकारनें दिलेल्या विशेष सवलती हेंच होय. या सवलती मुसलमानवर्गांस देण्यात आल्यामुळे वरिष्ठ हिंदु सरकारवर नेहमी नाराज असतात. हे त्यांचे वर्तन आम्हास पसंत नाहीं. ज्या कारणाच्या आधारावर मुसलमान वर्ग आपणा-करितां विशेष सवलती सरकारजवळ मागतो तीं कारणें नादानपणाचीं असतील. आम्ही हिंदुस्थानचे देवडीवाले आहोंत, आम्हास खूष ठेवा, नाहीं तर शत्रुला आंत सोडूं, आम्ही मोगल बादशाहीचे ऐतिहासिक अवशेष आहोंत, यास्तव आमच्या म्हणण्याला सरकारनें विशेष किंमत दिली पाहिजे वगैरे आधारांवर मुसलमान लोकानीं मागण्या मागणें हें घमेंडखोरीचें लक्षण आहे. तथापि मुसलमानांना ज्या सवलती देण्यांत आल्या त्या केवळ बाजीरावानें मस्तानीवर फिदा होऊन दिलेल्या देणग्यांप्रमाणे अस्थानीं आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. या सवलतीच्या धोरणाला विरोध करणाऱ्या वर्गाचें असें म्हणणें आहे कीं, सवलती देणें हा निव्वळ पक्षपात आहे. सरकारनें सर्व प्रजेला सारखें वागवावें, आंगा जांधाचें करूं नये. हा उपदेश दिसावयाला यथार्थ दिसतो. पण सर्वच परिस्थितींत तो सारखाच हितकारक होईल असें म्हणता येणार नाहीं. एका परिस्थितींत न्याय करावयाचा झाला तर तोच उपदेश अंमलांत आणावा लागेल. पण निराळ्या परिस्थितींत तो जर लागू केला तर न्यायाच्या ऐवजीं अन्याय होईल. दोन माणसें सारखी सुदृढ असतील तर एकाला मलिदा व दुसऱ्याला कोंडा देणे केव्हांच रास्त होणार नाही. पण एक रोगी व दुसरा निरोगी असला तर निरोग्याला कोंडा व रोग्याला मलिदा हीच व्यवस्था प्रशस्त ठरेल. म्हणून आम्ही म्हणतो कीं, जेथें सर्व लोक सारख्या सपाटीवर असतील तेथें त्यांना सारख्या रीतीने वागविण्यास हरकत नाहीं. नव्हे तेंच न्याय्य होईल. पण जेथे मुळांतच लोक असमान आहेत तेथें त्यांना समानतेनें वागविणें अन्याय होणार आहे. यास्तव प्रजेतील सर्व जनांना सारख्या सपाटीवर आणणें ही जर सरकारच्या धोरणांची दिशा असेल तर जे वर्ग सपाटीच्या खालीं† असतील त्यांना विशेष सवलत देऊन वर आणणें ह्यांतच न्याय आहे. म्हणून मुसलमान

†पाहा, परिशिष्ट क्रमांक १९.

वर्गाला सरकारनें ज्या सवलती दिल्या त्याबद्दल आम्हांस विषाद वाटत नाहीं. विषाद वाटतो तो येवढ्यासाठीच की मागासलेल्यांपैकी मुसलमान तेवढे सरकारला दिसले. मराठा वर्ग व अस्पृश्य वर्ग यांच्या अस्तित्वाची बूज सरकारला कां झाली नाहीं ? मागासलेपणामुळे जर सवलती द्यावयाच्या तर जे जास्त मागासलेले त्यांना जास्त सवलती मिळावयास पाहिजे होत्या. एकट्या मुसलमानांना सरकारनें उरावर घेऊन नाचावें व त्यांच्याहिपेक्षां मागासलेल्या वर्गांकडे डाव्या डोळ्यानें देखील पाहू नये ही सरकारच्या प्रजापालनाची हातोटी विलक्षण नाहीं असें कोण म्हणेल ? आतां सवलतींचा प्रश्न बाजूस ठेवला तरी शिक्षणाच्या बाबतींत सरकारला कर्तव्य म्हणून कांही करणें प्राप्त आहे किंवा नाहीं याचाच विचार करावयाचा आहे.

उपासमारींने शरिराचें पोषण कमी झाल्यास माणूस हीनबल होऊन अल्पायुषी होतो. तसेंच शिक्षणाचें अभावी तो निर्बुद्ध राहिल्यास जिवंतपणीं दुसऱ्याचा गुलाम बनतो. अर्थात् मुलांच्या शरिराची व बुद्धीची शक्य तेवढी चांगली जोपासना करणें प्रत्येक आईबापाचे कर्तव्य आहे. परंतु बऱ्याचशा लोकांच्या हातून शिक्षण देण्यांचें महत्वाचें कर्तव्य पार पडत नाहीं. पोट हें दरेकाच्या मागे लागलेले असतें व तें भरण्यास अनेक लोक अनेक प्रकारचे व्यवसाय करीत असतात. एकदां एक व्यवसाय पिढीजात झाला म्हणजे तोच पुढे चालू होतो; त्यात सहसा बदल होत नाहीं. या अनेक व्यवसायांपैकी शिक्षण हा एक व्यवसाय आहे व ज्या जाती त्यांत पडतात त्यांचा तो धंदा होऊन बसतो. ब्राह्मण लोक शिक्षण घेतात व इतर वर्ग घेत नाहींत याचें तरी कारण हेंच कीं शिक्षण हा जसा ब्राह्मण जातीचा धंदा झाला आहे तसा तो इतर जातींचा झालेला नाही. तुम्ही शिक्षण घ्या म्हटलें असतां आम्हांला काय ब्राह्मण व्हायचें आहे, असें जे अब्राह्मण लोकांकडून उत्तर मिळतें त्यांचें इंगित यांतच आहे. शिवाय अब्राह्मण लोकांत मुलांबाळांना शिक्षण देण्याची मनापासूनची इच्छा असली तरी ती सहज सफल होत नाहीं. मुलाला शाळेत घातलें तर त्याचा दुहेरी बोजा आईबापांवर पडतो. एक तर मुलगा शाळेत गेला तर त्याच्यापासून होणारी कमाई बंद होते व तो आईबापांच्या अंगावर पोस पडतो. दुसरें त्याच्या शिक्षणासाठीं होणारा खर्च त्याच्या आईबापांस सोसावा लागतो. म्हणजे शिक्षणाच्या पायीं कमाईची आयात बंद होऊन खर्चाच्या निर्गतीला मात्र सुरवात होते. यामुळे हातावर कमवून जीवीत कंठणाऱ्या आईबापांना खर्चाचा बोजा झेपत नाहीं व म्हणून त्यांची प्रजा पिढ्यान्पिढ्या अज्ञानाच्या गर्तेत खितपत पडलेली असते. पण ही अवस्था कितीही क्षम्य असली तरी ती विघातक आहे यांत शंका नाही. कारण व्यक्ति स्वातंत्र्यांची आवश्यकता जर मान्य असेल तर दरेक

व्यक्तीच्या ठायीं आपलें स्वातंत्र्य रक्षण करण्याची शक्ती उत्पन्न होणें अत्यंत जरूर आहे व ती शिक्षणाशिवाय उत्पन्न होऊं शकत नाहीं. या कारणास्तव दरेक सुधारलेल्या राष्ट्रात प्रजेला सुशिक्षित करण्याची जबाबदारी सरकारला आपल्या अंगावर घेणें प्राप्त झालें आहे. हिंदुस्थानांत मात्र ही जबाबदारी पत्करण्याचे भरीस सरकार पडलें नाहीं. प्रजेच्या वित्ताचें व जीविताचें संरक्षण एवढेंच काय तें आपलें कर्तव्य आहे, यापरतें दुसरें कांही नाहीं अशी आमच्या इंग्रज सरकारनें आपली ठाम समजूत करून घेतली होती. यास्तव कोणी कोणावर चाल करुन त्याच्या शरिराला प्रत्यक्षपणे दुखापत करू नयें अगर अप्रत्यक्षपणें त्यास अपाय होईल असें करू नये, ज्यास जिकडे जाणें असेल तिकडे त्यास जावयास कोणी प्रतिबंध करू नये; कोणी कोणाचें वित्त लबाडीनें हरण करू नये; ज्यांचें धन तो त्याचा स्वामी, त्यानें त्याचें वाटेल तें करावें वगैरे व्यवस्था नियमबद्ध करणारे पीनलकोड, क्रिमीनल प्रोसीजर कोड, ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टीचा कायदा वगैरे कायद्याच्या राशीच्या राशी करून आमचें इंग्रज सरकार स्वस्थ हात आंखडून बसलें होतें. १९१० सालीं प. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं सरकारला शिक्षणाचें बाबतींत हालवून पाहण्याचा प्रयत्न केला. पण या बाबतींत बसकटीस आलेलें सरकार कांही केल्या उभें राहिना. याचा परिणाम असा झाला की, ज्या जातींना शिक्षणाची गोडी नव्हती त्या जाती अशिक्षितच राहिल्या व व्यक्तिस्वातंत्र्यांचें संरक्षण करण्यासाठी मोठमोठाले कायदे ठोकठाकून केले असतांही अशिक्षित जनतेला सुशिक्षित वर्गाच्या लफंग्या व लोभी कारस्थानापासून सुटका करुन घेणें दुरापास्त झालें. शेतकरी कायद्यासारखा कायदा शेतकऱ्यांच्या बचावासाठी सरकारला पास करणे भाग झालें, हा सरकारचा व्यक्तिस्वातंत्र्यांचे संरक्षण करण्याचा उपाय कसा फोलकट आहे याचा सरकारविरूद्ध सरकारनेंच दिलेला पुरावा आहे.

१९२० साली राजकीय सुधारणेचा कायदा पास झाला. तेव्हांपासून इतर इलाख्याप्रमाणें या इलाख्यांतही लोकशाहीच्या काळास सुरूवात झाली. तेव्हां आतां तरी शिक्षणाचे बाबतीत आपलें कर्तव्य सरकार पार पाडील अशी आशा होती. कारण लोकशाहीच्या काळांत शिक्षणाशिवाय मुळीं चालणेंच शक्य नाहीं; दरेक राष्ट्रांत नानाविधप्रकारचे उद्योग व व्यवहार परस्परांत चालले असतात. या व्यवहारांत कोण कोणाला बुडवील, कोण कोणाला रसातळाला नेईल, कोण कोणाचा गळा कापून त्याच्या स्वातंत्र्यांला धोका करील याचा नेम नाही. व असें जर झालें तर लोकशाही ऐवजी अमीरशाहीच होईल. हल्ली एका विवक्षित प्रकारच्या संघटनेला लोकशाही असें नांव देण्याचा प्रघात पडला आहे. पण लोकशाहीचा हा अर्थ अगदी संकुचित आहे. जेथे दरेक व्यक्ति परस्परांत व्यवहार करतांना आपल्या तोलानें वागूं शकते व दुसऱ्याच्या जाळ्यांत

न सांपडतां आपले हितसंबंध अबाधित राखू शकते तेथेंच पूर्ण लोकशाही नांदत आहे असें म्हणतां येईल. अशा स्थितींत लोकनियुक्त सभासदांनी गजबजलेल्या कौन्सिलांत सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न योग्य तऱ्हेनें निकालांत निघेल अशी आशा लोक धरुन होते व त्याप्रमाणें १९२० सालचा १६ वा कायदा व १९२३ सालचा ४ था कायदा असे दोन कायदे या इलाख्यात पसारही करण्यांत आले. पहिल्या कायद्याने मुंबई शहरांतील प्राथमिक शिक्षण मुंबई म्युनिसिपालिटीच्या ताब्यांत देण्यांत आलें; व दुसऱ्या कायद्यानें जिल्ह्यातील प्राथमिक शिक्षण स्थानिक म्युनिसिपालिट्या आणि लोकल बोर्डे यांजकडे सोंपवून दिलें आहे. हे कायदे डॉ. परांजपे शिक्षणमंत्री असतांना त्यांच्या कारकिर्दीत आणि त्यांच्या धोरणानें पसार झालें आहेत. हे कायदे पसार करण्याचे कार्य त्यांच्या आयुष्यांतील एक महत्कार्य म्हणून गणलें जातें हें आम्हीं जाणून आहों. परंतु दिसण्यात जें महत्कार्य म्हणून दिसतें तें नेहमीच सत्कार्य असतें असें म्हणतां यावयाचें नाहीं. कोणी कांहींही म्हणो आम्हीं स्पष्टपणें म्हणतों कीं, डॉ. परांजप्यांचे हे कायदे अत्यंत नादान पणाचे आहेत आणि जितक्या लवकर ते कायदे रद्द करण्यांत येतील तितके बरें. या कायद्यांत अनेक दोष आहेत. पण आमच्या मतें त्यांतील मुख्य दोष म्हणजे प्राथमिक शिक्षणाची व्यवस्था कायदे कौन्सिलच्या हातून काढून म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डे यांच्या स्वाधीन करण्यांत आली हा होय. ज्या राजकारणी पुरुषानें ही व्यवस्था घडवून आणली तो एक तर खुळा असला पाहिजे किंवा लबाड असला पाहिजे. खुळा, कारण कोणीही शहाणा माणूस हल्लींच्या परिस्थितींत केव्हांही असें म्हणू शकणार नाहीं कीं प्राथमिक शिक्षणाच्या कार्याला कायदे कौन्सिलापेक्षां लोकल बोर्डे व म्युनिसिपालिट्या जास्त लायक आहेत. एक तर लोकल बोर्डे व म्युनिसिपालिट्या यांचे सभासद कायदे कौन्सिलच्या सभासदांपेक्षां केव्हांही जास्त अडाणीच असणार. शिवाय भत्ता घेऊन बाजार करावयास सांपडतो एवढ्यासाठीं बोर्डाच्या सभेला जे हजर राहतात त्यांना प्राथमिक शिक्षणाची कसली चडचड असणार ! आणि असलीच तर पैशाच्या अभावीं त्या बापड्यांना काय करतां येईल ? आणि जर सोय करतां आलीच तर त्यांच्या हातून सर्व जनतेचा सारख्या प्रमाणांत परामर्श घेण्यांत येईल याविषयीं कोण खात्री देऊं शकतो ? आम्हाला तर असें वाटतें कीं ही लोकल बोर्डे आणि म्युनिसिपालिट्या म्हणजे वर्णाश्रमवाद्यांच्या संस्था आहेत ; कारण त्यांच्यांत भरणा होणार तो ब्राह्मणग्रस्त अज्ञ जनतेचाच होणार. असे लोक अस्पृश्य जनतेच्या शिक्षणाची काळजी घेतील, हें कशावरुन सांगतां येईलं ? आतां हा घोड्याचें ओझें गाढवावर लादण्याचा प्रकार खुळेपणाचा नसला तर लबाडीचा असला पाहिजे. कारण या कायद्यानें लोकांची वंचना जरी झाली असली तरी कायदा करणारानें

हा कायदा केल्याबद्दलचें फुकटचें श्रेय लाटलें आहे. सरकारला सक्तीचे शिक्षण पूर्वी जरी नको असलें तरी आतां तें नको आहे असें नाहीं. पण सरकार भितें ते खर्चाला. तेव्हां सक्तीच्या शिक्षणाचा कायदा मागणाऱ्या लोकांनां कायदा करुन दिला, आणि तो प्रचारांत आणण्याची जबाबदारीही स्थानिक संस्थांवर टाकिली कीं आपण सुटलों ! जर कायदा अमलांत आला नाहीं तर जनता स्थानिक संस्थांचे पाहून घेईल ! अंध जनता पाहूं इच्छित नाहीं, स्थानिक संस्थां कांही करू शकत नाहींत, आणि सरकारवर प्राथमिक शिक्षणाचा कायदा पास केल्यामुळे जादा खर्च कांही बसत नाहीं ! मग केवळ कायदा पास केल्यानें कांहीं बावळट लोक आपल्यावर वेडे होतात तर मग फुकटचे श्रेय टाका कां, असा आंतला मतलब असावा अशी आमची प्रामाणिक समजूत आहे.

आम्ही या बाबतीत इतकी कठोर भाषा वापरली याबद्दल आमचे कांही मित्र आमच्यावर रोष धरतील हें आम्हीं जाणून आहों. पण आमचा नाईलाज आहे. प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न अस्पृश्यवर्गाच्या अगदीं जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. त्या प्रश्नाची अशा प्रकारची विल्हेवाट झालेली पाहून आमचे मन क्षुब्ध झालें नाहीं तर मग कोणाचे होणार ? आमच्या इतकी शिक्षणाची जरूरी दुसऱ्या कोणास आहे असें आम्हांस वाटत नाहीं. सरकारचें घर म्हणजे बाप घर. त्या घरांत असतांना अस्पृश्यांच्या पदरी त्याच्या दुर्दैवानें बाटा आला. पण तें घर म्हणजे परघरच. तेथें तसें व्हावयाचेंच. पण लोकशाहीला तरी आपघराची सर यावी कीं नाहीं ? कां तेथेहि पुन्हा बाटाच ? जिच्या वाट्याला आप घरीं बाटा, बाप घरींहि बाटा अशा बिचाऱ्या अभागी विधवेची गत आणि अस्पृश्यांची गत सारखीच झाली म्हणावयाची ! आम्हीं विनाकारण निराश झालों आहोंत असें कांहींना वाटेल. पण आमची खात्री आहे कीं प्राथमिक शिक्षण, लोकलबोर्ड व म्युनिसिपालिट्या यांच्यात ताब्यांत राहिलें तर अस्पृश्यांना वर डोकें काढण्याची आशाच नको.

● ● ●

---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. १५ जुलै १९२७.

# ५१

# सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधी कायद्यांत आमूलाग्र सुधारणा करणे हा एकच उपाय

गेल्या अंकी मुंबई इलाख्यांतील सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधाच्या कायद्यावरील अग्रलेखांमध्यें* आम्हीं जे विचार प्रदर्शित केले होते त्यांना मागील आठवड्यांत पुणें येथें मि. पाहलाजानी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मुंबई इलाख्याच्या प्राथमिक शिक्षण परिषदेमध्ये झालेली भाषणें आणि ठराव यांच्यांयोगें दुजोरा मिळाला आहे. हें पाहून आम्हांस फार समाधान वाटतें. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधाचा कायदा मुळांतच सदोष आहे ही गोष्ट आतां लोकपक्षांतील सर्व शाखांच्या लोकांना पटली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सक्तीच्या शिक्षणासंबंधाचा कायदा पसार झाला, तेव्हां ज्यांना सार्वत्रिक शिक्षणप्रसारासंबंधानें आशा वाटत होती त्यांचीहि आतांपर्यंतच्या अनुभवावरून निराशा झालेली आहे. स्थानिक संस्थांची अनास्था, नवीन कर बसविण्याच्या बाबतींतील त्यांची नाखुषी, सरकारचा कंजूषपणा आणि स्वतःवरील जबाबदारी टाळण्याची प्रवृत्ति इत्यादि करणांच्या समुच्चयाचे निरसन करण्याचा जर एकच कोणता उपाय असेल तर तो सध्याच्या कायद्यांत आमूलाग्र सुधारणा करणें हाच होय. पुण्याच्या परिषदेमध्ये सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधाच्या कायद्यांमध्यें सुधारणा करण्याच्या उद्देशानें एक कमिटी नेमण्याची सूचना करण्यांत आली ती सर्वथैव योग्य आहे. अशी कमिटी नेमण्यांत आल्यास तिच्याकडून होणाऱ्या चौकशीमध्यें पुष्कळ महत्वाच्या गोष्टी बाहेर येतील. सक्तीचें तत्त्व अंमलांत येण्याच्या बाबतींत कोणकोणत्या गोष्टी आड येतात तें समजून येईल आणि प्राथमिक शिक्षण अल्प कालांत सार्वत्रिक होण्यासाठीं उपाय शोधून काढणें सोपें जाईल. तथापि, कशाहि प्रकारचा कायदा अस्तित्वांत आला तरी, जोंपर्यंत द्विदल राज्यपद्धति अंमलांत आहे आणि प्रांतिक स्वायत्तता मिळालेली नाहीं तोंपर्यंत सार्वत्रिक शिक्षणप्रसाराची योजना कितपत अंमलांत येऊन ती यशस्वी होऊं शकेल याची आम्हाला शंकाच आहे.



---

*पाहा, पृ. २१२-२१८.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २९ जुलै १९२७.

# ५२

# अस्पृश्यता काढून टाकणे ही सुधारणा, न्याय, भूतदया व राष्ट्रैक्य यांच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक

दुसरीकडे नागपूरचें श्री. घोरपडे यांचें पत्र† प्रसिद्ध केलें आहे. त्यावरून महाड येथें जो सत्याग्रह करावयाचें योजिलें आहे त्याला उदारमतवादी लोकांचा अधिकाधिक पाठिंबा मिळत आहे असें दिसून येईल. श्री. घोरपडे यांनीं प्रदर्शित केलेले विचार मननीय आहेत. श्री. जवळकर यांनीं आमच्या सत्याग्रहाच्या चळवळींतून ब्राह्मणांना वगळण्याची जी अट∆ सुचविली आहे ती आम्हांला मान्य नसल्याचें यापूर्वी आम्हीं दर्शविलेंच आहे. श्री. घोरपडे यांचेंहि मत तसेंच आहे हें पाहून आम्हांस समाधान वाटतें. ब्राह्मण जातींत जन्मलेला कोणीच मनुष्य मनापासून उदारमतवादी असूं शकणार नाहीं असें आमची मनोदेवता आम्हांस सांगत नाहीं. एवढेंच नव्हे तर आतापर्यंतचा आमचा तसा अनुभवहि नाहीं. आमच्या कार्याविषयीं सहानुभूति बाळगणारें सर्व लोक आम्हांस पाहिजेत, मग ते ब्राह्मण असोत वा ब्राह्मणेतर असोत. ब्राह्मणांना वगळण्यांत तत्वाच्या दृष्टीने चूक होईलच; परंतु तसें करणें गैरमुत्सद्दीपणाचेंहि होईल. आणि आमची खात्री आहे कीं, ज्या ब्राह्मणेतरांना बहिष्कृत वर्गाविषयी मनापासून कळकळ आहे, अस्पृश्यतानिवारण्याच्या प्रश्नाविषयी तळमळ वाटते आणि त्या कामीं शक्य तितका आपला हातभार लागावा अशी मनापासून इच्छा आहे, त्या ब्राह्मणेतरांकडून केवळ आम्हांस कांही ब्राह्मणांनीं मदत करण्याची इच्छा दाखविली आणि आम्हीं त्यांची ती मदत स्वीकारण्याची तयारी दर्शविली म्हणून आम्हीं योजिलेल्या पवित्र कार्यास हातभार लावण्यांत कसूर होईल असें आम्हांस वाटत नाहीं. इतकेंच नव्हें तर खुद्द श्री. जवळकर हेहि श्री. घोरपडे यांच्याप्रमाणेंच ब्राह्मणांना सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेऊं देण्याला हरकत करूं नये असे म्हणतील अशी आमची खात्री आहे. भांडण तत्त्वासाठीं आहे. तें कोणत्याही एका व्यक्तींशीं किंवा कोणत्याही एका जातीशीं नाहीं. पुण्याहून आमच्या एका ब्राह्मण भगिनीनें आपल्या पतीच्या संमतीनें महाडच्या सत्याग्रहांत स्वयंसेविका म्हणून भाग घेण्याची आपली इच्छा व तयारी आहे असें मुद्दाम पत्राद्वारे कळविलें

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक– २०.

∆ पाहा, परिशिष्ट क्रमांक–१७.

आहे. अशा माणसांचा हिरमोड करावा असें श्री जवळकर हेहि म्हणूं शकणार नाहींत. ब्राह्मणांमुळें कार्याचा बिघाड होईल अशी भीति बाळगायवाची तर तशी भीति अनेक ब्राह्मणेतरांच्या व खुद्द बहिष्कृत वर्गीयांच्या बाबतींतहि बाळगावीं लागेल. आम्हांला चोरून छपून कांही करावयाचें नाहीं. सर्व गोष्टी आम्हीं उघडच करणार आहों. त्याअर्थी ब्राह्मणांविषयी किंवा दुसऱ्या कोणाविषयीं भीति बाळगण्यांचें आम्हांस कारण नाहीं. कांही सोंवळे ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर आमच्या स्पर्शाचा विटाळ मानोत, परंतु सद्धेतूंनी प्रेरित असलेल्या ब्राह्मणांच्या किंवा ब्राह्मणेतरांच्या साहाय्याचा आम्हीं तरी विटाळ मानीत नाही. आमच्या पवित्र कार्यात साहाय्य करावयाला तत्त्वनिष्ठेनें जे पुढे येतील त्यांचे आम्ही आभारच मानूं. आमच्याकडे आणखीही कित्येक सद्‌गृहस्थांनी पत्रें पाठवून सत्याग्रहांत भाग घेण्याची इच्छा प्रदर्शित केलेली आहे. अस्पृश्य वर्गातील शेंकडो लोक फक्त सत्याग्रहाची तारीख जाहीर होण्याची वाट पाहत आहेत. योग्य वेळीं महाडला जाणाऱ्या मंडळीचीं नांवें प्रसिद्ध करण्यांत येतील.

श्री. घोरपडे यांनी आपल्या पत्राच्या शेवटी बहिष्कृतांच्या तर्फे सुरू होणाऱ्या सत्याग्रहाच्या चळवळींत सामील होऊं इच्छिणाऱ्या मंडळींसाठी शपथपत्रिका तयार करण्याच्या बाबतींत जी सूचना केली आहे तिच्याविषयीं दोन शब्द लिहिण्याखेरीज या विषयाची रजा घेणें योग्य होणार नाहीं. श्री. घोरपडे यांनी शपथपत्रिकेंत घालावयाचीं जीं कलमें सुचविली आहेत ती तत्त्वदृष्ट्या बरोबर आहेत यांत मुळीच शंका नाहीं. जातिभेद व अस्पृश्यता हे दोन्ही प्रश्न परस्पर संलग्न आहेत. जातिभेदाचा प्रश्न अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नापासून पूर्णपणें अलग ठेवता येणें शक्य नाहीं, हें आम्हास सर्वस्वी मान्य आहे. तथापि, व्यवहारसुलभतेच्या दृष्टीनें विचार करतां, सत्याग्रहाची चळवळ अस्पृश्यतानिवारणापुरतीच मर्यादित करणें ईष्ट आहे असें आम्हांस वाटतें. अस्पृश्यता काढून टाकणें ही सुधारणा न्याय, भूतदया व राष्ट्रैक्य यांच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे असें ज्यांचे मत आहे अशा सर्व लोकांना बहिष्कृतांतर्फे व त्यांच्याबरोबर सत्याग्रहांत सामील होण्यास कांही हरकत नसावी. उदाहरणार्थ, महात्मा गांधींच्या मतांसारखीं ज्यांचीं मतें आहेत अशा लोकांना श्री. घोरपडे यांनीं सुचविलेल्या शपथपत्रिकेवर सही करणें कदाचित् कठीण जाईल. पण त्याकरितां तशा मंडळीची सहानुभूति व सहाय्य धुडकावून लावणें योग्य होणार नाहीं. त्यांचे विचार तत्त्वदृष्ट्या चुकीचे असतील, परंतु तेवढ्यासाठी त्यांच्यावर बहिष्कार घालणे चुकीचे होय. सत्याग्रहासारखी चळवळ विशिष्ट बाबींवरच भर ठेवून चालवावयाची

असते. तिच्यामध्यें अनेक प्रश्नांची गुंतागुंत होऊं देणें इष्ट नसतें आणि व्यवहारामध्यें तत्त्वाचा भंग न होऊं देतां वेगवेगळ्या मतांच्या व प्रवृत्तींच्या माणसांशीं सहकार्य करणे सर्वांना फायदेशीर असते.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २९ जुलै १९२७.

# ५३

# आमचे टीकाकार

' बहिष्कृत भारता ' च्या धोरणावर निरनिराळ्या लोकांकडून निरनिराळ्या प्रकारची टीका करण्यांत येत आहे. या सर्व टीकाकारांना उत्तरें देणें आणि सर्वांचे समाधान करणें आम्हांस शक्य नाहीं, हें आम्ही जाणून आहों. तथापि, आमच्या टीकाकारांपैकी जे कोणी प्रामाणिक टीकाकार असतील, ज्यांचा केवळ गैरसमज झालेला असेल, त्यांच्याकरितां आमच्या धोरणासंबंधांनें थोडाबहुत खुलासा करावा असें आम्हांस वाटतें. आमच्यांतलेच, गोताला काळ होणारे कांही कुऱ्हाडीचे दांडे किंवा ' अस्तनींतले निखारे ' असून ते आपल्या मनास मानेल त्याप्रमाणें आमच्याविषयीं गैरसमज पसरवीत असतात. बहिष्कृत वर्गांतल्या कित्येक लोकांनी आपली बुद्धि अस्पृश्यतानिवारणाची वरपांगी कळकळ दाखविणाऱ्या लोकांपाशी गहाण ठेवली आहे. कित्येकांना आपली आजपर्यंतची नामधारी पुढारीपणासंबंधाची वतनदारी आमच्या धडाडीच्या धोरणामुळें गेली त्यामुळें वैषम्य वाटत आहे. कित्येकांना वैयक्तिक असूयेनें इतकें पछाडलें आहे कीं, अस्पृश्यतानिवारण होवो किवा न होवो, आज होवो किंवा कालांतरानें होवो, पण डॉ. आंबेडकर यांना हाणून पाडलें कीं मिळविली, या धोरणांनें त्यांनी आपल्या प्रयत्नांची पराकाष्टा चालविली आहे. आंबेडकर किंवा ' बहिष्कृत भारत ' यांनी दिलेलें मत योग्य असो किंवा अयोग्य असों, त्यांचें धोरण परिणामी बहिष्कृत वर्गांना फायदेशीर असो किंवा नसो, त्याविषयी नापसंती दाखवावयाची आणि उभयतांविषयीं बहिष्कृत समाजांत व इतरत्र गैरसमज पसरवून द्यावयाचे, मग बहिष्कृतांची चळवळ ठार झाली तरी हरकत नाहीं, येथपर्यंत वैयक्तिक असूयेची व द्वेषाची मजल गेली आहे. अशा टीकाकारांचे समाधान आंम्हीं काय करणार ? परंतु त्यांच्या टीकेमुळें होणाऱ्या भोळ्या व गैरमाहीत लोकांचा गैरसमज टाळता येईल तर टाळावा असें आम्हांला वाटणें स्वाभाविक आहे. आमच्या अंगीकृत कार्याला अडथळे येऊं नयेत, याकरितां आमच्यावर चाललेल्या टीकेचा कायदेशीर मार्गानींहि बंदोबस्त करणें आम्हांस भाग पडलें तर त्याबद्दल विचारी लोक आम्हांला दोष देणार नाहींत याविषयी आमची खात्री आहे. बहिष्कृत वर्गातले कित्येक लोक आमच्यावर स्वजातिपक्षपातित्वाचा आरोप करीत असतात. या आरोपाचें

उत्तर पुण्याच्या एका सभेमध्यें आम्ही दिले आहे. त्या सभेची हकीकत † दुसरीकडे दिली आहे. ती वाचकांनी अवश्य वाचावी स्वजनांतील टीकाकारांच्या बाबतींत तूर्त आम्ही यापेक्षां जास्त कांहीं लिहूं इच्छीत नाहीं.

आतां उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या हिंदु लोकांमधील आमच्या टीकाकारांचा थोडक्यांत परामर्श घेऊं. या टीकाकारांचा आमच्यावर सर्वांत अधिक रोष होण्याचें कारण हें कीं, अस्पृश्यतेचें शक्य तितक्या लवकर निवारण न झाल्यास अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या लोकांनी धर्मांतराचा मार्ग स्वीकारावा असें आम्हीं प्रतिपादितों. धर्मांतराला जर आम्ही आतुर असतों आणि अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न स्वतःपुरता व स्वतःच्या पुढील पिढीपुरताच आम्हांस सोडवावयाचा असता तर आम्हीं तसें यापूर्वीच केलें असतें. परंतु शक्यतोंवर हिंदु धर्मांत राहावयाचें आणि आपल्या बहिष्कृत बंधूंनाहि त्या धर्मांत ठेवावयाचें तसेंच अस्पृश्यतानिवारणासंबंधानें स्वतःपुरतेच न पाहतां अखिल बहिष्कृत वर्गाच्या दृष्टीनें विचार करावयाचा, अशीच आमची इच्छा असल्यामुळें आम्हीं आमचें सध्यांचे प्रयत्न चालविले आहेत. तथापि, कोणत्याही एका व्यक्तींच्या काय किंवा एकाद्या वर्गाच्या काय, सहनशीलतेला मर्यादा ही असावयाचीच. उच्चवर्णीय म्हणविणारे लोक न्यायान्याय, धर्माधर्म, पापपुण्य, सारासार यांचा विचार न करतां बहिष्कृत वर्गावरील अस्पृश्यतेचा शिक्का कायम ठेवण्याचाच हेका धरतील आणि आपल्या बहुसंख्येच्या आणि आर्थिक संपन्नतेच्या घमेंडींत बहिष्कृत वर्गाच्या युक्तिवादाला धाब्यावर बसवितील तर बहिष्कृत वर्गाला धर्मांतरासंबंधाच्या प्रश्नाचा विचार करणें भाग पडेल असें आम्ही आतांहि पुनःस्पष्ट म्हणतो. महाड प्रकरणावर लिहितांना ' भाला ' कारासारख्यांनीं बहिष्कृतांच्या ' पाठी सडकण्याची ' धमकी दिली असतां त्यांना जसें उत्तर द्यावयाला पाहिजे होतें तसें आम्हीं दिलें आणि त्याच वेळी आमचे वाजवी हक्क स्वधर्मांत राहून मिळण्याची निराशा झाल्यावर आम्ही परधर्माचा अंगीकार करून आमचे वाजवी हक्क मिळविण्याची पाळी आली तर तसें करण्यासहि कमी करणार नाही असें बजावलें. यांत काय चुकलें हे आम्हांस तरी समजत नाहीं. ' आम्ही तुमच्या लाथा खाऊं ! पण तुमच्याच धर्मांत राहूं ' असें आम्ही म्हणावें अशी आमच्या टीकाकारांची अपेक्षा आहे काय ? तुमचा आमचा धर्म जर एक तर तुम्हांला आम्हांला हक्क सारखेच. माणसामाणसांत जो धर्म पंक्तिप्रपंच करतो, कोट्यावधी लोकांना त्यांचा स्वतःचा कांही अपराध नसतां गुन्हेगारांपेक्षांहि वाईट रीतीनें वागवितो, विशिष्ट वर्गातल्या लोकांना पिढ्यानपिढ्या इहलोकच्या

† पाहा, खंड १८, भाग १, पृ. ५६–५९.

नरकयातना भोगावयाला लावतो, माणसें असून त्यांना जनावरांना मिळणाऱ्याही सवलती लाभू देत नाहीं तो धर्म तरी कसला ? तशा धर्माला ' धर्म ' हें नावंच योग्य नाहीं. या धर्मासंबंधाने आमच्या मनांत आपलेपणाची भावना तीव्रतेनें कशी असूं शकेल ? हिंदुधर्म सर्वांना समतेनें वागवील तर त्याच्याविषयी सर्वांना सारखाच अभिमान व आपलेपणा वाटेल. ' धर्म ' शब्दाची व्याख्या तरी काय ? शास्त्रीपंडिताना सर्वसंमत अशी व्याख्या

'' यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिःस धर्म :''

ही होय. '' ज्याच्या योगानें अभ्युदय (ऐहिक उन्नती) व मोक्ष यांची प्राप्ती होते तो धर्म '' असा या वाक्याचा अर्थ आहे. आधीं अभ्युदय व मग मोक्ष असा या व्याख्येंतील साध्यामध्यें क्रम ठेवलेला आहे. ' अभ्युदय ' म्हणजे संसारातील उत्कर्ष किंवा उन्नती (Prosperity or elevation) हे धर्माचें पहिलें साध्य होय. या दृष्टीनें विचार केल्यास प्रचलित हिंदु धर्म अस्पृश्य मानलेल्या वर्गांचा धर्म कितपत होऊं शकतो याचा टिकाकारांनींच विचार करावा. अस्पृश्यता ही गोष्टच अशी आहे कीं, तिच्यामुळे अभ्युदयाचा मार्गच बंद होतो. अस्पृश्यतेमुळें समाजांत मोकळेपणी वावरता येत नाहीं, बहिष्कृत होऊन समाजाबाहेर घाणेरड्या वस्तींत रहावें लागतें, शिक्षण घेतां येत नाहीं, प्रतिष्ठित धंदे करतां येत नाहींत ; मग अभ्युदय कसा व्हावयाचा ? आज हिंदुसमाजात धर्माच्या बाबतीत अशी व्याख्या आहे की, धर्मांचे जें प्रथम साध्य अभ्युदय तें अस्पृश्य म्हटलेल्या लोकांच्या बाबतींत तेवढें लागू नाही ! ' निःश्रेयस् ' मात्र सर्वांना मोकळें ठेवलेलें आहे ! निःश्रेयस् म्हणजे मोक्ष. तो पाहिला कोणीं व कोठें आहे ? त्याची प्राप्ती शुद्रांना, अतिशुद्रांना झाली तरी उच्चवर्णीयांचे काय वेंचावयाचें ? शिवाय त्यांतही मेख आहेच. त्रैवार्णिकांची सेवाचाकरी करण्यानेच शुद्रांना व अतिशुद्रांना मरणोत्तर सद्‌गति मिळेल असे धूर्त शास्त्रकारांनी लिहून ठेवलेलेंच आहे. याचा अर्थ असा कीं, ''तुम्ही जीवंत असतां आमच्या गुलामगिरीत रहां, नरकवास भोगा, म्हणजे मेल्यावर तुम्हांला स्वर्गप्राप्ती होईल !'' जो धर्म आम्हांला असें सांगतो त्या धर्माविषयीं आम्हांला आपलेपणा कसा वाटावा ? ज्या लोकांना अभ्युदयाचे मार्ग त्या धर्मांने मोकळे ठेवले आहेत आणि विशिष्ट वर्गांवर कुर्घोडी करण्याचे ताम्रपट देऊन ठेवले आहेत त्यांनीं अशा धर्मांचे खुशाल गोडवे गावे; परंतु ज्या वर्गांना धर्माच्या नांवावर शतकानुशकें जुलूम सोसावा लागत आहे त्या वर्गांतील लोकांना त्या धर्माविषयीं तिळकेंच प्रेम वाटणें कसें शक्य आहे ? हिंदुधर्मात उच्च तत्त्वज्ञान

पुष्कळ असेल, कांही उदात्त तत्त्वेंहि असतील, परंतु व्यवहारांत जोंपर्यंत तें उच्च तत्वज्ञान व ती उदात्त तत्वें दिसत नाहींत तोंपर्यंत त्यांची किंमत कोण कितीशी मानील ? पुस्तकांतल्या गोष्टी पुस्तकांत, किंवा 'पुराणांतली वांगी पुराणांत' हा न्याय प्रत्यक्ष आचरणांत जोंपर्यंत दिसून येत आहे तोपर्यंत हिंदुधर्मातल्या तत्वज्ञानावर भाळलेल्या लोकांनाहि त्या धर्माविषयींचा अर्थात त्या धर्माच्या व्यावहारिक स्वरुपाचा थोडा बहुत वीट आल्याखेरीज राहणें शक्य नाही. त्यांतहि ज्या वर्गांना त्या धर्माचें व्यावहारिक स्वरुप पदोपदी नडतें व जाचतें त्या वर्गांतल्या लोकांना एकदांचा या बाबतीत सोक्षमोक्ष करून घ्यावा असें वाटावें हे अगदीं स्वाभाविक आहे.

## धर्मासाठीं माणूस कीं माणसासाठीं धर्म ?

हा प्रश्न जरूर विचार करण्यासारखा आहे. नीतिशुद्ध आचरण ठेवण्याच्या जबाबदारीच्या दृष्टींने धर्मासाठी माणूस आहे. आणि एकंदर समाजाच्या हिताचा प्रश्न जेव्हां उपस्थित होतो तेव्हांहि धर्मासाठी माणूस आहे असें म्हणतां येईल. परंतु धर्माच्या नांवावर खपणाऱ्या अधर्मासाठीं, विशिष्ट वर्गांच्या गुलामगिरींत खपण्यासाठीं, पिढ्यान्‌पिढ्या अन्याय व जुलूम सोसण्यासाठीं माणसाचा जन्म आहे किंवा एकाद्या वर्गाचें अस्तित्व आहे असें मात्र केव्हांहि म्हणतां येणार नाही. माणसासाठीं धर्म आहे, म्हणजे प्रत्येक मनुष्याला आपली ऐहिक उन्नति नीतिमार्गानें चालून संपादण्याला धर्माचें साहाय्य झालें पाहिजे. कोणत्याहि माणसाच्या 'अभ्युदया' ला त्याचा जन्म अमुक एका कुळांत झाला म्हणून धर्मांच्या नांवावर आडकाठी येतां कामा नये. कित्येक धार्मिक म्हणविणारे लोक अस्पृश्य मानलेल्या वर्गावरील अन्यायांवर सारवण घालतांना असा प्रश्न करितात कीं, "अस्पृश्य मानलेल्या वर्गांत चोखोबामहाराज †, रोहिदास महाराज यांच्यासारखे जे साधुपुरुष झाले त्यांना आम्ही स्पृश्यवर्गीय लोक पूज्य मानीत नाहीं काय ? आमच्या धर्मांत त्या साधुपुरुषांना आम्ही उच्च स्थानच देत नाहीं काय ?" गोष्ट खरी आहे. परंतु चोखोबा रोहिदासांसारखी माणसें कोणत्याहि समाजांत वारंवार किंवा शेंकड्यांनी उत्पन्न होत नसतात. तशा अपवादभूत व्यक्तींची उदाहरणें देणें म्हणजे वादाचा मुख्य मुद्दा जाणून बुजून टाळण्याचा प्रयत्न करणेंच होय. अस्पृश्य वर्गांतले लोक तरी सर्व ब्राह्मणांना किंवा स्पृश्यांना कोठें सारखेच अनुदार म्हणतात ? एकनाथ महाराजांविषयी आधुनिक विचारांच्याहि कोणत्या बहिष्कृताला अत्यंत आदर वाटत नाही ? चोखोबामहाराजांच्या अस्थि शोधून काढणाऱ्या नामदेव महाराजांच्या अंतःकरणाला आकुंचित विचारांचा विटाळ झालेला नव्हता असेंच प्रत्येक बहिष्कृत समजतो. चोखोबा

† पाहा, परिशिष्ट क्रमांक २१.

रोहिदासांसारख्या साधूंना ऐहिक गोष्टींची पर्वा नव्हती, त्यांचे सर्व लक्ष्य परमेश्वराकडेच वेधलें होतें. त्यांचे उदाहरण साधारण लोकांना काय उपयोगाचें ? जसे सर्वच ब्राह्मण किंवा सर्वच स्पृश्यवर्गीय लोक साधु नाहींत किंवा साधु व्हावयास पात्र नाहीत, त्याप्रमाणे बहिष्कृत वर्गांतले सर्वच लोक साधू नाहींत व साधु व्हावयाला पात्रहि नाहीत. समाजरचनेविषयीचा विचार साधारण जनसमुहाच्या दृष्टीनेंच केला पाहिजे. चोखोबामहाराजांच्या नांवांला हल्लीं उच्चवर्णीय लोक मान देतात, पण जीवंतपणी चोखोबांना ढोरें ओढण्याचाच धंदा करावा लागला ना ? पोटासांठी मोलमजुरी करीत असतां अपघात होऊन चोखोबा कोसळलेल्या तटाखाली सांपडून गतप्राण झाले ना ? ज्या वेळी चोखोबा महार म्हणून ढोरें ओढीत होते त्या वेळी अंगी लायकी नसतां ब्राह्मण वगैरे लोक उच्च धंदे करीत होते. याच समाजरचनेच्या विरुद्ध आमचा आक्षेप आहे. अस्पृश्यता म्हणजे गुलामगिरीचाच एक प्रकार आहे. कांही वर्गांना कांहीं निमित्तावरून अस्पृश्य ठरवावयाचें, त्यांच्याकडून समाजांतली घाणेरडीं कामें करून घ्यावयाची, त्यांना तिरस्काराने वागवावयाचें, त्यांचे नागरिकत्वाचे हक्क हिरावून घ्यावयाचे आणि पिढ्यान् पिढ्या त्यांनी त्याच स्थितींत रहावें याकरितां त्यांचे शिक्षण वगैरे आत्मोन्नतीचे मार्ग बंद करून टाकावयाचे, त्यांतले कोणी लोक आपले माणुसकीचे हक्क मांगू लागले तर त्यांना बंडखोर ठरवावयाचे, त्यांना कांही हक्क सवलती मिळू नयेत म्हणून आकाशपातळ एक करावयाचें आणि प्रसंगी अत्याचार करूनहि त्यांच्या हक्कांच्या आड यावयाचे हे प्रकार जसे गुलामगिरीच्या इतिहासांत तसेच या देशांतील अस्पृश्यतेच्या इतिहासांतहि दिसून येतात. लॉर्ड ऑलिव्हीयर यांनी लिहिलेल्या व हल्लींच प्रसिद्ध झालेल्या "The Anatomy of African Misery" या पुस्तकांत आफ्रिकेंतल्या निग्रो लोकांना गोऱ्या लोकांनी आतांपर्यंत कसें वागविलें व आजहि ते त्यांना कसें वागवित आहेत त्याचें हृदयद्रावक वर्णन केलें आहे. तें या देशांतल्या अस्पृश्यांच्या बाबतींत बरेंचसे लागू पडतें. लॉर्ड ऑलिव्हियर एका ठिकाणी म्हणतात :–

The slave relation, being once established, is automatically and in part unconsciously buttressed by a resolute refusal to admit that the slave is capable of anything better; and when, in the development of competitive industrialism, opportunities arise for his showing that he is capable, the fear of his competition with the established master race adds feelings of jealousy and hatred to the fear and contempt, and reinforces the

obstinacy of the refusal to admit any kind of equality of capacity or of rights. His education and his free use of his faculties are discouraged and opposed. In low minds this complex of prejudies and resistances breeds open contumely, vilification of the slave-race, agitation against any concession to it, and acts of outrage and violence.

आफ्रिकन लोक व या देशांतील बहिष्कृत वर्ग यांच्या दरम्यान कांही बाबतींत भेद आहेत. पहिली गोष्ट ही की, निग्रो वगैरे आफ्रिकन लोक हे युरोपियन लोकांपेक्षा मानववंशदृष्ट्या जसे भिन्न आहेत तसे या देशांतले अस्पृश्य मानलेले लोक स्वतःला उच्च वर्णीय मानणाऱ्या या देशांतल्या लोकांपासून मानववंशशास्त्रदृष्ट्या भिन्न नाहींत. दुसरी गोष्ट ही कीं पाश्चात्य देशींय लोकांनी जो गुलामगिरीचा जुलूम केला त्याला धर्माचा कांही आधार त्यांनी घेतला नाही. परंतु इकडे समाजशास्त्र व धर्मशास्त्र हीं एक असल्यांमुळे राजरोस धर्माच्या आधारावर अस्पृश्यतेची गुलामगिरी निर्माण करतां आली. धर्मामध्ये हीं बाब घुसडली गेल्यांमुळे ती वज्रलेप बनली. एक तर तिनें उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या लोकांच्या मनांतली न्यायविषयक भावना नष्ट करून टाकली आणि खुद्द अस्पृश्यांचीहि विचारशक्ति नाहींशी केली. धर्माच्या दडपणाखाली बहिष्कृतांचा स्वाभिमान नष्ट झाला. त्यांना आपल्या माणुसकीच्या हक्कांचा विसर पडला. ज्या जातीचा स्वाभिमानच नष्ट झाला ती जात आपलें डोकें कसे वर काढणार? अर्थात् बहिष्कृतांच्या उन्नतीचा मार्गच मुळी खुंटला. लॉर्ड ऑलिव्हीयर म्हणतात :– " No race can be raised by destroying its self-respect." (स्वाभिमान नष्ट करून कोणत्याहि जातीची उन्नति करतां येणार नाही). धर्मावर आमचा कटाक्ष आहे तो याचसाठी. धर्मानें समाजरचनेच्या बाबतींत लुडबूड केली नसती, धर्माच्या नांवावर खपणारें निर्बंध आम्हांला जाचक झाले नसते, तर आम्ही तरी धर्मावर का रोष केला असता ? आम्हांला शांतिपाठ शिकविण्याचा आव आणणाऱ्या

## आमच्या टीकाकारांना आमचा सवाल

असा आहे कीं, तुम्ही जर एकाद्या बहिष्कृत-अस्पृश्य मानलेल्या जातींत जन्मलां असतां तर तुम्हीं असेंच शांतिब्रह्म राहिलां असतां काय ? तुम्हांला हिंदुधर्माविषयींच्या प्रेमाचा असाच उमाळा आला असता काय ? दक्षिण आफ्रिकेंत हिंदी लोकांना तुच्छतेनें वागविण्यांत येतें म्हणून तुमच्या अंगाचा संताप होतो. या देशांत यूरोपियन व युरेशियन लोकांसाठी निराळे आगगाडीचें डबे राखून ठेवले तर तें तुम्हांस खपत नाही. फार काय पण एडिंबरो येथील हिंदी लोकांना तेथल्या

कित्येक हॉटेलांमध्ये जाऊन गोऱ्या मडमांबरोबर नाचण्याची बंदी केली एवढ्याच गोष्टीवरून तुम्हीं आकाशपाताळ एक केलें ! पण अस्पृश्यतेच्या पायीं होणारी मानहानि आणि उन्नतिच्या मार्गांत होणारी कायमची बंदी यांच्यापुढें सदरील निर्बंध म्हणजे कांहीच नव्हत ही गोष्ट अद्यापि तुम्हांला पटत नाही. कै. टिळकांसारखी एकादी व्यक्ति बहिष्कृत वर्गांत जन्माला आली असती आणि ब्रिटिश अमलाखालीं झालेल्या मन्वंतराचा फायदा मिळून तशा गृहस्थाला तसेंच उच्च शिक्षण मिळालें असतें तर त्या गृहस्थांनीं 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' अशी गर्जना करण्याच्या भरीस न पडतां 'अस्पृश्यता नष्टमूल करणें हें माझें कर्तव्य आहे' असेंच खात्रीनें म्हटलें असतें आणि 'ये यथा मां प्रपद्यतें तांस्तथैव भजाम्यहम्' हा गीतेंतील आपला आवडता श्लोकार्ध पुढें करून धार्मिक व सामाजिक हक्क मिळविण्याच्या बाबतींत 'बाप दाखवा नाहीं तर श्राद्ध घाला' असें उच्चवर्णीय लोकांना उघड आव्हान केलें असतें अशी आमची खात्री आहे. पण 'परदुःख शीतळ' असल्याकारणानें शहाण्यासुर्त्या, समजूतदार म्हणविणाऱ्या आणि समानतेच्या हक्कांची राजकीय बाबतींत तारस्वरांने सदैव घोषणा करणाऱ्या लोकांनाहि बहिष्कृतांच्या दुःखांचे कांहीच वाटत नाहीं. ते बहिष्कृतांना शांतिपाठ शिकविण्याचें धाष्टर्य करितात आणि कित्येक तर निर्लज्जपणानें धमक्याहि देतात. या देशावर मुसलमानांच्या स्वाऱ्या झाल्या, मुसलमानी सत्ता स्थापित होऊन कोट्यवधि मुसलमान अस्तित्वांत आले, पुढें ब्रिटीश राजसत्ता स्थापित होऊन इंग्रजी शिक्षणाचा प्रसार झाला, ख्रिस्ती मिशनऱ्यांचे काम या देशांत जोरांने चालू झालें. या गोष्टी इतर हिंदूना आपत्तीप्रमाणे वाटत असल्या तरी आम्हां बहिष्कृतांच्या सुदैवानेंच त्या घडून आल्या असें आम्ही समजतो. नाहींपेक्षां बहिष्कृत वर्गाला आजचे दिवससुद्धां पाहावयास मिळाले नसते, त्यांना आपली दुःखे बोलून दाखविण्यास वाचाहि प्राप्त झाली नसती, आणि संख्याबलाचा प्रश्न देशांतल्या देशांत उपस्थित झाला नसता तर सध्यां जे अनेक लोक बहिष्कृतांविषयी वरपांगी कळवळा दाखवीत आहेत त्यांना तो दाखविण्याचे कारणच पडले नसतें. ही साधी गोष्ट स्वतःच्या सोयीपुरती विसरणारे लोक आम्ही धर्मांतरांचे नांव काढलें कीं आमच्यावर गरम होतात त्यांचें आम्हांस आश्चर्य वाटतें. "तुम्ही जोपर्यंत आमच्या धर्मांत आहां तोंपर्यंत सार्वजनिक विहिरीतलावांच्या पाण्याला तुम्ही शिवतां कामा नये, तुम्हांला आमच्यापासून दूरदूरच राहिलें पाहिजे, आमच्या देवळाजवळ तुमची सावलीहि पडतां कामा नये". असेंच आज आम्हांस इतर हिंदुसमाज सांगत आहे. उलट पक्षीं आम्ही ख्रिस्ती, विशेषतः मुसलमान, झालों

कीं जादूने चमत्कार व्हावा त्याप्रमाणे आमची अस्पृश्यता नष्ट होते. अर्थात ख्रिस्ती किंवा मुसलमानधर्मात पावनशक्ति आहे, ही गोष्ट आम्हांस स्पष्ट दिसत असतांहि आमच्या वाडवडिलांचे हिंदुधर्मावरील प्रेम–त्यांची भोळी श्रद्धा कां म्हणाना लक्षांत आणून हिंदुधर्मात राहण्यासाठीं आम्ही धडपड करीत आहों. बाकी हिंदु लोक हे आपले धर्मबंधु आहेत असे आम्हांस वाटत आहे म्हणूनच देवळांचे दरवाजे आम्हांला खुले करून देवदर्शन घेऊं द्या, आमच्यावरील अस्पृश्यतेचा बहिष्कार काढा, असें आम्हीं म्हणत आहों. तुमचा आमचा धर्म जर एक तर त्याच्यावर तुमच्याइतकाच आमचाहि हक्क आहे. त्या हक्काची अंमलबजावणी होऊं शकत नाहीं अशी खात्री झाल्यावर तुमचा धर्म आमच्यासाठी नाहीं असें समजून आम्हीं आमचा मार्ग सुधारला तर त्याबद्दल तुम्हांला वाईट कां वाटावें ? परमेश्वरप्राप्ति हिंदुधर्मांतच आहे आणि इतर धर्मांत नाहीं असें नाही. हिंदुधर्माला सांप्रतची विषमताच कायम ठेवावयाची असेल तर त्यानें आमच्यापासून प्रेमाची व आपलेपणाच्या भावनेची अपेक्षा तरी कां करावी ?

## हिंदुधर्म हा आमचा आहे किंवा नाहीं

या प्रश्नाचा एकदां कायमचा निकाल आम्हांला करून घ्यावयाचा आहे. धर्माला सध्यां जे विषमतेचें विकृत स्वरुप प्राप्त झालेलें आहे तें घालविणें हें काम आमच्या हातीं नाहीं. चालू वहिवाटीचे हक्क बळकावून ज्यांनीं आमचे हक्क हिरावून घेतले आहेत आणि ज्यांची बहुसंख्या आहे, ज्यांचा समाज विशेष पुढारलेला आहे, शिक्षण व संपत्ति हीं ज्यांच्यापाशीं आहेत त्याच वर्गांतल्या लोकांचे धर्म सुधारणा करणें हे कर्तव्य आहे. बौद्ध किंवा आर्यसमाजिस्ट होऊन उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या लोकांच्या दुराग्रहावर म्हणण्यासारखा कांही परिणाम होणार नाहीं, म्हणून तो मार्ग स्वीकारण्यांतहि आम्हाला अर्थ वाटत नाहीं. हिंदु लोकांच्या दुराग्रहाला यशस्वी रीतीनें तोंड द्यावयाची म्हणजे ख्रिस्ती किंवा मुसलमान होण्याचेंच धर्मांतर करून एकाद्या शिरजोर समाजाचेंच पाठबळ मिळविलें पाहिजे म्हणजे अस्पृश्यतेचा डाग निघून जाईल. हा निर्वाणीचा उपाय बहिष्कृत वर्गांनीं योजावा किंवा नाहीं, हें ठरविणें आमच्या हातीं नाहीं. तें इतर हिंदूंच्याच हातीं आहे. त्यांनी शेवटपर्यंत आपला दुराग्रह कायम ठेवला आणि बहिष्कृतवर्गांचे वाजवी हक्क कबूल केले नाहींत तर आम्हीं न सांगतांहि बहिष्कृत वर्गांतील तरूण पिढी धर्मत्यागाचा मार्ग स्वीकारणार आहे. आम्हीं केवळ निमित्तमात्र आहों, हें आमच्या टीकाकारांनी कृपा करून विसरूं नये. असो. आतां

## आमच्यावरील दुसरे आरोप

कांय आहेत हें पाहूं. एक आरोप हा कीं आम्हीं स्पृश्य वर्गाचा द्वेष करितों. पण आम्हांला कोणाचाच द्वेष करण्याची जरूरी नाहीं. स्पृश्य वर्गात आमचे अनेक स्नेही आहेत. आम्हांला आमच्या कार्याकरितां लढा चालविणें भाग असल्यामुळें आमच्या आड येणाऱ्या लोकांची मने दुखविणें प्रसंगोपात भाग पडतें. परंतु त्यावरून आम्ही स्पृश्यांचा किंवा कोणाचा द्वेष करतों असें समजण्याचें कारण नाही. दुसरा आरोप असा कीं, आम्हीं आमच्या पत्रांत अस्पृश्यतेसंबंधानेंच न लिहितां इतर वादग्रस्त विषयांचीहि चर्चा करतों. परंतु त्यावर आमचा असा उलट सवाल आहे कीं, वादग्रस्त प्रश्नांची ज्यांत चर्चा होत नाहीं असें कोणतें वर्तमानपत्र आहे ? इतरांप्रमाणें आम्हांलाहि आमची मतें आहेत आणि तीं प्रतिपादणें हा आमचा हक्क आहेच ; पण तें आमचें कर्तव्यहि आहे. शिवाय, हेंहि लक्षात ठेवलें पाहिजे कीं, अस्पृश्यता हा प्रश्न इतर प्रश्नांपासून अजीबात वेगळा करतां येणें शक्य नाही. जातिभेद, धर्मविषयक कल्पना, ग्रंथप्रामाण्य, राजकीय हक्क, राजकीय चळवळ वगैरे अनेक गोष्टींचा अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाशीं कमीजास्त प्रमाणानें संबंध पोचतो. हिंदुधर्म व हिंदुसमाज यांच्या मुळाशी जी कीड लागलेली आहे तिचा अस्पृश्यता हा एक सर्वात अनिष्ट असा परिणाम असला तरी त्याचें कारण विशिष्ट मनोवृतींत आहे, हे विसरून चालावयाचें नाहीं. म्हणूनच, अस्पृश्यतेसंबंधाने विचार करतांना इतर गोष्टींचा विचार करणें ओघाने प्राप्त होतें. आडमुद्यांवर टीका करून किंवा व्यक्तिशः डॉ. आंबेडकरांना खालीं पाडण्याचां प्रयत्न करून अथवा 'बहिष्कृत भारता ' विरुद्ध निंदासत्र चालवून आमचा पक्ष किंवा आमची चळवळ हाणून पाडणें शक्य नाहीं, हें आमच्या टीकाकारांनी समजून असावें. बहिष्कृत वर्गांत फूट पाडून आमची चळवळ कमजोर करण्याचा डावहि यापुढें यशस्वी व्हावयाचा नाहीं. अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत टोलवाटोलवीं करावयाला आम्हीं सवड देत नाहीं हेंच आमच्यावर कित्येक उच्च वर्णीय म्हणविणाऱ्या टीकाकारांचा इतका रोष आहे त्याचे कारण होय हें आम्ही जाणून आहों.



---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. २९ जुलै १९२७.

# ५४

# संख्या फुगवून हिंदु समाजाच्या नांवावर उच्च वर्णीयांनी विशेष हक्क व सवलती स्वतःसाठी मिळविण्याचा मार्ग

त्रावणकोर संस्थानामधील एका ठिकाणी अस्पृश्य मानलेल्या वर्गातील लोकांकरितां एक वेगळा रस्ता काढण्याची सूचना तेथल्या कायदेकौन्सिलमध्यें पसार झाल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. अस्पृश्यांकरितां वेगळी देवळें बांधण्याच्या सूचनेला विरोध करितांना, अशा वेगळेपणाचे पर्यवसान शेवटीं वेगळ्या धर्मशाळा, वेगळ्या विहिरी, वेगळे रस्ते वगैरेंमध्यें होऊन शेवटीं अस्पृश्यता आहे तशी कायम राहील अशी भीति आम्हीं व्यक्त केली होती. त्या भीतीचें प्रत्यंतर त्रावणकोरमधील वरील सूचनेवरून दिसून येते. जेथें बहिष्कृतांच्या स्पर्शानें रस्ते विटाळतात तेथें अस्पृश्यता नाहींशी होण्याची आशा तरी बाळगतां येईल काय ? बहिष्कृतांना असल्या फुसक्या सवलतींची मुळींच जरूरी नाहीं. त्यांत त्यांचे हित नाहीं, कारण अशा ढोंगी सवलतीमुळें अस्पृश्यता नाहींशी होण्याला मदत न होता ती वज्रलेप मात्र होणार आहे. बहिष्कृत लोक आपल्याला हिंदूंच्या देवळांत जाण्यास मोकळीक असावी, हिंदुधर्मीय या नात्यानें आपला तो हक्क आहे अशी मागणी करीत आहेत तर कांहीं धूर्त लोक आम्ही तुम्हांला निराळी देवळें देतों, तुमच्यासाठी निराळे रस्ते बांधतों असें सांगत आहेत. याचा अर्थ असा कीं, बहिष्कृतांनी चिरकाल बहिष्कृतच रहावें, त्यांना आपलीं डोकीं वर काढण्यास केव्हांच सवड मिळूं नये, आणि अशा थोड्या सवलती तोंडावर टाकून हिंदुधर्मीय लोकांची संख्या फुगवून दाखवून अखिल हिंदुसमाजाच्या नांवावर उच्च वर्णीय म्हणविणाऱ्या लोकांना विशेष हक्क व सवलती स्वतःसाठी मिळविण्याचा मार्ग मोकळा राहावा ! बहिष्कृतांसाठीं देवळें वेगळीं, त्यांना चालण्यासाठीं रस्ते वेगळे, असे बंड चालू दिल्यास, हिंदुलोकांना स्वराज्य मिळाल्यावर बहिष्कृतांसाठीं आगगाड्या किंवा आगगाड्यांचे डबे वेगळे, येथपर्यंतहि पाळी यावयाची आणि पेशवाईचें पुनरुज्जीवन होऊन महाराष्ट्रांतसुद्धां बहिष्कृतांना गळ्यांत मडकीं बांधून फिरावें लागावयाचें ! सारांश, अस्पृश्यांसाठीं निराळीं देवळें व निराळे रस्ते बांधणें ही प्रगति नसून पुच्छप्रगतिच होय. मलबारमधील अस्पृश्य मानलेल्या जातींमध्यें ताडी काढणें वगैरे धंदे करणाऱ्या कित्येक जाती असून त्यांची राहणी

तेथल्या कित्येक उच्च जातींपेक्षांहि स्वच्छ आहे आणि त्यांमध्यें कैक पुरुष व स्त्रियाहि विश्वविद्यालयाच्या पदवीधर आहेत. अर्थात् राहणी व संस्कृति यांचा त्यांच्या अस्पृश्यतेशीं कांहीं संबंध नसून केवळ दुराग्रहच अस्पृश्यतेच्या मुळाशीं आहे. अशा जुलुमाला कंटाळून दरसाल शेंकडों कुटुंबें तिकडे ख्रिस्ती होतात यांत आश्चर्य आहे काय ? हिंदुसंघटनवाद्यांचें इकडे लक्ष जात नाहीं, त्यांना अन्यायाची चीड येत नाहीं, आपल्या जातभाईंचा मूर्खपणा त्यांच्या डोळ्यांना दिसत नाहीं, आणि एकाद्या मालिनीबाईनें एखाद्या खानाशी विवाह केला म्हणजे मात्र त्यांच्या धर्माभिमानाला ऊत येतो !

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १२ ऑगष्ट १९२७.

## ५५

# ज्या देवाला गुरें मारणें शक्य आहे त्याला माणसें मारणेंच कां अशक्य असावें ?

नाशिकचे श्री. गायकवाड † यांचें पत्र ‡ दुसरीकडे दिलें आहे त्यावरून बहिष्कृतांना खेड्यापाड्यांमध्यें किती जुलूम व अन्याय सोसावा लागतो त्याची थोडी तरी कल्पना येईल. गांवांत इतरांच्या गुरांबरोबर खुद्द महारांचींहि गुरें मरत होतीं, ही एकच साधी गोष्ट, महारांना गुरें मारण्याचें चेटूक करणें शक्य आहे असें मानलें तरी, महारांचा त्या बाबतींत कांहीं संबंध नव्हता हें शाबीत करण्यास पुरेशी होती. परंतु महारांना वाटेल तशी मारहाण केली तरी हरकत नाहीं, त्यांची दाद कोण घेणार ? अशीच समजूत असल्यामुळें गांवच्या लोकांनीं महारांना यथेच्छ मारहाण करून स्वतःच्या मनाचें समाधान करून घेतलें ! महारांचा देव जर खरोखर ' कर्तुमकर्तुम् ' शक्तिमान् असता तर त्यांना इतका अन्याय व जुलूम इतकीं शतकें कां सोसावा लागला असता ? ज्या देवाला गुरें मारणें शक्य आहे त्याला माणसें मारणेंच कां अशक्य असावें ? बहिष्कृतांना अज्ञान म्हणणारें लोकच स्वतः किती अज्ञान असतात, त्यांच्यामध्ये रानटी लोकांच्या समजुती कशा प्रचलित आहेत, तें दिंडोरी तालुक्यांतल्या प्रस्तुत उदाहरणावरून स्पष्टपणें दिसून येतें. कित्येक क्षत्रियकुलावतंसांनीं केलेल्या मारहाणीमुळें बहिष्कृत वर्गांतलीं सात निरपराधी माणसें दिंडोरी येथल्या दवाखान्यांत जखमी होऊन पडलीं आहेत. या बाबतीत तिकडील पोलीस योग्य ती तजवीज करून अपराध्यांना कडक शासन करावयाला लावील काय ? नाशिक जिल्ह्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचें इकडे लक्ष जाईल आणि आडमुठ्या गांवगुंडांना योग्य ती शिक्षा होऊन, इतरांना दहशत बसेल अशी आम्हांस उमेद आहे.



† पाहा, परिशिष्ट क्रमांक २२..

‡ पाहा, परिशिष्ट क्रमांक २३.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १२ ऑगष्ट १९२७.

# ५६

# महाडच्या मारामारीचे खापर स्पृश्य जातीच्या अशिक्षितांवर फोडणाऱ्यांचे खरे स्वरूप

महाड येथील ज्या ' चवदार ' तळ्याच्या बाबतींत एवढें रण माजलें, आणि साऱ्या हिंदुस्थान देशांत गवगवा झाला त्या ' चवदार ' तळ्याचें शुद्धीकरण † करूनच महाडचे सोवळे लोक उगी राहिले नाहींत. पूर्वी एका ठरावाच्याद्वारें सदरील तळें सर्व जातींच्या लोकांना मोकळें ठेवण्यांत आलें होतें व त्यानंतरच बहिष्कृत लोकांची परिषद भरून त्याचें पाणी परिषदेचे प्रतिनिधी प्याले. हल्लीं तेथल्या म्युनिसिपालिटीनें सदरील पूर्वीचा ठराव बहुमतानें रद्द केल्याची खात्रीलायक बातमी ‡ आम्हांस समजली आहे. महाड म्युनिसिपालिटीमध्यें प्रतिगामी धोरणाच्या सभासदांचाच भरणा असल्यामुळें ' चवदार ' तळें फक्त उच्चवर्णीय हिंदु लोकांपुरतेंच खुलें ठेवण्याची जी ' सुधारणा ' (!) करण्यांत आली तीबद्दल आम्हांस कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. महाड म्युनिसिपालिटीनें आपला पूर्वीचा ठराव बदलून अस्पृश्यांना चवदार तळ्यावर जी बंदी केली आहे तिच्याकडे कुलाबा जिल्ह्याच्या कलेक्टराचें लक्ष्य जाऊन म्युनिसिपालिटीला ताळ्यावर आणण्यासाठी योग्य ती तजवीज केली जाईल, अशी आम्हांस आशा आहे. महाड म्युनिसिपालिटीला सदरील नवीन ठरावानें आपण बहिष्कृतांचा आतां कायमचा बंदोबस्त केला असें वाटत असल्यास तो भ्रम आहे. या प्रश्नाचा निकाल असल्या फुसक्या ठरावामुळें बहिष्कृतांच्या विरुद्ध होणें शक्य नाहीं. उलट, महाड येथें सत्याग्रह करून चवदार तळ्याची बहिष्कृतांच्या दृष्टीनें खरी शुद्धि करण्याची जी चळवळ चालू आहे, त्या चळवळीला मात्र अधिक जोर येणार आहे, हें महाड म्युनिसिपालिटीच्या अनुदार सभासदांनीं पक्कें ध्यानांत ठेवावें. महाडच्या मारामारीचें खापर स्पृश्य जातीच्या अशिक्षित लोकांवर फोडून खादीवाले, प्रतिसहकारवाले वगैरे लोक नामानिराळे होऊं पाहत होते, परंतु हल्लींच्या

---

† चवदार तळ्याचे शुद्धीकरण दि. २१ मार्च १९२७ ला केले गेले होते. महाडच्या विष्णुमंदिरात ब्रह्मवृंदांची सभा भरून १०८ घागरीपाणी चवदार तळ्यातून काढून त्यात वेदोक्तविधीने पंचगव्य (गाईचे मूत्र, शेण, दूध, तूप व दही) मिसळवून ते पुन्हा तळ्यात टाकले गेले होते व तळे शुद्ध झाले असे जाहीर केले गेले होते.

‡ पाहा, परिशिष्ट क्रमांक २४.

ठरावामुळें त्यांच्या तोंडावरील बुरखा दूर होऊन त्यांचें खरें स्वरूप सर्व जगाला दिसून येत आहे. बहिष्कृत वर्गाच्या योग्य हक्कांविषयीं त्यांना जाणीव असती आणि अशिक्षित गुंडांनीं केलेली मारामारी त्यांना मनापासून नापसंत असती तर तळ्याच्या बाबतींतील पूर्वीचा ठराव रद्द करण्याचा उपद्व्याप त्यांनीं केला नसता, हें सांगावयास नकोच.

●●●

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १२ ऑगष्ट १९२७.

## ५७

# ढोंगीपणा, माथेफिरूपणा व गैरमुत्सद्दीपणा

हिंदुसमाजामधील कित्येक लोकांनी संघटन व शुद्धि या चळवळी सुरु केल्या असून या चळवळींमध्यें शिकलेल्या लोकांचाच भरणा आहे. साधारण बहुजनसमाज या चळवळीपासून साधारणतः अलिप्त आहे असें म्हणावयास हरकत नाही. त्याचप्रमाणें समाजसुधारकांचेंहि या चळवळींमध्ये फारसें अंग नाही. एकंदरीत अर्धवट विचाराच्या लोकांचेंच या चळवळींमध्यें प्राबल्य आहे. जुन्या मताच्या लोकांना शुद्धीची कल्पना परकी वाटते आणि समाज-सुधारणेकडे ज्यांचा ओढा आहे त्यांना समाजसुधारणेच्या द्वारेंच खरें संघटन हिंदुसमाजामध्ये उत्पन्न होईल आणि शुद्धीचें कारण फारसें न उरतां हिंदुसमाजाचें संख्याबल कायम राहून वाढेल असें वाटतें, त्यामुळे ते दोन्ही पक्ष या चळवळींपासून अलग राहिले आहेत. शुद्धीसंघटनाच्या चळवळींमध्यें अर्धवट लोकांची भरताड झाल्यामुळें त्या चळवळीचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. इतकेंच नव्हे तर ढोंगीपणा व माथेफिरूपणा यांना ऊत येऊं लागला आहे. सध्यां हिंदुमुसलमानांमध्यें भयंकर तेढ उत्पन्न झाली आहे. तिचा फायदा कांहीं लबाड लोक घेत आहेत. आधींच धार्मिक कलह म्हणजे मुर्खपणाचा बाजार. जेव्हां खऱ्या धर्माची पायमल्ली होते तेव्हांच धार्मिक कलह माजतात. जे हिंदु व जे मुसलमान सध्यां धर्माच्या नांवावर एकमेकांशी भांडत आहेत त्यांच्यामध्यें खऱ्या धार्मिक वृत्तीची माणसें चार दोन तरी सापडतील किंवा नाहीं याची आम्हांला शंका आहे. धर्माला पदोपदी लाथाळणारे लोकच धर्मांचा आवेश दाखवून दुसऱ्या धर्माच्या लोकांचें प्राण घेऊं पाहतात. धर्मानें माणसाला देवदूत बनविलें पाहिजे. परंतु तसें न होतां धार्मिक कलहामुळें धर्माच्या योगानें माणसाचें माणूसपण जाऊन त्याला पशुपणा येत आहे. अशा स्थितीत अशिक्षित गुंड मारामाऱ्या करितात. एकमेकांचीं टाळकीं सडकतात व खून करितात आणि सुशिक्षित गुंड अल्पायासानें आपापल्या समाजांत लोकप्रिय होण्याची पर्वणी साधून घेतात. अशिक्षित गुंडांच्या दुष्ट कृत्यांची खरी जबाबदारी खरें म्हटलें असतां सुशिक्षित गुंडांवरच आहे. कारण त्याच्या चिथावणीमुळेंच अशिक्षित लोक अत्याचार करावयाला प्रवृत्त होतात. सुशिक्षित गुंड जसें हिंदूत आहेत तसे मुसलमानांत आहेत. पंडितांत आहेत तसे मौलानांमध्यें आहेत. खरें पाहिल्यास धर्माचा सूक्ष्म विचार कोणीच करीत नाही, धर्माच्या आद्य तत्त्वांची कोणालाच पर्वा नाहीं.

दुराग्रह व दुरभिमान यांचेच उभय समाजांमध्यें प्राबल्य झालेले आहे. ग्रंथप्रामाण्य, अंधश्रद्धा व अज्ञ समजुती, यांनीं प्रत्येक धर्माला ग्रासून टाकलेले असल्यामुळे धर्म व सारासार विचार यांच्यांत घटस्फोट झालेला आहे.

## मेलेल्या माणसांची मढी व मेलेल्या माणसांचे विचार

यांच्यावरच सध्यांची रणें माजलेलीं आहेत. सत्य काय हे कोणीच पाहत नाहीं. अमका एक धर्मसंस्थापक काय म्हणाला होता आणि अमक्या एका धर्मग्रंथांत काय म्हटलेलें आहे यालाच सर्व महत्त्व आलेलें असून सत्य कोपऱ्यांत रडत बसले आहे. अशा वेळीं ढोंगी लोकांचें फावावें हे स्वाभाविकच होय.

खान-मालिनी विवाह हीच एक सध्यां गाजत असलेली बाब उदाहरणासाठी घेतली तर ढोंगीपणा व माथेफिरूपणा यांना हल्लींच्या धार्मिक कलहामुळें कसें प्रोत्साहन मिळत आहे तें दिसून येईल. या विषयावरील बाकी विचार आम्हीं या पूर्वीच प्रदर्शित केलेले आहेत. परंतु शिळ्या कढीला ऊत आणण्याची खटपट अजूनहि कित्येक लोकांकडून चालू असल्यामुळें त्या विषयाकडे आम्हीं पुन: वळत आहों. हिंदुसमाजाची कशी दिशाभूल होंत आहे तेंही आम्हांस आज दाखवावयाचें आहे.

एका सुशिक्षित हिंदु स्त्रीनें एका सुशिक्षित मुसलमानाशीं विवाह केला त्यामुळें वर्तमानपत्र व जाहीर सभा यांमधून एवढें मोठें काहूर माजविण्यांत आले कीं, हिंदुसमाजावर आकाश कोसळून पडलें असेंच एकाद्याला वाटावयाचें. आज दोन महिने ज्याच्या त्याच्या तोंडीं हाच विषय. हिंदुसमाजावर या गेल्या पांच दहा वर्षातच किती तरी मोठे आघात झाले असतील, परंतु मालिनी-खान विवाहामुळें जेवढी खळबळ उडाली तेवढी खळबळ आतांपर्यंत कशानेंच उडाली नव्हती. स्वामी श्रद्धानंदांच्या खुनावर मराठी वर्तमानपत्रांत जेवढें व जितके लांब लेख आले नाहींत तेवढे व तितके लांब लेख या एका विवाहावर प्रसिद्ध झाले ! पण खरोखर खान-मालिनी विवाह व श्रद्धानंदांचा खून यांची तुलना तरी होऊ शकेल काय ? ज्या हिंदु स्त्रीनें मुसलमानाशीं विवाह केला ती कितीही सुशिक्षित व कितीही उच्च जातीची अथवा मोठ्या घराण्यांतील असली तरी ती संख्येच्या दृष्टीने एकच होय. बरें, त्या स्त्रीच्या पाठीमागें तिचे शेंकडों स्त्रीपुरुष अनुयायी होतें असेंहि नाहीं. म्हणजे, ती स्त्री मूळची ब्राह्मणघराण्यांतली, जुन्या हिंदुघराण्यांतील नव्हती ही गोष्ट बाजूला ठेवून विचार केला तरी तिच्या सदरील विवाहामुळें हिंदुसमाजांतील एक माणूस कमी झालें एवढेंच फार तर संख्याबलाचा

विचार करतांना म्हणावें लागेल. त्यामुळें मुसलमान समाजांत एका माणसाची भर पडली असेंही कायदेशीर दृष्ट्या म्हणतां यावयाचें नाहीं. कारण विवाह नोंदतांना वर व वधू या उभयतांनीं आपण कोणत्याच धर्माचे नाहीं असें म्हटलेलें आहे. अर्थात्, एका माणसाची भर न पडतां मुसलमान समाजांतला एक माणूस कमीच झालेला आहे. असें असतांहि या विवाहविरुद्ध केवढी ओरड ! आपल्यातलीं माणसे परधर्मांत जातात व त्यामुळे आपल्या धर्माचें संख्याबळ कमी होतें याबद्दलच जर या ओरड करणाऱ्या लोकांना मनापासून हळहळ वाटत असती तर या एवढ्या लहानशा गोष्टीला भलतेंच महत्त्व न देतां त्यांनीं स्वधर्मसंरक्षणाचा विचार केला असता. हिंदुसमाजांतून दरदिवशी शेंकडों माणसें परधर्मांत जात आहेत त्याबद्दल जर खान-मालिनी-विवाहबद्दल आक्रोश करणाऱ्या लोकांना खरोखर हळहळ वाटली असती तर त्रैराशिक दृष्ट्या विचार केल्यास त्यांनी शोकाकूल होऊन प्राणच सोडले पाहिजे होते ! घराला मोठमोठीं भगदाडे पडलीं आहेत तिकडे न पाहातां एकादें लहानसें बिळ पाहून घराचा मालक जर छाती पिटून रडूं लागला तर ते जितकें हास्यास्पद होईल तितकाच मालिनी-खान विवाहाविरुद्ध झालेला व होत असलेला आक्रोश हास्यास्पद आहे. असल्या मुर्खपणाच्या ओरडीनें भगदाडें आपोआप बंद होणार नाहींत. हिंदुसमाजात ज्या मुर्खपणाच्या व घाणेरड्या समजुती दृढमूल झाल्या आहेत, त्यांच्यामुळें हिंदू समाज विस्कळित व दुर्बळ बनलेला आहे, त्या समजुती व त्यांना अनुसरून असलेल्या चालीरीती यांच्याकडे लक्ष द्यावयाचें नाहीं आणि भलत्याच गोष्टीला नसतें महत्त्व देऊन आकाशपाताळ एक करावयाचें हा कालाचा व उत्साहाचा शुद्ध दुरुपयोग होय. जो कोणी बारकाईनें पाहील त्याला हिंदुधर्मांतील शेंकोडों माणसें दरदिवशी परधर्मांत कां जातात तें सहज कळून येईल. कित्येक ठिकाणी मुसलमान हिंदु लोकांच्या भेडकपणाचा फायदा घेऊन त्यांच्या बायका पळवीत आहेत आणि त्याखेरीज अनेक माणसें सामाजिक व धार्मिक जुलूमाला कंटाळून आपखूषीनें परधर्माचा अंगीकार करीत आहेत. अस्पृश्य मानलेल्या वर्गांतील लोकांची संख्या त्यांत मोठी आहे. शिवाय हिंदुसमाजांतील कित्येक जातींमध्यें विधवांच्या पुनर्विवाहाला बंदी असल्यामुळे उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या लोकांच्या घरांतल्या कैक विधवा मुसलमानांच्या बिबी होत आहेत. मग एकट्या मालिनीबाईच्या विवाहाविरूद्धच एवढी ओरड कां ? पांडवांच्या राजसूययज्ञाच्या वेळी पुष्कळ ब्राह्मण जेवलें तथापि स्वर्गांत घंटा वाजल्या नाहींत, परंतु शुकमहर्षि राधूच्या रुपानें शितें खाऊं लागले तेव्हां शितागणिक लक्षभोजन झालें म्हणून स्वर्गात घंटा वाजूं लागल्या अशी एक गोष्ट आहे. तसेंच महत्त्व खान-मालिनीविवाहाला द्यावयाचें असल्यास न कळे! म्हणजे

१ मिस् मालिनी पाणंदीकर=एक लक्ष किंवा एक कोटी हिंदु स्त्रिया, असें गणित करावें लागेल! दुसरी गोष्ट ही कीं, मालिनीबाईंनीं जो विवाह केला तो सामाजिक चालीरीतींना कंटाळून केला नाही. जबरीमुळें केला नाही ; किंवा फसवणूक झाल्यामुळें केला नाहीं. तो राजीखुषीने व अक्कलहुशारीने झालेला विवाह आहे. अशा विवाहाबद्दल त्या व्यक्तीला दोष देण्याचा-नांवें ठेवून छळ करण्याचा समाजाला अधिकार नाहीं आणि असें विवाह मधूनमधून व्हावयाचेच अशा प्रकारें छळ झाला म्हणून ते बंद होणार नाहीत. अशा क्वचित होणाऱ्या विवाहामुळे कमी होणाऱ्या संख्याबळापेक्षां इतर कारणांनीं कमी होणारें संख्याबल किती तरी मोठें आहे. पण तिकडे लक्ष न देतां अपवादभूत उदाहरणाचाच मोठा बाऊं करण्यांत येत आहे. महाराष्ट्रांतलीं बरीचशीं वर्तमान पत्रे म्हणजे

## अज्ञ लोकांना मूर्ख बनविण्याचे कारखाने

आहेत. लोकांना कोणत्या मुद्यावर मूर्ख बनवून आपल्या पत्राचा खप वाढविता येईल याचें या धूर्त पत्रकारांनीं एक शास्त्रच बनविलें आहे आणि आपल्या लेखनकलेचा त्याच कामीं ते उपयोग करीत असतात. हे लेखक मोठे धार्मिक वृत्तीचे, प्रामाणिकपणें जुन्या समजुतीचे आहेत, असें मुळींच नाहीं. त्यांच्या काळजाला हिंदु पुरुषांनीं यूरोपीयन स्त्रियांशीं लग्नें केल्यास मुळींच धक्का बसत नाहीं. मद्यमांसाची तरफदारी करणाऱ्या लोकांनाही ते सत्पात्र ब्राह्मण आणि हिंदू समाजाचे पुढारी समजतात.' धर्माच्या नांवावर होणारे अनाचार व अत्याचार त्याना बिनदिक्कत खपतात. ' न लोक : पारमार्थिक :' म्हणजे साधारण लोक स्वतःच्या बुद्धीनें व बारकाईने विचार करणारे असतात हें त्यांना पक्के ठाऊक असतें व त्यामुळें धर्माभिमानाच्या ढोंगाखाली ते स्वार्थ साधूं शकतात. सरकारच्या विरूद्ध लिहिलें तर पीनलकोडचें १२४ (अ) कलम आणि मुसलमानांच्या विरूद्ध लिहिलें तर १५३ (अ) कलम आपल्याला लागू होईल म्हणून सरकारच्या किंवा मुसलमानांच्या वाटेला न जातां, लोकांना मूर्ख बनवून फुकटची लोकप्रियता मिळविण्याचा सोपा मार्ग ते शोधून काढतात. विघातक कृत्यें करण्यावर यांचा धंदा व उदरनिर्वाह चालतो. एखादी संस्था चांगल्या रीतीनें चालत असली तर ती यांच्यानें पाहवत नाहीं. तिच्याविषयीं अज्ञ लोकांत गैरसमज उत्पन्न करावयाचा हेंच यांचें शतकृत्य! हिंदुसंघटक व शुद्धी यांच्याविषयी खरोखरच जर यांना कळकळ असती तर हिंदुसमाजाच्या इमारतीला जीं भगदाडें पडलीं आहेत तीं बुजविण्याकडे यांनी लक्ष दिलें असतें. परवां नागपूर येथें हिंदु महासभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्यानें

## सर शंकरन् नायर यांनीं केलेला उपदेश †

हिंदुसमाज लक्षांत ठेवील तरच खरें हिंदुसंघटन अस्तित्वांत येईल. जातिभेद-निराकरण व अस्पृश्यतानिवारण हीं जोपर्यंत झालीं नाहींत तोपर्यंत संघटनांच्या व शुद्धीच्या गप्पा व्यर्थ आहेत. पण खानमालिनीविवाहाविरुद्ध सारखी ओरड करणारे लोक या प्रश्नावर कधीं कळकळीनें लिहितील तर शपथ ! कारण त्यांना पक्कें ठाऊक आहे कीं, अशा विषयांवर लिहिलें तर अज्ञ लोकांना तें आवडणार नाहीं आणि आपल्या पत्रांच्या प्रती अधिक खपणार नाहींतच, पण असलेला खप मात्र कमी होईल ! लोकांना मूर्ख किंवा माथेफिरू बनविणें सोपें असतें, पण शहाणपणा शिकविणे सोपें नसतें. जर या लेखकांना आपल्या लेखनकौशल्याची घमेंड असेल तर त्यांनी अशा विषयांवर लेख लिहून आपल्या पत्राची लोकप्रियता थोडी तरी वाढवून दाखववावी. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे एकीकडे ढोंगीपणा आणि दुसरीकडे विचारशून्यता यांच्यामुळें मूर्खपणाला व निष्कारण माथेफिरूपणाला उत्तेजन मिळतें. अशा मूर्खपणामुळें हिंदुसमाजाचा फायदा न होतां उलट तोटाच होईल. एक तर यामुळें समाजाची दिशाभूल होते, योग्य उपायांकडे दुर्लक्ष होते आणि गैरमुत्सद्दीपणामुळें हिंदुंच्या प्रतिपक्षाचा मात्र फायदा होतो. खानमालिनीविवाहावर टीका करतांना कित्येक पदवीधर लेखकांनी गटारें उपसलींच, पण कित्येक पदवीधर वक्त्यांनी जाहीर सभांत अश्लील ध्वनी काढून आपल्या मनोवृत्तीच्या क्षुद्रतेचें जाहीर प्रदर्शन केलें आणि आपल्या उच्च शिक्षणाला काळिमा आणला ! शिवाय या घाणेरड्या चळवळींत गैरमुत्सद्दीपणाचेंही प्रदर्शन झालें. या लोकांना शुद्धीची जर खरोखर कळकळ असती तर मि. व मिसेस खान यांना हिंदुसमाजांत आणण्याचे प्रयत्न त्यांनीं केले असतें. कदाचित थोड्या वर्षांनी ते प्रयत्न यशस्वी होऊन मि. खान हे हिंदु निदान ब्राम्हो तरी झाले असते. सर शंकरन् नायर यांच्या नागपूर येथील भाषणांत असा एक उल्लेख आढळतो कीं, मद्रास इलाख्यामध्यें रोमन कॅथोलिक पाद्री आपल्या धर्मांतल्या तरुणींशीं हिंदूंनी लग्नें लावावीं अशासाठी प्रयत्न करीत ; हेतु हा कीं, ते हिंदु लोक आपल्या धर्माच्या जाळ्यांत अडकावेत. मि. व मिसेस खान यांच्याविरुद्ध एवढा गवगवा करण्यांत आला नसता, मिसेस खान यांच्यावर शिव्याशापांची लाखोली वाहण्यांत आली नसती आणि हिंदु समाजांत त्या उभयतांना प्रेमानें वागविण्यांत आलें असतें तर त्यांना आत्मसात् करणें हिंदु समाजाला शक्य झालें असतें. एखाद्या हिंदूनें मुसलमान स्त्रीशीं विवाह केला असता तर ' श्रद्धानंद '

---

† पाहा, परिशिष्ट - २५.

प्रभृति संघटन शुद्धिवादी पत्रांची हरकत नव्हती असें त्यामधील लेखांवरून दिसतें. तेवढाच प्रश्न असेल तर उद्यां एकाद्या खदिजा बिबीशीं किंवा फातिमा बिबीशीं एकादा पंत किंवा राव लग्न लावील व फिटाफिट होऊन जाईल. मग त्याबद्दल इतका आक्रोश कशाला ?

●●●

---

अग्रलेख, बहिष्कृत भारत, ता. १२ ऑगष्ट १९२७.

# ५८

# वऱ्हाडांतील ब्राह्मणेतर पक्ष आपल्या सत्वाला नेहमींचा जागता आहे

वऱ्हाडप्रांतांत उमरावती येथें श्रीअंबादेवीचें एक पुरातन देवालय आहे. या देवालयाची व्यवस्था करण्याकरितां एक पंचकमिटी स्थापन झालेली आहे. सदर्हू देवालयांत आपला प्रवेश व्हावा म्हणून तेथील स्थानिक अस्पृश्य लोक गेल्या दोन वर्षांपासून अर्जद्वारें देवस्थान कमिटीकडे विनवणी करीत असत. गतसालीं सदर्हू व्यवस्थापक कमिटीने अस्पृश्यांच्या अर्जावर खालील ठराव पास केला. " श्रीअंबादेवी-संस्थान व एकवीरादेवी-संस्थान ही संस्थानें फार प्राचीन असून आजपर्यंत अस्पृश्य दर्शनास आले नाहीत, व त्यांना येऊं देण्यानें जवळ जवळ सर्वच सनातन-धर्मीयांच्या मनोवृत्तीस जबर धक्का बसून समाजामध्यें प्रक्षोभ उत्पन्न होण्याचा संभव आहे. समाजाची घडी एकदम बिघडविणें बरेंच धोक्याचें आहे. ही सभा सनातनधर्मीय नागरिक लोकांकडून नेमलेली असून सर्व बाबतींत पूर्णपणें त्यांस ती जबाबदार आहे. आजपर्यंत ह्या सभेस अशा प्रश्नाचा विचार करण्याचा प्रसंग आला नव्हता. वर्णाश्रमधर्माप्रमाणें सर्व सनातनधर्मीय समाज चालत आहे व अस्पृश्यांनींहि आपआपलीं देवळें निराळीं ठेविलीं आहेत, व इतर जातींच्या धार्मिक भावना दुखावण्याचा प्रयत्न केला नाहीं. काशी, पंढरपूर, वगैरे मोठमोठ्या क्षेत्रांतही अद्यापपर्यंत अस्पृश्यांना देवळांत येऊं देण्याचा प्रघात पडलेला दिसून येत नाहीं. हल्लींच्या काळांत हा प्रश्न सनातनधर्मीय बहुजनसमाजापुढें आलेला आहे व सनातनधर्मीय सर्व समाजाचें या प्रश्नांसंबंधीं एकमत झालेलें दिसून आल्यांशिवाय पूर्वापार अनेक वर्षें चालत आलेला वहिवाट मोडून टाकतां येत नाहीं व या प्रश्नाचा निकाल आजच करतां येत नाहीं, याबद्दल या सभेस दिलगिरी वाटते." यानंतर उमरावतीचे सुप्रसिद्ध नागरिक श्री. दादासाहेब पाटील यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २७-७-१९२७ रोजीं अस्पृश्यांची एक जाहीर सभा भरवून श्री अंबादेवीच्या देवस्थान-कमिटीकडे दुसरा एक अर्ज करण्यांत आला. त्यांत अस्पृश्यांना पंधरा दिवसांच्या आंत श्री अंबादेवीच्या देवालयांत जाऊं न दिल्यास अस्पृश्य लोक त्या बाबतींत सत्याग्रह करतील अशा अर्थाचा एक ठराव देवस्थान-कमिटीकडे पाठविण्यांत आला. त्यावर ता. २१-८-१९२७ रोजीं देवस्थान-कमिटीनें खालील ठराव पास केला. या

कमिटीला कदीमची रूढी मोडण्याचा अधिकार नाहीं. कमिटीनें अस्पृश्यांस देवळांत जाण्यास परवानगी दिल्यास त्यांच्यांत व इतर लोकांत तंटे उत्पन्न होऊन अनर्थ गुदरेल असें या सभेचें ठाम मत आहे. असें होऊं देणें या कमिटीस इष्ट वाटत नाहीं. सभा सनातन धर्मीय बहुजनसमाजास जबाबदार असल्यामुळें अर्जदारांनीं सनातन धर्मीय बहुजनसमाजाची प्रवृत्ति अस्पृश्यांस या देवळांत जाऊं देण्यास तयार करावी, व तशी प्रवृत्ति दिसून आल्याचीं चिन्हें दिसतांच ही सभा या प्रश्नाचा विचार करील. तथापि सत्याग्रह करणें झाल्यास अस्पृश्यांनीं आपले जबाबदारीवर करावा, व त्याचा वाईट परिणाम निघाल्यास त्याची जबाबदारी अर्जदार व त्यांचे पुरस्कर्ते यांच्यावर राहील. या टोलवाटोलवीच्या उत्तरानें आम्हांस कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. जांवई पाहुणा आला असतांनाहि न पान्हवणारा टोणगा एखाद्या वेळीं पान्हवेल, पण वाटेल तो प्रसंग आला, तरी ब्राह्मण्यग्रस्त स्पृश्य लोकांना अस्पृश्यनिवारणाचे बाबतींत कधींहि पाझर फुटणार नाहीं हें आमच्या अस्पृश्य बंधूंनी केव्हांही विसरतां कामा नये. या बाबतींत अस्पृश्यांनीं आपली माणुसकी उजवण्यासाठीं देवळांत प्रवेश करण्याचा प्रयत्न केला नाहीं तर त्यांचा प्रवेश केव्हांहि होणें शक्य नाहीं. यास्तव अर्ज व विनंत्या यावर अवलंबून न रहातां, आमच्या उमरावतीकर अस्पृश्य बंधूंनीं श्रीअंबादेवीच्या देवालयांत शिरण्याचा जो निर्धार केला आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करितों.

नेहमींच्या सरावास अनुसरून पंचकमिटीनें बहुजनसमाजाचें लोकमत म्हणजे ब्राह्मणेतर जनतेचें लोकमत अस्पृश्यांस देवालयात प्रवेश करूं देण्यांस अजून तयार नाहीं अशी सबब दाखविली आहे. ही सबब जरी खरी असली तरी या सत्याग्रहाच्या कामीं आमच्या उमरावतीकर अस्पृश्य बंधूंना माघार घेण्यांचें कांहीं कारण नाहीं. त्यांच्या सुदैवानें त्यांना या सत्याग्रहाच्या बाबतींत जी ब्राह्मणेतर जनता विरूद्ध आहे असें भासविण्यांत येतें, याच ब्राह्मणेतर जनतेचे सामान्य पुढारी सहाय्य करण्यास तयार आहेत. मुंबई इलाख्यांतील ब्राह्मणेतर पक्षासंबंधाने † अस्पृश्य वर्गांतील लोकांना आदर वाटत नसल्याचे कांहीं प्रसंगीं दिसून येतें. निदान ज्या हेतूनें तो पक्ष अस्तित्वांत आला, तो हेतु साध्य करण्यास ज्या गोष्टी करणें अवश्यमेव आहे त्याकडे या पक्षांनी इतकें दुर्लक्ष केलें आहे कीं, आपला आद्य हेतु या लोकांच्या ध्यानीमनींदेखील नाहीं असा भास होतो. परंतु वऱ्हाडांतील ब्राह्मणेतर पक्ष आपल्या सत्वाला नेहमींचा जागता आहे याची आम्हींच काय पण ज्याला त्याच्या कामगिरीची माहिती आहे, असा कोणीहि ग्वाहि देऊं

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक - २६.

शकेल. असे लोक सहाय्यकर्ते असतांना आमच्या उमरावतीकर अस्पृश्यबंधूंनीं श्रीअंबादेवीच्या देवळांत प्रवेश करून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं तर स्पृश्य लोक अस्पृश्यता काढून टाकण्यास तयार नाहींत असें म्हणण्याऐवजीं अस्पृश्य लोक आपली अस्पृश्यता घालवून देण्यास तयार नाहींत असें म्हणावे लागेल.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २ सप्टेंबर १९२७.

# ५९

# शुद्धीकरणवाल्यांच्या खोट्या धर्माचे मरण आज येणारें उद्यांवर जाईल पण अमर राहत नाहीं हे खास !

वासरूं जसें एकदां सडकून दूध प्यालें कीं, त्यांच्या आंगांत वारें शिरतें व तें बेभान इकडून तिकडे नाचावयास लागतें. तसेंच शुद्धिकार्यास सुरवात झाल्यापासून सनातन धर्मवाद्यांच्या मनांत एक प्रकारचें वेडसरपणाचे वारें खेळू लागल्याचें दिसून येत आहे. आजवर फक्त हिंदुस्थानांतील मुसलमान लोकांनाच हिंदुधर्माच्या गर्तेत ओढून घेण्याची शुद्धिकार्यवाल्यांची प्रतिज्ञा होती ; परंतु कमाल पाशानें तुर्कस्थानांत कोणाला कोणत्याही धर्माचा पुरस्कार करण्याची मुभा दिली आहे. त्याबरोबर शुद्धीच्या वेडाच्या वाऱ्यात कांहीं सनातनी लोकांना तुर्कांची शुद्धि करून त्यांना हिंदु करण्यासाठीं तुर्कस्तानांत जाण्याची उत्कंठा झाली आहे. हा सगळा प्रकार पाहिला म्हणजे हिंदु सभा हिंदुसमाज समर्थ करू शकेल याबद्दल जबरदस्त शंका येते. हिंदु सभेच्या कार्याची संघटना व शुद्धि अशीं दोन कार्ये आहेत. या दोन कार्यांपैकीं आमच्या मतें संघटना हेंच जास्त महत्त्वाचें कार्य आहे. आमचें तर असें मत आहे कीं, हिंदूंनीं आपलें संघटन केलें तर शुद्धीची कांहींच आवश्यकता उरणार नाहीं. शुद्धीकरणाचा मुख्य हेतु म्हणजे हिंदूंचें संख्याबल वाढविणें हा होय. हिंदु मुसलमानांच्या दंग्यांत हिंदूंची जी दाणादाण होते ती हिंदु लोक अल्पसंख्यांक आहेत म्हणून होते असें जर म्हणता येईल तर हिंदु समाजाच्या तरणोपायास शुद्धि अवश्य आहे हें कबूल करावें लागेल. पण हिंदु लोक बहुसंख्यांक असून त्यांना ज्यांच्याकडून मार खावा लागत आहे, तेच मुसलमान लोक अल्पसंख्यांक आहेत ही वस्तुस्थिति जर हिंदु महासभेचे लोक नुसते डोळे उघडे ठेवून ध्यानांत घेतील तर त्यांना कळून येईल कीं, हिंदु समाजास समर्थ करण्यास शुद्धीची आवश्यकता नाहीं.

इतकेच नव्हे तर आम्ही असेंही सांगूं शकतों कीं, हिंदुसमाजाची संघटना झाल्याशिवाय शुद्धीचें कार्य केव्हांही यशस्वी होणार नाहीं. याचें कारण थोड्या विचारांतीं सहज कळून येण्यासारखें आहे. तुलनात्मक दृष्टीनें ज्यांनीं हिंदु

धर्माचा अभ्यास केला आहे त्यांच्याकडून असें सांगण्यांत येतें कीं, हिंदुधर्मांत व इतर धर्मांत जो एक महत्त्वाचा फरक आहे तो हा कीं, हिंदुधर्म हा जसे इतर धर्म शोधक धर्म आहेत तसा हिंदुधर्म हा शोधक धर्म नाहीं. ह्या मतास विशेष कांहीं आधार आहे असें नाहीं. आधार काय तो इतकाच कीं, आज कितीएक शतकांपासून शुद्धीकरण झाल्यानें हिंदुत्व पावल्याचें उदाहरण घडलेले नाहीं ; पण एवढ्यावरून हिंदुधर्म हा केव्हांही शोधकधर्म नव्हता असें म्हणतां येणें शक्य नाहीं. उत्तर हिंदुस्थानाच्या एका टोंकावर राहाणाऱ्या मूठभर आर्यांचा धर्म सारा हिंदुस्थान देश व्यापून उरला ही असाधारण गोष्ट हिंदुधर्म शोधक असल्याशिवाय घडली असेल हें असंभवनीय आहे. आर्यांपासून संस्कृतीनें, रूपरेखेनें, रंगानें अगदी निराळे असणारे द्रवीड लोक ज्या हिंदुधर्मानि आत्मसात् करून घेतले तो हिंदुधर्म कांहीं शतकांपूर्वी तरी शोधकधर्म असलाच पाहिजे. तेव्हां विचारांत घेण्यासारखा प्रश्न जो आहे तो हा की, एके काळीं, शोधक असलेला हिंदुधर्म शुद्धीस प्रतिकूल कां झाला ?

याचें उत्तर आमच्या मतें अगदी सोपें आहे. शुद्धीकरणास सामाजिक परिस्थिति एकवर्णी असावी लागते. कोणी परकीय मनुष्य एक धर्म सोडून शुद्धीकरणाद्वारें दुसऱ्या धर्मात गेला तर त्या धर्मांत त्याचे सामाजिक व्यवहार घडून आले पाहिजेत. म्हणजे त्यांच्यांत व मूळधर्मीयात रोटी-बेटी व्यवहार होणें अवश्य आहे. व समाज एकवर्णी असल्याशिवाय परस्परांत रोटी-बेटी व्यवहार घडणें शक्य नाही. हाच न्याय हिंदु धर्मास लागू केला असतां असें दिसून येईल कीं, जोंपर्यंत हिंदुसमाज एकवर्णी होता तोंपर्यंत त्याला शुद्धीकरणाचें कार्य करतां आलें. तेच एक वर्णाचे चार वर्ण व चार वर्णांच्या चार हजार जाती झाल्या त्यावेळीं शुद्धीकरणाचें कार्य आपो-आप बंद झालें. तें बंद होणें अपरिहार्य आहे. कारण जेथें एकवर्णी समाजाच्या चार हजार जाती झाल्या तेथें शुद्धीकरणद्वारें हिंदुधर्मांत येऊं पाहाणाऱ्या परधर्मीयांस कोणत्या जातींत व कोणत्या धर्मांत जागा द्यावयाची या नडीच्या प्रश्नास कांहीं तोडच सांपडत नाहीं. याला जी एक तोड आहे ती हीच कीं, हिंदुसमाज एकवर्णी करणें ; म्हणजे आधीं संघटणेच्या कार्याला हात घालणें हेंच होय. आमच्या शुद्धिकरणवाल्या लोकांना वरील युक्तिवाद कळत नाहीं किंवा पटत नाहीं अशांतला कांही भाग नाहीं. परंतु हिंदुसमाजाची घडी आहे तशी कायम ठेवून हिंदुधर्मावर महंमदीधर्मीयांकडून मिळणाऱ्या हल्ल्यांचा प्रतिकार करावयाचा आहे, एवढाच त्यांचा हेतु आहे. नाहीं तर त्यांनीं संघटणेच्या कार्याकडे दुर्लक्ष करून घरची घाण उपसून टाकण्याऐवजीं तुर्कस्थानाची शुद्धि

करण्याची क्लुप्ति काढली नसती. आमच्या शुद्धीकरणवाल्यांस आमचा एवढाच इशारा आहे कीं, त्यांच्या खोट्या धर्माचें मरण अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे, त्यांच्या या लपंडावांनीं आज येणारें मरण उद्यांवर जाईल ; पण तो अमर राहत नाहीं हें खास !

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २ सप्टेंबर १९२७.

# ६०

# ब्राह्मणांच्या अन्याय वर्तनावर टीका करणारे ब्राह्मणेतर अस्पृश्यांवर कांहीं कमी अन्याय करीत नाहींत

हिंदुस्थानांतील ज्या कांहीं प्रांतांत ब्राह्मणेतर चळवळ चालू आहे त्यांत मद्रास इलाख्यांत ती जितक्या जोरानें चालू आहे तितक्या जोरानें दुसरीकडे कोठेंच चालू नाहीं. या मद्रास येथील ब्राह्मणेतर पक्षानें स्वतःस ब्राह्मणेतर पक्ष म्हणविण्याऐवजीं स्वतःस जस्टिस पक्ष म्हणजे न्यायपक्ष असें नांव घेऊन आपल्या कार्यास सुरवात केली होती. न्यायासाठी झगडा करावयास सिद्ध झालेले लोक ज्या अस्पृश्यांना सर्वांपेक्षां जास्त अन्याय सोसावा लागत आहे त्यांना मदत करून त्यांच्यावर होत असलेला अन्याय दूर करतील अशी सबळ आशा वाटत होती ; परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, न्याय करण्याच्या सबबीवर अधिकारारूढ झालेल्या या लोकांनीं ब्राह्मणांविरूद्ध मद्रास एथील अस्पृश्यांना कांहीं मदत तर केली नाहींच पण अस्पृश्यांना ज्या सवलती देण्याचे सामर्थ्य त्यांच्या हातीं होतें त्या सवलती देण्याचा उदारपणादेखील त्यांना दाखवतां आला नाहीं. याचें उदाहरण नुकतेंच घडून आलें आहें. कांहीं वर्षांपूर्वी पच्चाप्पा नांवाच्या एका ब्राह्मणेतर गृहस्थानें एक मोठा निधि ठेविला होता व त्यांतून ब्राह्मणेतर वर्गाच्या शिक्षणाची तरतूद करण्यांत यावी अशी इच्छा प्रदर्शित केली होती. त्याप्रमाणें व्यवस्था होऊन एक कॉलेज व कांहीं शाळा चालविण्यांत येत आहेत. ह्या शाळा व कॉलेज यांची व्यवस्था ठेवण्याकरितां एक पंचमंडळ नेमण्यांत आलेलें आहे. चालू सालीं एक पंचम जातीच्या एका विद्यार्थ्यानें पच्चाप्पा कॉलेजमध्यें आपला प्रवेश व्हावा म्हणून कॉलेजच्या प्रिन्सिपालकडें अर्ज केला. या अस्पृश्य जातीच्या मुलास कॉलेजमध्ये घेणें त्यास जोखमीचें वाटल्यावरून त्यानें ही बाब पंच कमिटीकडे निकालांत काढण्यासाठी पाठवून दिली. या पंचकमिटींत ब्राह्मणेतरांचे बहुमत आहे. असें असतांनाहि अस्पृश्य विद्यार्थ्यांस पच्चाप्पा कॉलेजमध्यें घेतां येत नाहीं असा निकाल दिला. या निकालाविरूद्ध मद्रास हायकोर्टाकडे फिर्याद दाखल करण्यांत आली होती व त्यांत अस्पृश्यविद्यार्थ्यास पच्चाप्पा कॉलेजमध्यें घेण्यास कोणतीच हरकत नाहीं असा निकाल देण्यात आल्याचें कळते. तथापि एवढी गोष्ट ध्यानांत

ठेवण्यासारखी आहे की, ब्राह्मणाच्या अन्याय्य वर्तनावर टीका करणारे ब्राह्मणेतर अस्पृश्यांवर कांहीं कमी अन्याय करीत नाहींत. या पंचकमेटींतील ब्राह्मणेतर लोक कांहीं अज्ञान लोक नाहीत. ते अज्ञान जर असते तर त्यांचे वर्तन ब्राह्मण्यास धरून आहे असें समजून त्यांची गय केली असती ; परंतु या पंचकमिटींतील कांहीं लोक तर जनतेचे पुढारी म्हणून मिरवीत असल्याचें ऐकिवात येतें. त्यांना तरी आपण कोणतें ध्येय स्वीकारलें आहे व तदनुरुप कोणतें वर्तन ठेविलें पाहिजे हें कळावयास हवे होतें. त्या ट्रस्टीपैकीं एक पुढारी आहे इतकेंच नव्हे तर अस्पृश्यतानिवारणावर नेहमींच झोड गाजवीत असे. परंतु याच पठ्यानें अस्पृश्यांविरूद्ध आपलें मत दिलें, इतकेंच नव्हे तर चार चौघांत या अद्यःपाताचें कारण विचारलें असतां, आपण जें केलें तें ट्रस्टी या नात्याने केलें. अशा प्रकारचा युक्तिवाद करून आपल्या तोंडाला लागलेली काळोखी पुसून टाकण्याचा प्रयत्न केला. अशा स्वभावाच्या लोकांनीं न्यायाचें कितीही मोठें सोंग आणले तरी तें फार दिवस टिकणें शक्य नाहीं. मद्रास एथील जनतेनें यांना जें पदच्युत केलें, तें कांहीं कारणाशिवाय केलें नाहीं.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २ सप्टेंबर १९२७.

# ६१

# महार आणि त्यांचे वतन

(१)

गेल्या वर्ष दोन वर्षांपासून महारकी वतनाची बरीच चर्चा सुरू झालेली दिसून येते. केवळ याच प्रश्नाचा विचार करण्यासाठी गतवर्षी नाशिक जिल्ह्यांत नांदगांव येथें व सातारा जिल्ह्यांत रहिमतपूर येथें महार समाजाच्या दोन प्रचंड सभा भरविण्यांत आल्या होत्या व त्या सभेंतून महारकी वतनाच्या बाबतींत कांहीं महत्वाचे ठराव पसार करण्यात आले होते. ते ठराव यापूर्वी प्रसिद्ध झालेले आहेत. तरीपण ते अस्पृश्य वर्गातील वाचकांच्या अवलोकनांत आले किंवा नाहीं, याविषयीं शंका वाटत असल्या कारणानें आम्ही ते आज दुसरीकडे छापले आहेत.† त्याचप्रमाणें नुकत्याच बेळगांव जिल्ह्यातील बहिष्कृत वर्गाच्या गांवनाळ येथें भरलेल्या सभेंत महारवतनासंबंधी कांही ठराव पास करण्यांत आल्याचें जाहीर करण्यात आले आहे. या चळवळीस अनुसरून डॉ. आंबेडकर यांनी वतन ॲक्टांत दुरुस्ती घडवून आणणारा एक कायद्याचा मसूदा तयार केलेला आहे व तो लौकरच मुंबईच्या कायदे कौन्सिलांत मांडण्यात येणार आहे.

एका दृष्टीने वतनाच्या प्रश्नाचा व्याप काय तो महार जातीपुरता आहे. पण दुसऱ्या दृष्टीनें पहातां या प्रश्नाचा व्याप दिसतो त्यापेंक्षा फारच मोठा आहे. सन १९२१ च्या मुंबई इलाख्याच्या खानेसुमारीवरून असे दिसतें कीं या इलाख्यांतील एकंदर लोकसंख्येंत मांग लोक दर हजारीं दहा व चांभार लोक दर हजारीं अकरा सापडतात. पण महार लोक दर हजारी ५० सापडतात. अस्पृश्यांतील इतकी मोठी लोकसंख्या वतनपद्धतीच्या सापळ्यांत अडकून जाऊन हतबल झाली असतां अस्पृश्यतानिवारणांचे कार्य यशस्वी होणे दुरापास्त आहे. अशा दृष्टीनें पहातां, महार वतनाचा प्रश्न नुसत्या महार जातीचा नसून महाराष्ट्रातील साऱ्या अस्पृश्य जातींचा आहे, असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. यास्तव या प्रश्नाचा सविस्तर विचार करण्याचा आज आमचा इरादा आहे. प्रथमतः

## वतन म्हणजे काय ?

हे समजून घेतलें पाहिजे. सन १८७४‡ च्या वतन ॲक्टांत '' कोणतीही वतनी मालमिळकत असल्यास ती व वंशपरंपरेचा हुद्दा व त्यासंबंधी हक्क व अधिकार

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक २७.

‡ पाहा, परिशिष्ट क्रमांक २८.

हीं मिळून वतन होतें," अशी ' वतन ' या शब्दाची व्याख्या करण्यात आलेली आहे. या व्याख्येवरून पहातां वतन या शब्दामध्ये दोन गोष्टींचा समावेश होतो, (१) वंशपरंपरेचा हुद्दा ; व (२) वतनी मालमिळकत. आता वंशपरंपरेचा हुद्दा, हें जरी वतनाचें एक अंग आहें, तरी त्यात सर्व प्रकारच्या वंशपरंपरेच्या हुद्यांचा समावेश होत नाही. एखादा हुद्दा केवळ वंशपरंपरागत चालतो, एवढ्यावरूनच तो वतनी हुद्दा आहे असें कायद्यावरून म्हणता येणार नाही. कारण वतन ॲक्टांत

## वंशपरंपरेचा हुद्दा याचा अर्थ

" सरकारी साऱ्याचा कारभार करण्यासंबंधी, किंवा तो वसूल करण्यासंबंधी, किंवा गांवचे पोलिसांसंबंधी, किंवा गांवच्या हद्दी ठरविण्यासंबंधी किंवा मुलकीं कारभाराच्या इतर बाबतींसंबंधी कामे करण्यासाठी वंशपरंपरेने धारण केलेला प्रत्येक हुद्दा असा ठरविण्यात आला आहे. या वंशपरंपरेच्या हुद्याची जी कायद्यांनी केलेली व्याख्या वर दिलेली आहे ती जुन्या परंपरेकडे पाहतां अगदीं संकुचित अशी आहे. पूर्वीच्या काळी दर गांवास वंशपरंपरेच्या हुद्देदारांची संख्या २४ असे. त्यापैकी बारा जणांना बलुतेदार व बाकी बारा जणांना अलुतेदार असे संबोधण्यांत येत होते. पेशवाईत अखेर या अलुते बलुतेदारांची संख्या इतकी फोफावली होती की, या चोवीस अलुते बलुतेदारांच्या जोडीस तितक्याच लोकांची भर पडली होती व त्या सर्वांना वतनदारांच्या यादींत समाविष्ट करण्यात आलें असें. जेव्हा इंग्रज सरकारचा अंमल सुरू झाला तेव्हा या बेसुमार वाढलेल्या वतनपद्धतीत छाटाछाट करण्याचा विचार ठरला व त्याप्रमाणे या अलुत्याबलुत्यांचे तीन वर्ग करण्यात आले. (१) सरकारअवश्यक वतनी गांव कामगार ; (२) रयतअवश्यक वतनी गांव कामगार ; व (३) सरकार व रयत यांस अनवश्यक असे वतनी गांव कामगार, यापैकी दुसऱ्या आणि तिसऱ्या वर्गांतील वतनदार जे सरकारला अवश्यक नाहीत अशांच्या इनामावर कर (जुडी) बसवून लोकोपयोगी कामाच्या तगाद्यापासून जरी नसलें तरी सरकारी नोकरीच्या तगाद्यापासून त्यांना मुक्त करण्यात आलें. तेणेंकरून त्यांची स्थिती आणि गांवातील रयतेची स्थिती सारखीच झाली व त्यामुळें त्यांना वतन ॲक्ट लागू करण्यात आलेला नाही. वतन ॲक्ट कायतो पहिल्या वर्गाच्या गांव कामगारांना लागू करण्यात आला आहे. कारण जे गांव कामगार सरकारी कारभार चालविण्यास आवश्यक आहेत अशा संबंधीच कायद्याचे बंधारण असणे जरूर आहे असे इंग्रजी अधिकाऱ्यांचे मत पडले. या नव्या व्यवस्थेमुळे पूर्वीचे बाराबलूते लयास जाऊन हल्ली वतन ॲक्टाप्रमाणे गांवचे कामगार म्हटले म्हणजे काय ते पाटील, कुळकर्णी आणि महार असे तीन असून कारणपरत्वें चौथा जागल्या असतो. यांपैकी आपल्या महाराच्या वतनाच्या गुणदोषाचाच काय तो विचार करावयाचा आहे.

## महारांची कामें निश्चित नाहींत.

कोणताहि नोकर झाला तरी त्यानें करावयाची कामे मुकरर असावयास पाहिजे आहेत. परंतु महार वतना संबंधी ध्यानांत ठेवण्या सारखी गोष्ट ही कीं महारांची कामे मुळीच निश्चित झालेली नाहीत. इतकेच नव्हे तर तीं मुद्दाम होऊन सरकारने अनिश्चित ठेवली आहेत. सन १८७४ चा वतन ॲक्ट जेव्हा पास करण्यात आला तेव्हा त्याच्या १८, ६९ व ८३ या कलमांवर वादविवाद चालू असतांना कांहीं लोकांनी महारांची कामें ठराविक करण्याच्या दृष्टीने त्या कलमांत फेरफार करण्यात यावा अशी सूचना त्यावेळी कायदेकौन्सिलांत आणिली होती. परंतु सरकारने आपल्याला महारासारखे कांही सांगकामे व हरकामे नोकर पाहिजे आहेत असा आग्रह धरल्यामुळे ती सूचना अमान्य झाली व महार लोक हे सरकारी गांव नोकर असल्यामुळे त्यांची कामे कोणती हे ठरविण्याचा अधिकार वतन ॲक्टाप्रमाणे जिल्ह्याच्या कलेक्टरास देण्यात आला. या अधिकारान्वये महारांना कोणती कामें करावी लागतात हें पाहावयाचे असल्यास कोणत्याहि गांवचे महारवतन प्रोसिडिंग पाहिल्यास कळून येण्यासारखे आहे. कांही दिवसांपूर्वी आमच्या हाती नाशिक जिल्ह्यांतील एका लहर गांवच्या महारवतन प्रोसिडिंगचे कागद आले होते. त्यात महारांनी करावयाची सरकारी कामे खालील प्रमाणे नमूद करण्यात आली होती. (१) वसूल गोळा करण्याच्या बाबतीत गांवच्या अधिकारी लोकांस मदत करणे. (२) तालुक्याचे गांवी अगर अधिकारी सांगतील त्या ठिकाणी टपालाची नेआण करणे. (३) तालुक्याचे कचेरीत वसूल पोहोंचता करणे. (४) जन्ममृत्यूची खबर गोळा करणे. (५) सरकारी अंमलदार गांवी येतील त्यांचा बंदोबस्त ठेवणे व त्यांची सांगतील ती कामे करणे व (६) अन्य प्रकारची कामे पडतील ती करणे. ही कामाची यादी कशी अघळपघळ व ऐसपैस आहे हे दिसतच आहे. ह्या कामांचा व्याप दिसावयाला अगदी थोडा दिसतो. पण ती कामे किती संतापदायक आहेत हे बिचाऱ्या महारांनाच ठाऊक ! साधी टपालाची बाब जरी घेतली तरी महाराला आठ दहा मैल मकान २ पैशाने जाणाऱ्या लखोट्यासाठी अन्नपाण्यांवाचून उन्हांत तळतळ करीत, अनवाणी रखडत जावे लागते ! ही ताबडणी काय थोडी झाली ! ! सरकारी अंमलदारांची कामे अशीच भरमसाठ आहेत. अंमलदारांचा बंदोबस्त ठेवणे म्हणजे नुसते त्यांचा तंबू डेरा ठोकून त्यास सावली करून देणे, किंवा त्यांना बाजार हाट आणून त्यांची सरबराई करणें इतक्यानेच संपत नाही. अंमलदारांचे घोडे व बैल सोडणे, त्यांना चंदी पाणी पुरविणे, त्यांना खरारा करणे वगैरे कामे सरकारी कामे नाहीत असा महारांचाच काय पण कोणाचाहि

समज होणे शक्य आहे पण तो समज खरा नाही. नाशिक जिल्ह्यांतील देवळें येथील महार लोकांनी आपण मामलेदार साहेबांच्या घोड्याचा खरारा करणार नाहीं असा आग्रह धरल्यामुळे बरीच भानगड उपस्थित झाली होती. त्यात खरारा करण्याचे काम सरकारी नाही हे खास, अशी मनाशी गांठ बांधून आमची कामे काय तीं लिहून द्या असे महारांनी मोठ्या दिमाखाने सरकारी अधिकाऱ्यांस विचारलें. पण लिहून आलेली कामाची यादी वाचून पाहतात तों त्यात खरारा आहेत ! याचे कोणासहि आश्चर्य वाटण्याचें कांहीच कारण नाही. महारांच्या कामाची व्याख्याच इतकी ढोबळ करण्यात आली आहे की त्यात वाटेल ते काम व्याख्येला बाध न आणता घुसडून देता येण्यासारखे आहे. कोणत्याहि अंमलदाराला वाटेंला लावणें अर्थात तो अधिकारी टांग्यांत किंवा घोड्यावरून जात असल्यास त्याच्या घोड्याबरोबर अथवा टांग्याबरोबर एका मुक्कामाहून दुसऱ्या मुक्कामापर्यंत धावतं जाणें हें महारांनी करावयाच्या सरकारी कामांपैकी एक काम आहे असे गणलें जातें. रिकामे जाणे झाले तर थोर नशीब ! नाही तर माथ्यावर बिगार असावयाचीच. बिगार ही कायद्यात कोठेच सांगितली नाही. पण अंमलदारांचा बंदोबस्त ठेवणे व ते सांगतील ती कामे करणे या अनुज्ञेत वेठबिगारीचा समावेश होतो. ही बिगार म्हणजे बेबंदशाही आहे. तिला धरबंध कांहीच नाही ! उपरनिर्दिष्ट देवळें येथील महार लोकांनी कलेक्टरकडे केलेल्या अर्जात ज्या प्रकारच्या बिगारीसाठी आपल्याला ताबडण्यात येतें अशी तक्रार केलेली आहे, त्याचा तपशील देतांना. (१) जोड्यांच्या बिगारी ; (२) बुटांच्या बिगारी ; (३) म्हशींच्या बिगारी ; (४) गाईंच्या बिगारी ; (५) बकऱ्यांच्या बिगारी ; (६) घोड्यांच्या बिगारी ; (७) बैलांच्या बिगारी ; (८) राघू मैनांच्या पिंजऱ्यांच्या बिगारी ; (९) पाळीव हरणांच्या बिगारी ; (१०) कुत्र्यांच्या बिगारी ; (११) पलंगाच्या बिगारी ; (१२) पेट्यांच्या बिगारी ; (१३) भांड्यांच्या बिगारी ; (१४) मुलींच्या बिगारी ; (१५) मुलांच्या बिगारी ; (१६) जात्यांच्या बिगारी ; (१७) शिपायांच्या गळ्यांतल्या पोतड्याच्या बिगारी ; (१८) बंदुकीच्या बिगारी ; (१९) तलवारीच्या बिगारी ; (२०) कांद्याच्या बिगारी ; (२१) भाजीच्या बिगारी ; (२२) चाकांच्या बिगारी ; (२३) आंब्यांच्या बिगारी ; (२४) लाकडांच्या बिगारी ; (२५) कंबरेच्या पट्ट्यांची बिगारी ; (२६) जाजमांच्या बिगारी ; (२७) कपड्यांच्या बिगारी ; (२८) पार्सलाच्या बिगारी ; (२९) उसांच्या बिगारी ; (३०) चाबकांच्या बिगारी ; (३१) नांगराच्या बिगारी ; (३२) खुर्च्यांच्या बिगारी ; (३३) फळांच्या बिगारी ; (३४) बाजेच्या बिगारी ; (३५) माचवेबाज यांच्या बिगारी ; (३६) खोगिरांच्या बिगारी ; (३७) टेबलांच्या बिगारी ; (३८) पोत्यांच्या बिगारी ; (३९) गाडीचे जूंचे बिगारी ; (४०) सबळा जोते यांच्या

बिगारी ; (४१) मडक्यांच्या बिगारी ; (४२) टिकावांच्या बिगारी ; (४३) फावड्यांच्या अशा एकूण ४३ प्रकारच्या बिगारींची यादी दिली आहे. खरे पाहिलें असतां सरकारी पार्सल किंवा दप्तर याची ने आण करणे येवढाच काय तो वेठबिगारीचा व्याप कायद्याच्या दृष्टीने असू शकतो. पण या वेठबिगारीच्या बाबतींत किती आंदाधुंदी चालते हे वरील यादीवरून उघड होत आहे. सरकारी कामाचा तींत कोठे मागमूसहि नाही. या कामी अधिकाराचा इतका दुरुपयोग व इतकी बेदाद करण्यात येत आहे की सरकारी काम बाजूस राहून वेठबिगारी म्हणजे आल्यागेल्या अंमलदारांच्या खाजगी सामानाची वाहतूक याशिवाय त्यांत दुसरे कांहीच उरले नाही.

या बिगारी घेऊन जाण्याचे टप्पेहि कांही जवळचे नाहीत. नगर देवळें येथील लोकांना बिगार नेण्याची ठिकाणे म्हणजे (१) देवळे ते मटाणे ; (२) देवळे ते बिलेवाडी ; (३) देवळे ते लोहनेर ; (४) देवळे ते भाटवडे ; (५) देवळे ते पिंपळगांव ; (६) देवळे ते वासारी ; व (७) देवळे ते वाजगांव. देवळें पासून ही गावे कांही हांकेवर नाहीत. मटाणे खेरीजकरून बाकीची सर्व गांवे देवळेपासून अजमासे ५ मैल आहेत. यावरून उघड आहे की बिगारीची नेआण करण्याकरिता या महारांना १० मैल मकान पायाखाली तुडवावे लागते. सरकारी कामे निश्चित नाहीत ती नाहीत. पण सरकारच्या अनेक खात्यांपैकी कोणत्या खात्यांची कामे महारांनी करावयाची हे तरी निश्चित असावयास पाहिजे होते. पण तसेहि सरकारकडून अद्यापी करण्यात आलेले नाही. खालच्या प्रतीचा जरी कामगार झाला तरी ज्या खात्यांत त्याची नेमणूक झाली असेल त्या खात्याच्या बाहेरील काम त्यास कोणी सांगत नाही. न्याय खात्यांतील शिपायाला कोणी अबकारी खात्यांतले काम सांगत नाही. रेव्हेन्यु खात्यांतल्या शिपायास कोणी पोलिस खात्यांत कामगीरीवर पाठवित नाही. परंतु कामगार महाराच्या बाबतींत हा नियम मुळींच लागू केलेला दिसत नाही. वसुलीच्या बाबतीत महाराला तो रेव्हेन्यु खात्याचा शिपाई म्हणून राबविला जातो. जन्ममृत्यूच्या नोंदणीच्या प्रसंगी तो आरोग्य खात्याचा शिपाई म्हणून धरला जातो. मोजणीच्या वेळी सर्वे सेटलमेन्ट खात्यांत त्याला जमा केला जातो. जंगलासंबंधी कामे करतांना तो फॉरेस्ट खात्याचा शिपाई गणला जातो. कोंडवाड्याच्या कामी पोलीस खात्यांत त्याची हजेरी लागते. कोणतेंहि नवे खाते उघडण्यात आले आणि त्याला गांवगन्ना शिपायाची जरुरी लागली की महाराला बोलावणे आलेच म्हणून समजावे. एकूण हे उघड आहे की एकरूपी महारास बहुरूप्याचे सोंग घेण्यास लाऊन त्याच्याकडून सरकार अनेक कामे बीनधास्त करवून घेते. हा अन्याय आहे हे कोणालाहि कळण्यासारखे आहे. खुद्द इंग्रज अंमलदारांच्या

घरामध्यें पाहिलें असतां असें दिसून येईल कीं बुटलेर कुकचें काम करणार नाही ; कुक मेसमनचें काम करणार नाहीं ; मेसमन बॉयचें काम करणार नाही; व ही कामाची खातेवार व्यवस्था त्याच अंमलदारांना न्याय वाटते परंतु अनेक खात्यांकडून होणाऱ्या मागणींना महारांनी पुरें पडावें असे हुकूम सोडतांना याच अंमलदारांना आपण अन्याय करीत आहोंत असें मुळींच वाटत नाही ! कामें कोणतीं हें निश्चित नाहीं तर नाहीं पण

## माणसें किती हेहि निश्चित नाही.

जशी महारांची कामे म्हणजे सांगतील तीं, तशीं महारांचीं माणसें राबायला मिळतील तेवढीं ! गांव कामगार महारांच्या बाबतीत ज्याप्रमाणें कामें नियमित नाहीत किंवा खातीं नियमित नाहींत त्याप्रमाणें कामावर माणसें किती नेमावयाची हेंहि नियमित नाही. नाही म्हणावयास सरकारी ठराव आहे कीं गांवची लोकसंख्या १ ते ५०० असेल तर गांवाला १ कामगार महार नेमावा. लोकसंख्या ५०१ ते १००० जर असेल तर २ कामगार महार नेमावेत व पुढे दर १००० लोकसंख्येला १ अधिक महार नेमावा. परंतु वस्तुस्थितीचा व या ठरावाचा ताळमेळ कोठेंच दिसत नाहीं. असे सांगण्यात येतें की, नगर जिल्ह्यांत ४ हजार वस्तीच्या पारनेर येथे ३२ व ८ शें वस्तीच्या ठाकूर पिंपळगांव येथे ८ व १६२५ वस्तीच्या धांदरफळ गांवीं १६ महार राबतात ! सरसकट २५० चौरस मैल क्षेत्र व पाऊण लाख लोकवस्ती असणाऱ्या तालुक्याला १५ / १६ मुलकी शिपाई व ३० / ३५ पोलीस शिपाई पुरतात. तर टीचभर खेड्यांत आणि मूठभर वस्तीत येवढें मोठें कामगार महाराचें दळ राबविण्यांत यावें हें आश्चर्यकारक नव्हे काय ?

कामें नियमित नाहींत, खाती नियमित नाहींत, माणसे नियमित नाहींत ! पण

## कामाचे तास तरी नियमित आहेत काय ?

तेही नाहींत !! २४ तास कामावर हजर असलें पाहिजे. कोणत्या वेळी कोणता अधिकारी येईल आणि बिगार न्यावयास सांगेल याचा नेम नाहीं. पुरुष हजर नसला तर बायको, बायको नसली तर मुलगा किंवा मुलगी व तीही हजर नसली तर म्हातारा किंवा म्हातारी ! कोणी तरी बदली म्हणून काम करण्यास एका पायावर तयार असलेच पाहिजे. मग ते काम कोणत्याहि वेळीं येवो. रात्र म्हणतां येणार नाहीं, आजारी आंहे म्हणतां येणार नाहीं, घरीं मयत झालें आहे असें म्हणतां येणार नाहीं. हांक मारली की तडक निघालेंच पाहिजे. जर का उशीर झाला तर अधिकारी, मग तो फाटका कां असेना महाराच्या आईबहिणीच्या, लेकीबेटीच्या नांवानें लाखोली वाहण्यास केव्हांच मागे पुढे पाहणार नाहीं. व हे सर्व आमचे महार लोक निमूटपणें सहन करितात !!

वतनदार महार लोकांच्या कामासंबंधाने जो दुसरा एक चमत्कारिक प्रकार आढळून येतो तो असा कीं,

**महार म्हटला म्हणजे तो दोन घरचा चाकर !**

कोणत्याहि गांवच्या महार वतन प्रोसिडिंगाची छाननी केली तर सरकारी कामाबरोबरच खालीलप्रमाणें रयतेची कामें करण्याचें ठरवून दिल्याचे दिसून येतें :

(१) खळी तयार करण्यास रयत लोकांस मदत करणे.

(२) रयतेपैकी कोणी मरण पावल्यास त्याला जाळण्यासाठी लांकडे वाहून नेणें.

(३) मयताच्या नातेवाइकांस मयताची वर्दी देणें.

(४) मेलेलीं जनावरे ओढून टाकणें.

(५) लग्न प्रसंगी लाकडे फोडणे.

(६) इतर मामूल कामें करणें.

खरें म्हटलें असतां वतनदार म्हणजे सरकार उपयुक्त गांवकामगार असे वतन ॲक्टांत सरकारनेच ठरवून टाकलें आहे. इंग्रजी अमदानींत वतनदारांची झाडबाकी करतांना फक्त सरकार उपयुक्त गांवकामगारांनाच राखण्यांत आले व बाकीच्यांना रयतेत मिळवून दिलें, हे सरकारी दप्तरावरून सिद्ध होत आहे. त्याप्रमाणें गांवकामगार सरकारी कामें करण्यासच काय ते जबाबदार आहेत. पाटील व कुळकर्णी या दोन वतनदार गांवकामगारांना सरकारी कामाशिवाय दुसरी कोणतीच कामें करावीं लागत नाहीत. पाटील कुळकर्ण्याप्रमाणें महार हे देखील सरकार उपयुक्त कामगार आहेत अशा सबबीवरच यांना राखण्यांत आलेले आहेत. असें असतां सरकारी कामाशिवाय रयतेचीं खासगी कामें करावयास सरकार कां भाग पाडतें याचें कारण काय असावें कळत नाहीं. अशा प्रकारच्या अन्यायास वतन ॲक्टांतून कांहीच आधार देतां येत नाहीं. कदाचित् वतन ॲक्टाच्या कलम १८ च्या अन्वये हें घडत असेल. त्या कलमांत असें ठरविण्यात आलें आहे कीं, ज्या गांवकामगारांची वतनाची सगळी माल मिळकत किंवा तिजपैकीं कोणतीही माल मिळकत लोकांकडून परभारे नक्त किंवा ऐन ज़िनसी ऐवज घेण्याचा हक्क असेल (यावरुन हें कायद्याचें कलम महार लोकांस लागू आहे हें उघड आहे) अशा लोकांच्या हक्कांचा व कर्तव्य कर्मे करावयाची त्यांचा प्रकार व मान आणि ऐवज देण्यास तीं कर्तव्यकर्ते करण्यास कोण पात्र आहेत हें पंचाईतीकडून निश्चित करण्यांत यावें. परंतु रयतेकडून परभारें महार लोक

हक्क आणि बलुतें उकळतात म्हणून महार लोक रयतेचीं कामें करण्यास जबाबदार आहेत असें म्हणणे म्हणजे वतन ॲक्टाचा विपर्यास करण्यासारखें आहे. वतनदार म्हणजे वंशपरंपरेनें सरकार उपयोगी कामें करणारा हक्कदार माणूस असें वतन ॲक्टाच्या कलम ४ मध्ये स्पष्टपणे सांगितले आहे. मग त्याची वतनी मिळकत कोणत्याहि स्वरूपाची असो. सरकारनें दिलेली मिळकत असो किंवा रयतेकडून परभारे उकलून घेतलेली मिळकत असो, तो सरकार उपयुक्त कामगार म्हणून राखून ठेवण्यात आला असेल तर त्याच्या कामाची व्यवस्था वतन ॲक्टाच्या ४ थ्या कलमाप्रमाणे व्हावयास पाहिजे; म्हणजे त्यास सरकारी कामाशिवाय इतरांचीं खासगी कामे करण्यास भाग पाडतां येऊं नये.

इतरांचीं खासगी कामें करण्यास भाग पाडण्यांत येणें हे गैर तर आहेच, पण तीं कामे ठरवितांना इष्टानिष्ट याकडे सरकारकडून बेपरवाई तरी व्हावयास नको होती. वर सांगितलेल्या रयतेच्या खासगी कामा पैकीं दोनच घ्या : मयताची वर्दी देणें व मेलेली जनावरें ओढणें. मयताची वर्दी देण्याचें काम महारावर लादणें कोणत्याहि दृष्टीने इष्ट आहे असें दिसत नाहीं. शहरांत कोणाच्याहि घरीं मयत झालें तर टपाल मार्फत जो तो मयताची खबर आपापल्या नातेवाईकांस देतो. मग खेड्यांतील मुड्याचीच काय एवढी मातब्बरी असावीं कीं त्याच्या मेल्याची सांगी महारानें पायपिटी करून पांचपांच दहादहा कोसांवर राहणाऱ्या त्यांच्या सग्यासोयऱ्यास तोंडानें कळवावी ! ! जें काम शहरांत टपालानें होतें त्याच कामाला खेड्यांत जासूद लागावा हें आश्चर्य नव्हे काय ? हा कदाचित् रयतेच्या मानापमानाचा प्रश्न असेल. पण या खुळ्या समजुतीला सरकारचें अनुमोदन असावें हे बेजबाबदारपणाचें लक्षण आहे असें म्हटल्यास वावगें होईल काय ?

सन १८८८ च्या तारीख २८ जूनच्या नं. ४२७३ च्या सरकारी ठरावा अन्वयें कलेक्टर वगैरे अधिकारी वर्गास असा इशारा देण्यांत आलेला आहे कीं, गांवच्या सफाईच्या बाबतींत महार लोकांकडून जीं मामूल शिरस्त्याप्रमाणें करवून घ्यावयाची कामें आहेत तीं रयतेचीं खासगी कामे आहेत सरकारी नाहींत असा त्यांचा समज होऊं देऊं नये. याचा उघड अर्थ असा कीं मेलेलीं गुरें ओढणें हीं सरकारी कामें आहेत व तीं महारांनी गांवकामगार म्हणून करणें भाग आहे. रयतेच्या इतर कामांप्रमाणे हें काम देखील वतन ॲक्टांत वतनदार या शब्दाच्या दिलेल्या व्याख्येवरून सरकारी काम होत नाहीं हें मागें सांगितलें आहे. गैर कायदा असूनहि केवळ रयत लोक मेलेली ढोरें ओढणें आपल्याला शोभत नाहीं या भावनेने प्रेरींत होऊन आपलीं मेलेंली ढोरें ओढावयाचें नाकारतात.

व दुसरा कोणी तर हें काम पत्करणार नाहीं तर गांवांत उपद्रव होईल या भितीनेंच वरील इशारा वजा ठराव काढून हे गलिच्छ काम महारांवर लादण्याचा हा अतिक्रम सरकारनें केला आहे. हा ठराव जाहिर करतांना मेलेलीं जनावरें ओढणें हे महार लोकांच्या उन्नतीच्या दृष्टीनें इष्ट आहे किंवा अनिष्ट आहे याचा विचार केला असावा असें मुळींच वाटत नाहीं. ढोरें ओढणें कमीपणाचें लक्षण आहें असें जर लोक मानीत नसते तर महारांनीं ढोरें ओढण्यांत कांहीं म्हणण्यासारखा दोष नव्हता. हें एक कमीपणाचें काम इतकेंच नव्हे तर या गलिच्छ कामामुळें महारांना अस्पृश्य मानण्यांत येतें असे सनातन हिंदु लोक जगाला व सरकारला नेंहमी सांगतात. ही सबब प्रामाणिक आहे किंवा अप्रामाणिक आहे तो प्रश्न निराळा. परंतु एवढें खरें कीं, ज्याचें पडें त्यानें न्यावे असा परिपाठ जर पडला तर सर्वच लोक अस्पृश्यांशी तत्सम झाल्यानें अस्पृश्यता नष्ट होण्याच्या मार्गास लागेल. परंतु असा परिपाठ पडण्यास महारांनींच ढोरें ओढावी ह्या जबरीच्या अन्यायाचें उच्चाटन करावयास पाहिजे आहे. आतां काहीं लोक असेंहि म्हणतील कीं जेथें समाज आहे तेथें अशा प्रकारची गलिच्छ कामें असावयाचींच व तीं कामें करावयाचें कोणाच्यातरी माथीं पडावयाचें मग जर महारांनीं तीं कामें केलीं तर त्यांत काय बिघडले ? या युक्तिवादाला आमचे उत्तर असें आहे कीं कोठेंही झालें तरी अशीं कामें करणें न करणे हे करणारांच्या खुशीवर राखून ठेवलेलें असतें. ज्याला वाटेल त्यांने करावींत ज्याला नको असेल त्यांनी करूं नयेत. येथें अन्याय जो होत आंहे तो हा कीं सरसकट महार जातीवर ही गोष्ट जबरदस्तीनें लादण्यांत येत आहे. महार झाला की त्यानें ढोरें ओढिलींच पाहिजेत. मग त्याची मर्जी असो किंवा नसो ! येथवर महार वतनपद्धतींत दोष कोणते याचा विचार केला आहे. तिच्यांत गुण कोणते याचा विचार पुढील अंकीं करूं.'

(२)

गेल्या अंकात महार वतनाचा कामाच्या दृष्टीनें विचार केला व त्यांत कोणते दोष आहेत हें आम्ही लोकनिदर्शनास आणून दिलें. मुशाहिऱ्याच्या दृष्टीनें महार वतनाचा विचार करावयाचा आहे. महारकीच्या कामाकरिता

## महारांना मुशाहिरा काय मिळतो

याची जर चौकशी केली तर आपल्याला असें दिसून येईल कीं महारकीच्या कामाकरितां महारांना साधारणपणें तीन प्रकारचें उत्पन्न असतें : (१) इनाम जमीन (२) बलूते आणि (३) नक्त पगार. हे मुशाहिऱ्याचे तीनही प्रकार सर्वत्रच आढळतात असें नाहीं. कोठे इनाम जमीन असते तर कोठें नसते. काहीं

[१] : अग्रलेख–बहिष्कृत भारत, ता. २ सप्टेंबर १९२७.

ठिकाणीं फक्त पगार व बलूतें असतें. कांहीं ठिकाणीं जमीन व बलूतें या दोनच उत्पन्नाच्या बाबी असतात. या उत्पन्नाचे विविध प्रकार असण्याचें कारण असें आहे कीं कोणीकडून तरी कामगार महाराला दरमहा ५ । ६ रुपये पगार पडला म्हणजे झालें. येवढा मुशाहिरा पडावा या बेतानेंच इनाम जमीन काय, बलुते काय किंवा पगार काय आकारण्यात येतात. हा आकारणीचा काटा कमीच्या बाजूने झुकेल ; पण अधिकाच्या बाजूला सहसा झुकणार नाहीं. हल्लींच्या महागाईच्या काळांत पेजेलासुद्धा पुरणार नाहीं येवढ्या रकमेवर महारलोकांना सरकार राबवतें ही गोष्ट कोणाच्या स्वप्नीं देखील नसेल ! त्यात हा अल्पसा

## मुशाहिरा पदरांत पडेलच याची खात्री नाही.

वतनी जमीन महारांना असली तरी ती नेहमीच त्यांच्या कब्जांत असते असें नाहीं. खरें म्हटलें असतां महारांची इनाम जमीन महारांच्या ताब्यांतून जाऊं नये. कारण सन १८२७ सालापासून कोणाही वतनदाराला आपल्या वतनांतील जमीन भाउबंदा बाहेर इतरांना कोणत्याहि सबबीवर समर्पन करतां येत नाहीं. परंतु अशा प्रकारचा कायद्याचा निर्बंध असूनहि अनेक महारांच्या वतनी जमीनी परक्यांच्या ताब्यांत गेलेल्या आहेत. त्यामुळें सरकारी काम करीत असून देखील महार लोक आपल्या इनाम जमीनी ज्या केवळ कामाच्या मेहनतान्याबद्दल देण्यांत आल्या होत्या त्यांना आंचवलेले आहेत. अशा प्रकारें परघराण्यांत गेलेल्या इनामी जमीनी ज्या वतनदारांकडून घालविण्यात आल्या असतील त्यांच्या वंशजांना दावे लावून त्या परत आणतां येतील हें खरें परंतु कांही जमीनी परघराण्यांत गेल्यास इतकी वर्षे लोटली आहेत कीं, त्या काढून घेण्याचे दावे जर आतां आणले तर त्यांना मुदतीच्या कायद्याची हरकत येईल यांत शंका नाहीं. या बाबतींतील मुंबई हायकोर्टाच्या निकालाचा ओघ असा आहे की कोणाहि वतनदाराला आपली इनाम जमीन आपल्या हयाती पर्यंतच दुसऱ्या कोणालाहि देतां येते व तो मेल्यापासून १२ वर्षांच्या आंत त्याच्या वारसानें जर दावा आणला तर त्याला ती जमीन मिळू शकते. परंतु जर त्या वारसानें बारा वर्षांच्या आंत दावा आणला नाहीं तर त्याच्या स्वतःचा दावा आणण्याचा हक्क नष्ट होतो इतकेंच नव्हे तर त्याच्या पुढच्या वंशजांचा देखील तो हक्क नष्ट होतो. ह्या विचारसरणीच्या कायदेशीरपणाबद्दल संशय वाटणें साहजिक आहे. जी मिळकत मुळी परघराण्यांत जाऊंच शकत नाहीं, ती मिळकत केवळ मुदतीच्या कायद्याच्या अनुरोधानें परघराण्यांत राहू शकते असें म्हणणें कायद्याच्या दृष्टीनें विसंगतपणाचें आहे. नुकत्याच प्रिव्ही कौन्सिलने दिलेल्या एका निकालांत मुंबई हायकोर्टाच्या वा विचारसरणीच्या कायदेशीरपणासंबंधानें संशय व्यक्त करण्यांत

आला आहे. तेव्हा ज्या महारांच्या जमीनी परघराण्यांत गेल्या असतील त्यांनी अशा प्रकारचे दावे आणून ही गोष्ट कसाला लावून पाहावी. परंतु तें घडून येईतो पर्यंत ज्यांच्या जमीनी परघराण्यांत गेल्या आहेत अशा महारलोकांना अर्धपोटी काम करणें भाग आहे. कलेक्टरला मात्र अशा प्रकारच्या परघराण्यांत गेलेल्या इनाम जमीनी परत घेण्याकरितां दिलेले अधिकार विस्तृत आहेत. व त्या अधिकारांना मुदतीच्या कायद्यापासून कोणताही बाध येत नाही. वतनी जमीन कोणत्याच प्रकारचा परघराण्यांत गेल्याला किती दिवस झाले असले तरी त्या जमीनी काढून घेऊन त्यास वतनदार कामगारांना परत देता येतात. परंतु हे स्वाधीन करुन ठेवलेले अधिकार महारांची अशा रितीनें नागवन होत असताहि कलेक्टर लोक कसोशीनें अमलांत आणीत नाहीत. वनतदारानें स्वतः परघराण्यांत गेलेली जमीन परत मिळविण्याकरितां दावा आणला असतां त्यास मुदतीची हरकत येणार नाही. असा निकाल वरिष्ठ कोर्टातून मिळेपर्यंत आपल्याला स्वाधीन करून ठेवलेले अधिकार जर सरकार अमलांत आणणार नाही तर

## काम करावें महारांनी व वतन खावें परक्यांनी

हा चालू असलेला अनिष्ट प्रकार तसाच चालू राहणार हें उघड आहे. ज्या महारांच्या जमीनी परघराण्यांत गेल्या आहेत ते तर नागवले आहेतच. पण ज्यांच्या जमीनीची तशी वाताहत झाली नाहीं त्यांच्या जमीनी बिनधोक त्यांच्या जवळ राहतील असें कोणी निश्चयात्मक सांगू शकणार नाही. पूर्वीच्या धामधुमीच्या काळांत लोकांना जंगम मिळकतीची किंमत फार कमी वाटत असें. स्थावर मिळकतीला चोराचिलटांची भिती नाहीं म्हणून ती सुरक्षित असें लोक मानीत यामुळे रोकडीच्या मानाने कमी उत्पन्नाचें स्थावर असलें तरीं तें निरंतरचें आहें या विश्वासावर कामकरी वर्ग रोकडांपेक्षा स्थावराला जास्त चहात असें शिवाय एकदां करून दिलेली स्थावर नेमणूक वंशपरंपरेची असल्यामुळें कोणाहि वतनदारास आपल्या मुलाबाळांचें पुढें काय होईल याची चिंता करण्याचे कांहीच कारण उरत नसे. अशा प्रकारची कायमची व्यवस्था बरी असें समजून दरोबस्त कामगारानें मग तो दिवाण असो, सेनापती असो, खजीनदार असो, फडणीस असो, मुजुमदार असो, चिटणीस असो, पाटील असो, कुळकर्णी असो, या सर्वांनी वंशपरंपरेच्या तहहत्यात असाम्या पतकरल्या आणि रोकड तनख्याऐवजी इनाम जमीनीची पद्धत स्विकारली. काम करावें आणि इनाम खावें या मगरमस्त भावनेने आजवर सारेच वतनदार या वतनपद्धतीला चिकटून राहिले. परंतु या वतनी जमीनी महारांना निरंतरच्या देण्यात आल्या आहेत हें सरकार कबूल करीत नाही. त्या महारांना कामाबद्दल मुशाहिरा म्हणून देण्यांत आल्या आहेत असें

सरकारचे मत आहे. या म्हणण्यांत हरकत घेण्यासारखें विशेष कांही नाही. पण महारांचा मुशाहिरा ठरविण्याचा अधिकार आपला आहे असें सरकार म्हणते. व त्या अधिकाराच्या जोरावर नेमून दिलेली ठराविक कामें महार लोक करीत असतांना महारांना उत्पन्न जास्त झाले या सबबीवर

### सरकार महारांच्या इनाम जमीनी काढून घेते.

याचे ताजे उदाहरण म्हणजे बारामतीजवळ असलेल्या सांगवी गांवच्या महारांवर सरकारनें केलेला अन्याय हें होय. सांगवी येथील महारलोकांना वतनी इनाम जमीन होती. ती जोपर्यंत जिरायत होती तोंपर्यंत ती महारांच्या उदरनिर्वाहाला पुरेशी आहे किंवा नाही याबद्दल आमच्या दयाळू सरकारनें मुळीच विचारपूस केली नाहीं. परंतु जेव्हा या महारांच्या जमिनीच्या लगत निरा नदीचा कालवा जाऊ लागल्यानें जमिनीचे उत्पन्न वाढलें तेव्हां सरकारचे डोळे फाटले आणि महारांना जमीन जास्त झाली या सबबीवर त्याच्या इनाम जमीनीपैकी अर्धा निम्मा भाग सरकारनें खालसा केला व खालसा केलेल्या इनाम जमीनीचा कबजा सोडण्यास महार लोक कबूल होईनात तेव्हां त्यांना कायद्याच्या जोरावर शिक्षा ठोठावण्यांत आल्या ! अशा रितीने जर पाहिलें तर ज्या इनाम जमीनीवर महारांची येवढीं भिस्त आहे ती परघराण्यात गेली तर परत येण्याची आशा नको आणि हातात असली तरी ती हातची कधीं जाईल याचा नेम नाही.

इनाम जमिनीसंबंधीं ही रड झाली. महारलोकांच्या उत्पन्नाची दुसरी बाब म्हणजे बलूतें. तें

### बलूतें त्यांना मिळतेंच अशी खात्री नाहीं.

महारलोकांच्या वतनी उत्पन्नासंबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं जरी ते सरकारी कामगार असले तरी त्यांना सरकारकडून पगार देण्यांत येत नाहीं. त्यांचा पगार मुख्यतः म्हटला म्हणजे रयतेकडून मिळणारें बलुतें. हें बलुतें त्यांना रयतेकडून परस्पर उकळून घ्यावे लागते. या व्यवस्थेमुळें कधी कधीं असे प्रसंग येतात कीं महारांनी सरकारी कामे कितीही चोख पार पाडलें तरी त्यांना बलुतें मिळालेले नाहीं. बलुतें मिळाल्यास सरकारी कामाच्या आधी रयतेचीं कामें करावीं लागतात व कांही कारणामुळें रयतेची महारावर इतराजी झाली तर रयत बलुतें अडवून धरतें. बलुतें वसूल करण्यास महारांना कायद्याने मदत करण्याची तरतुद करण्यांत आली आहे. परंतु

### कामाला सरकार आणि वैरणीला रयत

ही पद्धत मुळांतच चुकीची आहे. याशिवाय या बलुत्याच्या व्यवस्थेत आणखी दुसराहि एक दोष आहे. दुष्काळ पडला असतां सरकार रयतेला शेतसारा माफ

करितें किंवा सूट देतें. पण जेव्हा जेव्हां सरकार कराची सुट रयतेला देतें तेव्हा तेव्हां बलूत्याचीहि सुट रयतेला देण्यात येते. दुष्काळांत कराची लुट रयतेला देणे हें योग्य आहे. परंतु बलुत्याचीहि सुट देणे सर्वस्वी रास्त आहे असें म्हणता येणार नाही. यात रयतेचा फायदा आहे. पण महारांचे काय ? महार काम करावयाचे ते करतातच. उलट दुष्काळांत इतर दिवसांपेक्षा काम जास्त म्हणून खरें म्हटलें असतां महारांना दुष्काळांत वेतन जास्त मिळावयास पाहिजे. पण तसें कांहीं न होता केवळ दुष्काळ म्हणून काम जास्त व पगार कमी असा प्रकार घडतो. महार हे सरकारी नोकर आहेत. दुष्काळ पडला आणि सरकारी वसुल कमी झाला म्हणून सरकार कांहीं आपल्या नोकरांना पगार कमी घ्या म्हणून सांगत नाही. मग महारांच्याच बाबतींत हा अन्याय कां असावा ? अशा प्रकारचें हे महारांचे वतन आहें. त्यात सुधारणा करून ते कायम ठेवावें किंवा तें अजिबाद खालसा करावें ह्या प्रश्नाचा अखेरचा निंकाल लावणे हें महार जातीच्या उन्नतीच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे कार्य आहे. इतर कोणाचे या बाबतीत काय मत असेल तें असों पण आम्ही

## महार वतन खालसा करावें

या मताचें आहोंत. वतन ही अत्यंत जिव्हाळ्याची चीज आहे. कोणीहि वतनदार वर्ग आपलें वतन सोडून देण्यास तयार होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर वतनासाठीं आपला प्राण देण्यास कमी करणार नाहीं, हें आम्हीं जाणून आहों. गळ्यांत नांगर घालून वतनदारांच्या लेकी बहीणींना आळवून पै पैशाची भिक्षा मागून गेलेलें वतन परत मिळविणारे वतनदार फकीर आजहि आपल्या दृष्टीस पडतात. जेथें वतनाचा ओढा इतका जबरदस्त आहे, जेथें पाटील आपलें वतन सोडण्यास तयार नाहीं, जेथें कुळकर्णी गेलेलें वतन परत मिळविण्यास सारखी खटाटोप करीत आहे तेथें महारांच्या पुढाऱ्यांनींच महाराचे वतन खालसा करण्यांत यावें असें सांगणें हा प्रकार बराचसा विलक्षण वाटेल व कांहीं लोक आम्ही आमच्या लोकांचे हितशत्रु आहोंत म्हणून आम्हाला दोष देतील. परंतु आमचें मत अशा प्रकारचे व्हावयास आमच्या जवळ कारणेंहि तशी सबळ आहेत. तीं कोणतीं हे कळलें म्हणजे आम्ही महार वतन खालसा करावें असें जें म्हणतो तें महार लोकांचे हित व्हावे म्हणूनच म्हणतों अशी सर्वांचीच खात्री होईल.

महार वतन खालसा करण्याचें पहिलें कारण असें कीं या वतनामुळे महार स्वाभिमानशून्य झाले आहेत. स्वाभिमानाच्या दृष्टीनें जर महार वतनाकडे पाहिलें तर त्यांत अत्यंत अनिष्ट अशीं जर एखादी बाब असेल तर ती बलूत्याची पद्धत होय. महारांचा मुशाहिरा बलूत्याच्या रूपांत देण्यांत येत असल्या कारणाने

महारवतनाला अत्यंत घाणेरडें व किळसवाणें स्वरूप आलें आहे. बलूते म्हणजे पगार, मुशाहिरा किंवा नोकरीचा मोबदला असा जो महारांचा व रयतेचा समज व्हावयाचा तो तसा न होतां बलूतें म्हणजे भीक आणि महार म्हणजे भिकारी असा उभय पक्षांचा ग्रह होऊन बसला आहे. कोणत्याही समाजांत एकदां श्रेष्ठ आणि कनिष्ठ,स्वामी आणि किंकर, दाता आणि याचक असे भेद उत्पन्न झाले म्हणजे ज्यांना नेहमीं श्रेष्ठ म्हणवून घेण्याची संवय जडलेली असते त्यांच्या मनांत आपण त्या योग्यतेस सर्वस्वी पात्र आहोंत अशी भावना जागृत राहून ती इतकी दृढ होते कीं अंगीं कोणत्याहि प्रकारचे गुण नसताना आपण वंदनीय आहोंत असें वाटतें आणि आपल्यापेक्षा कनिष्ठ असणाऱ्या लोकांनी त्याला आपण होऊन मान दिला नाही, तर त्याचें ताडन अथवा दंडन करुन तो घेण्याचा ते प्रयत्न करितात. त्याचप्रमाणे जे कनिष्ठ ठरले त्यांना सांगतील तें करण्याची आणि वागवतील तसे वागण्याची संवय लागते, अशा रीतीनें जे एकवार परवश झाले त्यांना तीच स्थिति बरी वाटूं लागते. ऐश्वर्य आणि श्रेष्ठता यांच्याठायीं मनुष्यमात्राची नेहमींच भक्ति असते. पिढ्यान्‌पिढ्या या भावनेचें संगोपन झालें असतां ती इतकी दृढ होऊन जाते कीं पुढें ज्यांना कनिष्ठ मानून घेण्याची संवय झाली मग आपण किती प्रयत्न केले तरी आपली श्रेष्ठता वाढविण्याची इच्छा मनाला शिवत देखील नाहीं. याचे प्रत्यंतर आपणास महार वतन पद्धतींत खासे पाहावयास सांपडते.

बलुतें देऊन महार लोकांना आपण जगवितों अशी रयतेची भावना झाल्यामुळें रयतेंत फाजील आढ्यता व उद्दामपणा वाढला आहे. गांवांत महार लोकांना शिवीशिवाय कोणी बोलत नाही. ब्राह्मण, मराठा, कुणबी किंवा इतर वरच्या जातीचें शेंबडें पोर देखील वयोवृद्ध अशा एखाद्या महार जातीतील पुरूष अगर स्त्री यांस बेमुरवतपणे वाटेल तशी मोजून शिवी देतें. ब्राह्मणाच्या घरीं जशी देवपूजा टळत नाहीं, त्याप्रमाणें महाराच्या माणसाला शिवी खाल्याशिवाय गांवांत दिवस जात नाहीं. नुसत्या शिवीवर जरी भागते तरी बरें. परंतु शिवीबरोबर केव्हां केव्हां मारहि बसावयाचा. रोजच्या रोज आईवरून शिवी, सुनेवरून शिवी, बायकोवरून शिवी, मुलीवरून शिवी असा शिव्यांचा वर्षाव महार लोकांवर होत असतां त्यांना डोळे वटारण्याची तर राहूं द्या परंतु नुसती वर बघण्याची देखील ताकद नाही. मुंगीवर पाय बडला तर ती देखील उलट डसण्याचा प्रयत्न करिते. पण महार जात गाईसारखी गरीब होऊन गेली आहे. तिची नांगी मोडून अगदीं खच्चीं झाल्यासारखी झाली आहे. इतकी कीं, 'मीं तुमचा दास आहे मला आपल्या जोड्यांत वागवून घ्या' अशा दीनवाण्या शब्दाखेरीज महार

लोकांच्या तोंडून दुसरी भाषा ऐकूं येत नाहीं. आणि ती कशी येणार ? ज्या जातींतील प्रत्येक माणूस उपजल्यापासून तों मरेपर्यंत दुसऱ्याच्या अन्नावर जगतो, ज्याचा देह दुसऱ्याच्या उष्ट्या घासकुटक्यावर पोसलेला असतो त्याच्या अंगी आत्मतेज तें काय असणार? आत्मतेज उत्पन्न होण्यास ज्यानें त्यानें आपल्या जीविताची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली पाहिजे. आपल्या परिस्थितीशी झगडलें पाहिजे. आपल्या बलाची, बुद्धीची व कर्तुत्वशक्तिची पराकाष्ठा केली पाहिजे. सर्वत्र चाललेल्या जीवनकलहांत दंड थोपटून उभें राहिलें पाहिजे. आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या मनगटाशी मनगट घांसून होईल तितकें यश संपादन केलें पाहिजे. त्याशिवाय मनुष्यमात्र स्वतंत्र होऊन दुसऱ्याच्या आदरास कधींच पात्र होणार नाहीं. परंतु बलुत्याची आणि भिकेची खात्री असल्यामुळें महार जातीनें आपल्या जीविताची जबाबदारी कधींच ओळखिली नाहीं. आपलें काय होईल असा प्रश्न महारांना केव्हाच पडत नाहीं. कांहीं झालें तरी वेसकराची काठी आहेच. कांहीं नच झालें तरी हक्काची भीक चुकली नाही. अशा परिस्थितीत वाढलेला माणूस बैलासारखा बसकटीस येऊन पुढें पाऊल घेण्याचें नाकारुं लागला तर त्यांत नवल काय ?

महारकी वतन खालसा करा असें म्हणण्याचें दुसरें कारण असें की,

## वतनामुळें महारांतील महत्त्वाकांक्षा साफ मारली गेली आहे

आजकाल वरिष्ठ वर्गात अहर्निश धडपड चालू असलेली नजरेस पडते. कोणी बॅरिस्टर होण्याची हांव धरतात, कोणी कलेक्टर होऊं म्हणतात, कोणी दिवाण होऊं म्हणतात व कोणी व्यापारांत उडी घालतात. एकूण वरिष्ठ वर्गांत मोठे होण्याची भावना अत्यंत प्रज्वलित असलेली दिसून येते. त्या मानानें पाहतां महार जात अगदी निश्चेष्ट पडलेली दिसते. यांचें कारण काय असा जर आपण प्रश्न केला तर त्याला एकच उत्तर देतां येईल ; आणि तें हें कीं, महार लोकांत महत्त्वाकांक्षा नाहीं. कोणाहि माणसाला आपली उन्नति करुन घ्यावयास संधि ही लागतेच. परंतु त्याबरोबर आपण मोठें व्हावें, अशी भावनाहि त्यांच्या ठायीं रुजावी लागते. किंबहुना, संधि असूनहि महत्त्वाकांक्षेच्या अभावी किती तरी माणसें अवनत झालेलीं–नव्हे वायां गेलेली–आढळण्यांत येतात. उलटपक्षीं, ज्यांच्यांत मोठेपणाची भावना जागृत झालेली आहे असे लोक संधि नसतांनाहि लाथ मारतात तेथें पाणी काढतात आणि आपल्या महत्त्वाकांक्षेच्या बळावर वैभवाच्या शिखरावर चढतात. अशा प्रकारची महत्त्वाकांक्षा महार लोकांत कां नाहीं हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याचें उत्तर मात्र अगदी सोपें आहे. चालतें तोंपर्यंत चालवावयाचे, हा मनुष्यमात्राचा सर्वसाधारण स्वभाव आहे. दारांतल्या

शेवग्याच्या झाडावर जोंपर्यंत उपजीविका होऊं शकते तोंपर्यंत उदरनिर्वाहाचा दुसरा मार्ग शोधणें जरुर वाटत नाहीं. या बाबतींतील एका श्रीमंत कुटुंबाची गोष्ट अत्यंत बोधप्रद असल्यामुळें ती आम्हीं येथें देत आहोंत. " एक श्रीमंत कुटुंब दरिद्रावस्थेप्रत पोहोंचलें. " त्यांच्या अंगणांत एक शेवग्याचें झाड होतें. त्यांच्या शेंगा गुजरीत स्वतः विकल्या तर आब जातो म्हणून त्या रात्रीं काढून ते एका माळ्याला विकीत आणि गुपचुप तो देईल त्या किमतीवर गुजराण करीत. कुटुंबांत चार पांच भावांचा विस्तार होता. तेव्हां आळी-पाळीनें कित्येकांना उपवास काढावे लागत. एक दिवस त्यांचा सोयरा रात्रीं मुक्कामाला आला. त्याला व लहान मुलांना जेवण्यास बसविलें व बाकीच्यांनी भूक नाहीं म्हणून वेळ मारुन नेली. सोयरा निजला असें पाहून कारभाऱ्यानें नित्यक्रमाप्रमाणें शेंगा माळ्याला दिल्या, आणि त्यांचे दाम घेतले. सोयरा जागा होता. त्याला सर्व अवस्था अगोदर माहित होतीच, आणि हा प्रकारहि त्यानें पाहिला. चार पांच धडधाकट भाऊ आज जे उपवास काढतात, ते या शेवग्यामुळें अशी त्याची खात्री झाली; आणि त्यानें जिकडे तिकडे सामसूम झाल्यावर रात्रीं तें झाड कापून काढलें व कोणाला न विचारतां आपले घराची वाट धरली. सकाळीं घरांत जिकडे तिकडे हाःहाःकार झाला. ' हगवणीला बायको आणि नागवणीला सोयरा ' असें म्हणतात. ह्या सोयऱ्यानें तर दहा पांच मण धान्य पाठविण्याच्या ऐवजी अर्धकोर भाकर देणारा शेवगाहि तोडला, म्हणून सर्व त्याला शिव्या शाप देऊं लागले. तो दिवस कसाबसा गेला, आणि रात्री सर्व कुटुंब एकत्र जमून त्यांनीं विचार काढला कीं, आतां घर सोडलें पाहिजे. सर्वांनी रोजगार केला आणि दोन वर्षात घर सुधारलें. नंतर सर्वजण दिवाळीला घरीं जमलेले पाहुन तो सोयराहि मुद्दाम तेथें आला, तेव्हा सर्वांनीं त्याचे पाय धरले, व कबूल केलें कीं, " तुम्हीं झाड तोडलें नसतें तर आम्हाला घर सुटतेंना व आमचें दारिद्र्य जन्मभर फिटतेंना."

ही गोष्ट महार वतनदारांना तंतोतंत लागू पडत नाही असें कोण म्हणेल ? वतन म्हणजे महारांच्या दारांतील शेवगा आहे. तो कापून काढल्याखेरीज त्यांच्या परिस्थितींत क्रान्ति घडणार नाही. आणि त्यांच्या जीवनक्रमांत अशा प्रकारची क्रांति घडल्याशिवाय महार लोक स्वतंत्रपणे उद्योग करुन राहण्यास प्रवृत होणार नाहीत. वेसकरकी हे महारांच्या महत्त्वाकांक्षेवर मोठे दडपण आहे. वेसकरकी ही आपली अढळ बादशाही, यापेक्षा आपल्याला श्रेष्ठ असा दर्जा तो काय असावयाचा या भावनेने ग्रस्त झालेले महार आईबाप आपल्या मुलांना वेसकरकीपेक्षां दुसरी उन्नतावस्था प्राप्त करुन देण्याचा विचार मुळीं आपल्या मनाला शिवूंसुद्धा देत नाहीत. वेसकरकीच्या व्यसनांत सांपडल्यामुळे कोणीहि महार पेशा घेण्याची इच्छा करीत नाही. मळलेल्या वाटेनें जाण्याची संवय

लागल्यामुळें अन्य वाटा आपल्याला मोकळ्या आहेत, याची महाराला आठवण देखील होत नाही. तीच वाट बंद झाली तर आज त्यांना दाही दिशा खुल्या होतील; आणि ज्या दिशेला दैव निघेल त्या दिशेला ते जातील, परंतु वेसकरकी जोंपर्यंत त्यांच्या डोळ्यापुढें आहें तोंपर्यंत गतानुगतीच्या बंदिवासांतून त्यांची सुटका होणें शक्य नाहीं. म्हणून आम्ही म्हणतों कीं, खुजटलेला महारसमाज वाढीस लागावा हें जर इष्ट असेल तर प्रथमतः महारवतन खालसा झालें पाहिजे. ही विचारसरणी कांहीं लोकांना अविचारीपणाची वाटेल, व हातचे सोडून पळत्याच्या पाठी लागा म्हणणें, हे व्यवहारशून्यतेचें लक्षण आहे, असेंहि ते आरोप करतील. परंतु हा युक्तिवाद भित्र्या लोकांचा आहे. ज्यांना साहसी वृत्तीची जोपासना करावयाची आहे त्यांच्या तो उपयोगाचा नाही. हाती असलेल्याचा मोह इतका जबर असतो कीं, तें सुटल्याखेरीज पळत्याच्या पाठीं कोणी लागत नाही; आणि पळत्याच्यापाठीं लागल्याशिवाय प्रगति होत नाहीं. म्हणून आधीं हातचे वतन सुटले पाहिजे. त्याशिवाय महारांना उन्नतीचा मार्ग सुचणार नाहीं.

महारवतन खालसा करावें यास तिसरेंहि एक कारण आहे. तें हें किं,

## वतन गेल्याशिवाय महारांची सुधारणा होणें शक्य नाहीं.

वतन आहे तो पर्यंत महार लोक आपली सुधारणा करून घेण्यास तयार होणार नाहींत हें तर खरेंच पण इतर लोकहि वतनपद्धतीचा फायदा घेऊन महार जातीला सुधरूं देणार नाहींत हें म्हणणें कदाचित वरच्या वर्गाच्या लोकांना पटणार नाहीं. पण आमची या बाबतींत बालंबाल खात्री झाली आहे. आज अनेक दिवसांच्या चळवळीनें कांहीं गांवच्या महार लोकांच्या मनावर परिणाम होऊन त्यांनीं स्वच्छ व स्वतंत्रपणाची राहणी स्वीकारण्याच्या हेतूनें गावातून भाकरी मागणें, मेलेली जनावरें ओढणें वगैरे वगैरे गलिच्छ व स्वाभिमान नष्ट करणारीं कामें सोडून देऊन आपल्या इभ्रतीनें वागण्यास सुरुवात केली आहे. महार लोक स्वतंत्र व स्वच्छ राहिल्यानें कोणाचेंहि खरें पाहिलें असतां नुकसान होण्यासारखें नाही. परंतु अशा रितीनें वागूं लागल्यानें महार लोक आपल्या बरोबरीचे होतील अशा भीतीनें पछाडून जाऊन गांवांतील लोकांनीं संगनमत करून महारांनीं केलेल्या क्षुल्लक अशा सुधारणेवरून चेतून जाऊन त्यांना त्राहि भगवान केल्याचें अनेक प्रसंग आमच्या कानीं आलेले आहेत. एका ठिकाणीं एका महारानें आपल्या मुलीच्या लग्नांत कापडी मांडव घालून ग्यासबत्ती आणून लग्नसमारंभ पार पाडला. येवढ्या कारणावरुन गांवचे लोक चेतून जाऊन त्याला व त्याच्या आईला त्यांनीं बेदम मारलें. दुसऱ्या एका गावी महारानें आपल्या घरावर कौलें

घातलीं. ह्या महारानें अतिक्रम केला असें वाटून कौलें काढ नाहीतर घर जाळूं म्हणून त्याला गांवाने धाक घातला. केवळ महारानें जमीन घेतली येवढ्यावरूनच गावकऱ्यांनी थैमान घातल्याचीं उदाहरणे अनेक देतां येतील. विषाद वाटतो तो हा कीं असा एकादा सुधारणाप्रिय महार गावांत निघाला तर त्याला महार लोकांची देखील सहानुभूती नसते याचे कारण महारांना सुधारणा आवडत नाहीं असें नाहीं. पण करतील काय बिचारे ! गांवाला नेहमीं अनन्य शरण असल्याखेरीज त्यांना गत्यंतरच नाही. याचें कारण असें कीं महारांना जुन्या चालींचा प्रतिकार करण्याचा प्रसंग आला किंवा इच्छा उत्पन्न झाली म्हणजे त्यांना भाकरीची व बलुत्याची आठवण होते, मारामार केली, उलट बोललों तर आपल्याला भाकरी कोण वाढील, आपल्याला बलुतें कोण देईल? आणि आपली भाकरी व बलुतें बंद झाले तर आपण जगणार कसे ? हे प्रश्न त्यांच्या डोळ्यासमोर नेहमी उभे राहतात. याचें कारण असें कीं गावकऱ्यांचे व महारांचे बिनसलें म्हणजे गांवकरी आधीं महारांचे गांवबंद करितात आणि गांव बंद झाले कीं महारांच्या नाड्या लगेच बंद पडून ते गावाकऱ्यांना शिरी वहाण व दांतीतृण धरून ते सांगतील त्याप्रमाणें नांदण्यास कबूल असतात. महारांचा गांव बंद करणें हें गांवच्या लोकांच्या हातीं एक मोठेंच शस्त्र आहे. त्याचा उपयोग वाटेल त्या प्रसंगी करण्यांत येतो यावरून उघड आहे की ज्या भाकरीवर महार जगतात त्या भाकरीमुळे महारांचे मरण होंते! एकाच परीने सुधारणेच्या कामी महारांचे वतन महारांना नडतें असे नाही, तर तें अनेक परीनें नडतें. महारांचे वतन राहील कीं जाईल, हें सर्वस्वी पाटील, कुळकर्णी व मामलेदार यांच्या मेहरबानीवर अवलंबून असतें, ह्या तिघां अधिकाऱ्यांची एक जात जरी नसली तरी महारांच्या बाबतीत त्यांचे एकमत असतेच. कारण महारांनी गुलामाप्रमाणे वागावें, वर डोके काढूं नये ही त्या सर्वांचीच इच्छा महारांनी गावकीचे काम कितीही चांगल्या तऱ्हेने केलें पण इतर बाबतीत जर का महार प्रमाणानें वागले नाहीत तर त्यांच्या कामाबद्दल खोटा नाटा रिपोर्ट होऊन त्याचे वतन खालसा व्हावयाचें ही एक भीति महारांच्या पोटात सदा सर्वकाळ असते. अशा या वतनपद्धतीमुळें महारांचे जिणें सर्वस्वी पराधीन झालें आहें व जोपर्यंत ते पराधीन आहेत तोपर्यंत त्यांना स्वइच्छेनुरूप सुधारणां करणे केंव्हांच शक्य होणार नाही.[१]

(३)

वतनपद्धतीपासून महार कामगारांचे तसेंच महार जातीचें कसें नुकसान झाले आहे, व त्याला महारकी वतन खालसा करणे हा एकच उपाय कसा लागू पडतो

[१] : अग्रलेख–बहिष्कृत भारत, ता. १६ सप्टेंबर १९२७.

याचा ऊहापोह येथवर झालेल्या विवेचनांत करण्यांत आला आहे. आज हें महारकी वतन कसें खालसा करावें या प्रश्नांचे विवेचन करून ही लेखमाला समाप्त करण्याचा आमचा विचार आहे. सरकारने ज्यापरी वतनदारीच्या हक्कांचे संरक्षण व्हावें अशी कायद्यांत तरतूद केली आहे, त्याच परी व वेळ पडल्यास वतन खालसा करण्याची तरतूद त्याच कायद्यात करून ठेवण्यात आली आहे. वरील प्रकारची तरतूद ज्या वतन कायद्याच्या पंधराव्या कलमांत केलेली आहे ते कलम पुढीलप्रमाणे आहे. " कलेक्टर यांनी वतन धारण करणाऱ्या इसमाच्या लेखी, नमूद करून दिलेल्या संमतीने असा धारण करणारा व कलेक्टर यास कबूल असतील अशा अटींवर, मग त्या या कायद्यास अनुसरून असोत अगर नसोत, नोकरी करण्याच्या जोखमदारीतून त्यास, त्याच्या वारसास व त्याच्या यास्त्या वतनदारास कायमचे मुक्त करावे." असें हें कलम मूळच्या वतनकायद्यांतच असल्यामुळे महारकी वतन खालसा करण्याकरिता एखादे नवीन कलम घडविण्याची काही जरूरी नाही. फक्त

## कोणत्या अटींवर महारकी वतन खालसा करावयाचें.

त्या अटींची एक पुस्ती वरील कलमास जोडण्यांत आली म्हणजे झालें. या अटी उभयपक्षांत देवाण घेवाण झाल्याशिवाय ठरणें शक्य नाहीं. आणि ही देवाण घेवाण घडून येण्यास उभयपक्षाचें परस्पराविरूद्ध काय हक्क आहेत, याची कल्पना झाली पाहिजे. प्रथमतः, वतनदारांच्याबाजूने सांगावयाचे म्हणजे त्यांना अनुवंशिक नोकरीचा हक्क आहे. गांवात बाराबलुतेदारासह त्यांनी सर्व रयतेची व सरकारी कामें करावयाची, असें गांवगाड्याचे साधे सोपे वर्णन करण्याचा प्रघात आहे. परंतु हे वर्णन एका दृष्टीने अर्थशून्य आहे, व त्यावरून खऱ्या वस्तुस्थितीचा बोध होत नाहीं. बलुतेदार रयतेची कामें करतात, हे तर खरेंच परंतु रयतेला आपल्या बलुतेदारांशिवाय इतरांकडून आपली कामें करून घेतां येत नाहीत, हेंहि तितकेंच खरें आहे. रयतेच्या घरी लग्न झालें व गांवांत वतनदार जोशी असला तर त्या वतनदार जोशास रयतेनें बोलविल्यास येणें भाग आहेच. रयतेला गावांतील वतनदार जोशाच्या हातून लग्न लावून घेणें भाग आहे. त्याला वगळून दुसऱ्या कोणाकडून लग्न लावण्यांत आलें तर वतनदार जोशाला यजमानावर व लग्न लावणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांवर नुकसानभरपायीचा दावा करण्याचा कायदेशीर अधिकार प्राप्त होतो. ग्रामजोशालाच काय, पण गांवातल्या वतनदार न्हाव्याला देखील तशाच प्रकारचा अधिकार आहे. वाटेल त्या न्हाव्याकडून आपण हजामत करून घेऊं असे रयतेंला वाटणें अगदी साहजिक आहे परंतु हा समज कसा भ्रामक आहे हें सन १९१९ साली मुंबई हायकोर्टांने

दिलेल्या एका निकालावरून उघड झाले आहे. या निकालांत हायकोर्टानें असे ठरविलें कीं, वतनदार न्हाव्याचे हक्क वतनदार जोशाप्रमाणेंच आहे. रयतेनें वतनदार न्हाव्यांकडूनच क्षौर करून घेतले पाहिजे; व वतनदार न्हाव्याला वगळून जर दुसऱ्या न्हाव्याकडून क्षौर करून घेण्यांत आलें, तर यजमानावर व क्षौर करणाऱ्या बिनवतनदार न्हाव्यावर त्यास नुकसान भरपायीची फिर्याद करण्याचा कायदेशीर अधिकार प्राप्त होईल. अशा प्रकारचा वतनी नोकरांचा हक्क फक्त जोशाला किंवा न्हाव्याला आहे अशांतला भाग नाही. वतनी नोकरांचा हक्क कशा प्रकारचा असतो, याचा दाखला म्हणून उदाहरणादाखल वरील दोन वतनदारांचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. परंतु हा हक्क साध्या वतनदारांचा आहे हे ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. त्याचप्रमाणे हेंहि ध्यानांत ठेविले पाहिजे कीं, कामें करणे व करवून घेणे, यासंबंधाने जसा रयतोपयोगी वतनदारांचा रयतेवर आनुवंशिक हक्क चालतो, तसाच हक्क सरकारोपयोगी वतनदारांचा सरकारवर चालू शकतो. वतनी कामे करून घ्यावयाची ती सरकारला मनमानेल त्यांकडून करुन घेता येणार नाहीत ती वतनदार घराण्याकडूनच करून घेतली पाहिजेत. कारण ती कामें करण्याचा त्या घराण्यालाच काय तो आनुवंशिक हक्क आहे, व ती कामें इतरांकडून करून घेण्याचे ठरलें तर ज्या वतनदार घराण्यांचे तेणेकरून बुडस्थळ होईल त्याला सरकारविरुद्ध नुकसान भरपायी मागण्याचा कायदेशीर हक्क प्राप्त होईल. यास आधार हवा असल्यास तो आपणांस कुळकर्णीवतनाच्या झालेल्या रदबदलींत सांपडतो. सन १९१४ साली कुळकर्णीवतन खालसा करून त्यांच्याऐवजी पगारी तलाठी नेमून कुळकर्ण्यांचे काम तलाठ्यांकडून करून घेण्यासंबंधींचा एक ठराव मुंबई सरकारने पास केला. परंतु असे केल्याने आपण कुळकर्ण्यांचे वतन बुडवीत आहोंत व त्या बुडीबद्दल नुकसानभरपायी मागण्याचा अधिकार कुळकर्ण्यांस प्राप्त होईल, हेंहि सरकारनें ओळखिलें होतें. त्याप्रमाणें नुकसानभरपायीबद्दल " सन १९१३-१४ सालांत आदा केलेले आकारणीचे (जमीन महसूल वसूल करण्याबद्दलच्या मुशाहिऱ्याचे) व पोटगीचे $\frac{१}{३}$ इतकी नेमणूक, जोपर्यंत वतनाचा पुरुष, वारस-म्हणजे सीधा किंवा तेढा, वतनदार घराण्यापैंकी अथवा वतनदार घराण्याबाहेरील दत्तक,–असा कोणीहि असेल, तोंपर्यंत निरंतर म्हणून इंग्रज सरकारांतून चालविली जाईल " असें देणें दिलें. कुळकर्ण्यांचें वतन खालसा करावयाचें असा ठराव ज्याप्रमाणें सरकारनें केला तसाच महारांचें वतन खालसा करावें असा ठराव जर सरकार करील तर कुळकर्ण्यांप्रमाणें महारांनांहि नुकसानभरपायीखातर कांहीं तरी दिल्याखेरीज सुटका नाहीं. कारण, वतनदारांचा

काम करण्याचा आनुवंशिक हक्क हा स्थावरमिळकतीच्या स्वरूपाचा आहे, असें कायद्यानें मानण्यांत येतें. अर्थात् ही स्थावर मिळकत विनामूल्य कोणासहि काढून घेता येणार नाही. येथवर सरकारनें महारांचे वतन म्हणजे त्यांचा नोकरी करण्याचा आनुवंशिक हक्क कमी केला तर महारांना काय करतां येईल, याचा विचार करण्यांत आला आहे. आतां, महारांनीं आपखुषीनें वतन सोडून दिलें तर सरकार काय करूं शकेल, याचा विचार करावयाचा आहे. सरकार व वतनदार या उभयतांतील नातें धनी व नोकर या मासल्याचें आहे. हें ध्यानांत घेतलें म्हणजे या प्रश्नाचा उलगडा सहज होऊं शकतो. नोकरानें नोकरी करण्याचे बंद केलें तर त्याचा धनी त्यास पगार देण्याचें बंद करतो, हा उघडा न्याय कोणासहि विशद करून सांगण्याचें कारण नाही. त्याच न्यायाने पाहतां, जर महारांनी काम करण्याचे बंद केले तर सरकार त्यांना देत असलेला मुशाहिराहि बंद करील. म्हणजे महारांचें बलुतें जाईल, इनाम जमीन जाईल व मिळत असलेला नक्त पगारहि जाईल.

परस्परांचें एकमेकाविरुद्ध कशा प्रकारचे हक्क आहेत याचें स्पष्टीकरण येथवर करण्यांत आलें आहे. महार-वतन खालसा करण्याच्या बाबतींत उभयपक्षांपैकीं कोणी काय सोडून द्यावें, हें ठरविणें जर आमच्यावर सोंपविण्यांत आलें तर आम्हीं असा निकाल सांगू की, महारांनीं काम सुटल्यामुळें सरकारविरुद्ध नुकसानभरपाई मागूं नये ; व सरकारने महारांनीं नोकरी बंद केल्याबद्दल त्यांचे बलुतें व पगार बंद करावा, पण त्यांच्या इनामी जमिनी काढून घेऊ नयेत. या अटींवर महारवतन खालसा होईल तर उत्तम. कारण तें सहज होण्यासारखें आहे. महारवतनांत एवढे मोठे दोष असतांनाही महार लोक वतन सोडण्यास अनमान कां करतात ? याची चौकशी केली असतां साधारणपणें असें दिसून येते कीं, वतन सोडलें असतां आपल्या इनाम जमिनी जातील अशी भीति महार लोकांना वाटत असते. वतन गेलें आणि त्याबरोबर पगारहि गेला, बलुतेंहि गेलें, व जमीनहि गेली तरी त्याची पर्वा महार लोकांना नाहीं, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. जमिनीची जर त्यांनीं पर्वा ठेविली नाहीं तर फटक्यासरशी एका अर्जाबरोबर त्यांना वतनाचा राजीनामा देता येईल ; आणि एवढा त्याग जर महार लोकांनी केला तर त्यांना आपली सुटका करून घेण्यास सरकारची दाढी धरण्याचें कांहींच प्रयोजन उरणार नाहीं. पण महार जात सर्व अस्पृश्य जातींत घोर दारिद्र्यानें व्यापलेली जात आहे. इतर अस्पृश्य जातींना कोणता तरी एक धंदा आहे. महार जातींच्या वाटणीस मात्र एकहि धंदा आला नाही. अशा स्थितींत उपजीविकेचें कोणतेंच साधन हातीं नसतांना महार जातीनें वतनी जमीनीचा सोस धरणें साहजिक आहे. परंतु या परिस्थितीचा फायदा घेऊन

तुम्ही जमिनी सोडीत नाहीं तर आम्हीही तुम्हांस वतनदारीच्या कामाच्या जबाबदारीतून मुक्त करणार नाहीं, असें सरकारनें म्हणणें केव्हांहि रास्त होणार नाहीं. महारांच्या वतनी जमिनी आपल्या कबजांत ठेवण्याचा सोस सरकारनें पुरविला तर सरकारचा तोटा होईल, हे खरें. परंतु महारांना वतनाच्या गर्तेत खितपत पडावयास लावून त्यांची वाढ खुंटविल्याने होणारा समाजाचा तोटा त्यापेक्षां अनेक पटीनें मोठा आहे, हें सरकारनें विसरतां कामा नये. तेव्हां जसें पुष्कळसा अर्थ साधण्यासाठी थोडासा अनर्थ होत असला तरी तो पत्करणें न्यायाचे आहे. या तत्त्वानुरूप सरकारनें या बाबतींत वर्तावें हे त्यांस उचित आहे.

आतां, महारांनी काम करण्याचे सोडून दिलें तर त्यांच्याऐवजीं दुसरे नोकर नेमून सरकारला आपली कामें करून घ्यावी लागतील व अशा नव्या नोकरांना पगार द्यावा लागेल. परंतु महार लोक वतन सोडल्यावर इनाम जमीनी आपल्या भोगवट्यास ठेवूं म्हणाले तर या नवीन नोकरांचा पगार कोठून आणावयाचा ? असा प्रश्न सरकारतर्फे पुढें येण्यासारखा आहे. हा प्रश्न सोडविणें विशेष जड नाहीं असें आम्हांस वाटतें. एकदां पगारी नोकर नेमावयाचें ठरलें म्हणजे सरकार हल्लीप्रमाणें नोकरांचें फाजील दळ राबविण्याचे बंद करून जरुरी पुरते एक दोन नोकरच नेमील. या ठराविक नोकरांच्या पगाराची तरतूद करण्यासाठी महारांच्या जमीनी काढून घेण्याचें कांहींच प्रयोजन पडणार नाही, असा आमचा दृढ भरवसा आहे. कारण महारांनीं सोडून दिलेलें बलुतें व नक्त पगार या दोन उत्पन्नाच्या बाबी या नव्या नोकरांच्या पोटगीखातर पुरेशा होतील. तथापि सरकारला याविषयीं संशय वाटून महारांचें वतन खालसा करण्यानें आपणास कोणत्याहि प्रकारची तोशीस लागूं नये, असा कांटेकोरपणाचा हट्टच जर सरकारनें धरला तर त्यासहि आमची संमति आहे. कारण कोणत्याहि अटींवर महार वतन खालसा व्हावें, अशी आमची इच्छा आहे. यास्तव सरकारला कानमान करण्यास सवडच मिळू नये म्हणून आम्ही असें सुचवितों कीं,

**महार-वतन खालसा करावें, पण महारांच्या इतर जमिनी काढून घेण्याऐवजी त्यावर मामुलजुडी बसविण्यांत यावी.**

म्हणजे कोणताच वाद शिल्लक उरत नाहीं. महारांच्या इनाम जमिनी महारांजवळ राहून महारांची वतनांतून सुटका होते. लागेल ते पगारी नोकर नेमून त्यांच्याकडून काम करून घेण्यास सरकार स्वतंत्र होतें व त्यांच्या खर्चाचा बोजा सरकारवर पडत नाहीं, अशा प्रकारच्या तडजोडीचा मार्ग उभयपक्षांनीं या प्रकरणांत स्वीकारावा, हें आम्हांस श्रेयस्कर वाटतें.

वतन सोडण्यास कोणीही तयार नाहीं. उलट गेलेले वतन परत मिळविण्यासाठी कुळकर्णी वतनदार कसे अहर्निश झटत आहेत हें पाहून महारकी वतन खालसा करण्यापेक्षां त्यांत सुधारणा करणें बरें नव्हे काय ? असा कोणी प्रश्न करील. आम्ही महारवतनाच्या विरुद्ध आहोत म्हणून,

## महारवतनांत सुधारणा करण्यापेक्षां तें खालसा करणें बरें

असे आमचे स्पष्ट मत आहे. महारकी वतन हे उत्सर्गकारी कारणांपैकी एक कारण असतें, तर त्याची सुधारणा करण्याचे उपाय आम्ही सुचविले असते. पण ते उपसर्गकारी कारणापैकी एक मोठेच प्रबळ कारण आहे. त्याचा लोप झाल्याशिवाय महारांची अवनति टळणार नाही. तेव्हा त्याच्या सुधारणेच्या पाठीस लागण्यात कांही अर्थ नाही हे उघड आहे. झालाच तर अनर्थ होईल. कारण वतनात सुधारणा झाली तर अदूरदृष्टी महार जात वतनाचा त्याग करण्यास प्रवृत्त होण्याऐवजी वतनाला जास्त जास्त चिकटून रहाण्याचा संभव आहे. कुळकर्णीवतनात व महारवतनात कोणत्याच प्रकारचें साम्य नाही. एक त्यांच्या धारण करणारांस अधिकाराप्रत पोहोचविते तर दुसरें त्यांच्या धारण करणारांस मनानें तसे शरीराने गुलाम बनवितें. तेव्हा कुळकर्णी लोक गेलेली वतनदारी परत मिळविण्यास झटतात म्हणून महारांनी आहे ती वतनदारी सांभाळून ठेवावी, असें केव्हांच म्हणता येणार नाही. कुळकर्णी लोक वतनासाठी झटतात, याचें कारण असें कीं, त्यांना वतनामुळे रयतेवर व महारांवर हुकमत प्राप्त होते. परंतु महारांच्या वतनामुळे त्यांना रयतेचें तसेंच अधिकाऱ्यांचे कायमचे ताबेदार व्हावे लागतें. सर्वांची हुकमत महारांवर पण महारांची हुकमत कोणावरच नाही. जन्मा आला हेला आणि पाणी वाहतां मेला, हीच त्याची गत. अंशा परिस्थितीची सुधारणा करून ती कायम करणे केव्हांहि हितावह होणार नाहीं. आम्हाला नमूद करण्यास आनंद वाटतो की, या बाबतींत आमचें जें मत आहे तेंच सरकारचें आहे. सन १९२५ साली माजी आमदार निकाळजे यांनी महारवतनदारांचा पगार दरमहा रुपये १५ असावा अशा प्रकारचा एक ठराव कायदे कौन्सिलांत आणला होता. त्यास सरकारतर्फे मि. मॉन्टफर्ड यांनी दिलेले उत्तर मनन करण्यासारखें आहे. ते म्हणाले, " महार लोकांची उन्नति करण्याचें कार्य इतकें कठीण कां जातें याचा विचार केला असतां असें दिसून येईल की, खेडेगावांत राहणाऱ्या महार लोकांना स्वाभिमानानें व स्वावलंबनानें आपला संसार चालविण्याची मुळींच संवय नाहीं. महार लोक अत्यंत दरिद्री आहेत, ही गोष्ट खरी. परंतु जन्मल्यापासून मरेपर्यंत भिकेचा हक्क सांगून

दुसऱ्यांनी दिलेल्या अन्नावर जगतो तो दरिद्री नसणार तर कसा असणार ? माझें असें स्पष्ट मत आहे की, गांवकीच्या बेडीला मुलामा देऊन महारांना आपली मान त्यांत कायमची गुंतविण्यास उत्तेजन देणारा हा ठराव मुळांतच चुकीचा आहे. महार लोकांना सुखी करावयाचें असेल तर ते गांवाला चिकटून न राहतां ते गांव सोडून जातील अशी व्यवस्था करणें जरूर आहे.'' परंतु महार वतन खालसा झालें तरच महार लोक गावांबाहेर जातील हे उघड आहे. अर्थात महारांच्या उन्नतीचा उपाय म्हणजे वतन खालसा करणें, सुधारणा नव्हें असेच मॉंटफर्ड साहेबांचें मत होते हें उघड आहे.

ज्या सुधारणांमुळे महार लोक वतनाला कायमचे चिकटून जातील अशा अनिष्ट सुधारणांच्या जरी आम्ही विरुद्ध आहोंत, तरी अशा

## कांही इष्ट सुधारणा

आम्हाला अवश्य दिसतात की, ज्या अमलांत आल्या असतांना महार लोकांच्या मनावर त्यांचा योग्य तो परिणाम होऊन ते वतन सोडून देण्यास तयार होतील. या इष्ट सुधारणांपैकी पहिली व महत्वाची सुधारणा ही की, महारांचे बलूते व भाकर बंद करून त्यांचे रुपांतर नक्त ऐवजांत करण्यांत यावें. खरें पाहिलें असतां महार लोकांचे बलूते आणि भाकर याचे नक्त ऐवजांत रुपांतर केव्हांच व्हावयास पाहिजे होते. इंग्रजी अमदानीच्यापूर्वी कोणत्याच प्रकारच्या वतनदार गांव कामगारांना कामाच्या मुशाहिऱ्या बद्दल नक्त ऐवज मिळत नसे. त्या ऐवजी त्यास काळी व पांढरी उकळून खाण्याचे हक्क असत. परंतु या काळी पांढरीच्या तगाद्याने नक्त इतकी गांजून गेली होती की, सन १८३९ च्या २० व्या कायद्या अन्वये वतनदारांचे काळीतील हक्क बंद करण्यात आले. त्याप्रमाणे पांढरी उकळण्याचे बंद करण्यांत यावें या इच्छेनें सन १८४४ चा १९ वा कायदाहि पास करण्यांत आला. या कायद्याच्या अनुरोधाने पाटील व कुळकर्णी या दोन वतनदार गांव कामगारांचे काळीपांढरीतील हक्क सरकारनें बंद केले व त्याचे रूपांतर नक्त ऐवजांत करून त्याचें प्रमाण गांवचे वसुलावर ठरवून दिले, व तो सरकारी तिजोरीतून मिळविण्याचीही व्यवस्था केली. पण महार वतनदारांना मात्र हे कायदे सरकारनें लागू केले नाहींत, ते कां ? याचे कारण कांहीं समजत नाहीं. परंतु कोणत्याही कारणामुळें हा भेदभाव आजवर ठेवण्यांत आला असला तरी तो यापुढें तरी ठेवण्यांत येऊं नये. ही सुधारणा घडून आल्यानें वतन म्हणजे नोकरी, भीक नव्हे, अशी भावना महारांच्या मनांत उत्पन्न होईल. एकदां वतनाला नोकरीचें स्वरूप प्राप्त झालें म्हणजे इतर नोकरींतून सुटका करून घेण्यास जसा नोकर वर्ग कचरत नाहीं तसेंच प्रसंगविशेषीं महारलोक ही वतनी नोकरी सोडून

देण्यास कचरणार नाहींत, अशाच प्रकारची दुसरी सुधारणा आम्हास सुचवावीशी वाटते. ती ही कीं, रयतेकडून जें बलुतें महारलोकांस दिलें जातें तें केवळ रयतेच्या कामाकरितांच दिलें जातें असें नसून तें सरकारी कामाचा मोबदला म्हणूनहि दिलें जाते, असा सरकारचा नियम दिसतो. बलुत्याच्या आधारावर रयत महारलोकांस नेहमी आपल्या दास्यत्वांत कसें जखडून ठेवितें, याचें विवेचन आम्ही यापूर्वीच केले आहे. रयतेच्या जोर जुलमांपासून महारांना मुक्त करावयाचें असल्यास त्यांना रयतेच्या आधीन होण्याची पाळी त्यांच्यावर येणार नाहीं अशी वतन कायद्यांत सुधारणा करणे अवश्य आहे. यास्तव आमचे असें मत आहे कीं, ऐन जिनसी बलुत्याचें व भाकरीचें रूपांतर नक्त नेमणुकींत तर व्हावेंच, पण या नक्त नेमणुकीची विभागणी होऊन सरकारी कामाकरिता किती व रयतेच्या कामाकरितां किती, याचें प्रमाण अलग करण्यांत यावें ; व रयतेचें काम पत्करावें किंवा सोडून द्यावें, याची मुभा महार वतनदारांस देण्यांत यावी. तेणेकरून कामगार महार रयतेचा बंदा गुलाम न राहतां त्याला इतर रयतेचा दर्जा प्राप्त करून घेण्यास अवसर सांपडेल.

महार वतनावर लिहिलेल्या या तीन लेखांत जे विचार प्रगट करण्यांत आलेले आहेत व ज्या सुधारणा सुचविण्यांत आलेल्या आहेत त्या सर्वांचा समावेश आजच्या अंकात दुसरीकडे वतनकायद्याच्या दुरुस्तीचें जें बील† छापण्यांत आलें आहे, त्यांत करण्यात आला आहे. हें बील थोड्याच दिवसांनी मुंबईच्या कायदेकौन्सिलात मांडण्यात येणार आहे. ज्यांना या विषयासंबंधी अगत्य वाटत असेल त्यांनी या बिलाचे लक्षपुर्वक मनन करावें ; व सुचना करावाव्याशा वाटतील त्या आमच्याकडे पाठवून द्याव्यात. त्यांचा योग्य तो विचार केला जाईल.[१]



† पाहा, परिशिष्ट क्रमांक २९.

[१] : अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ३० सप्टेंबर १९२७.

# ६२
# ब्राह्मण्याचा उच्छेद झाल्याशिवाय हिंदूंचे संघटण होणे दुरापास्त

भाई परमानंद हे एकेकाळीं पंजाबांतील हिंदुमहासभेचे मोठे पुरस्कर्ते होते. परंतु थोडक्याच अवधींत त्यांना असें दिसून आलें कीं, हिंदु संघटणेचें कार्य हिंदु महासभेचे हातून पार पडणें शक्य नाहीं. कारण ब्राह्मण्याचा उच्छेद झाल्याशिवाय हिंदूंचे संघटण होणें दुरापास्त आहे. या ब्राह्मण्याचा उच्छेद करावयास ज्या रोटीबंद बेटीबंद तटबंद्यांच्या आत तें सुखरूपपणे नांदत आहे त्या उडवून दिल्या पाहिजेत हें निर्विवाद आहे. परंतु हिंदुंचें संघटण करावयास कंबर कसलेली हिंदु महासभा दर्भंग्याच्या महाराजांच्या सनातन धर्म महामंडळाप्रमाणें संघटणेच्या आड येणाऱ्या ब्राह्मण्याला कापून काढण्याऐवजी त्याची जोपासनाच करू पाहते ! याचा उद्वेग वाटून भाईपरमानंद यांनी "जातपात तोंडक मंडळ" या नावाची संस्था स्थापन केली. तिच्या मार्फत संघटणेंचें कार्य चालू असतां त्यांनीं नुकतेंच एक 'हिंदु साम्यवाद मंडळ' उभारलें आहे. हें नवीनच काय आहे म्हणून भाई परमानंद यांना जिकडून तिकडून विचारपूस होत असतां उत्तरादाखल त्यांनीं एक खुलासेंदार जाहिरनामा प्रसिद्ध केला आहे. त्यांत भाई परमानंद लिहितात, "मला वाटतें आजच्या काळांत हिंदु समाजरचनेंत आमूलाग्र क्रांति घडवून आणणें अत्यंत जरूर आहे. समता आणि बंधुत्व यांचा संदेश सर्वत्र प्रसृत करतांना **जरूर तर आपण जुन्या शास्त्राज्ञाहि पाळूं नयेत.** त्या शास्त्राज्ञादेखील तत्परिस्थितींत समाजसंवर्धनाला आवश्यक वाटल्या म्हणूनच प्रसृत केल्या होत्या. समाजसंरक्षण हें मुख्य साध्य असून शास्त्रज्ञा हें त्यांचे केवळ साधन होतें. अर्थातच परिस्थित्यनुरूप साधनांत फरक करणें अत्यावश्यक आहे. जन्मजात अधिकारांच्या रक्षणासाठीं जे लोक भांडतात त्यांना तोंड देण्यासाठी ४ वर्षांपूर्वी 'जात-पात-तोडक मंडळ' स्थापन झालें होतें. जे जीर्णमतवादी आपल्या जन्मजातीचा वृथाभिमान बाळगून विधवा आणि कनिष्ठ वर्ग यांना माणुसकीनें वागविण्यास तयार नाहींत, त्यांना शह देणें हें या मंडळाचें कार्य आहे. हें जुनें 'जात-पात-तोडक मंडळ' म्हणजेच नवे 'हिंदु साम्यवाद मंडळ' होय. त्या मंडळाचा पूर्वीचा हेतु विध्वंसक स्वरूपाचा होता; आतां समाजांतील असाम्यता

नष्ट करून एकता, बंधुभाव आणि साम्यता निर्माण करणें असें विधायक ध्येय पुढें ठेवलें आहे. अमेरिकेत जी यादवी (Civil war) झाली ती जगांतील गुलामगिरी नष्ट करणें या सामाजिक प्रश्नावरच झाली. फ्रान्स देशांत क्रांति होण्यापूर्वीच तेथील विचारप्रवर्तकांनी आपल्या बांधवास साम्यता आणि बंधुभाव याचें शिक्षण दिलें होतें. १८३२ साली इंग्लडांत जो सुधारणांचा कायदा अमलांत आला, त्यानेंहि बरीच सामाजिक प्रगति झाली. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील आपल्या स्वराज्याच्या चळवळीचा अखेर निष्कर्ष हाच निघाला आहे की, आपण आपल्या कोट्यावधि बांधवांना समानतेचे हक्क दिल्याखेरीज आपण राजकीय हक्कांस लायक ठरत नाहीं. आपल्या हिंदुसंघटनाच्या चळवळीविषयीं असें म्हणतां येईल कीं, मुसलमानांच्या जातिविषयक चळवळीला तोंड देण्यासाठी संघटन पाहिजे या मुद्यावर जरी सर्वांचें एकमत असलें, तरी त्यामुळें हिंदुसमाजांत संघशक्ति निर्माण झालेली नाही. जाति आणि धर्मपंथ यांची विध्वंसक शक्ति संघटनापेक्षां अधिक सामर्थ्यवान ठरली असल्यामुळें उच्च नीच हे भेदभाव विसरून जाऊन हिंदुसमाजाची समानतेच्या तत्त्वावर पुनर्घटना करणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें. इथून तिथून सारे हिंदू एकाच रक्तामांसाचे व त्यांचा इतिहासहि एकच असून आज त्यांच्यावर अपूर्व आपत्तीला तोंड देण्याचा प्रसंग आला आहे या एकाच भावनेनें ते बद्ध झाले पाहिजेत. आज हिंदु समाजापुढें तो जिवंत कसा राहिल, हा प्रश्न आहे. अशा परिस्थितीत ज्यांनी त्यांनी आपल्या पूर्वजांच्या धर्मावर श्रद्धा ठेवून व उज्वल भावितव्याचीं आशा करून परिस्थित्यनुरूप वागण्यास तयार झालें पाहिजे.''

आज इतके दिवस संघटणेचे बाबतीत हिंदु महासभेकडून जी फसवणूक होत आहे तिचा विचार केला असतां भाई परमानंद यांच्या स्पष्टोक्तीबद्दल त्यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. ब्राह्मण्याचा त्याग केल्याशिवाय संघटण होणें शक्य नाहीं ही गोष्ट हिंदु महासभेवाल्यांस कळत नाहीं, अशांतला कांही भाग नाही. पण कांही गोष्टी कांही लोकांना इतक्या जिव्हाळ्याच्या वाटतात कीं, त्यांचा त्याग करणें तर राहोच पण नुसता त्यांच्या त्यागाविषयींचा विचार करणें देखील मनाला दुःखदायक होतें. हिंदुमहासभेला ब्राह्मण्य ही अशाच प्रकारची प्रिय झालेली चीज आहे. तिचा त्याग करण्याचा विचार हिंदु महासभेच्या मनाला शिवणें सुद्धां अशक्य आहे. हिंदु महासभा ही गोष्ट प्रांजलपणें जर कबूल करती तर तिला दूषण देण्याचें कांहीं कारण नव्हतें. कणंगीला हात लावूं नको व पोरेंहि उपाशीं मारूं नको, असा अविचार सांगणारा कुणबी बापडा नेणताच होता. पण एकीकडे ब्राह्मण्याला धक्का लावावयाचा नाहीं व दुसरीकडे तर संघटणा करण्याचा आंव

आणावयाचा हा हिंदु महासभेवाल्यांच्या नेणतपणचा अविचार नसून त्यांत दगलबाज जाणत्या माणसांची ठगबाजी भरलेली आहे. या ठगबाज लोकांना बाजूस सारून भाई परमानंद यांनीं जातपात तोडक ऊर्फ हिंदु साम्यवाद मंडळ प्रस्थापित केलें ही गोष्ट हिंदु संघटणेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची आहे असें आम्ही समजतों.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १६ सप्टेंबर १९२७.

# ६३
# सहभोजन ''गुपचूप'' न घेता तें जाहीर करावे अन्यथा .......

भाई परमानंद यांच्या जातपात तोडक ऊर्फ हिंदु साम्यवाद मंडळाचे हेतु व साधनें बऱ्याचशा हिंदु लोकांना पटत चाललीं आहेत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. मुंबईत चिंचपोकळी येथील सोशल सर्व्हिस लीगच्या परेल शाखेनें चालविलेल्या शाळेच्या विद्यार्थ्यांनी व तालमीच्या खेळगड्यांनी चालू साली गणेश उत्सव साजरा केला होता. सार्वजनिक गणेश उत्सव ही अगदी अलीकडील बाब आहे. हिंदु धर्माचे असूनहि मुसलमानी मोहरमाचे वेळेस आपपर भाव सोडून देऊन त्यांच्या देवांस नवस सायास करण्याचा हिंदूंचा सांप्रदाय असे. परंतु प्रतिवर्षी मुसलमानांशी एकरूप होत असतांहि मुसलमान हिंदुंची कत्तल करण्यास कमी करीत नाहींत असें जेव्हां मुंबईतील हिंदुमुसलमानांच्या दंग्यांनंतर दिसून आलें तेव्हां लोकमान्य टिळकांनी हिंदूंना ताबूदापासून परावृत करावें, व उत्साह विकृत होणाऱ्या या लोकांना स्वधर्माशी संबंध असलेली अशी कांहीतरी नवीन करमणूक मिळवून द्यावी अशा उद्देशानें सार्वजनिक गणेश उत्सवाची प्राणप्रतिष्ठा केली. सार्वजनिक गणेश उत्सवाची पूर्वपीठिका ही अशी असल्यामुळे त्या उत्सवाचा रोख साधारणपणें मुसलमानांविरूद्ध असणें अगदीं सहाजिक आहे. आतां हा उत्सव हिंदुमहासभेच्या पंखाखाली साजरा होत असल्यानें तर गणेश उत्सव म्हणजे मुसलमानांविरूद्ध व्याख्यानांचें एक सत्रच आहे असा भास होऊ लागला आहे. चिंचपोकळी येथील या गणेश उत्सवांत मात्र घडलेला प्रकार या नेहमींच्या प्रकाराहून अगदी भिन्न होता. तेथें मुसलमानांविरूद्ध जप करण्याऐवजी ब्राह्मण्यावर गदा घातली गेली व सहभोजनाच्या द्वारें ब्राह्मण्याचें संरक्षण करण्यासाठी उभारलेल्या तटबंद्यांपैकी रोटीबंदीची तटबंदी उडवून देण्यांत आली. या सहभोजनांत ब्राह्मणापासून भंग्यापर्यंत सर्व जातींचें मीलन झालें होतेंच. पण या सहभोजनांत आमच्या मतें दोन गोष्टी अपूर्व अशा झाल्या. पहिली अपूर्व गोष्ट म्हटली म्हणजे ही कीं, अस्पृश्यांनी स्पृश्यांना जेऊं घातलें. स्पृश्यास्पृश्यांत जीं सहभोजनें होतात, त्यांत बहुधा स्वयंपाकी अथवा यजमान कोणीतरी स्पृश्य गृहस्थ असतो. असल्या सहभोजनाला आमचें मतें कांहींच महत्व नाहीं. सर्वच लोक आपल्याला ब्राह्मणाच्या उष्ट्याचे धनी

समजतात. ब्राह्मणाचे हातचें कोणीहि खातो. ब्राह्मणाचें हातचें शिजलेलें अन्न स्पृश्य अस्पृश्य यांनीं मिळून एका पंक्तीला बसून खाल्लें तर त्यांत ब्राह्मण्याला कांहींच धोका पोहोंचत नाहीं. तें अढळ राहतें. सहभोजनाचा मुख्य हेतु जर ब्राह्मण्यविध्वंसन हा असेल तर अस्पृश्यांनी शिजविलेलें अन्न ब्राह्मणांना खावयास लावलें पाहिजे. तो प्रकार या सहभोजनप्रसंगीं घडला म्हणून या सहभोजनाला विशेष महत्व आहे असें आम्ही समजतो. याच प्रसंगी घडलेली दुसरी अपूर्व गोष्ट म्हणजे ही कीं या सहभोजनांत शाळेच्या व तालमीच्या शेजारी असलेल्या इस्पितळांतील भंगी लोकहि स्पृश्य लोकांशीं मांडीशीं मांडी लावून पंगतीला बसले होते. नुसता अस्पृश्य आहे असें म्हटलें तर कांही ब्राह्मण्यग्रस्त स्पृश्य लोकांना शिसारी येते. अनोळखी अशा अस्पृश्यांची संगत करण्याची गांठ पडली तर ते कसा बसा कड सोसून वेळ मारून नेतात. असा जेथें प्रकार आहे तेथें आपल्या देखत भंग्याचा धंदा करित असलेल्या माणसाला पंक्तिपावन करणें ही मोठ्याच मनोधैर्याची गोष्ट आहे हें ब्राह्मण्याची जाणीव असणारा कोणीही माणूस नाकबूल करणार नाहीं. या मंगलमय पर्वणीचें सारें श्रेय आमचे उत्साही मित्र डॉ. आपटे यांना आहे. ही वार्षिक पर्वणीची बाब न राहतां हा नेहमींचा शिरस्ता होईल अशी कांही तरी भाईपरमानंद यांच्या जातपात तोडक मंडळाच्या धर्तीवर नित्याची व्यवस्था करण्यांत यावी अशी डॉ. आपटे यांस आमची प्रेमाची सूचना आहे.

या सहभोजनाला एकंदर ७०/८० माणसें हजर होतीं. जागा लहान व वेळ थोडा या दोन कारणांमुळे सहभोजनांत भाग घेण्यास उत्सुक असणाऱ्या दुसऱ्या कित्येकांना आमंत्रणें पाठविण्यांत आलीं नव्हतीं. तथापि माटुंगा हिंदु महासभेचे चिटणीस डॉ. उद्‌गांवकर यांना आपल्या मित्रमंडळींसह भोजनास येण्यास आमंत्रण देण्यांत आलें होतें. त्यास मान देऊन डॉक्टर साहेब युरोपीयन पद्धतीप्रमाणे एक मिनीट मागें पुढें न होऊ देता नेमके बाराला आले व "खाना तयार है" म्हणून तेथल्या मुदपाक्यांना त्यांनी सवाल केला. 'थोडा वेळ आहे,' असें उत्तर मिळाल्याबरोबर स्वारी जरा गरम झाली व "हम जाता है, हमकू दूसरा काम है" असें म्हणून निघून गेली. जातांना डॉक्टर महाशयांनी एक पत्र लिहून ठेवलें होतें. त्यांत "हिंदु सभेनें आतांपर्यंत अशी सहभोजनें घडवून आणलेलीं आहेत. मात्र ती प्रसिद्ध न करतां घडवून आणलेलीं आहेत व यापुढेही हिंदु सभा अशीं सहभोजनें घडवून आणील" असें जळफळीचे उद्‌गार काढलेले होते. हिंदुमहासभेला हा सहभोजनाचा कार्यक्रम जर आवडतो व तिनें मागें केला आहे व पुढेंहि जर ती करणार आहे तर तिच्या चिटणीसांनी आमंत्रणाबद्दल आनंद व्यक्त करावयास पाहिजे होता. पण

त्यांना तर राग आला ! आम्हाला तरी असें वाटतें कीं आपण हिंदु संघटणांच्या लंब्याचवड्या बाता झोंकतों तेव्हां त्याप्रमाणें आपण वागतों किंवा नाहीं याची कसोटी करण्यासाठींच आपल्याला हें आमंत्रण दिलें गेलें असें या डॉक्टर साहेबांस वाटल्यावरून त्यांना राग आला असावा. खरे म्हटलें असतां हें सहभोजन झालें तें केवळ हिंदु महासभेला लाजविण्यासाठीं किंवा तिच्या चिटणीसांची परीक्षा घेण्याच्या हेतूनें घडविण्यांत आलें नव्हतें. तथापि त्यांना तसें वाटणें साहजिक आहे, परंतु चिटणीस साहेबांनी रागें भरण्या ऐवजीं लोक आपल्या वर्तनाबद्दल संशय कां घेतात याचाच आधीं विचार करावा व संशयाचें कारण दूर करावें म्हणजे त्यांना आमंत्रणाचा शीण कोणी देणार नाहीं. चिटणीस महाशय सहभोजन करीत नसतील असें आम्हीं म्हणत नाहीं पण त्यांची प्रसिद्धी होत नसल्याकारणानें ते बोलल्याप्रमाणें वागतात असें समजण्यास कांही मार्ग नाहीं. पुष्कळ सनातन धर्मवादी लोकहि सहभोजनांत भाग घेतात. पण त्याची बाच्यता करण्यास ते इतके भितात कीं "न व्हावें तें झालें" असें समजून त्याच्यावर "गुपचूप" घेतात. तेणेंकरून ते सहभोजन करीत असूनहि करीत नाहींत असाच भ्रम सर्वत्र पसरलेला राहतो. हा गैरसमज पसरण्यास त्याचे तेच कारणीभूत असतात तीच गत डॉक्टर महाशयांची असूं शकेल. त्याचा उपाय त्यांच्याच हातांत आहे आणि तो हाच कीं त्यांनी करीत असलेल्या सहभोजनावर "गुपचूप" न घेतां तें जाहीर करीत जावें. नाहीं तर सहभोजन करीत असूनहि ते करीत नाहींत या भ्रमानें समाजांतील जहाल लोक अशा प्रकारचीं आमंत्रणें देऊन त्यांचा छळ केल्यावाचून राहणार नाहींत.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १६ सप्टेंबर १९२७.

# ६४

# ब्राह्मणी धर्माच्या सभोंवार बांधलेले जे तीन कोट, पैकी अस्पृश्यता बाहेरचा कोट

मुंबईत माटुंगा येथे कुमार विनयमंदिर या भलत्याच नांवाची अस्पृश्य विद्यार्थ्यांकरिता राष्ट्रीय स्त्रीसंघानें चालविलेली एक शाळा आहे. ही शाळा रा. गांधी यांच्या असहकारितेच्या चळवळीच्या धामधुमींत स्थापन करण्यांत आली होती. असहकारिता जरी आज सर्वत्र लोपत चालली आहे, तरी या शाळेच्या मूळस्वरूपांत फारसा फेरबदल झालेला नाहीं. या शाळेंचे हल्लींचें मुख्याध्यापक मि. शेट्ये या नांवाचे एक गृहस्थ आहेत. त्यांनी मोठी मेहनत घेऊन शाळेतील विद्यार्थ्यांचा एक मेळा तयार केला, व तो गणपतीसमोर येऊ देण्याबद्दल बऱ्याच सार्वजनिक गणेशोत्सव-कमिट्यांकडे विनंती अर्ज केलें. तशाच प्रकारचा एक अर्ज मुंबईच्या शंकरवाडीतील ब्राह्मण सभेच्या गणेशोत्सव-कमीटीकडेहि त्यानीं केला होता. परंतु नवलाची गोष्ट हीं की, हा कुमार विनयमंदिरांतील अस्पृश्य मुलांचा मेळा आपल्या गणपतीपुढें येऊं द्यावा किंवा नाहीं, या प्रश्नावर ब्राह्मण सभेंत जसें वादळ झालें तसें अन्यत्र कोठेंच झालें नाहीं. प्रथमतः ब्राह्मण सभेच्या व्यवस्थापक मंडळानें इतर मेळे आणिले जातात त्या ठिकाणीं ब्राह्मण सभेच्या गणपतीपुढें या मेळ्यास येऊं द्यावें असा ठराव बहुमतानें पास केला. परंतु असा ठराव करणें हें व्यवस्थापक मंडळाच्या अधिकारांतलें नसून तसा ठराव करण्याचा अधिकार फक्त साधारण सभेसच आहे, अशा सबबीवर ब्राह्मण सभेच्या कांहीं सभासदांनी संस्थेची सर्वसाधारण सभा या प्रश्नाचा निकाल करण्यासाठी बोलावण्यांत यावी, अशा अर्थाचा एक अर्ज ता. १८ ऑगस्ट रोजीं व्यवस्थापक मंडळाकडे करण्यांत आला. त्याप्रमाणें ता. २८ रोजी साधारण सभा बोलाविण्यांत आली; व तेथेंहि व्यवस्थापक मंडळानें केलेला पूर्वीचाच ठराव बहुमताने पास झाला. व त्याप्रमाणे रा. शेट्ये यांनाहि कळविण्यांत आलें. परंतु ज्यांना हा ठराव कबूल नव्हता, अशा सुमारे १२५ पुराणमताभिमानी सभासदांनी ता. २८ रोजी भरलेली सभा गैरकायदेशीर होती व त्यांत ब्राह्मणसभेंचे सभासद नसलेल्या लोकांनी मतें दिली, अशा सबबीवर त्याच प्रश्नाचा पुन्हा रितसर

विचार करण्याकरितां ब्राह्मण सभेची दुसरी सर्वसाधारण सभा बोलवावी असा अर्ज व्यवस्थापक मंडळाकडे केला. त्याप्रमाणे ता. ९ सप्टेंबरला पुन्हा सर्व साधारण सभा भरविण्यांत आली. मध्यंतरी उभय पक्षांच्या पुष्कळ सभा झाल्या. परंतु त्या सर्वात विरोधकांना अपयशच आलें. शापादपिशरादपि ब्राह्मणब्रुव एवढ्यानें थांबले नाहीत. त्यांनी ब्राह्मण सभेवर हायकोर्टात फिर्याद केली व ता. २८ ऑगस्टचा ठराव अमलांत आणू नये म्हणून मनाई हुकूम मागितला. पण त्यांच्या दुर्दैवानें तोहि त्यांना मिळाला नाही. अशा प्रकारे अस्पृश्यता निवारकवाल्यांचा विजय होत असता कांही अवसानघातकी लोकांनी ता. ९ सप्टेंबरच्या सभेत अस्पृश्यांच्या मेळ्याला इतर मेळे येतात तेथवर येऊं द्यावें किंवा नाहीं, हा ठराव मांडण्याऐवजीं "कुमार विनयमंदिराच्या मेळ्याला सभेच्या मांडवांत येऊं द्यावें, तेथे त्यांचा कार्यक्रम झाल्यानंतर श्रींच्या दर्शनासाठी मेळ्यांतील मुलांना दिवाणखान्यापर्यंत नेऊन तेथे त्यांना श्रींचा प्रसाद द्यावा," असा समेटाचा ठराव मांडण्यात आला ! ! या ठ़रावाचे जनक डॉ. भाजेकर हे होते ! त्यांनीच हा ठराव मांडला, व तेच या सभेचे अध्यक्ष होते. ठराव मांडल्यावर सभाजनांच्या आग्रहावरून विरोध करणारांचीं व पाठिंबा देणारांची पांच पांच मिनिटे भाषणें झालीं. परंतु शेवटी ठरावावर मतें घेण्याची वेळ आली असतांना मतांची मोजणी कोणत्या प्रकारें करावीं यावर वाद माजून आरडाओरड सुरू झाली. कदाचित् समेटाचा ठराव नापास होईल या भयानें झालेल्या गोंगाटाचा फायदा घेऊन मतें घेतल्याशिवाय सभा बरखास्त झाली असें जाहीर करण्यास सांगून अध्यक्ष निघून गेले; व उपस्थित झालेल्या प्रश्नावर अखेरचा निकाल दिल्याखेरीज सभा संपली !!

सभेचें वरीलप्रमाणें पर्यवसान झाल्यामुळे व दुसऱ्या दिवशीं गणपतींचें विसर्जन व्हावयाचे असल्यामुळे कुमार विनयमंदिराच्या मेळ्याच्या अर्जासंबंधी काय करावयाचें याचा निर्णय करण्यांसाठीं ब्राह्मण सभेच्या व्यवस्थापक कमिटीची निकडीची सभा ता. १० सप्टेंबर रोजी सकाळी ८ वाजतां भरली होती. तिनें ता. २८ ऑगस्ट रोजी पास झालेल्या ठरावाची अंमलबजावणी करण्याऐवजी सभेंत पास न झालेल्या अशा समेटाच्या ठरावाची अंमलबजावणी करावी असा निर्णय दिला ! ! व त्याप्रमाणें रा. शेट्ये यांना आपला मेळा आणण्यास सांगितले. व रा. शेट्ये यांनीं आपला मेळा त्या ठिकांणीं नेला. ध्यांनात घेण्यासारखी गोष्ट ही की, या मेळ्याचा सभागृहाच्या पायरीला पाय लागू नये अशी व्यवस्था करण्यात आली होती ! मेळ्यांतील मुलांना सभागृहाच्या समोरच्या मोकळ्या जागेवर पद्यें

म्हणावयास लाविलें. अगदींच उघड्यावर उभें केलें असें वाटू नये म्हणून या मोकळ्या जागेवर तात्पुरता मंडप घालण्यात आला होता. पद्यें म्हणून झाल्यावर मेळ्यांतील मुलांनी गणपतीचे दर्शन कोठून व कसें घ्यावें याविषयीं वाद निघाला. त्यांत बाहेरच्या जिन्यावरून एकेका मुलानें गणपती बसविलेल्या दिवाणखान्याच्या दाराबाहेरून दर्शन घ्यावें असें सुचविण्यांत आलें. एकेका मुलाला जाऊं देण्यांत मुलें अतिक्रम करतील अशी शंका त्याच्या मुळाशीं असून विनय मंदिराच्या विनयावर वाढलेल्या मुलांवर हा शिंतोडा नसून पर्यायाने तों आपल्या स्वतःवर आहे, असे रा. शेट्ये यांना वाटल्यावरून ती सूचना त्यांनी अमान्य केली. वाद येवढ्यापुरताच होता. कारण दिवाणखान्याच्या बाहेरून मुलांनी गणपतींचे दर्शन घ्यावें, ही गोष्ट रा. शेट्ये यांना नापसंत नव्हती. शेवटी जिन्यावर व दिवाणखान्याच्या पांच दरवाज्यांवर दोनदोन माणसांचा पहारा ठेवून मुलांना वर नेण्यांत आलें ; व बाहेरच्या गॅलरींतून त्यांनी देवदर्शन घेतले. नंतर ब्राह्मणसभेचे कार्याध्यक्ष रा. काणे यांनी मुलांना प्रसाद दिला ! अशा रीतीनें या दर्शनपिपासू मुलांचे व त्यांच्या अध्यापकाचें स्वागत झाल्यानंतर हा मेळा आपल्या स्थानी परत आला ! !

ज्या ब्राह्मणसभेच्या सभासदांनीं भेटीबंदीचा कोट मोडून अस्पृश्यांना आंत आणण्याचा प्रयत्न केला, ते आपल्या हाती घेतलेला पण शेवटास नेतील अशी आमची अपेक्षा होती. परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, इरेस चढलेले हे लोक आपला पण सोडून देऊन आपल्या प्रतिपक्षाला शरण गेले ! युद्धाचा निश्चय करून संग्राम करण्यास सज्ज झालेले हे लोक शरण गेले ते अल्पसंख्याक होते म्हणून शरण गेले हें जर खरें असते तर त्याचें आम्हांस कांहीच आश्चर्य वाटलें नसतें. परंतु त्यांचे मागे एवढे प्रचंड लोकमत होते की, करू ती पूर्व असे त्यांना छातीठोकपणें आपल्या प्रतिपक्षास म्हणतां आलें असतें. परंतु केवळ मताधिक्याच्या जोरावर हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला तर त्यामुळे ब्राह्मणसभेंत फूट पडणें अपरिहार्य होईल, म्हणून सभासदांनी हा प्रश्न सभेच्या भवितव्याच्या दृष्टीनें व समेटाच्या भावनेने सोडविला पाहिजे, म्हणून करूं ती पूर्व असे सांगण्याचा अधिकार प्राप्त झाला असतांहि तो अधिकार सोडून म्हणाल ती पूर्व या अटीवर ओढघस्तीस आलेल्या प्रतिपक्षाशीं या लोकांनी तहनामा केला. त्यांचा वरील युक्तिवाद आम्हांस पटतो. आतां हिंदुसमाजाचे ऐक्य ही महत्वाची बाब आहे किंवा ब्राह्मण सभेचे ऐक्य ही महत्वाची बाब आहे या राष्ट्रीय दृष्टीनेंहि या प्रश्नाकडे पाहणे अवश्य होतें. परंतु राष्ट्रांचे नांव व आपला गांव या लफंगेगिरीला राष्ट्रीय चळवळ

असें गोंडस नांव देऊन अज्ञ जनतेला फसवीत आलेल्या या लोकांना असली व्यापक दृष्टी असणे शक्य नाही. व्यापक दृष्टी नसली तरी नसो. पण ब्राह्मण सभेच्या ठायी व्यापक बुद्धि तरी असावयास पाहिजे होती. केवळ ब्राह्मणसभेच्या भवितव्याच्या दृष्टींनेंच जर या प्रश्नाचा निकाल करणें इष्ट होतें, तर मग उभय पक्षांत एवढे रण तरी कां माजवलें गेलें हेंच आम्हांस समजत नाहीं. ब्राह्मणसभा ही ब्राह्मणांची संस्था आहे, तिची उभारणी करण्यांत शंकराचार्यांसारख्या धर्ममार्तंडापासून तो साध्या भिक्षुकापर्यंत अखिल ब्राह्मण ज्ञातीनें पै पैसा जमवून हातभार लावलेला आहे. अशा संस्थेंत अस्पृश्यता मानणारे लोक नसले तर ते अन्यत्र कोठे असूं शकणार ? अस्पृश्यता हा ब्राह्मणी धर्माच्या सभोंवार जे भेटीबंद, रोटीबंद व बेटीबंद असे तीन कोट बांधलेलें आहेत त्या पैकी हा अगदी बाहेरचा कोट आहे. हा भेटी बंदीचा बाहेरचा कोट फुटला व शत्रु आत आले तर ते सहज रोटी बंदीचा कोट फोडतील व तो जर फुटला तर बेटी बंदीच्या कोटाचे संरक्षण करणे अशक्य जाईल, व शेवटी ब्राह्मणी धर्माचा भयाभंग होईल, तेव्हा भेटी बंदीच्या कोटाचे दरवाजे उघडून शत्रूला आंत घेऊन त्यास आपल्यावर मात करण्यास संधी देण्याऐवजीं, ह्या बाहेरच्या कोटावर सज्ज होऊन आंत येऊं पाहणारांचा प्रतिकार करणें हें ब्राह्मणी धर्माच्या संरक्षणार्थ शहाणपणाचे लक्षण आहे असें ब्राह्मणी धर्माच्या भक्तांना वाटणे साहजिक आहे. ज्या ब्राह्मण सभेच्या सभासदांनी भेटी बंदीचा कोट मोडून अस्पृश्यांना आत आणण्याचा प्रयत्न केला त्यांना ब्राह्मण सभेंत आपल्या विचारांच्या विरूद्ध कांही सभासद आहेत याची जाणीव नव्हती असें केव्हांही म्हणता येणार नाहीं. तेव्हां त्यांनी जी उचल घेतली ती या विरोधकांविरूद्ध सामना करून त्यांचा पाडाव करावयाचा या भावनेनेच घेतली असली पाहिजे. या सामन्यांत अस्पृश्यासारख्या परकीय समाजाकरितां आपणास ब्राह्मण समाजांत दुही करावी लागेल हें सूर्य प्रकाशाइतकें स्पष्ट होते. ती जबाबदारी जर या सुधारकांना घ्यावयाची नव्हती तर त्यांनी हें वादळ उत्पन्न करून काय साधलें हेंच कळत नाहीं.

ब्राह्मण समाजांत दुफळी व्हावयाची ती झालीच, आतां या वादाचे पर्यवसान ज्या समेटाचे ठरावांत झालें त्या ठरावानें जर अस्पृश्य लोक संतुष्ट होते, तर झाला हा वाद बरा झाला असें आम्ही म्हणालों असतों. परंतु आमचे असें स्पष्ट मत आहे कीं, या ठरावानें अस्पृश्य लोक संतुष्ट होणें शक्य नाहीं. ब्राह्मणशाहीं कांहीं सामान्य नव्हे. समर्थ आहे, अधिकारारुढ आहे, तसेंच ती धूर्त आहे. अर्थात स्वतःचे अधिकारास बाध न येतां अस्पृश्यांस जें देतां येईल तेंच देईल व आपण मोठेसें कांहीं देतों आहोंत असें भासवील. पण आमच्या ब्राह्मणशाहीनें हें ध्यानात घ्यावें कीं, आतांचे अस्पृश्य लोक भोळे नाहींत, ते दक्ष आहेत त्यांना पाहीजे काय याची जाणीव आहे व जें मिळालें तें तपासून घेण्याची अक्कल आहे. अस्पृश्यांना

अस्पृश्यता घालवावयाची आहे, पण सहविवाह सुरू झाल्या खेरीज आपली अस्पृश्यता गेली असें मानावयास ते कदापि तयार होणार नाहींत. ब्राह्मण्य मरेल तेव्हांच अस्पृश्यता जाईल आणि बेटीबंदीचा कोट उडाल्या खेरीज ब्राह्मण्य कांहीं मरत नाहीं. अर्थात ब्राह्मण्य मारल्या खेरीज अस्पृश्य लोक शांत बसणें शक्य नाहीं हें उघड आहे. कारण ब्राह्मण्य आहे तो पर्यंत अस्पृश्यताहि दारांत नसली तरी घरांत राहणारच. या स्पष्टीकरणावरून अस्पृश्यांच्या आकांक्षा काय आहेत हें ब्राह्मणशाहींनें ओळखून घ्यावें. जेथें अस्पृश्यांच्या मागणीची धांव येथवर पोहोचली आहे तेथें या समेटाच्या ठरावानें अस्पृश्य वर्ग ब्राह्मण सभेनें आपणास उपकृत केलें असें न मानतां, ब्राह्मण सभेनें आपली विटंबना केली असेंच मानील. याबद्दल कोणीहि शंका घेऊं नये.

रा. शेट्ये यांना मात्र आपला अपमान झाला असें वाटलें नाहीं हें खरें. उलट ब्राह्मणसभेंनें फारच सौजन्य दाखविलें असेंही त्यांना वाटलें असावें. कारण त्यांच्या मागणींत "हा मेळा शंकरवाडींतील सार्वजनिक गणपतीपुढें माडीवरील दिवाणखान्यांत घ्या व तेथें मुलांना पद्यें म्हणूं द्या, तसें नसेल तर निदान खालील मजल्यावर घ्या, हेंही पसंत नसेल तर खालील चौकांत शंकरवाडीच्या इमारतीसमोर पण भिंतीच्या आंत घ्या. आणि हेंहि पसंत नसेल तर निदान शंकरवाडीसमोर रस्त्यावर मुलें उभीं करा व त्यांची सेवा घ्या" अशी याचना करण्यांत आली होती. अर्थात माझें मागणें तें किती दाता लक्ष्मीचा पति या संतवचनाप्रमाणें ब्राह्मणसभेंनें जो समेटाचा ठराव केला त्यांत रा. शेट्ये यांच्या किमान मागणीपेक्षां कितीतरी मोठा वर देण्यांत आला. श्वानवृत्ती धारण करून केलेल्या मागणींचे अशापरी साफल्य झालेलें पाहून रा. शेट्ये यांना धन्यता वाटणें, अगदीं साहजिक आहे. परंतु रा. शेट्ये हे अस्पृश्य नाहींत म्हणून त्यांच्या ठायीं अस्पृश्यांत जागृत झालेल्या स्वाभिमानाची ओळखही नाहीं. तसें जर असतें तर त्यांनी आपल्या शाळेंत शिकत असलेल्या मुलांना त्यांच्या हक्कासाठीं दैन्य भाकण्यास लाविलें नसतें. रा. शेट्ये यांना आमची अशी सूचना आहे कीं, यावर्षी जसें तुम्ही अस्पृश्य जातींच्या विटंबनेस कारणीभूत झालांत तसें यापुढें तरी होऊं नका. हिंदुधर्मात राहिल्याखेरीज अस्पृश्यांना मोक्ष नाहीं असें जर असतें तर रा. शेट्ये यांच्याप्रमाणें आम्हीहि ब्राह्मण्यग्रस्त लोकांचे पाय धरले असते. पण आम्हाला अजून तशी वेळ आली नाहीं कारण आमच्या सुदैवानें आम्हाला इतर मोक्षाच्या वाटा खुल्या आहेत.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १६ सप्टेंबर १९२७.

# ६५

# उच्च शिक्षण ही एकाच वर्गाची मिरास होणे राष्ट्राच्या दृष्टीने मोठी घातुक गोष्ट

मुंबई विश्वविद्यालयानें मॅट्रिक व बी. ए. या दोन परिक्षांत पास झालेल्या विद्यार्थ्यांची वर्गवारी नुकतीच प्रसिद्ध केली. ही वर्गवारी खालीलप्रमाणें आहे :—

१. मॅट्रिकमध्यें एक लक्ष लोकसंख्येला पारशी लोकांत ३००, खिस्ती लोकांत ७०, हिंदूंत २० व मुसलमानांत ४ विद्यार्थी पास झाले.

२. एकंदर पास झालेल्या ४१२१ विद्यार्थ्यांमध्यें १६८ मुली होत्या. त्यांत ६९ हिंदु, ५० हिंदी खिस्ती व ४२ पारशी होत्या. म्हणजे तीन लाखांला पारशी मुलींचे प्रमाण १५०, हिंदीं खिस्ती मुलींचे प्रमाण ५० व हिंदु मुलींचे प्रमाण १ असें आहे.

३. बी. ए. च्या परीक्षेंत प्रत्येकीं एक लक्ष लोकसंख्येंत ७५ पारशीं, १३ हिंदी खिस्ती, ४ हिंदु व १ मुसलमान असें प्रमाण आहें.

हिंदूंची व मुसलमानांची लोकसंख्या इतर धर्मीयांपेक्षां अधिक असल्याकारणांने त्यांच्यांत शिकलेल्यांची संख्या जास्त दिसते. पण खरोखर हे लोक शिक्षणांत इतकें मागें आहेत की त्याची कल्पना देखील होणें शक्य नाहीं. ती होण्यास वरील आकड्यांची मदत होईल म्हणून ते दिलें आहेत. वर दिलेल्या हिंदु या वर्गवारीत ब्राह्मणांचाच विशेष भरणा आहे हें ध्यांनात ठेवलें म्हणजे बिचारे ब्राह्मणेतर व अस्पृश्य यांचा उच्च शिक्षणांत कोठें मागमूस नाहीं हेंहि ध्यानांत येईल. याकडे सरकारनें लक्ष देणें अवश्य आहे. कारण उच्च शिक्षण ही एकाच वर्गाची मिरास होणें राष्ट्राच्या दृष्टीनें मोठी घातुक गोष्ट आहे. पण सरकारचेच कांहीं अधिकारी बेकार पदवीधराची बेसुमार वाढ होऊन असंतोष पसरल्यानें इंग्रजी राज्यास धोका आहे या सबबींवर कॉलेजांतील विद्यार्थ्यांची संख्या मर्यादित करावी असा ध्वनि काढीत आहेत. नुकतेच कोठें ब्राह्मणेतर व अस्पृश्य कॉलेजच्या पायरीवर पाय ठेवीत आहेत ! तोंच विद्याधिकारी अंमलदारांनी वरील प्रकारच्या नियमांचें घोडे दामटण्यास सुरवात करावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. उच्च प्रतीचें शिक्षण मर्यादित करून कोणत्याहि वर्गास त्यापासून

परावृत्त करणे हें आमचे मतें अनहितकारी आहे. पण तसें करणें अन्य कारणामुळें अपरिहार्य ठरलें तर अशा या मर्यादेची कड ज्यांना मुळींच उच्च शिक्षण मिळालें नाहीं अशा वर्गाला न लागेल याची खबरदारी शिक्षणांत मागासलेल्यांनी घेणें अत्यंत जरूर आहे.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. १६ सप्टेंबर १९२७.

# ६६

# समतेच्या झगड्यांत वरच्यास खाली लोटण्याऐवजीं खालच्यास वर ओढणे हाच प्रगतीचा मार्ग

अमरावती येथील श्री. अंबेच्या देवळांत जाण्याची परवानगी देता येत नाहीं असें सदरहू देवळाच्या कमेटीकडून लिहून आल्यानंतर तेथील अस्पृश्यांनीं या बाबतीत सत्याग्रह करण्याचा ठराव पास केला. परंतु तसें करण्यापूर्वी तडजोडीनें कांहीं साधतें काय हें पाहण्याच्या हेतूनें स्थानिक पुढारी बॅ. बागवे यांनीं एक तडजोडीची योजना तयार केली. त्यांत तीन कलमें होतीं. तीं अशीं (१) अंबेच्या मूर्तीपासून कांहीं अंतरावर एक कठडा बांधण्यांत यावा, व त्या कठड्याच्या आंतील भागांत पुजाऱ्याशिवाय कोणासही जाण्याचा अधिकार असूं नये, (२) दिवसाचा कांही वेळ वगळून इतर वेळेला सर्व हिंदूंना देवदर्शनाची मोकळीक असावी, (३) वर नमूद केलेल्या वेळीं अस्पृश्यांनीं देवदर्शनास जाऊ नये. हा तडजोडीचा ठराव पुरता विचार करून केलेला असावा असें दिसत नाहीं. देवळांत प्रवेश करून अस्पृश्यांना दोन गोष्टी प्रस्थापित करावयाच्या आहेत. त्यांपैकीं पहिली हीं कीं, त्यांच्या प्रवेशानें देवालय भ्रष्ट होत नाहीं. किंवा देवळांतील मूर्तीला स्पर्श केला असतां तिचें पावित्र्य कमी होत नाही. तडजोडीच्या ठरावांतील पहिल्या अटीनें अस्पृश्यांची अपवित्रता साफ धुवून गेली असें म्हणतां येणार नाहीं. जोंपर्यंत देवळाच्या आंत अमुक पावलापुढें अस्पृश्यांनीं जातां कामा नये असा निर्बंध राहील तोंपर्यंत अस्पृश्यांतील अपवित्रता कायम आहे असेंच म्हणावें लागेल. पुजाऱ्यानें मूर्तीस स्पर्श केला असतां ती जशी विटाळत नाहीं, तसेंच अस्पृश्यांनीं तिला स्पर्श केला असतां तिचें पावित्र्य भंग होत नाहीं. अशी स्थिति जेव्हां प्राप्त होईल तेव्हांच धार्मिक व्यवहारांत अस्पृश्य स्पृश्य झाले असें मानतां येईल. आतां या अटीच्या समर्थनार्थ असें म्हणतां येण्यासारखें आहे कीं, पुजारी वर्ग खेरीज करून बाकी सर्व लोकांना स्पृश्यांना तसाच अस्पृश्यांनाही हा निर्बंध लागू आहे. तेव्हां यांत वैषम्य वाटण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. एका दृष्टीनें हें खरेंच आहे. पण आम्हांस असें वाटतें कीं, ठेंगू व लंबू यांच्या उंचितील तफावत काढून टाकून त्यांना एकाच उंचीला आणावयास लंबूची मान उडवणें अशाच प्रकारची समानता प्रस्थापित करण्याचा हा मार्ग दिसतो. अस्पृश्यांना अमुक एका मर्यादेपुढें देवळांत

जाऊं देण्यास लोक तयार नाहींत म्हणून ज्या मर्यादेपर्यंत आज इतर स्पृश्य हिंदूंना देवळांत जातां येतें ती मर्यादा कमी करणें, यांत मुत्सद्दीपणा असला तरी तो अस्पृश्यता निवारणाच्या ध्येयास पोषक आहे असें आम्हांस वाटत नाहीं. अशा समतेच्या झगड्यांत वरच्यास खालीं लोटण्याऐवजीं खालच्यास वर ओढणें हाच प्रगतीचा मार्ग विशेष श्रेयस्कर आहे असें कोणीही कबूल करील. ठरावांतील दुसऱ्या व तिसऱ्या अटी इतक्या घातुक आहेत कीं त्या जर अमलांत आल्या तर ही सारी तडजोड अगदीं बेमालूमपणें निकामी ठरली जाईल. पृथक्पणें विचार केला तर या अटी फायदेशीर अशा दिसतात. परंतु त्या दोन्हीं एकत्र केल्यास त्यांचा परिणाम असा होईल कीं, ज्या काळांत अस्पृश्य लोकांना देवळांत जाण्याची बंदी राहील तेवढ्या काळांत स्पृश्य लोक देवळांत जावून आपला कार्यक्रम उरकून घेतील व ज्या काळांत अस्पृश्य लोकांना देवळांत जाण्याची मोकळीक ठेविली जाईल त्या वेळीं स्पृश्यलोक देवळाचें दार चढणार नाहींत. एकूण अशा योजनेनें एका देवळाची कालमानानें दोन देवळें केल्यासारखें होईल. एका कालभागांत हें देऊळ स्पृश्यांकरितां व दुसऱ्या कालभागांत तेंच देऊळ अस्पृश्यां करितां असा अनिष्ठ परिणाम घडल्या शिवाय राहाणें शक्य नाहीं. त्यांतल्यात्यांत अस्पृश्यांची घटका सरून स्पृश्यांची घटका लागण्यापूर्वी मध्यंतरीच्या अवधींत पुजाऱ्यानें सडासंमार्जन करून देवळाची शुद्धी करण्याची खबरदारी घेतली म्हणजे या तडजोडीच्या ठरावानें घडवून आणलेली नवी परिस्थिति व परंपरेनें पुनीत झालेली जुनी परिस्थिति या दोन्हींत पाहूं गेलें असतां कांहीं अंतर दिसणार नाहीं. या तडजोडीच्या ठरावानें आमच्या मतें सर्वांचीच फसवणूक झाली असती. भेटीबंदीचें उच्चाटन तर झालें नसतेंच; फारतर भेटीबंदीला कायम ठेवतां स्पृश्यां अस्पृश्यांतील भेटीबंदीच्या रूढीस कोणत्याही तऱ्हेनें हात न लावितां स्पृश्यांच्या देवळांत अस्पृश्यांचा प्रवेश झाला असें फारतर म्हणतां येईल.

सदरहु तडजोडीला कमीटीनें मान्यता दिली नाहीं याबद्दल आम्हांस सर्वपरी आनंद होत आहे. तसाच तो बॅ. बागवे यांनाहि होत असेल अशी आमची खात्री आहे. कारण या प्रकरणीं तडजोड व्हावी म्हणून हा ठराव त्यांनीं पुढें आणला असावा असें आम्हास मुळींच वाटत नाहीं. देवस्थान कमीटी हा देखील ठराव पास करणार नाहीं हें त्याना माहीत असावें, तेव्हां तिच्याकडून तो राजरोसपणें अमान्य करून घेऊन तिला पेंचात टाकण्याचा त्यांचा विचार असावा असा आमचा तर्क आहे. कारण तसें झाल्यानें सत्याग्रह करूं नका, असें सांगण्याला कमीटीला मुळीं तोंडच रहात नाहीं. तेव्हां हा तडजोडीचा ठराव पुढें आणल्यानें एकंदरींत

आपला फायदाच आहे, असें वाटल्यावरून त्यांनीं अशापरी नमते घेतले असावें. अस्पृश्यांच्या सुदैवानें आतां तो डाव साधला आहे. तेव्हां या बाबतीत होणाऱ्या सत्याग्रहाच्या पूर्वतयारीस सर्वांनी लागावें व तो यशस्वी करून दाखववावा, हेंच एक करण्यासारखे कार्य अमरावती येथील अस्पृश्यांच्यापुढें असलें पाहिजे.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३० सप्टेंबर १९२७.

## ६७

# . . . तर ते आपल्या माणुसकीची आपणच माती करीत आहेत, कोणीही त्यांचा धिक्कारच करील

अमरावती येथील मांग लोक कदाचित् या सत्याग्रहांत भाग घेणार नाहींत असें वाटतें. कारण तेथील कांहीं मांग गृहस्थांनीं पुढील प्रकारचें एक पत्रक अमरावती येथें प्रसिद्ध होणाऱ्या " उदय " पत्रांत प्रसिद्ध केलें आहे. " ता. २८ च्या येथील अस्पृश्यांच्या जाहीर सभेंत वाटलेलें एक हस्तपत्रक :—सर्व अमरावती नगरवासी लोकांस आम्ही खाली सह्या करणारे सदर्हु मांगलोकांकडून जाहीर विनंतीनें कळविण्यांत येतें कीं, येथील पुढारी महार लोकांनीं जाती सुधारण्यासंबंधाने आमच्या सर्व मांगलोकांच्या सह्या घेतल्या आणि त्याप्रमाणे आम्ही लोक गणेश थियटरमध्यें सभेला गेलों होतों. परंतु तेंथें जातीचा कांहीएक संबंध नसून तेंथें दुसराच विषय निघाला. तो असा कीं, श्रीअंबेच्या देवळांत जाऊन दर्शन घ्यावें असें कळलें, त्यावरून आजपर्यंत सनातन धर्म जो चालत आलेला आहे त्या धर्मास धक्का पोहोंचतो. या कारणानें त्या सभेचा जो निश्चय होता तो आम्हास मंजूर नाहीं. आम्ही सदर्हु मांगलोक वाडवडिलांपासून वागत आलेल्या धर्माप्रमाणें आम्ही वागण्यास तयार आहों. वरील महार लोकांनी आमच्या ज्या सह्या धोक्यांनें घेतल्या त्या अगदीं खोट्या आहेत. "

दुःखाची गोष्ट आहे कीं, हिंदुस्थानांतील स्पृश्यलोकांनाच काय पण साऱ्या जगांतील लोकांना अस्पृश्यतेपासून होणाऱ्या अन्यायाची चीड उत्पन्न झाली असतां, भंगीखेरीजकरून सर्वांकडून हीन लेखण्यांत येत असलेल्या मांग जातींतील कांहीं लोकांनीं आपल्या वडिलांना ज्या परी वागविण्यांत आलें तशांच प्रकारची वागणूक खपवून घेण्यास आपण तयार आहोंत असें आपल्या तोंडानें कबूल करणे ही मोठ्याच खेदाची गोष्ट आहे. मांग लोकाच्या हातून हा घडलेला प्रकार स्वयंप्रेरणेनें झाला असेल असें आम्हांस वाटत नाहीं. अस्पृश्यवर्ग अगदी अधोगतीस गेलेला आहे ही गोष्ट खरी. पण ज्यांना आपल्या अधोगतीची जाणीव नाहीं असे अज्ञानी लोक फारच थोडे सांपडतील, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. तेंव्हां वरील प्रकारचें आपल्या मानवी हक्काचें बेचनखत बिन मागतां पाठीस लावून देणारे कांहीं लोक अस्पृश्य वर्गांत सांपडले तर ते परप्रेरणेनेंच वागत असावेत असा संशय घेणें सर्वथा निष्कारण होणार नाहीं. तथापि तात्पुरत्या स्वार्थाला बळी पडून कायमच्या हितास आपण मुकतों आहोंत यांची जाणीव असूनहि तात्पुरत्या स्वार्थासाठीं स्वतःस विकणारे लोक अस्पृश्यात सांपडणार

नाहींत असें आमच्यानें म्हणवत नाहीं. ज्या मांग लोकांनीं वरील पत्रकावर सह्या केलेल्या आहेत ते लोक अशा कोटींतले असतील तर ते स्वयंप्रेरणेनें वागून आपल्या माणुसकीची आपणच माती करीत आहेत, हें पाहून कोणीहि त्यांचा धिक्कारच करील.

या दोहोंपैकीं कोणतीहि गोष्ट खरी असली तरी मांग लोक अंबादेवीच्या सत्याग्रहांत भाग घेणार नाहींत म्हणून तो सत्याग्रह थोपवून धरण्यांचे कांहींच कारण नाहीं. सत्याग्रहाच्या परिपूर्ततेस लागणारें बळ सत्याग्रह करणारांच्या निश्चयावर अवलंबून आहे. त्यांच्या समुच्चयावर अवलंबून नाही. कोणताहि सत्याग्रह तो करणारे लोक कितीहि अल्पसंख्यांक असले तरी त्यांना तडीस नेतां येणें शक्य आहे. मात्र त्यांचा निश्चय दृढ असला पाहिजे. म्हणून अमरावतीकर अस्पृश्यांना आमची अशी सूचना आहे कीं, सर्व अस्पृश्यांची एकजूट होऊन जर ते सत्याग्रहांस सामील झाले तर त्यासारखी आनंदाची गोष्ट नाहीं. पण तसें नच झालें व कांहीं जण रुसवा फुगवा धरून किंवा सत्याग्रहाचें महत्त्व न पटून त्यांनीं सत्याग्रहांत सामील होण्याचें नाकारलें, तर ज्यांना सत्याग्रह करावयाचा आहे, त्यांनीं जे करूं इच्छीत नाहींत त्यांची वाट पहात बसूं नये. काळ चालला आहे, त्याबरोबर कार्य करीत रहाणें अत्यंत जरूर आहे, हें अस्पृश्यांनीं विसरतां कामा नये.

## ब्राह्मण्य हें ठेचलेच पाहिजे मग कोठेही असो

अमरावती येथील मांग लोकांचें जाहीरपत्रक वाचलें व गेल्या महिन्यांत मुंबई इलाख्यांतील मांग लोकांनी महारांतील ब्राह्मण्याविरुद्ध दोन ठिकाणांहून जो निषेध केला तो ध्यानांत घेतला म्हणजे एकाबद्दल जसा धिक्कार वाटतो तशी दुसऱ्याबद्दल धन्यता वाटते. हा निषेध जाहीर करतांना तो जाहीर करणाऱ्या मांग लोकाचा हेतू महारांचे डोळे उघडावयाचे एवढाच जर असता तर आम्हांस आनंद वाटला असता. परंतु त्यांचा हेतू तसा नाहीं असें आम्हांस वाटतें. कारण महार लोकांकडे काय तो आपल्या निषेधाचा रोंख आहे अशी जर त्यांची भावना असती तर वऱ्हाडांतील कट्टर ब्राह्मणीं पत्रांत तो निषेध प्रसिद्ध न होतां अस्पृश्य वर्गांत जीं पत्रें साधारणपणें खपतात त्यांतच तो प्रसिद्ध करण्यांत आला असता. परंतु निषेध करणारांचा उद्देश महारांना जागें करण्याचा नसून स्पृश्य लोकांना महारांच्या विरुद्ध एक सबब साधून द्यावी असाच मुख्य हेतू असल्यामुळें आम्हांला त्यांचा विषाद वाटतो. तथापि ब्राह्मण्य हें ठेंचलेंच पाहिजे मग तें कोठेंही असो असें आमचें मत असल्यामुळें महारांतील ब्राह्मण्याचा निषेध करणाऱ्या मांग लोकांचे आम्ही अभिनंदन करितों.

## ब्राह्मण्यग्रस्त लोकांशी संगनमत करणाऱ्या अस्पृश्यपुढाऱ्याशी असहकार

हा निषेध कितपत यथायोग्य आहे याचा विचार केला असतां ज्या महार लोकांविरुद्ध तक्रार करण्यात आली आहे ते महार लोक अपराधी आहेत असें आम्हांस दिसत नाहीं. या दोन तक्रारीपैकीं पहिली तक्रार रा. के. के. सकट यांची आहे. त्यांच्या तक्रारीचा मतितार्थ असा आहे कीं, ते ता. २८-८-१९२७ रोजीं पुणें येथील कामाठीपुऱ्यांतील महार लोकाच्या मरीआईच्या देवळांत त्यांना महार लोकांनी प्रवेश करूं दिला नाहीं. महार लोकांनी रा. सकट यांना देवळांत न घेतल्याबद्दल फारच वाईट वाटलें असें ते म्हणातात. त्यांच्या दु:खाचे आम्ही वाटेकरी आहोंत याबद्दल त्यांनीं खात्री बाळगावी. परंतु या बाबतींत विशेष काहीं करितां येईल असें वाटत नाहीं. कारण या बाबतींत आम्हीं जी चौकशी केली आहे त्यावरून आम्हांस असें दिसून आलें कीं, देवळांतील बंदी ही फक्त रा. सकटांपुरतीच आहे. ती सर्व मांग लोकांस लागू नाही. ज्या लोकांनीं रा. सकट यांना मरी आईच्या देवळांत येण्यास बंदी केली त्या लोकांचें असें म्हणणें आहे कीं, आम्ही कोणाही मांगाला घेऊं; पण सकटांना घेणार नाहीं. अशा प्रकारचा पक्षपात करण्याचें कारण जे त्यांनीं दिले तें रा. सकट यांनी ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. तें कारण असें कीं, जो मांगाचा पुढारी ब्राह्मण्यग्रस्त लोकांशीं संगनमत करितो, त्यांच्या तंत्रानें वागतो, व महारांतील किंवा चांभारांतील उणे दुणे काढून ब्राह्मणांना भर देतो तो आमचा आहे असें आम्ही कबूल करणार नाहीं; व त्याला आम्ही आपल्या देवळांत घेणार नाहीं. विचारसरणी सत्य असल्याकारणानें रा. सकट यांनीं कितीही सांगितलें तरी तिचा आमच्यानें निषेध होणें शक्य नाहीं. उलट रा. सकट यांना आम्हीं असें सुचवीतों कीं, तुमच्या वरचा हा आरोप तुम्ही धूवून काढा व उजळ माथ्यानें मरीआईच्या देवळांत येऊ देण्याची मागणी करा. मग महार लोक जसे इतर मांग लोकांना देवळांत घेण्यास तयार आहेत तसें तुम्हांस घेण्यासही ते तयार होतील.

## . . . आपल्यांतील ब्राह्मण्य मिरविण्याचा उपक्रम करूं नये

दुसरी तक्रार लोणावळें येथील मांग लोकांची आहे. तींत महार लोकांवर केलेला आरोप असा आहे कीं, महार लोकांनीं लोणावळें येथील चहाच्या हॉटेलच्या मालकास मांग लोकांस हॉटेलांत येण्याचें बंद करण्यास भाग पाडलें. ज्या लोकांनीं ही तक्रार प्रसिद्ध केली आहे त्या लोकांनीं जे महार लोक एके काळीं कोणत्याही प्रकारचा वीट न मानितां एकाच कपबशींतून एकाच टेबलावर बसून चहापान करीत असत तेच महार लोक एकदम बिथरून जाऊन जुनी वहिवाट मोडून आपल्याला मांगाचा विटाळ होतो असें म्हणण्यास उद्युक्त झाले याचें कारण

काय ? हें त्यांनीं जाहीर केलें असतें तर या बाबतींत खरा दोष कोणाच्या पदरीं येतो हें ठरविण्यास सोपें गेलें असतें. पुण्याच्या प्रकरणांत तसेंच लोणावळें येथील प्रकरणांत आम्हास जेवढी चौकशी करितां आली तेवढी आम्हीं केली. व त्यावरून लोणावळें येथील महार मांगांमध्यें हा बेबनाव उत्पन्न करण्यास कांहीं मांग पुढाऱ्यांचा बेवकूबपणाच कारणीभूत झाला आहे. एके काळीं लोणावळें येथील महार मांगांत चांगली एकी होती; व ती दिवसेंदिवस दृढतर होत होती. इतकी कीं, महार लोक सार्वजनिक प्रसंगांत मांग लोकांना आमंत्रणें देऊन त्यांच्याशी सहपान करीत असत. परंतु दुधांत मिठाचा खडा पडावा याप्रमाणें मांगांतले कोणी पुढारी लोणावळ्यास येवून या एकीची बेकी करून चालते झाले. त्यांनीं लोणावळें येथील आपल्या जातभाईस अशी शिकवण दिली कीं, मांगांनीं महाराचे हातचें खाऊं नये. इतकेंच नव्हे तर हा नियम पाळण्याबद्दल मांग लोकांना त्यांनीं शपथाही दिल्या. याचा परिणाम असा झाला कीं, महारांच्या हातचें खाल्लें तर आमची जात आम्हांला जाचते. अशा जाहीर सबबीवर मांग लोक महारांनीं दिलेलीं आमंत्रणें नाकारूं लागले. मांग लोक आपणाला अशा परीनें तुच्छ लेखतात याचा महार लोकांना विषाद वाटणें अगदीं साहजीक आहे; म्हणून मांग लोकास चहाच्या दुकानांत बंदी करण्याचा जो त्यांनीं घाट घातला त्याला या चिडवाचिडवीशिवाय दुसरें कोणतेंच कारण संभवत नाहीं. अशा परिस्थितींत मांग लोकांना दोन व्यवहाराच्या गोष्टी सांगण्यापलीकडे आमचें कांहीं विशेष कर्तव्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. व त्या व्यवहाराच्या गोष्टी ह्याच कीं, ज्या मांग लोकांना महारांतील ब्राह्मण्य लयास जावें असें वाटत असेल त्यांनीं आपल्यांतील ब्राह्मण्य मिरविण्याचा उपक्रम करूं नये.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३० सप्टेंबर १९२७.

# ६८

# एकाची माणूसकी अमान्य तर दुसऱ्याची माणूसकी मान्य

हिंदु महासभा हें कशा प्रकारचें थोतांड आहे हें आम्ही अनेक वेळां लोकांच्या निदर्शनास आणून दिलें आहे. वर्णव्यवस्था कायम ठेवून हिंदु संघटन करूं पाहणाऱ्या या अजागळ कंपूस आपल्या प्रयत्नाच्या विफलपणाचा कियास होऊ नये ही तर आश्चर्याची गोष्ट आहेच. पण त्यांच्या नादानपणाची समज शुद्धी करून घेऊन परधर्मांतून हिंदु धर्मांत येऊं इच्छिणाऱ्या महामूर्खांना होऊं नये ही त्याच्याहिपेक्षां आश्चर्याची गोष्ट आहे. हिंदु सभेच्या हुलकावणीस फसून परधर्मातून हिंदु धर्मांत आलेल्या लोकांची कशी फजीती होते याची दोन उदाहरणें आज दुसरीकडे छापलेल्या पत्रव्यवहारांत† वाचावयास सांपडतील. रा. नायडू हे ख्रिस्ती होण्यापूर्वी स्पृश्य हिंदूंपैकी एक होते. हिंदुधर्मात परत आल्यानंतर आपले आप्त इष्ट जूनी ओळख देऊन आपल्याशीं व्यवहार करतील अशी आशा धरून त्यांनी आपलें शुद्धिकरण करून घेतलें. परंतु त्यांच्या अपेक्षेप्रमाणे त्यांच्या जुन्या आप्तांनी त्यांच्याशीं स्नेह संबंध केला नाहीं. म्हणून अशा प्रकारच्या स्नेहाच्या अभावीं आपलें जीवित कष्टमय करून घेण्याऐवजीं आपल्या पूर्वीच्या एकवर्णी ख्रिस्ती धर्मात जाणें बरें असें वाटून त्यांनी हिंदुधर्माचा त्याग केला. तथापि आले तसेंच हिंदु धर्मात राहिले असते तरी त्यांची विशेष हानी झाली नसती. कारण स्पृश्य हिंदु व ख्रिस्ती यांच्या सामाजिक दर्जात कांही फरक नाहीं. परंतु हिंदुधर्मीय अस्पृश्य व परधर्मीय ख्रिस्ती यांच्या सामाजिक दर्जात जमीन अस्मानाचें अंतर आहे. एकाची माणूसकी अमान्य तर दुसऱ्याची माणूसकी मान्य. एकाला उन्नतीच्या साऱ्या वाटा बंद तर दुसऱ्याला त्या अगदीं मोकळ्या. असें असताना ख्रिस्ती या नात्याने उच्च पद भोगीत असलेल्या माणसानें हिंदु होऊन महारांच्या पंक्तीला येऊन बसावे याचा आम्हास विस्मय वाटतो. रा. विश्वास हे कांही अज्ञान गृहस्थ नाहीत. त्यांना हिंदुधर्मात अस्पृश्यांची काय दुर्दशा आहे हें माहित नाही असें म्हणतां यावयाचे नाही. त्यांनी जें बेवकूफपणाचे कृत्य केलें त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते की धर्माची उभारणी त्याच्या सामाजिक उपयुक्ततेवर झालेली नाहीं. सामाजिक उपयुक्ततेच्या दृष्टीनें ख्रिस्ती धर्म हिंदु धर्मापेक्षां कसा श्रेष्ठ आहे

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–३०.

याची जाणीव रा. विश्वास यांना असती तर त्यांनी ख्रिस्ती धर्मांतून हिंदु धर्मात कोलांटी उडी मारून आलेच नसते. आतां प्रचीती आल्यानंतर तरी रा. विश्वास हे निमूटपणें ख्रिस्ती धर्मांत परत जातील अशी आम्हांस आशा आहे. त्यांच्या उदाहरणानें परधर्मांत गेलेले अस्पृश्य हिंदुमहासभेच्या शुद्धिकरणाच्या फसवेगिरीपासून सावध राहतील ही त्यांतल्यात्यांत आनंदाची गोष्ट आहे.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# ६९

# धर्मांतर केल्याशिवाय अस्पृश्यांना आपला दर्जा वाढवून घेण्यास वाव नाही

मध्य हिंदुस्थानांत व राजपुतान्यांत मेघवाल नांवाचा अस्पृश्य वर्ग आजवर पितळेचे दागिने वापरीत असे. आतां त्या वर्गांतील सुखवस्तु लोकांना पितळेचे दागिने घालण्याची लाज वाटू लागली आहे. आपल्या ऐपती प्रमाणें आपला पोशाख असावा असे वाटणें अगदीं सहाजीक आहे. त्या नियमास अनुसरून या मेघवाल लोकांनीं चांदीचे दागिने घालण्याचा प्रघात सुरू केला. खरोखरी सोन्याच्या दागिन्याची हौस चांदीच्या दागिन्यावर भागवून घेणाऱ्या या लोकांची कींव करणेंच प्राप्त आहे. परंतु स्थानिक स्पृश्य लोकांना कींव येण्याऐवजी त्यांचा संताप झालेला दिसतो. अस्पृश्य मेघवाल लोकांनीं चांदीचे दागिनें घालणे हां आम्हां स्पृश्य हिंदूंचा उपमर्द आहे असे त्यांचे म्हणणे आहे व त्यामुळें त्यांनीं या मेघवाल जातीचा छळ करण्यास आरंभ केला आहे !! याच अंकांत दुसरीकडे जीं वऱ्हाड प्रांतांतील गृहस्थांचीं दोन पत्रें† छापली आहेत त्यांतील करूण कहाणी अशाच मासल्याची आहे. तेथें ज्या अस्पृश्य लोकांना त्राही त्राही करून सोडलें आहे ते अस्पृश्य लोक स्वच्छतेनें राहतात हाच त्यांचा अपराध असल्याचें दिसते !! मनूनें दरेक वर्णाची राहणी कशी असावी याविषयीं निर्बंध घातल्याचें मनुस्मृतींतून आढळून येतें. हे निर्बंध इतके अमानुष आहेत कीं ते फक्त दप्तरींच राहत असतील असें म्हणण्याकडे माणसाची प्रवृत्ति होते. परंतु वरील प्रकारचीं उदाहरणें निदर्शनास आली म्हणजे या नियमांची कसून अंमलबजावणी होत असे याची खात्री वाटू लागते. तसे जर नसतें तर असलें प्रकार आज ऐकीवात येतेचना. ब्रिटिशांच्या अमदानींत पिनल कोडांतील गुन्ह्याशिवाय इतर कोणत्याही वर्तनाबद्दल कोणासहि शिक्षा होऊ शकत नाही असा सर्व साधारण समज आहे. परंतु पिनल कोडांत नसलेल्या गुन्ह्याबद्दल देखील स्पृश्य हिंदु अस्पृश्यांना कसे छळतात हे वरील उदाहरणावरून उघड होईल.

या बेगुन्हा जुलमांतून अस्पृश्यांची सुटका कशी करून घेता येईल हा अस्पृश्य जनतेपुढें मोठाच प्रश्न आहे. या जुलमांतून सुटका करून घेण्यास सरकारची विशेष मदत होईल असें आम्हांस वाटत नाहीं. सरकार हें स्पृश्य हिंदूंच्या ताब्यांत

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–३१.

नसले तरी त्यांच्या धोरणानें वागणारे आहे. तसें जर नसतें तर रा. आठवले यांस ते अस्पृश्यांना जागृत करतात येवढ्याच अपराधावरून पोलीसांनी त्यांना बिनधोक मारलें नसतें. स्पृश्य हिंदुसमाज अस्पृश्यांना सुखाने, ऐष आरामानें नांदु देत नसेल तर त्यांनी परधर्माचा अवलंब करावा हेंच बरें. अस्पृश्यांना स्पृश्य लोक कांकणभर देखील इतमामानें राहूं देत नाहींत याचे कारण हिंदु धर्मात अस्पृश्यांचा दर्जा खालचा आहे. दर्जा वाढल्याखेरीज अस्पृश्यांना स्पृश्याप्रमाणें वागू दिलें जाणार नाहीं आणि धर्मांतर केल्याशिवाय अस्पृश्यांना आपला दर्जा वाढवून घेण्यास मार्ग नाहीं. तेव्हां या मेघवाल लोकांनी वऱ्हाडांतील रा. भिमसन व रा. सूर्यभान यांनी मनांत आणल्याप्रमाणें धर्मांतर करावें याशिवाय दुसरा सल्ला आम्ही काय देणार ?

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# ७०

# चातुर्वर्णाला कंटाळलेल्या अस्पृश्यांस एकवर्णी धर्मात गेल्याशिवाय गत्यंतर नाही

अस्पृश्यांनी धर्मांतर करूनहि हिंदु धर्म त्यांना अजीबाद मुकणार नाहीं अशा प्रकारची व्यवस्था आर्य समाजांत होती. आर्य समाज ही ज्यांत ब्राह्मण्य नाहीं अशी हिंदुधर्माची एक सुधारलेली आवृत्ती आहे. व मुसलमान वगैरे परधर्मीय लोकांचाहि तशाच प्रकारचा समज आहे. आर्यसमाज हा हिंदुसमाजांतील चातुर्वर्ण मोडून त्याला एकवर्णी करण्याकरितां जन्मास आलेला पंथ आहे. त्याची धडाडीहि विलक्षण आहे. इतकी कीं मुसलमानांसारखे परधर्मी लोक त्यापुढें गांगरून जातात. परंतु अलीकडे चातुर्वर्णी हिंदुंना शुद्ध करून आर्यसमाजांत घेण्याकडे त्याचे दुर्लक्ष झालें आहे. व परधर्मी लोकांना शुद्ध करून हिंदु करण्याकडे या समाजाचे विशेष जोरानें प्रयत्न होऊं लागले आहेत. आर्यसमाजांत व हिंदुमहासभेंत एकेकाळी ध्येयाच्या दृष्टीनें एक मोठें अंतर असें. परकीयांच्या हल्ल्यापासून हिंदुधर्माचा बचाव करण्यास त्याला एकवर्णी केलें पाहिजे असा हिंदुसमाजाविरूद्ध आर्य समाजाचा कटाक्ष असें. हिंदुमहासभेचा सारा कटाक्ष परधर्मीयांकडे असून हिंदूंचे चातुर्वर्ण्य कायम ठेऊन शुद्धीनें हिंदूंचे संख्याबल वाढवावें असा आहे. या दोन दृष्टिकोनांतील अंतर महत्त्वाचें आहे. परंतु मुसलमानांचा मारा आर्य समाजावर व हिंदुमहासभेवर सारख्याच परीनें होत असल्या कारणानें आर्य समाज हिंदुसमाजास एकवर्णी करण्याचें आपलें मूळकाम विसरून हिंदुमहासभेप्रमाणेंच शुद्धीकरणाच्या मागे लागला आहे. आता या दोघांची गट्टी इतकी घट्ट जमली आहे की हिंदुमहासभेचे ध्येय आर्यसमाजाचेंहि ध्येय बनले आहे, हें अमरावती येथें ता. ६ ऑक्टोबर रोजी भरलेल्या आर्यधर्म परिषदेने चातुर्वर्णाला मान्यता दर्शविणारा ठराव पास केला यावरून उघड होत आहे. तो ठराव जरी गुणभेदाच्या चातुर्वर्णासंबंधी असला तरी ब्राह्मणांप्रमाणें आहे तो वर्णभेद गुणभेदानुरूपच आहे असा युक्तिवाद करण्यास आर्यसमाजिष्ट लोकांस फारसा अवधी लागणार नाहीं असें आम्हांस वाटतें, हिंदुमहासभेने आर्यसमाजाला आपलेसें करून आपसांतला विरोध मोडून टाकला याबद्दल तिला आनंद होत

असेल. परंतु हिंदुसमाजानें आपल्या पोटांत किंवा आपल्यास जोडून जर एकवर्णी व्यवस्था केली नाही किंवा आर्यसमाजासारखी असलेली मोडून टाकिली तर चातुर्वर्णाला कंटाळलेले अस्पृश्य लोकांस हिंदुधर्माशीं कांहीं संबंध नसलेल्या ख्रिस्ती किंवा मुसलमानी धर्मासारख्या एकवर्णी धर्मांत गेल्याशिवाय गत्यंतर उरणार नाहीं हें हिंदुमहासभेनें अथवा आर्यसमाजानें विसरूं नये. आर्य समाजानें हिंदुमहासभेला बळी पडण्याऐवजीं तिला आत्मसात करून घेणें यांत आर्यसमाजाच्या कार्याची पूर्तता आहे; इतकेंच नव्हे तर हिंदुसमाजाचा व हिंदुधर्माचा बचाव आहे असें आम्हांस वाटतें.



---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# ७१

# ..... वगैरे सांप्रदायाप्रमाणें ब्राह्मण्य हा एक सांप्रदाय आहे

अलीकडे मुंबईच्या म्युनिसिपल कार्पोरेशनच्या स्कूल्स कमेटीच्या एकंदर वागणुकी व वातावरणाकडे पाहिलें तर अजूनपर्यंत कार्पोरेशनच्या कोणत्याही स्वाभिमानी सभासदानें ह्या कमेटीवर निंदाव्यंजक ठराव कसा आणला नाहीं ह्याचेंच आश्चर्य वाटतें. कॉर्पोरेशनच्या बहुतेक ठरावांना जवळ जवळ धाब्यावर बसविण्याचा जणूं काय ह्या कमेटीनें विडां उचलला आहे असें दिसतें. कमेटीच्या ह्या असल्या अरेरावी वर्तणुकीची फक्त शाब्दीक चर्चा मधून मधून मुंबई म्युनिसिपल कार्पोरेशनमध्ये होत असते. पण कार्पोरेशनची सभा संपल्यावर जिकडे तिकडे परत शांत व म्हणूनच कार्पोरेशननें ठराव केला असतांही दादर येथील मुलींची शाळा स्कुल कमेटीचे सभासद डॉ. जावळे यांच्याच बंगल्यात अजूनही बेधडक राहूं शकते. असल्याच प्रकारचा ''अस्पृश्यां'' बद्दल ह्या कमेटीच्या ताब्यांत असलेल्या शाळांमध्यें कसल्या प्रकारचा अन्याय होत आहे हें ता. १८ ऑक्टोबर १९२७ च्या स्कूल कमेटीच्या चर्चेवरून चांगलेंच ध्यानांत येऊं शकतें. स्पर्शास्पर्श भेद बाजूला सारून मुंबईच्या म्युनिसिपल कार्पोरेशनच्या ताब्यांतील प्रत्येक शाळांत कोणासही मज्जाव नसावा, व शिक्षणाचा उपयोग सर्वांस सारखा मिळावा म्हणून गेल्या वर्षी एक ठराव पास केला होता. तसेंच एफ् आणि जी वार्डात सक्तीचें शिक्षण झाल्यापासून प्रत्येकांस आपली मुलें कोणत्या ना कोणत्या शाळांत पाठविणे भाग पडत आहे. अशा स्थितींत आपल्या ठरावाची कुठपर्यंत अम्मलबजावणी होते हें पाहणें कार्पोरेशनचे काम होतें. परंतु तें त्यांच्याकडून नीट रीतीनें होत नसावे असें अनुमान काढणें काहीं चुकीचें होणार नाहीं. ता. १८ च्या स्कूल्स कमेटीच्या चर्चेवरून ''लोटीबंदी'' सांप्रदायाची येथें चांगलीच वर्णी लागली असें दिसून आल्याशिवाय राहत नाहीं. कमेटीच्या शाळांमधून स्पृश्यांकरितां निराळे लोटे ''अस्पृश्यां'' करितां अगदीं निराळे लोटे (हे पितळीचे तरी आहेत कां? नाहींतर ''स्पृश्य'' पितळीचे वापरतात तर अस्पृश्यांच्या नशिबीं टिन पॉट्स) ठेवण्यांत आलेले असून त्यांचा उपयोग अगदी त्यांनीच करावयाचा. कार्पोरेशननें गेल्या वर्षी ठराव केला होता की आपल्या शाळेंत कोणत्याहि प्रकारचा भेदभाव पाळण्यांत येऊं नये. कार्पोरेशनच्या ठरावाची पूर्णपणें अंमलबजावणी करणें हें स्कूल कमेटीचें कर्तव्य

आहें हें श्री. जमनादास मेथा व मि. बोमन बेहराम ह्यांनी कमेटीच्या निदर्शनास आणिलें परंतु लोकमताच्या नांवाखाली आपला सोंवळेपणा झाकून घेण्यासाठीं श्री. पारेख, डॉ. जावळे, श्री. दळवी ह्यांचीं जीं भाषणें झाली, त्यावरून हे लोक स्पृश्य लोकांना अस्पृश्यांचा विटाळ होवूं नये म्हणून जी दक्षता बाळगतात ती खरोखरच त्यांच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखी नाहीं असें कोण म्हणेल ? हिंदु-मुसलमानांची एकी करावयास सरसावलेले श्री. दळवी ह्यांनीं तर आपल्या सोंवळेपणास कायद्याची जोड देऊन तें कसें "सोंवळे" असू शकतें हें दाखविण्याचा प्रयत्न केला. ज्या कायद्याची भीति ह्या सद्गृहस्थांनीं दाखविली तो कायदा तरी कोणता हें मात्र त्यांनीं दाखविलें नाहीं. स्कूल्स कमेटीवर " स्पृश्य लोक " कोणत्या कायद्याच्या कोणत्या कलमाखाली फिर्याद लावतील हें दाखविण्याचीं तसदी जर श्री. दळवी ह्यांनीं घेतली असती तर "स्पृश्यां " चे वकिलीला जाणारे पैसे तरी वांचले असतें व त्यांनीं तडक कोर्टाकडे धांव ठोकली असती. शाळेसारख्या सरस्वतीच्या पवित्र मंदिरांत माणुसकीस लज्जास्पद असलेला पक्षभेद फक्त ह्या हिंदुस्थानांतच जिवंत दिसूं शकतो व राहूं शकतो. ज्या समाजांच्या व्यक्तींमध्यें माणुसकीस वाव नाहीं, त्यांनीं स्वातंत्र्यरूपी माणुसकीचे हक्क मिळवावयास निघणें म्हणजे वेश्येनें एकपातिव्रत मिळविण्यासाठी निघण्यासारखें हास्यास्पद व उपहासात्मक होय. डॉ. जावळे, दळवी प्रभुतींना व त्यांच्याच विचारांच्या इतर स्पृश्य बांधवांना जर समतेच्या तत्वांवर आपलीं मुलें म्युनिसिपालटीच्या शाळांमधून पाठवावयाची नसतील तर खुशाल त्यांनी त्यांना घरी पोसावें अथवा खुशाल निराळ्या शाळा काढून आपणांस " अस्पृश्य " बनवून घ्यावे. समतेच्या तत्त्वावर जगण्याचा, वागण्याचा, राहण्याचा हा प्रत्येक माणसास हक्क आहे व त्याप्रमाणे त्यानें तो बजाविला पाहिजे व आमच्या अस्पृश्य बांधवांनीं तो बजावून घेण्यास बिलकूल डगमगता कामा नये. श्री. जमनादास मेथा ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें परकीय गौरकाय पंचमाशीं सहकार्य व खानपान करावयास ज्यांना लाजलज्जा वाटत नाहीं, असल्या लोकांनी आपल्या देशबांधवांशीं अशाप्रकारची वागणूक अझूनही ठेवून लोकहितवादाच्या गोष्टी बोलणें म्हणजे आपल्या उलट्या काळजाची प्रचीति दाखविण्यासारखें होय. आमच्या ह्या लोकहितवाद्यांना इतकेंच सांगावयाचें कीं, आपल्या ह्या लोकहितवादाचा सांवळा गोंधळ झाला तेवढा पुरे. आतां जर समतेची भाषा व कृती नसेल तर खुशाल घरीं स्वहितवाद करीत बसा. आजकाल लोक आपलें हित पाहण्यास पूर्णपणे समर्थ आहेत. हा " लोटीबंदीचा " ठराव पुन्हा विचारार्थ एका कमेटीकडे सोंपविण्यात आलेला आहे. त्याचा काय निकाल होतो पहावा. तुर्त इतकेंच सांगितले म्हणजे पूरे कीं लोटीबंदी वाले भालाकार देखील " गोविंद " " गोविंद " म्हणून कां होईना

आपत्कालीं ब्राह्मणेतरांच्या हातचें पाणी पिण्यास तयार झाले आहेत. कमीटीला भालाकारांच्या जरासें पुढें पाऊल टाकण्याचे देखील धैर्य नाहीं काय ?

ब्राह्मण्य कायम राखण्यासाठी ब्राह्मण्यग्रस्त लोक कसे अहर्निश खटपट करीत असतात हें वरील उदाहरणावरून स्पष्ट होत आहें. पण सरकार देखील या कामी त्यांनाच मदत करील असें कोणालाच वाटलें नव्हतें. म्हणून आमचे व्यवसाय बंधु राष्ट्रवीरकर्ते* यांच्यावर बेळगांव येथील डि. म्यॅजिस्ट्रेट यांनीं "ब्राह्मण्य ठार मारलें पाहिजे" असा शब्दप्रयोग इतःपर उपयोगांत आणूं नका अशी नोटीस† बजावल्याचें वाचून आम्हास तरी मोठे आश्चर्य वाटले. कारण इंपीरियलझम्, शोशलीझम्, बोलशेव्हीझम्, क्यापीट्यालिझम् वगैरे सांप्रदायाप्रमाणें ब्राह्मण्य हा एक सांप्रदाय आहे. आणि कोणत्याहि सुधारलेल्या राष्ट्रांत कोणाहि व्यक्तीला कोणता सांप्रदाय बरा, कोणता वाईट, कोणता ठेवला पाहिजे, कोणता काढून टाकला पाहिजे याची चर्चा करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असतें व तें या देशांतहि आहे असें आमचें मत आहे. कदाचित ब्राह्मण्य या शब्दाचा अर्थ म्यॅजिस्ट्रेट साहेबांनी ब्राह्मण असा केला असला पाहिजे असा आमचा तर्क आहे. त्याशिवाय असा विचित्र हुकूम त्यांनी सोडला नसता. सांप्रदायाची चर्चा बंद करण्याचा त्यांचा हेतू असता तर त्यांनीं "सत्यशोधक ठार मारलें पाहिजे" असा शब्दप्रयोग उपयोगात आणणाऱ्या बेळगांवच्या परीक्षक पत्राच्या संपादकावरहि इतःपर तसें न लिहिण्याबद्दल मनाई हुकूम काढला असता. परंतु तसें घडल्याचे ऐकिवांत नाही. यावरून आमचा तर्क खरा आहे असें वाटतें. परंतु तो चुकीचा असल्यास सदर्हू मॅजिस्ट्रेटच्या ठरावाचा निषेध करणे आम्हास प्राप्त आहे. राष्ट्रवीर कर्त्यांनी ह्या ठरावाचा वाजवी गैरवाजवीपणा कसाला लावून पहावा. ब्राह्मण्यविध्वंसनास अनुकूल असलेले लोक त्यांना या बाबतीत साहाय्य करतील याबद्दल त्यांनी खात्री बाळगावी.

● ● ●

---

* शामराव गोविंदराव देसाई.

† पाहा परिशिष्ट क्रमांक–३२.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# ७२

# महार वतनाचा कायदा व त्यांत सुचविलेल्या दुरुस्त्यांचें स्पष्टीकरण

गेल्या तीन अंकात " महार आणि त्यांचे वतन " या मथळ्या खालीं तीन अग्रलेख आम्हीं लिहिले. त्यांत महार वतनापासून महार लोकांचा कसा तोटा होतो व त्यांत कोणत्या प्रकारची दुरुस्ती करणें आवश्यक आहे, याचें जरी आम्ही सांगोपांग विवेचन केले होतें तरी आम्ही तयार केलेल्या योजनेत ज्यांना जे फेरफार करावेसे वाटतील त्यांनी आपल्या सूचना आमच्याकडे पाठवाव्यात अशी आम्ही जाहीर विनंति केली होती. आमच्याकडे या बाबतींत काय काय सूचना येतात याची आम्ही वाट पहात बसलों असतां अचानक मुंबईत दोन सभा भरविण्यात आल्याचे व त्यांत आमच्या योजनेविरुद्ध ठराव पास केल्याचे वृत्तपत्रांतून जाहीर झालें ! ! सुधारणा सुचविण्याऐवजी एकदम विरोध करणारा ठराव सभांतून पास झाल्याचें जेव्हां आम्ही ऐकिलें तेव्हां आम्हांस थोडेसें आश्चर्य वाटलें. परंतु या सभा तरी कोणी भरविल्या याचा ठाव शोधून काढण्याचा प्रश्न जेंव्हा आम्ही केला, तेंव्हा आम्हांस असें दिसून आलें की, या सभाच आमच्या विरोधी पक्षानें भरविल्या होत्या. अर्थात अशा सभांतून विरुद्ध ठराव पास होणें अगदीं स्वाभाविक आहे. शिवाय या सभांतून फक्त एकच सभा जाहीरपणें भरविण्याचा घाट घालण्याचा प्रयत्न करण्यात आला होता, व दुसरी जाहीरपणें न भरवितां दाराच्या आंतच भरविण्यांत आली होती असें म्हणतात. व पहिलीहि जरी जाहीरपणे भरविण्यांत आली होती, तरी ती शेवटीं हजर असलेल्या लोकांनी उधळून लावून दिल्यानंतर कोणाच्या तरी खासगी जागेंत अध्यक्ष व त्यांचे अनुयायी एवढ्यांनीच जमून तिच्यांत जो ठराव पास करावा असें त्यांना वाटत होते तो पास करण्यांत आला. अशाप्रकारच्या चोरट्या सभांना महत्व कोणीच देऊं शकणार नाही. या दोन्ही सभेच्या अध्यक्षांना वतनाचा मुळी परिचय नाही. एकाचा व्यवसाय गंडे दोरे देण्याचा, वेसकराची काठी याच्या कैक पिढ्या झाल्या, गेलेली ! त्याच काठीच्या झपाट्यानें जशी वेसकराची कधीं काळीं पाठ शेकली जाते तशी ज्याची कधीं शेकली गेली नाहीं, तो म्हारकी नको असें कशाला म्हणेल ? दुसरा अध्यक्ष कोण हें त्याच्या नांवावरून ओळखींता येत नाहीं. तो लक्षचौऱ्यांशीचे फेरे करणाऱ्या जीवात्म्याप्रमाणे साऱ्या शहरास खालीं फेरे घालीत फिरणारा मोटारवाला आहे असें म्हणतात. यांपैकीं एकानेही आपल्या बापाच्या हातची

वेसकराची काठी घेऊन वतनाचें सुख दु:ख कांहीं अजमावलेले नाहीं. महारवतनाची अशापरी ओळख नसतांहि महारांचें वतनाशिवाय चालणें शक्य नाहीं व वतन सोडा म्हणून सांगणाऱ्या लोकांपासून महारांनीं सावध राहावें असा अगदीं जिव्हाळ्याचा उपदेश सहजासहजीं लाभलेल्या अध्यक्षपदांवरून या दुक्कलीने केला असें म्हणतात. त्याचें आम्हांस नवल वाटत नाहीं. ज्या महारांनीं मोठेपणा भोगला आहे तेच तुम्ही पिढीजात दुसऱ्यांचे नोकर न राहतां अधिकारी व्हा असा उपदेश आपल्या जातभाईस करतील. पण सभेचे अध्यक्ष दोघेही छोटी माणसें. त्यांना मोठेपणाचें स्वप्नहि पडले असेल किंवा नसेल याची शंकाच आहे. अशा छोट्या माणसांनी महारांच्या भाषेंत " गरीबी अढळ बाच्छाई " असा उपदेश जो केला तो त्यांना साजेसा नव्हता असें कोण म्हणेल ? या ज्या विरोधक सभा भरल्या, त्यांना आम्ही किंमत न देण्याचें दुसरेंही आणखी कारण आहे. आम्ही महारकी वतनाच्या बाबतींत ज्या दुरुस्त्या सुचविल्या आहेत त्या बहिष्कृत भारतांतून जाहीर करण्यापूर्वी त्यांची चर्चा महार जातींतील अनेक सुशिक्षित व अशिक्षित लोकांशीं तीन चार वर्षे करीत होतों. नांदगाव व रहिमतपूर या दोन ठिकाणीं महारकी वतनाचा विचार करण्यासाठीं ज्या सभा भरविण्यांत आल्या होत्या त्या सभेंत वरील आमच्या सूचना आम्ही प्रगट केल्या व आमची विशेष अपेक्षा नसताहि त्या ठराव रूपांने दोन्ही सभांतून पसंत करण्यांत आल्या. इतका विचारविनिमय होऊन खुद्द गांवकी करणाऱ्या महार लोकांचें या बाबतींत काय मत आहे, याचा आम्हांस पूर्ण कयास झाल्यानंतरच आम्ही आपली योजना बहिष्कृत भारतांतून प्रसिद्ध केली. अशा परीनें तावून सुलाखून घडविलेल्या योजनेला महार लोकांचा विरोध होईल यास आमची मनोदेवता साक्ष देऊं शकत नाहीं. ज्या महार लोकांनी या सभांतून विरोध व्यक्त केला त्यांना एक तर आमच्या योजनेंचे खरें स्वरूप कळलें नसावें, किंवा सदरहू सभांच्या चालकांनीं तिचा विपर्यास तरी करून दिला असला पाहिजे. परंतु ती पूर्णपणें कळल्यावर ती ज्याला पटणार नाही असा महारच सांपडणार नाहीं असे आम्ही बिनधोक सांगू शकतों.

बहिष्कृत भारत जितक्या साध्या व सोप्या भाषेंत आम्हांस लिहितां येणें शक्य आहे तितक्या साध्या सोप्या भाषेंत लिहिण्याचा आम्ही प्रयत्न करीत असतों. तथापि आमच्या अस्पृश्य वाचकांपैकीं बऱ्याच जणांची बहिष्कृत भारत दोनदा वाचूनहि त्यांतील लिखाणाचा आपणास समज पडत नाहीं अशी तक्रार असल्याची आम्ही ऐकून आहोंत. अशा परिस्थितींत आम्ही महारकी वतनासंबंधीं लिहिलेले लेख ज्या वतनदार महारांसाठीं लिहिले ते त्यांना कितपत समजले याबद्दल आम्ही साशंक होतों. तसेंच खासगी द्वेषानें ज्यांचें चित्त मलीन झालें आहे, असे लोक वतनाविरुद्ध लिहिलेल्या आमच्या लेखांचा फायदा घेऊन वतनास चिकटून

राहणाऱ्या अडाणी महारांस बिथरवण्याचा प्रयत्न करितील याचाहि आम्हांस अंदाज होता. परंतु लागोपाठ तीन अंकांत एकाच विषयावर तीन लांबलचक अग्रलेख लिहिले असतांना केवळ कांही महार लोकांना आमची योजना कळली नसेल या सबबीवर पुन्हा तोच विषय चर्चेसाठी घेणें रास्त होणार नाहीं असें वाटल्यावरून तसें करण्याचा विचार एकदां मनांत आला असतांहि तो कृतीत आणण्याचा नेम आम्हीं केला नव्हता. शिवाय कांहीं खासगी द्वेषाने प्रेरित झालेले लोक संधीचा फायदा घेऊन विरोधांची उभारणी करण्यांत सदा सर्वकाळ दंग झाले असले तरी त्यांनाहि अंतर्यामापासून पसंत असलेल्या योजनेला विरोध करण्याची कुबुद्धि होणार नाही अशी आमची खात्री होती. परंतु विरुद्ध पक्षाच्या अंगी सद्भाव आहे. अशी जी आम्ही आमची समजून करून घेतली होती ती आता खोटी ठरली. कारण

**महारकी वतन खालसा करावें म्हणजे इनामातून कमी करून रयताव्यांत दाखल करावे, व महारांना नोकरीतून सोडवावें**

असा आमच्या योजनेचा स्पष्ट हेतू असतांना महारकी वतन खालसा करावे म्हणजे जबरीने काढून घ्यावे असा खोटाच अर्थ करून ते लोकांना सांगत आहेत. तेव्हा ज्या महार लोकांना आमची योजना कळली नसेल त्यांना ती कळावी व विरुद्ध पक्षास या शुभ कार्यात विघ्न करण्यास संधी सापडू नये म्हणून संपविलेला विषय पुन्हा हाती घेऊन आमच्या योजनेचे स्पष्टीकरण करण्याचा आम्ही आज निश्चय केला आहे. महार वतनाच्या कायद्यात ज्या दुरुस्त्या आम्ही सुचविल्या आहेत त्यांत आमचा हेतु काय आहे याचा खुलासा आम्ही प्रथम करीत आहोंत.

**आम्ही सुचविलेल्या दुरुस्त्यांच्या मुळाशीं सहा हेतू आहेत**

(१) पहिला हेतू असा की, जे महार लोक आज गांवकीचे काम करीत आहेत परंतु ज्यांच्या जमिनी परघराण्यात गेल्या असतील त्या त्यांच्या त्यांना परत मिळून त्यांच्या पोटापाण्याची सोय चांगल्या प्रकारे व्हावी.

(२) आज काल महारांना जे बलुते मिळते तें मिळणे न मिळणे सर्वस्वी रयतेचे मर्जीवर अवलंबून ठेवलेले आहे. तेणेंकरून सरकारचीं व रयतेची कामे करूनहि बलूत्यासाठी महारांना रयतेच्या तोंडाकडे पहावे लागते. दिलें तर घ्यावें, नाहीं तर जावें याशिवाय महारांना बलुतें वसूल करण्यास दुसरा उपाय नाही. ही परिस्थिती जाऊन महारांच्या बलुत्याची वसूली योग्य रीतीनें होऊन त्यांचा बलुत्याचा हक्क पूर्णपणे प्राप्त व्हावा हा आमच्या योजनेच्या मुळाशी असलेल्या हेतूंपैकी दुसरा हेतु आहे.

(३) कामाचा बोजा वाढला किंवा महागाई झाली तर कामदार लोकांच्या पगारात वेळोवेळी बढती करण्याचा नियम सर्वत्र लागू आहे. परंतू महारांना द्यावयाचे बलुतें एकदां जे कांहीं ठरून गेलें असेल त्यांत मात्र फेरबदल होत नाही. मग काम कितीहि वाढो अथवा महागाई कितीहि होवो ! तसें न होता महागाईच्या मानाने किंवा कामाच्या बोज्याच्या मानानें महारांच्या बलूत्यांत वेळोवेळीं वाढ व्हावी हा आमच्या योजनेचा तिसरा हेतु आहे.

(४) कांहीं ठिकाणी महार लोक फक्त सरकारी कामें करण्यास तयार असतात. रयतेची कामें करण्यास नाखुष असतात. परंतु रयतेच्या व सरकारच्या कामाची एकच सांगड घातली गेली असल्यामुळे महारांना दोघांचीही कामें करणें भाग पडतें. तसे न होतां ज्या महारांना रयतेचें काम नको असेल त्यांना तीं करण्याचें भाग पडूं नये हा आमच्या योजनेचा चवथा हेतु आहे.

(५) ज्याप्रमाणे कांही महार लोक रयतेच्या कामाला कंटाळले आहेत त्याप्रमाणे कांही महार लोक सरकारी कामाच्या दगदगीला देखील कंटाळलेले आहेत. अशा लोकांना त्यांच्या हितसंबंधास विशेष धोका न होतां त्यांना सरकारी कामाचा राजीनामा देतां यावा हा आम्ही सादर केलेल्या योजनेचा पांचवा हेतु आहे.

(६) सर्वत्र महार गांवकामगारांची अशी तक्रार आहे कीं महारांचीं कामें निश्चित नाहींत. वाटेल तो अधिकारी वाटेल तीं कामें सांगतो व ती महारांना करणें भाग पडतें. या जुलमाला आळा बसून महार लोकांनी करावयाची कामें निश्चित व्हावी हा आमच्या योजनेचा सहावा हेतू आहे. या उपरनिर्दिष्ट हेतूंना मूर्त स्वरुप देण्याकरितां चालू वतनकायद्यांत ज्या सुधारणा आम्ही सुचविल्या आहेत, त्या येणेंप्रमाणें आहेत.—

(१) पहिला हेतू तडीस नेण्यास वतनकायद्याच्या ९ व्या कलमांस एक नवे कलम जोडण्यांत आलें आहे. तें असें— हल्लीं वतनदार गांवकामगारांच्या जमीनी परघराण्यांत गेल्या असतां त्या काढून घेऊन मूळ वतनाच्या मालकास परत देण्याचा अधिकार जरी कलेक्टर यास दिला गेला आहे तरी तो अधिकार अंमलांत आणणें न आणणें हे सर्वस्वी कलेक्टरच्या मर्जीवर राखून ठेवलें आहे. त्यामुळे अधिकार असूनहि कलेक्टर लोक त्याचा उपयोग करीत नाहींत, व केलाच तर जमीन मूळ मालकास देण्याऐवजीं त्याला फार तर कमाल भाडेंच देतात. यामुळे वतनदारांचे कसें नुकसान होतें हें कोणास विशद करून सांगण्याचें कारण नाही. हें नुकसान न व्हावे या हेतूनें परघराण्यांत गेलेल्या जमिनी काढून मूळ मालकास देणें कलेक्टरला भाग पाडण्यांत आलें आहे. ही वतनकायद्यांतील सूचनेपैकीं पहिली सूचना होय.
(२) बलुत्याची वसुली योग्य रीतीनें व्हावी असा जो आम्ही मांडलेल्या योजनेचा

दुसरा हेतू आहे त्याच्या परिपूर्णतेसाठी दोन जादा कलमें वतन कायद्यातील १९ व्या कलमास जोडण्यांत यावींत असें आम्ही सुचविलें आहे. या दोन जोड कलमानुसार महारांना वाटल्यास बलुत्याचें रूपांतर नकदींत करून घेण्याचा हक्क त्यांना देण्यांत आला आहे. या व्यवस्थेमुळे रयतेवर जसा लोकल सेस बसविला जातो तसा बलुत्याच्या ऐवजी महारकी सेस बसविला जाईल. अशा प्रकारची व्यवस्था झाली म्हणजे रयतेनें महारांना काय द्यावयाचें व महारांनी रयतेपासून काय मागावयाचें हें एकदांचे निश्चित होऊन जाईल. ही तजवीज करण्याचें कारण असें कीं आमच्या योजनेंत बलुत्याचा हक्क महारांचा महारांनी बजावण्याऐवजी सरकारतर्फे त्याची अंमलबजावणी होऊन महारांचा हक्क पूर्णपणे त्यांच्या पदरांत पडावा. परंतु बलुत्याची उगरणी सरकारतर्फे व्हावी ही गोष्ट जर आवश्यक असेल तर या हक्कांचें रुपांतर नकदीत झालेंच पाहिजे. त्याशिवाय सरकार ही उकलती आपल्या अंगावर घेणार नाही, व ती सरकारवर लादणेंहि योग्य होणार नाहीं. यास्तव बलुत्याचें रुपांतर नगदींत होणें महार लोकांच्या हिताचें आहे. हल्ली बलुतें महारांना खळोखळीं हिंडून उकळावे लागते. कोठें मिळते, कोठें मिळत नाही. आमची सूचना अंमलात आल्यावर ही सारी अनवस्था टळून नेमके जे काही मिळावयाचे तें सरकारी तिजोरींतून नेमक्या वेळी मिळेल.

(३) ठराविक बलुत्यांत वेळोवेळीं कारणपरत्वें बढती व्हावी म्हणून वतन कायद्याचे कलम २१ यांत दुरुस्ती करण्यांत आली आहे. ती ही कीं महारांना बलुते किती द्यावें या विषयींचा ठराव दहा वर्षांपेक्षा जास्त वर्षे लागू असूं नये. यामुळे निदान दर दहा वर्षांनी महारांना आपलें बलूते वाढवून घेण्याचा अधिकार प्राप्त होईल.

(४) ज्यां महारांना रयतेचीं कामें करावयाची नसतील, त्यांना त्यांच्या वतनास धोका न होतां त्यांना तसें करतां यावें हा जो आमच्या योजनेचा तिसरा हेतू आहे तो तडीस जावा यास्तव वतन कायद्याचें कलम १९ यास आणखी दोन ज्यादा कलमांची जोड देण्यांत आली आहे. या दोन जोड कलमांच्या आधारें महार लोकांस वाटल्यास त्यांना बलुत्या ऐवजीं ठरलेल्या महारकी सेसपैकी सरकारी कामाकरितां किती व रयतेच्या कामाकरितां किती याची कलेक्टरकडून विभागणी करून घेण्याचा अधिकार महारांना देण्यांत आला आहे, व अशी विभागणी करून घेतल्यावर ज्या महार लोकांनीं रयतेची कामें करावयाची नसतील त्यांनी रयतेच्या कामासाठी तोडून दिलेला महारकी सेसचा भाग सोडून द्यावा व रयतेच्या कामांतून आपली सुटका करुन घ्यावी. अशी व्यवस्था करून घेण्यांत आली आहे.

(५) आतां ज्या महार लोकांना सरकारी कामेंही करण्याची इच्छा नाहीं, म्हणजे ज्यांना वतनच सोडून द्यावयाचें आहे अशा लोकांनाही आपली इच्छा सफल करून घेता यावी म्हणून वतनकायद्याच्या १५ व्या कलमांत आम्ही एक दुरुस्ती

सुचविली आहे. त्याअन्वये महार आपल्या जमीनीवर शेतसारा देण्यास तयार असतील त्यांना सरकारी कामांतून आपली सुटका करून घेतां येईल. पुष्कळसे महार सरकारी कामाला कंटाळून गेले आहेत. पण आपण काम करावयाचें जर बंद केले तर सरकार आपल्या वतनी जमिनी काढून घेईल असें त्यांना भय वाटतें व तें वास्तविक आहे. पण आमची योजना अंमलांत आल्यास कोणाही महारानें सरकारी काम बंद केलें म्हणून त्याची जमीन जाण्याचे कारण नाहीं. त्याची जमीन त्याच्याजवळ राहून त्याला फक्त इतर रयतेप्रमाणे शेतसारा काय तो द्यावा लागेल. इतक्या थोडक्या पैशांत इतका मोठा सवदा घडवून आणण्याची दुसरी कांही युक्ति आम्हांस सुचत नाही.

(६) महारांनी करावयाची कामें ठरवून घेणें हा आमच्या योजनेचा सहावा हेतू आहे. तो हेतू सिद्धीस जाण्यास वतनकायद्याचे कलम ८३ यांत एक सुधारणा करण्यात आली आहे. ती अशी की, कामासंबंधाचे नियम हल्लींप्रमाणें सरकारनें करावेत. पण ते कौन्सिलचे संमतीशिवाय अमलांत आणू नयेत. चालू कायद्याप्रमाणे सरकारी अधिकारी ठरवतील तीं कामें असाच प्रकार होतो. त्यांत कमजास्त करण्यास कोणासच अवसर मिळत नाही. आमची योजना मान्य झाल्यास सरकारनें केलेले कामासंबंधींचे नियम योग्य आहेत किंवा अयोग्य आहेत याची छाननी करण्यास कायदेकौन्सिलांतील अस्पृश्य वर्गाच्या सभासदास संधी सांपडेल व कायदेशीर कामें कोणती व बेकायदेशीर कामे कोणती हे निश्चित करतां येईल.

येथवर आम्ही वतन कायद्यांत ज्या दुरुस्त्या सुचविल्या त्यांचे हेतू काय आहेत व त्यांचे स्वरुप कशा प्रकारचे आहे याचे स्पष्टीकरण केलें आहे. आमच्या योजनेमुळें " महारांनो सांभाळा ! तुमची वतने खालसा होतील." असा कांहीं मुर्खशिरोमणी अडाणी महारांचा गैरसमज करुन देत आहेत. तेव्हां यासंबंधानेंहि खुलासा करणें अवश्य आहे असें आम्हांस वाटतें. महारकी वतन इतकें घातुक आहे कीं त्यापासून जितक्या लवकर महारांची सुटका होईल तितकें बरें या मताचे आम्ही आहोंत व सुटका करण्यास महारांवर जरी जबरदस्ती करणें जरूर झालें तरी आम्हाला त्याबद्दल कांही वाईट वाटणार नाही. लोकांनी अज्ञानांत राहू नये म्हणून जबरीने शिक्षण देऊन सरकार त्यांची अज्ञानांतून सुटका करिते तर मग वतनामुळे गुलामगिरींत पडलेल्या लोकांची गुलामगिरी सक्तीने कां काढण्यांत येवू नये ? महार वतन जबरीनें खालसा करावे या मताला फारशा महार लोकांकडून रुकार मिळणार नाही हें खरें. पण जे जाणते आहेत त्यांनीं योग्य कोणते व अयोग्य कोणतें हें ठरवितांना अजाण लोकांची संमती घेत बसल्यास कोणत्याच प्रकारची प्रगती होणें अशक्य होईल.

कै. शाहू छत्रपति महाराज[†] हे कांही महारांचे शत्रु नव्हते. त्यांच्यासारखा सखा अस्पृश्यांना पूर्वी लाभला नव्हता व पुढे लाभेल कीं नाही याबद्दल आम्हास शंकाच आहे. तथापि त्यांना पक्केपणी कळून चुकलें होतें कीं वतनामुळेंच महारांची अधोगती झाली आणि म्हणूनच त्यांनी आपल्या अधिकाराच्या जोरावर कोल्हापूर संस्थानांतील महारांची वतनें जबरदस्तीनें खालसा केली. महाराजांनी जेव्हां जबरदस्तीनें महारांची वतनें खालसा केली तेव्हां कोल्हापूर संस्थांनांतील महार प्रजेनें त्याला विरोध केला नव्हता असें नाही. कोठेंहि झालें तरी अज्ञ जनता ही जुन्या परंपरेनें आंधळी झालेली असते. हातचे, मग तें कितीहि अल्प असो, सोडून पळत्याच्या पाठीं, मग तें कितीहि मोठें असो, लागणें हा धाडसी खेळ जनता कधीं सहज खेळत नाहीं. अमेरिकेतील गोऱ्या लोकांत बहुत वर्षे काळ्या शिद्दी लोकांना गुलामगिरीत ठेवण्याची पद्धत चालू होती. माणसा सारखी माणसें ! त्यांचा बाजारांतील एखाद्या जड वस्तुप्रमाणें क्रयविक्रय व्हावा ही गोष्ट अमेरिकेंतील कांही सुज्ञ गोऱ्या लोकांना अत्यंत पाप मुलक अशी वाटली व त्यांनी या अमानुष पद्धति विरूद्ध मोहिम सुरू केली. शेवटी अमेरिकेंतील गोऱ्या लोकांत आपापसांतच काळ्या लोकांना गुलामगिरीतून मुक्त करण्याकरिंता भयंकर लढाई सुरू झाली व तींत गुलामगिरी चालू ठेवावी असें म्हणणाऱ्या गोऱ्या लोकांचा पराजय झाला. शेवटी ता. २२ सप्टेंबर सन १८६२ रोजीं सर्व अमेरिकन राष्ट्रांच्या वतीनें त्या वेळचे राष्ट्राचे अधिपति अब्राहम लिंकन यांनी जाहीरनामा काढून व साऱ्या काळ्या शिद्दी लोकांची गुलामगिरीतून ता. १ जानेवारी १८६३ पासून मुक्तता करण्यात आली. हा संदेश सर्वत्र पसरल्याबरोबर दरेक गुलामाच्या गोऱ्या मालकाने आपल्या गुलामांना एकत्र करून सांगितले कीं, " तुम्ही आतां स्वतंत्र झालांत. माझ्याकडे तुम्हांला आतां न्याहारी किंवा जेवण मिळणार नाही तुमचे तुम्ही पहा." दुर्दैवाची गोष्ट ही की स्वतंत्रतेचा संदेश ऐकून आनंदी झालेले गुलाम आपली जबाबदारी काय हें ऐकल्याबरोबर बिथरून गेले व आपल्याला स्वातंत्र्य देतों म्हणणाऱ्या अब्राहॅम लिंकननें आपल्यावर काय अरिष्ट आणलें आहे याची जाणीव होऊन आनंदाच्या ऐवजी त्यांच्या मनांत चीड आली. तशीच गत कोल्हापुरांतील महारांची सुरवातीस झाली होती. तथापि बऱ्या गोष्टीचे बरे परीणाम छपून राहत नाहींत. त्याच न्यायानें वतन नष्ट होणें ही आपल्या हिताची गोष्ट आहे असें कोल्हापूर संस्थानांतील महारांनी अखेर ओळखले व आमची वतने खालसा करावींत असे स्वखुशीनें करवीर सरकारकडे अर्ज केले.[‡] जसे अमेरिकेंतील काळ्या लोकांना "तुम्हांला न्याहारी देतों, जेवण देतों, आमचे गुलाम

---

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–३३.

[‡] पाहा, परिशिष्ट क्रमांक–३४.

व्हा '' असें आज जरी कोणी गोरा अमेरिकन म्हणूं लागला तरी ते लोक आतां जसें गुलामगिरी पत्करणार नाहींत तसेंच कोल्हापूर संस्थानांतील महारांना ''तुमचीं वतनें तुम्हांला देतों, घ्या!'' म्हणून कितीही विनवण्या केल्या तरी तें त्याला कदापि कबूल होणार नाहीं. कारण नरकांतल्या किड्यास नरकांतून बाहेर पडण्यापूर्वी आहे तें सोडलें तर आपलें काय होईल अशी त्याला मोठी भिती असते. पण एकदां बाहेर पडला कीं पुन्हा तो नरकवास कधींही पत्करणार नाहीं. तशीच स्थिती आज कोल्हापूर संस्थानांतील महारांची आहे. त्यांची स्थिति वतन गेल्यामुळें इतकी सुधारली आहे कीं, ते '' ताक कण्या चांगल्या'' असें म्हणावयास कधींच तयार होणार नाहींत. इतकेंच नव्हे तर वतन गेल्यानें कोल्हापूर संस्थानांतील महार लोकांचा जो कांहीं फायदा झाला आहे तो पाहून कागल संस्थानच्या महारांच्या तोंडाला पाणी सुटलें आहे व त्यांनी आपलें वतन खालसा व्हावें म्हणून आम्हीं मध्यस्थी करावी या हेतूनें आमच्याकडे एक विनंतिवजा अर्ज पाठविला आहे. महारकी वतन खालसा करण्याकरितां जरूर पडल्यास जबरदस्ती करण्यांत यावी असें जरी आमचें मत आहे तरी

**वतन कायद्यांत ज्या सुधारणा आम्ही सुचविल्या आहेत त्या अमलांत आणणें न आणणें हें सर्वस्वी आम्ही महारांच्या मर्जीवर राखून ठेवलें आहे.**

त्यांना आवडेल तर त्यांनी कायद्यांत सुचविलेल्या सुधारणा पचनीं पाडून घ्याव्यात. त्यांच्यावर कोणत्याच प्रकारची जबरदस्ती नाहीं. महार जातींत वतन बाबतींत जी चळवळ चालली आहे, तिच्यावरून वतनदार महारांचे तीन वर्ग असल्यांचे आम्हांस दिसून आलें आहे. कांहीं महार असें आहेत कीं, ज्यांना चालू वतनपद्धत ठीक आहे असें वाटते. दुसरे असे आहेत कीं, ज्यांना वतन सोडण्याची इच्छा नाहीं, परंतु ज्यांना वतनपद्धतींत सुधारणा होणें इष्ट वाटतें. या दोहोंशिवाय वतनदार महारांचा तिसरा असा एक वर्ग आहे कीं, जो वतनदारीला कंटाळुन गेला आहे व जो जमीन हातची गेली नाहीं तर सारें वतन सोडून देण्यास तयार आहे. आम्ही जी योजना तयार केली आहे, तींत हे तिन्ही वर्ग ध्यानांत धरूनच तयार केली आहे. ज्या महारांना आहे ती वतन व्यवस्था बरी आहे असें वाटतें त्यांना ती सोडून देण्याची जबरदस्ती करण्यांत आलेली नाहीं. त्यांनी आहे त्या परिस्थितींत सुखानें रहावें. ज्यांना वतनांत सुधारणा पाहिजे अशा महारांनी कलेक्टरला अर्ज करून बलुत्याच्याऐवजीं नकद कर ठरवून घ्यावा व तो सरकारला वसूल करण्यास सांगावा. त्याचप्रमाणें रयतेचें काम करणें नको असल्यास अर्ज करून कलेक्टरास तसें कळवावें म्हणजे त्यांना त्यापासून आपली सुटका करून घेतां येईल. परंतु हें महारांच्या मर्जीवर अवलंबून ठेवण्यांत आलें

आहे. त्यांना पसंत पडेल तर त्यांनीं तसें करावे. नको असल्यास त्यांच्यांवर कोणाची सक्ति नाहीं. त्याचप्रमाणें ज्या महारांनां मुळीं वतन नको आहे त्यांनीं शेतसारा भरून मोकळें होण्याची तरतूद करून ठेवण्यांत आली आहे. यांतहि वतन हवें कीं नको हें ठरविणें सर्वस्वी महारांच्या मर्जीवर ठेवण्यांत आलें आहे. ज्यांना पाहिजे असेल, त्यांना सोडा म्हणून त्यांच्या पाठीं कोणी लकडा लावणार नाहीं. ज्यांना नको असेल त्यांना जमीन जाईल या भीतीनें वतनाच्या खोड्यांत अडकून राहण्याचें कांहीं कारण नाहीं. एकूण तिन्ही प्रकारच्या वतनदार महारांची सोय आमच्या योजनेने होणार आहे व तीहि कोणावर जोरजुलूम केल्याशिवाय होणार आहे. अशा योजनेस विरोध करणारे लोक मूर्ख असले पाहिजेत किंवा दुष्ट असले पाहिजेत. दुष्टांचें समाधान करणें अशक्य आहे. आज हें जें स्पष्टीकरण आम्ही करीत आहोंत तें दुष्ट लोकांचे समाधान करण्याकरितां करित नाहीं. फक्त मूर्ख लोकांनीं शहाणे होऊन त्यांच्या लपंडावास बळी पडूं नये येवढ्याच हेतूनें तें करित आहोंत. तो आमचा हेतू सफल होईल व महार जात वतनाची बेडी तोडून आपल्या उन्नतीचा मार्ग मोकळा करून घेईल असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे.

● ● ●

---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# ७३

# ब्राह्मण्याच्या टांचेखाली तुडविलेल्या ब्राह्मणेतर लोकांचा ब्राह्मण्याविरूद्ध झगडा करणाऱ्या अस्पृशांना विरोध

महाड येथें चवदार तळ्याच्या बाबतींत सत्याग्र करणार असें अस्पृश्य लोकांतर्फे जाहीर झाल्यास आज नऊ दहा महिने झाले. परंतु एवढ्या अवधींत महाड येथील स्पृश्य लोकांनीं या बाबतींत काय करावयाचें याचा कांहींच विचार केला नाहीं याचें कोणासही आश्चर्यच वाटेल. कदाचित् अस्पृश्य लोकांचा हा नुसता दम आहे ; त्यांच्या हातून काय होणार ? व आलेच तर त्यांच्यावर अंबील शिंपून फत्ते करून घेऊं, असें या लोकांस वाटलें असावें. आतां जेव्हां अस्पृश्य लोकाचा निश्चय ढळत नाहीं व त्यांचीं जय्यत तयारी चालली आहे असें दिसून आल्यावर ही खडबडून जागी झालेली स्पृश्य प्रजा नाहीं नाहीं ते चाळे करूं लागली आहे. दुराग्रहास बद्ध झालेल्या प्रजेस क्रिमिनल प्रोसिजर कोडांतील १४४ कलम नेहमीं डोळ्यांपुढें दिसतें. व त्याचा आश्रय करावा म्हणून कुलाबा जिल्ह्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांच्याकडे अस्पृश्य लोकांना चवदार तळ्यावर येण्यास मनाई करण्याचा हुकूम मिळविण्याची, कल्पना निघाली. व त्या अर्जास पाठिंबा मिळावा म्हणून म्युनिसिपालिटीच्या सभासदांनीं एक मोठी गंमतीची कारवाई केली. पहिल्यांदा ज्या म्युनिसिपालिटीनें हें तळें अस्पृश्यांना खुलें असावें असा ठराव केला त्याच म्युनिसिपालिटीनें तो मागाहून रद्द केला. व म्युनिसिपालिटीच्या या प्रतिगामी धोरणास जनतेचा पाठिंबा आहे असें भासविण्याकरितां महाड म्युनिसिपालिटीच्या मतदारांची सभा भरविण्यात येऊन या प्रश्नावर त्यांचीं मतें घेण्यांत आलीं. व त्यात २६१ मतें अस्पृश्यांना प्रतिकूल, व ७ अनुकूल, अशीं पडलीं. मतदारांपैकीं १३ जण कोणत्याही बाजूस मत न देतां तटस्थ राहिले. म्युनिसिपालिटीच्या मतदारांचा व म्युनिसिपालिटीचा सनदशीर विरोध प्रकट करविल्यावर कलेक्टरकडे तो पाठविण्यांत आला व त्याबरोबर मनाई हुकुमाची मागणी करण्यात आली असें समजतें. या सनदशीर निकालाला आम्ही कवडीचीही किंमत देत नाहीं. कारण, हें तळें जर सार्वजनिक आहे तर म्युनिसिपालिटीला काय, तिच्या मतदारांना काय किंवा सरकारला काय अस्पृश्यांना मनाई करण्याची प्राज्ञा नाहीं. आणि हें तळें सार्वजनिक नसून

खाजगी आहे, असें जर असेल तर म्युनिसिपालिटीला व तिच्या मतदारांना चोंबडेपणा करून या वादांत शिरण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्यांच्या खाजगी मालकीचें हें तळें आहे, ते व अस्पृश्य लोक पाहून घेतील. म्युनिसिपालिटीला वकीली करण्याचे कांहीं प्रयोजन नाहीं.

अशाच प्रकारचें धोरण कुलाबा जिल्ह्याचे डि. मॅजिस्ट्रेट यानीं स्वीकारल्याचें समजतें. तारीख ७-१२-१९२७ रोजी डि. मॅजिस्ट्रेट या बाबतींत लोकांशी चर्चा करण्याकरितां महाडला मुद्दाम गेले होते. व त्यांनीं स्पृश्य व अस्पृश्य या दोन्ही वर्गांतील स्थानिक पुढाऱ्यांना बोलावून वाटाघाट केली. व शेवटीं जमलेल्या स्पृश्य वर्गांच्या पुढाऱ्यांना सांगितलें कीं, सरकार अस्पृश्यांना तळ्याला शिवण्याला प्रतिबंध करणार नाहीं. प्रतिबंध करावा अशी जर तुमची इच्छा असेल तर तुम्ही दिवाणी कोर्टात जाऊन अस्पृश्यांना तळ्यावर न येऊं देणें हा तुमचा हक्क आहे असें तुम्हीं शाबीत करून आणा. जोपर्यंत तुम्हीं तसें करीत नाहीं तोंपर्यंत अस्पृश्यांच्या न्याय्य हक्क बजाविण्यांला मदत करणें सरकारला प्राप्त आहे. अशाप्रकारें सरकारानें महाड येथील स्पृश्य लोकांस धाब्यावर बसविलें असून यांतून ते कशी वाट काढतात हें पहावयाचें आहे. कुलाबा समाचारांच्या ता. १०-१२-१९२७ च्या अंकावरून पहातां कलेक्टरच्या सूचनेप्रमाणें बहुधा हा दावा दिवाणी कोर्टात पडेल असें वाटतें. आम्हीही त्यास तयार आहोंत. स्थानिक स्पृश्य लोकांस आमची सूचना आहे कीं, या कामांत पडण्यापूर्वी हलविल्यानें हा खुंटा बळकट न होवो याचा त्यांनीं विचार करावा.

म्युनिसिपालिटीची व तिच्या मतदारांची कारवाई कशीही असो परंतु त्यांच्यांत आणि महाड येथील लोकांत अस्पृश्यांनीं तळ्यावर येऊं नये या बाबतींत एकमत आहे, असें मुळीच दिसून येत नाहीं. निदान येवढी गोष्ट खरी कीं, महाड येथील पुष्कळसें लोकमत अस्पृश्यांना अनुकूल आहे असें ता. २७ नोव्हेंबर १९२७* रोजीं महाड येथील अखिल नागरिकांचीं सभा श्री वीरेश्वराच्या देवालयांत भरली होती, तिच्यांत घडलेल्या हकीकतीवरून उघड होते. ती हकीकत या अंकात † दुसरीकडे छापली आहे. त्या हकीकतीवरून व ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालेल्या बातमीवरून असें दिसून येतें की, ज्यांनीं ही सभा घडवून आणली होती त्यांचा उद्देश यासभेंत अस्पृश्य लोकांच्या सत्याग्रहाला विरोध करण्याचा ठराव सर्व नागरिकांकडून पास करून घ्यावा, असा होता ; पण तो त्यांनीं जाहीर केला नव्हता. सभा फक्त सत्याग्रहाबद्दल विचार करण्याकरितां बोलविण्यात येत आहे

---

* तारीख १७ नोव्हेंबर १९२७ आहे.

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–३५.

असें जाहीर केलें होतें, चालकांचा असा लपंडाव आहे असें सभाजनास कळून आल्यामुळे जेव्हां रा. वामनराव जोशी वकील, यांनीं सभेचे अध्यक्षस्थान बाळंभटजी यांनीं स्वीकारावें अशी सूचना आणली तेव्हां अध्यक्षांची नांवे सुचविणाऱ्या अशा निराळ्या ७/८ सूचना सभेपुढें आल्या. इतक्या सूचना येण्याचे मुख्य कारण हेंच कीं, जो अध्यक्ष होईल त्यांनें दोन्हीं बाजूंचे म्हणणें ऐकून घेण्याचे कबूल केल्याखेरीज अध्यक्षस्थान स्वीकारू नये अशी सभाजनांची ईच्छा होती. पण अशा प्रकारचें आश्वासन देण्यास कोणीच तयार होईना, व सभेस अध्यक्ष मिळेना. अशा परिस्थितींत रा. सदाशिवराव धारप वकील, विरोधाची पर्वा न करतां अध्यक्षाच्या खुर्चीवर जावून बसले. परंतु विरोध झाल्यावर निरूपायानें त्यांना खाली बसावें लागलें. अशा रीतीनें अध्यक्षस्थान कोणीहि स्वीकारीना असें जेव्हां दिसलें तेव्हां रा. वामनराव जोशी वकील, यांनीं सांगितलें कीं, ही सभा सत्याग्रहाला विरोध करण्याकरितां बोलाविलेली आहे, ज्यांना विरोध करावयाचा नसेल त्यांनीं सभा सोडून जावें यावरही मोठ्या कडाक्याचा वादविवाद झाला, व बारा वाजले तरी हरकत नाहीं परंतु सभा सोडून जाऊं नये, अशी सूचना रा. टिपणीस यांनी आणिली, व त्याप्रमाणें सभेंतून कोणीही उठून गेले नाहीं. अखेर रा. वामनराव जोशी यांना सभा बरखास्त झाली, असें जाहीर करणें भाग पडले. यावरून एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, महाडची पुष्कळशी जनता अस्पृश्यांना अनुकूल आहे, व लोकमतच पहावयाचें झालें तर जनतेचेंच लोकमत पाहिलें पाहिजे. नुसत्या म्युनिसिपालिटीच्या मतदारांवर ही गोष्ट अवलंबून ठेवतां येत नाहीं, महाड येथील सहा हजार लोकसंख्येच्या वस्तीत म्युनिसिपालिटीचे २१३ मतदार म्हणजे दर्यामें खसखस असेंच म्हटलें पाहिजे.

महाडला बरेंचसें लोकमत आमच्या बाजूचें आहे. हें वरील सभेच्या हकीकतीवरून दिसून येत आहे. आतां जें कांहीं थोडें लोकमत अस्पृश्य लोकांच्या विरूद्ध आहे, त्याला अनुकूल करून घेणें हें स्पृश्य लोकांतील पुढाऱ्यांचें आद्य कर्तव्य आहे. हें कर्तव्य ब्राह्मण वर्गाचे पुढारी थोड्या बहुत अंशानें बजावीत आहेत, असें दिसतें. पुण्याचे पुढारी बाबुराव गोखले∆ व केसरीचे दुय्यम संपादक रा. ज. स. करंदीकर हे कांहीं दिवसांपूर्वी मुद्दाम पुण्याहून महाड येथे गेले होते. व ता. ३० नोव्हेंबर रोजी त्यांनी महाड येथील नागरिकांची सभा भरवून तेथील लोकांना अस्पृश्यांच्या सत्याग्रहाला विरोध करूं नका, हा हिंदुमहासभेचा संदेश निवेदन केला. त्याचा इष्ट तो परिणाम तेथील ब्राह्मणवर्गावर होईलच,

∆ पुणे हिंदू सभेचे एक पुढारी.

निदान या कार्यानें ब्राह्मणवर्गानें तरी आपल्यावरची जबाबदारी टाळण्याचा प्रयत्न केला आहे असे त्यांना म्हणतां येईल. ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं मात्र या बाबतींत कांहीच केलें नाहीं. खेडेगांवचे मराठे आदिकरून ब्राह्मणेतर लोक अस्पृश्यांच्या सत्याग्रहाला जोराचा विरोध करण्याच्या तयारीत आहेत अशी ओरड कांनी येत आहे. अशा वेळी जबाबदार मराठा ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं कुलाबा जिल्ह्यांत जाऊन आपल्या ज्ञातिबांधवांची समजूत घालणें अवश्य होते. व जातां येत नसल्यास त्यांनीं ताबडतोब एक खुलासापत्र छापून तें गांवोगांवीं प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करावयाची होती. ब्राह्मणेतर पक्ष या कार्याकडे दुर्लक्ष करील तर पुढील अनर्थाचे खापर सर्वस्वी त्याच्या माथ्यावर फुटेल, इतकेच नव्हे तर त्या पक्षाबद्दल अस्पृश्य वर्गाचें मत कलुषित झाल्याशिवाय राहणार नाहीं.

आज जो महाड येथे अस्पृश्यांवर प्रसंग आहे तसाच प्रसंग चेऊल येथील ब्राह्मणेतर जनतेवर आलेला आहे. कारण, महाड येथे अस्पृश्यांस पाणी पिण्यास जाण्यास जशी मनाई करण्यांत आलेली आहे तशीच चेऊल येथील श्री रामेश्वराच्या देवळांत कोळी, भंडारी, आग्री, मराठे, वगैरे ब्राह्मणेतर जनतेस देवळाच्या गाभाऱ्यांत जाण्याची ब्राह्मण ट्रस्टींनी मनाई केलेली आहे. व ती विरूद्ध स्थानिक ब्राह्मणेतर लोकांची जोराची चळवळ चालू आहे. अशा प्रसंगी ब्राह्मण्याच्या टांचेखाली तुडविलेल्या ब्राह्मणेतर लोकांनीं त्याच जिल्ह्यांत ब्राह्मण्याविरूद्ध झगडा करणाऱ्या अस्पृश्य लोकांस विरोध करण्यास सिद्ध व्हावें ही मोठ्याच शरमेची गोष्ट आहे ! पण ते बिचारे काय करणार ? त्यांचे पुढारी महात्मा ज्योतिबा फुल्यांचा † शतसांवत्सरिक उत्सव साजरा करण्यात गुंग झाले असल्या कारणानें त्यांना सन्मार्ग दाखविण्यास जागेवर कोणीच नाहीं. महाडचा सत्याग्रह चालू असतांना ब्राह्मणेतर पुढारी महाडला ब्राह्मण्यविध्वंसन होत आहे असे ऐकून " महात्मा फुले की जय " म्हणून घरीं बसून गजर करणार आणि त्यांचे अनुयायी महाडला येऊन हरहर महादेव म्हणून ब्राह्मण्यांचें संरक्षण करणार ! ! महाडला येणाऱ्यांना ब्राह्मणेतर पक्षांतील लोकांची ही एक मोठी गंमत पाहावयास सांपडणार आहे असें मोठ्या कष्टाने म्हणावें लागतें. ईश्वर करो, आणि यापक्षाची अशी नाचक्की न होवो.



---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–३६.

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. २३ डिसेंबर १९२७.

## ७४

# आम्हींहि सत्यशोधकींच आहोंत
# सत्यशोधकी चळवळ म्हणजे, समानतेची व सद्‌धर्माची चळवळ

१. महाडच्या सत्याग्रह परिषदेची साद्यंत हकिकत* आजच्या अंकांत दुसरीकडे दिली आहे. त्या परिषदे इतकी यशस्वी व परिणामकारक अशी अस्पृश्य वर्गाची परिषद कोठेंच भरली नाहीं, असें आमचें प्रामाणिक मत आहे. तथापि कांहींचा तिच्यावर आक्षेप आहे. त्यांपैकीं एक आक्षेपक पत्र आमचे व्यवसाय बंधु रा. भुस्कुटे, स्वराज्य पत्राचे संपादक, यांजकडून आमचेकडे आलें आहे. त्यांतील आक्षेपांस उत्तर देण्यापूर्वी तें त्यांच्या परवानगीनें जसेंच्या तसेंच आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत.

" सा. न. वि. वि.—

महाड येथें अस्पृश्यांच्या सभेंत ' मनुस्मृति ' जाळण्यांत आली अशी बातमी आहे. ही बातमी खरी का ? अशा कृत्यांनीं काय साधेल, कोणता हक्क अस्पृश्यांना प्राप्त होईल, असें आपल्याला वाटतें ? अस्पृश्य वर्गावर आज हजारों वर्षें अन्याय चालू आहेत. या गोष्टीला एकटी मनुस्मृतीच कारणीभूत झालेली आहे काय ? त्या वेळच्या समाजाला नियमांची जरूरी वाटली तसे नियम मनूनें ग्रथित केले. जुने ग्रंथ म्हणजे त्या त्या कालच्या समाजाच्या विचारसरणीचे आदर्श होत. समाजाला न पटणारे व अगदी स्वतंत्र असे बुद्धासारखे किंवा खिस्तासारखे किंवा टॉलस्टॉयसारखे महात्मे अत्यंत विरळा. आपल्याला जर आपले हक्क संरक्षण करून घ्यावयाचे असतील तर असलीं निरर्थक व मनें प्रक्षुब्ध करणारीं कृत्यें करण्यांत काय बरें फायदा ? असलीं कृत्यें आपल्या पुरस्कर्तृत्वाखालीं तरी होऊं नयेत अशी माझी इच्छा आहे.

कुलाबा समाचारांत आतांच हकीकत वाचली. कुलाबा समाचारकारांनीं आपल्याला भीमासूर ! ! म्हटलें आहे व सनातन हिंदुधर्म बुडवून एक नवा सबगोलंकारी धर्म स्थापन करण्याची महत्वाकांक्षा आपल्याला आहे असेंहि त्यांनीं म्हटलें आहे. महाड येथें झालेल्या आपल्या भाषणाची सर्व नक्कल मला पाठवाल का ? मनुस्मृती जाळल्याचे कुलाबा समाचारातील वृत्त वाचून वाईट वाटतें.

---

* पाहा, या खंड मालिकेतील खंड १८, भाग-१, पृ. १०२–१४७.

बिच्याऱ्या मनुचा त्यात काय दोष आहे ? मनुस्मृति ही एक कायद्याची, त्या वेळच्या प्रचलित असलेल्या रूढींची जंत्री आहे. तेव्हां ही जंत्री जाळल्यानें आजवर हिंदु समाजात रूढ झालेल्या जातिविषयक व स्पृश्यास्पृश्यविषयक कल्पना थोड्याच नष्ट होणार ? अंत्यजत्वाची कल्पनाच आपल्या समाजांत रूढ झालेली आहे व ही कल्पना आपल्या सर्व धर्मग्रंथांतून सुद्धा आढळेल. आपल्यांतील नव्या व जुन्या सुधारकांनीं व संतांनीं ही कल्पना घालविण्याची खटपट केली पण त्यांना यश आलें नाहीं. त्यांना यश आलें नाहीं म्हणून आपण मात्र डगमगून जातां कामा नये. आपला प्रयत्न आपण जोरात चालविला पाहिजे. खबरदारी इतकीच घेतली पाहिजे कीं, आपल्या चळवळीला सत्यशोधकी वळण लागूं नये. ' सत्यशोधकी ' हा शब्द मी मुद्दाम वापरला आहे. सत्यशोधकी चळवळ म्हणजे ब्राह्मणांचा द्वेष करणारी, राजकारणांत भाग न घेणारी, सरकारच्या नजरेकडे लक्ष ठेऊन काम करणारी अशी आजपर्यंतची महाराष्ट्रांतील रूढ कल्पना आहे. या कल्पनेंत समाविष्ट असलेलें वळण आपल्या चळवळीलाहि न लागेल अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. आपला उत्साह अवर्णनीय आहे. आपल्या वर्तनानें अस्पृश्य वर्गांत आपण लोकप्रियताहि संपादन केली आहे, हें अभिनंदनीय आहे. अस्पृश्य गणल्या गेलेल्या समाजात आपल्यासारखे विद्वान् व लोकहिताचा विचार करणारे गृहस्थ निर्माण झाले हें महाराष्ट्राचें सुदैव आहे. या सर्व उत्साहाला म. गांधींची अहिंसा वृत्ति व सरकारशीं असहयोगवृत्ति यांची जोड मिळाल्यास आपली चळवळ यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहीं. अस्पृश्य समाजाची चळवळ जर न्यायावर उभारलेली आहे तर सरकारच्या इंजंक्शनला तिनें कां भ्यावें ? खालच्या कोर्टांत इंजंक्शन मिळालें त्याप्रमाणें वरच्या कोर्टानेंहि इंजंक्शन दिलें तर आपला सत्याग्रह कायमचाच थांबला म्हणावयाचा ! महाडचा सत्याग्रह म्हणजे कलेक्टरचा खेळ असेंच दिसतें. सत्याग्रहाच्या पूर्वी तो स्पृश्य समाजाला धमकी देतो. व सत्याग्रहाच्या वेळीं इंजंक्शनचें निमित्त पुढें करून सत्याग्रह थांबवितो. अस्पृश्यांची सत्याग्रहाची ही चळवळ याप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांच्या कक्षेंत जावी हें राष्ट्रहिताचें नाहीं. सरकारी कारस्थानांना वांव देण्यास या चळवळीचा उपयोग होतां कामा नये. महाडला मी येणार होतों. सत्याग्रह थांबला असें ऐकिलें म्हणून आलों नाहीं. पण तेथें आलों असतों तर बरें झालें असतें असें आतां वाटूं लागलें. मनुस्मृतीचेंदहन मी आपल्या हातून होऊं दिलें नसतें. अस्पृश्य चळवळीविरूद्ध मनें कलुषित करण्याला ही गोष्ट आपल्या विरोधी पक्षाला कोलितीप्रमाणे उपयोगी पडेल.

आपण पुण्यास येणार असाल किंवा याल तेव्हां स्वराज्य ऑफिसाला पुन्हा भेट द्यावी.

सत्याग्रहासंबंधानें, मनुस्मृतीच्या दहनासंबंधानें स्वराज्यांत कांहीं लिहिणार होतों, पण तसें कांहीं लिहिण्यापूर्वी आपल्याला एकदां पत्र पाठवून व आपलें काय म्हणणें आहे तें अजमावून मग कसें लिहावयाचें तें ठरवून लिहावें म्हणून आपल्याला हें पत्र पाठविलें आहे. पत्राचें उत्तर शक्य तितकें लवकर पाठवाल अशी आशा आहे. ''

२. आम्ही जें टीकात्मक पत्र वर प्रसिद्ध केलें आहे त्यापेक्षांहि मोठी जहाल टीका धुळ्याच्या प्राबोधकारानें, पेणच्या कुलाबा समाचाराने, मुंबईच्या रणगर्जनेनें, पुण्याच्या भाला संग्राम कंपूनें व बेळगावच्या परीक्षकानें केल्याचें महशूर आहेच. त्यांना उत्तर न देतां येवढ्या एका पत्रालांच आम्ही उत्तर देतों याचा कांहीं जणांना विस्मय वाटेल. परंतु या उपरिनिर्दिष्ट टीकाकारांना उत्तर न देण्याचीं कारणें अनेक आहेत. पहिलें असें कीं, त्यांच्या टीकेंत शिवीशिवाय दुसरें कांहींच नाहीं. त्यांच्या शिव्यांला कोणी भीक घालीत नाहीं. शिवाजीच्या वेळच्या मुसलमान इतिहासकारांनीं शिवाजीस कुत्ता, मूषक, सैतान, गनिम, बंडखोर वगैरे शेलक्या शब्दांनीं त्याची संभावना केली. येशुख्रिस्ताला त्याच्याच गणगोत्रांनीं राजद्रोहाचा आरोप करून रोमन सरदाराकडून सुळी देऊन आपले डोळे निववले. महंमद पैगंबराचीहि त्याच्या लोकांनीं तशीच दशा उडविली. त्याला त्याचें जन्मस्थान जें मदिना शहर त्या शहरांतून हाकून लावण्यात आलें. व मक्केसारख्या परस्थ गांवीं त्याला आपल्या आयुष्याचे दिवस काढावे लागले. आमचीही तशी वासलात लावण्याचा योग येणार हें आम्ही जाणून आहों. व रायगडावरील घडलेंलें प्रकरण ही या भावी अरिष्टाची चुणुक आहे. कोणाहि क्रांतिकारक पुरुषाच्या आयुष्यांत हा संकटयोग असतोच. व तो असणें अगदीं साहजिक आहे. म्हणून जे लोक आम्हाला धिःकारतात, शब्दशाप देतात किंवा धमक्या घालतात त्यांच्या बोलण्याचा किंवा लिखाणाचा आम्हांस कवडीचाही विशाद वाटत नाही. या बाबतीत असल्या बीभत्स टीकाकारांना आमची अशी सूचना आहे कीं, अस्पृश्यांचे पुढारी स्वतःला कांहीं सर्वज्ञ समजत नाहींत. तथापि अस्पृश्य समाज उन्नतीच्या बाबतींत त्यांचीं तत्त्वें ठरून गेलीं आहेत. तपशीलाच्या बाबतींत आपल्या हातून चुका होतील हें त्यांना मान्य आहे. परंतु ह्या चुका दाखवून देतांना त्यांनीं आपली जीभ सैल सोडणें हें त्यांच्या नाशाचें कारण आहे. याची त्यांनीं आठवण ठेवावी. एकदां वादांनीं पेट घेतला म्हणजे मग कोणाचे तोंड चालतें तर कोणाचा हात चालतो. महाडच्या सत्याग्रह परिषदेसंबंधी लिहितांना मुसलमान समाजाला जनावरांच्या रांगेत घातल्यामुळें, मुसलमान समाजाकडून एक साधें निषेध प्रदर्शक रजिस्टर पत्र आल्याबरोबर डॉ. आंबेडकरांना ' तुम्ही गडावर गेलांत, तें सांगून जावयाचें होतें

म्हणजे पाहिली असती, ' असें धमकावणाऱ्या कुलाबा समाचाराच्या संपादकाचा कासोटा फिटला. आणि त्यांनें लगेच दुसऱ्या अंकांत मुसलमान समाजाची माफी मागितली. मुसलमान समाजानें रजिस्टर पत्र पाठविण्याच्या ऐवजी तुझा बोल तर माझी बुक्की व तुझी बुक्की तर माझी लाथ असा प्रकार केला नाही हा त्यांचा शहाणपणा होय. पण कुलाबा समाचारांनीं आपली जिभली फाजील चालविली तर आज रजिस्टर पत्रानें काम भागवून घेणारा मुसलमान समाज संपादकाचा पारा उतरण्याकरितां वरील जालीम इलाज करणार नाहीं कशावरून ? आणि जी गोष्ट मुसलमान समाज करील तीच गोष्ट अस्पृश्य समाजास करणें कठीण होणार नाहीं. तेव्हां कुलाबा समाचाराचे संपादकास व त्याच मालिकेंतल्या इतर संपादकांस आमचें असे सांगणें आहे कीं, अस्पृश्य समाज हा हल्लींच्या काळीं पेटलेला अग्नि आहे ; त्याच्याशी खेळ खेळूं नका. बीभत्स टीकाकारांना उत्तर न देण्याचें दुसरें कारण असें कीं, त्यांनीं आम्हास वाईट म्हटलें म्हणून आम्ही खरोखरीच वाईट आहोंत असे कांहीं ठरत नाहीं. आम्ही व आमचे वरील टीकाकार या परस्परांमधील भाव जार स्त्री व तिचा पति या परस्परात जो भाव असतो तशाच प्रकारचा आहे. ' जार स्त्रीणां पतिः शत्रुः ' जार कर्मांत रत असलेल्या स्त्रीला आपला नवरा शत्रूसारखा वाटतो. त्याला नित्य शिव्याशापांची ती लाखोली वहाते, त्याचां द्वेष करते आणि रात्रंदिवस त्याचें मरण चिंतिते. तथापि जारीणीच्या जल्पनामुळें, तिचा नवरा दुष्ट आहे असें कोणीहि मानित नाहीं. जुनें तें सोनें मानणारे, अन्यायाला परंपरा म्हणून उराशीं बाळगणारे, माणुसकी गारद करणाऱ्या लिखाणांना धर्मग्रंथ मानणारे, अशा टीकाकारांना मानवी धर्माचें प्रतिपादन करणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें धर्मक्षेत्रांतील जारिणी अशी उपमा न द्यावी तर कोणती द्यावी ? अशा लोकांनी डॉ. आंबेडकर वेडा आहे असें ठरविण्यांचा प्रयत्न केला म्हणून, तो कांहीं वेडा ठरत नाहीं, किंवा वेडा होत नाहीं. मग हे लोक उपशीत असलेल्या नरकांत दगड टाकून तो अंगावर उडवून घेण्यांत काय हंशील आहे ? शिष्टाचारांचें उल्लंघन न करतांना आम्ही आरंभिलेल्या कार्यांत वादविवाद करण्यास जो कोणी पुढें येईल, त्याच्याशीं वादविवाद करण्यास आम्ही तयार आहोंत. परंतु पशूबरोबर लागून आम्हांस पशु होण्याची इच्छा नाहीं. येवढ्यामुळेंच इतर टीकाकारांतून उत्तरपक्ष मांडण्याच्या हेतूनें आम्ही स्वराज्याच्या संपादकाच्या टीकेस मानाचा ठाव दिला आहे.

३. वरील पत्रांतील आक्षेप काय आहेत याची छाननी केली असतां, असें दिसून येतें कीं, मनुस्मृति जाळण्यांत आली हा महाडच्या सत्याग्रह परिषदेवरील मोठाच आरोप आहे. वरील आक्षेप जे करतात त्यांनीं एक तर मनुस्मृति वाचली नसावी किंवा मनुस्मृतींत सांगितलेले नियम त्यांना मान्य असावेत. राजकारणांत

जहाल असलेले लोक समाज कारणांत मवाळ असावयाचे अशी आजपर्यंतची या देशांतली परंपरा होऊन राहिली आहे. त्या परंपरेस पुण्याचे स्वराज्यकर्ते हे एक अपवाद आहेत ही गोष्ट नाकबूल करणें शक्य नाहीं. राजकारणांत जसे जहाल तसेच समाज कारणांतही ते जहाल आहेत याबद्दल आमची खात्री आहे. अशा परिस्थितींत मनुस्मृतींत ग्रथित केलेलीं तत्त्वें त्यांना मान्य असतील असें आमच्यानें म्हणवत नाहीं. तेव्हां त्यांनीं जो आक्षेप काढला आहे तो केवळ त्यांनीं मनुस्मृति वाचली नाहीं म्हणूनच काढला असावा असें म्हणणें प्राप्त आहे. तेव्हां आमच्या या मित्रांना आम्ही अशी प्रेमाची सूचना करतों कीं, त्यांनीं मनुस्मृति एकदां वाचावी. आम्ही जें मनुस्मृतीचें वाचन केलें आहे त्यावरून आमची खात्री झाली आहे कीं, त्या ग्रंथांत शूद्र जातीची निंदा करणारी, त्यांचा उपमर्द करणारीं, कुटाळ उत्पत्तीचा कलंक त्यांच्या माथीं मारणारीं व त्यांच्याविषयीं समाजांत अनादर वाढविणारीं वचनें ओतप्रोत भरलेली आहेत. त्यांत धर्माची धारणा नसून, धर्माची विटंबना आहे, आणि समतेचा मागमूस नसून, असमतेची मात्र धुळवड घातली आहे. स्वयंनिर्णयाचें तत्त्व प्रस्थापित करावयास निघालेल्या सुधारणावाद्यांस असला ग्रंथ कधींच मान्य होणें शक्य नाही. व तो अस्पृश्य वर्गासही मान्य नाहीं एवढेंच दर्शविण्याकरितां महाड येथे त्याची होळी करण्यांत आली.

४. आमच्या मित्रांचा दुसरा असा एक आक्षेप आहे कीं मनुस्मृति ही जुन्या काळीं अंमलांत असलेल्या नियमांची एक जंत्री आहे. त्या जंत्रींतील नियम आज कोणास लागू नाहींत. मग असलें जुनें बाड जाळण्यांत काय अर्थ आहे ? मनुस्मृति हें एक जुनें बाड आहे असें आमच्या मित्राप्रमाणें आम्हासही महणतां आलें असतें तर आम्हांस मोठाच आनंद झाला असता. परंतु दुर्दैवानें आम्हांस तसें म्हणतां येत नाहीं. आणि आमची खात्री आहे कीं, भावी स्वराज्याचा चंद्रोदय केव्हां होतो हें पाहण्याकरितां, आमच्या मित्रांचे डोळे आकाशाकडे लागले नसते तर आपल्या पायांखालीं काय जळतें आहे हें त्यांना निरखून पाहता आलें असतें. मनुस्मृति हें एक जुनें बाड आहे, तें राहिलें तरी कांही हरकत नाही असा युक्तिवाद करणाऱ्या गृहस्थांना नुकतीच प्रसिद्ध झालेली बळहायी लोकांवरील जुलमाच्या कहाणीकडे त्यांनीं लक्ष द्यावें अशी आमची आग्रहाची सूचना आहे. मध्य हिंदुस्थानांत कांहीं दिवसांपासून बळहायी नांवाच्या अस्पृश्य जातींत सुधारणेचें वारें शिरलें आहे. व त्याप्रमाणें या बळहायी जातींतील स्त्रीपुरुषांनीं आपले जुने व हीनपणादर्शक रिवाज व चालीरीति, तसेंच पेहराव सोडून देऊन वरिष्ठ वर्गाच्या हिंदूंची जशी वागणूक आहे तशी वागणूक आपणही ठेवण्याबद्दलचे ठराव केले. व ते अंमलांतही आणले. परंतु सुधारणा करण्यास निघालेल्या या बिचाऱ्या बळहायी लोकांचे ठराव अमलांत येतात तोंच दरेक गांवच्या स्पृश्य हिंदूंनीं आपापल्या गांवच्या

बळहायी लोकांस अशी नोटीस दिली कीं, तुम्हांस जर आमच्या गांवांत नांदावयाचे असेल तर तुम्ही खालील अटी पाळल्या पाहिजेत. (१) बळहायी पुरुषानें भरजरी पागोटें डोक्यास बांधूं नये. (२) बळहायी पुरुषांनी रंगीत किनारीची अगर रुईफुल किनारीची धोतरें नेसता कामा नये. (३) बळहायी लोकांनी गांवांत कोणाहि स्पृश्य माणसाच्या घरीं मयत झाल्यास त्या मयताची खबर त्याच्या नातेवाईकांस मग तो नातेवाईक कितीही दूर राहात असो त्याला पोहोचविलिच पाहिजे. (४) स्पृश्य हिंदूंच्या लग्नामध्ये व वरातींमध्ये बळहायी लोकांनी वाजंत्री वाजविण्याचे काम केलेंच पाहिजे. (५) बळहायी स्त्रियांनी चांदीचे अगर सोन्याचे दागिने घालतां कामा नये, तसेंच त्यांनीं ऊंच प्रतीचीं अगर उंच मोलाची झबलीं अगर चोळ्या घालूं नयेत. (६) बळहायी स्त्रियांनी सुविणीचे काम केलेच पाहिजे. (७) स्पृश्य लोक देतील तें मोल घेऊन, सांगतील तें काम करण्यास बळहायी लोकांनी तयार असलें पाहिजे. कांहीं ठिकाणी वरील नियम एका करारपत्रकांत घालून, सह्या करा नाहीं तर गांवांतून जा, असा बळहायी लोकांस पेंच टाकला आहे. व त्याप्रमाणें कांहीं स्वाभिमानी बळहायीं लोकांनी आपल्या माणुसकीवर तिलांजली देण्याऐवजी हजारों वर्षे जेथे ते व त्यांचे पूर्वज राहिले ते गांव सोडून त्यांनी देवास वगैरे जवळपासच्या संस्थानांत व ब्रिटीश हद्दींत जाऊन राहिले आहेत. जसा मध्य हिंदुस्थानांत बळहायी लोकांवर प्रसंग गुदरला आहे तसाच प्रसंग या इलाख्यांतील कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांतील महार लोकांवर गुदरला आहे. भागे एकदां भालाकारांनें मोठ्या तोऱ्याने सांगितलें कीं, बौद्ध लोकांनी यज्ञांत होणाऱ्या हिंसेचा आधार घेऊन, ब्राह्मणांवर हत्यार चालविलें, पण ब्राह्मणांनी एका झटक्यास मद्य व मांस पूर्णपणे सोडून देऊन, बौद्ध लोकांवर मात केली. अशा लिखाणानें हा घमेंडानंदन असें भासवूं इच्छितों कीं, याच्या बाप जाद्याच्या अंगांत जो करारीपणा आहे तो करारीपणा अस्पृश्यांच्या अंगांत नाहीं. असली फुशारकी मारणाऱ्यांस आम्ही असें सुचवितों कीं, त्यांनी कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांत दौरा काढून अस्पृश्य लोकांच्या आंगींही किती करारीपणा बाणला आहे याची त्यांनी खात्री करून घ्यावी. दौऱ्याअंती कळून येईल कीं, मार्च १९२७ पावेतों जे लोक मेलेली जनावरें ओढून नेण्याचा आग्रह धरीत होते व त्यांचे मांस खाणे आपला धर्म आहे म्हणून मानीत होते त्याच लोकांनी आतां मांसाला न शिवण्याचा निश्चय केला आहे. इतकेंच नव्हे तर मेलेल्या जनावराला ते शिवत देखील नाहींत. तसेंच आज इतके दिवस वतनाच्या हक्कापैकीं, एक हक्क म्हणून, गांवातून भाकर मागण्याचा जो पुरातन प्रघात होता तो अजिबात बंद करण्यांत आला आहे. ब्राह्मणांनीं मद्य मांस सोडलें त्यांत त्यांना स्वार्थ साधावयाचा होता म्हणून सोडले, कारण बुद्ध भिक्षूंची जागा प्राप्त करून

घेण्यासाठी, मद्य मांस वर्ज्य केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हते. कुलाबा जिल्ह्यातील अस्पृश्य लोकांचा करारीपणा स्वार्थ साधण्यासाठीं नाहीं तो स्वार्थावर पाणी सोडण्यासाठीं आहे. हें बापाच्या नांवावर विकणाऱ्या भालाकारानें ध्यानांत घ्यावें हें बरें. परंतु या सुधारणाप्रिय महार लोकांवरही बळहायी लोकांप्रमाणेच प्रसंग गुदरला आहे ! ! जेथें जेथें महार लोकांची वस्ती छोटी आहे व इतर स्पृश्य लोकांची वस्ती मोठी आहे, तेथें तेथें महार लोकांना तुम्ही मेलेल्या जनावरांचे मांस खाल्लेंच पाहिजे, गावांत भाकरी मागितलीच पाहिजे, सर्वांना जोहार घातलाच पाहिजे, अशी सक्ति करण्यांत येत आहे. आमच्या स्वराज्य पत्राच्या संपादकांस आम्ही असें विचारतों कीं, वरील उदाहरणें काय दर्शवितात ? आमच्या मतें तीं जें दर्शवितात तें हेंच कीं, मनुस्मृति ही जुनी जंत्री नसून चालू वहिवाटींत आहे. मनुस्मृतींत सांगितलें आहे कीं, शूद्र लोकांनीं अमंगल राहावें, भिक्षा मागावी, धन संचय करूं नये, व मेलेलीं जनावरें न्यावींत. स्पृश्य लोक जे आज अस्पृश्य लोकांना आपली सुधारणा करूं देत नाहींत त्याचें कारण असें कीं, त्यांनीं जर सुधारणा केली तर मनूनें घालून दिलेल्या पायऱ्या राहू शकत नाहींत. तसें जर नसतें तर सुधारणाप्रिय अस्पृश्य लोकांवर असा जुलूम कां करण्यांत येता ? अस्पृश्य लोक स्वच्छतेनें राहिले, भाकरी मागण्यासारखें हीनपण त्यांनी सोडलें, मृत मांसाहाराचें त्यांनीं उच्चाटण केलें तर त्यांत स्पृश्य वर्गाचे काय नुकसान होण्यासारखें आहे ? कांहींच नाहीं. केवळ अस्पृश्य लोकांनीं पायरी सोडूं नये म्हणून हा सारा जुलूम चालला आहे. यावरून कोणाहि हिंदुमात्रास तेव्हांच कळेल कीं स्पृश्य लोक अस्पृश्य लोकांस सुधारणा करूं देत नाहींत. ते मनुस्मृतीचे नियम पाळीत आहेत. दुसरें कांहीं करीत नाहींत. असें असतांना मनुस्मृति ही जुनी जंत्री आहे हे म्हणणें केवढें धाडसाचें आहे याचा आमच्या मित्रांनीं विचार करावा.

५. ज्यांना आमचा हा युक्तिवाद पटत नाहीं त्यांना आम्हीं असें विचारतों कीं मनुस्मृति हें जर जुनें बाड आहे तर तें जाळल्यानें तुमचें काय बिघडलें ? वाण्याच्या घरी पुड्या बांधण्यासाठीं पडलेली रद्दी जर कोणी जाळली तर त्याबद्दल कोणाचाच जळफळाट होत नाहीं. मग मनुस्मृति ही एक रद्दी पोथी आहे असें म्हणणाऱ्या लोकांनीं तिची होळी केल्याबद्दल एवढे आकाशपाताळ एक करण्यांत यावे हें आश्चर्यकारक नव्हे काय ? ज्याअर्थी या लोकांचा असा जळफळाट झाला आहे त्याअर्थी ती पोथी रद्दी नाहीं, तिला लोक मानतात ही गोष्ट सिद्ध आहे. मग जी पोथी लोकांस मान्य आहे व जी आम्हांस मान्य नाहीं अशा पोथीची आम्ही कां होळी करूं नये ? यावर आमचें मित्र असें म्हणतात कीं, मनुस्मृति जाळून काय

साधणार आहे. समाजात रूढ झालेल्या जातिविषयक व स्पृश्यास्पृश्य विषयक कल्पना तेणें करून कांहीं नष्ट होणार नाहींत. उलट कांहीं स्पृश्य लोकांची सहानुभूति मात्र गमावण्याचा संभव आहे. यावर आमचें उत्तर असें कीं, असहकारितेच्या चळवळींत म. गांधींनीं स्वदेशी कपडा जाळून काय साधले ? खानमालिनी विवाहाच्या प्रकरणांत ज्ञानप्रकाशाची होळी करणाऱ्या लोकांनीं काय साधले ? राजकीय सुधारणांची चौकशी करण्याकरितां येणाऱ्या सायमन कमिशनवर बहिष्कार घालून काय साधणार आहे ? मिस मेयोनें लिहिलेल्या मदर इंडिया[†] पुस्तकाचा नुकताच न्यूयार्क शहरीं ज्यांनी होम केला त्यांना काय मिळवावयाचे होते ? परदेशी कपडा जाळून, ज्ञानप्रकाशाची किंवा मिस मयोच्या पुस्तकाची होळी करून किंवा सायमन कमिशनवर बहिष्कार घालून जी गोष्ट साधावयाची होती तीच गोष्ट आम्हांस मनुस्मृति जाळून साधावयाची आहे. होळी करणें हा एक निषेध दर्शविणाऱ्या अनेक प्रकारांपैकीं एक प्रकार आहे व तो प्रकार कांहीं रानटीपणाचा आहे असेंही म्हणतां यावयाचें नाहीं. तो शिष्टसंमत झाला आहे याबद्दल कोणासही ना म्हणतां येणार नाहीं. निषेध दर्शविण्याचा मुख्य हेतु म्हणजे ज्यांच्याविरूद्ध आपण निषेध प्रदर्शित करितों त्याला लाज वाटावयास लाऊन व त्यांच्यात विचार जागृती करून त्यांच्या वर्तणुकींत योग्य तो फेरबदल करून आणावयाचा असा असतो. मनुस्मृति जाळून जो निषेध आम्ही व्यक्त केला त्यांत ब्राह्मण्याचा म्हणजे हिंदुसमाजांतील उच्च नीच भावनेचा इनकार व्यक्त करण्याचा आमचा हेतु होता. आमचा इनकार ध्यानांत घेऊन ब्राह्मण्यग्रस्त लोक आपल्या वर्तणुकीत फेरबदल करतील अशी आमची आशा आहे. व त्या आशेनेच हें सर्व कार्य केलेलें आहे. आतां आमचे मित्र जी शंका घेतात कीं मनुस्मृति जाळल्यानें ब्राह्मण्य नष्ट होणार नाहीं, ती शंका जर दुर्दैवानें खरी ठरली तर ब्राह्मण्य विध्वंसनासाठी ब्राह्मण्यग्रस्त लोकांना जाळणे किंवा हिंदुधर्माचा त्याग करणें या दोहोंपैकीं कोणती तरी एक गोष्ट करावी लागेल. स्पृश्यलोकांची सहानुभूति गमावण्याचा आक्षेप तर अगदीं खुळा आहे असें आम्ही समजतों. मनुस्मृति मस्तकावर धारण करून अस्पृश्य लोकांना आम्ही तुमचा उद्धार करतो असें म्हणणें म्हणजे भस्मासुरानें एका हातांत शंकरानें दिलेला खडा घेऊन दुसरा हात मस्तकावर ठेवून तुझें कल्याण करतों असें म्हणण्यासारखें आहे असें आम्हांस वाटतें. मनुस्मृतीचा एका बाजूनें अभिमान धरणें व दुसऱ्या बाजूनें अस्पृश्योद्धार करूं म्हणणें या दोन गोष्टी इतक्या परस्पर

---

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–३७.

विरोधी आहेत की एकाच तोंडानें या दोन्ही गोष्टींचा उच्चार करणाऱ्या लोकांच्या प्रामाणिकपणाची आम्हांस जबरदस्त शंका येते. आणि म्हणूनच अशा लोकांच्या सहानुभूतीची आम्ही विशेष दरकार करीत नाही. यावरून आम्हांस कांहीं मूर्ख लोक असें दूषण देतात कीं, आम्ही साऱ्याच स्पृश्यलोकांवर एकजात तुटून पडत आहोंत. व तेणेकरून अस्पृश्यता निवारणाचें कार्य दुष्कर करीत आहोंत. पण हा त्यांचा गैरसमज आहे. तशी जर आमची भावना असती तर आमचे मित्र रा. अनंतराव चित्रे, गंगाधरराव सहस्त्रबुद्धे व रा. देवराव नाईक, मोर्शीचे मुंडले व अमृतकर यांना आम्ही शिरसावंद्य मानले नसते. किंवा अस्पृश्येतर लोकांना सत्याग्रहांत भाग घेऊ दिला नसता. आम्हांला स्पृश्य लोकांची सहानुभूति मिळेल तितकी थोडीच आहे. मात्र खरें सहानुभूतीचें कोण हें कसाला लावून पाहिल्याखेरीज नुसती सहानुभूतीची साखर पेरणाऱ्या लोकांना आम्ही आपले मित्र म्हणण्याचा बावळटपणा करीत नाहीं, अगर त्यांना भिऊन आमचा निषेध व्यक्त करण्यास आम्ही मागें घेत नाहीं. यात आमची चूक होत आहे असें कोणी म्हणेल असें आम्हांस वाटत नाहीं.

६. कलेक्टरच्या सांगण्यावरून सत्याग्रह थांबविण्यांत आला हा महाडच्या परिषदेवर आमच्या मित्राचा दुसरा आरोप आहे. आमच्या टीकाकारांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे "महाडचा सत्याग्रह म्हणजे कलेक्टरचा खेळ असें झालें." आमच्या या टीकाकारांच्या म्हणण्यांत अर्थ असो किंवा नसो, आम्ही कलेक्टरला भिऊन सत्याग्रह थांबविला असें नाशिकच्या स्वातंत्र्यकाराप्रमाणे ते म्हणत नाहींत, हें पाहून आम्हांस एक प्रकारचा आनंद वाटतो. भ्याडपणानें सत्याग्रह केला नाहीं असा आमच्या वर आरोप करण्याचा जर कोणास अधिकार असेल तर तो एखाद्या सत्याग्रही वीरालाच असूं शकेल. ज्याला आजवर सत्याग्रह करण्याचा–नव्हे, सत्याग्रह करण्याचा विचार करण्याचा–प्रसंग आलेला नाहीं, ब्राह्म जातींत जन्मल्यामुळे अष्टाधिकारांचें गांठोडें जन्मतःच हातीं आले असल्याने ज्याला समाजाच्या विरूद्ध सत्याग्रह करण्याचा प्रसंग येण्याचा कधी संभव नाहीं, व परार्थसाधनासाठी आपल्या गणगोत्रांविरूद्ध सत्याग्रह करण्याचे ज्यास शील नाही; एकूण सारें आयुष्य स्वतःचें उदर भरण्याकडे खर्ची घालण्याशिवाय दुसरें उज्वल ध्येय नाहीं, अशा स्वातंत्र्याच्या संपादकानें वीराचा उसना आवेश आणून कलेक्टरला भिऊन सत्याग्रह थांबविला, असे उद्गार काढणें हास्यास्पद नव्हें काय ? आधीं कर आणि मग बोल, असा ज्याचा नियम असेल त्यानेंच दुसऱ्याला हिणविण्याच्या भानगडींत पडावें, उत्तराला ठपका देण्याचा अधिकार अर्जुनाचा आहे. तो स्वातंत्र्याच्या संपादकासारख्या बृहन्नडेचा नाही. असो !

स्त्री दाक्षिण्याच्या नियमानुसार अबलेचे कठोर शब्द सोसणे हा देखील शिष्टाचारच आहे. तथापि पुष्कळशा लोकांचा असा समज झाला आहे की, कलेक्टरचा मनाई हुकूम मोडण्याची आमची छाती झाली नाहीं, म्हणून सत्याग्रह थांबविण्यांत आला. पण या लोकांना आम्ही असें कळवूं इच्छितो की, कलेक्टरनें मनाई हुकूम काढला होता. ही हकीगतच मुळीं चुकीची आहे. कलेक्टर साहेबांनें मुळी मनाई हुकूम काढलाच नव्हता. तेव्हां कलेक्टरच्या हुकुमास आम्ही भ्यालों असें जे म्हणतात, त्यांचे म्हणणें सर्वथा अर्थशून्य आहे यांत शंका नाही. कलेक्टर साहेबांनी दंडाची भाषा मुळीं केलीच नाहीं. त्यांचा सारा भर सामदामावरच होता. तेव्हा आमच्यावर जर कोणता आरोप असूं शकेल तर आम्ही कलेक्टरचें म्हणणें ऐकलें हें बरे केलें किंवा वाईट केलें एवढ्यापुरताच असू शकेल.

७. आम्ही कलेक्टरचें ऐकिलें तें योग्य केलें असें आमचें प्रामाणिक मत आहे व तसे मत होण्यास कांहीं कारणेंही घडलीं. त्यापैकी जे कारण खरोखरी निर्णायक ठरलें त्याचा आम्ही जसा विचार केला तसा आमच्यावर आरोप करणाऱ्यांनीही केला आहे असें वाटत नाहीं. सत्याग्रह करण्यास महाड मुक्कामी जे १० हजार अस्पृश्य लोक जमा झाले होते त्यांच्या वाटेंत किती कांटे पसरलेले आहेत व ते कोणी पसरलेले आहेत याची कल्पना या लोकांना तशीच ती आम्हालाही होती. सत्याग्रहाची मोहीम सुरू झाल्यापासून कुलाबा जिल्ह्यांतील व रत्नागिरी जिल्ह्यांतील उत्तर भागांतील अस्पृश्य लोकांवर स्पृश्य लोकांचा जो जुलूम चाललेला आहे त्याचें यथार्थ वर्णन करतां येणें आम्हास अशक्य आहे. सत्याग्रहांत कोण भाग घेणार याचीं नांवें नोंदण्यासाठी जशीं माणसें बसविण्यात आली होती तसेंच गांवगांवच्या लोकांच्या तक्रारीची नोंद करून घेण्यासाठींही बसविण्यात आली होती. या तक्रारींच्या नोंदपत्रकांचा भारा चाळून पाहिला तों असें दिसून आलें कीं, असा एकही गांव नाहीं कीं जेथे गरीब बिचाऱ्या अस्पृश्यांवर, ते केवळ आपली उन्नति करून घेत आहेत एवढ्याच कारणामुळें त्यांच्यावर जुलूम झालेला नाहीं. सत्याग्रह केल्यानें होणारा जोरजुलूम द्विगुणित होणार याबद्दल कोणाच्या मनांत शंका नव्हती. परंतु सरकार आमचें संरक्षण करील या भरंवशावर या छळणुकीची आम्ही मुळीच तमा केली नव्हती. सरकारची मदत आहे तोंपर्यंत स्पृश्य लोकांच्या जांचणुकीचें भय बाळगण्याचे आम्हास कारण नव्हतें. परंतु कलेक्टरनें उलट खाल्ल्यामुळें अस्पृश्य जनतेस स्पृश्य जनतेच्या जुलूमापासून बचावण्यास अवश्य असणारें सरकारी संरक्षण पूर्णपणें मिळेल किंवा नाहीं याबद्दल साहजिकपणें शंका उत्पन्न झाली.

८. ही शंका बलवतर होण्यास दुसराहि एक विचार कारणीभूत झाला. सत्याग्रह करावयाचा तो दुराग्रहाविरूद्ध करावयाचा. अर्थात कलेक्टरचें म्हणणें धुडकावून सत्याग्रह करण्यापूर्वी कलेक्टरचा दुराग्रह आहे, याची खात्री करून घेणे प्राप्त होतें. सरकार झालें म्हणून त्याच्याविरूद्ध सत्याग्रह करताना कसलाच विचार करूं नये अशा अर्थाचे जे आमच्या मित्राचे म्हणणे आहे तें आम्हास मुळीच पटत नाहीं. नव्हे ते कोणाही सत्याग्रही माणसास पटणार नाहीं. ज्याला ज्याला म्हणून या प्रकरणाची पूर्ण माहिती आहे त्याला त्याला कलेक्टरचा दूराग्रह नव्हता असेंच म्हणावे लागेल. कोर्टात प्रकरण जाण्यापूर्वी आपण अस्पृश्य लोकांस तळ्यावर जाण्यास हरकत करणार नाहीं, उलट तुम्ही जर त्यांना हरकत कराल तर तुमचा मी बंदोबस्त करीन, असें महाडच्या स्पृश्य लोकांस कलेक्टरनें बजाविलें होतें. शिवाय भरसभेंत येऊन आपण तुमच्याविरूद्ध नाहीं, अशी त्यांनी अस्पृश्य लोकांपुढे कबुली दिली. इतकेंच नव्हे तर, हें तळें सोडून इतर कोणत्याही सार्वजनिक तळ्यावर सत्याग्रह करा, आपण मदत करावयास तयार आहोंत, असेहीं त्यांनीं स्पष्ट करून सांगितलें. अशा विचाराच्या कलेक्टरांत दुराग्रह आहे, असें कोणी विचारी माणूस म्हणूं शकेल असें आम्हांस वाटत नाहीं. असें असतांना त्यांच्या म्हणण्याविरूद्ध सत्याग्रह केला तर स्पृश्य लोकांच्या जुलुमापासून दाद मागते समयी माझा दुराग्रह नसतां. तुम्ही सत्याग्रह केलात मग केलें तसें भरा, असें म्हणण्यास कलेक्टरला कारण सांपडलें असतें. दुसरें असें कीं सरकारविरूद्ध सत्याग्रह केल्यानें सरकार अस्पृश्यांच्या न्याय्य हक्कांविरूद्ध आहे, असा एक नसता आरोप सरकारवर लादण्यात आला असता. आम्ही नसताच म्हणतों याचें कारण सरकार अस्पृश्यांच्या न्याय्य हक्कांच्या विरूद्ध नाहीं, अशी कलेक्टरांनी दिलेली कबुली, हे होय. अर्थात् सरकारचा अपराध नसतांना त्यास विनाकारण बदनाम केल्यामुळें त्यास चिडविल्यासारखे झालें असतें. इष्ट असलेली गोष्ट करीत नसतांना ठपका दिला तर माणूस लाजतो. पण ती करीत असतांना ठपका दिला तर त्याच माणसाला आपल्याला विनाकारण कलंक लावल्यामुळें त्वेष येतो व बरें करण्याऐवजी तो घात करण्यास प्रवृत्त होतो हा मानसशास्त्राचा अनुभव आहे. अस्पृश्य समाज हा सरकार आणि स्पृश्य वर्ग या दोन्ही दळांच्या तावडींत सापडलेला वर्ग आहे. त्याला दोहोंपैकी कोणत्या तरी एका दळावर मारा करणें शक्य आहे. दोन्ही दळांवर एकाच वेळी मारा करण्याइतकें बळ त्याच्यांत आज नाहीं हें कबूल करण्यांत कांहीं लाज नाहीं. जेथें स्पृश्य जनता, त्यांचे मानवी हक्क स्वखुशीनें व सलोख्यानें देत नाहीं तेथे ते मिळविण्याकरिता सरकारशी तहनामा करणे हेंच अस्पृश्य लोकांच्या हिताच्या दृष्टीनें शहाणपणाचें आहे, असें आम्हास वाटले.

९. महाडची बारडोली[1] केली असें जे मूर्ख बडबडतात त्यांनी ती कां झाली हें समजून घेण्याचे श्रम घेतले असते तर त्यानीं छिद्रान्वेश करण्याऐवजी शरमेनें आपल्या माना खाली घातल्या असत्या. स्पृश्यांच्या सत्याग्रहांत व अस्पृश्यांच्या सत्याग्रहांत जमीन असमानचे अंतर आहे. स्पृश्य लोकांचा सत्याग्रह सरकार विरूद्ध असतो व त्याला सर्व जनतेचा पाठिंबा असतो. असें असताना स्वराज्याचा अट्टाहास करणाऱ्या स्पृश्य लोकांनीं कोणता एखादा सत्याग्रह करण्याची तयारी केल्याचे ऐकीवांत नाहीं. अस्पृश्य लोकांनी सत्याग्रह केला तर त्याला साऱ्या स्पृश्य जनतेचा विरोध असतो. समाजाशी सामना करणे साधे काम नाहीं. असें असतांहि स्पृश्य जनतेच्या विरूद्ध सत्याग्रह करण्याची अस्पृश्य वर्गाने आपली तयारी दाखविली होती. एवढ्या मुळेंच अस्पृश्य लोक कोणाहि समंजस माणसाच्या आदरास पात्र झालें पाहिजेत. तयारी करून चाल करण्याचें त्यांनी थांबविलें तर तें स्पृश्य वर्गाने युद्धाच्या अधर्म पद्धतीचा अवलंब केल्यामुळेच होय. स्पृश्य लोकांनी तुम्ही धर्म युद्ध करावे आणि मग त्यांनीं आमची परीक्षा पाहावी. यावर कांहीं छिद्रान्वेशी लोक असें म्हणण्याचा संभव आहे की, स्पृश्य जनतेकडून जुलूम होणार याची कल्पना सत्याग्रहास जमलेल्या लोकांना पूर्णपणे होती. तो जोर जुलूम सोसण्यास ते जर आपण होऊन तयार झाले होते तर त्यांची काळजी घेण्याचें सोंग तुम्ही कां केलें ? असल्या आक्षेपकांस आमचा असा प्रश्न आहे कीं अनुयायांच्या हिताची काळजी पुढाऱ्यांनीं घेऊं नये तर कोणी घ्यावी ? स्वामीनिष्ठेनें पुष्कळसे लोक आगींत उडी टाकण्यास आपल्या जिवावर उदार होतात. परंतु सेवक आपल्या जिवावर उदार झाला तो स्वखुषीनें झाला आहे तेव्हां आपल्याला काय ? त्याचें तो भोगील, असें मानून आपली जबाबदारी जर त्याचा स्वामी टाळूं म्हणेल तर त्याला लोक अधम म्हणतील. आपल्या जिवावर उदार होणारा सेवक आपला स्वामी अखेरीस आपला बचाव करील अशी आशा धरून असतो हें कोणीहि नाकबूल करणार नाहीं. नाहीं म्हणतां तशी आशा सत्याग्रहास जमलेल्या मंडळीस होती व ती असणे साहजिक आहे. तेव्हां त्यांच्यावरील संकटाचें निवारण करण्याची जबाबदारी जी पुढाऱ्यावर पडावयाची ती कांहीं चुकत नाहीं हें आम्हांस ओळखणें प्राप्त होतें. अशा परिस्थितींत सत्याग्रह करणाऱ्या लोकांना त्यांच्यावर येणाऱ्या संकटात आम्हांला कसें सहाय्य

---

[1] : इंग्रज सरकारने शेतसाऱ्यात अवास्तव वाढ केल्याने बारडोली तालुक्यातील शेतकऱ्यांनी साराबंदीच्या विरोधात सत्याग्रहाची चळवळ उभारली होती. त्याचे नेतृत्त्व वल्लभभाई पटेल यांचेकडे होते. परंतु हिंसक वळण लागू नये म्हणून. गांधींनी ही चळवळ बेमुदत बंद केली होती. बारडोलीच्या सत्याग्रहापासूनच वल्लभभाई पटेलांना सरदार म्हटले जावू लागले होते.

करतां येईल त्याचा विचार करणें भाग पडलें. अत्याचाराचा अवलंब करून संरक्षण करतां येण्यासारखें आहे. पण तो मार्ग पत्करावयाची इच्छा आम्हांस नाहीं. आज तरी आमच्या लोकांचे संरक्षण सनदशीर मार्गानेंच आम्हास साधावयाचें आहे. व त्या करितांच कलेक्टरची मर्जी राखण्याच्या भरीस आम्ही पडलों.

१०. कलेक्टरची मर्जी राखली पण लोकांची निराशा करून, त्यांच्या तेजोभंगास कारणीभूत झालांत असाही कांहीं जणांचा आरोप आहे. अशा रीतीने जो जोम आज लोकांत उत्पन्न झाला होता तो पुढे टिकेल काय अशी पुष्कळांना शंका येते. हें त्यांचें म्हणणें कांही अंशी खरें असू शकेल. पण तें सर्वस्वी खरें असूं शकणार नाहीं. सूर्यास्त झाल्यावर संधिकाल येतो तसेच सत्याग्रह थांबल्यामुळे लोकांचा हुरुप ओसरेल हें खरेंच. तथापि सूर्यास्तापाठी संधिकाल झाला म्हणून पुन्हां केव्हांच सूर्योदय होणार नाही, हें म्हणणें जसें चुकीचें आहे तसेंच आजचा जोम ओसरला म्हणून, त्याचा संचार पुन्हा कधींच व्हावयाचा नाहीं हें म्हणणेहि चुकीचें आहे. शिवाय उत्साह-निरुत्साह यांच्या बाबतींत एक गोष्ट ध्यानात घ्यावयास पाहिजे होती ती ही कीं, ज्याच्यावर प्रसंग नाहीं तो मनुष्य मृतप्राय असतो. कठीण योग आल्याशिवाय माणसाच्या आंगांत चैतन्य उत्पन्न होत नाही. तथापि योगांचे काठिण्य, त्याची दुर्धरता पल्ल्याचे बाहेर गेली म्हणजे देखील माणूस पुनः मृतप्राय होतो. व ती गोष्ट आपणांस असाध्य आहे म्हणून तिचा नाद सोडून निराश होऊन प्रयत्न करण्याचें सोडून देऊन बसतो. सत्याग्रहाची ही जी चळवळ आरंभिलेली होती ती केवळ चवदार तळें काबीज करण्यापूरती आरंभिलेली नव्हती. तर अस्पृश्य लोकांना आपल्यापुढें ठेविलेलें ध्येय पदरांत पडेतोंपर्यंत ती कायम टिकावी या हेतूने ती उभारण्यात आली होती. ती कायम टिकेल किंवा नाहीं हें सत्याग्रहापासून होणारा जुलूम किती मोठा होईल व त्यापासून लोकांचा बचाव करण्याचीं साधनें आहेत किंवा नाहींत यावरच अवलंबून राहणार. महाडचा एक सत्याग्रह लोकांनीं केला असता; पण त्यापासून होणाऱ्या त्रासांतून आपला बचाव होऊं शकत नाहीं, हें जर लोकांना कळलें असतें तर त्यापुढें होणाऱ्या दुसऱ्या कोणत्याहि सत्याग्रहांत भाग घेण्यास ते तयार झाले असते किंवा नाहीं याचा विचार करणे अवश्य आहे. विचारांती ती शंका खरी होण्याचा पुष्कळसा संभव वाटल्यामुळे, अनेक सत्याग्रह करण्याइतका जोम कायम टिकावा म्हणून महाडचा सत्याग्रह तहकूब करणे भाग झाले. आतां कांहीं लोक असें म्हणतील कीं, हें सर्व भविष्य जर तुम्हांस दिसत होतें तर तुम्ही महाडला गेलातच कशाला ? याला आमचें उत्तर असें आहे कीं,

कलेक्टर आमची बाजू सोडील असा संशय आम्हांस दासगांवला पोहोंचेपर्यंत आला नव्हता. दासगांवला जाईतोंपर्यंत फक्त दिवाणी कोर्टाचा तात्पुरता मनाई हुकूम सुटल्याचें आम्हास माहीत होते. परंतु तो मनाई हुकूम मोडण्याचा आम्ही निश्चय केलेला होता. दिवाणी कोर्टाचा मनाई हुकूम मोडल्यांने आम्हांस कोर्टाला सहा सहा महिने शिक्षा करण्याचा अधिकार आहे हें आम्ही जाणून होतों. तथापि ती शिक्षा भोगण्याची आमची तयारी होती. व तसें आम्ही आमच्याकडे चौकशीस आलेल्या अधिकाऱ्यांस अगदीं स्पष्टपणें कळविलें होतें. दिवाणी कोर्टाचा हुकूम मोडल्यामुळें, जे मोडतील ते तुरुंगांत जातील, आपल्याला ह्या भानगडींत पडण्याचे कारण नाहीं असें म्हणून, कलेक्टर त्रयस्थाप्रमाणें स्तब्ध बसेल अशी आमची समजूत होती. व ती समजूत चुकीची आहे असे मानण्यांत कसल्याच प्रकारचें कारण घडलें नाहीं. परंतु अस्पृश्यांची बाजू घेणारा कलेक्टर कोर्टाची इभ्रत राखण्याच्या दृष्टीने स्पृश्यांच्या बाजूचा झाला. व स्पृश्य लोकांच्या जुलुमापासून बचाव करण्यास त्याचें साहाय्य अवश्य असल्यामुळे, त्याचा सल्ला ऐकावा लागला. यावरून आमच्या मित्राला कळेलच कीं, सत्याग्रह थांबला तो तुरूंगात जाण्याच्या भीतीमुळें किंवा कलेक्टरच्या भिडेमुळे थांबला नसून, अस्पृश्य वर्गाचे हिताकरितांच थांबविण्यांत आला. त्यांत स्पृश्य लोकांतील टवाळ कंपूस हंसण्यास जागा झाली असेल. पण स्पृश्य लोकांकडून शाबासकी मिळविण्यासाठीं हें कार्य मुळी आरंभिलेलेंच नव्हते. तें केवळ अस्पृश्यांच्या हित संवर्धनासाठींच आरंभिलेले होतें. तुरुंगात जाण्यानें तें साधलें असतें तर तें करावयास कोणाचीच ना नव्हतीं.

११. आमच्या मित्रांना आमच्या चळवळीस सत्यशोधकी वळण लागेल याचे भय वाटत आहे. सत्यशोधकी चळवळ † म्हणजे ब्राह्मणाचा द्वेष करणारी, राजकारणांत भाग न घेणारी, सरकारच्या नजरेकडे लक्ष ठेवून काम करणारी अशी आजपर्यंतची महाराष्ट्रांतील रुढ कल्पना आहे. व या कल्पनेंत समाविष्ट असलेलें वळण अस्पृश्यांच्या चळवळीस न लागेल अशी खबरदारी घेण्याविषयीं त्यांनी आम्हांस इशारा दिला आहे. आमच्या मित्रास आम्ही असें सुचवितो कीं, आम्हींहि सत्यशोधकीच आहोंत. व त्याबद्दल आम्हांस कोणत्याहि तऱ्हेचा विशाद न वाटता उलट आनंदच वाटतो. सत्यशोधकी चळवळ म्हणजे, समानतेची व सद्धर्माची चळवळ असें आमचें ठाम मत आहे. इतकेंच नव्हे तर दरेक स्वराज्यवाद्यांनें सत्यशोधकीं असलेंच पाहिजे असें आमचें ठाम मत आहे. आमच्या मित्रांनी चालू सत्यशोधकी चळवळीवर जो आरोप केला आहे तो मात्र कांहीं अंशी खरा आहे असे कबूल करणें प्राप्त आहे. परंतु हे वळण या चळवळीस कां लागले याचा

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–३.

विचार आमच्या मित्रांनी जितका करावयास पाहिजे होता तितका केला नाही असे आम्हास म्हणावें लागते. सत्यशोधकी चळवळीला अशा प्रकारचें अनिष्ट वळण लागल्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे ब्राह्मण जातीचा त्या चळवळीस होणारा एकजात विरोध हेंच होय. ब्राह्मण जातींतील कांहीं लोकांनी तरी सत्यशोधकी चळवळीनें आपल्यापुढें मांडलेली समानतेची व सद्धर्माची तत्वें मान्य केली असती तर सत्यशोधकी चळवळीस ब्राह्मण द्वेषाचे भूत लागलें नसतें. किंवा तिच्या प्रसारार्थ तिला सरकारची कांसहि धरावी लागली नसती. अशी परिस्थिति असल्याकारणानें आमच्या मित्रांस आमची अशी सूचना आहे की, त्यांनी सत्यशोधक व्हावें आणि आपल्या जातभाईसहि सत्यशोधक बनविण्याचा प्रयत्न करावा.

● ● ●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ फेब्रुवारी १९२८.

# ७५

## ........ या संस्थांचा उपयोग अस्पृश्यांच्या हितसंवर्धनाकडे होईल किंवा नाही हे प्रतिनिधींच्या लायकीवर व कार्यक्षमतेवर अवलंबून

अस्पृश्य वर्गानें अवश्य असलेले हक्क मिळविण्यासाठीं जसा प्रयत्न करणें आवश्यक आहे तसाच मिळविलेले हक्क उपयोगांत आणण्याचेही प्रयत्न करणें जरूर आहे. पेशवाईकाळी जो राज्यकारभार चालत असे तो एकतंत्री चालत असे. प्रजेचीं सुखदु:खे कोणती याची विचारपूस कोणीच करीत नसे व त्यामुळे दाद मिळणेंही कठीण होत असें. त्यांतल्यात्यांत अस्पृश्य वर्गाची स्थिति तर अत्यंत केविलवाणी अशी असे. पेशवाईतील राज्यकाभारांतील एकतंत्रीपणा जाऊन, ब्रिटिश आमदानींत प्रजासत्ताक राज्यपद्धतीला सुरवात झाली आहे. व त्याप्रमाणें म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डे वगैरे स्थानिक संस्थांना पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें आहे व त्यांच्याकडे शिक्षणासारख्या महत्वाच्या बाबींही सोपवून दिल्या आहेत. या संस्थांचा उपयोग अस्पृश्य वर्गाच्या हितसंवर्धनाकडे होईल किंवा नाहीं हें अस्पृश्य वर्गांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या लायकीवर व कार्यक्षमतेवर पुष्कळ अंशीं अवलंबून राहणार आहे. यास्तव वरील संस्थांत आपले प्रतिनिधी निवडून देतांना अस्पृश्य वर्गाच्या मतदारांनी अत्यंत काळजी घेणें अवश्य आहे. पुणें म्युनिसिपालिटीची निवडणूक अगदीं जवळ आली आहे व तिच्यांत पुण्यांतील असपृश्य वर्गातर्फे दोन प्रतिनिधी निवडून जावयाचे आहेत, या दोन जागांकरिता अनेक उमेदवार आहेत. असें आम्ही ऐकतों. त्यांपैकी सुभेदार घाडगे व रा. पांडुरंग नथूजी राजभोज हे दोघे आहेत. वरील दोन्हीही गृहस्थ म्युनिसिपालिटींत काम करण्यास सर्वतोपरी लायक आहेत याबद्दल आम्हांस मुळींच संशय नाहीं. आम्ही अनुभवानें सांगतों कीं, या दोघांमधील चिकाटी, धाडस व कळकळ वाखाणण्यासारखी आहे. पुण्यांतील अस्पृश्य लोकांनी त्यांनाच निवडून द्यावें अशी आमची आग्रहाची सूचना आहे. सगळ्या जागा महार लोकच आडवतात व मांग लोकांच्या वाट्यास कांहीच येऊं देत नाहींत असा शंखध्वनि करणारे रा. सकट निवडणुकीला उभे राहिले नाहीत याचें आश्चर्य वाटतें. माटेकंपूच्या साहाय्याने म्युनिसिपालिटीच्या स्कूल बोर्डात आपली नेमणूक करून घेण्याचा त्यांचा कावा असावा असा आमचा तर्क आहे. हें जर

खरें असेल तर तसें न होण्याची खबरदारी पुणेंकरांनी आतांपासूनच घ्यावी हें बरें. लायकी नालायकी न पहातां केवळ मातंग समाजाची कोठें तरी वर्णी लावावयाची असेंच जर असेल तर रा. सकटापेक्षां रा. लोखंडे यांना तो मान मिळणें उचित आहे असें आम्हांस वाटतें.

●●●

---

आजकालचे प्रश्न : बहिष्कृत भारत, ता. ३ फेब्रुवारी १९२८.

## ७६
# बहिष्कृत भारताचें ऋण हें लौकिक ऋण नव्हे काय ?

आज बहिष्कृत भारत पत्रास एक वर्ष पुरें झाल्याचें जाहीर करण्यास प्रस्तुतच्या लेखकास आनंद होतो व पुढील अंकापासून पत्राच्या दुसऱ्या वर्षास प्रारंभ होऊन, पहिल्या वर्षाप्रमाणेंच दुसऱ्या वर्षीहि तें सतत प्रसिद्ध होत जाईल अशी त्यास आशा आहे. तुफान झालें असतां आपल्या गलबताची डोलकाठी, शीड, नाळ वगैरे सामान धड आहे किंवा नाहीं, तसेंच गलबतावर जरूर तेवढे खलाशी आहेत किंवा नाहींत याची चांगली चौकशी केल्याशिवाय कोणताही नावाडी भर दर्यात आपलें गलबत हाकारीत नाहीं. बहिष्कृत भारताच्या झंझावातानें महाराष्ट्रांतील हिंदूसमाजांत एकप्रकारचें तुफान झालें आहें हें कोणासच सांगण्याची जरूरी नाहीं. मग अशा तुफानांत आपल्याजवळ सर्व साहित्य आहे किंवा नाहीं याची पूर्ण चौकशी केल्याशिवाय सदरहु वर्तमान पत्राच्या कर्णधारकत्वाचें काम प्रस्तुतच्या लेखकानें तरी कसें हाती घ्यावें? यास्तव पहिल्या वर्षाच्या अखेरीस व दुसऱ्या वर्षाचा प्रारंभ होण्यापूर्वी

**बहिष्कृत भारताच्या परिस्थितीचें सिंहावलोकन**

करून तिचा नक्शा बहिष्कृत वर्गापुढें मांडून त्यासंबंधी बहिष्कृत वर्गाचें कर्तव्यकर्म कोणतें याची त्यास जाणीव करून देणें प्रस्तुतच्या लेखकांस अगत्याचें वाटतें.

बहिष्कृत भारताची सांप्रतची अवस्था अत्यंत शोचनीय आहें हे जाहीर करण्यास प्रस्तुतच्या लेखकास मोठे कष्ट वाटतात. खर्चाचा व मिळकतीचा आढावा काढला असतांना आजमितीस बहिष्कृत भारतावर कर्जाचा ५०० रुपयांचा बोजा चढला आहे. खरें म्हटले असतां, बहिष्कृत भारताची अशी शोचनीय स्थिती होऊं नये. कोणतेंही पत्र घेतलें तरी त्यांच्यासाठीं संपादकाच्या व्यवस्थापकाच्या व त्यांच्या हाताखालील कामधंदा करणाऱ्या शिपाई प्याद्यांच्या पगारांचे तगाद्यावर तगादे असतात. मोठमोठी समाजकार्ये घडवून आणण्याच्या पवित्र उद्देशाने प्रस्थःपित करण्यात आलेल्या पत्रांचीही या तगाद्यापासून सुटका झालेली नाही. परंतु यास बहिष्कृत भारत एक अपवाद आहे असे म्हटले असतां त्यास प्रत्यवाय येईल असे मुळीच वाटत नाहीं. बहिष्कृत भारताच्या संपादकास अथवा त्यांच्या व्यवस्थापकास त्यांनी वर्षभर जी दगदग सोसली व जी मेहनत घेतली, त्याबद्दल

त्यांना एक पैचाहि मोबदला देण्यांत आला नाहीं. छपाई व टपाल याशिवाय बहिष्कृत भारताच्या संबंधांत खर्चाच्या काय त्या दोनच बाबी होत्या. एक कचेरीचें भाडें व दुसरें एका नोकराचें वेतन. पण या दोहींचा मिळून झालेला खर्च इतका क्षुल्लक आहे कीं, तो जमेस धरण्यासारखा नाहीं असें कोणीही म्हणेल. साऱ्या वर्षांत कचेरीचें भाडें २०५ रु. ८ आणे झाले व शिपायाच्या पगाराच्या खाती फक्त ९८ रुपयेच पडले आहेत. यावरून बहिष्कृत भारताइतके काटकसरीनें चालविलेलें दुसरें पत्र महाराष्ट्रांत नाहीं याबद्दल शंका घेणें अशक्य आहें. असें असतानांहि एका वर्षांचें आंत बहिष्कृत भारतावर पाचशें रुपयेपर्यंत कर्ज झाले आहे व आहे तीच परिस्थिति जर राहिली तर हा कर्जाचा डोंगर वर्षों-वर्षी वाढत जाणार आहें. व तसा जर तो वाढत गेला तर बहिष्कृत भारत बंद करावें लागेल किंवा त्याची बूड भरून निघेल अशी कांहीतरी कायमची व्यवस्था करावी लागेल.

प्रचलित हिंदु धर्माच्या अतिघोर अन्यायास्तव आपल्या समाजास अस्पृश्यमानण्याचें महापातक विश्वजनक प्रभूला न जुमानता करणारे कोट्यावधि अविवेकी जन जोंपर्यंत या हिंदभूमीवर कायम राहाणार तोपर्यंत हा अस्पृश्य समाज निष्कृष्ट स्थितिमध्यें खितपत पडणार आहे, हें कोणांस सांगावयास नको. या स्वार्थिपणाच्या अन्यायामुळें बहिष्कृत मानलेला एवढा मोठा जनसमूह सामाजिक, राजकीय व आर्थिक दृष्ट्या कल्पनातीत प्रमाणांत कसा अधोगतीस गेला आहे हे सर्व लोक जाणून आहेतच. इंग्रज सरकारच्या अमदानींत कोणाच्याहि मानवी हक्कांची जाणूनबुजून पायमल्ली केली जात नाही; सर्वांना सारख्या प्रमाणांत विद्येची द्वारें खुली आहेत; त्याचप्रमाणें सर्वांना सार्वजनिक साधनांचा सारखा उपयोग करून घेण्यास मनाई नाहीं, असें जरी सर्वत्र सांगण्यांत येते तरी त्यास तेथील सामाजिक परिस्थितीस अनुसरून वागावें लागत असल्यामुळें बहिष्कृत वर्गातील लोकांस इंग्रजी राज्यांत देखील या देशांतील अमानुष आचाराविचारामुळें अगदीं हलक्या सलक्या मानवी हक्कांस पदोपदीं मुकावें लागत आहें. अशा बिकट परिस्थितीत आमच्या बहिष्कृत समाजानें एखाद्या हवालदीलाप्रमाणें नशीब म्हणून स्वस्थ बसण्याचा आत्मघातकीपणा करण्याऐवजी आपले मानवी हक्क आपण ओळखून ते प्राप्त करून घेण्यास ब्रिटिश सरकारच्या साम्राज्य छत्राखाली एक दिलानें व जोमानें अविश्रांत श्रम करण्यास त्यानी निरंतर तयार असले पाहिजे हें निर्विवाद आहें. तशा प्रकारचा जोम व ऐक्य उत्पन्न होण्यास बहिष्कृत समाजांस जागरूक करण्याचें काम अव्याहत चालू ठेवलेंच पाहिजे. त्याशिवाय त्यांना त्यांच्या खालावलेल्या स्थितीची जाणीव पटणार नाहीं. तसेच शिक्षणाच्या

बाबतीत त्यांना कोणकोणत्या अडचणी येतात, सरकारी नोकरीत त्यांचा शिरकाव होतो किंवा नाहीं, पडीक व फोरेस्ट जमिनी त्यांना मिळतात किंवा नाही, या गोष्टी सरकारच्या कानावर घातल्याखेरीज त्या बाबतीत योग्य ती दाद लागणार नाहीं. महारकीचा प्रश्न, सार्वजनिक तळी व देवालयें यातींल अस्पृश्यतेचा प्रश्न यांना आतांसें कोठें तोंड लागलें आहे. या बाबतीत सरकार व स्पृश्य जनता यांच्या पुढें बहिष्कृत वर्गाचे काय मत आहे हें वारंवार मांडून त्यावरील आक्षेपांचें खंडन करीत राहिलें तरच इष्ट तो परिणाम घडून येईल; परंतु तो परिणाम घडवून आणण्यासाठी बहिष्कृत भारतासारखे एकादे निर्भीड वर्तमानपत्र असल्याशिवाय भागणार नाहीं. वरील विवेचनावरून बहिष्कृत समाजास बहिष्कृत भारताची किती आवश्यकता आहे हें उघड होईलच. ते बंद झालें तरी हरकत नाहीं असा कोणी शहाणा माणूस म्हणेल अशी कल्पनासुद्धां करवत नाही. बहिष्कृत भारत हें चालवलेंच पाहिजे असे जर आहे, तर त्याची बूड भरुन निघेल अशी कांहीं तरी

## कायमची व्यवस्था करणें प्राप्त आहे.

बहिष्कृत भारताची बूड दोन प्रकारें भरुन काढता येण्यासारखी आहें. त्यांपैकी वर्गणीदारांची वाढ करणें हा एक प्रकार आहें.

बहिष्कृत भारतास वर्गणीदारांची उणीव पडण्याचें कारण काय असावें याचा प्रस्तुतच्या लेखकास समज पडत नाहीं. एक गोष्ट खरी आहे कीं, बहिष्कृत भारत वेळेवर निघत नाहीं. व निघालें तर वेळेवर वर्गणीदारांच्या हाती पडत नाहीं. हा आरोप जरी प्रस्तुतच्या लेखकांस कबूल करणें प्राप्त आहे, तथापि तो बुद्धिपुरःसर किंवा आळसामुळें घडलेला आहे असा कोणीही आपला समज करून घेऊ नये. इतर वर्तमान पत्रांच्या संपादकास दुय्यम संपादकाची व बाहेरच्या लेखकांची जोड असते व त्यामुळें यांच्या बाबतींत श्रमविभाग होऊन, लेखनाचें काम वेळच्या वेळेवर होऊं शकतें. तसेंच व्यवस्थापकाचें काम पाहणारा माणूस पगारी नोकर असल्याकारणानें त्यास त्याचें नियमित काम पाहण्याशिवाय दुसरें कांहीच करावयाचें नसल्यामुळे, त्याच्या हातून पत्राची व्यवस्था ठेवण्याचें काम बिनचूक व्हावें हें अगदी साहजिक आहे. बहिष्कृत भारताची स्थिति अशा प्रकारची असती तर त्याच्याहि बाबतीत नियमितपणा, व्यवस्थितपणा यांच्या दृष्टीने जे दोष घडले आहेत ते दोष घडले नसतें. प्रस्तुतच्या लेखकास सांगणे प्राप्त आहे कीं बहिष्कृत भारताच्या संपादकास मदत करण्यास दुय्यम संपादक ठेवण्याइतकी पत्राची सांपत्तिक स्थिति नव्हती. तसेंच बिनमोली संपादकी काम

करण्यास स्वार्थत्यागी असा अस्पृश्यांतील माणूसही लाभला नाही. बहिष्कृत भारताच्या संपादकाच्या प्रौढ लिखाणास दबून गेल्यामुळे म्हणा, किंवा सार्वजनिक कार्याविषयीं चढचढ वाटली नसल्यामुळें म्हणा बाहेरच्या लेखकांचा त्यास मिळावा तितका पाठिंबा मिळाला नाहीं. अशा परिस्थितीत बहिष्कृत भारताचे २४/२४ रकानें लिहून काढण्याची सारी जबाबदारी एकट्या संपादकास घ्यावी लागली. बहिष्कृत भारताच्या संपादकाच्या पाठीं पोटाचा धंदा आहेच. इतकेंच नव्हे तर बहिष्कृत हितकारिणी सभेसारख्या सार्वजनिक संस्थेचे वाढतें कामही त्यासच पहावें लागत आहे. हे सर्व सांभाळून त्याला संपादकाचें काम करावयाचें असतें. तें काम त्याच्या हातून ठराविक वेळीं जर झालें नाहीं, तर त्या दोषाबद्दल वाचकांनी त्यास क्षमा करणें प्राप्त आहें. बहिष्कृत भारताचा व्यवस्थापकही कांहीं पगारी नोकर नव्हे. तोही पोटाचा धंदा संभाळून फावल्या वेळांत पत्राची व्यवस्था पाहत असतो. त्याला जर पत्राच्या अनेक भानगडींची विल्हेवाट वेळच्या वेळीं करतां आली नाहीं तर तो दोष त्याचा आहे किंवा परिस्थितीचा आहे याचाही विचार वाचकांनी करणें जरूर आहे. एवढ्यानें ज्या आक्षेपकांचें समाधान होत नाही त्यांना असें विचारणें प्राप्त आहे कीं, अनियमितपणामुळें जें नुकसान झालें असेल तें भरुन निघण्यासारखें बहिष्कृत भारतांत कांहींच नव्हतें काय? बहिष्कृत भारत वेळेवर निघालें नसेल. पण आठ पानांचे पत्र काढून, चार पानें जाहिरातीला खर्ची घातल्याची पद्धत बहिष्कृत भारतानें स्विकारली होती काय? किंवा बहिष्कृत भारताचे रकाने सोडचिठ्ठ्यांच्या नोटिसानीं, किंवा गटारगप्पानीं भरून काढलेले आहेत काय ? प्रस्तुतच्या लेखकांस सांगण्यास अभिमान वाटतो कीं, बहिष्कृत भारतानें आपली आठचीं आठ पानें वर्गणीदारांस समर्पण केली आहेत. बऱ्यावाईट जाहिरातींचा त्याला विटाळसुद्धां होऊं दिला नाहीं. त्यातील मजकूर मोठमोठीं हेडिंगें देऊन, ओळी ओळीत जागा सोडून, होता होईल तितका कमी करण्याचा अंगचोरपणा केलेला नाहीं. लिखाणांच्या दर्जाच्या दृष्टीनें जर पाहिलें तर बहिष्कृत भारत टाकाऊ पत्र आहे असें केंव्हांही म्हणतां यावयाचें नाहीं. महाराष्ट्रांत जीं कांहीं वाखाणलेली पत्रें आहेत त्या पत्रांपैकीं बहिष्कृत भारत हें एक आहे. हें प्रस्तूतच्या लेखकांस स्वतः सांगण्याचें कांहीं कारण नाही. या पत्राचा दर्जा किती मोठा आहे यांतील लेख किती भारदस्त व उद्बोधक असतात याची ग्वाही इतर वृत्तपत्रकारांनी यापूर्वीच दिलेली आहे. असे असतांना पत्राच्या अनियमितपणाचें वैगुण्य हें वर्गणीदारांच्या पडलेल्या तुटवड्याचें कारण आहे. यावर प्रस्तूतच्या लेखकाचा भरंवसा बसू शकत नाहीं. बहिष्कृत भारताच्या शोचनीय स्थितीचें बहिष्कृत वर्गात अजूनही असलेली

## समाजकार्याबद्दलची अनास्था

हेच मुख्य कारण आहे. ती अनास्था जर नसती तर बहिष्कृत भारतास तोटा येण्याऐवजी तें किमयेचें साधन झालें असतें. अस्पृश्य समाज केवढा तरी अफाट आहे. एवढ्या एका पत्राशिवाय त्यांच्या हितानुहिताची चर्चा करणारे व त्यांच्याचपैकी एकानें चालविलेलें दरेक गांवच्या अस्पृश्य लोकांनीं समाईकपणें गांवगन्ना एकेक अंक घेण्यास कांही हरकत नव्हती. पण प्रस्तुतच्या लेखकाची आशा मुळापासूनच अगदी लहान होती. अस्पृश्य समाज हा अज्ञ लोकांचा समाज आहें. त्यांच्यातून पुष्कळसा मोठा वाचकवर्ग सापडणें कठीण आहें. याची जाणीव प्रस्तूतच्या लेखकास होतीच. तथापि त्यांस एवढा भरवंसा होता कीं, निदान अस्पृश्य वर्गातील सुशिक्षित असा जो शिक्षक वर्ग तो तरी या पत्राला आपला पूर्ण आश्रय देईल व तसा आश्रय देण्याचा त्यानें जर निश्चय केला असता, तर बहिष्कृत भारत किमयेचें साधन झालें नसतें तरी त्याला तूट आली नसती हें निर्विवाद आहे. परंतू बहिष्कृत वर्गाच्या दुर्दैवानें त्यांच्यातूनच उत्पन्न झालेला हा शिक्षक वर्ग आपल्या कर्तव्याला जागला नाहीं. अस्पृश्य शिक्षकांतील शेकडा ७५ लोक अजूनही बहिष्कृत भारताचे वर्गणीदार नाहींत. व जे आहेत त्यांची वागणूक स्वत:साठीं कमाई करण्याच्या हेतूनें काढलेल्या पत्राशीं जशी असावी तशी असते. एका शिक्षकानें पत्र घेतलें. काही अंक गेल्यानंतर दस्तुरप्रमाणे त्याला ३ रु. ४ आण्यांची व्ही. पी. करण्यात आली. तिचा त्यानें त्या वेळीं स्वीकार केला नाहीं. पुढें त्यानेंच २ रु. १४ आण्यांची मनिऑर्डर केली, व लिहिलें कीं, ३ रुपये वर्गणीपैकी २ आणे मनिऑर्डरीचा खर्च कापून घेतला आहे. तरी पत्र चालू करावें. खरे म्हटले असतां या गृहस्थानें झालेला खर्च भरून काढण्यासाठी, ३ रु. ४ आ. ची मनिऑर्डर पाठवावयास पाहिजे होतीं. परंतु तसें न करता ६ आण्याची खोट दिल्याबद्दल तक्रार करण्यात आली. तेव्हां त्यानें खालील आशयाचे पत्र लिहून पाठविलें.

" कृतानेक साष्टांग नमस्कार वि. वि. ( परमेश्वरानें मला स्वार्थ बुद्धि दिलीच नाहीं ) मी आपणास जोडकार्ड पाठविलें होतें. त्यावर आणखी ।=* पाठवा म्हणजे अंक सुरू करूं. मी ।= ची तिकिटे पाठविण्यास तयार आहें. पण आपण एवढे थोर गृहस्थ असून आमचा आपणास बिलकूल विश्वास नाहीं. अहो मेहेरबान, मी जगबुडव्या नव्हें. मि. ×× शेंकडों लोकांची वर्गणी घेऊन बुडविली. तसेंच ×× यांनींही आमची वर्गणी बुडविलीं. तसेंच ×× यांनीहीं आमची वर्गणी बुडविली पण आम्ही तिकडे कानाडोळा'ही केला नाही. पण आपण

* सहा आणे.

नुसते ।= वर आणून माझा अंक बंद पाडला. पुष्कळ पत्रकर्त्यांनीं माझे पैसे बुडविले, पण मी कोणाची नुसती १ पै सुद्धां डुबविली नाहीं. या ।= नीं माझा कोणता झेंडा लागेल. समाजहित व्हावें पण स्वार्थ नसावा असें माझे मत आहे.'' परंतु कांहीं वर्गणीदारांची वागणूक इतकी नाठाळ होती कीं, वरील प्रकारच्या खट्याळ वर्गणीदारास मला म्हणावेसें वाटतें. जवळ जवळ चारशें लोकांनी वर्गणीदार होऊन, नऊ दहा अंक घेतले व व्ही. पी. च्या वेळीं ती नाकारून व्ही. पी. च्या खर्चाचा तसेंच मागील अंकांच्या खर्चाचा बोजा पत्रावर बसविला. खरें म्हटलें असतां या बेजबाबदार वर्तनास कसलेंच कारण नव्हतें. ज्यांच्या ज्यांच्यांकडे बहिष्कृत भारत पाठविण्यात आलें, त्यांना त्यांना, पहिल्याच अंकात अशी सूचना करण्यात आली होती कीं, ''आपण वर्गणीदार व्हाल या आशेने सदरील अंक आपल्याकडे पाठविण्यात आला आहे. आपणास वर्गणीदार व्हावयाचें नसेल तर उलट टपालीं कळवावें. जर आपणांकडून कांहींच लिहून आलें नाही तर आपण वर्गणीदार आहां असें समजून अंक चालू ठेवण्यात येईल.'' परंतु दाभोळी चांभाराचे हिताकरितां जुन्या दमानें सामाजिक चळवळीच्या नव्या क्रीडांगणावर उतरलेले प्रसिद्ध क्रिकेटपटु रा. बाळू बाबाजी पालवणकर यांच्याशिवाय दुसऱ्या कोणीही लेभागुपणा करणाऱ्या वर्गणीदारानें या सूचनेचा विचार केला नाहीं. त्यांनीं मात्र लगेंच कळविले की, ''आपले पत्र आमच्याकडे पाठवूं नये.'' त्याबद्दल आम्हाला जरी आश्चर्य वाटलें, तरी विशाद वाटला नाहीं. कारण त्यांनी निदान नसत्या खर्चापासून आम्हांस वांचविण्याची मेहेरबानी केलीं. तशीच मेहेरबानी इतरांनीं केली असती तर त्यांत कांहीं त्यांचे वेचलें नसते. आमच्या खट्याळ व नाटाळ वर्गणीदारांनीं व इतर आश्रयदात्यांनीं लक्षात ठेवावयास पाहिजे कीं, बहिष्कृत भारताची संपादकी हा इतर पत्रांच्या संपादकीप्रमाणें पैसे कमविण्याचा धंदा नसून, ही लोकजागृतीकरतां घेतलेली स्वयं दिक्षा होय. अशा लोकसेवेंत दिक्षीत झालेल्या इसमानें काढलेल्या पत्रास अशा कांटेकोरपणानें वागविणें अनुदारपणाचें आहे.

अशा प्रकारचा अनुदारपणा व अनावस्था ज्या शिक्षक वर्गांतून दिसून येते त्या शिक्षक वर्गांतून बहिष्कृत भारतास पुरेसे वर्गणीदार मिळतील अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. वाचकांची वाढ होण्याच्या बाबतींत निराशाजनक स्थिती असल्यामुळें, बहिष्कृत भारताच्या बुडीच्या निवारणार्थ दुसरी कोणती तरी कायमची योजना करणें प्राप्त आहे व ती योजना आजच्या अंकात बहिष्कृत वर्गांपुढे मांडावयाची आहे. ती योजना म्हणजे बहिष्कृत भारतासाठी एक स्वतःचा छापखाना काढणें

ही होय. ही

## छापखान्याची योजना

अमलांत आणण्यांसाठी चाळीस हजार रुपयांची जमवाजमव करणें अवश्य आहे. ही रक्कम दिसावयाला फार मोठी दिसतें. पण अस्पृश्य वर्गांच्या लोक संख्येच्या मानाने कांहींच नाहीं असेच म्हटलें पाहिजे. एकट्या मुंबई शहरांत महार जातीची एक लाखाची वसती आहे. पुणे, सोलापूर वगैरे ठिकाणीं कांहीं नाहीं तरी त्याच जातींची वीस वीस हजार लोकांची आहे, या सर्व लोकांनी डोईपटी म्हणून या कामीं एकदांच एक रुपया देण्याचा संकल्प केला तर १ लाख ४० हजार रुपयांचा फंड गोळा होऊं शकतो. त्यांत जर सर्व अस्पृश्य जातींचा समावेश केला तर याच्या दुपटीनें रक्कम गोळा होऊं शकेल. शहरांची गोष्ट सोडून खेडेगांवांतील लोकांची गोष्ट घेतली तर आज मराठी भाषा बोलणारे मुंबई इलाख्यांत १० जिल्हे आहेत. दरेक जिल्ह्यांत १०।१० तालुके, व दरेक तालुक्यांत १००।१०० गांवें धरली, व दरेक गांवांनीं १०।१० रुपये मदत देण्याचें ठरविलें तर सहजासहजीं एक लाख रुपये या कार्याकरिता गोळा होऊ शकतात. आणि १० हजार गांवांपैकी, निम्म्या गांवांनीं जरी या कार्यास मदत केली तरीदेखील ५० हजार रुपये जमण्यास कठीण पडणार नाहीं. येवढा मोठा छापखाना कशाला असा कांही लोक प्रश्न करतील. त्यांनीं हें ध्यानांत धरावें कीं, छापखाना जो काढावयाचा आहे तो पत्रासाठी काढावयाचा आहे. पत्रापुरता छापखाना काढावयांचा झाल्यास पांच हजार रुपयाच्या आत बाहेर निघूं शकेंल. पण त्याचा उपयोग काय ? आपले पत्र आपल्याच छापखान्यांतून निघावें यांत विषेश फायदा नसून पत्राच्या दगदगीबरोबर छापखान्याची दगदग निष्कारण अंगावर पडणार आहे. प्रस्तुतच्या लेखकानें छापखाना काढावयाचे जें ठरविलें आहे तें छापखान्यातून नफा मिळून बहिष्कृत भारताला येणारी बूड भरून काढतां यावीं या हेतूनें ठरविले आहे. छापखान्याचा खर्च भागून फायदा पडावयाचा तर छापखाना मोठाच असावयाला पाहिजे. लहान प्रमाणात छापखाना काढून फायद्यापेक्षां त्रासच होणार आहें आणि म्हणूनच एवढ्या मोठ्या प्रमाणांत छापखाना काढण्याचे प्रस्तुतच्या लेखकानें ठरविलें. फंड म्हटला कीं, कांहीं लोंक बिचकतात. लुच्चे लोक फंड काढतात व गिळंकृत करतात हें खरें परंतु लुच्चे लोक फंड काढतात म्हणून फंड काढणारें सारेच लुच्चे असतात असें कोणी मानूं नयें. ह्या फंडांतून उभारला जाणारा छापखाना स्वतःच्या मालकीचा करण्याचा नाहीं हें जाहिर करणें प्रस्तुतच्या लेखकास अवश्य वाटतें. त्या छापखान्यापासून होणारे उत्पन्न बहिष्कृत भारताची बूड भरून काढण्याकडें व उरलेली किफायत सार्वजनिक कार्याकडे खर्च करण्याचा त्याचा संकल्प आहे. तेंव्हा ही केवळ

स्वार्थपरायणतेची टुम आहे असा कोणीही आपला ग्रह करून घेऊं नयें. निदान प्रस्तूतच्या लेखकाबद्दल तसा संशय कोणी घेणार नाही अशीं त्याची उमेद आहे. फंड काढणारा इसम प्रमाणिक आहे किंवा अप्रामाणिक आहे, त्यानें आरंभिलेले कार्य हितकारक आहें, किंवा अहितकारक आहे याचा विचार केल्याशिवाय कोणत्याही फंडाला मदत करावयाची नाहीं अशी दृष्टीं ठेवणें अगदीं योग्य आहे. परंतु लुच्चे लोक फंड काढतात येवढ्याच गोष्टी पुढें करून चांगल्या कार्याला व प्रामाणिक लोकांनांहि मदत न करणाऱ्या कृपणांना सांगितले पाहिजें कीं, उघडपणें फंड न काढतां समाज कार्याचा आव घालणारे लोक एक तर नादान असले पाहिजेत, किंवा संभावित चोर तरी असले पाहिजेत. कोणत्याहि सार्वजनिक् कार्याला फंडाची आवश्यकता ही असतेच.

**सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलः**

कोणताही यज्ञ करावयाचा झाला तर त्याकरितां आधीं तांदुळाची जरूरी पडतें हें जितकें खरें आहें तितकेंच सार्वजनिक कार्याला पैशाची जरूरी असतें हें खरें आहें. पाण्यावाचून वृक्ष नाहीं. पैशावाचून कार्य नाहीं. कार्य करण्याचा त्याचा निश्चय असल्यामुळें फंडाची योजना जनतेपुढे मांडण्यात प्रस्तुतच्या लेखकाने कसली भीड धरलीं नाहीं.

प्रश्न एवढाच आहे कीं, ज्यांच्यासाठीं येवढी खटाटोप चाललीं आहें ते लोक या कार्यांत अवश्य तो स्वार्थत्याग करण्यास तयार आहेत काय ?

मनुष्य जन्मतांच चार ऋणें पाठीवर घेऊन जन्मलेला आहे, अशी हिंदु धर्माच्या लोकांची पूर्वापार समजत आहे.

**ऋणैश्चतुर्भिः संयुक्ता जायन्ते मानवा भुवि ।**
**पितृदेवर्षिमनृजैर्देयं तेभ्यश्च धर्मतः ॥**

असें महाभारत सांगितले आहे. त्याप्रमाणें दरेंक माणूस पितृऋण, देवऋण, ऋषिऋण व मानव म्हणजे लौकिक ऋण अशीं चार ऋणें आपल्या पाठीवर घेऊन जन्माला येतो. व तीं ऋणें मनुष्य मात्रांनी कोणकोणत्या पद्धतीने फेडावी हे देखील वरील श्लोकाच्या उत्तरार्धात सांगितले आहे.

**यज्ञैस्तु देवान् प्रीणाति स्वाध्यायतपसा मुनीन् ।**
**पुत्रैःश्राद्धैःपितृश्चापि आनृशंस्येन मानवान् ॥**

देवऋण फेडण्यास यज्ञ करावा, ऋषीचे ऋण वेदाभ्यास करुन फेडावे, श्राद्ध करून बापाचे ऋण फिटते व लौकिक ऋण फेडण्यास माणसाने भूतदयेचा अवलंब

करावा. या सर्व ऋणांत, लौकिक ऋण अत्यंत श्रेष्ठ आहे इतकें कीं, देवऋण फेडलें नाहीं तरी चालेल कारण त्यामुळे देवाचा कोप होऊन तो आपला नाश करील इतकी शक्ति बिचाऱ्या हिंदु दैवतात उरली नाहीं. ऋषिं ऋण फेडलें नाही तरीही चालेल, कारण वेदाभ्यासावांचून आज कोणाचे काहीं नडत नाही. बाईच्या रेड्डी शास्त्र्यासारखे लोक ज्यांच्या पिढ्यान्‌पिढ्या वेदाभ्यासांत गेल्या अशा भिक्षुकांनाहि आपल्या मुलांना आर्यांचे वेद शिकविण्याऐवजी इंग्रजांचे वेद शिकविले, पितृऋण घालण्यासाठीं श्राद्ध जरी केले नाही तरीही त्यात वाईट होण्यासारखे कांहीच नाहीं. मृत्यूनंतर आत्म्याची गति कोणती याबद्दल अजूनही शंका आहे. अशा स्थितींत श्राद्धाने पितृतर्पण होईलच हे खात्रीनें कोणासच सांगतां यावयाचें नाहीं. परंतु

## लौकीक ऋण हें दरेकास फेडलेंच पाहिजे

त्याशिवाय गत्यंतर नाही. लौकिकऋणाची फेड ही जितकी पुण्यप्रद गोष्ट आहे तितकीच ती स्वहिताच्या दृष्टीनेहीं अवश्य आहे. ज्या ज्या मनुष्याला बुद्धि धन व सामर्थ्य हीं प्राप्त झालेलीं असतात त्या त्या माणसाने या साधनांचा उपयोग कसा करावा त्याचे नियमही धर्मानें घालून दिलेलें आहेत. त्या नियमानुसार त्यांनी आपल्या बुद्धीचा, धनाचा व सामर्थ्यांचा उपयोग निर्बुद्धास बोध देण्याकडे, अधनिकास सुख देण्याकडे, व निर्बलाचे संरक्षण करण्याकडे खर्च करणें यांतच खरें पुण्य आहें ; असे धर्मांत सांगितलेले आहे. व आज जगांत त्याच भावनेने पुष्कळसे परोपकाराचे काम होत आहे. परंतु परोपकारापासून पुण्य प्राप्त होते येवढ्यामुळेंच लौकिकाचीं कामें करावीत असें नाहीं. तर त्यापासून स्वहित साधतें म्हणूनहीं ती करणें प्राप्त आहे. समाजाच्या सुधारणेखेरीज व्यक्तिमात्राची सुधारणा होणें शक्य नाहीं. व्यक्तीच्या आजूबाजूचे नैतिक वातावरण जर दूषित झालेलें असेल, तर व्यक्तिमात्राला पावित्र्य व उन्नति कशी करून घेतां येईल ? मनुष्याला समाजाबरोबरचा आपला संबंध तोडतां येत नाहीं, त्याला आपले आयुष्य आपल्या बांधवातच काढावे लागतें. त्याचा जीवनक्रम त्यांच्यामुळें त्याला चालवता येतो व त्यांच्यामध्येंच तो आपल्या जीवनाचा व्यय करतो. असे असल्यामुळे त्याला आपल्या भोंवतालच्या परिस्थितीचें परिणाम भोगावे लागतात. आणि जोपर्यंत त्याच्या बांधवांच्यां परिस्थितीची उन्नत अवस्था झाली नाहीं तोपर्यंत त्याला तें टाळता येत नाहीं. ऐहिक परिस्थितीसंबंधाने विचार करतांही असेंच दिसेल कीं, सर्वांच्या अभ्युदयाशिवाय कोणाही एकाची ऐहिक स्थिती सुधारणे शक्य नाहीं. जेथें साऱ्या व्यक्ति दारिद्र्यांत खितपत पडल्या आहेंत तेथे कोणाला श्रीमंती प्राप्त होऊ शकेल ? यास्तव एक गोष्ट उघड आहे

कीं, परोपकार करावयाचा तो केवळ पुण्याचा मार्ग म्हणून करावयाचा नसून, तो आत्मोन्नतीचा मार्ग आहे म्हणूनहीं पत्करला पाहिजें. या लौकिक ऋणाची फेड करणे कां आवश्यक आहे हे एकदां समजलें म्हणजें समाजाचीं दशा आणि लौकिक ऋणाचा बोजा यांचें प्रमाण व्यस्त कां असलें पाहिजें हेही ध्यानात येईल. जितकी समाजाची अवनत दशा झाली असेल, त्या मानानें त्यातील व्यक्तींवरील लौकिक ऋणाचा भारही फार मोठा असला पाहिजे. त्याशिवाय समाज वर येणें शक्य नाही. उलटपक्षी जितकी समाजाची दशा उर्जित असेल त्या मानानें त्यातील व्यक्तिवरील लौकिक ऋणाचा भार कमीं झाला पाहिजे. परंतु आश्चर्याची गोष्ट हीं कीं, या लौकिक ऋणाची कल्पना जितकी ब्राह्मण समाजात रुजलेली आहे तितकी अस्पृश्य समाजांत रुजलेली नाहीं. ब्राह्मण वर्ग हा कांही खालावलेल्या लोकांचा वर्ग नव्हें. त्यातील दरेक व्यक्ति आपले स्वत:चे हित रक्षण करण्यास शिक्षणानें व द्रव्यानें सामर्थ्यवान आहे. कांहीं झालें तरी ब्राह्मण भिक्षुकी करून पोट भरण्यास धर्माने मोकळा असल्याकारणानें ब्राह्मण जात अवनत होण्यांचे भय नाही व म्हणूनच कीं काय

**जाय मानो वय ब्राम्हणस्तभि ऋणवा जायते**

या श्रुति वाक्याप्रमाणें ब्राह्मणाला फक्त तीनच ऋणें सांगितलीं आहेत व या तीन ऋणांत लौकिंक ऋणाचा समावेश केलेला नाही. तथापि आपल्या समाजास उन्नत दशेंत ठेंवण्यास ब्राह्मण वर्गांतील लोक लौकिक ऋणाचा भार वाहण्यास जितके तत्पर असतात तितके अस्पृश्य वर्गाचे लोक आपल्या समाजासाठी शास्त्राज्ञा असतांही तत्पर असत नाहींत ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे, असे प्रस्तूतच्या लेखकांस म्हणणे प्राप्त आहे. प्रस्तुतच्या लेखकानें समाजकार्याप्रीत्यर्थ जेवढा स्वार्थत्याग करणे त्यास शक्य होते तेवढा स्वार्थत्याग त्यानें केला आहे. तो कांहीं संस्थानिंक नाहीं, किंवा जहागीरदारहिं नाहीं. किंवा रानांत नाहीं शेत व गांवात नाहीं घर असें त्यांच्यासंबंधी एकानें केलेले विधान सत्य आहे. कांहीं झालें तरी म्हणण्यासारखी द्रव्यानुकूलता नसता इंग्रज सरकारने देऊ केलेली दरमहा अडीच हजार रुपयांपर्यंत वाढूं शकणारी नौकरी त्याने मला नको म्हणून सांगितलीं. वकिलीसारख्या स्पृश्य लोकांवर अवलंबून असणाऱ्या धंद्यांत विशेष किफायत मिळण्याची आशा नसताही केवळ समाजकार्य करण्यास मोकळीक असावी म्हणून त्यानें तो पत्करिला आहें. रूढधर्माचारांतील आणि लोकाचारांतील दोषांचें निर्भयपणें आविष्करण करण्याचें भयंकर कार्य हाती घेतले असल्यामुळे, देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पत्रांकडून होत असलेल्या शिव्यांचा व शापांचा भडिमार तो एकसारखा सोशीत आहे. स्वमतांचें मंडन व तदनुसार

होईल तेवढे वर्तन करण्याचें त्यानें ठरविल्यामुळें स्पृश्य वर्गांतील आपल्या फार दिवसांच्या मित्रांचा दीर्घ रोष त्याने आपणावर करून घेतला आहे व तेणे करून त्याच्या हातून त्याच्या धंद्यांत त्यास मिळू शकणाऱ्या मदतीस तो दुरावला आहे. कवडीचा फायदा नसतांना त्यानें एक वर्षाच्या आंत बहिष्कृत भारताचें बऱ्याच वाईट रीतींने रकाने भरून काढून लोक जागृतिचें काम केले. व ते करतांना त्याने आपल्या प्रकृतीकडे, सुखाकडे, चैनीकडे व ऐष आरामाकडे न पाहता डोळ्याच्या वाती केल्या इतकेच नव्हे तर प्रस्तुतचा लेखक परदेशी असतांना रात्रंदिवस जिनें प्रपंचाची काळजी वाहिली व जिला अजूनहि वाहावी लागत आहे व तो स्वदेशी परत आल्यानंतर त्याच्या विपिन्न दशेत शेणीचे भारे स्वतःच्या डोक्यावर वाहून आणण्यास जिणे मागें पुढें पाहिले नाहीं अशा अत्यंत ममताळू, सुशील व पूज्य स्त्रीच्या सहवासात दिवसाच्या २४ तासांतून अर्धा तासही त्याला घालवितां येत नाहीं. प्रस्तुतच्या लेखकाने जो स्वार्थत्याग केला आहे त्यांत त्याने विशेष कांही केले आहे असे नाही व प्रस्तुतचा लेखक तसे म्हणतही नाही उलट ज्या परमेश्वराने त्यास एका अस्पृश्य जातीस जन्मास घालून या मानवोद्धाराच्या मंगल कार्यात आपला देह झिजविण्याची जी त्यास संधि दिली हा त्याच्यावर मोठा उपकार झाला असे समजून त्या परमेश्वराला तो शतशः धन्यवाद देऊ इच्छितो तथापि त्याचे म्हणणें असें आहे कीं, दरेक अस्पृश्य माणसावर जो लौकिक ऋणाचा बोजा जन्मताच पडलेला आहे त्या ऋणाची जाणीव प्रस्तूतच्या लेखकास पूर्णपणें आहे व त्याने समाज कार्याप्रीत्यर्थ जे कांही केलें आहे तें त्याच्यावर असलेल्या लौकिक ऋणाची थोडी बहुत फेड करावी या भावनेनेच केलें आहे. त्याची इतकीच अपेक्षा आहे की, त्याच्या इतर अस्पृश्य बंधूंनींही या लौकिक ऋणाची बूज ठेवावी. बहिष्कृत भारताचे कार्य एकट्याचे तर नाहीच ते एकट्याने होणारेहि नाही. दसकी लकडी एकका बोजा झाला तरच ते तडीस जाईल. नाही तर त्याचा मध्येंच लोप होईल. प्रस्तूतच्या लेखकास आशा आहे की, त्याचे अस्पृश्य बंधु त्याचा लोप होऊ देणार नाहीत.



---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ३ फेब्रुवारी १९२८.

## ७७

# कै. श्रीधर बळवंत टिळक

श्रीधर पंताचे खालील पत्र डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या ऑफीसात मुंबईत येऊन पोहोचले तेव्हा ते जळगावला २६ मे १९२८ ला भरविण्यात येणाऱ्या सभेसाठी तिकडे गेलेले होते. श्रीधरपंताच्या मृत्यूची बातमी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली तेव्हा समतासंघाचे चिटणीसांनी ती तारेने बाबासाहेबांना कळविली. तेव्हा बाबासाहेबांच्या मनात जे विचारतरंग उठले त्यांचे शब्दचित्र त्यांनी एका लेखात रेखाटले व तो लेख ' दुनिया ' साप्ताहिकाने छापला. श्री. श्रीधर बळवंत टिळक यांनी आत्महत्त्या करण्यापूर्वी डॉ. आंबेडकर यांना जे पत्र पाठविलेले होते, त्याचा संपूर्ण ब्लॉक (पत्त्यासह) 'दुनिया' साप्ताहिकाने शनिवार तारीख २ जून १९२८ च्या सातव्या अंकात ३ पानावर छापलेला होता, तो असा :—

पाकीटावरील पत्ता :—

STAMPED

To,

Dr. B. R. Ambedkar, M.A., Ph. D., D. Sc.
M. L. C., Bar-at-Law.
Damodhar Hall, Parel.
Bombay, 12.

From : S. B. Tilak
Gaikwad Wada
668 Narayan Peth
Poona City
25-5-1928

॥ श्री ॥

गायकवाड वाडा,
पुणे, ता. २५ मे १९२८

कृ. सा. न. वि. वि.

हे पत्र आपले हाती पडण्यापूर्वी बहुदा मी इहलोकास रामराम ठोकल्याची वार्ता आपले कानी पडेल ! आपल्या ' समाज–समता–संघाचे ' अंगीकृत कार्य नेटाने पुढे चालू ठेवण्यासाठी सुशिक्षित व समाज-सुधारणावादी तरुणांचे लक्ष या

चळवळीकडे अधिकाधिक वेधून घेणे आवश्यक आहे. आपण या कामी अहर्निश झटता याबद्दल मला फार संतोष वाटतो व आपले प्रयत्नांस परमेश्वर यश देईल अशी खात्री वाटते. महाराष्ट्रीय तरुणांनी मनावर घेतल्यास अस्पृश्यता-निवारणाचा प्रश्न अवघ्या पाच वर्षात सुटेल. माझ्या बहिष्कृत बांधवांची गाऱ्हाणी प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णाचे चरणारविंदी सादर करण्यासाठी मी पुढे जात आहे. तरी मित्रमंडळीस माझा सप्रेम नमस्कार सांगावा. कळावे, लोभ असावा, ही विनंती.

आपला नम्र,
श्रीधर बळवंत टिळक
२५-५-१९२८

To,
Dr. B. R. Ambedkar,
Bar-at-Law.
Damodhar Hall, Bombay, 12.

आयुष्य हे जगण्यासाठी आहे, जगता जगता जनांना अज्ञानाच्या झोपेतून जागे करणे व त्यांना मानाने जीवन जगण्यासाठी झगडावयास तयार करणे, हे मानवी जीवनाचे श्रेष्ठतम ध्येय आहे ; आणि आत्महत्या करणे हे पराभूत जीवनाचे नीचतम द्योतक आहे, हे बाबासाहेबांच्या आत्मजीवन ध्येयाचे सुंदर चित्र या लेखात दृग्गोचर झालेले आहे.

बाबासाहेबांनी आपल्या भावना प्रदर्शित करणारा लेख दुनिया पत्रासाठी लिहिला, तो त्या पत्राने प्रसिद्ध केला. तो असा :—

## कै. श्रीधर बळवंत टिळक

ले. डॉ. भीमराव आंबेडकर

मी ता. २६ मे ला जळगाव येथे बहिष्कृत वर्गाच्या सभेकरिता गेलो होतो. आदल्या दिवशी मी जेव्हा मुंबईहून निघालो त्याच दिवशी रा. श्रीधर बळवंत टिळक यांचे एक पत्र मला आले होते. त्यात आपल्याला दापोलीच्या सभेला येता आले नाही याबद्दल वाईट वाटते वगैरे मजकूर होता. त्यात आत्महत्त्या करण्यासारखा प्रसंग ओढवला आहे असा ध्वनि उमटण्यासारखे काहीच नव्हते. दुपारी फार उन्ह असल्यामुळे रा. लबाचंद यांच्या अध्यक्षतेखाली सभा संध्याकाळी ६ वाजता सुरू झाली. सभेस पाच हजार लोक आले असल्यामुळे

सभेचे काम फार उत्साहाने चालले होते. हिंदु महासभेच्या कामापेक्षा समाज समता संघाचा कार्यक्रम कसा परिणामकारक आहे या आशयाचे थोडेसे कडाक्याचे भाषण संपवून नुकताच मी खाली बसलो होतो. इतक्यात एक तार आली. तार येण्याचे काही कारण नसताना तार आली यामुळेच मला थोडा धक्का बसला. वाचून पाहातो तो ज्या समता संघाच्या कार्याची महती गाऊन मी खाली बसलो होतो त्याच समता संघाच्या पुणे येथील शाखेचे उपाध्यक्ष माझे मित्र रा. श्रीधर बळवंत टिळक वारले म्हणून बातमी. मी अगदी गांगरून गेलो. आधी हे खरेच वाटेना. परंतु ही तार संघाच्या सेक्रेटरीने केली असल्यामुळे ती खोटी म्हणता येईना. अशा परिस्थितीत एक दुखवट्याचा ठराव मांडून मी सभा सोडून तसाच तडक मुंबईस आलो. गाडीत श्रीधरपंतांच्या मरणासंबंधी अनेक तर्क माझ्या मनात आले व आपण आरंभिलेल्या कार्यातील धडाडीचा एक मोठा जोडीदार नाहीसा झाला हे जाणून माझे मन फार उद्विग्न झाले. श्रीधरपंतांना कोणी तरी दुष्टाने विषप्रयोग केला असावा असा माझा प्रबल तर्क झाला. तारेत मरणाचे कारण काहीच दिलेले नव्हते. तेव्हा मरणाचे कारण हेच की दुसरे कोणते, हे जाणण्यासाठी गाडी मुंबईस केव्हा पोहोचेल असे मला झाले होते. गाडी दादरला पोहोचल्याबरोबर मी माझ्या ऑफिसात गेलो. टाईम्स् हातात घेतो तोच श्रीधरपंतांचे हातचे मरणापूर्वी तीन तास अगोदर मला लिहिलेले एक पत्र टेबलावर पडलेले दिसले. तेव्हा टाईम्स् टाकून ते हाती घेतले. वाचतो तो आत्महत्त्या हेच मरणाचे कारण होय हे अगदी स्पष्ट झाले.

मग तर अगदी कष्टी झालो. श्रीधरपंताला मी थोडासा दोषही दिला. आत्महत्त्या हा मरणाचा एक भेसूर प्रकार आहे. परंतु ज्या कारणामुळे ही आत्महत्त्या घडली ती कारणे ध्यानात घेतली म्हणजे श्रीधरपंतांची आत्महत्त्या मोठी हृदयद्रावक होती असे म्हणणे भाग पडते. आपले आयुष्य केसरी कंपुशी भांडण्यात जाणार, आपल्याला विधायक काम करण्यास अवसर राहाणार नाही. यास्तव जगण्यात हाशील नसून आत्महत्त्या करणे बरे, असे म्हणण्याची पाळी श्रीधरपंतांवर यावी, यासारखी अनिष्ट गोष्ट ती कोणती ? माझ्या मते श्रीधरपंतांना केसरीत जागा मिळाली असती तर हा घोर प्रसंग आलाच नसता. केसरी पत्रात आपणास जागा मिळावी ही एक त्यांची महत्वाकांक्षा होती. टिळकांच्या मरणानंतर ज्यांच्या हाती केसरी गेला त्यांनी केवळ टिळकांचा मुलगा म्हणून श्रीधरपंतांना त्यांच्या वडिलांनी केलेल्या उपकारांची फेड या दृष्टीने केसरीच्या चालकांत जागा द्यावयास पाहिजे होती. परंतु टिळकांचा मुलगा म्हणूनच नव्हे तर भारदस्त लेखक या दृष्टीने केसरीच्या संपादक वर्गांत

श्रीधरपंतांचा समावेश व्हावयास पाहिजे होता. राजकीय दृष्ट्या ते काही मवाळ नव्हते--जहाल, सुताळ आणि बेताल या सर्वांच्यापेक्षा ते फारच पुढे गेलेले होते. तेव्हा त्यांच्या लिखाणाने केसरीला काही धोका नव्हता. असे असताना त्यांना केसरीत जागा मिळाली नाही, याचे मला राहून राहून मोठेच आश्चर्य वाटते. केसरीत जागा मिळाली असती तरीही केसरी कंपूचा भांड लागून जे व्हायचे ते झालेच असते असे काही लोक म्हणतील. कसेही असो. एवढी गोष्ट खास की, निदान पैशापायी काही भांडण झाले नसते. कारण श्रीधरपंत यांची मनोवृत्ति त्या दृष्टीने अनुदार नव्हती. तसे जर ते असते तर वडिलांची इच्छा पुरी पाडण्याच्या हेतूने त्यांनी ट्रस्ट डीडवर बिनतक्रार सह्या केल्या नसत्या व आज जे केसरीचे ट्रस्टी म्हणून वावरत आहेत त्यांना तसे वावरता आले नसते. केसरी कंपूवर हा त्यांनी केवढा उपकार केला आहे याची आठवण केसरी कंपूला असती तर किती बरे झाले असते.

श्रीधरपंतांचा मृत्यू हा खरोखर दैवदुर्विपाकाचा एक मासला आहे. मनुष्यमात्राच्या आयुष्याच्या पूर्ततेस अवश्य असलेली सामुग्री कै. श्रीधरपंतांच्या भाग्याने त्यांच्या उशास ठेवलेली होती. साधनसामुग्रीचा उपयोग करण्याइतकी बुद्धिमत्ताही त्यांना होती. सार्वजनिक कामाची कळकळ व एखादी गोष्ट तडीस नेण्यास अवश्य असणारी धडाडी या दोन्ही गोष्टी त्यांच्यात ओतप्रोत भरलेल्या होत्या. त्यांचा स्वभाव अगदी प्रेमळ असल्यामुळे जनतेला वश करून घेण्यात त्यांना अवधी लागला नसता. अशा सर्वतोपरी पुढारीपणास लायक असलेल्या तरुणाचा अंत झालेला पाहून कोणास खेद होणार नाही ?

सामाजिक सुधारणेच्या बाबतीत त्यांचा जहालपणा सर्वांनाच माहीत आहे. समता संघाच्या कार्यावर त्यांनी किती भर दिला होता हे त्यांच्या पत्रावरुन उघड होत आहेच. समता संघाच्या स्थापनेचा पश्चात्ताप होऊन आत्महत्त्या केली, अशा मूर्खपणाच्या वल्गना करणाऱ्या भालाकाराने आपला शहाणपणा आटोपता घ्यावा, हे बरे. समता संघाच्या कार्याला त्यांना किती अंतिम स्वरूप द्यावयाचे होते, हे त्यांनी आपल्या गायकवाड वाड्यावर नुसते समाज समता संघ असे नाव न देता ' चातुर्वर्ण्य विध्वंसक समाज समता संघ ' हे नाव दिले, यावरून सिद्ध होत आहे. त्यांनी, आपल्या वडिलांची समाजकार्य वगळण्यात चुकी झाली, हे प्रांजळपणे कबूल केले, यातच त्यांचा मोठेपणा दिसून येतो. त्यांना स्पष्टपणे कळून आले होते की, अर्ध शतक राजकारणाचा अट्टाहास करूनही त्याच्या फलश्रुतीच्या आड जर कोणती एकादी गोष्ट आली असेल तर समाजकारणाचा अभाव हीच होय. या समजुतीप्रमाणे त्यांचा उद्योगही चालला होता. तो उद्योग किती धडाडीचा होता, हे कोणासही सांगण्याचे कारण नाही.

हल्लीच्या काळी महाराष्ट्रातील तरुणांत श्रीधरपंतांच्या तोडीचा तरुण सापडणे अत्यंत कठीण आहे. तरुण महाराष्ट्र परिषदेत जिभल्या पाजळणारे तरुण कोणीकडे आणि आमचे श्रीधरपंत कोणीकडे ? ठरावांतील रेलचेल करून गिरीकंदरी लपून बसणाऱ्या तरुणांतील भेकड तरुण ते नव्हते. त्यांचा निश्चय, जोम व कर्तबगारी ही सारी अवर्णनीय होती. ते जगले असते तर महाराष्ट्रातील अस्पृश्यता निवारण्याचे महान कार्य त्यांनी तडीस नेले असते. याचमुळे श्रीधरपंतांच्या मरणासंबंधी मला थोडा राग येतो. सामाजिक सुधारणेच्या अंगीकृत कार्यात आपणास केवढे स्थित्यंतर घडवून आणता येईल याची त्यांना यथार्थ कल्पना असावयास पाहिजे होती व त्या कार्यासाठी तरी निदान त्यांनी जगावयास पाहिजे होते. नुसत्या जगण्यात हशील नाही हे तत्त्व मलाहि मान्य आहे. परंतु सफल जीवित स्वार्थासाठी नाही, तरी परार्थासाठी साठवलेच पाहिजे. श्रीधरपंतांना याचा विसर पडला.

मला त्यांच्यासंबंधी काय वाटते हे मी त्यांच्या निधनासंबंधीचा लेख लिहिण्यास उद्युक्त झालो आहे, यावरून सर्वांना जाणता येण्यासारखे आहे. कै. श्रीधरपंत टिळक एका ब्राह्मण्याभिमानी गृहस्थाचे चिरंजीव. त्यांचे वडील लो. टिळक यांना १९१९ साली जेव्हा मी मूकनायक पत्र चालवीत असे त्यावेळी, दर अंकात जरी नसले तरी अंकाआड, शिव्याशापांची लाखोली वहात असे. ब्राह्मण्याशी अहर्निश झगडणाऱ्या माझ्यासारख्या अस्पृश्य जातीतील एका व्यक्तीने ब्राह्मण्याभिमानी व्यक्तीच्या पोटी जन्मास आलेल्या श्रीधरपंतांचे मरणाने दुःखित व्हावे, हा योगायोग तर त्याच्याहीपेक्षा विशेष विलक्षण आहे, हे कोणीही कबूल करील. परंतु, हा योगायोगच श्रीधरपंतांच्या मोठेपणाची एक मोठी साक्ष आहे. कोणी काहीही म्हणो, श्रीधरपंतांच्या वडिलांना लोकमान्य ही पदवी अयथार्थ होती. तेली, तांबोळी म्हणून बहुजन समाजाचा उपहास करणाऱ्या व्यक्तीला लोकमान्य म्हणणे म्हणजे लोकमान्य या शद्बाचा विपर्यास करणे, असे आभचे मत आहे. लोकमान्य ही पदवी जर टिळक घराण्यापैकी कोणा एकास साजली असती तर ती श्रीधरपंतासच होय. टिळकांच्या हातून लोकसंग्रह झाला नाही. खरा लोकसंग्रह श्रीधरपंतच करू शकले असते. तो करण्यास ते उरले नाहीत, ही महाराष्ट्रावरील

नव्हे–हिंदुस्थानावरील मोठीच आपत्ति आहे, असे भिक्षुकशाहीच्या कच्छपी नसलेल्या कोणत्याही लोककल्याणेच्छु माणसास कबूल करणे भाग आहे. (दुनिया, मुंबई, शनिवार, २ जून १९२८).[१]

' दुनिया ' खास टिळक अंक, शनिवार, २ जून १९२८ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या लेखाखाली जे लेख प्रसिद्ध झाले होते ते माहितीच्या दृष्टीने चांगले होते.[†]

●●●

---

[१]: खैरमोडे, खंड ४ था, पृ. २-४, ११-१४.

[†] पाहा, परिशिष्ट - ३८.

# ७८

# आजवरि होतों तुझे सत्तेखालीं। तोंवरि तों केली विटंबना

मंगळवार ता. २३ ऑक्टोबर १९२८ रोजी विजयादशमीच्या सुमुहूर्तावर अस्पृश्य वर्गाच्यातर्फे डॉ. आंबेडकर व डॉ. सोळंकी यांची सायमन कमिशनपुढें साक्ष झाली. तींत अस्पृश्य वर्गातर्फे चार मागण्या मागण्यांत आल्या. (१) मुंबई इलाख्यांत संपूर्ण स्वराज्य स्थापन करण्यात यावें, (२) अस्पृश्य वर्गाचा हिंदूत समावेश न करता तो वर्ग हिंदू समाजापासून अलग व स्वतंत्र आहे, असें मानण्यात यावे, (३) नवीन होणाऱ्या कायदे कौन्सिलात मुसलमान लोकांचे प्रतिनिधि ज्या प्रमाणांत घेण्यात येतात त्याच प्रमाणात अस्पृश्यांचे प्रतिनिधि घेण्यात यावेत. (४) बहुजन समाजाच्या हातून त्यांच्या हिताची जी पायमल्ली होते व त्यांच्यावर जो जुलूम होतो, त्यापासून त्यांचा बचाव होण्याकरितां कायद्याने कांही हक्क-संरक्षक अटी घालण्यांत याव्यात.

या मागण्या प्रसिद्ध झाल्यापासून स्पृश्य हिंदूंकडून जे टीकेचें सत्र सुरू झालें आहे, तें पाहून आम्हांस विस्मय वाटतो. ज्या एका मुद्यामुळें त्यांच्या आंगाचा भडका झाला आहे तो मुद्दा म्हणजे अस्पृश्य समाजास हिंदू समाजापासून पृथक् करण्यात यावें, हा होय. ज्या लोकांचें पित्त या मागणीनें इतकें खवळून गेलें आहे त्या लोकांनी हिंदु समाजाचा आणि अस्पृश्य समाजाचा काय संबंध आहे, हें आम्हांस दाखवून द्यावें, असें त्यांस आम्हीं आव्हान करतों. समाजाच्या एकीकरणाला सहभोजन व सहविवाह, हे दोन विधी कारणीभूत होत असतात. हे दोन विधी जेथें चालू असतात तेथें सर्व व्यक्ती एका तान्यांत विणल्या जाऊन त्यांचा एक समाज बनूं शकतो. एकीकरणाचे हे दोन मुख्य विधी स्पृश्य-अस्पृश्य यांत मुळींच चालूं नाहींत इतकेंच नव्हे तर ते चालूं करा असें म्हटले की, पायाची तिडीक मस्तकाला जाते आणि अस्पृश्य लोक आर्य स्त्रीचा अभिलाष धरतात म्हणून गिल्ला केला जातो. सहभोजन व सहविवाह तर राहोच पण ज्यांच्यांत साधा सहवासहि नाहीं अशा स्पृश्य व अस्पृश्य हिंदूंत असा कोणता दुवा आहे कीं, ज्याच्यामुळें त्या उभयतांची मिळून एक साखळी झाली आहे, असें म्हणता येईल ? अस्पृश्य समाज व स्पृश्य समाज एकाच

संस्कृतीखालीं किंवा धर्माखाली वाढले असतील व मोडत असतील. परंतु केवळ एका संस्कृतीखालीं वाढलेल्या लोकांना एका समाजाचे घटक म्हणावयाचें असे ठरलें तर मग ' समाज ' हा शब्द निरर्थक होईलच पण समजुतीचाहि मोठा घोटाळा उडेल. कारण संस्कृती आणि समाज या दोन गोष्टी अगदी भिन्न आहेत. एका समाजाची संस्कृति एकच असते. हे खरे. परंतु एका संस्कृतीचे लोक ते एकाच समाजाचे घटक, हा नियम सर्वत्र लागूं पडणार नाही. उदाहरणार्थ, युरोपांतील सर्व लोक एका खिस्ती संस्कृतीखालीं वाढलेले आहेत. ते सारे एकच धर्म पाळतात. एकाच येशुला भजतात, जन्मापासून मृत्यूपर्यंत व्हावयाचे त्यांचे संस्कार एकाच फर्म्याचे असतात. पण तेवढ्यामुळें ते सर्व एका समाजाचे लोक आहेत, असे कोण म्हणूं शकेल ? एक धर्म असूनही त्यांच्यात फ्रेंच, जर्मन, इंग्लिश, इटॅलियन, बल्गेरियन, स्पॅनिश, पोर्तुगीज, वगैरे निरनिराळ्या समाजाचे लोक आहेत. तोच प्रकार हिंदूंचा आहे. स्पृश्य व अस्पृश्य यांची संस्कृति एक असली तरी ज्याप्रमाणे फ्रेंच आणि जर्मन हे समाज भिन्न आहेत त्याप्रमाणे स्पृश्य व अस्पृश्य यांचे समाज भिन्न आहेत. इतकेंच नव्हे तर युरोपांत जे अनेक लोक नांदत आहेत ते सर्व एका समाजाचे आहेत. असें म्हणणें जर एक पटींने मूर्खपणांचें होणार असेल, तर केवळ हिंदु संस्कृतींत वाढले म्हणून स्पृश्य व अस्पृश्य यांचा एकच समाज होतो असें म्हणणें शतपटीने मूर्खपणाचे होणार आहे.

## स्पृश्य व अस्पृश्य या उभय समाजांत कोणताच सांधा नाही

अस्पृश्य हे हिंदूधर्मांतर्गत असतील. पण ते हिंदू समाजांतर्गत खास नाहींत. अस्पृश्य समाज हा हिंदु समाजाहून निराळा आहे. या परिस्थितीस अनुलक्षून स्वराज्यघटनेंत त्या समाजाला हिंदु जातीपासून अलग मानण्यात यावें, असें सांगितले त्यांत वावगें तें काय झाले ?

कसेंहि असो, पण ज्या स्पृश्य हिंदूंनी अस्पृश्य लोकांना आपलेपणानें कधीही वागविले नाहीं त्या स्पृश्य हिंदूंना अस्पृश्यांबद्दल एकाएकी इतका पान्हा फुटावा, हें एक मोठें आश्चर्यच आहे ! ' हिंदूंत रहा ! हिंदूंत रहा ! फुटून जाऊ नका ! ' असा टाहो फोडून आम्हास जे सांगत आहेत त्यांना आम्ही असे विचारतो की, तुमचे आमचे सामाजिक नाते कांहीच नाही ! आम्ही निराळे तुम्ही निराळे ! सामाजिक दृष्ट्या जे निराळे आहेत ते राजकीय दृष्ट्या निराळे झाले तर त्यात तुमचे काय बिघडले ? परंतु तुम्ही आम्ही एका रक्तामांसाचे असे जर तुम्ही म्हणत असाल तर ज्या आज अगणित वर्षे आम्ही तुमच्यात राहिलों त्या अवधीत तुम्ही,

## स्पृश्य हिंदूनीं आमच्यासाठी काय केले ?

असा एखादा प्रश्न अस्पृश्यांनी विचारला की, नाना तऱ्हेच्या कोट्या लढवून कांही सूज्ञ म्हणविणारे हिंदू लोक त्यांना निरुत्तर करण्याचा प्रयत्न करतात. कोणी म्हणतो, आम्ही आमच्या बायकांची सुधारणा करण्यात गुंतलों आहोंत, जरा दम धरा ; आमच्या बायका सुधारल्या म्हणजे मग त्यांच्या सहाय्यानें आम्ही तुमचा प्रश्न हाती घेऊं. यांच्या बायका कांही सुधारत नाहींत, आमचा प्रश्न ते कांही हातीं घेत नाहीत आणि ज्या सुधारल्या आहेत त्या अस्पृश्यतानिवारणास कांही अनुकूल नाहींत, हें पुण्याच्या सेवासदनांतील अंतर्व्यवस्थेंवरून दिसत आहे. एकूण आमचा प्रश्न लोंबत ठेवण्यास बायकांची बरी सबब झाली. दुसरा म्हणतो, प्रार्थना समाजानें अस्पृश्यांसाठी शाळा नाहींत कां काढल्या ! प्रार्थना समाजाने अस्पृश्यांसाठी काढलेल्या शाळेंतून शिकून किती विद्यार्थी तयार झाले हे कांही आम्हांस नक्की माहीत नाही. पण या शाळा आतां बहुतेक बंद झाल्या हें खरे. याच प्रार्थनासमाजानें मात्र सासऱ्याशी, दिराशीं अगर पुतण्याशीं व्यभिचार करून पोट वाढविलेल्या स्पृश्य हिंदुच्या बोडक्या बायांचे बाळंतपण सुखाने पार पडावें म्हणून एक अनाथाश्रम हजारो खस्ता खावून कर्जाला न जुमानतां चालूं ठेविला आहे. ह्या एकाच गोष्टीवरून प्रार्थनासमाजाला अस्पृश्यांविषयी कळकळ जास्त आहे किंवा बोडक्या बायांच्या बाळंतपणांची कळकळ जास्त आहे, हें दिसून येईल. तिसरा म्हणतो, १९२३ सालीं आम्ही स्पृश्यांनी अस्पृश्यांशी सहभोजन केले ! मोठी बहादरी केली ! खानावळवजा हॉलमध्ये १९२३ साली सहभोजन झाले, या एका गोष्टीवरुन अस्पृश्यता काढून टाकण्यास लोक तयार झाले आहेत असें जो म्हणतो तो अगदी भोळा असला पाहिजे किंवा लुच्चा असला पाहिजे. त्याला आम्ही असें सुचवितों कीं, पशू, पक्षी जसे एका गोठणीवर एकत्र बसून चारा खातात तसें एका निर्जन व निर्लेप जागेंत कांही स्पृश्य, कांही अस्पृश्य, एका आकाशाखालीं जमले असतील व जेवले असतील ! त्यांत मोठेसे काय घडले ? घराबाहेर इराण्याच्या दुकानांत सर्वच लोक एकत्र जेवतात. पण इराण्याच्या दुकानांत महार व ब्राह्मण एका टेबलावर जेवतात म्हणून ब्राह्मण महाराचा विटाळ पाळीत नाहीं हे म्हणणे जितके हास्यास्पद आहे तितकेंच वडाच्या झाडाखाली दोन्ही जातीतील कांही भूतांनी एकत्र बसून भाताची शिते खाल्ल्यामुळे अस्पृश्यता गेली हे म्हणणे हास्यास्पद आहे. नाहीतर एकाच मुंबईत १९२३ सालीं सहभोजनास तयार झालेला हिंदू समाज १९२८ सालीं एकत्र पाणी पिण्याचा प्रसंग आला असतांना ' धर्म बुडाला ! धर्म बुडाला ! ' अशी ओरड करू लागला

नसता. वरील प्रकारची बकालीं सहभोजने म्हणजे एक प्रकारचें तमाशे होत. अशा एखाद्या सहभोजनाचा अस्पृश्यतानिवारणास हवाला देऊन शहाण्या हिंदूंनी आपल्या नादानपणाचें प्रदर्शन करू नये हें बरें. चवथा म्हणतो आम्ही कांही केले नसेल. पण इंग्रजांनी अस्पृश्यांसाठी काय केलें तें सांगा ? या उफराट्या काळजाच्या लोकांस आम्ही अगदी स्पष्टपणें सांगू इच्छितों की हिंदू लोकांनी आमच्यासाठी काय केले, या प्रश्नास इंग्रजांनी तुमच्यासांठी काय केले हे कांही उत्तर नव्हे. ही मखलाशी आहे. इंग्रज बोलून चालून परके. त्यांनी कांही केले नसेल तर त्यांच्यावर रूसण्याचा कोणताहि हक्क नाहीं. परंतु तुम्ही आमचे म्हणवितां, आम्हांला कवटाळतां, प्रसंग पडला असतांना आर्यधर्माच्या व आर्यस्त्रियांच्या संरक्षणाचा आमच्यावर भार ठेवितां त्या तुम्ही आमच्यांसाठी काय केलें, तें सांगा ? इंग्रज परके, सरकारीरीत्या ज्या गोष्टी अस्पृश्यांच्या हिताप्रित्यर्थ करावयास पाहिजे होत्या त्या करून तुम्हाला त्यांनी अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं मदत केली नसेल. पण ज्या गोष्टीं निव्वळ लोकमतावर अवलंबून आहेत, ज्या घडवून आणण्यास कायदा नको अशा कोणत्या गोष्टी तुम्ही केल्या आहेत ? हिंदु धर्मांचीं देवळें खुलीं केलीं ? शाळा मोकळ्या केल्यांत, कां सार्वजनिक पाणवठे खुले केले ? या गोष्टी करण्याला इंग्रज सरकारची कांहीं आडकाठी नव्हती. या गोष्टी तुमच्या मनावरच्या होत्या, व त्या करणें न करणें सर्वस्वी तुमच्या हातांत होतें. पण त्यांपैकी एकहि गोष्ट तुम्ही केली आहे काय ? यांपैकीं एकहि गोष्ट तुम्ही केली नाहीं इतकेंच नव्हे, तर त्या घडवून आणण्यास लोकमत वळविण्याचा अल्प स्वल्पसा प्रयत्न देखील केला नाहीं. स्वराज्यासाठीं वाहून घेतलेल्या काँग्रेस भक्तांनी १९१७ सालापर्यंत आधी राजकीय मग सामाजिक असे सामुदायिक प्रश्नांचे वर्ग पाडून नुस्त्या राजकीय प्रश्नांचा काथ्याकूट केला. अस्पृश्यता निवारण्याच्या प्रश्नाला मुळी महत्त्वच मिळूं दिलें नाहीं. स्वराज्य मागतां आणि ६ कोटी प्रजेला दडपून ठेवतां असा कोणी ठपका देतील आणि मग उजळ माथ्यानें स्वराज्य मागतां येणार नाहीं म्हणून की काय काँग्रेसनें १९१७ सालीं अस्पृश्यता निवारणाचे सोंग आणून एक ठराव पास केला. पण तो तेथेच धूळ खात पडला. त्यानंतर म. गांधींची लाट उसळली तींत अस्पृश्यता हा हिंदुधर्मावर मोठा कलंक आहे, हें एक सूत्र जन्माला आलें. पण म. गांधींना " सामर्थ्य आहे चरख्याचें ।। जो जो फिरवील तयाचें " या महामंत्राशिवाय दुसरें कशांतच तथ्य नाहीं असें वाटत असल्यांमुळें त्यांनी अस्पृश्यतानिवारणाचा कार्यक्रम जोराने असा कधींच चालूं केला नाहीं. त्या कार्यक्रमाची त्यांना खरोखरच विशेष आवड आहे की काय याबद्दल आम्हास तरी

निदान शंका आहे. हिंदुमुसलमानांची मारामारी झाली असतांना त्यांनी २१ दिवसांचे उपोषण केलें. खादीचा प्रसार व्हावा म्हणून खादी विणील त्यालाच काँग्रेसचा मेंबर करावा असा त्यांनी आग्रह धरला. पण स्पृश्यास्पृश्यांमधील अमानुष वागणुकीबद्दल आपली नापसंती दर्शविण्यासाठीं एक दिवसहि देहदंडन त्यांनी केलें नाहीं किंवा अस्पृश्यतानिवारण करीलं तोच काँग्रेसचा मेंबर होईल असें ते म्हणाले नाहींत. आता तर म. गांधी म्हणजे उडालेला बार आहे. त्यांची कोणाला फारशी अपेक्षा नाहीं. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पुढारी तर कुटिलांचा कंपू. पंडित जवाहिरलाल नेहरुच्या, राजकारण व धर्म यांची फारकत करण्यांत यावी, या सरळ वाक्याचा वाकडा अर्थ लावून गेल्या मे महिन्यांत महाराष्ट्र प्रांतिक परिषदेनें अनेक प्रकारचे लपंडाव करून साधा अस्पृश्यता निवारणाचा ठराव परिषदेपुढें येऊं दिला नाहीं. त्यांच्याच तरुण पिढीने एक तरुण महाराष्ट्र परिषद भरविली. नानातऱ्हेचे सामाजिक ठराव पास करून या तरुणांनी आपल्या वाडवडिलांना भयभयीत करून टाकिलें. बिचारे अस्पृश्य मोठ्या आशेंने त्यांच्याकडे पाहात होते. पण आपण केलेल्या सामाजिक ठरावांची पूर्तता करण्याऐवजीं हा तरुणांचा तांडा बारडोलीकडे झुकला. आणि आतां तो राष्ट्रीय स्वातंत्र्य कसें मिळविण्यांत येईल या विचारांत दंग झाला आहे. बारडोलीसारख्या राजकीय चळवळीची त्याला जितकी चव लागते तितकी त्यास महाडच्या सत्याग्रहाची चव लागू शकत नाही. बरें या हिंदू जातींनीं स्वतः कांहीं केलें नाहीं तें नाहीं. पण अस्पृश्य लोक जें कांही करीत आहेत त्याला कांही सहाय्य, कांही उत्तेजन ! त्या नांवानेहि शून्य ! सेवासदनाला लाखो रुपये गोळा होतात, महिला विद्यालयाला लाखो रुपये मिळतात, पण अस्पृश्यांसाठीं काढलेल्या डिप्रेस्डक्लासेस मिशनला[†] पै देखील मिळत नाहीं. त्यांचे दार बसलें ! शिक्षणासाठीं मदत नाहीं ती नाहींच. सामाजिक उन्नतीला तरी कांहीं सहाय्य ! तेंहि नाहीं. अस्पृश्य लोक आपली सामाजिक उन्नती करुं लागले तर त्यांचा उलटा छळ !! कांहीं लोक ही गोष्ट खरी आहे असें मानावयास तयार नाहींत. त्यांना आम्ही असें सांगतो कीं, तुम्ही एकदां रत्नागिरी आणिं कुलाबा जिल्ह्यांत दौरा काढून बघा आणि आम्ही म्हणतों तें खरें किंवा खोटे हें शोधून पहा. क्वचित एखादा गांव या दोन जिल्ह्यात असेल कीं ज्यात खोतांनी महारांकडच्या जमिनी काढून घेतल्या नसतील, गांवकऱ्यांनी त्यांचा बाजार बंद केला नसेल, त्यांचे गांवांतून अगर रानांतून हिंडणें फिरणें बंद केलें नसेल, त्यांची गुरें कोंडवाड्यात घातली नसतील आणि त्याचा पूंज पसा बंद केला नसेल. कांही ठिकाणीं तर हा छळ इतका बेफामपणें चालविण्यात आला कीं ज्याप्रमाणें परचक्र आले असतांना एका

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–३९.

सैन्यांतील लोक शत्रूच्या सैन्यांतील लोकांवर छापे घालतात त्याप्रमाणे गांवच्यागांव महारवाड्यावर तुटून पडून बायकापोरासकट सगळ्यांना मारहाण करण्यात आली आहे. व कांही गतप्राण झाले आहेत. या जुलमांचे कारण काय तर अस्पृश्य लोकांनी गोमांस खाण्याचे बंद केलें, आणि जानवी घालून स्पृश्य हिंदुप्रमाणे वागूं लागले !! अस्पृश्यांनी स्वतःच्या पायावर उभे राहून अशुद्ध अमंगल न राहतां स्वच्छतेने रहावे म्हणजे तुमची अस्पृश्यता सहज जाईल असे कंठशोष करून सांगणाऱ्या पुढाऱ्यांना आम्ही विचारतों, हीच कां तुमची कळकळ आणि अशी आमची

## गळचेपी करण्यासाठींच कां गळ्याला मिठी मारतां ?

या सर्व हकीगतीवरुन एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, स्पृश्य हिंदु जातीला जो पान्हा फुटला आहे तो कांहीं अस्पृश्यांच्या हितासाठीं फुटलेला नाहीं. कधींही न पान्हवणारा हा टोणगा जो एकाएकीं इतका पान्हवला आहे, तो अस्पृश्यासाठींच पान्हावलेला नसून स्वतःसाठींच पान्हवलेला आहे. अस्पृश्यलोक हिंदू समाजांतून फुटून गेले तर हिंदूसमाज कमकुवत होईल. हिंदुमुसलमानांच्या संस्कृतीच्या संग्रामांत हिंदूंचा नाश होईल, हें आम्हांस दिसते परंतु हिंदू समाजाचे काय होईल याचा विचार अस्पृश्य समाजाने काय म्हणून करावा ? ' महार मेला विटाळ गेला ' असे जसें हिंदु लोक म्हणतात त्याप्रमाणे ' हिंदु मेला पाप गेले ' असे म्हणून अस्पृश्याने स्वस्थ कां बसूं नये ? हिंदुसमाजाची नीति सगळ्या जगाच्या नीतीपेक्षां अगदी उलटी आहे. इतर समाजांत बाहेरचा मनुष्य आंत आला म्हणजे त्याचा दर्जा वाढतो. हिंदुसमाजांत आंतला माणूस बाहेर गेल्याशिवाय तो मानास चढत नाही. अस्पृश्य जोपर्यंत तो हिंदू राहील तोपर्यंत तो पशुपेक्षा नीच मानला जातो. तोच मुसलमान झाला तर सर्वांपेक्षा श्रेष्ठ गणला जातो. यावरून उघड आहे कीं

## अस्पृश्यांना हिंदुत्व हा शाप आहे.

तो कांही वर नव्हें. ज्या हिंदूच्या हिंदूत्वाचा शाप अस्पृश्यलोक भोगीत आहेत त्या अस्पृश्य लोकांनी हिंदुलोक मरतील कां तरतील याची चिंता करण्याचे कांही कारण नाहीं. खरे म्हटले असतां हिंदू म्हणजे जगांतले मोठ्यातलें मोठें पाप आहे. ज्या हिंदुजातीने अनेक प्रकारचे कठोर निर्बंध घालून माणसांच्या माणुसकिची अहर्निश विटंबना चालविली आहे ती जात जगांतून नाहींशी झाली तर तिच्यासाठी कोण अश्रु गाळील ? हिंदूजात आपलें पाप आपल्या प्रांतातच ठेवील तरी बरें. पण नाहीं, जिकडे जाईल तिकडे ती आपल्या पापाची पेरणी

केल्याशिवाय राहणार नाही. इतकी ही हिंदु जात उपद्रवी आहे. सिंध प्रांतात जावो अथवा साऊथ आफ्रिकेंत जावों, हिंदुजात आपलें पाप जेथें जाईल तेथें, पसरवल्या शिवाय स्वस्थ बसणार नाहीं. कोठेंही जावो, जगाच्या स्वच्छ जीवनाच्या झऱ्यांत आपले पातकी जीवन मिसळून त्यास ती अशुद्ध करणार नाहीं असें होणें नाहीं. या पतीत जातीला जगती तलावर थारा देणे ही मानव जातीच्या हिताच्या दृष्टीने मोठी आपत्ती आहे. मनुष्यमात्रास तिच्या सान्निध्यांत राहावें लागणें हेंच आधीं मोठें दुर्भाग्य आहे. तिच्यांत समावेश करून घेणे आणि तिच्या सत्तेखालीं वागणें म्हणजे तर जिवंतपणी नरक यातना भोगण्यासारखे आहे. अशा हिंदुजातीशीं संबंध ठेवण्यास कोण तयार होईल ? तिचा संसर्ग न व्हावा म्हणून अलग होणें यांतच खरें हित आहे, आणिं म्हणूनच तो मार्ग अस्पृश्यांच्या प्रतिनिधींनी स्विकारला आहे.

अस्पृश्य समाजाला स्पृश्य समाजापासून निराळा करण्यांत यावा या साक्षींतील मुद्यावर विरोध व्हावयाचा तो अस्पृश्यांकडून व्हावयास पाहिजे होता. पण तसा विरोध त्यांच्याकडून झालेला नाहीं व होईल असें आम्हांस वाटत नाहीं. झालेल्या साक्षीवर त्यांचा आक्षेप आहे, नाहीं असें नाहीं. पण तो आक्षेप अगदीं वेगळ्याच मुद्यावर आहे. त्यांचा मुख्य आक्षेप म्हणजे मुंबई इलाख्यांत संपूर्ण स्वराज्य स्थापन करण्यांत यावे अशी मागणी अस्पृश्यांच्या प्रतिनिधींनी करावयास नको होती. या आक्षेपाला वाचा फुटली नसली व त्याचा ध्वनी स्पष्टपणें जरी ऐकूं येत नसला तरी त्यांचा तसा आक्षेप आहें हे आम्ही जाणून आहों. आमच्यांत व आमच्या अस्पृश्यबंधूत हा महत्वाचा मतभेद असल्यामुळे हा आक्षेप विचारांत घेणे अपरिहार्य झालें आहे व स्पृश्यांच्या आक्षेपाबरोबर अस्पृश्यांच्याहि आक्षेपाचे निरसन करण्याचें आज आम्ही योजिलें आहे. या आक्षेपाचे मूळ

## हिंदुपेक्षां इंग्रज बरें.

या भावनेंत आहे हें निर्विवाद आहे. ही भावना अस्पृश्य वर्गांत किती खोल गेली आहे याची कल्पना स्पृश्य हिंदूस करतां येणे शक्य नाही. इंग्रजांचे राज्य म्हणजे रामाचें राज्य अशी अस्पृश्य लोकांची इंग्रजाविषयींची निष्ठा आहे. आणि त्या निष्ठेला त्यांच्या हृदयांत ठाव मिळण्यास तशी सबळ कारणेहि घडली आहेत. ज्या पेशवाईच्या काळांत[†] अस्पृश्यांना रस्त्यांत थुंकून तो अपवित्र करतील म्हणून गळ्यांत मडकें बाळगावें लागत असें; अस्पृश्य कोण हें ओळखण्यांत यावे म्हणून हातांत खुणेसाठीं काळा दोरा बांधावा लागत असें, चालून दूषित झालेली धूळ वाहून जावी व पवित्र हिंदुजातीस तीवरून चालण्याचा प्रसंग पडूं नये म्हणून

---

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–८

कमरेस काठ्यांचा खराटा लटकावावा लागत असे, त्या पेशवाइचा जो अस्पृश्य अंग्लाईशी तुलना करील, त्याला एकी संबंधाने द्वेष व दुसरी संबंधानें प्रेम वाटलें तर त्यात कांहीं आश्चर्य नाही. पेशवाईतून अंग्लाईत संक्रमण झालेल्या अस्पृश्यांच्या स्थितींत व महाभारतांत सांगितलेल्या कपोतपक्षाच्या स्थितींत एक प्रकारचें साम्य दिसून येते. जसा श्येनपक्षी मागे लागला असतांना तो गरीब बिचारा कपोत जीव घेऊन शिबीराजास 'रक्ष रक्ष' म्हणून शरण गेला, त्याचप्रमाणे अस्पृश्यजनता ही स्पृश्य जनतेच्या अमानुष छळास त्रासून इंग्रजप्रभूस शरण गेली असून त्याच्या आश्रयाखाली आज ती आपले दिवस कंठीत आहे. अशा परिस्थितींत वाढलेली अस्पृश्यप्रजा शिबीचा आधार तुटला असतांना, श्येनपक्षानें जी कपोताची गत केली असती तशीच इंग्रजांचा आधार तुटला असताना, स्पृश्य जनता आपली गत करील या भयानें स्वराज्याच्या मागणीस बिचकली तरी तिला कोणी प्रमाणिक व विचारवंत मनुष्य दोष देईल असें आम्हास वाटत नाहीं. तथापि इंग्रज सरकारवर सर्वस्वी विसंबून राहणाऱ्या अस्पृश्य बंधूस आमचा असा इषारा आहे कीं, इंग्रज प्रभु हा खरोखरीच शिबीचा अवतार आहे कीं काय याबद्दल त्यानी आपली खात्री करुन घ्यावी. एकीकडे 'नुपेक्षावें शरणागता' अशी करुणा भाकणारा कपोत व दुसरीकडे 'ज्याचे त्यास द्यावें निश्चित', असा शास्त्रार्थ सांगणारा श्येनपक्षी, या दोहोंच्या कचाट्यांत सांपडलेला शिबी, ज्याप्रमाणे आपले मांस देऊन आत्मनाश झाला तरीपण कपोताचे रक्षण करण्यास तयार झाला त्याचप्रमाणे स्वतःचे कांहींही होवो पण अस्पृश्यांचे हित करू हें इंग्रजसरकारचें ब्रीत आहे, याची हमी कोणता अस्पृश्य देऊं शकेल? व इंग्रजप्रभूला तुम्ही शरण गेला पण त्या

## इंग्रजप्रभूनें तुमच्यासाठीं काय केलें आहे ?

मुंबई प्रांतात इंग्रजी अम्मल सुरुं झाल्यास एक शतकाधिक वर्षे झाली या अवधींत ज्या अस्पृश्यतेमुळें तुमची माणुसकी नष्ट झाली आहे त्या अस्पृश्यतेचे उच्चाटन झालें आहे काय ? ज्या अज्ञान अंधकारांत तुम्हाला तुमच्या देशबांधवांनी खितपत ठेविलें होते त्या अंधकारांत इंग्रजप्रभुनें केवढीशी ज्ञानाची ज्योत पेटविली? सरकार दरबारी जी तुम्हांस बंदी होती ती उठवून त्या बाबतीत तुमचा कितपत प्रवेश झाला आहे ? ज्या दारिद्र्यात तुम्ही लोळत पडला होता त्यातून वर काढून तुम्हांला सुखाचा व संपत्तिचा लाभ व्हावा एतदर्थ इंग्रजांनी तुमच्यासांठीं कोणते प्रयत्न केले ? या सर्व प्रश्नांची उत्तरें इतर कोणी कोणत्याही तऱ्हेनें देवोत, आम्हाला तरी ती नकारार्थीच देणें प्राप्त आहे. इंग्रजी अमदानींत अस्पृश्यांच्या

परिस्थितींत जें कांही आशा करण्याजोगें परिवर्तन घडलें असेल तें केवळ काळाच्या ओघामुळेंच घडलें आहे. तें घडवून आणण्यास इंग्रज सरकारनें कांही विशेष प्रयत्न केले याची ग्वाही आम्ही देऊ शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर इंग्रजांच्या हातून अस्पृश्योन्नती होईल अशी आशा बाळगणे व्यर्थ आहे, असे आमचें मत आहे. याचें कारण इंग्रज सरकारच्या हातीं अस्पृश्योन्नती करण्याइतकीं सत्ता नाहीं असे नाहीं. इंग्रज सरकारनें मनांत आणले असते तर सर्व अस्पृश्यांची सार्वजनिक ठिकाणची अस्पृश्यता गेली असती, पलटणींत, पोलीसांत, आरमारांत व इतर सरकांरी खात्यांत त्यांची भरती झाली असती, शिक्षणाचा इतका प्रसार झाला असतां कीं, कोणताही अस्पृश्य निरक्षर राहिला नसता. व पडीक जमीनिवर अस्पृश्य लोकांच्या वसाहती करून त्यांचा संसार सुखानें चालविण्यास मदत केली असती. यापैकी एकही गोष्ट इंग्रजसरकारनें केली नाही. इतकेंच नव्हे, तर ज्या अस्पृश्य लोकांनी इंग्रजास मदत करून या देशाचे राज्य कमाऊन दिलें, त्याच इंग्रजसरकारनें अस्पृश्य लोकांची सैन्यांत भरती करण्याचे बंद केले. कांहीं अस्पृश्य लोक असें म्हणतील की, स्पृश्य जनतेचा विरोध होईल म्हणून इंग्रज सरकारनें वरील गोष्टी करण्याचें हातीं घेतलें नाही. अर्थात इंग्रज सरकारनें अस्पृश्योन्नति प्रीत्यर्थ जर कांहीं प्रयत्न केले नसतील तर त्याचे खापर सर्वस्वी विरोधी स्पृश्य जनतेच्या माथीं फोडले पाहिजे. परंतु जसें न कर्त्याचा वार शनिवार तसें स्पृश्य जनतेचा विरोध ही केवळ सबब नसेल कशावरून ? हिंदुस्थान देशांत अनेक धर्म, अनेक जाती, व अनेक पंथ आहेत. त्यामुळें एका धर्माचे व जातीचे लोक दुसऱ्या धर्माच्या व ज़ातीच्या लोकांवर जोर जुलूम करतात व त्यास अन्यायानें वागवितात म्हणून इंग्रजांचे राज्य या देशांत राहिले पाहिजे असें इंग्रज सरकार म्हणते. अर्थात या अन्यायाची आयुमर्यादा जितकी लांबविता येईल तितकी बरी असें इंग्रज सरकारास वाटणें अगदी नैसर्गिक आहे. कारण त्यांच्याच राजकारणाच्या तत्वानुरोधानें ज्या दिवशीं हे सामाजिक अन्याय बंद होतील त्या दिवशी इंग्रजी राज्याचा शेवट करणे त्यांना क्रमप्राप्त होईल. सामाजिक अन्यायाचा व इंग्रजी राज्याचा असा जेथें लागा बांधा आहे, तेथें सामाजिक अन्याय जोपर्यंत राहतील तोपर्यंत तसेंच राहूं देण्याकडे इंग्रजांचा कल आहे. म्हणूनच स्पृश्य जनतेची सबब पुढें करून ते अस्पृश्यतेसारखा अन्याय खपवून घेत आहेत असा जर कोणी इंग्रजावर आरोप केला तर तो मनुष्यमात्राच्या नेहमीच्या व्यापाराविरूद्ध होईल असें कोणास सहसा म्हणतां येणार नाहीं. नाहींतर सत्तावनसालाचें बंड ज्या सरकारनें हा हा म्हणतां मोडले, रौलट ॲक्टाविरूद्ध प्रतिकार करणाऱ्या लोकांची ज्यांनी जालियनवाला बागेंत कत्तल उडविली, तें सत्ताधीश इंग्रज सरकार अस्पृश्योन्नतीच्या बाबतींत

स्पृश्य जनतेच्या विरोधास भीते, या म्हणण्यावर कोणाचाच विश्वास बसणे शक्य नाही. इंग्रज सरकार जर खरोखरच स्पृश्य जनतेला भीत असेल तर असल्या भ्याड वृतीच्या सरकारापासून अस्पृश्यांना लाभ तो कोणता? उलटपक्षी इंग्रज सरकार स्पृश्य जनतेच्या विरोधाची सबब पुढें करून, अस्पृश्योन्नतीचे कार्य टाळीत असेल तर असल्या कर्तव्यपराङ्मुख सरकारवर विसंबून काय उपयोग ? भयामुळें म्हणा किंवा स्वार्थामुळें म्हणा, इंग्रज सरकार हाती असलेल्या सत्तेचा आपल्या कामीं जर कांहीं उपयोग करीत नाहीं, तर आहे ती सत्ता त्याच्या हातीं तशीच ठेवा, ती काढून घेऊं नका असें म्हणण्यांत काय हंशील आहे ? तीच राजकीय सत्ता इंग्रजांच्या हातांत असण्यापेक्षा अस्पृश्यांच्या हातांत असती तर, ज्या सुधारणा सत्ता असूनही इंग्रजसरकारने केल्या नाहींत व ज्या करणे अवश्य होते, त्या सुधारणा घडवून आणल्याशिवाय ते स्वस्थ बसले नसते. ज्याचे कल्याण तोच करील, दुसरा कोणी करणार नाही. या न्यायानें पाहतां अस्पृश्यांचे कल्याण जितकें अस्पृश्यलोक करूं शकतील तितकें इंग्रज देखील करूं शकणार नाहींत. यासाठी अस्पृश्यांनी स्वकल्याणाचे काम परक्यांवर सोपविण्याचेऐवजी स्वतःचे हातीं घेणे बरें. हिंदूंवर विश्वास ठेवून ते चालत नाहींत, ही शहाणपणाची गोष्ट होय. पण इंग्रज सरकारवर विसंबून राहणे, ही कांही शहाणपणाची गोष्ट नव्हें. खरा शहाणपणा कोणावरही विश्वास न ठेवितां स्वतःवर विश्वास ठेवणें यांतच आहे. दोघांच्याहि सत्तेखाली उन्नति झालेली नाही. झाली ती विटंबनाच झाली आहे. म्हणून

## स्वावलंबन हेंच अस्पृश्यांचे ध्येय असले पाहिजे

डॉ. आंबेडकर व डॉ. सोलांकी यांनी जी अस्पृश्यवर्गातर्फे सायमनकमिशनपुढें साक्ष दिली त्या साक्षींत हेंच ध्येय मांडले होतें. आणि म्हणनूच या इलाख्यांत स्वराज्य स्थापन करा कीं जेणे करून राजकीय सत्ता जनतेच्या हातांत येईल, अशी मागणी करण्यास त्यांनी मागें पुढें पाहिलें नाहीं. यावर कांही अस्पृश्यलोक अशी शंका घेतील कीं, या स्वराज्याच्या मागणीनें हिंदुसमाजाच्या सामाजिक, आर्थिक व धार्मिक जुलुमाच्या आड घातलेले इंग्रजी सत्तेचे सुदर्शन लोपून, स्वराज्याच्या वज्राचा आमच्यावर प्रत्यक्ष आघात झाल्याशिवाय राहणार नाही. हें स्वराज्य म्हणजे आमच्यावर राज्य होईल. आमच्यामतें ही शंका व्यर्थ आहे. कारण स्वराज्य मागतांना त्यांत थोडे बहूत आपलेंही राज्य होईल अशी मागणी मागण्यांत आलेली आहे. अस्पृश्यवर्गाचे भरपूर प्रतिनिधी मागितले असल्यामुळें स्वराज्य म्हणजे अस्पृश्यांवर राज्य असें तर होणार नाहींच, परंतु राजकीय सत्तेचा बराचसा भाग अस्पृश्य वर्गाच्या हातांत येईल. सायमन

कमिशनपुढें मांडलेल्या योजना फलद्रुप झाल्यास हिंदुस्थानात कधीहि न घडलेली गोष्ट घडून येणार आहे. अस्पृश्यवर्ग हा सत्ताधीश होणार आहे. त्याच्या उद्धारास राजकीय सत्तेचा आधार सांपडणार आहे. ही गोष्ट अस्पृश्योन्नतीच्या दृष्टीने कांही लहान सहान नाहीं. तेव्हां अशा योजनेला नाकें मुरडण्यापूर्वी अस्पृश्य लोकांनी पूर्ण विचार करावा अशी आमची त्यांना आग्रहाची सूचना आहे.

सायमन कमिशनशीं सहकार्य केल्याबद्दल राष्ट्रीयब्रुव वृत्तपत्रकारांचा मोठा रोष झालेला आहे. व अस्पृश्य वर्ग देशद्रोही आहे, अशी एकच कोल्हेकुई त्यांनी उठविली आहे. सायमन कमिशनवर हिंदी माणसांची नेमणूक केली नाहीं, हा हिंदुस्थानचा अपमान होय, असें या लोकांप्रमाणे आम्हांलाहि वाटत आहे. स्वाभिमान ही चीज या पुढारलेल्यांच्याच पांचविला पुजलेली आहे असे नाही. मागासलेल्या वर्गांनाहि स्वाभिमान आहे. व त्यांच्यात ज्या आत्मोद्धाराच्या चळवळी चालू आहेत त्या स्वाभिमानाच्याच चळवळी होत. या दृष्टीने पाहत पुढारलेल्या लोकांनी चालविलेल्या बहिष्काराच्या चळवळीत आम्हांला भाग घेता आला असतां तर त्यांत आम्हाला आनंदच वाटला असता, परंतु या चळवळीत अस्पृश्यांनी कां भाग घेतला नाही, याचें कारण स्पष्ट आहे. पुढारलेल्या हिंदी गृहस्थाची कमिशनवर नेमणूक केली असती तर अस्पृश्यांच्या प्रश्नांची काय वाट लागली गेली असती याचा तर्क करण्याचे कारण उरलें नाहीं. नेहरू कमीटीचा रिपोर्ट सर्व अस्पृश्यवर्गाच्या नजरेसमोर आहेच. नेहरू कमीटीच्या रिपोर्टात अस्पृश्यांना कोणत्या सवलती दिल्या आहेत ? मुसलमानांच्या प्रश्नापेक्षा अस्पृश्यांचा प्रश्न नेहरू कमीटीला कमी महत्वाचा वाटला नाहीं काय ? स्पृश्य वर्गाच्या सहानुभूतीशी अस्पृश्यांच्या हितसंबंधाची गांठ घालून देऊन ती कमिटी मोकळी झाली नाहीं काय ? ही सहानुभूति किती तकलादी अतएव अविश्वसनीय आहे, याचा नेहरू कमीटीने विचार केला काय ? कांही नाहीं. अस्पृश्यांचा प्रश्न सामाजिक आहे, शिक्षणानें तो सुटणार आहे, त्यांच्यासाठी विशेष योजना कांही करणें नको, असा झकपक अभिप्राय नेहरू कमीटीनें देऊन टाकला आहे. जणू अस्पृश्यता ही अगदीं साधी बाब आहे ! नेहरू कमेटींतील लोक अथवा त्यांचे भाईबंद हे जर सायमन कमिशनवर असते तर जें नेहरु कमिटीत घडलें तेंच त्यांनी सायमन कमिशनकडून करविलें असतें, या म्हणण्यास कांही प्रत्यवाय दिसत नाहीं. असल्या एखाद्या पुढारलेल्या माणसाची कमिशनवर नेमणूक केली असती तर हिंदी राष्ट्राचा मान राखण्यांत आला असता, हें खरें, पण अशा नेमणुकीपासून अस्पृश्य वर्गाचा घात झाला असता, ही गोष्ट आम्ही विसरु शकत नाही. . हा ' आमचा माणूस ' आहे असे म्हणण्यासारखा एक जरी पुढारी असता तरी त्याला नेमण्याविषयीं आम्ही आग्रह

धरला असतां, पण आमचा म्हणण्यासारखा एकहि माणूस आम्हाला दिसला नाहीं आणि म्हणूनच कोणता तरी एखादा हिंदी माणूस कमिशनवर असण्यापेक्षा बिन हिंदी माणसाचें कमिशन असणे बरें, असें आमचे प्रामाणिक मत झालें. आणि त्यामुळेंच सायमन कमिशनशीं सहकार्य करण्याचा आम्ही निश्चय केला. जे लोक आम्हाला देशद्रोही म्हणून म्हणतात त्यांनी प्रथम या सर्व प्रश्नांचा विचार कारावा व मग अस्पृश्यांवर स्वाभिमानशून्यतेचा शिक्का मारण्यास पुढें यावें. ब्रह्मद्वेष, देशद्रोह, वगैरे कायम ठशाच्या आरोळ्यांनी बिचकून जाण्याइतकें अस्पृश्य नाजुक प्रकृतीचे राहिले नाहींत. आमचे व्हावें व आमचा विश्वास संपादन करावा मग आम्ही तुमचें होऊं व तुम्हाला आमचे मानूं तोंपर्यंत आम्ही आमची वाट स्वतंत्रपणें चालत आहोंत. आम्ही कोणाचेहि द्वेष्टे नाहीं. पण आमचे द्वेष्टे कोण आहेत हें मात्र आम्ही ओळखून आहोंत. त्यांचे सामाजिक अतिक्रमण चव्हाट्यावर मांडण्यांत व त्या अतिक्रमणापासून आमचे संरक्षण करण्यास आम्हांस राजकीय सत्तेचा भरपूर अंश द्या असें म्हणण्यांत जर ब्रह्मद्वेष, अगर देशद्रोह होत असेल तर तो करणें हें आमचें पवित्र कर्तव्य आहे, असें आम्ही मानतों.



---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. १६ नोव्हेंबर १९२८.

# ७९

## ब्राह्मण्य म्हणजे बहुजन समाजाच्या अज्ञानावर आधारलेलें जाति वर्चस्व

१ हिंदी स्वातंत्र्यसंघाच्या बंगाल व महाराष्ट्र अशा दोन शाखांचे जाहिरनामे[†] आम्हीं या अंकात दुसरीकडे प्रसिद्ध केले आहेत. हे जाहिरनामे तुलनात्मक दृष्टीनें वाचून पाहिल्यास वाचकांना बराच बोध होण्यासारखा आहे. हिंदी स्वातंत्र्यसंघाचे मूळ उत्पादक पंडित जवाहिरलाल नेहरू[‡] हे राजकीय बाबतींत जितके उर्ध्वगामी आहेत तितकेच सामाजिक क्षेत्रांत मूलगामी आहेत. पण त्यांच्या अनुयायांच्या दृष्टीकोणांत प्रांतनिहाय परिस्थितीनुसार फरक पडलेला आढळतो. प्रस्तुत जाहीरनाम्यांपैकी बंगाल शाखेचा जाहिरनामा बहुतांशीं पंडितजींच्या तत्वाला धरून आहे. पण महाराष्ट्र शाखेचा जाहिरनामा लक्षपूर्वक वाचून पाहिल्यास तो महाराष्ट्रांतल्या टिळक-चिपळूणकर परंपरेच्या वळणावर गेला असल्यांचें दिसून येईल.

२ या टिळक-चिपळूणकर परंपरेचें ब्रीद राजकीय सुधारणेचा पुरस्कार व समाज सुधारणेला विरोध हें असल्याचें महशूरच आहे. कै. आगरकर प्रभृति सुधारकांनी चालविलेल्या समाज सुधारणेच्या प्रयत्नांना कै. टिळकांनीं होती नव्हती तेवढी शक्ती खर्च करून विरोध केला. कै. आगरकरांचे प्रयत्न अत्यंत तुटपुंजे होते. त्यांच्या कार्याची व्याप्ति ब्राह्मण समाजापुरती मर्यादित होती. समाजाचे खालचे थर हालविण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला आढळत नाही. तरीपण कै. टिळकांनी त्यांचेवर विरोधाचे शस्त्र उपसलें. सामाजिक प्रश्नांविषयीं कै. टिळकांची मतें सुविख्यातच आहेत. अस्पृश्यता निवारणाच्या जाहिरनाम्यावर त्यांनी सही करण्याचे नाकारलें होतें. सहभोजनांनी जातीय भांडणे मिटतीं तर एका ताटांत जेवणारीं एका आईचीं मुलें कां भांडतीं अशी वकिली थाटाची, भ्रामक व कुचेष्टेखोर टीका त्यांनी सहभोजनावर केली होती. आणि त्यांच्या सुदैवाने ब्राह्मणव्यतिरिक्त वर्गांत त्यावेळी म्हणण्यासारखी जागृतीही झाली नव्हती. त्यामुळे त्यांची अडवणुक करणारे कोणीही त्यांना भेटले नाहींत

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–४०.

[‡] पाहा, परिशिष्ट क्रमांक–४१.

व कै. टिळक बोलतील त्याला जिकडे तिकडे टाळ्या मिळू लागल्या. टिळक म्हणतील तें ब्रह्मवाक्य असें मानण्याचा जणुं शिरस्तांच पडून गेला; व अडाणी लोकांच्या मूढपणाचा फायदा घेऊन टिळकांनींही त्यांना वाटेल तसें झुलविले. समाजसुधारणेचें कार्य अराष्ट्रीय होय अशी विचारसरणी कै. टिळकांनीच प्रचलीत करून दिली. आज जे टिळकशिष्य म्हणवितात त्यांची हीच विचारसरणी आहे. काळ बदल्यामुळें व मागासलेल्या वर्गात जागृति होऊं लागल्यामुळें त्यांना अर्थातच आपला पवित्रा बदलावा लागला आहे. पण या परंपरेचा देह स्वभाव मात्र अद्याप बदलला नाही, व सहजासहजीं तो बदलेल अशी आशाही नाहीं.

३ या परंपरेच्या तावडींत कोणीही सांपडो, तो माणुसकीला मुकावयाचा असा अनुभव आहे. मग तो ब्राह्मण असो, पारशी असो, ख्रिश्चन असो अगर दलित अस्पृश्य वर्गांपैकीं असो. तो राजकीय स्वातंत्र्याच्या लंब्याचवड्या बाता मारील. पण समाजसुधारणेच्या क्षेत्रांत मात्र त्याच्या मनाची गति चालणार नाहीं. चाललीच तर काळकामवेगाच्या उदाहरणांत अ ज्याप्रमाणें चार मैल पुढे जातो व दहा मैल मागें येतो त्याप्रमाणें चालेल. हल्लीं या परंपरेनें जी हिंदुसंघटनाची चळवळ चालविली आहे, तिच्यावरून हीच गोष्ट द्दष्टोत्पत्तीस येते. हिंदुसंघटनाचें कार्य हें वास्तविकपणें प्रगतिसूचक आहे. पण या परंपरेनें जी हिंदुसंघटनाची चळवळ चालविली आहे, तिच्यावरून हीच गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते. हिंदुसंघटनाचे कार्य हें वास्तविकपणें प्रगतिसूचक आहे. पण या परंपरेनें, हिंदुसंघटनाच्या मिषाने ब्राह्मणी धर्माची पकड हिंदुसमाजावर कायम करण्यासाठी ही चळवळ हातीं घेतली आहें. अशा तऱ्हेनें, पुरोगतींत पुच्छगती साधणारी ही परंपरा, हिनेंच महाराष्ट्रातील समाजसुधारणेचे कार्य अत्यंत दुष्कर करून ठेवले आहे. इतर प्रातांतील सुधारकांना सरळ व प्रामाणिक पुराणमतवादाशीं झगडावें लागतें. पण महाराष्ट्रीय सुधारकांना पुराणमतवादाचा बुरखा सोयीखातर पांघरणाऱ्या या परंपरेला लाथाडीत मार्ग काढावयाचा आहे. या परंपरेनें पछाडलेले लोक काँग्रेसमध्ये शिरोत, हिंदु सभेंत उपस्थित होवोत, अगर स्वातंत्र्यसंघात घुसोत, तेथें तेथें ते आपल्या शेपटाचा वाकडेपणा दाखविल्याशिवाय रहात नाहींत. हिंदी स्वातंत्र्यसंघाच्या महाराष्ट्रीय शाखेच्या जाहीरनाम्यावरून ही गोष्ट दृष्टोपत्तीस येते.

४ बंगालशाखेच्या जाहीरनाम्यांत राजकीय पारतंत्र्याइतकाच सामाजिक दास्यत्वाच्या उच्चाटणावरही जोर दिला आहे. पण महाराष्ट्र शाखेनें मात्र या बाबतींत मूकवृत्ति धारण केली आहे. अस्पृश्य समाजाला सामाजिक हक्क मिळवून देणें असा एक उद्देश या संघाच्या कार्यक्रमांत ग्रंथित करण्यांत आला आहे.

पण अस्पृश्यसमाजानें स्वत:साठी जर कांहीं राजकीय सवलती मागितल्या तर मात्र तो जातिनिष्ठ ठरून या संघाच्या रोषाला पात्र होणार ! कारण जातिनिष्ठ चळवळींना विरोध करणे हाही या संघाचा एक मुख्य उद्देश आहे. स्वातंत्र्यसंघाचे प्रणेते पं. जवाहिरलाल यांचाही जातिनिष्ठ चळवळींना विरोध आहे. पण जातिनिष्ठ चळवळींच्या सदरांत ते अस्पृश्यांच्या किंवा ब्राह्मणेतरांच्या चळवळींना ओढीत नाहींत. या सामाजिक हक्कांच्या चळवळीं आहेत हें त्यांना समजलें आहे पण टिळक परंपरेनें ग्रासलेल्या महाराष्ट्रीय स्वातंत्र्यसंघाच्या सभासदांना मात्र हें कळणार नाहीं. आणि विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, या संघाचे कांहीं सभासद ब्राह्मणसभेचे सभासद आहेत ! वास्तविक खरी जातिनिष्ठ संस्था जर कोणती असेल तर ती ब्राह्मण सभा होय. ब्राह्मणेतर किंवा अस्पृश्य यांच्या चळवळींत जर जातीयता असेल तर ती संरक्षक स्वरूपाची (Defensive) आहे. आपले मानवी हक्क ब्राह्मणेतरांना व अस्पृश्यांना मिळवायचे आहेत. दुसऱ्या कोणाचे हक्क लुबाडून त्यांना आपले दास करण्याचा त्यांचा हेतु नाहीं. पण टिळक परंपरेच्या दृष्टीने या स्वहक्क-संपादन-रक्षणाच्या चळवळी जातिनिष्ठ ठरतात; व आपल्या जातिश्रेष्ठत्वाचा डळमळता डोलारा परत स्थिरस्थावर करण्यासाठीं ब्राह्मणांनी स्थापन केलेली ब्राह्मण सभा मात्र राष्ट्रीय ठरते ! म्हणूनच ब्राह्मण सभेचे सभासद जातीयत्वाचें वावडें असलेल्या स्वातंत्र्यसंघाचे सभासद होऊं शकतात ! या संघावर टिळक, चिपळूणकर परंपरेचा पगडा बसलेला नसता, तर अर्थांतच असा प्रकार झाला नसता. डॉ. रवींद्रनाथ टागोर,[†] देशबंधु दास वगैरेंच्या बंगाल प्रांतातील स्वातंत्र्यसंघात असा प्रकार झाला नाहीं. त्या संघानें जातिबद्ध पौरोहित्यावर हत्यार उपसलें आहे, व सहभोजन, मिश्रविवाहद्वारा समाज समतेचा पुरस्कार केला आहे. पण महाराष्ट्रीय स्वातंत्र्यसंघाने हे प्रश्न अचूक वगळले आहेत. कांहीं आरसे असे असतात कीं, त्यात प्रतिबिंब पडायचे तें सरळ न पडतां वेडेवाकडें पडतें. पं. जवाहिरलाल नेहरूंच्या तत्वाची हीच स्थिती महाराष्ट्रांत झाली आहे.

५ आश्चर्य हें कीं, अस्पृश्यसमाजाच्या वतींनें सायमन कमिशनशीं सहकार्य केल्याबद्दल हेंच लोक आम्हांला देशद्रोही म्हणत असतात. वास्तविकपणें खरे देशद्रोही हेच होत. आपल्या स्वार्थासाठीं देशातील एका मोठ्या समाजाला दलितावस्थेंत डांबून ठेवणारे हेच लोक होत. यांनाच आम्हीं ब्राह्मण्यग्रस्त म्हणतों. ब्राह्मण्य हें निव्वळ सामाजिक आहे असें नाहीं. सामाजिक स्पर्शास्पर्शाच्या भावनेशिवाय राजकीय जातिवर्चस्वाचा ब्राह्मण्यांत अंतर्भाव होतो.

---

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक–११.

किंबहुना आजच्या ब्राह्मण्याच्या अंतरंगाचा ठाव शोधल्यास तेथे जातिवर्चस्वाची लालसा जितक्या प्रमाणांत दिसून येईल, तितक्या प्रमाणांत स्पर्शास्पर्शाची भावना आढळणार नाहीं. आजच्या ब्राह्मण्यग्रस्तांना जर कसली चिंता लागली असेल तर ती शिवाशीवीचा धर्म टिकविण्याची नसून आपलें जातिवर्चस्व अबाधित ठेवण्याची होय. यांच्या जातिवर्चस्वाच्या बुरुजाला सुरंग लागणार तो अस्पृश्यसमाजांतूनच हें त्यांना कळत आहे; व म्हणूनच अस्पृश्यसमाजावरचा सामाजिक बहिष्कार उठविणें त्यांच्या जिवावर आलें आहे. ब्राह्मणेतर बहुजनसमाजाचें अज्ञान व तज्जन्य धर्ममूढपणा त्यांच्या पथ्यावरच आहेत. ब्राह्मणेतरांकडून अस्पृश्यांना परस्पर पायबंद लागतो, म्हणूनच हे ब्राह्मण्यग्रस्त लोक ब्राह्मणेतरसमाजाच्या धार्मिक दुराग्रहाच्या नाड्या सैल करण्यास नाखूष असतात.

६ ब्राह्मणेतरसमाज अद्याप शिवाशिवीच्या धर्माचा गुलाम आहे हें आम्हांला कबूल आहे. पण प्रयत्न केल्यास त्याचें मन वळवणें फार सोपें आहे. दादरच्या लोकहितवादीसंघानें परवां जो नवरात्रोत्सव साजरा केला त्यांत अस्पृश्यांनी स्पृश्यांबरोबर समानतेच्या नात्यानें भाग घेतला होता. देवीची पूजा व आरती करण्यासही स्पृश्यांनीं अस्पृश्यांना हरकत घेतली नाहीं पण दादरच्या सार्वजनिक गणेशोत्सवांत जेव्हां अस्पृश्यांनी समानतेच्या हक्कांची मागणी केली तेव्हां, अस्पृश्यांना मुक्तद्वार ठेवल्यास स्पृश्य लोक पिसाळतील, मारामाऱ्या होतील, मुर्दे पडतील, रक्तपात होईल अशी भीति त्या उत्सवाच्या ब्राह्मण्यग्रस्त चालकांनी घातली. पण नवरात्रोत्सवांत यांपैकी एकही प्रकार घडला नाहीं. अथपासून इतिपर्यंत कोणीहि स्पृश्य इसम अस्पृश्यांबरोबर मारामारी करण्यात उद्युक्त झाला नाहीं. सांगण्याचा हेतु एवढाच कीं, दोष आहे तो स्पृश्य बहुजनसमाजाचा नसून, त्याचे पुढारी म्हणविणारांचा आहे. स्पृश्यवर्गीय पुढाऱ्यांनी मनापासून प्रयत्न केल्यास, शिवाशिवीच्या धर्माचा नायनाट होण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं.

७ पण अंदरकी बात अशी आहे कीं, त्यांना तसे प्रयत्नच करावयाचें नाहींत. याचें कारण त्यांचें ब्राह्मण्य होय. कोणतीही सार्वजनिक नांवाखालीं खपणारी संस्था घ्या, अगर कोणतीही सार्वजनिक चळवळ घ्या. त्यांत या ब्राह्मण्यग्रस्तांचें संख्याधिक्य असलेलें दिसून येईल. या लोकामुळेंच सर्व चळवळींचा विचका होऊन गेला आहे. जर एखाद्या चळवळींत यांच्या ब्राह्मण्याचा वरचष्मा रहात नसेल तर त्या चळवळीचे तीनतेरा वाजविण्यास हे केव्हांच मागेंपुढें पहात नाहीं. घरीं दारीं, देवळीं, बिऱ्हाडी इतकेंच नव्हे तर स्मशानांतसुद्धा यांचें ब्राह्मण्य यांना पाहिजे. आमचे ब्राह्मण्य जर स्वराज्यांत टिकणार नसेल तर तें स्वराज्य आम्हांला मुळींच नको असें म्हणण्यापर्यंतही यांची मजल गेलेली आहे. आणि

हे ब्राह्मण्य म्हणजें काय ? तर बहुजन समाजाच्या अज्ञानावर आधारलेलें यांचे जातिवर्चस्व, पण तें टिकूं देण्यास आतां दलितवर्ग तयार नाहींत, व यांचा तर तें टिकविण्याचा संकल्प आहे. स्वतःच्या जातिवर्चस्वासाठीं देशांतील बहुसंख्य समाजांच्या माणुसकीचा बळी घेऊं पहाणारे हे लोकच खरे समाजकंटक व राष्ट्राचे कुलांगार होत. या लोकाचें अस्तित्व म्हणजे सैतानानें हिंदुस्थानला दिलेला शाप असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं.

८. याच राष्ट्रद्रोही दुर्जनांनीं महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटींत राजकारणापासून धर्माची फारकत करण्याच्या मिषानें अस्पृश्यतेचा प्रश्न कॉंग्रेसच्या कार्यक्रमांतून काढून टाकण्याचा प्रयत्न केला. पण यांचा खरा राष्ट्रदोह निराळाच आहे. तो पहायचा झाल्यास हिंदुसभेकडे वळलें पाहिजे. मूठभर मुसलमानापासून महान् हिंदुजातीचें रक्षण करण्यासाठीं ही चळवळ सुरू करण्यांत आली आहे, असें सांगण्यांत येतें. पण वास्तविक प्रकार निराळाच आहे. जर या लोकांना खरोखर संघटना करायची असती तर विघटणाजनक असा जो शिवाशिवीचा धर्म त्याची हकालपट्टी त्यांनी अगोदर केली पाहिजे होती. पण या बाबतींतील त्यांचे प्रयत्न किती उथळ स्वरूपाचे व अविश्वनीय आहेत हें आतां सर्वांना कळलें आहे. त्यांचा सारा जोर शुद्धीच्या चळवळीवर आहे. परधर्मांतील कितीशीं मेंढरें शुद्ध होत्सातीं या विषमतेच्या चिखलांत लोळायला येत असतील व कांहीं आलीच तर किती दिवस रहात असतील हा प्रश्नच आहे. पण तूर्त आपणाला त्याच्यांशी कर्तव्य नाहीं. या चळवळीचा हेतु कोणता एवढेंच आपणांस पहावयाचें आहे. कोणत्या तरी उपायानें महान् हिंदुजातीची लोकसंख्या वाढविणें हाच तो हेतु होय. त्यायोगे यांच्या जातिवर्चस्वाचें आयुष्य आणखी थोडे दिवस वाढणार आहे. म्हणजे ही चळवळ शुद्ध राजकीय स्वरूपाची आहे. अज्ञ व धर्मवेड्या बहुजन समाजाचा पाठिंबा मिळविण्यासाठीं तिच्यांत धर्म घुसडण्यांत आला आहे. या ब्राह्मण्य ग्रस्तांनी पूर्वी कॉंग्रेसमध्ये धुमाकुळ घातला होता. पण म. गांधींच्या चळवळीमुळें त्यांचें तेज तेथें पडेनासें झालें, व कॉंग्रेसमार्फत ब्राह्मणी स्वराज्य किंवा ब्राह्मण्यग्रस्तांच्या भाषेंत बोलायचें म्हणजें हिंदुपदपातशाही स्थापन करण्याची त्यांची आशा समूळ नष्ट झाली. इकडे दलितवर्गांतही जागृति होऊं लागली. अशा स्थितींत आपल्या जातिवर्चस्वाची पकड स्पृश्यास्पृश्य समाजावर कायम ठेवण्यासाठीं त्यांनीं ही हिंदुसभेची चळवळ हातीं घेतली आहे, व तिच्यामार्फत बहुजन समाजाचा धर्ममूढपणा चिरस्थायी करण्यास त्यांनी कंबरा कसल्या आहेत. आपल्या स्वार्थासाठीं हे ब्राह्मण्यग्रस्त बहुजन समाजाचा म्हणजेच राष्ट्राचा द्रोह करण्यास कसे मागें पुढें पहात नाहींत, याचा आणखी कोणता पुरावा पाहिजे ?



---

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. १६ नोव्हेंबर १९२८.

# ८०

# महार वतन बिलावरील कांहीं आक्षेप

गतवर्षी '' महार आणि त्यांचें वतन '' या विषयावर आम्ही चार अग्रलेख लिहिले; व त्यांत महारांचा वतनापासून कसा अधःपात झाला आहे व तो टाळण्याकरितां वतनाच्या कायद्यांत कोणत्या सुधारणा करणे अवश्य आहे याचें सांगोपांग विवेचन आम्ही केले. या लेखमालेंतून जेव्हां वतनाविषयींचे आमचे विचार आम्ही प्रदर्शित केलें तेव्हां आम्हाला असें भय वाटत होतें कीं, महार लोकांचा आम्ही सुचविलेल्या सुधारणांच्या बाबतींत विरोध होईल. ती आमची अपेक्षा खरी ठरली. ''वतनावर गदा '' या मथळ्याखालीं कांही बेअकली लोकांनी एक हस्तपत्रक प्रसिद्ध करून तें महार लोकात वाटलें; व कांही ठिकाणीं महार लोकांचा गैरसमज करून त्यांच्या करवी एकदोन निषेधपर सभाहि त्यांनीं भरविल्या. पण महार लोकांची जी कांही विरोधी वृती सुरवातीस दिसत होती ती आतां अगदीं साफ निवळून गेली आहे. आणि वतन बिल कायदे कौन्सिलांत मांडण्याचे पूर्वी महार लोक जे विरूद्ध होतें ते आतां झाडून एकमतानें बिलाला पाठिंबा देत आहेत. या बिलाला आतां जो विरोध होत आहे तो अगदीं अनपेक्षित दिशेकडून होत आहे. महार लोक जेव्हां या बिलास विरूद्ध होते त्यावेळीं आमच्या स्पृश्य बंधूंनीं आम्हांस मोठा आधार दिला. वतनावरच्या आमच्या विचारांचे त्यांनी समर्थन केलें. इतकेंच नव्हें तर '' वतनावर गदा '' म्हणून ओरडणाऱ्या महार भाईंच्या मूर्खपणाचें माप त्यांनीं त्यांच्या पदरांत घातलें. परंतु बिलाचें पहिलें वाचन पास झाल्यानंतर आमच्या स्पृश्य बंधूंची दृष्टि या बिलाच्या बाबतींत अगदी उलट होत चाललेली आहे. बिल कौन्सिलमध्यें आणण्यापूर्वी ज्यांनीं आमच्या विचारास पूर्ण संमति दिली होती ते बिलाच्या पहिल्या वाचनानंतर थोडासा विरोध दर्शवू लागले आहेत. हल्लीं हें बिल कौन्सिलच्या निवडक सभासदांच्या एका कमिटीकडे सोंपविण्यांत आलें आहे. या कमिटीचा रिपोर्ट आल्यानंतर दुसऱ्या व तिसऱ्या वाचनांकरितां तें बिल कौन्सिलपुढें येऊन काय तो शेवट लागणार आहे. विरोधकांच्या म्हणण्यांत कांही हंशील असल्यास त्याचा योग्य तो विचार कमिटीकडून झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु हे आक्षेप जनतेंत तसेच पसरूं दिल्यास बिलाविरूद्ध लोकांचीं मनें निष्कारण कलुषित होणार आहेत. तसें न व्हावें म्हणून वरील आक्षेपांचें निरसन करून झालेला गैरसमज दूर करणें कार्यसिद्धीच्या दृष्टीनें आम्हांस आवश्यक वाटतें. यास्तव त्याच विषयावर आज पुनः आम्ही लिहीत आहोंत.

## या विरोधकांचा मुख्य कटाक्ष बिलाच्या सहाव्या कलमावर आहे.

या सहाव्या कलमाचें स्वरूप कसें आहे, हे बिलाचा मराठी तर्जुमा जो आजच्या अंकांत दुसरीकडे छापण्यांत आला आहे† त्यावरून स्पष्ट होईल. या सहाव्या कलमाप्रमाणें वतनदार महारांनीं धान्यरूपानें मिळावयाचें बलुतें द्रव्यरूपानें मिळावें असा कलेक्टरकडे अर्ज केला तर तशी अंमलबजावणी कलेक्टरनें करावी व सदर बाब शेतसाऱ्याबरोबर वसूल करून तिचें उत्पन्न सरकारी तिजोरींतून महार वतनदारांना देण्यांत यावे असें सहाव्या कलमाच्या पहिल्या पोटकलमांत सांगितलें आहे. जेथें हे बलुतें सरकारच्या व रयतेच्या नोकरीबद्दलचा मोबदला म्हणून ठरलें गेलें असेल तेथें त्याच्याऐवजीं मागितलेल्या नगदी वेतनापैकी सरकारी नोकरीबद्दल किती व रयतेच्या नोकरीबद्दल किती ते ठरवून देण्याविषयी कलेक्टरकडे अर्ज करण्यांत आला तर तशी व्यवस्था कलेक्टरनें करावी. हा पोटकलम २ याचा मतलब आहे. पोटकलम ३ यांतील मागणी अशी आहे कीं रयतेची नोकरी करणें वतनदार महारांच्या मर्जीवरच अवलंबून आहे. मात्र त्यांनीं रयतेची नोकरी करण्याचें सोडलें तर रयतेच्या नोकरीबद्दलचा नगदी वेतनाचा जो भाग ठरला गेला असेल त्यावर त्यांचा हक्क राहणार नाही. वरीलप्रमाणें बिलाच्या ६ व्या कलमाचें स्वरूप आहे. यावर आक्षेप घेणारांमध्ये पुण्याचा " शेतकरी संघ," अहमदनगरचा "दीनमित्र " व बेळगांवचा "राष्ट्रवीर" या त्रयींची प्रामुख्यानें गणना करणें प्राप्त आहे. त्यांच्यामतें कलम ६ यांत सुचविलेली व्यवस्था अंमलात आली तर या कलमान्वयें

## शेतकऱ्यांवर एक नव्या कराची धोंड बसेल.

आम्ही या बाबतींत शक्य तेवढा विचार केला आहे. परंतु ६ व्या कलमानें शेतकऱ्यांवर नवा कर लादला जाईल या म्हणण्यास कोणता आधार आहे तो आम्हांला दिसत नाहीं. या ६ व्या कलमावर यांचा एवढा कटाक्ष असण्याचें कारण या कलमांत महारांना रयतेची नोकरी नाकारण्याचा अधिकार दिला असतां सरकारी कामापुरतां रयतेपासून बलुतें मागण्याचा हक्क राखून ठेवण्यांत आला आहे हें होय. राष्ट्रवीरकारांच्या मतें "वतनदार महारांना शेतकऱ्यांकडून जो बलुता मिळतो तो प्रामुख्यानें रयतोपयोगी नोकरीकरितांच होय. सरकारी नोकरीसाठी त्यांना पाटील, कुळकर्णी व सनद्यांप्रमाणेंच जमिनीच देण्यांत आलेल्या आहेत." अर्थात् महारांना रयतेचीं कामें न करतां रयतेपासून बलुते मग तें कोणत्याहि अंशानें कां होईना मागण्याचा हक्क देणें हें विनाकारण रयतेवर नवा

† पाहा, परिशिष्ट क्रमांक–४२.

बोजा लादण्याचा अन्याय करणें होय असें त्यांना वाटतें. बलुतें कशाकरिता देण्यांत येतें याबद्दल राष्ट्रवीरकारानीं जे मत जमेस धरलें आहे तें मत खरें असेल तर कलम ६ हे अन्यायकारक आहे असें आम्हीहि कबूल करूं. परंतु खोट्या समजुतीमुळें राष्ट्रवीरकार न्यायाला अन्याय म्हणत नसतील कशावरून? या दोन्हींपैकी कोणती गोष्ट खरी आहे हें निश्चित होण्यापूर्वी बलुतें कशाकरिता देण्यांत येतें हे ठरविणें अवश्य आहे. बिलांतील ६ व्या कलमाची उभारणी करतांना जें मत जमेंस धरण्यात आलें आहे तें मत हें कीं, बलुतें हें सर्वस्वी रयतेच्या कामांसाठी किंवा सर्वस्वी सरकारी कामांसाठी नसून तें दोन्हीं प्रकारच्या नोकरीसाठी आहे. हें आमचे मत राष्ट्रवीरकारांच्या मतापासून भिन्न आहे हें सांगावयास नको. या दोन मतांपैकीं आमचें मत जर खरें ठरलें तर रयतेंचे काम न करणाऱ्या महारांना सरकारी कामांपुरतें जेवढें बलुते जाईल तेवढेच बलुते रयतेपासून मागण्याचा हक्क देण्यांत आला तर त्यामुळें रयतेवर विनाकारण बोजा पडला, असें कोणासहि म्हणतां यावयाचे नाही. कुळकर्णी वतनाची विल्हेवाट लावताना ज्या सवलती त्यांना देण्यात आल्या त्याची आणि महार वतन बिलाच्या सहाव्या कलमाची तुलना केली तर हें बिल किती न्यायबुद्धीनें घडविण्यात आले आहे याची कल्पना होईल. कुळकर्णी लोकांचे वतन ज्या ता. ३० मे १९१४ च्या नं. ५०७० च्या सरकारी ठरावानें खालसा करण्यांत आले त्या ठरावाच्या पहिल्या कलमांत असें म्हटलें आहे कीं "सन १९१३-१४ सालात अदा केलेले आकारणीचे (जमीन महसूल वसूल करण्याबद्दलच्या मुशाहिऱ्याचे) व घोटगीचे एक तृतियांश इतकी नेमणूक, जोपर्यंत वतनाचा पुरुष वारस म्हणजे सिधा किंवा तेढा, अगर वतनदार घराण्यापैकी अथवा वतनदार घराण्याबाहेरील दत्तक,—असा कोणीहि असेल तोंपर्यंत निरंतर म्हणून, वारचे वतनदार, त्याचे सिधे अगर तेढे वारस घराण्यांतील अगर वतनदार घराण्याबाहेरील दत्तक, व त्याचे वारस यांस इंग्रज सरकारांतून चालविली जाईल." या ठरावान्वये कुळकर्णी सरकारी नोकरी करीत नाहीत तरी पण त्यांच्या वतनाच्या जमिनी त्यांच्याकडे राहिल्या इतकेंच नव्हें तर कांहीएक काम न करतां १९१३-१४ सालीं अदा झालेल्या मुशाहिऱ्याचा एक तृतियांश भाग त्यांना फुकटांत मिळतो !! हा आम्हास तरी अन्याय वाटतो. मग आमच्या कुळकर्णी लिलामृतकारांस काय वाटते कोण जाणें. महारांच्या हक्कांच्या विरूद्ध गिल्ला करणाऱ्या लोकांनी याचा विचार करणें अवश्य आहे. त्यामानानें पाहतां बिलाच्या सहाव्या कलमांत कसलाच अन्याय नाही असें आमचे स्पष्ट मत आहे. रयतेचें काम न करणाऱ्या महारांना

आतां मिळतें तेवढे सारे बलुतें मागण्याचा हक्क या बिलात दिला असतां तर तो अन्याय झाला असता. तसा अन्याय होऊं नये म्हणूनच बलुत्याची विभागणी करून सरकारी कामें करणाऱ्या महारांना फक्त सरकारी कामांपुरताच बलुत्याचा अंश मिळावा, असे कलम घालण्यात आले आहे. रयतेचें कांही होवो, महारांची पोळी पिकावी या स्वार्थबुद्धीनें जर या बिलाची घटना करण्यांत आली असती तर बलुत्याच्या विभागणीचे कलम या बिलांत मुळी घालण्यांतच आले नसतें. आम्ही जें मत जमेंस धरलें आहे तें मत अगदी अश्रुत असून महार व सरकार संगनमत करून ते बळेंच शेतकऱ्यांच्या नरड्यांत कोंबण्याचा प्रयत्न या बिलाच्याद्वारे करीत आहेत तेव्हां सावध रहा असा इषारा सर्व शेतकरीवर्गास राष्ट्रवीरकार देत आहेत. असलें सपशेल चुकीचें विधान राष्ट्रवीरपत्राच्या बहुश्रुत संपादकाकडून केलें जावें, याचें आम्हांस आश्चर्य वाटते! आम्ही जें मत जमेस धरून बिलाची मांडणी केली आहे त्याला मुख्य आधार म्हणजे मुंबई सरकारचा सन १८९९ चा नंबर ३०७४ चा सरकारी ठराव हा होय. या ठरावांत स्पष्टपणे जाहीर करण्यात आलें आहे की, "महारांना द्यावयाचें बलुतें हें फक्त रयतेच्या कामांकरिता आहे, असें म्हणण्यास कांहीच आधार नाही. वतन ॲक्टाच्या १८ व्या कलमांत ज्या कामांबद्दल महारांना बलुतें द्यावयाचें असतें त्या कामांत सरकारी कामाचाहि समावेश होतो." हा ठराव कांही महारांनी केला नाहीं किंवा तो महारांना कांही फाजील हक्क द्यावेत म्हणून करण्यांत आलेला नाही. तो केवळ वस्तुस्थितीचा निदर्शक म्हणून करण्यांत आला आहे. हा ठराव मुंबई सरकारचा असल्यामुळे मुंबई इलाख्यापुरता लागू असला तरी वऱ्हाड व मध्यप्रांतात महारकी वतनाची सुधारणा करण्याकरिता जी कमिटी १९२० साली नेमण्यांत आली होती त्या कमिटीने महारकी वतनाची परिस्थिती दोन्ही प्रांतात सारखी असल्यामुळें याच ठरावाचा आधार घेऊन वऱ्हाडांतहि सरकारी कामांकरिता रयतेपासून बलुता घेणें अगदी रास्त आहे, असा निकाल दिला. जोपर्यंत हा ठराव जारी आहे तोपर्यंत आमची बाजू रास्त आहे व राष्ट्रवीरकारांची बाजू लंगडी आहे, हें उघड आहे. या ठराव्याच्या यथार्थतेबद्दल अनेक वेळा तक्रारी करण्यांत आल्या होत्या. पण त्या सरकारनें केव्हांच मान्य केल्या नाहींत. १९२२ सालीं या संबंधींचा जो शेवटचा ठराव प्रसिद्ध झाला आहे त्यातहि १८९९ चा ठराव अगदी रास्त आहे, असें सरकारतर्फे ठासून सांगण्यांत आले आहे. या सरकारी ठरांवात जें मत व्यक्त करण्यात आले आहे ते सर्वानींच मान्य करणे अवश्य आहे, असें आम्हास वाटतें. कारण तें मत अमान्य करून, राष्ट्रवीरकारांचे मत ग्राह्य धरले तर केवढा अनर्थ ओढवेल याची कल्पना करणें अशक्य आहे. सरकारी कामासाठी जमीन आणि रयतेच्या कामासाठी बलुतें अशी महारवतनाची व्यवस्था

आहे, असा जे लोक आग्रह धरतात त्याना आम्ही असें विचारतों कीं, सोलापूर जिल्ह्यांत बार्शी तालुक्यांत, सातारा जिल्ह्यांतील जावळी खोऱ्यांत व ठाणा, कुलाबा व रत्नागिरी या कोंकणच्या तीनही जिल्ह्यांत महार सरकारी कामें करतात. पण त्यांना इनामी जमिनी नाहीत. रयतेनें दिलेल्या बलुत्याशिवाय त्याना कसलाच मुशाहिरा नाही. अशा ठिकाणी रयतेच्या कामांसाठी बलुते आणि सरकारी कामासाठी जमीन हा राष्ट्रवीरकारानीं बांधलेला ठोकताळा लागू पडणें अशक्य आहे. अशा ठिकाणी बलुते हे रयत व सरकार या उभयतांच्या कामांसाठी आहे, असेंच मानलें पाहिजें. नाही तर अशा ठिकाणी सरकारी कामासाठी महारांना कांहीच मोबदला मिळत नाही, अशा वेडगळ मताचा स्वीकार करावा लागेल. वरील विवेचनावरून स्पष्ट होईल कीं, बलुते हें फक्त रयतेच्या कामांसाठीच आहे, हा समज अगदी खोटा आहें. आणि हा खोटा समज जे सोडून देतील त्यांना बिलाच्या सहाव्या कलमात कसलाच अन्याय दिसणार नाही. खुद्द राष्ट्रवीरकार देखील बलुतें हे सर्वस्वी रयतेच्या कामांसाठी असतें, असें निखालसपणें म्हणत नाहीं. तसें जर त्याचे म्हणणें असतें तर शेतकऱ्यांनी बिलास विरोध करावा, असें जें त्यानी सांगितले आहें, तें सांगणे वास्तविक आहे असें आम्ही मानले असते. परंतु ते स्वतः बलुते हे 'प्रामुख्याने ' रयतेच्या नोकरीसाठी आहे असें म्हणतात. अर्थात बलुत्याचा काही भाग सरकारी नोकरीसाठी आहे हें त्यांच्या शब्दांवरुनच ठरत आहे. आम्ही तरी बलुतें हें सर्वस्वी सरकारी नोकरीसाठी आहे, असें केव्हाच म्हटले नाही. त्याचा कांही भाग सरकारी नोकरीसाठी आहे इतकाच आमचा आग्रह आहे. आमच्यांत व राष्ट्रवीरकारांत जो भेद उरला आहे तो तपशिलाचा भेद आहे. बलुत्याचा काही भाग, प्रामुख्यानें किंवा अल्पांशाने, सरकारी नोकरीसाठी आहे, हें दोघांसही कबूल आहे. असें असतांना सहाव्या कलमानें शेतकऱ्यांवर नवाच बोजा बसतो असा गिल्ला करून शेतकऱ्यांनी या कलमास विरोध करावा अशी सल्ला राष्ट्रवीरकारांनी दिली, याबद्दल आम्हास सखेदाश्चर्य वाटतें !

महार वतन बिलांत दोष दाखविण्याच्या भरांत राष्ट्रवीरकारांनी कांही महत्त्वाचे प्रश्न लोकांपुढे मांडले आहेत. ते विचारतात, " कोणत्या तत्त्वानुरोधानें महारांकडून होत असलेल्या सरकारी नोकरीबद्दलचा भुर्दंड सरकार शेतकऱ्यांवरच लादीत आहे ? आज शेतकरी वर्ग जो शेतसारा देत आहे त्यांतूनच महारांचाहि मेहनताना कां भागविला जाऊं नये ? आणि महारांचा पगार स्वतंत्रपणे शेतकऱ्यांनींच द्यावा, हें एकदां गृहीत धरण्यात आलें तर पाटील, कुळकर्णी, सनदी पोलीस, इत्यादि गांवकामगारांचाहि पगार पृथकपणे शेतकऱ्यांवरच लादण्यात कोणती हरकत होईल ? " हे जे प्रश्न राष्ट्रवीरकारांनी विचारलेले आहेत ते

केवळ बिलाच्या विरुद्ध लोकांना चेतविण्याच्या इराद्याने विचारले आहेत, हे निर्विवाद आहे. ज्या कोणाला या प्रश्नांची योग्य उत्तरे कळतात त्याला हे प्रश्न गमतीचे आहेत, इतकेच वाटेल ! पण ज्यांना त्यांची उत्तरे देता येणार नाहीत त्यांची मने या बिलाच्या यथार्थतेबद्दल साशंक झाल्याशिवाय राहणार नाहीत. तसा संशय उत्पन्न होऊ नये यास्तव राष्ट्रवीरकारांच्या प्रश्नांची उत्तरे दिल्याखेरीज आम्हांस तरी गत्यंतर राहिले नाही. सरकारी नोकरांचा भुर्दंड शेतकऱ्यांवर लादणे, ही गोष्ट तत्त्वतः बरी आहे किंवा नाही, याबद्दल राष्ट्रवीरकारांचे काय मत असेल, कोण जाणे ! पण ज्या देशात शेतकरी वर्गाखेरीज दुसरा म्हणण्यासारखा उत्पादक वर्ग नाही त्या देशांत सरकारी नोकरांचा भुर्दंड शेतकऱ्यांवर न पडावा तर कोणावर पडावा हे राष्ट्रवीरकार सांगतील तर फार बरे होईल ! गरीब शेतकऱ्यांवर कराचा बोजा न पडता तो श्रीमंत शेतकऱ्यांवर पडावा, या तत्त्वाला आमची नुसती शाब्दिक मान्यता आहे एवढेच नव्हे तर त्या तत्त्वाचे आम्ही कट्टे पुरस्कर्ते आहोत. पण शेतकऱ्यांवर करभार बसेल अशी कोणतीही गोष्ट करू नये असे म्हणणारा जो एक नवीन पक्ष अस्तित्वांत आला आहे तो पक्ष अगदी खुळा आहे असे आमचे मत आहे. त्यांच्या म्हणण्यात आम्हास कांही तत्त्वही दिसत नाही किंवा मोठेसे राजकारणहि दिसत नाही ! कारण शेतकऱ्यांवर कर ठेवल्या शिवाय त्यांचे कल्याण करण्याची बोलकी विद्या आम्हास अवगत झाली नाही. शेतकऱ्यांना जर सुव्यवस्थित राज्यकारभार हवा असेल तर त्याचा खर्च त्यांनी सोसलाच पाहिजे. आणि सुव्यवस्थित राज्यकारभार चालण्यास महारांची जरूरी असेल तर त्यांचाहि खर्च यांनी भरला पाहिजे. पाटील, कुळकर्णी यांचाहि पगार शेतकऱ्यांतून दिला जातो, आणि महारांचा तेवढा पगार पृथकपणे शेतकऱ्यांवरच लादण्यात येतो हे राष्ट्रवीरकारांना मोठे विचित्र वाटते ! १८३९ सालापूर्वी पाटलांच्या व कुळकर्ण्यांच्या पगाराची जी पद्धत होती ती राष्ट्रवीरकारांनी लक्षात आणली असती तर हा प्रश्न त्यांनी मुळी विचारलाच नसता. १८३९ सालापूर्वी पाटील व कुळकर्णी ह्या गांवकामगारांना पगार मिळावयाचा तो महारांप्रमाणे बलुत्याच्या रूपाने शेतकऱ्यांकडूनच मिळत असे, ही गोष्ट ध्यानात न घेणे, ही राष्ट्रवीरकारांची पहिली चूक झाली आहे. ही चूक जर घडली नसती तर महारांचा पगार पृथकपणे आकारण्यात त्यांना विचित्र असे कांही वाटले नसते. मध्यवर्ती सरकारच्या खर्चासाठी शेतसारा घेऊन बाकीच्या खर्चाच्या बाबींसाठी शेतकऱ्यांवर वेगवगळ्या पट्ट्या आकारणे ही या देशातील राजमान्य करपद्धत होती, व ती इंग्रज सरकारने होता होईल तोपर्यंत चालू ठेविली होती. पाटील व कुळकर्णी हे अधिकारसंपन्न अंमलदार असल्यामुळे सत्तेच्या जोरावर शेतकऱ्यांपासून वाजवीपेक्षा फाजील

बलुते उकळतात असे दिसून आल्यामुळे १८३९ साली त्यांचा बलुते उकळण्याचा हक्क रद्द करण्यात येऊन त्यांना सरकारी तिजोरीतून पगार देण्याचा प्रघात सुरू करण्यात आला. तोच नियम महारांना लागू केला असता तर राष्ट्रवीरकारांना बोलण्यास जागा उरली नसती, व हे बील आणण्याचे कारणही पडले नसते. पण दयाळू इंग्रज सरकारला ते करावेसे वाटले नाही. महार पडला नोकर. तेव्हा पाटला प्रमाणे रयतेपासून जादा बलुते उकळील अशी कोणाला धास्ती वाटली नाही व रयत महारांना वेळेवर बलुते देत नाही म्हणून त्यांना सरकारकडून पगार द्यावा एवढा कनवाळूपणा इंग्रजसरकारांत नव्हता. या दोन्ही कारणांमुळे पाटलांचे बलुते जसे गेले तसे महारांचे बलुते गेले नाही. एकाच तक्त्यावर रंगविलेल्या चित्रांपैकी अर्धा भाग पुसला असतांना अवशेष भाग जसा विचित्र दिसतो, त्याच न्यायाने पाटलाचे बलुते गेल्यामुळे महारांचे राहिलेले बलुते विचित्र दिसते. पण मुळाशी पाहिले असता त्यांच्यात विचित्र किंवा भिन्न असे कांहीच नाही. पाटलाला शेतसाऱ्यांतून पगार मिळत असतांना, महारासाठीच शेतकऱ्यांवर निराळीच बलुत्यासारखी पट्टी ठेवणे, हे गैर नव्हे काय, असा जो राष्ट्रवीरकारांनी दुसरा प्रश्न ऊपस्थित केला आहे, त्या प्रश्नाला उत्तर म्हणून आम्ही असा उलट प्रश्न विचारतो की, पाटलाला शेतसाऱ्यांतून पगार मिळतो हे दृश्य खरे आहे, किंवा हा नुसता भास आहे ? शेतसाऱ्यांत कोणत्याही प्रकारची वाढ न करिता, म्हणजे रयतेला पाटलाचे बलुते माफ करून, पाटलांना सरकारी तिजोरीतून पगार देण्याची जबाबदारी सरकारने आपले शिरावर घेतली असे जर राष्ट्रवीरकारांचे म्हणणे असेल तर ती मोठी चूक आहे. शेतकऱ्यांवर जो शेतसारा बसविला जातो, त्या शेतसाऱ्यांत कोणकोणत्या पट्ट्यांचा समावेश करण्यात आलेला आहे, याचा विचार जर राष्ट्रवीरकारांनी केला असता तर त्याची चूक त्यांना दिसून आली असती. ज्या ज्या बाबीं साठी, पूर्व काळी निरनिराळ्या पट्ट्या शेतकऱ्यांवर बसविल्या जात असत त्या पैकी ज्या ज्या बाबीं इंग्रज सरकारने राज्य कारभार चालविण्यात अवश्य म्हणून मानल्या त्या त्या बाबी संबंधीची पट्टी शेतसाऱ्यांत, इंग्रज सरकारने सामील केली आहे, हे या इलाख्यांतील शेतसाऱ्याचा इतिहास ज्यास अवगत असेल त्यास मान्य करावे लागेल. पाटलाच्या मुशाहिऱ्याचाहि तोच प्रकार आहे. पाटलाच्या बलुत्याच्या प्रमाणात शेतसारा वाढ दिल्याशिवाय सरकारने पाटलांना पगार देण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली नाही. भेद इतकाच की, शेतसाऱ्यापैकी अमूक इतका भाग पाटलाच्या मुशाहिऱ्यासाठी आहे, असे स्पष्ट भाषेत सरकार म्हणत नाही. आणि म्हणून पाटलासाठी पृथक् पट्टी शेतकऱ्यांवर लादल्याचे दिसत नाही. परंतु तेवढ्यामुळे पाटलाच्या मुशाहिऱ्याचा बोजा शेतकऱ्यांवर पडत नाहीं, हें म्हणणें अगदी फोल व निराधार आहे.

या बिलाच्या सहाव्या कलमाला विरोध व्हावा अशी राष्ट्रवीरकारांची मनापासून इच्छा आहे. पण हें बिल अस्पृश्यवर्गाच्या हिताचें असल्यामुळें ब्राह्मणेतर पक्षाचे लोक खोटी माया धरून त्यास विरोध करण्यास कचरतील अशी त्यांना भीति वाटत आहे व म्हणूनच ते शेतकरीवर्गास आग्रहानें असें सुचवीत आहेत कीं या कामीं कांहीं मुरवत न धरतां बिनघोर विरोध करा. ही चेतावणी देतांना ब्राह्मणेतरपक्ष मोठा स्वार्थत्यागी आहे असें राष्ट्रवीरकारांना वाटत असले पाहिजे !! त्याशिवाय त्याला या ठिकाणी स्वार्थत्यागबुद्धी बाजूला ठेवण्याची सल्ला देण्याची आवश्यकता राष्ट्रवीरकर्त्यांना वाटली नसती. राष्ट्रवीरकारांच्या सल्ल्याप्रमाणें जरी ब्राह्मणेतरपक्षानें या बिलाला विरोध केला, तरी त्यानें अस्पृश्यांना मदत केली नाहीं असा दोषारोप आम्हीं त्यांच्यावर केव्हाच करणार नाहीं. ब्राह्मणेतर हे संन्यासी नाहींत हें आम्हाला माहीत आहे. त्यामुळें अस्पृश्यांच्या हितासाठी त्यांनीं आपल्या स्वार्थावर पाणी सोडले नाही तर त्यात वावगें तें काय आहे ? मद्रासेंत ब्राह्मणेतरपक्ष सत्ताधीश होण्यापूर्वी तेथील सरकारनें अस्पृश्यवर्गाची सुधारणा करण्याकरितां एक स्वतंत्र खातें उघडलें होते ; व त्या खात्यातर्फे अस्पृश्यांना लहानसहान तुकडे लागवडीस देऊन, त्यांचा एक स्वतंत्र शेतकरीवर्ग तयार करण्याचें काम उत्तम प्रकारें चालविलें होतें. पण ब्राह्मणेतरपक्षाच्या हातीं सत्ता आल्याबरोबर त्यांनीं हें खातेच नाबूद करून टाकलें. आणि तें त्यांनी कां करू नये ? मोठमोठ्या जमिनदार लोकांची सारी मदार मजुरांवर. ते मजुरच जर शेतकरी झाले तर इनामदारांच्या जमिनी कोण नांगरणार ? मद्रासेंतील ब्राह्मणेतरपक्ष हा मोठमोठ्या इनामदारांचा पक्ष आहे. ज्या अस्पृश्य मजुरांवर त्यांचीं सारी भिस्त तेच शेतकरी झाले तर ' यांचें कसें निभणांर ? ' जें मद्रास इलाख्यात घडलें तें मुंबई इलाख्यांतही घडण्यासारखें आहे. त्याला राष्ट्रवीरकारांचा सल्ला नको. आपल्या तोंडचा घांस काढून दुसऱ्यांच्या तोंडात कोणीच घालीत नाही. स्वार्थाच्या झगड्यांत भाऊ भावाची गय करीत नाही. मग ब्राह्मणेतरांनी अस्पृश्यांची गय करावी असें कोणत्या न्यायानें म्हणतां येईल ? ब्राह्मणेतर व अस्पृश्य हे एका नांवाखाली आहेत म्हणून अस्पृश्यांनी वाटेल तें मागावें व ब्राह्मणेतरांनी द्यावें, किंवा ब्राह्मणेतरांनी वाटेल तें मागावें व अस्पृश्यांनी द्यावें हा दुधखुळा न्याय आम्हासही मान्य नाहीं ; व म्हणूनच आम्ही राष्ट्रवीरकारांच्या व तदुप्रदेशानुयायी ब्राह्मणेतरांच्या कठोरपणाला मुळीच दोष देत नाहीं. आमचे इतकेंच सांगणें आहे कीं विरोध करायचा असेल, तर ज्या कारणांमुळे तुम्हीं विरोध करू चाहतां ती रास्त आहेत अशी खात्री करून घेऊन मग करा. चुकीचा समज करून घेऊन विरोध करू नका.

● ● ●

---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

# ८१

# देशभक्त लाला लजपतराय
# राजकारण व समाजकारण यांत क्रांतिकारक

१. देशभक्त लाला लजपतराय यास गेल्या महिन्याच्या १७ तारखेस एकाएकीं हृदयक्रिया बंद पडून मृत्यू आला ही गोष्ट नमूद करण्यास आम्हांला अत्यंत दु:ख होत आहे. सायमन कमिशन लाहोरला गेले असतां, त्याला परत जा म्हणून सांगण्याकरितां जी बहिष्कारवादी लोकाची चमू स्टेशनवर उपस्थित झाली होती, तिच्या अग्रभागीं लालाजी होते. गर्दी मागें हटविण्याचा प्रयत्न करीत असतां एका पोलीस अधिकाऱ्यानें लालाजींच्या छातीवर लाठी मारली. हा लाठीचा आघातच लालाजींचीं हृदयक्रिया बंद होण्यास कारणीभूत झाला असे डॉक्टरलोकांचे मत आहे. तें खरें असल्यास, असल्या उन्मत्त व राक्षसी वृत्तीच्या पोलीस अधिकाऱ्यांचा निषेध करावा तितका थोडाच आहे.

२. तें कांहीं असो. लालाजींच्या मृत्युमुळें देशांतील एक कर्तबगार पुढारी नाहींसा झाला यांत मात्र शंका नाहीं. हिंदुस्तानला राजकीय पुढाऱ्यांची वाण कधींच पडली नाही. पण लालाजीसारखे प्रामाणिक वृत्तीचे, स्वार्थ त्यागी व हातीं घेतलेल्या कामांत तनमनधन खर्च करणारे पुढारी फारच थोडे. पुढारीपणाला हपापलेले व त्याच्यासाठीं आपली सदसद्विवेकबुद्धी सैतानाला विकणारेच फार. यांच्या उक्तीकृतींत कमालीचा विसंगतपणा असायचा व तो लोकांच्या ध्यानांत आला म्हणजे 'मेंटल रिझर्वेशन' ची बात झोंकून हे मोकळे व्हावयाचे. पण लालाजींच्या आयुष्यक्रमांत हा प्रकार आढळत नाहीं. नर्सोपंती दुटप्पीपणा व अय्यंगारछाप लफंगेपणा, लालाजींना माहीत नव्हता. त्यांची कार्यक्षमता दांडगी होती. जास्त बडबड व गडबड न करतां धिम्मेपणानें अंगीकृत कार्य पार पाडणें यांत लालाजींच्या चारित्र्याचें वैशिष्ट्य आहे.

३. लालाजींचा जन्म पंजाब प्रांतांत एका गरीब वैश्य कुलांत १८६५ सालीं झाला. त्यांचे वडील आर्यसमाजी होते. त्यामुळें लालाजींना आरंभापासूनच उदारमतवादाचें बाळकडू पाजलें गेलें. आज आर्य समाजाला 'सनातन धर्मानें' गिळंकृत केलें आहे. पण त्या कालीं आर्यसमाज व 'सनातनधर्म' यांचा उभा दावा होता. कारण त्या कालीं आर्यसमाज मुसलमानांच्या अतिक्रमणापेक्षां जाति भेदादि हिंदुसमाजांतर्गत दोषांकडेच जास्त लक्ष देत असे. त्यामुळें जरी पुराण्या

लोकांना तो साहजिकपणेंच अप्रिय होता. पुराणमतवाद व आर्यसमाज यांच्या या लढ्यात लालाजींनीं आर्यसमाजाची बाजू घेतली, व त्या समाजाची तत्वें दृढमूल करण्यासाठीं त्यांनीं कांहीं मित्रांच्या सहाय्यानें १८८६ साली दयानंद अँग्लोवेदिक कॉलेजची स्थापना केली. त्यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाला आरंभ याच गोष्टीनें झाला. ही संस्था ऊर्जितावस्थेस आणण्यासाठीं त्यांनीं अविश्रांत मेहनत केली, व पुष्कळ स्वार्थत्याग केला. आज ही संस्था पंजाबांत एक प्रमुख शिक्षण संस्था म्हणून गणली जाते.

४. या नंतर ते राजकीय चळवळींतही भाग घेऊं लागले. पण इतर राजकीय चळवळ्यांप्रमाणें त्यांनीं राजकारण व समाजकारण यांची फारकत करून आपल्या पंगुपणाचें प्रदर्शन कधींचे केलें नाहीं. दोन्ही बाबतींत ते क्रांतिकारक होते. राजकीय चळवळींत पडल्यामुळें सरकारानें जेव्हां त्यांना अंदमानला पाठविलें, त्यावेळीं बऱ्याच पुराणमतवादी लोकांना आनंद झाला होता हें ध्यानात ठेवण्यासारखें आहे. सरकार व पुराणमतवादी लोक यांच्या विरोधातून अशा रितीनें लालाजींनीं आपला सार्वजनिक कार्यक्रम चालविला. पंजाबातील कांहीं स्पृश्यवर्गीय पुढाऱ्यांनीं चालविलेल्या अस्पृश्यांच्या स्पृश्यीकरणाच्या चळवळींत ते मनापासून भाग घेत. स्पृश्यवर्गीय लोकांनीं चालविलेल्या ' अस्पृश्योद्धारा ' च्या चळवळी आम्हांला जरी पूर्णतः समाधानकारक वाटत नसल्या, तरी लालाजींची सहानुभूती प्रामाणिकपणाची होती याबद्दल आम्हांला शंका वाटत नाहीं. आमच्या दृष्टीनें ती अपुरी असली तरी अविश्वसनीय खास नव्हती.

५. लालाजी हे उत्तम लेखकही होते. सामाजिक व राजकीय विषयावर त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. ' दी पीपल ' नांवाचें इंग्रजी पत्र ते चालवित होते. दयानंद कॉलेज शिवाय त्यांनीं स्थापन केलेली दुसरी संस्था म्हणजे सर्व्हंटस् ऑफ पीपल सोसायटी ही होय. मुंबईच्या सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या धर्तीवर या संस्थेची घटना केलेली असली, तरी दोहोंच्या अंतरंगांत महत्त्वाचा भेद आहे. मुंबईची सोसायटी ' नेमस्त ' लोकांच्या ताब्यांत असल्यामुळें, तिचा सर्वच कार्यक्रम नेमस्तपणाचा आहे. राजकीय बाबतींत नेमस्तपणा व सामाजिक बाबतींतही नेमस्तपणा. एक पाऊल पुढें टाकण्याच्या पूर्वी दहा तास विचार करावयाचा अशा प्रकारचा या संस्थेचा कार्यक्रम आहे. या संस्थेचे कांहीं सभासद व्यक्तिशः जहाल पुरोगामी असतील. पण " जातीशः " त्यांना नेमस्तपणाच्या चाकोरींत घुटमळत रहाणें भाग आहे. याच्या उलट लाहोरच्या सोसायटीला लालाजी सारखा तडफदार नेता लाभल्यामुळें तिला सर्वांगीण प्रगतिपर स्वरूप प्राप्त झालें आहे. सामाजिक व राजकीय बाबतीत सारखेच

प्रगमनशील कार्यकर्ते तयार करण्याचें कार्य ही सोसायटी धडाडीनें करीत आहे. या संस्थेसाठींही त्यांनीं पुष्कळ झीज सोसली. अशा प्रकारें लालाजींचें चारित्र्य अनेकांगी आहे. सामाजिक, राजकीय, शैक्षणिक इत्यादी सर्व क्षेत्रांत त्यांनीं अमोल कार्य करून ठेवलें आहे आणि ते कालवश झाले असले तरी त्यांचें बहुविध विधायक कार्य त्यांचे जिवंत स्मारक म्हणून रहाणार आहे.



प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

# ८२

# डॉ. आंबेडकरांनी स्वाभिमानाच्या व स्वावलंबनाच्या पायावर सुरू केलेल्या चळवळीविषयी द्वेषमूलक भावना

कांहीं दिवसांपूर्वी सोलापूर येथें झालेल्या हिंदु-मुसलमानांच्या झगड्यांत अस्पृश्यवर्गानें हिंदूंची बाजू घेण्याचे नाकारल्यामुळें सोलापूर म्युनिसीपॅलिटीनें अस्पृश्यांच्या बोर्डींगची ग्रँट बंद केली, असें विधान सायमनकमिशन पुढील साक्षींत केल्याच्या आरोपावरून, सोलापूर म्यु. नें डॉ. आंबेडकरांबद्दल निषेधपर ठराव पास केला आहे. हा ठराव सकारण असता तर आम्हांला त्याबद्दल कांहींच वाटलें नसतें. पण तो तसा नाहीं. कमिशनपुढे डॉ. आंबेडकरांची साक्ष चालू असतां मि. अब्दुल लतिफ यांनी विचारलेल्या '' मुसलमानांना चिरडण्यासाठी अस्पृश्यांची मदत सोलापूरच्या हिंदूंनीं मागितली काय व अस्पृश्यांनीं ती नाकारल्यामुळे सोलापूर म्यु. ने अस्पृश्यांच्या बोर्डींगची ग्रँट बंद केली काय ? '' या प्रश्नाचे उत्तर देतांना डॉ. आबेडकर म्हणाले '' होय, अशी मदत मागण्यांत आली होती. अस्पृश्यांनीं या बाबतींत माझें मत विचारलें असतां मी त्यांना तटस्थ राहाण्याची सल्ला दिली. ग्रँट नाकारण्याचे कारण मला माहीत नाही. पण अस्पृश्यांच्या बोर्डींगच्या सुपरिंटेंडंटनीं म्यु. तील बहुमतवाल्या पक्षाशीं सहकार्य करण्याचे नाकारल्यामुळें त्यांना दहशत बसविण्यासाठीं तसें करण्यांत आलें असावें. '' या ठिकाणीं मि. अबदुल लतिफच्या एका प्रश्नांत दोन प्रश्न समाविष्ट झाले आहेत, व डॉ. आबेडकरांच्या उत्तरांतही, दोन प्रश्नांची दोन उत्तरें समाविष्ट झाली आहेत. अस्पृश्यांची मदत हिंदूंनीं मागितली काय या प्रश्नाचें होकारार्थी उत्तर डॉ. आंबेडकरांनी दिलें आहें. पण '' अस्पृश्यांनी ती नाकारल्यामुळें ग्रँट बंद झाली काय ? '' या दुसऱ्या प्रश्नाला उत्तर देतांना '' ग्रँट बंद करण्याचें नक्की कारण आपल्याला माहित नाहीं '' असें ते म्हणाले आहेत. पण डॉ. आंबेडकरांचा निषेध करण्याची सोलापूर म्यु. ला इतकी घाई झाली कीं, उत्तराच्या आरंभीच्या ' होय ' शब्दाच्या आधारानें मि. लतिफच्या दोन्ही प्रश्नांना डॉ. आंबेडकरांनी होकारार्थी उत्तर दिलें असें गृहीत धरून, त्यांनी निषेधपर ठरावाचा विधि एकदाचा उरकून घेतला.

एवढेंच करून म्यु. थांबती तर कांहीं हरकत नव्हती. डॉ. आंबेडकरांनीं अस्पृश्य वर्गाची चळवळ स्वाभिमानाच्या व स्वावलंबनाच्या पायावर सुरू केल्यापासून, त्यांच्यावर महान् हिंदु जातीच्या पांजरपोळांतून जीं अनेक कुत्रीं भुंकूं लागलीं आहेत त्यांपैकींच हें एक असें म्हणून स्वस्थ बसतां आलें असतें. पण म्यु. ने याच्या पुढें जाऊन " बोर्डींगची ग्रँट थांबविण्यांत आली ती बोर्डींगच्या जमाखर्चात अंधाधुंदी माजल्याबद्दल म्यु. ची खात्री झाली म्हणून " असें प्रसिद्ध केलें आहे. अव्यवस्थेचे व अंधाधुंदीचे हे आरोप हल्लीं इतके शिळे झाले आहेत कीं त्यांचे निराकरण करण्याच्या भरीस पडण्यात कांहीं अर्थ नाहीं. तरी पण प्रस्तुत आरोप इतका खोडसाळपणाचा आहे कीं या बाबतींत खरी वस्तुस्थिती काय आहे हें प्रसिद्ध केल्याशिवाय स्वस्थ बसतां येण्याजोगें नाही. सोलापूरचे बोर्डींग १९२५ सालीं उघडण्यात आलें. सुरवातीपासून म्यु. नें बोर्डींगला ग्रँट चालू केले. व १९२५/२६ या दोन वर्षाची ग्रँट नियमितपणें देण्यांतही आली. पण १९२७ च्या निवडणूकीनंतर म्यु. चें धोरण एकदम बदललें. विशेषतः डॉ. व्ही. व्ही. मुळे हे म्यु. चे अध्यक्ष झाल्यापासून हा बदल दृश्यमान होऊं लागला. या वर्षाच्या आरंभींच स्कूलबोर्डाच्या अध्यक्षांनीं बोर्डींगला आकस्मिक भेट दिली व जमाखर्च तपासून पाहिला. खर्च व्यवस्थित ठेवलेला आहे असा शेराही त्यांनीं दिला. या शेऱ्याची प्रत सुपरिंटेंडंटनी म्यु. च्या अध्यक्षांकडे पाठवून दिली. पण अध्यक्ष महाशयांचे त्यांयोगे समाधान न होतां, त्यांनीं १९-३-१९२८ रोजीं सुप. ला पत्र लिहून १९२५-२६ सालच्या हिशोबाची बुकें तपासण्याकरिता मागवली. हीं बुकें मुंबईला बहिष्कृत हितकारिणी सभेच्या हेडऑफिसांत पाठविण्यांत आलीं असल्यामुळें व नेहमींच्या रिवाजाप्रमाणे तीं नष्ट करण्यांत आल्यामुळें आपल्याला तीं पाठवितां येणें अशक्य आहें असें सुप. नी अध्यक्षांना कळविलें. चालूवर्षांचें हिशेबबूक पाठविण्यास ते तयार होते. यावेळीं हिशोब तपासण्यासाठीं म्यु. नें स्कूल बोर्डाचें उपाध्यक्ष श्री. बुवालाल वकील व सभासद सदाशिव अप्पा देशमुख यांची कमिटी नेमली. या कमिटीनें आपला रिपोर्ट ता. २-५-१९२७ रोजी सादर केला. त्यांत जमाखर्च बिनचूक असल्याची कबुली दिली आहे. पण अध्यक्षांना हा रिपोर्टही समाधानकारक वाटला नाहीं, व १९२५-२६ सालचे हिशेब पाहिजेतच असा त्यांनीं आग्रह धरला. पूर्वी निर्दिष्ट केल्याप्रमाणें हा आग्रह पूर्ण करणें अशक्य होतें. यानंतर म्यु. च्या ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफीसरनीं बोर्डींगचे हिशेब तपासले व त्यांत कांहीं चूक नाहीं असा शेरा दिला. यानंतर मात्र अध्यक्षांना लज्जा उत्पन्न झाली की काय नकळे त्यांनीं मागील हिशेबांविषयींच्या आपल्या प्रेमाचा संन्यास केला, व चालूवर्षाचे (१९२७) हिशेब मागविले. पण इतरांप्रमाणेंच त्यांनाही त्यांत चूक आढळणें शक्य नव्हतें. अशा रीतीनें नाइलाज

झाल्यावर अध्यक्षांनी, बजेटच्या वेळीं बोर्डींगची ग्रँट बंद करावी असा ठराव आणला. पण तेथेंही दुर्दैवानें त्यांची पाठ पुरविली. त्यांच्या, विरोधी पक्षानेंच नव्हे, तर त्यांच्या पुड्यातील लोकांनींहि हा ठराव हाणून पाडला. या ठरावाला फक्त एकच मत अनुकूल मिळालें.

खरा प्रकार काय आहे तो यावरून ध्यानांत येईल. बोर्डींगची ग्रँट बंद करणें, व अशारीतीनें त्याचें अस्तित्व धोक्यात आणणें हा अध्यक्षांचा हेतु होता. बोर्डींगचे हिशेब अव्यवस्थित आहेत हें सिद्ध झाल्यास, हा हेतु साध्य होणें सुकर होतें. पण अध्यक्षांच्या दुर्दैवानें तें सिद्ध झालें नाहीं. उपरिनिर्दिष्ट बुवालाल वकील व शिवदास देशमुख हे गृहस्थ अध्यक्षांच्या पुड्यांतील होते. पण त्यांनाहीं जमाखर्च बिनचूक ठेवला सल्याची कबुली द्यावी लागली. ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसरसारख्या जबाबदार अधिकाऱ्याचा शेराही अध्यक्षांना ध्यानांत न घेऊन चालण्यासारखें नव्हतें. अशा तऱ्हेनें अव्यवस्थेचें व गैरशिस्तपणाचें कायम ठशाचें थोतांड निरुपयोगी ठरल्यावर अध्यक्षांनीं ग्रँट बंद करण्याचा ठराव आणला. लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं हा ठराव पास झालेला नाहीं. अर्थात् म्यु. नें ग्रँट बंद केली हें म्हणणेंच खोटें आहे. जमाखर्चातील अव्यवस्थेमुळेंच नव्हे तर कोणत्याही कारणानें म्यु. नें ग्रँट बंद केली नाहीं. अध्यक्षांचा ठराव नापास करून बोर्डींगची ग्रँट चालू ठेवण्याचें म्यु. नें बहुमतानें ठरविलें असतांही, अध्यक्षांनीं ग्रँट बंद ठेवली आहे असा खरा प्रकार आहे.

●●●

---

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

# ८३

# *शिक्षण नसल्यामुळे जीवनाच्या शर्यतींत पुढे जातां येत नाही*

अस्पृश्यादि निकृष्ट व दलित जातींच्या शैक्षणिक, सामाजिक व आर्थिक परिस्थितीची चौकशी करण्याकरतां डॉ. सोळंकी यांच्या ठरावानुसार मुंबई सरकारनें नेमलेल्या कमिटीची घटना† आम्ही दुसरीकडे प्रसिद्ध केली आहे. प्रस्तुत कमिटी नेमण्यात सरकारने अस्पृश्यादि जातींवर उपकार केले आहेत अशांतला प्रकार नाहीं. पूर्विच हा उपक्रम झाला पाहिजे होता. या जगांतील आपले जीवन सुखी करण्यास जी साधनसामुग्री लागते, तिची बहिष्कृत भारतांत किती महर्घता आहे हें महशूरच आहे. शिक्षण नाहीं, तें नसल्यामुळें जीवनाच्या शर्यतींत पुढे जातां येत नाहीं, व त्यामुळे इतर समाजाकडून गळचेपी, मानहानी व विटंबना होते. अशा निकृष्टावस्थेत पडलेल्या जातीच्या उन्नतीची जबाबदारी जर कोणावर असेंल तर ती प्रामुख्यानें शासन संस्थेवर आहे. खासगी स्वरूपाच्या संस्था जरी भूतदयेनें अगर नैतिक जबाबदारीच्या भावनेनें प्रेरीत असल्या तरी त्यांच्या हातून हें काम होणें नाहीं. कारण शासनसंस्थेच्या हाती जी सत्ता असते, ती खासगी संस्थांच्या हातीं नसते व तिच्या कायद्यामागे जी सर्वमान्यता असते ती खासगी प्रयत्नांच्या मागे असणें शक्य नसतें.

अस्पृश्यादि जाती निकृष्टावस्थेंतच रहाणें ज्यांच्या फायद्यावर आहे अशा ब्राह्मण्यग्रस्त लोकांना मात्र या कमिटीच्या नेमणुकीमुळें पोटदुखी उत्पन्न झाली आहे. ही कमिटी म्हणजे अस्पृश्यांच्या वेगळ्या मतदारसंघाची पूर्व तयारी असें ते म्हणत आहेत. अस्पृश्यांचा वेगळा मतदारसंघ केल्यास तो कांहीं मुंबई इलाख्यापुरताच असणार नाहीं. पण सदर कमिटीच्या चौकशीची व्याप्ती मुंबई इलाख्यापुरतीच आहे. पण या लोकांच्या म्हणण्याप्रमाणें ही स्वतंत्रमतदारसंघाची पूर्व तयारी मानली तरीही हिंदुसमाजापासून अलग होण्यांतच अस्पृश्य वर्गाचे हित आहे हें आम्ही गतांकीं सिद्ध केलें आहे. हिंदूना अर्थातच आमची विचारसरणी पटणार नाहीं. कारण अस्पृश्यवर्ग हिंदुसमाजांत रहाणें यांना फायदेशीर आहे. आणि त्यानें रहायचें तें गुलाम म्हणून राहिलें पाहिजे. समतेच्या

---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ४३.

हक्कांचीं मागणी त्यानें करतां कामा नये. आपला राजकीय दर्जा वाढविण्याची त्यानें खटपट करतां कामा नये. स्पृश्य हिंदूंची हीच मनोभावना आहे व म्हणूनच ज्या योजनांमुळें अस्पृश्य लोक आपल्याबरोबरीचे होण्याचा संभव आहे, त्यांना ते असा विरोध करीत आहेत.

● ● ●

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

## ८४

# सहविवाह हीच समतेची खरी कसोटी

नाशिक येथे हिंदुसमाजसमतासंघ† नांवाची संस्था नुकतीच स्थापन झाली असून स्पृश्यास्पृश्यांत समता प्रस्थापित करणें हें तिचें ध्येय आहे. पण हें ध्येय पूर्णपणें साध्य व्हावें असें संघाला वाटत असल्यास त्यानें आपला कार्यक्रम आहे त्यापेक्षां जास्त सकस व जोरदार ठेवणें जरुरीचें आहे असें आम्हाला वाटते. भंगी लोकांच्या देवळांत स्पृश्य हिंदूंना नेण्यापेक्षां, भंगी लोकांनाच स्पृश्य हिंदूंची देवालयें खुलीं करणें हें समतेच्या दृष्टीनें जास्त इष्ट आहे. त्याप्रमाणें सहभोजनें घडवून आणतांना तीं बकाली स्वरुपाचीं न होतां कौटुंबिक होतील अशी व्यवस्था करणें फायद्याचें आहे. आणि शेवटीं सहभोजनाच्या कार्यक्रमाला सहविवाहाची जोड देणें अवश्य आहे. सहविवाह हीच समतेची खरी कसोटी. बाकीच्या कार्यक्रमांत पळवाटा काढणें शक्य आहे. भंग्यांच्या देवळांत जाऊन आल्यावर स्नान करून 'शुद्ध' होणें हिंदूंना सहज साध्य आहे. सहभोजनानंतर प्रायश्चित घेणेही कठीण नाहीं. पण सहविवाहाच्या कार्यक्रमांत मात्र या पळवाटा संभवत नाहींत. म्हणून सहविवाहाशिवाय कोणत्याही समता प्रवर्तक संस्थेचा कार्यक्रम पुरा होणें शक्य नाहीं.



---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ४४.

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

# ८५

## सर्व ठिकाणीं सत्यान्वेषी बुद्धी व सारासार विचारशक्ती जागृत पाहिजे, ही लोकहितवादींची मुख्य शिकवण

या अंकापासून आम्हीं सुप्रसिद्ध लेखक गोपाळराव हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांच्या पत्रांचें पुनर्मुद्रण सुरू केलें आहे. सरळ व असंदिग्ध भाषा, सडेतोड विचारसरणी व भरीव व्यवहारज्ञान हे लोकहितवादींच्या लिखाणाचे विशिष्ट गुण आहेत. तत्त्वज्ञानाच्या निष्फळ गप्पांनी व तर्कशास्त्रांच्या शब्दावडंबरी लंपडावांनीं लोकांना भुलविण्या-झुलविण्याच्या भरीस लोकहितवादी कधीच पडले नाहींत. आपल्या सामाजिक व्यवहारांतील रोजच्या प्रसंगावर व त्यांच्या मागे असलेल्या भावभावनांवर त्यांनी लिहिलें आहे, आणि त्यांचें लिखाण अत्यंत स्पष्टोक्तीपूर्ण, निर्भीड व हृदयस्पर्शी आहे. भूतकालीन ' रामराज्या ' पेक्षां आजच्या सामाजिक आचारविचारांतील दोष हेच त्यांच्या लिखाणांचे मुख्य विषय असल्याचें दिसून येईल. लोकमान्यता मिळवायची असेल तर आपल्या दोषांचाही गुण म्हणून उदोउदो करणें व परकीयांच्या गुणांनाही दोष म्हणून त्याज्य ठरविणें, हा मार्ग आहे. पण लोकहितवादींनीं हा मार्ग कधींच अनुसरला नाहीं. आपल्या दोषांचे त्यांनीं कठोरपणें आविष्करण केलें व तसें करतांना अमके नाराज होतील अगर तमक्यांचीं मनें दुखावतील याविषयीं त्यांनीं पर्वा केली नाहीं.

जुन्या घातुक रूढी, जरीपुराण्या टाकाऊ कल्पना व समजुती, धार्मिक दुराग्रह व ढोंगीपणा इत्यादि विषयांवरही लोकहितवादींनीं सडेतोड लेख लिहिले आहेत; व ते सर्वांना मार्गदर्शक होतील असेच आहेत. सर्व ठिकाणीं सत्यान्वेषी बुद्धी व सारासारविचारशक्ती जागृत पाहिजे, ही लोकहितवादींची मुख्य शिकवण आहे. लोकहितवादींची परंपरा जर महाराष्ट्रांत चालली असती तर आपले सामाजिक प्रश्न आजच्या इतके सोडविण्याला कठीण होऊन बसले नसते. पण दुर्दैवानें टिळक-चिपळूणकर परंपरा टाळ्यांच्या कडकडाटांत पुढें आली, व लोकहितवादींची धिम्मी व कार्यक्षम परंपरा मागें पडली. याचें परिणाम आजवर महाराष्ट्रानें भोगले आहेत, व अजूनही त्यांतून त्याची सुटका झाली नाहीं. असो. लोकहितवादींनीं ७५ वर्षांपूर्वी लिहून ठेवलेले विचार आजच्या परिस्थितींतही उपयुक्त असेच आहेत. आमच्या वाचकांना ते मार्गदर्शक होतील असें वाटल्यावरूनच आम्हीं तत्प्रकाशनाचें कार्य सुरू केलें आहे.



---

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. ७ डिसेंबर १९२८.

# ८६

# हिंदुंचें धर्मशास्त्र, त्याचे क्षेत्र आणि त्याचे अधिकारी

सर्व समाजात अत्यंत जरठ असा हा हिंदु समाज आज अनेक वर्षांच्या परकीयांच्या माऱ्यामुळें हादरून गेला आहे. सर्वच परिस्थितीत पराभूत झालेला माणूस जसा स्तंभित होऊन ' मला काय झाले ' असें विचारीत आपले स्वरुप तपासून पहावयास लागतो त्याच प्रमाणें हिंदु समाज बऱ्याच दिवसापासून आपले स्वरुप तपासून पाहत आहे. तथापि आपल्याला कोणता रोग झाला आहे व आपण पदोपदीं कां पडतो याचा उलगडा अजूनहि त्याला पूर्णपणें झाल्याचे दिसत नाही.

समाजशास्त्रवेत्ते असें सांगत आहेत कीं या देशातील लग्न पद्धति अत्यंत घातुक आहे. या देशातील लग्न पद्धतिमुळें आठ वर्षांच्या आंतील मुलीला साठ वर्षे झालेल्या वृद्ध कपीच्या माथीं मारून देण्यात येतें. तसें न झालें तर लग्न म्हणजे काय चीज आहें हे ज्यांस कळलें नाही अशा अर्भकाच्या गळ्यांत गुंतवून देण्यात येतें. अल्प वयांत हा ऋणानुबंध पडल्यामुळें ज्याच्याशी किंवा जिच्याशी सारा जन्म कंठावयाचा त्याचा किंवा तिचा स्वभाव, रुप वा शील पाहण्याची संधी वधुवरास न मिळाल्यामुळे भिन्नरुची व भिन्न वागणुकीमुळें संसार दुःखकारक होतो तो होतोच. शिवाय त्यात संसाराची गोणी सुखानें वाहून नेण्यास धनसंचय करण्यास अवश्य असें उपयुक्त ज्ञान अथवा कला प्राप्त होण्यापूर्वीच त्याच्या पाठीवर ठेवली जात असल्यानें वाढता पसारा आणि घटता आधार अशी स्थिती येऊन ठेपतें व सारे जीणे व्यर्थ होतें. या विवाहपद्धतीनें व्यक्तीच्या जन्माचे मातेरे होत आहे. इतकेच नाहीं तर या पद्धतिपासून समाजावर अत्यंत अनिष्ट परिणाम होत आहेत. ज्याप्रमाणे जोरदार वृक्ष व्हावयाचा असल्यास त्याचा अंकूर जोरदार असावा लागतो, त्या प्रमाणे देशांत सुदृढ संतती निपजण्यास प्रजोत्पन्नकालीं स्त्री-पुरुषाची वाढ संपूर्ण झाली असली पाहिजे. दहा-बारा वर्षांच्या बालकांचे लग्न करून त्यांच्या कडून ज्या देशात प्रजोत्पादन करण्यात येतें त्या देशातील प्रजा खुरटी, अल्पायुषी, निस्तेज, निर्बल व निरुत्साही झाली नाही तर कशी होणार ? या देशांत शोधकबुद्धीचे लोक उत्पन्न झाले नाहीत याचे तरी कारण ही अनिष्ट विवाह पद्धतच होय. जेथें शरीर सामर्थ्याचा लोप होतो तेथें मानसिक सामर्थ्याचा लोप झाला तर त्यात नवल तें काय ? म्हणच आहे कीं शरीर धड तर मन धड.

समाजशास्त्रवेत्ते सांगत आहेत कीं जातीभेदामुळें हिंदुसमाजाची स्थिती खिळखिळी झाली आहे. जातीत जनन जातीत मरण, जातीत जेवण जातीत लग्न, अशी हिंदुसमाजाची रचना असल्या कारणानें जितके म्हणून सार्वजनिक काम तें सर्व जातीबाह्य असल्या कारणानें निषिद्ध मानलें जातें. मनुष्य जितका लोकापासून वेगळा राहील तितकी त्याची जात शुद्ध राहते. जो घरची गाडी सोडून रेल्वेतून प्रवास करणार नाहीं, देश सोडून परदेशांत जाणार नाहीं, जो चोरट्यासारखा सर्व लोकांपासून वेगळा राहील तो मोठा जातीनीष्ट व जो बिळांतील उंदराप्रमाणे निरुपयोगी न राहतां सामाजिक जिवनात कोणताहि भेदभाव न करतांना भाग घेईल तो जातीभ्रष्ट मानला जातो. सार्वजनिक ऋणानुबंधाच्या गांठी पडून समाजाचे एकीकरण होण्यास जातिभेद ही मोठीच कातर आहे. एकीची भावना जातिभेद उत्पन्न होऊं देत नाहींच पण त्यापासून हिंदुमात्राचें जीवन भयंकर जातिमय बनते. एका जातीला दुसरी जात परकी वाटते व तिच्याशी व्यवहार करताना आपल्या जातीचा फायदा व पर जातीचे नुकसान हें धोरण मग तें कितीही अन्यायकारक असो, पाळण्यात येतें. यामुळे परस्पर हिंदु जातींत एकमेकांबद्दल इतका गैर विश्वास प्रस्थापित झाला आहे कीं परदेशीय राजा असला तर लोक संतुष्ट असतात. पण तोच स्वदेशी नेमण्यास कोणीच कबूल होऊ शकत नाहीं. कारण राजा स्वदेशीय असला तर त्याला कोणती तरी जात असावयाचीच, इतर जातींना तो परका व अविश्वसनीय वाटावयाचाच. याच भावनेपायी चांगल्या पुढाऱ्याचे पुढारीपण केवळ तो अमक्या जातीचा आहे एवढ्याच कारणामुळें इतर जातींना मान्य होत नाहीं. ज्या त्या जातीला आपल्या जातीचा पुढारी असावा असें वाटतें. पर जातीच्या शहाण्या पुढाऱ्याच्या मागें जाण्यापेक्षां स्वजातीतील पुढारी मग तो वेडगळ असेना त्याच्या मागे जाणे त्यांना बरे वाटते. जातीजातीतील लाथाडीमुळें पुढाऱ्यात लाथाडी माजते व तेणे करून कोणत्याहि महत् प्रसंगी एकजूट होत नाहीं. स्वराज्याविषयीं जर कोणाला इतकी तळमळ वाटत नाहीं याचें कारण तरी हा जातिभेदच आहे. दरेक जातीला वाटतें कीं स्वराज्य आलें तर न जाणो दुसऱ्याच एका जातीच्या हातीं सत्ता जाईल व तसें झालें तर आपला घात होईल. तेव्हां परक्यांच्या हातात सत्ता आहे हें ठीक आहे अशी भावना होते. जातिभेदामुळें जातिद्वेषाला वाव मिळतो इतकेंच नव्हें तर तो जातिद्वेष वंशपरंपरा चालत जात असतो. इंग्लंडमध्यें अंग्ल, पीक्ट, स्याकसन्, केल्ट वगैरे निरनिराळ्या वंशाचे लोक होते. त्यांच्यामध्यें तुंबळ रणें माजली. त्यांचें वंशज हल्लीं त्याच देशांत आहेत. पण ते पूर्वजांची भांडणे भांडत असल्याचें कोणास ऐकू येत नाहीं. इंग्लंडमध्यें वॉरस् ऑफ रोझेस या नांवाने प्रसिद्ध असलेल्या लढाईत

श्वेत व पीत या नावाखाली श्रेष्ठ वर्गाच्या लोकांनीं आपापसांत मोठी यादवी केली. पण वडील भांडले म्हणून त्यांचे वंशज कांहीं भांडत नाहीं. हिंदुसमाजांत मात्र अशी पुष्कळ भांडणें पाहावयास सापडतात. याज्ञवल्क्य आणि वैश्यंपायन यांचा पूर्वी कधी काळी कलह झाला असेल. परंतु त्या बद्दल यजुर्वेदी व ऋग्वेदी ब्राह्मण अद्याप तंटे करतात. पेशवाईच्या काळांत ब्राह्मण आणि कायस्थ जातीवर्चस्वासाठीं फार निकरानें भांडले त्याला शंभर अधिक वर्षे झाली पण त्याचे विस्मरण दोहोपैकीं एकाहि जातीला अजून झालेले नाही. वामन† नांवाच्या कुलूंग्या ब्राह्मणाने आपल्या बलाढ्य अशा बळी† राजाचे राज्य फसवून घेतलें याला किती तरी वर्षे झाली पण याची आठवण ब्राह्मणेतरांना होते. जातीभेद राहील्यामुळें जातीद्वेषाचा अग्नीहि विझू शकत नाहीं आणि त्यामुळें जातीजातीत तंट्याचा विसर पडण्याऐवजी त्याची आठवण जागृत राहते. जाती भेदामुळें सामाजिक सुधारणेचे काम अशक्य झाले आहे. जातीतील अमुक एक रूढी वाईट आहे हें कोणाला कळत नाही असें नाहीं. पण ती सोडून आपण वागलो तर आपल्याला जातीबाहेर टाकतील मग आपल्या मुला-मुलींची लग्ने कशी होतील, जनन मरण प्रसंगी आपल्या घरीं कोण येईल याचे भय बाळगून जो तो वाईटाला चिटकून राहतो. टनभर बोलणारे पण इंचभर न हालणारे असा जो समाज-सुधारकां विषयी अपवाद उठलेला आहे त्याला कारण जातीभेदच आहे. जातीभेदामुळें हिंदू समाजाची वृद्धी खुंटली आहे व त्याचा क्षय वाढत चालला आहे. हिंदु समाजातील कोणत्याही माणसाला परधर्मांत जाण्यास कांहीं आडकाठी नाहीं. नव्हें हिंदुंच्या दुष्ट अशा अनेक रितीरिवाजामुळें त्यांच्यातलेच कांहीं लोक हिंदु धर्मांला कंटाळून परधर्मात जात आहेत. खिस्ती समाज व मुसलमान समाज यांची जी आज वाढ होत असलेली दिसत आहे त्याला कारण हिंदुतले असंतुष्ट लोक त्यांना जाऊन मिळत आहेत हेंच होय. उलट पक्षी परधर्मातले लोक हिंदुधर्मात घेण्यास अवसर नाही. परधर्मातून एकाद्याची शुद्धी करून त्याला हिंदुधर्मात घेण्याचे ठरलें तर आधीं त्याला कोणत्या जातींत घ्यावयाचा हा प्रश्न नडतो. कारण जात ही जन्मानें प्राप्त होत असते. जो ज्या जातींत जन्मेल ती त्याची जात असा प्रकार हिंदु समाजांत असल्यामुळें नव्या शुद्धीकृत हिंदुला कोणतीच जात पत्करू शकत नाहीं. ज्या समाजात जाती शिवाय गत नाहीं आणि जन्माशिवाय जात नाहीं त्या समाजात कोणीही परधर्माचा माणूस येण्यास धजत नाही. आतल्याला बाहेर जाण्याचा मार्ग हिंदु धर्मानें मोकळा ठेवला आहे पण बाहेरच्याला आंत येण्याचा मार्ग बंद करण्यात आला आहे. या विधीमुळें पाणी आंत घेण्याची तोटी तर बंद पण पाणी सोडण्याची तोटी खुली असलेला हौद जसा शेवटीं तो शुष्क होऊन त्यांत पाण्याचा एक टांकहि

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ४५.

उरत नाहीं तशी स्थिती हिंदुसमाजाची न व्हावी व हा सारा अनर्थ टाळावा असें जर वाटत असेल तर जातीभेदाचे उच्चाटण करणे अत्यंत अवश्य आहे.

समाजशास्त्रवेत्ते असें सांगत आहेत की स्त्री व शुद्रांना कनिष्ठ लेखणे समाजास अकल्याणकारक आहे. ज्यांचा दर्जा खालचा असतो त्याला आपल्या कनिष्ठ पणाची आंच लागू लागली म्हणजे ते त्या विरुद्ध बंड करण्यास सिद्ध होतात व त्यामुळे समाजाची स्थिरता नष्ट होते. तथापि कनिष्ठ मानलेली माणसें आपल्यावर श्रेष्ठत्व मिरविणाऱ्या विरूद्ध बंडाळी करण्याचे धैर्य दाखवीतील तरी ती मोठी अभिनंदनीय गोष्ट मानली पाहिजे. पण तसें घडत नाहीं हा या भावनेचा मोठाच दुष्परिणाम आहे. कनिष्ठ माणसें अनेक दिवसाच्या कनिष्ठ भावनेच्या शिकवणीमुळे स्वतःच कनिष्ठ आहोंत असें मानावयास लागून श्रेष्ठाचे श्रेष्ठत्व व कनिष्ठाचे कनिष्ठत्व हें कृत्रीम कारस्थान नसून दैवाचा ठेवा आहे असे मानावयास लागतात व ज्या अन्यायाविरुद्ध बंड करणें त्याचे कर्तव्य असते त्याच अन्यायाला आपले नशीब म्हणून ते खुशीनें मान देतात. इतकेच नव्हे तर ज्यांच्या वर्चस्वाला ते आपली मान वाकवितात त्यांना लोकपाल, भुदेव, राजाधिराज, अशा विशेषणानें संबोधून त्यांची प्रशंसा करूं लागतात. या पासून दोन्ही वर्गाचा नैतिक अधःपात होतो. कनिष्ठांच्या अंतःकरणात श्रेष्ठ वर्गाच्या पूज्य बुद्धीचे पिढ्यानपिढ्याच्या संगोपनानें तिची पाळें मुळें इतकी खोल जातात कीं, कालांतरानें ज्यांना एकदां पूज्य मानण्याची मनाला सवय झाली, ते त्या आदरांस पात्र नसले तरी त्याचा अपमान किंवा धिक्कार करणें तर राहोच पण त्यांना सर्वांसारखें लेखण्याचे देखील धैर्य त्यांना होत नाहीं. ते सांगतील ते ऐकण्याची, वागवतील तसें वागण्याची आणि नेतील तिकडे जाण्याची त्यांना सवय लागते. अशा रितीनें जे एकवार परवश झाले त्यांना ती स्थिती बरी वाटूं लागते. उलटपक्षी श्रेष्ठ लोकांची स्तुती होत गेल्यामुळें त्या स्तुतीस आपण सर्वस्वी पात्र आहोत अशी त्यांची भावना होते व कालांतरानें ती भावना अंगात मुरली म्हणजे आपण परमपूज्य आहोत असें स्वतःचे ठाम मत करून घेतात आणि लोकांनी आपण होऊन मान दिला नाहीं तर त्यांना दंडून त्यांच्या कडून तो घेण्याचा ते प्रयत्न करितात. अशा प्रकारच्या वातावरणात वाढल्यामुळें श्रेष्ठलोक डौली व खुनशी बनतात व कनिष्ठ लोक नीच व भेकड होतात. ब्राह्मणांची वागणूक आणि ब्राह्मणेतरांची अस्पृश्यांशी वागणूक कशी असते याचा विचार केला म्हणजे या श्रेष्ठ कनिष्ठ भावामुळें परस्पर वर्गाच्या नीतिमत्तेवर अनिष्ठ परिणाम होऊन वरच्यांचे शील कसें बिघडते व खालच्यांचे तेज कसें नाहीसें होते याची सत्यता सर्वांना पटेल. शिवाय या श्रेष्ठ कनिष्ठ भावनेचा आणखी असा दुष्परिणाम होतो कीं कनिष्ठ पदाचा शिक्का ज्यांच्यावर

मारला जातो त्या वर्गाच्या कर्तबगारीस समाज अंतरतो व शेवटी गलीत व हतवीर्य असा होतो. बऱ्याचशा लोकांची अशी समजुत असते कीं कनिष्ठ वर्गात कर्तबगार माणसे निपजणे अशक्य आहे व कनिष्ठ वर्गात कर्तबगार माणसे आजवर फारशी निपजली नाहींत ही गोष्ट ते आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ पुढें करतात. पण हे लोक विसरतात की महत्त्वाकांक्षेशिवाय महत्प्रयत्न होऊ शकत नाहीं व महत्प्रयत्न झाल्याशिवाय कोणाच्या हातून महत्कार्य होत नाहीं. कनिष्ठ वर्गात कर्तबगार माणसे निपजत नाहीत याचे कारण त्यांच्यात महत्त्वाकांक्षेचें बीज रूजूं घातलेलें नाहीं हेच होय. महत्त्वाकांक्षेचे बीजारोपण सर्वच परिस्थितीत होऊं शकत नाही. जशी विशेष प्रकारचे पीक येण्यास विशेष प्रकारची जमीन असावी लागते तसेच महत्त्वाकांक्षेचें बीजारोपण होण्यास विशेषप्रकारची सामाजिक परिस्थिती असावी लागते. जेथे सामाजिक बंधनान्वयें अमक्या वर्गाचा अमूक दर्जा अशी हद्दमर्यादा ठरली गेली आणि अनेक शतकाच्या शिकवणीचा ठसा उमटला म्हणजे त्या दर्जाच्या माणसांना त्या दर्जापलीकडे जाण्याची मानसिक शक्ती उरत नाहीं. मन मारले गेल्यामुळें आपल्या नशीबी मोठा दर्जा प्राप्त नाहीं अशी त्यांची ठाम समजूत होते व मोठेपणा मिळविण्याचा प्रयत्न करावा अशी त्यांना कल्पना देखील होत नाहीं. इतकेंच नव्हें तर आपल्याला घालून दिलेली मर्यादा सोडून वर जाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे पायरीला पाय लावल्यासारखें अधर्म्य कृत्य करणें होय असें त्यांना वाटतें. खालच्या दर्जाच्या माणसांत मोठी माणसें निपजली नाहींत याचे कारण त्यांच्यांत गुणवान लोक नाहींत असें नाहीं. त्यांच्यात मोठे लोक निपजले नाहींत याला कारण तुमच्या नशीबांत मोठेपणा नाहीं ही हिंदुसमाजाची शिकवण होय. दुसरे कांहीं नाहीं. हिंदुसमाजाच्या या विपरीत शिकवणूकीमुळें स्त्रीशुद्रांच्या गुणास हिंदुसमाज अंतरला आहे. मोठी माणसें ही समाजाचे आधारस्तंभ आहेत. त्यांच्याशिवाय समाज मोठा होऊं शकत नाहीं. ही मोठी माणसे मिळतील त्या वर्गांतून घेतली पाहिजेत. ब्राह्मणांच्या खाणींतून हिरे निघतात आणि शुद्रांच्या खाणीतून सारे कोळसेच निघतात अशा खोट्या समजुतीला हिंदुसमाज बळी पडला आहे. हिंदुसमाजाची काठी मजबुत राहवयाची असेल तर जेथे जेथे म्हणून गुणांचा अंश असेल तेथें तेथें त्याचा पूर्ण विकास होईल अशी व्यवस्था करणें अवश्य आहे.

समाजशास्त्रवेत्ते सांगत आहेत की हिंदुसमाजांत कांहीं वर्गाच्या ठायी कल्पलेली अपवित्रता व अस्पृश्यता यात विचार शून्यतेची परमावधी झाली आहे. अतिशुद्रादिजाती अस्पृश्य आहेत, त्यांचा स्पर्श देखील हिंदुंना खपत नाहीं. पण तेच हिंदू साहेब लोकांच्या येथें जेवणास गेले असतां त्याच अतिशुद्र नोकरांनी तयार

केलेले अन्न त्यांना चालते !! मुसलमान, ख्रिश्चन इत्यादी धर्मातील लोक हिंदुधर्मातील कोणत्याही अतिशुद्र वर्गापेक्षा विशेष अस्पृश्य मानणें भाग आहे. कारण कोणताहि अतिशुद्र हिंदु गोवधाचे पाप करीत नाहीं. तथापि हिंदुंच्या घरी दारी मुसलमान किंवा ख्रिश्चन चालतो ! इतकेच नव्हे तर त्यांच्याशी सहपान देखील खपते !! पण अस्पृश्यांची सावली देखील चालत नाहीं. स्पृशांच्या या वागणूकीत धर्म नाहीं, संयुक्तिकताही नाहीं. ही वागणूक म्हणजे शुद्ध मानवद्रोह आहे. या मानवद्रोहाच्या पापाचे प्रायश्चित या अतिशुद्रांनी हिंदुंना पूर्णपणें भोगावयास लावले आहे. हिंदुपदपादशाहीचा लोप होऊन मोंगलशाही कशी आली आणि मराठशाहीचा नायनाट होऊन ब्रिटीशशाही कशी प्रस्थापित झाली याची कारणे अनेक विद्वान लोक आपआपल्या परीनें देत आहेत. पण ती सारी खुळचट आहेत. परकीयांनीं या देशात जी आपली सत्ता प्रस्थापित केली ती त्यांनी निव्वळ सैन्याच्या बळावर केली. या राजकीय क्रांत्या झाल्या त्यात या परकीय लोकांनी सैन्य कोठून आणले हा महत्वाचा प्रश्न आहे. हिंदुस्थानच्या इतिहासात एखादी विलक्षण अशी गोष्ट घडली असेल तर ती ही की त्यांनी हा जो देश काबीज केला तो या देशांतील लोकांचे सैन्य उभारूनच केला. एक पाऊल पुढे जाऊन या देशाचे स्वातंत्र्य हरण करण्याकरितां परकीयांनी उभारलेल्या सैन्यात कोण लोक सामील झाले असा एक प्रश्न विचारला तर अस्पृश्यतेनें या देशास कसें धुळीस मिळविले आहे हें उघड होईल. कारण परकीयांना साह्य करून त्याचे राज्य या देशावर प्रस्थापित करण्यात जर कोणत्या वर्गानें पुढाकार घेतला असेल तर तो अस्पृश्य वर्गच होय. त्याच्या सहाय्याशिवाय महाराष्ट्रात तरी मोगलीसत्ता टिकली नसती व इंग्रजी सत्ता सुरू झाली नसती किंवा स्थिरावली नसती. अस्पृश्यांनी देश द्रोह केला ही गोष्ट वाईट झाली असेल. पण त्याचे पातक ज्यांनी मानव द्रोह केला त्यांच्यावर आहे. या मानव द्रोहाची परंपरा नष्ट झाल्याशिवाय देश द्रोहाची परंपरा नष्ट होणार नाही.

या सुविचारांचा परिणाम कांहीं ब्राह्मणमंडळींवर होऊन त्यांनीं गत साली अकोला येथें जी ब्राह्मण परिषद भरविली होती त्या परिषदेंत वरील प्रश्नांवर प्रगतिपर असें कांहीं ठराव पास केलें. त्यापैकीं जे दोन महत्वाचे होते ते असें कीं, हिंदुतील कोणतीही जात सामाजिक अगर धार्मिकदृष्टीनें जन्मानें श्रेष्ठ वा कनिष्ठ नाहीं व सर्व वेदांचा अभ्यास करण्याचा मनुष्यमात्रास अधिकार आहे. हे दोन्ही ठराव म्हणण्यासारखे क्रांतिकारक आहेत असें कोणालाहि म्हणता येणार नाही. या अकोला परिषदेनें जातीभेद आपणास अमान्य आहे असें कांहीं म्हटलें नाहीं. फक्त जातीजातींत जी असमानता मानण्यात येते ती आपणास कबूल

नाहीं एवढेच तिनें म्हटलें आहे. या ठरावानें जातीभेद कांहीं मोडत नव्हता; फार तर जातीद्वेष कमी झाला असता. परंतु जाती समान आहेत असें म्हटल्यानें जाती जातींत प्रेम वाढेल व तेणें करून रोटी बेटीचे बंद तुटावयास लागून शेवटीं जातीची माती होऊन हिंदूंची एक जात होईल असें भय वाटून या ठरावासंबंधी ब्राह्मण जातीत दोन पक्ष पडले. जातीजाती श्रेष्ठ कनिष्ठ नाहीत असें म्हणणाऱ्यांना जुन्या पक्षाचे सनातनी लोक समसमानी अशा मोठ्या क्रांतीकारक व भयप्रदर्शक नांवाने संबोधू लागले व त्यांना नामोहरण करून त्यांचा पाडाव करण्याचा चंग त्यांनी बांधला. या सनातनी ब्राह्मणांनी गेल्या महिन्यांत श्रीक्षेत्र काशी येथें अखिल भारत वर्षीय ब्राह्मण महासंमेलन भरविले. या संमेलनास द्रविड, तामिळ, आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र, गुर्जर, बंगाल, कान्यकुब्ज, मैथिल इत्यादि प्रायःसर्व भरतखंडांतील दोन हजार तज्ज्ञ प्रतिनिधि उपस्थित झाले होते. या संमेलनापुढें एकंदरीत १७ प्रश्न चर्चेकरितां मांडण्यांत आले होते. त्या प्रश्नांवर दिलेले निर्णय आजच्या अंकांत दुसरीकडे छापण्यात आले आहेत[†] जो कोणी ते निर्णय वाचून पाहील त्यांना ते समसमानी ब्राह्मणांच्या ठरावांच्या कसे विरूद्ध आणि प्रतिगामी स्वरूपाचे आहेत हें दिसून येईल. हे निर्णय देतांना अज्ञ जनांना असें भासविण्यात आले आहे कीं, धर्मशास्त्राच्या अनुज्ञेप्रमाणे आचरण करीत आल्यामुळेंच हिंदुसमाज आजपर्यंत तगला आहे. हिंदुसमाज धर्मशास्त्राविरूद्ध जर वागूं लागेल तर त्याच्या बरोबरीचे समाज जसें लयास गेले तसा तोही लयास जाईल हे म्हणणे पुष्कळांना पटले व त्यामुळे पुष्कळशा माणसांचा धर्मशास्त्रावरील विश्वास दृढ होतो. पण हे म्हणणें अर्थशून्य आहे हें उघड करून दाखविण्यास फारसा लांबवर विचार करण्याचे प्रयोजन नाही. अत्यंत प्राचीन काळीं उदयास आलेल्या राष्ट्रांपैकी हिंदु राष्ट्र हें एक आहे. ही गोष्ट इतकी महशूर आहे कीं, तिची कोणालाहि आठवण करून देण्याचें कारण नाहीं. त्याच्या बरोबरीची इजीप्त, आसीरीया, रोम व ग्रीस वगैरे राष्ट्रे नामशेष झालीं हेंही खरें आहे. परंतु हिंदु राष्ट्र इतके दिवस जीव धरून राहिलें म्हणून तें बलवान आहे असें म्हणणें आत्मश्लाघेचें तसेंच विचारशून्यतेचें लक्षण आहे असें आम्हास वाटतें. जगण्याच्या अनेक परी आहेत व त्या सर्वच बलदर्शक अथवा स्वाभिमानदर्शक आहेत असें नाहीं. शत्रुचा हल्ला आला असतांना त्याचा पराभव करून आपलें स्वातंत्र्य कायम राखणें ही जगण्याची एक पर आहे. तसेंच शत्रुस शरण जावून त्याच्या दास्यत्वाखालीं जीवित कंठणें ही देखील जगण्याची दुसरी पर आहे. दोन्ही परीनें जगणें होतेच. परंतु स्वातंत्र्ययुक्त जीवनाच्या परीची सर गुलामगिरीच्या जीवनाच्या परीला कधींहि

---

[†] पाहा, परिशिष्ट क्रमांक ४६.

येंऊ शकणार नाहीं. हिंदु समाज हा अनेक वर्षे जगला आहे तो केवळ गुलामांचे राष्ट्र म्हणून जगला आहे. त्या जगण्यात कीर्ति व प्रौढी आहे असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं ती पाहिजे तर गावी. आम्हाला तरीं त्या जगण्याची अत्यंत लाज वाटते. नव्हे, आम्ही जगलो हें म्हणणे मुळांतच निराधार आहे असें आम्हास वाटते. आम्हीं जगलों असें म्हणण्यापेक्षां आमच्या जेत्यांनी आम्हास जगविलें म्हणून आम्हीं राहिलों हेंच म्हणणें आम्हास खरें वाटतें. अत्यंत प्राचीन काळीं जेते लोक ज्यांना ते जिंकीत असत त्यांना ठार मारीत असत कारण जिंकलेल्या लोकांपासून त्यांच्या संपत्तीचा अपहार करण्यापलिकडे त्यांचा अन्य कामीं उपयोग करून घेण्याची अक्कल जेतें लोकांत नव्हती. परंतु जेंव्हा जेते लोक शहाणे झाले व जीत लोकांना मारुन टाकण्यांपेक्षां शेतकी वगैरे कामाकडे उपयोग करून घेतां येईल असें त्यास दिसून आले तेंव्हां जीत लोकांचा संहार करण्याची पद्धत नाहींशी होऊन त्यांना गुलाम करण्याची पद्धत अंमलांत आली. हिंदु राष्ट्र जगलें यात त्याचा पराक्रम नसून ज्या लोकांनीं त्यांना जिंकले त्यांचा शहाणपणा आहे. ज्यांचीं परचक्रें हिंदुस्थानावर आली ते लोक अडाणी दशेंत जर असते तर हिंदुंचा संहार कधींच झाला असता. गुलामाचे राष्ट्र म्हणून मिरविण्याची दुर्दशा जी त्यांना साध्य झाली आहे ती देखील त्यांना लाभली नसती. याप्रमाणे जगण्याच्या अनेक परीनें पाहतां आम्हीं जगलों ही गोष्ट आम्हास भूषणावह तर नाहींच पण आम्ही जगलो याचे कारण आम्ही शास्त्राप्रमाणे वागलों हें नसून आम्हास आमच्या शत्रुंनी ठार मारले नाहीं हेंच होय. शास्त्राप्रमाणे वागून जर कांहीं झालें असले तर ते हेच कीं इतर राष्ट्रांपेक्षा आम्ही जास्त हतबल झालों व कोणाविरूद्ध दोन हात करून जय संपादन करण्याइतकी कुवत आमच्यांत राहीली नाहीं. एका राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्रापुढें टिकाव लागला नाहीं याची अनेक कारणें असली तरी सर्वात मुख्य कारण एकाची समाजघटना दुसऱ्याच्या समाजघटनेपेक्षा अधिक लवचिक व न्यायी हेंच होय. त्याशिवाय एका राष्ट्राचे वर्चस्व दुसऱ्या राष्ट्रावर फार दिवस टिकू शकत नाही. हा सिद्धांत जर खरा असेल आणि त्याला कांहीं प्रत्यवाय आहे असें आम्हास तरी वाटत नाहीं तर हिंदु राष्ट्राच्या आपेशपरंपरेचे कारण त्याची विपरीत घटना आहे हें निर्विवाद आहे. आणि ज्याअर्थी त्यांची घटना धर्मशास्त्रानुरूप आहे त्याअर्थी हिंदु राष्ट्राचा अध:पात त्यांच्या धर्मशास्त्रामुळें झाला आहे हे ओघानेच ठरते. ज्या सनातनी लोकांनीं हे निर्णय दिले त्यांनी निर्णय देताना जग कोठे गेलें आहे व कोठें राहिलों आहोंत याचा मुळींच विचार केलेला असावा असें दिसत नाहीं. डोळे उघडून पाहिलें असतां सामाजिक सुधारणेच्या बाबतींत दुनिया कोठेच्या कोठे निघून गेली आहे. आम्ही मात्र जगाच्या आरंभी होतों तेथेंच आहोंत. तनानें, मनानें, धनानें

व वयानें स्त्री-पुरूष प्रजोत्पादनास तयार झाल्याशिवाय दुनियेंत कोठेंच त्यांची लग्नें होत नाहींत. आमच्या देशांत मात्र विवाहाची वयोमर्यादा आठव्या वर्षाच्या वर नसावी असें आमचे धर्ममार्तंड निर्णय देत आहेत! निरोगी माणसामाणसांत सहभोजन झालें असतां एकमेकास कोणताच रोग होत नाहीं, तसेंच माणसामाणसांत सहविवाह झाला असतांना त्यांच्या पोटी माणसेंच निपजतात अशी अनुभवाची ग्वाही सारे जग देत आहे. आमच्या देशांत मात्र रोटीबंद व बेटीबंद कायम राहिले पाहिजेत अशी शास्त्राची अनुज्ञा असल्याचे आमचे धर्मगुरू सांगत आहेत ! जणूं ब्राह्मणाच्या शेजारी मांग जेवावयास बसला तर त्यास रक्तपिक्ती फुटेल! कां ब्राह्मण स्त्रिया व मांग पुरुषांचा संबंध घडला तर त्यापासून होणारी संतति माणसाची न होतां पशुची होईल! स्त्री व शूद्र यांच्यावरील हीनत्वाचा डाग दुनियेंत कोठेंच उरला नाही. गृहकृत्यांना बांधून टाकलेल्या स्त्रिया वाटेल त्या क्षेत्रांत शिरून वाटेल त्या दर्जावर चढल्या आहेत हें यूरोपातीत कोणत्याहि राष्ट्राच्या सामाजिक घडामोडीकडे पाहिलें असतांना दिसून येईल. नेपोलियनसारखा यत्किंचित चांभाराचा पोर अर्ध्या यूरोपखंडाचा बादशाह होऊं शकतो. आईबापाचा ठाव नसलेल्या रॅमसे मॅकडोनल्डसारख्या अर्भकाला ब्रिटिश साम्राज्याच्या दोऱ्या दातांत असलेल्या बलाढ्य इंग्लिश राष्ट्राचा मुख्य दिवाण होता येते. एके काळीं सेवक मानलेले शूद्रवर्ग जगात सेव्य होऊन मोठमोठ्या अधिकाराच्या जागास पात्र झालेले आहेत; इतकें जग पुढें गेलें आहे. आमच्या देशांत स्त्री शूद्रांना साध्या प्रणवाचा उच्चार करण्याचा अधिकार नाहीं असें शास्त्रमत निःशंकपणें मांडण्यांत येत आहे!

या निर्णयांविरूद्ध समसमानी ब्राह्मणात मोठी खळबळ उडाली आहे. त्यांच्या तर्फे सनातन्यांच्या निषेध प्रदर्शन सभा भरविण्यांत येत आहेत. त्यांच्या साऱ्या कार्यक्रमावर पाणी पडल्यांनें त्यांना संताप येणें साहजिक आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें काशीचें संमेलन पद्धतशीर झालें नाहीं. कारण विचारसभेची नियमावली आयत्यावेळी प्रसिद्ध करण्यांत आली व ती पंडीतांच्या अनुमती शिवाय त्यांच्यावर लादली गेली; मध्यस्थ नेमण्यांत वादी प्रतिवादी यांना त्यांच्या लायकी-नालायकी संबंधी मत देण्याचा अधिकार न देता ते नेमण्याचे तसेंच अखेर निर्णय देण्याचे सर्व अधिकार आचार्यांकडे देण्यांत आलें होते; तसेंच सर्व धर्मशास्त्र ग्रंथांचे प्रामाण्य मान्य करण्यांत आलें होते. या गोष्टी गैर झाल्या हे समसामान्याचें म्हणणें आम्हासहि मान्य आहे. पण आम्ही असें विचारतो कीं समसमानी ब्राह्मणांना जी पद्धत पसंत होती त्या पद्धतिप्रमाणें काशीच्या संमेलनाचा कार्यक्रम

चालला असता तर भागले असतें काय? या सनातनी व समसमानी ब्राह्मणांच्या लढ्यांत आमचा ओढा समसमानी ब्राह्मणांकडे आहे हें सांगावयास नको. या लढ्यांत त्यांनी नव्या मताचा पुरस्कार केला याबद्दल आम्ही त्यांचे अभिनंदन करीतों. तथापि आम्हांस मोठ्या कष्टाने म्हणावे लागतें कीं समसमानी ब्राह्मणांच्या युक्तिवादानें कार्यभाग होणे शक्य नाही. समाजसुधारणेंचे कार्य सुकर करावयाचे असेल तर दोन मुख्य प्रश्नांचा उलगडा झाला पाहिजे. सामाजिक प्रश्नांचा विचार करावयाचा तो धर्मशास्त्राच्या अनुज्ञेप्रमाणें करावयाचा किंवा समाजशास्त्राच्या सिद्धांताच्या आधारें करावयाचा हा त्या दोहोंपैकी एक प्रश्न आहे. दुसरा महत्वाचा प्रश्न हा कीं समाजाला लागू पडणारे धर्मशास्त्राचे निर्णय ब्राह्मण वर्गानें द्यावेत आणि बाकीच्यानीं ते मानावेत ही शिस्त हितकारक आहे काय? हे दोन्ही प्रश्न आमच्या मतें अत्यंत महत्वाचे आहेत. त्यांकडे समसमानी ब्राह्मणांचे लक्ष वेधलेलें मुळीच दिसून येत नाही. इतकेच नव्हे तर या प्रश्नाच्या बाबतींत त्यांच्यांत व सनातनी ब्राह्मणांत मतभेद आहे असें मुळीच दिसत नाहीं. दोघांनाहि सामाजिक प्रश्नाचा विचार धर्मशास्त्राच्या आधारें करण्यांत यांवा हें तत्व मान्य आहे. भेद इतकाच कीं, एकाला सर्व शास्त्रे व दुसऱ्याला त्यापैकीं फक्त कांहींच प्रमाणभूत वाटतात. दोघेही धर्मशास्त्राचा निर्णय देण्याचा अधिकार ब्राह्मणांचाच आहे असें मानून वर्तत आहेत. आमच्या मतें हीं दोन्ही तत्वें अतिशय घातुक आहेत. समसमानी ब्राह्मण नवमतवादी आहेत. हे जरी खरे असलें तरी असल्या नवमतवाल्यांच्या नादीं लागून हिंदुसमाजाच्या बुद्धीला धर्मशास्त्रांनी व धर्माधिकाऱ्यांनी लावलेलें ग्रहण सुटणार नाहीं. मताच्या नुसत्या नवेपणावर भाळून जाण्यांत अर्थ नाहीं. त्या मताचा आधार कोणता, धर्मशास्त्र कीं समाजशास्त्र, हें तपासणें अत्यंत अवश्य आहे. त्याशिवाय हिंदुसमाज बाहेरून कितीही सजलेला दिसला तरी तो आतून पोखरलेल्या खांबाप्रमाणे किडकाच राहणार आहे. यासाठीं धर्मशास्त्राचे क्षेत्र आणि धर्मज्ञाचे अधिकार निश्चित झालें पाहिजे. ते कसे करतां येईल याची चर्चा पुढे केंव्हा तरीं करूं, आज या विषयाला झाली इतकी प्रस्तावना पुरे.



---

अग्रलेख : बहिष्कृत भारत, ता. २१ डिसेंबर १९२८.

## ८७

# त्यांच्या माणुसकीचा खून होणार नाही, तसले स्वराज्य त्यास हवे

१. नुकतीच पुणें येथें मुंबई प्रांतिक युवक परिषद भरली होती. या परिषदेचे अध्यक्ष हिंदी तरुणांचे पुढारी पंडीत जवाहरलाल नेहरू हे होते. मागें पुण्यास महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली होती तिला तरुणांचे दुसरे पुढारी बाबू सुभाषचंद्र बोस हें अध्यक्ष म्हणून लाभले होते. असें असुनही ती परिषद प्रतिगामी स्वरुपाची झाली. तिच्यांत अस्पृश्यता निवारणासारख्या सामाजिक व राजकीयदृष्ट्या महत्त्वाच्या ठरावास, धर्म आणि राजकारण यांच्या विभक्तीकरणाच्या सबबीखाली गंचांडी मिळाली. तरुणांचे तडफदार म्होरके आणि क्रांतीवादी सुभाषबाबू पुण्यांच्या विषारी वातावरणास व ब्राह्मण्यग्रस्त पुढाऱ्यांच्या कुटिल कारस्थानास बळी पडले. तसलाच कांहीं प्रकार या तरुण परिषदेंत होतो की काय अशी भीती आम्हांस होती. परंतु त्यांतल्यात्यांत पं. जवाहरलालसारखा बाणेदार, कळकळीचा, चौकस, व कसल्याही प्रकारच्या लपंडावाच्या आहारी न पडण्यासारखा अध्यक्ष या युवक परिषदेस लाभला असल्यामुळे आम्हास आशा होती. ती आशा विशेष जरी फलद्रूप झाली नसली तरी अगदींच विफल झालीं असें मात्र दिसून आले नाहीं. स्वागताध्यक्षांच्या आणि अध्यक्षांच्या, दोघांच्याही भाषणांत सामाजिक विषयावर थोडी कां होईना पण चर्चा दिसून येते. स्वागताध्यक्ष रा. गाडगीळ यांनीं आपल्या भाषणांत सांगितले की. " युवकांच्या चळवळीस सामाजिक समतेचे तत्त्व मान्य आहे; राष्ट्राची प्रकृती त्यांत प्रचलित असलेल्या सामाजिक चालीरीतीवरूनच ठरविली जाते; जर उदार शिक्षणानें एवढेही आम्हास पटलें नाहीं की केवळ एखाद्या जातींत जन्मल्यामुळेंच हक्क व अधिकार मिळत नाही, ते जन्मजातीवर अवलंबून आहेत तर आपल्या कपाळीं राजकीय गुलामगिरीच असणे सर्वथैव योग्य होय; माझे असें प्रामाणिक मत आहे कीं अस्पृश्यता ही शास्त्र सम्मत देखील नाही. " वगैरे वगैरे. जवाहरलाल यांनी देखील आपल्या तडफदार भाषणांत, सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत धुमाकुळ घालीत असलेल्या अरेरावी विरूद्ध तरुणांनी बंड पुकारावयास पाहिजे असें सांगीतले. ते पुढें म्हणाले कीं, प्राचीन काळी धर्माचा उपयोग स्वातंत्रेच्छा मारण्यासाठीं अफू प्रमाणें करण्यांत आला. राजेलोकांनी त्याचा

उपयोग आपल्या स्वार्थाकरितां केला आणि भटाभिक्षुकांनी धर्माचा आधार घेऊन आपले हक्क आणि अधिकार हे दैवी आहेत असे लोकास भासविले. पद दलित अस्पृश्यवर्ग आज जगास जाहीर करीत आहे की धर्माचे अवलंबन त्यांस डांबून ठेवण्यांत आणि त्यांच्या उन्नतीचा मार्ग खुंटवून टाकण्यांत करण्यांत आले.

२. अध्यक्ष व स्वागताध्यक्ष जरी सामाजिक प्रश्नास विसरले नसले तरी त्या प्रश्नास द्यावयास हवें तेवढें महत्त्व देण्यात आले नाही. स्वागताध्यक्षांनी तर सांगून टाकले कीं युवक चळवळ मुख्यत्वेकरून राजकीय अशीच आहे. अध्यक्षांचा कलहि तशाच प्रकारच्या मताकडें झुकलेला दिसत होता. साम्राज्यशाही नेस्तानाबूत करा (*Down with Imperialism*) या गगनभेदी आरोळीत साम्राज्यशाही ज्या ब्राह्मणशाही (*Brahmanism*) मुळें हिंदुस्थानांत आपली पाळेंमुळें दृढ करूं शकली तिजकडें साहजिकच दुर्लक्ष करण्यात आलें. ज्या ब्राह्मणशाहीच्या पायावर आजच्या साम्राज्यशाहीचा डोलारा उभारला गेला आहे तो पायाच मुळ खिळखिळा केला तर साम्राज्यशाही नष्ट करणें किती सोपें जाईल हे तरुणांच्या पुढाऱ्यांच्या ध्यानांत आलेले दिसत नाहीं. तरुणांच्या तर नाहींच नाहीं. साम्राज्यशाहीचा जोर व बळकटी ज्या वर्गांवर राज्य करण्यात येते त्यांच्या दुर्बलतेमध्येंच असते. हिंदुस्थानची ही दुर्बलता हिंदुंच्या सामाजिक रचनेंतच साठवलेली आहे. आमची सामाजिक नीती, व आमच्या चालीरीती ह्या ऐक्य विध्वंसक आणि विघटणा परिपोषक अशा आहेत. त्यामुळेंच साम्राज्यशाहीला आपलें ठाणें येथें बळकट करितां आले व अजून ते कायम ठेवण्यांस ती समर्थ आहे. तेव्हां खऱ्या पुढाऱ्यांस आणि कार्यकर्त्यांस एवढेंच सांगणे आहे कीं ही परिस्थिती जर बदलावयाची असेल तर जन्मजातीजन्य विषमता नष्ट करा, एका चिमुकल्या वर्गाचे बहुजनावर असलेले धार्मिक व सामाजिक वर्चस्व दूर करा, स्त्री व अस्पृश्यवर्गावर पुरातन काळापासून लादलेल्या गुलामगिरीचें उच्चाटन करा, म्हणजे तुमच्या डोक्यावर नाचत असणारे साम्राज्यशाहीचे भूत क्षणार्धात अंतर्धान पावलेंच म्हणून समजा.

३. पुण्यात जमलेल्या तरुणांत येथील सामाजिक परिस्थितीचें ज्ञान विशेष नव्हते. व पुढाऱ्यांत ज्या वर्गाचा भरणा होता त्यास इतर जाती व वर्गाच्या सामाजिक अडचणींचे व हृदयभेदी परंतु छद्मी दुःखाचे आकलन झालेले नव्हते, त्याबद्दल त्यास संवेदना झालेली नव्हती. त्यामुळे सामाजिक प्रश्नांची हेळसांड होऊन राजकीय बाबीवरच विशेष जोर देण्यांत आला. नाहीं म्हणावयास अठरा धान्याचे कडबोळेवजा सामाजिक बंडाळीचा ठराव पास करण्यांत आला. ह्या ठरावांत बाल विवाह निषेधापासून ते जातीभेदविध्वंसन व अस्पृश्यता निवारण

पर्यंतच्या सर्व गोष्टींचा समावेश करण्यांत आला आहे. या सामाजिक प्रश्नांनीं एका ठरावाच्या संकुचित कक्षेंत इतकी गिचडी करून ठेवली कीं त्यामुळें एकमेकांच्या श्वासोश्वासाचा कोंडमारा होऊन प्राणहानी होण्याचा संभव प्राप्त झाला. ठरावाबरोबरच सामाजिक बंडाळी कशी करावयाची याचा कार्यक्रम परिषदेनें आखला असतां तर फारच उत्तम झाले असते. आणि परिषदेच्या पदरांत यशस्वितेचे भरीव श्रेय पदरांत पडले असते. निदान समतासंधी किंवा जात-पात-तोडक कार्यास तरुणांनी जोरानें मदत करावी व त्यात भाग घ्यावा असें जरी सुचविले असते तरी बरेंच कार्य झालें असतें. अध्यक्ष आणि उपाध्यक्ष ह्या दोघांनीं, तरुणांची वृत्ती क्रांतीकारक झाली पाहिजे असें ठासून सांगितले आहे. त्यांतील सामाजिक क्रांतीकारक भावना वर निर्दिष्ट केलेल्या ठरावान्वये उत्पन्न करण्यांत आली. राजकीय क्रांती भावनोत्तेजक संपूर्ण स्वातंत्र्यांचा ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला. तसेच ता. १० मे हा १८५७ च्या बंडाच्या स्मरणार्थ स्वातंत्र्यदिन म्हणून पाळण्यात यावा असेही एकमतानें ठरलें. युवकसंघांच्या कार्यकर्त्यांनीं खादी वापरावी अशा धर्तीचा आर्थिक प्रश्न विषयकही एक ठराव पास झाला. अस्पृश्य वर्गाच्या चष्म्यांतून किंवा खऱ्या सामाजिक क्रांतीवादाच्या दृष्टीने जर या परिषदेकडे बघितले तर ती विशेष यशस्वी झाली असें म्हणता येणार नाहीं. आणि त्याची तशी अपेक्षाही नव्हती. अस्पृश्यवर्गाला सध्यां सामाजिक चळवळीची आवश्यकता आहे. स्पृश्यांचा सामाजिक विषयाबद्दलचा दृष्टीकोन जर बदलला तर तो त्यास हवा आहे. त्यांनी आपली चळवळ जरी स्वावलंबन व आत्मविश्वासाच्या जोरावर चालविलेली असली तरी स्पृश्यांच्या बदलत्या दृष्टीकोनांमुळें त्यांचे कार्य जरा सुलभ होईल एवढेंच.

४. ज्या राष्ट्रीय स्वातंत्र्य व स्वराज्याच्या प्रश्नावर या परिषदेंत जोर देण्यात आला आणि ज्याकरिता देशांतील पुढारी तळमळत असून आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहेत ते स्वराज्य जर स्पृश्य वर्गाचेंच होणार असेल आणि ज्यामुळें आजच्या परिस्थितीकडे लक्ष दिले असता, स्पृश्यांच्या हातीं असलेल्या धार्मिक व सामाजिक सत्तेस राजकीय पाठबळ मिळणार असेल तर तसलें स्वराज्य अस्पृश्य वर्गाला अत्यंत अनिष्ट असे होईल असें त्या वर्गातील कांहीं लोकास वाटते. ही अस्पृश्यांची भीती निराधार व निरर्थक आहे, उलट स्वराज्यांत अस्पृश्यतेचा आम्ही समूळ नायनाट चुटकी सरसा करूं असें स्पृश्यांकडून व विशेषतः राष्ट्रीय पुढाऱ्यांकडून भासविण्यांत येते. स्वराज्य पदरांत पडल्याबरोबर अस्पृश्यतेचा उच्छेद करूं असें म्हणणाऱ्या राष्ट्रीय पुढारी बुवांना, मद्रासेत

नुकत्याच भरलेल्या सामाजिक परिषदेचे अध्यक्ष श्री. इ. व्ही. रामस्वामी नायकर † यानीं चांगलीच थप्पड लगावली आहे. ते स्वतः कट्टे स्वराज्यवादी आणि सामाजिक क्रांतीचे अनन्यभक्त आहेत. ते कट्टर गांधीभक्त होते आणि देशाकरितां हालअपेष्टा व तुरुंगवासही त्यांनी भोगला आहे. त्यांचा आत्मा सामाजिक व राजकीय क्रांती करिता पं. जवाहरलाल नेहरूं किंवा सुभाषबाबूपेक्षां रतीभर ही कमी तळमळत नाहीं. ते आपल्या अध्यक्षपदाच्या भाषणांत अस्पृश्यतेविषयी खालील उद्‌गार काढतात.

५. " ज्या देशांत असा एक वर्ग आहे कीं, त्यास सार्वजनिक रस्त्यावरून जातां येत नाहीं, स्वतःच्या मंदिरात देवाची पूजा करितां येत नाहीं, सार्वजनिक विहिरी व तळ्यावर ज्यास मज्जाव करण्यांत येतो, असा देश जर भूकंपानें नाश पावला किंवा ज्वालामुखी पर्वतामुळें जळून गेला किंवा समुद्रामध्ये बुडून गेला तरी बरें. जर ईश्वरास दयामय असें म्हणावे तर त्यानें ह्या देशाचे केव्हांच जगाच्या पाठीवरून उच्चाटन करावयास पाहिजे होते. अशा देशाला स्वराज्य–साम्राज्यांतर्गत किंवा संपूर्ण स्वातंत्र्य–मागण्यास लाज कशी वाटत नाही ? राजकारणी पुरुष भलेही म्हणोत कीं स्वराज्य मिळाल्याबरोबर अस्पृश्यता नष्ट पावेल. त्यांस मी असें बजावून सांगतो की केवळ स्वराज्यच नव्हे तर, धर्मराज्य, रामराज्य, हरिश्चंद्र राज्य व खुद्द देवतांची राज्यें मनुष्यत्वाला कलंक फासणाऱ्या ह्या रूढीस जन्म देण्यास व तिची जोपासना करण्यास कारणीभूत झाली आहेत. जर ही राज्यें पुन्हां जन्मास यावयाची असतील, तर मला वाटतें कीं अस्पृश्य वर्गाची स्थिती इतकी वाईट होईल कीं तिची सुधारणा करणें पराकाष्टेचे कठिण जाईल." वगैरे वरील उद्‌गारावरून वाचकांस कळून येईल कीं अस्पृश्य वर्गास जी स्पृश्याच्या स्वराज्याची भीती वाटते ती अगदी कांही निराधार नाहीं. श्री रामस्वामीसारख्या खंद्या अनुभवी देशभक्तांस देखील ती वाटते त्यावरून तिच्यांत तथ्य नाहीं असें म्हणवत नाहीं. अस्पृश्यवर्गास स्वराज्याची अत्यंत आवश्यकता आहे. किंबहुना त्याबद्दल त्यांस इतर वर्गांपेक्षा जास्त तळमळ लागली आहे, परंतु त्यास हवें असलेले स्वराज्य म्हणजे पूर्वीच्या स्वराज्याची आवृत्ती असें नको. ज्या स्वराज्यांत त्यांच्या माणुसकीचा खून होणार नाहीं, ज्यांत त्यांचें हक्क संरक्षण योग्य प्रकारें होईल तसले स्वराज्य त्यास हवे आहे. तसल्या प्रकारची मागणी आम्हीं सायमन कमिशनपुढे मांडलेल्या आमच्या योजनेंत केलेली आहे व त्याबद्दल आमचे सर्वांगीण प्रयत्न चालूं आहेत.



---

† पाहा, परिशिष्ट क्रमांक ४७.

प्रासंगिक विचार : बहिष्कृत भारत, ता. २१ डिसेंबर १९२८.

# परिशिष्ट–१

## अस्पृश्यता आणि तिचे बीभत्स स्वरूप

'१९२० च्या नंतर सवर्ण हिंदूंमध्ये अस्पृश्यांच्या दु:सह परिस्थितीबद्दल जाणीव झाली. त्यातील काही लोक अस्पृश्यांना मंदिर प्रवेश करू द्यावा असे मत प्रतिपादन करू लागले. हिंदूंच्या मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश मिळाला, की त्यांची अस्पृश्यता नष्ट होईल व त्यांना व्यावहारिक जीवनांत इतर हिंदुंबरोबर आपली प्रगती घडवून आणण्यास संधी मिळेल, या कल्पनेचे बीजारोपण प्रथम दक्षिण हिंदुस्थानांत झाले. कारण तेथील अस्पृश्यांना नुसते अस्पृश्यच समजत नसत, तर त्यातील काही जातींना अस्पृश्य म्हणजे ज्याचे दर्शन हिंदूंना झाले तर विटाळ होईल, अशा कल्पना रूढ होत्या. मलबारांत माथडी, तीट्या, चैरूमान इत्यादी अस्पृश्य जाती आहेत. त्यांना सवर्ण हिंदूंपासून काही अंतरावर उभे राहून सवर्ण हिंदूंना होणारा विटाळ टाळावा लागतो. या लोकांनी एकमेकांमध्ये २४ ते ७४ फूट अंतर ठेवावयाचे असते.

दक्षिणेत हिंदूंचे राज्य असताना ठराविक अंतर सोडून जर एखादा अस्पृश्य जवळ आला तर नायर जातीचा शिपाई त्याचा तेथेच शिरच्छेद करीत असे व त्याबद्दल त्याला 'तू धर्माचे रक्षण केलेस म्हणून तू स्वर्गास जाशील' असा ब्राह्मणाकडून आशीर्वाद मिळे. ब्राह्मणांसाठी स्वतंत्र रस्ते राखून ठेवलेले असत. त्यांना अग्रहार म्हणत. या रस्त्यांतून ब्राह्मणशिवाय कोणी चालू लागला की त्याला देहांताची शिक्षा होत असे व नंतर अग्रहाराची (रस्त्याची) शास्त्रोक्त शुद्धी करण्यात येत असे. तिय्या जातीचे लोक विश्वविद्यालयाचे पदवीधर झाले तरी त्यांना रूढीपरंपरेप्रमाणे वागावे लागे. त्यामुळे अस्पृश्यांना व विशेषत: सुशिक्षितांना हिंदूंचा व हिंदू धर्माचा मनस्वी तिटकारा उत्पन्न झाला. त्यातील काही लोकांनी ख्रिस्ती व काहींनी मुसलमान धर्म स्वीकारला आणि मग ते सवर्ण हिंदूंबरोबर समतेने वागू लागले.

(South Indian Social Mysteries, by V. R. Shinde, B. A, The Servant of India, dated 24-4-1919).

हिंदूलोक अस्पृश्यांना जिवंतपणी अस्पृश्य समजतात तसेच ते त्यांना मेल्यानंतरही अस्पृश्य समजतात. या बद्दलचे एका अस्पृश्याने ज्ञानप्रकाशच्या दि. १२-१०-१९२३ च्या अंकात तक्रारपत्र प्रसिद्ध केलेले होते, ते असे :—

## महारांच्या प्रेतास ब्राह्मणेतरांच्या स्मशानात मनाई !

बार्शी येथे एक महार मनुष्य मेला असता त्याचे प्रेत काही महारांनी अंत्यसंस्कारासाठी तेथील मराठ्यांच्या स्मशानात नेले. पण त्यास ब्राह्मणेतरांनी हरकत केली. अखेर हा तंटा अधिकाऱ्यापर्यंत गेला व महारास पूर्ववहिवाटीप्रमाणे त्यांच्याच स्मशानभूमीत प्रेत जाळावे लागले, अशी हकीकत नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. ही हकीकत वाचल्यावर कोणासही विषाद वाटल्यावाचून राहणार नाही. प्रेतास मूठमाती देणे ही गोष्ट अगदी क्षुल्लक आहे व वहिवाटीप्रमाणे ती ज्या त्या जातीच्या ठराविक स्मशानभूमीतच झाल्यास काय वाईट, स्मशानात समतेचा हक्क मागण्याने स्वराज्य मिळणार आहे काय, असेही प्रश्न कोणी वावदूक लोक विचारण्यास चुकणार नाहीत. परंतु जरा बारकाईने विचार केला असता, आपल्या समाजातील फाटाफूट व धर्मवेडेपणाची कल्पना कोठवर भिनली आहे हे पाहून विषाद वाटतो. महाराला समाजात जिवंतपणी नागरीकत्वाचा हक्क नाहीच, परंतु पंचतत्त्वास गेलेल्या त्याच्या शरीराला मूठमाती देण्याच्या वेळीही जर कोणी रूढीची मर्यादा रेसभर ओलांडू म्हणेल, तर मेल्यानंतरही अपमानाचे मरण त्यास सोसावे लागते. आज कोणत्याही स्मशानभूमीत–मग ती ब्राह्मणांची असो वा ब्राह्मणेतरांची असो– तेथे रात्रंदिवस राहून व्यवस्था ठेवण्यास महार मनुष्य चालतो, किंबहुना त्यालाच बहुतेक ठिकाणी हे वतन दिलेले असते. तथापि तो स्वतः मेल्यास त्याच्या प्रेताचा विटाळ या दहनभूमीस खपत नाही, हे कोठले तर्कशास्त्र ? आपण सर्व एकाच देशाचे पुत्र आहोत व बंधू आहोत असे म्हणून फायद्यापुरते कुरवाळणारे लोक मयताची विल्हेवाट लावण्यासारख्या अंत्यसंस्काराच्या वेळीही आपल्या मनातील दुजाभाव तिळभरही कमी करणार नाहीत, तर मग एकीचे एवढे मोठे ढोंग कशाला ? ' आत्मवत् सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति ' हे सांगणाऱ्या भगवद्गीतेचे तरी स्तोम एवढे माजवावयाचे कशाला ? बार्शीमध्ये घडल्यासारखे प्रकार ठिकठिकाणी मुद्दाम घडवून आणावेत असे आम्ही सुचवीत नाही. झालेल्या प्रकाराच्या मुळाशी ज्या भावना आहेत त्या समूळ नष्ट होण्यावरच हिंदुस्थानची ऊर्जितावस्था अवलंबून आहे असे मानण्यास बिलकुल प्रत्यवाय नाही. '[1]



[1] : खैरमोडे, खंड २ रा, पृ. ३८, ४७-४८.

# परिशिष्ट–२

## हिंदुधर्माचा सिद्धांत आणि लोकशाही

येथील लोकशाही बलशाली करायची असेल तर तिचा आधार येथील प्राचीन वैचारिक जीवनात शोधला पाहिजे, या दृष्टीने भारतीय लोकशाहीची मुळे याचा शोध डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मन घेत असतांना या लोकशाहीचा येथील परंपरेशी, प्राचीन जीवनाशी सांधा जोडण्याचा त्यांचा प्रयत्न सतत सुरू होता. याबाबत विचार करतांना ते म्हणतात, येथील प्राचीन काळातील ब्रह्मवाद लोकशाही तत्त्वज्ञानाचा उत्तम आधार होऊ शकला असता. जुन्या काळातील ब्रह्मवादाची कल्पना ख्रिश्चन, मुस्लिम व ज्यू धर्मातील ईश्वरविषयक कल्पनेपेक्षा किती तरी श्रेष्ठ आहे. या धर्मामध्ये ईश्वर हा धर्माचा निर्माता. तो श्रेष्ठ व सर्व माणसे ही त्याची लेकरे अशी कल्पना आहे. यामध्ये निर्माता व माणसे यामध्ये अंतर आहे. द्वैत आहे. परंतु ब्रह्मवादाची कल्पना या विचारापेक्षा मूलतः वेगळी आहे. येथे सर्व माणसे ही ब्रह्माची रूपे आहेत. ब्रह्म आणि माणसे ही एकच आहेत. त्यांत कसलाही भेद नाही. अद्वैताचीही कल्पना समतेच्या दृष्टीने अधिक श्रेष्ठ दर्जाची आहे. या ब्रह्मवादातून लोकशाही जीवनाचा वृक्ष चांगला फोफावला असता. परंतु दुर्दैवाने जातिवादाने ब्रह्मवादातील समतेचा विचार मारून टाकला. यासंबंधीचे विवेचन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी ' Riddles in Hinduism ' An Exposition to Enlighten the Masses या पुस्तकातील २२ व्या निबंधात [1] केले आहे.

●●●

---

1 : Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches, Vol. 4, P. p. 284—287.

# परिशिष्ट–३

## सत्यशोधक समाज

महात्मा जोतीराव फुले यांनी खालील ध्येय आणि उद्दिष्ट यावर आधारित सत्यशोधक सभाजाची स्थापना केली.

" ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादी लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकास मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्र लोकास नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत. यास्तव सदुपदेश व विद्याद्वारे त्यास त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधी ब्राह्मणांचे बनावटी व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यास मुक्त करण्याकरिता काही सूज्ञ शूद्र मंडळींनी हा समाज तारीख २४ माहे सप्टेंबर १८७३ इसवी रोजी स्थापन केला. या समाजात राजकीय विषयावर बोलणे अजिबात वर्ज्य आहे." (म. फुले समग्र वाङःमय पाचवी आवृत्ती पृ. १८५)

अवघ्या पंधरा वर्षांत सत्यशोधक समाजाने म. जोतिराव फुले यांच्या नेतृत्वाखाली आपल्या ध्येय व उद्देशानुसार एवढे परिणामकारी कार्य केले की ब्राह्मण समाजाला आपले अस्तित्व कायम ठेवण्यासाठी तारीख १७ जून १८८८ ला " ब्राह्मण सभा " स्थापन करावी लागली. याबाबत ' ब्राह्मण सभेची साठ वर्षे ' या ग्रंथात सभेची पार्श्वभूमी विशद करताना वा. रा. गुळवणे म्हणतात, " जोतीराव फुले यांनी स्थापन केलेल्या सत्यशोधक समाजाने ब्राह्मण समाजावर प्रखर हल्ले सुरू केले होते. वेद, मुर्तीपूजा, चातुर्वर्ण्य आणि पौरोहित्य ही सर्व झुगारून दिली पाहिजेत, किंबहुना त्यामुळे ब्राह्मणेतर समाज अवनतावस्थेला पोहोचला, अशा प्रचाराचा सत्यशोधक समाजाने धुमधडाका सुरू केला. राज्य सत्ता सर्वस्वी इंग्रजांच्या हाती असली तरी कित्येक महत्वाच्या नोकऱ्या पटकावण्यात ब्राह्मण समाजाला यश मिळाल्यामुळे ब्राह्मणेतर समाजाचा जळफळाट सुरू झाला. महाराष्ट्रात मराठा समाज बहुसंख्य असल्यामुळे त्या समाजाची धार्मिक गुलामगिरी नष्ट झाल्याशिवाय त्यांची उन्नती होणे शक्य नाहीं, अशा मतांचा जोरात प्रचार सुरू झाला. काहीतरी करून ब्राह्मण समाजाचे नाक खाली करावयाचे असा जणू सत्यशोधक समाजाने विडाच उचलला होता, असे म्हणण्यास हरकत नाही." (खैरमोडे, खंड ५.पृ. ३३६-३७)

डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात, सत्यशोधक समाजाचे अध्वर्यू जोतीबा फुले यांचे खरे साथीदार व उत्साही शिष्यांपैकी बरेचसे जण ' अनार्य दोषपरिहार मंडळी ' या संस्थेच्या चालकांपैकी होते. एकाच्या नावाचा उल्लेख केल्याशिवाय

माझ्याने राहवत नाही. ते गृहस्थ म्हणजे कै. गोपाळबुवा वलंगकर हे होत. त्यांनी आपल्या लेखनाद्वारे जी जागृती केली ती अनुपम आहे. ज्यांना ती पाहावयाची असेल त्यांनी दीनबंधूच्या जुन्या फाईली वाचून पाहव्यात म्हणजे कळेल. '' (बहिष्कृत भारत, ता. ३ एप्रिल १९२७.)

म. फुले नंतर छत्रपती शाहू महाराज यांनी ११ जानेवारी १९११ रोजी कोल्हापूर येथे सत्यशोधक समाजाची पुनर्स्थापना केली, त्यांनी म. फुले यांच्या सत्यशोधक समाजाच्या ध्येय, उद्देश आणि त्यांचे प्रदर्शित विचार यांना दृष्टिगत या चळवळीला अधिक व्यापक स्वरूप दिले होते. या चळवळीमुळे आपले अस्तित्व धोक्यात येत आहे असे समजून ब्राह्मण समाजाने पंढरपूर येथे तारीख १७ ते १९ सप्टेंबर १९२० मध्ये ' पहिली ब्राह्मण्य संरक्षक परिषद भरविली.' त्यातील ठरावानुसार वि. शि. जोग वकिल यांना कोल्हापूर व सातारा भागात बहुजन समाजाकडून ब्राह्मण समाजावर झालेल्या अन्याय, अत्याचारांची चौकशी करण्यास नेमण्यात आले.

परिषदेच्या अहवालात स्पष्टपणे म्हटले आहे की, '' सनातन धर्मीय उर्फ पुराणमताभिमानी हिंदुंच्या विरूद्ध चळवळ करणारा जसा सत्यशोधक समाज आहे तसे प्रार्थना, ब्रह्मो, आर्य, हिंदू मिशनरी सुधारक वगैरे अनेक आधुनिक समाज आहेत. परंतु प्रार्थना समाजादिकांच्या आणि सत्यशोधकाच्या कार्याची जर तुलना केली तर सत्यशोधक समाज अनत्याचारी प्रागतिक नसून अत्याचारी क्रांतीकारक आहे हे कळून येणार आहे.''

'' सत्यशोधकी अत्याचाराकडे सरकार कानाडोळा करीत आहे. सरकारचे हे धोरण सरकारनीच पूर्वीपासून दिलेल्या अभिवचनाविरूद्ध आहे. सबब हे प्रकार ताबडतोब अजिबाद बंद करण्याची सरकारने तजवीज करावी.''

हा संपूर्ण अहवाल ' सातारा जिल्ह्यातील सत्यशोधक समाजाच्या अनुयायांची पुंडाई, जबरदस्ती अत्याचार वगैरे' या शिर्षकाखाली ब्राह्मण संरक्षक संघ श्रीक्षेत्र पंढरपूर १९२१ द्वारे मुंबई सरकारला आवश्यक कार्यवाहीसाठी पाठविला होता.



# परिशिष्ट–४

## अस्पृश्यता निवारण आणि सार्वजनिक सोयी

सार्वजनिक ठिकाणांचा अस्पृश्यांना उपभोग घेऊ द्यावा अशा आशयाचा ठराव श्री. सीताराम केशव बोले यांनी दि. ४-८-१९२३ ला मुंबई कायदेमंडळात मांडला.

'There is a very strong feeling amongst these classes themselves and I am afraid, if we do not pay any heed to the proper and legitimate demands of these classes, a day will come when these classes will themselves start satyagraha and carry the banner of social liberty to the temples and places of worship ......' (Vol. X, pp. 410).

श्री. सुर्वे यांनी या ठरावाला काही दुरुस्त्या सुचविल्या व चर्चेनंतर ठराव खालील स्वरुपात सरकारने स्वीकारला—

'This Council recommends that the Untouchables be allowed to use all public watering places, wells and dharmashalas which are built and maintained out of public funds or are administered by bodies appointed by Government or created by States, as well as public schools, courts, offices and dispensaries.' (Vol. X, pp. 428).

बोले ठरावावर डायरेक्टर ऑफ् इन्फर्मेशनने नंबर पी. ११७, ता. २९-३-१९२३ ला प्रेस नोट प्रसिद्ध करून जनतेस या ठरावाची माहिती दिली.

या ठरावाची अंमलबजावणी सरकारी अधिकाऱ्यांनी करावी, असा मुंबई सरकारने दि. १९-१-१९२३ ला एक हुकूम काढला. "In pursuance of the foregoing Council Resolution, the Government of Bombay are pleased to direct that all heads of offices should give effect to the resolution so far as it relates to the public place and institutions belonging to and maintained by Government. The collectors should be requested to advice the local public bodies in their jurisdiction to consider the desirability of accepting the recommendations made in the resolution so far as it relates to them. The Chairman, Bombay and Karachi Port Trusts, the Chairman, City of Bombay Improvement Trust, and the Municipal Commissioner for the City of Bombay should be requested to take similar steps with the consent of Trustees and the Corporation to give effect to the resolution with regard to the places controlled by them ...' (Memo prepared by the Govt. of Bombay for submission to the Indian Statutory Commission, 1928, pp. 231.)

बोले ठरावाची अंमलबजावणी व्हावी तितकी झाली नाही, याचे कारण ही अंमलबजावणी करणे हे स्पृश्य हिंदू अधिकाऱ्यांच्या हातात होते. आणि स्थानिक व सार्वजनिक ठिकाणांची व्यवस्थाही सवर्ण हिंदूंच्या हातात होती. अस्पृश्यांना

या ठिकाणी येऊ देणे म्हणजे आपल्या गेल्या काही पिढ्या व पुढील पिढ्याही नरकात लोटणे होय, अशी या हिंदूंची भावना होती. या ठरावाची अंमलबजावणी व्हावी म्हणून जो सरकारने हुकूम काढलेला होता त्याची भाषा आर्जवी होती. या व इतर कारणांमुळे बोले ठरावाची अंमलबजावणी व्यवस्थितपणे व कडक रीतीने झाली नाही. या ठरावाची अंमलबजावणी नीट होत नसे या संबंधी अस्पृश्यांच्या सभेतून ठराव पास होत. वर्तमानपत्रातूनही याबद्दल ओरड करण्यात आली. यासंबंधी दोन पत्रे ३ व ५ ऑक्टोबर १९२३ च्या ज्ञानप्रकाशात प्रसिद्ध झाली होती. ती खाली देत आहे.

## अस्पृश्यता निवारणासाठी मुंबई सरकारचे प्रयत्न : कलेक्टरांना हुकूम--

मुंबई कायदे मंडळाच्या गेल्या बैठकीत रा. बोले यांचा पुढील आशयाचा ठराव कौन्सिलात पास झाला होता :—

' प्रत्यक्ष सरकारी देखरेखीखाली असलेल्या अगर सरकारी खर्चाने चाललेल्या किंवा सार्वजनिक पैशातून निर्माण होणाऱ्या अगर कायद्याने अस्तित्वात येणाऱ्या अशा सर्व विहिरी, पाणवठ्याच्या जागा, धर्मशाळा, तसेच सार्वजनिक शाळा, कोर्टे, कचेऱ्या आणि दवाखाने वगैरे ठिकाणांचा उपयोग करण्याची अस्पृश्यांना परवानगी असावी. '

या ठरावास अनुसरून प्रत्यक्ष सरकारी खर्चाने चालणाऱ्या किंवा सरकारच्या नियंत्रणाखाली असलेल्या ठिकाणी या ठरावाची अंमलबजावणी करण्याबद्दल आपल्या अधिकाऱ्यांना मुंबई सरकारने हुकूम सोडले आहेत. सदर ठरावात केलेल्या शिफारसी अंमलात आणण्याची आवश्यकता स्थानिक संस्थांना पटवून देण्याचा उपदेश करण्याचे काम कलेक्टरांकडे सोपविण्यात आले आहे. मुंबई व कराची येथील पोर्टट्रस्ट, बॉम्बे सिटी इंप्रूव्हमेंट ट्रस्ट, आणि म्युनिसिपल कॉर्पोरेशन यांना त्यांच्या ताब्यातील जागांसंबंधाने हा ठराव अंमलात आणण्याची विनंती करण्यात आली आहे. ' (ज्ञानप्रकाश ३-१०-१९२३)

## मुंबई सरकार व अस्पृश्यता निवारण्याचा ठराव : अग्रलेख

सार्वजनिक पैशाने स्थापन करण्यात आलेल्या सार्वजनिक खर्चाने चाललेल्या शाळा, दवाखाने, धर्मशाळा, विहिरी, न्यायकोर्टे किंवा पाणवठे यांचा उपयोग करण्याचा हक्क अस्पृश्य म्हणून समजल्या गेलेल्या जातींना स्पृश्य म्हणून मानल्या गेलेल्या जातींच्या बरोबरीने आहे, हे तत्त्व मुंबई कायदे मंडळाच्या गेल्या अधिवेशनात रा. ब. सी. के. बोले यांनी आणलेला ठराव मान्य करून मुंबई कौन्सिलने बहुमताने कबूल केले होते. या ठरावावरील वादविवादात होम मेंबर

ना. सर मॉरिस हेवर्ड यांनी भाग घेतला होता व त्यावेळी या ठरावातील मूलभूत तत्त्वाला विरोध नाही असे जाहीर केले. या प्रश्नाची चर्चा सुरू असताना रा. सुर्वे यांची उपसूचना मान्य करून स्थानिक स्वराज्य मंत्री ना. खा. ब. हिदायतुल्ला यांनीही ठरावाला दुजोरा दिला होता. अर्थात् कौन्सिलने मंजूर केलेल्या रा. बोले यांच्या ठरावाची अंमलबजावणी करण्याचे नैतिक आश्वासन सरकारी सभासदांच्या सहानुभूतीच्या धोरणावरून मिळालेले होते. आता या बाबतीत मुंबई सरकारने जी प्रेसनोट काढली आहे, तिजवरून या प्रश्नाची शक्य तेवढी अंमलबजावणी करण्याच्या कामास सरकार कळकळीने पुढे येत आहे, असे कोणालाही सहज दिसून येईल सार्वजनिक शांततेची सबब पुढे करून सरकारला या कामी दिरंगाई दर्शविता आली असती. पण तसे न करता कौन्सिलने मंजूर केलेल्या ठरावाची अंमलबजावणी करण्यासंबंधाने स्थानिक संस्थांशी पत्र व्यवहार सुरू करण्याबद्दल जिल्हा अधिकाऱ्यांना हुकूम सोडून मुंबई सरकारने अस्पृश्यवर्गाच्या हिताबद्दलची आपली कळकळ चांगल्या रीतीने व्यक्त केली आहे, असे आम्ही मोठ्या आनंदाने कबूल करतो. या ठरावाच्या काही भागाच्या बाबतीत म्हणजे उदा.—सरकारी मदत घेणाऱ्या शाळांत अस्पृश्यांना ते अस्पृश्य गणलेले आहेत याच कारणास्तव मज्जाव करण्यात आल्यास त्यांना सरकारी मदत देण्यात येऊ नये, अशा अर्थाचा हुकूम काढून शिक्षणमंत्री ना. परांजपे यांनी आधीच त्याची अंमलबजावणी करण्यास सुरुवात केली होती. पण आता हा सर्वव्यापी ठराव करण्यात आल्याप्रमाणे निदान सार्वजनिक ठिकाणी अस्पृश्यांना होणारा प्रतिबंध कमी होण्यास पुष्कळच मदत होईल. हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनी अस्पृश्यता निवारण्यासाठी जे काही थोडेबहुत परिश्रम चालविले आहेत, त्या सर्वांत मुंबई सरकारचा नंबर पहिला लागेल. त्याचे मुख्य श्रेय या कायदेमंडळातील प्रागतिक पुढारी व ना. परांजपे यांच्यासारखे उदारमतवादी दिवाण यांनाच दिले पाहिजे. मुंबईच्या कायदेमंडळाप्रमाणे मध्यप्रांताच्या कायदेमंडळाने अस्पृश्यांना सार्वजनिक ठिकाणी मज्जाव असू नये, अशा अर्थाचा ठराव बहुमताने मंजूर केला असल्याचे वाचकांना आठवत असेलच. पण या बाबतीत मध्यप्रांत सरकार आपल्या जिल्हा अधिकाऱ्याकडे मुंबई सरकारप्रमाणे हुकूम सोडण्यास तयार आहे किंवा नाही याचा खुलासा होणे आम्हास जरूर वाटते. ना. सर मोरोपंत जोशी व ना. केळकर वगैरे सरकारी सभासदांनी व दिवाणांनी या ठरावाला दुजोरा दिल्यानंतर याची अंमलबजावणी करण्याच्या कामात दिरंगाई होण्याचे काही कारण नाही. केवळ सरकारने आपल्या अधिकाऱ्यांना हुकूम सोडले म्हणजे हा प्रश्न सुटतो अशातला भाग नाही. तथापि सरकारच्या हुकुमाने अंमलबजावणीच्या कामाला चालना मिळते, व लोकजागृती होण्याला मदत होते. या कामी कित्येक

ठिकाणी स्थानिक संस्थांतील पुराणमतवादी लोकांचा सरकारला विरोधही सहन करावा लागेल, हे अगदी खरे असले तरी आजपर्यंत अस्पृश्यवर्गीयांवर स्पृश्यवर्गीयांनी गुलामगिरीचा छाप मारून जो गुन्हा केला आहे, त्याचे निराकरण करण्यासाठी सरकारने या ठरावातील मूलभूत तत्त्वापासून मुळीच च्युत न होता, अस्पृश्यवर्गीयांची बाजू राखणे जरूर आहे. मुंबईसरकारच्या हातून गेल्या तीन वर्षांत ' जी ' काही निरनिराळी लोकहिताची कामे झाली, त्यात नैतिक दृष्ट्या या ठरावाच्या अंमलबजावणीची कामगिरी अत्यंत महत्त्वाची गणली जाईल, त्याबद्दल आम्ही मुंबई सरकारचे आणि रा. बोले यांचे अभिनंदन करतो. सध्या केनियाचा प्रश्न राष्ट्रापुढे आहे अशावेळी आपण आपल्या देशात अस्पृश्यांना कोणत्या प्रकारे वागवितो याची प्रत्येकाला आठवण झाल्याखेरीज रहात नाही. खरोखर जर आपण आपल्या बांधवांना आपल्या देशात समानतेने वागविणार नाही, तर परकीयांनी आपणाला समानतेचा दर्जा दिला पाहिजे असे म्हणण्याचा आपणाला नैतिक हक्क कितपत पोहोचतो, याचा आपल्या मनाशी शांतपणाने विचार करावा. परदेशात जाऊन राहिलेल्या पंधरा-वीस लक्ष देशबांधवांसाठी आपण जर इतकी ओरड करतो, तर आपल्याच आर्यावर्तात सहा कोटी देशबांधवांना अस्पृश्य म्हणून लेखणाऱ्याविरूद्ध आपण केवढी प्रचंड चळवळ केली पाहिजे, हे येथे सांगितले पाहिजे असे नाही. अशा स्थितीत मुंबई सरकारने काढलेल्या जाहीरपत्रकाला विरोध करण्याचे अश्लाध्य प्रयत्न करण्याचे पातक कोणीही करणार नाही, अशी आम्हास उमेद आहे. या बाबतीत अस्पृश्यवर्गीय बंधुंना आमची अशी आग्रहाची विनंती आहे की, त्यांनी या ठरावाची माहिती मुंबई इलाख्याच्या सर्व भागातील अस्पृश्य बंधुंना करून द्यावी व मुंबई सरकारच्या या बाबतीतील धोरणाला जाहीर सभांतून संमतीदर्शक व अभिनंदनपर ठराव मंजूर करून जोराचा पाठिंबा द्यावा. सध्याच्या लोकशाहीच्या काळात लोकमताची जागृती हाच हक्कसंपादनाचा आणि हक्कसंरक्षणाचा एक टिकाऊ राजमार्ग आहे, हे त्यांनी जरूर लक्षात बाळगावे. ' (ज्ञानप्रकाश, ५-१०-१९२३) [१]



[१] : उद्घृत, खैरमोडे, खंड ३, पृ. ३१-३४.

# परिशिष्ट–५

## नगर येथील पाणी प्रकरण
## बाटलेले खिस्ती व ब्राह्मण्यग्रस्त हिंदु यांच्यामधील
## एका जुन्या वादाची हकीकत

'' विष्णुपंत यांस कायद्याची बरीच माहीत होती, आणि या माहितीचा ते लोकांच्या कामांत चांगला उपयोग करीत असत. मुंबईपेक्षा नगर प्रांतांतील खिस्ती लोंकांस अशा प्रकारचे जे सहाय्य झालें, त्याचा त्यांस लवकर विसर पडणार नाही. जें हिंदु, मुसलमान वैगेरे लोक खिस्ती होतात, त्यांचे पहिले हक्क बुडवायाचा लोक प्रयत्न करितात. अशा प्रसंगी त्यांच्या ज्या खिस्ती बांधवास कायद्याचें ज्ञान आहे, त्यांनी त्यांना सहाय्य करावें हे त्यांचें कर्तव्य आहे. हें सहाय्य विष्णुपंत यांनी मोठ्या धैर्यानें केले, म्हणून त्यांची तारीफ करणें योग्य आहे. नगराच्या पाणी प्रकरणाचा विष्णुपंतांच्या चरित्राशी विशेष संबंध आहे. म्हणून त्याची हकीकत थोडी विस्तारांने सांगतो.

हें पाणीप्रकरण सन १८५९ त उपस्थित झाले. त्यांत पुढारी विष्णुपंत होते. ह्या प्रकरणावरुन असे वाद जेव्हा ठिकठिकाणी उत्पन्न होतात, तेव्हां जुने हिंदु लोक व अलीकडील सुशिक्षित लोक व त्यांचे पत्रकर्ते खिस्ती लोकांस दोष देतात, व त्यांवर भलभलत्या हेतूंचा आरोप ठेवितात. म्हणून बहुत लोकांस आतां त्यांचा विसर पडला आहे. यास्तव त्या प्रकरणाची कच्ची हकीकत थोडक्यांत देण्याची आवश्यकता आहे ती पुढच्या लोकांच्या उपयोगी पडेल अशी आशा आहे.

दोष देणारे म्हणतात कीं, असा बखेडा उपस्थित करण्यांचें कांहीच प्रयोजन नव्हतें, खिस्तीलोकांनीं तो बळेंच उकरून काढीला. हें म्हणणें खरें नाही हें वाचकांच्या ध्यानांत यावें, म्हणून ह्या प्रकरणास मूळ कारण काय झाले तें सांगतों. खिस्तीलोकांस वारंवार पाण्यामुळे फार अडचणी भोगाव्या लागत. अहमदनगर शहरांत मिशनचे दोन तीन बंगले आहेत. त्यापैकी एक बंगल्यांत मात्र एक लहानसे कारंजे होतें. ते कित्येक खिस्ती लोकांच्या घरापासून फार दूर होते, तरी त्यांस तेथेच पाण्याकरितां जावें लागे आणि एखाद्या वेळेस नळ बंद झाला म्हणजे त्यांस मोठे संकट प्राप्त होई. आपल्यास कायद्याप्रमाणें इतर लोकांप्रमाणे पाहिजे त्या सरकारी हौदांतून पाणी घेण्याचा पूर्ण अधिकार आहे, हें त्यांस ठाऊक होते. परंतु ह्या अधिकाराचा त्यांनी बहुत वर्षे उपभोग घेतला नव्हता; म्हणून लोक दांडगा करुन बखेडा माजवितील, याची त्यांस भीति वाटत असे. तेथील मिशनरीपैकीं रेर्व्हेसा नामे एक साहेब सन १८३९

पासून कित्येक वर्षे दिल्ली दरवाज्याबाहेरील बंगल्यांत राहत होता, तेव्हां त्याच्या संबंधांतील खिस्ती बाहेरील व शहरांतील कारंज्यांतून पाणी भरत असत. पण ती वहिवाट मागे पडून आतां सुमारे १५ वर्षे तरी झालीं होतीं. यामुळें त्यांस आपला पूर्वीचा हक्क चालविंता येईल किंवा नाहीं, याविषयी संशय वाटत होता. म्हणून त्यांनी या विषयी शोध केला, त्यावरून त्यांस समजलें कीं, आपण आपले कायदेशीर हक्क चालविल्यास हरकत होणार नाहीं. तरी खिस्ती लोक मागे मागेंच घेत असत. ज्यांस ऐपत होती, ते भिस्ती लावीत असत. ही ऐपत सर्वांस नव्हती व आतांहि नाहीं. सन १८५९ साली सप्टेंबर महिन्यांत असें झालें कीं, सरकारी अधिकाऱ्यांनीं शहरांतील दरोबस्त भिस्ती धरून त्यांस मोठाले हौद उपसून साफ करण्याच्या कामास लाविलें, व त्यांस तीन चार दिवस सोडिलें नाहीं. यावरून भिस्त्यापासून पाणी घेणाऱ्या लोकांस फार अडचण पडली. तेव्हां विष्णुपंत हे गुलाम अल्लीच्या बंगल्यांत रहात होते. त्यांनी एक दिवस कशी तरी अडचण सोसिली. मग ता. १५ माहे मजकूर रोजीं ते आपल्या कुटुंबास व आणखी एका दोघां खिस्ती मित्रांस बरोबर घेऊन नव्या पेठेंतील हौदावर गेले. सारजाबाई इतर बायांप्रमाणे एक घागर भरून घरी गेली तेव्हां तिजकडे कोणाचे लक्ष गेलें नाहीं. मग ती दुसरी घागर घेऊन चालली, तेव्हां कोणी हिंदु बायांनी पाहिलें; पण हिने ही घागर कोठून भरून आणिली, हें त्यांस समजेना. कोणीकोणी अनुमान केलें कीं, नव्या पेठेंतील हौदांतूनच आणिली असेल. म्हणून त्या जेथल्या तेथेंच थबकून तिची पुनः येण्याची वाट पाहात उभ्या राहिल्या. त्यांतून कोणी रिकाम्या घागरी घेऊन हौदाकडे चालल्या होत्या, त्यांस वाटलें की जर, ही किरस्तावाची बाई कारंज्याला शिवली असेल, तर त्यांचे पाणी आणून काय उपयोग ! ज्या घागरी भरून आपल्या घरांस चालल्या होत्या, त्यांस वाटलें कीं, जर हिनें त्याच कारंज्यांतून पाणीं घेतलें असेल तर हें " बाटलें " आणि बाटलेलें पाणी घरांत कसें न्यावें. परंतु बाटलें नसलें तर उगीच कशाला टाकून द्यावे ? म्हणून ती खिस्ती बाई फिरून येऊन कोणीकडे जाते, व कोठून पाणी आणते, हे पाहण्यासाठी ठिकठिकाणीं त्यांचे थवे उभें राहिले होते. कांहीं वेळांनें सारजाबाई तिसरी खेप नेण्यास आली, तेव्हा सर्व बायका तिच्या मागें मागें चालल्यां, हौदाजवळहि बरेच पुरुष व स्त्रिया उभी राहून त्याच गोष्टी विषयीं कुजबुज करीत होते. कोणी कारंज्याला शिवेनात, जसे जणू कारंजे त्यांस डसेल या प्रमाणे भिऊन त्यापासून दूर उभी राहिलीं होती. जेव्हां त्यांनी सारजाबाईस पाहिले तेव्हां ते म्हणाले " ती पहा आली ; तिला पाणी घेऊ देऊ नका. " पण जेव्हां ती आली, तेव्हां कोणी हिंदू पुढें व्हावयास धजेना; पण एक मुसलमान आडवा होऊन तिला हरकत करु लागला. इतक्यांत विष्णुपंत व

त्यांचे मित्र येऊन, त्यां मुसलमानास हरकत करण्यांचें कारण विचारू लागले. त्याशीं कांही बोलणें झाल्यावर तो मनुष्य कुंठीत झाला, आणि दुसऱ्या मुसलमानांनीही त्याला फजित केलें. त्यावरून तो म्हणाला, " खरेंच, आपण कशाला ह्या लचांडांत पडावें ? आम्हा मुसलमानांस बाटवावयाचें काय भय ? बिस्मिल्ला म्हटलें की सर्व कांही शुद्ध होतें. असें म्हणून तो आपला हांडा भरून चालता झाला. नंतर हिंदुंशीं व मुख्यत्वेंकरून ब्राह्मणांशी तसेंच बोलणें झालें ; पण ह्या उघड गोष्टीविषयीं त्यांची समजूत होईना. ते फार संतापले, आणि त्यांनी लोकांस सांगितलें, कीं, हा हौद लोकांनी भ्रष्ट केला म्हणून याचें पाणी कोणी भरूं नये. यावरून लोकांनी तो हौद टाकून दिला. भटांनी बाजारांत जाऊन सर्वात असें प्रसिद्ध केलें कीं, पाद्रीकडील बायांनी एका बाटलेल्या महारणीकडून कारंजाचे पाणी भरवून व त्यांत गुळण्या टाकवून तें बाटविलें, आणि याचप्रमाणें शहरांतील दरोबस्त हौद भ्रष्ट करण्याची प्रतिज्ञा केली आहे. यास्तव सर्व बाजार बंद करून हरताळ पाडा, म्हणजे सरकारचे डोळे उघडून आपली दाद लागेल, ही भयंकर कुभांडी वार्ता एकून बाजारच्या लोकांस फार वाईट वाटलें. परंतु हरताळ पाडण्याविषयीं भटांनी पराकाष्ठेचा आग्रह केला, तरी फार थोडक्या लोकांनी आपली दुकाने बंद केलीं.

नंतर लोकांनी नगरचे मॅजिस्ट्रेट मि. टैटलर यांजकडे अर्ज केला. त्यांतील मतलब असा कीं, पाद्रीकडील लोकांपैकी विष्णु भास्कर व शाहू दाजी कुकडे यांनीं बाप्तिस्मा घेतलेल्या महारणीकडून हौद बाटविला. त्या लोकांस सरकारनें दोन हौद दिले असून तेथेच सर्व खिस्ती लोकांची वस्ती आहे. दुसऱ्या हौदावर पाणी घेण्याची त्यांची वहिवाट नाहीं. सन १८२८ चा कायदा १७, कलम १, रकम १ ली, तारीख १ नोव्हेंबर सन १८५८ च्या महाराणी साहेबांच्या जाहीर नाम्यांचें कलम ७ वें, यांविरूद्ध चालून तें आम्हांस दुःख देत आहे. यास्तव त्यांस पाणी भरण्याची सक्त मनाई करावी. या अर्जावर ४३२ सह्या होत्या. त्या मुख्यत्वेंकरून भिक्षुक, कांहीं उदमी, व बाकी पोरें यांच्या होत्या. मॅजिस्ट्रेट साहेबांनी विष्णुपंत व मि. शाहु दाजी यांस बोलावून आणून व अर्ज वांचून दाखवून जबाब विचारला, तेव्हा विष्णुपंत यांनीं सांगितलें कीं, " कविजंगाचा वाडा भाड्यानें घेतल्यापूर्वी आमचे खिस्ती लोक ब्राह्मण वगैरे हिंदु, व दुसरे लोक, यांजबरोबर पाणी भरत असत. सदरहू वाडा घेतल्यावर बहुतेक खिस्ती त्यांतच राहून तेथील हौदाचें पाणीं घेऊं लागले. दुसऱ्या कारंज्यावर जाण्याची जरूरी पडली नाहीं, पण आतां आमचे लोक शहरांत निरनिराळ्या ठिकाणीं घरें घेऊन रहातात, म्हणून तो वाडा त्यांस फार लांब पडतो. यामुळें आमच्या घरांजवळील हौदाचें पाणी घेण्याची जरूर पडली. आमची, पूर्वीची पाणी भरण्याची वहिवाट कोणत्याही

कारणानें बुडूं शकत नाहीं, व सरकारचा कायदाहि असा नाहीं. ज्या स्त्रीनें हौदांतून पाणी भरिलें तिचाहि पूर्वीपासून हक्क आहे ; कारण अर्जात लिहिल्याप्रमाणें ती महारीण नव्हती, पण मराठीण होती.'' हें ऐकून मॅजिस्ट्रेट साहेबांनी म्हटलें तुमचें म्हणणें बरोबर आहे, तुम्हांस मनाई करण्याविषयीं आम्हांस कांही आधार नाहीं, मग त्यानीं अर्जदारांस सांगितलें कीं, '' सन १८५० च्या २१ व्या कायद्यांत साफ सांगितलें आहे कीं, जर कोणी धर्मांतर केलें, तर त्याचें पूर्वीचें हक्क मिळावे. '' त्यावर अर्जदार बोलले कीं, '' हक्क म्हणजे जिंदगी, उत्पन्न, व वतनदारी, या संबंधीं समजावयाचें; पाणी भरण्याचा हक्क मोठा आहे.'' शेवटीं त्यांस सांगितलें कीं, '' आम्ही मुंबईस सरकारकडे लिहून पाठवूं आणि तिकडून उत्तर आल्यावर तुमच्या अर्जाचा काय तो जबाब देऊं. ''

इकडे नव्या पेठेतील हौद लोकांनी टाकल्यावर तो वरून उचंबळून चालला, तरी त्यांतून कोणी पाणी घेईनात, आणि तो आता आपल्या उपयोगी नाहीं, म्हणून तो स्वच्छ राहूं द्यावा, याचीही कोणाला जरूर वाटेना. ख्रिस्ती लोकांनी त्यांतून ता. १५/१६ असे दोनच दिवस पाणी घेतलें. पुढें त्यांत लोक शेण कालवीत, कचरा टाकीत, धुणें घंगाळांत खळबळावें त्या प्रमाणे धोतरें व लुगडीं त्यांत खळबळीत, बैल व घोडीं यास तोंड घालून पाणी प्यावयास लावीत, फार काय सांगावें ! मुलांस कांठावर जमवून त्यांकडून आंतील पाण्यांत लघुशंका करवीत. त्यांतून एक दोन प्रकार तर ख्रिस्ती लोकांनी प्रत्यक्ष पाहिले. हिंदु लोकांनी अशा रीतीनें पाणी घाणेरडें करून कारंजे बाटविले, तेव्हां अर्थात ख्रिस्ती लोकांसही त्याचा त्याग करून दुसऱ्या हौदावर जाणें प्राप्त झाले. यावेळेस ते नव्या कारंजावर गेले. तेव्हां तेथे लोकांची फार मोठी गर्दी जमली होती. तेथें ख्रिस्ती लोक आले. तेव्हां पोलीस पलटणीचे कुमेदान (कमान्दन्त) यांनी तेथे हजर राहून चांगला बंदोबस्त ठेविला म्हणून बरें झालें. नाहींतर त्या अनिवार लोकांनी अनर्थ करून ख्रिस्ती लोकांस आपला कायदेशीर हक्क चालवूं दिला नसतां. हें नवें कारंजे पहिल्या हौदापेक्षा फार मोठें आहे. हेंहि ख्रिस्ती लोकांच्या स्पर्शानें बाटलें असें म्हणून लोकांनीं टाकून दिलें, व त्याच्याहि पाण्याची घाण केली. नंतर विष्णुपंताच्या घराच्या पश्चिमेस कांही अंतरावर चौपटीचें कारंजे आहे, त्याचें पाणी त्यांनीं घेतलें. तेव्हां तेथे लोक फार जमलें नव्हतें, तरी पोलिसचे लोक बंदोबस्ताकरितां आले नव्हतें, म्हणून साळी, कोष्टी, रंगारी, वगैरे २५/३० दांडग्या लोकांनी एका ख्रिस्ती तरूणास मारहाण केली. पुढें याबद्दल फौजदाराकडें फिर्याद झाली. पोलिसांच्या लोकांनी गुन्हेगारांचा पुष्कळ तपास केला, पण फिर्यादी यास गुन्हेगार ओळखून दाखवितां येईनात. नंतर मॅजिस्ट्रेट साहेबांनी पुन्हा चांगला शोध करण्याचा हुकूम केल्यावरून पोलिसानें

फिरून तपास करून १६/१७ मनुष्यें धरिली. त्यांची चौकशी करून रा. ब. रामचंद्र अमृत दुगल यांनी त्यापैकी बारा जणास पन्नास पन्नास व एकास ७५ रुपये दंड केला. माळीवाड्यांतील लोकांस वाटलें कीं, ख्रिस्ती लोक आपल्याहि कारंज्यावर येतीलच, पण त्यांस येऊं देऊं नये. म्हणून त्यांच्यापैकी शें दोनशे दांडगे गडी हाती सोटेबडगे घेऊन कारंज्याजवळ दररोज पाळीपाळींनें पहारा करीत, आणि पाण्यास ख्रिस्ती बाया आल्यास त्यास मारण्याकरितां दोन अडीचशें दांडग्या बायका कारंजाच्या कांठी चौफेर वेढा घालून उभ्या रहात. या प्रमाणें कित्येक दिवस गेल्यावर ते थकलें. त्यानंतर कांही काळानें बुरूड आळीजवळ रहाणाऱ्या कांही ख्रिस्ती लोकांनी त्या कारंज्याचें पाणी घेतलें, यापेक्षा जास्ती कारंज्यावर ख्रिस्ती लोक जमावानें गेले नाहीत. असो.

ख्रिस्ती लोकांस पाणी भरण्याची मनाई करावी म्हणून शहरच्या लोकांनी केलेला अर्ज व त्या संबंधी प्रकरण मॅजिस्ट्रेट साहेबांनी मुंबईस पाठविलें होतें, त्याचें उत्तर लॉर्ड एल्फिन्स्टन साहेब गव्हर्नर यांजकडून आल्यावर मॅजिस्ट्रेट साहेबांनी लोकांस त्यांच्या अर्जाचा जबाब दिला तो येणेप्रमाणे—''ज्या लोकांस धर्मांतर करण्याच्या पूर्वी पाणी घेण्याचा पूर्ण हक्क होता, त्यांचा तो हक्क किंवा दुसरा कोणताही हक्क ख्रिस्ती झाल्यानें बुडाला नाहीं, उलटें पुर्वीचें दरोबस्त हक्क त्यांचे त्यांस खचित मिळावे असा कायदा आहे. हा कायदा पूर्ण अंमलांत आणला जाईल आणि जे त्यास हरकत करतील त्यास शिक्षा करण्यांत येईल. मुंबईत व दुसऱ्या बहुत ठिकाणी मुसलमान व हिंदु लोकांबरोबर ख्रिश्चन लोकांस प्रसिद्ध तलावांत व विहिरीत पाणी भरण्याची मोकळीक आहे. नगरांतील कारंजावर गुरें, घोडी, गाढवे, कसबिणी, इत्यादिकांस पाणी मिळतें; परंतु ज्या लोकांच्या संभावितपणाविरुद्ध बोलावयास कोणास कांही जागा नाही, त्यांस हा हक्क मिळूं देऊं नये असा अर्जदारांचा हेतु आहे. ''

हा हुकूम अर्थातच लोकांस आवडला नाही म्हणून त्यांनी गव्हर्नर साहेबांस व त्यांचे कौन्सिल यांस अर्ज केला, त्यावरून मुंबई सरकारनें ठराव केला तो असा :—

'' जुडिशियल खात्यापैकी ठराव नं. ३, ४३९, ता. २४ वी माहे आक्टोबर सन १८५९,—माजिस्ट्रेट साहेबांस असें फर्मविण्यांत येतें कीं, आनंदराव बाबाजी देशपांडे यास कळवावें कीं तुम्ही व अहमदनगरांतील दुसऱ्या कित्येक बहकलेल्या लोकांनी अर्ज केला त्यांतील मागणें इतकें गैरसमजुतीचे व बेअदबीचे आहे कीं, सरकार तें एक क्षणभर मनावर घेणार नाहीं. अर्जदारास सांगावें कीं, नगरांतील ज्या कारंज्याविषयी तुम्ही तक्रार करिता, ती मुसलमान राजांनी बांधिली, यांस

तुम्ही स्वतः कबूल अहां; आणि त्या कारंज्यांतून मुसलमानांनी पाणी भरलें असतां ती बाटतात, असें म्हणण्याची त्या राजाच्या अंमलांत कोणाहि हिंदूची हिंमत झाली नसती. जे धेड किंवा जे मांग, मुसलमान झाले आहेत, त्यांच्या पाणी भरण्यानें जर कारंजी बाटत नाहींत, तर मग जे लोक खिस्ती होतात त्यांच्याच पाणी भरण्यांने ती कशी बाटतात ? अर्जदार हे खुद्द आपलें शास्त्र विसरले आहेत. त्यांच्या शास्त्रांत सांगितले आहें कीं, राजा कोणत्याहि जातीचा असला तरी त्याची जात सर्वांहून उच्च जातीच्या बरोबरीची आहे. आणखी मलिका माआजमा सरकारानें ज्या जाहीरनाम्यांत धर्मसंबंधी विचारांवरून कोणासहि तसदी होऊं नये, असें स्पष्ट लिहिलें आहे, त्याचा अर्थ अर्जदार युक्तीनें विपरीत करितात, आणि त्याच्या आधारावरून जो धर्म मलिका माआजमा सरकार स्वतः खरा मानतात एवढेंच नाही, तर ज्या धर्माचे संरक्षक आपणांस म्हणवितात, तो धर्म ज्यांनी स्वीकारिला आहे त्यांस, अर्जदार उपद्रव करून हेलना करावयास पहातात !

माजिस्ट्रेट साहेबानी शहरच्या लोकांस जमा करून त्यास हा हुकुम वाचून दाखविला. त्यावरूनहि अर्थातच त्यांचे समाधान झालें नाहीं. म्हणून त्यांनी मुंबई सरकारास दुसरा अर्ज केला. त्यांत असें लिहिलें होते कीं, नगर शहरांतील कारंज्यांपैकी कांही कारंजी खिस्ती लोकांस नेमून द्यावी आणि बाकीची जी कारंजी हिंदु वगैरे लोकांस नेमून दिलीं जातील त्यांतून पाणी घेण्याची खिस्ती लोकांस सक्त मनाई करावी, हा अर्ज गव्हर्नर साहेबांनी नगरच्या माजिस्ट्रेट साहेबांकडे अभिप्रायाकरितां पाठविला. अर्जदारांनी जी तडजोड सुचविली, तीविषयी खिस्ती लोकांचे काय म्हणणें, हें ऐकून घेतल्यावर माजिस्ट्रेट साहेबांनी आपला अभिप्राय सरकारास लिहून पाठविला. तो फार उत्कृष्ट आहे, पण विस्तार भयास्तव तो आमच्यानें येथे उतरून घेववला नाहीं. त्यावरून सरकारनें जो अखेर ठराव केला, तो मात्र घेतों, तो असा :—

" मुंबई कास्तल ता. १८ वी माहे एप्रिल सन १८६० "

" ठराव राईट ऑनरेबल गव्हर्नर इन-कौन्सिल यांचे मत माजिस्ट्रेट साहेब जि. अहमदनगर यांच्या रिपोर्टात लिहिलेल्या विचाराप्रमाणें आहे, म्हणून ते असें फर्मावितात कीं, खिस्ती लोकांनी पाणी घेतलें असतां कारंजें भ्रष्ट होतें असें सरकार कधीहि कबूल करणार नाही., असें अर्जदार यांस सांगावे. सरकारानें पूर्वी जो हुकूम दिला, त्यांत कांही कमी जास्त करण्याचें त्यांस बिलकूल कारण नाहीं, आणि हल्ली हा जो हुकूम देण्यांत येतो, तो अखेरचा आहे असें समजावें. "

(सही) **एच. एल. अँडर्सन,**
सरकारचे ॲक्टिंग सेक्रेटरी.

पुढे नामदार लॉर्ड एल्फिन्स्टनसाहेब यांनी हे ठराव जास्ती कायम व्हावे म्हणून हें सर्व प्रकरण हिंदुस्तान संबंधी स्टेट सेक्रेटरी यांजकडे पाठवून दिलें. त्याचें मनन करून स्टेट सेक्रेटरी सर चार्लसवूड यांनी नंबर ३४ ता. ९ माहे ऑगस्ट सन १८६० इ. रोजी ठराव केला, आणि मुंबई सरकारकडे पाठविला, तो येणें प्रमाणें :—

" महाराज, नेटिव खिस्ती लोकांनी प्रसिद्ध कारंज्यांतून पाणी घेण्याची सुरूवात केली तेणें करून पाणी बाटले, अशी जी अहमदनगरच्या कितीक लोकांची फिर्याद होती तिजप्रकरणी आपण पाठविलेले कागदपत्र कौन्सिलांत मजपुढें ठेवले गेले. आमच्या तर्फेने सरकारानें निकाल करावा, असें जे फिर्यादी यांचे मागणें होतें, तें अमान्य करून जो ठराव आपण केला तो मला पसंत आहे. मलिका माआजमः सरकारच्या ता. १८ नोव्हेंबर सन १८५८ च्या जाहीरनाम्याचा भलताच अर्थ करून फिर्यादी लोक त्यावर उड्या मारितात, ही त्यांची मोठी चूक आहे. नेटिव खिस्ती लोक प्रसिद्ध कारंज्यांतून पाणी घेऊं लागले असतां त्यांस उपद्रव देण्याचें जे यत्न फिर्यादि लोकांनी केलें, ते करण्यास त्या जाहीरनाम्यांत कांहीच आधार नाही. "

(सही) **सी. वुड.**

या प्रमाणें हें प्रकरण थेट विलायतेपर्यंत जाऊन त्याचा अखेर निकाल झाला, आणि हिंदु वगैरे लोकांमधून निघून जे लोक खिस्ती झाले आहेत, त्यांस कायद्यावरून इतर लोकांबरोबर प्रसिद्ध हौद, तळी, बारवा इत्यादी पाणवठ्यावर पाणी भरण्याचा पूर्ण अधिकार आहे हें सिद्ध झालें. तरी नगरचे लोक बहुत दिवसपर्यंत आणखी अर्ज वगैरे प्रयत्न करीतच होते. त्याविषयी येथें लिहिण्याची कांही जरूर नाहीं. तरी हें सांगितले पाहिजे कीं, त्यांतून एकासुद्धां यत्नांत त्यांस यश आलें नाही ; उलटें कांही प्रयत्नांत त्यांची मोठी फजिती झाली. शेवटी त्यांचे सर्व उपाय खुंटले म्हणून ते चुप्प बसले. जे हौद टाकून दिले होते, त्यांतून कांही एकांचा उमासा केला, पण सर्वांचा नाही. मुसलमान लोक इतर हौदांचा त्याग करण्याच्या कामी मुळींच त्यांस अनुकूल झालें नाहीत. शुद्र हळुहळू पाणी भरुं लागले. आणि कांही दिवसांनी सर्व कारंज्यांवर पूर्वीच्याप्रमाणें झुंबड पडूं लागली. नंतर ब्राह्मणांनी अनेक शहरें व क्षेत्रें, येथील ब्रह्मवृंदास लिहून खिस्ती होऊन बाटलेले लोक ज्या हौदावर पाणी भरितात येथून ब्राह्मणांनी पाणी आणणें योग्य आहे किंवा नाही, याविषयी अभिप्राय विचारले, तिकडून अनुकूल उत्तरें आलीं कीं, प्रतिकूल हें सांगवत नाहीं. पण इतकें ठाऊक आहे कीं, ब्राह्मण व ब्राह्मणांच्या बायकाही लौकरच खिस्ती लोकांबरोबर पाणी भरूं लागल्या. पुढे नगर जिल्ह्यांत

दुसऱ्या कित्येक ठिकाणी लोकांनी ख्रिस्ती लोकांस पाणी भरण्यास हरकत करून कोठें कोठें तर त्यास फार मार देखील दिला ; परंतु त्या सर्व खटल्यांचें निकाल ख्रिस्ती लोकांच्याच वतीनें होऊन त्यांतील कित्येक गुन्हेगारांस जबर दंड किंवा सक्त मजुरीच्या कैदेच्या जबर शिक्षाहि झाल्या. पुणें, सातारा, सोलापूर वगैरे परजिल्ह्यांमध्येहि कित्येक ठिकाणच्या लोकांनी असेच बखेडे केलें, अजून चालविले आहेत, तथापि त्यांतील एकांत देखील न्यायाचा पराजय होऊन जुलुमाचा जय झाला नाही. यावरून आम्हां सर्व ख्रिस्ती लोकांनी मंडळीचा मस्तक जो प्रभु त्याची उपकारस्तुति केली पाहिजे.

सदरील हकिकत बरीच लांबली, तरी बहुत गोष्टी सोडून तिचा संक्षेप केला आहे. त्या गोष्टी आणि लोकांचे म्हणणें, हरकती, प्रमाणें कुयुक्ती, व त्यांस ख्रिस्ती पक्षाकडून काय उत्तरें मिळाली, कृष्णपक्षाच्या कुयुक्तीं ईश्वरानें कशा व्यर्थ केल्या, हें सर्व ज्यास वाचावयाचें असेल, त्यांनी त्यावेळच्या ज्ञानोदयांतील सविस्तर पत्रव्यवहार वगैरे वाचून पहावें. (वरील उतारा रेव्हरंड विष्णू भास्कर करमरकर यांचे चरित्र पृष्ठ ३७ ते ५० यांतून घेतला आहे.)

सं. ब. भा.



---

बहिष्कृत भारत : ६ मे १९२७.

# परिशिष्ट–६

## टिपणीसांचे पत्र

रा. रा. संपादक, बहिष्कृत भारत, यांस—

तारीख २० मार्च रोजीं महाड येथे अस्पृश्यांना स्पृश्यांनीं जी मारहाण केली त्यासंबंधी चौकशी करण्यासाठीं पुण्याहून हिंदु सभेच्या खर्चानें श्रीयुत माटे येथें आले होते असें वर्तमानपत्रावरून समजलें. श्रीयुत माटे हे महाड येथें येणार असल्यांबद्दल पहिल्या प्रथम त्यांचे मला पत्र आलें होतें ; परंतु येथें येऊनही त्यांनी माझी भेट घेतली नाही. तारीख १२-५-२७ चे ' नवाकाळ ' तील पुण्यांचे बातमीपत्रावरून शिवाजी मंदिरांत झालेल्या त्यांचे व्याख्यानांत जी त्यांनी अनेक चुकीची विधाने केली त्यांत खुद्द माझेविषयीही एक चुकीचें विधान केलें आहे. तें असें " प्रेसिडेंट टिपणीस वगैरे स्पृश्य लोकांनी मार खाल्लेल्या अस्पृश्यांना औषधपाणी देवविलें आहें. " हें माटे मास्तरांचे म्हणणें खरें नाही. प्रतिकूल परिस्थितींत सांपडल्यामुळें मला तर माझे दलित बांधवांना मारहाण झाली त्यावेळी कोणतीही मदत करता आली नाही. या एकाच गोष्टीवरून माटे यांनी मिळविलेली माहिती कशी चुकीची आहे हें समजून येईल.

अस्पृश्य बाईला मारलें ही गोष्ट खोटी आहे असेंहीं माटे म्हणतात. परंतु ज्या भानुदास चांभाराचे बायकोला मार बसला आहे तो माझेसमोर डॉक्टर आंबेडकर यांना म्हणत होता कीं, "मला महाडच्या पेठेत धंदा करावयाचा आहे, माझे बायको पोराला जरी मारहाण झाली आहे तरी त्यांना मी कोर्टाकचेरीत येऊं देणार नाही. या पुढें मला सशस्त्र पोलीस मिळेल अशी व्यवस्था करा." असो. माटे यांनी एकांगी व अर्धवट अशी चौकशी करून पुणें येथील सभेंत कांही भरमसाट खोटी विधानें या महाड प्रकरणासंबंधी केली आहेत व इतर झालेल्या मारहाणीचा दोष अस्पृश्यांवर टाकून स्पृश्यांवर व त्यांतले त्यांत पांढरपेशांवर आलेल्या दोषांतून त्यांना बचावण्याचा प्रयत्न केला आहे. श्रीयुत माटे जर मला येथें भेटले असतें तर मी त्यांना जरुर ती मदत केली असती व त्यामुळें महाडचा खरा प्रकारही त्यांना समजून आला असता व तो त्यांना खऱ्या स्वरुपांत जनतेपुढे मांडता आला असता.

महाड, ता. १०-५-२७

आपला,

**सु. गो. टिपणीस.**

प्रेसिडेंट, महाड म्युनिसिपालिटी.

---

बहिष्कृत भारत, ता. २० मे १९२७.

# परिशिष्ट–७

## ब्राह्मण गृहस्थांचे पत्र

अहमदाबाद ता. ३० एप्रिल १९२७

श्री. रा. रा. डॉ. आंबेडकर यांस,

अनेकोत्तम राम राम विनंति विशेष.

मुंबई टाईम्स या पत्रांतून महाड येथील शोचनीय प्रकार वाचून आम्हांस अत्यंत वाईट वाटलें. आम्ही येथें जें कांही शब्दाने दिग्दर्शित करित आहों त्यापेक्षां आमची अंतःकरणे कितीतरी विदग्ध झाली आहेत. पोकळ सहानुभूति दाखविणे हें आमचे उद्दिष्ट नसल्यानें, आपण या पत्राचा योग्य अर्थ घेऊन आपलें समाधान करून घ्यावें.

आम्हीं देखिल महाराष्ट्रीय हिंदु ब्राह्मण आहोंत ; आणि म्हणूनच आपणावर व आपल्या सारख्या ज्यांच्या ज्यांच्यावर महाड येथील प्रसंग गुदरला आहे, त्यांना विनंती करीत आहोंत की, जरी आज अहंमन्य अशा उच्चवर्णीय हिंदूंनी आपला अपमान केला असला तरी; या प्रसंगाचा फायदा घेऊन मुसलमान लोकांनी पुढें केलेला प्रेमाचा हात-तो कोणत्याहि हेतूनें पुढें आला असला तरी-त्याचा स्वीकार करूं नये.

आम्हीं लोक विधर्मी अशा ख्रिस्ती, पारशी अगर मुसलमान यांना जितका स्पृश्यतेचा अधिकार देत आहों तितका देखील दुर्दैवानें आमच्या धर्मबांधवास–की, ज्यांनी केवळ आमच्या समाजाकरितांच हलका धंदा पत्करिला आहे, त्यांना–देत नाही ; इतकेंच काय परंतु त्यांचा आम्हीं तिरस्कार करितों. हा केवळ मुर्खपणा होय.

आपण क्षमा करा. परमेश्वर आपल्या कार्यात आपणांस यश देईल !

कोणत्याही फळाच्या प्राप्तीकरितां कष्ट हे उचललेच पाहिजेत. आपणांस येथे वाजवीपेक्षां जास्त श्रम पडत आहेत हें आम्हांस कबूल आहे, परंतु तें कसेंही असलें तरी या प्रसंगांत सांपडलों म्हणून कोणीही धर्मांतर करणार नाही अशी आपण खबरदारी घेतली पाहिजे व आपण त्याप्रमाणे करीत असाल अशी आम्हास आशा आहे.

आपली भांडणे आपणच भांडावी हेंच विनंती आहे.

कळावें, लोभ असावा, ही विनंती.

आपले धर्मबन्धु,
**रा. वि. सुदामे.**
**दे. घ. डिडोळकर.**

बहिष्कृत भारत, ता. २० मे १९२७.

# परिशिष्ट–८

## पेशवाई

" छत्रपती राजाराम महाराजांच्या मृत्यूनंतर जे पेशवे म्हणून स्वतंत्र रीतींने प्रसिद्धीस आले ते एकंदर सात पेशवे होत. त्यांची नांवें येणेप्रमाणे :–

| | |
|---|---|
| (१) बाळाजी विश्वनाथ | इ. स. १७१३ ते १७२० |
| (२) बाजीराव बल्लाळ | इ. स. १७२० ते १७४० |
| (३) बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब | इ. स. १७४० ते १७६१ |
| (४) माधवराव पहिला | इ. स. १७६१ ते १७७२ |
| (५) नारायणराव | इ. स. १७७२ ते १७७३ |
| *गंगाबाई (नारायणरावची बायको) | इ. स. १७७३ ते १७७४ |
| (६) सवाई माधवराव | इ. स. १७७४ ते १७९५ |
| (७) दु. बाजीराव | इ. स. १७९५ ते १८१८" [१] |

**पेशवेकालीन अस्पृश्यांचे जीवन :**

" ब्राह्मणांच्या हाती राजकीय व धार्मिक सत्ता आल्यानंतर त्यांनी सवर्ण हिंदूंचा पेशवाईत किती छळ केला, हे दाखविण्याचा उद्देश एवढाच की, ब्राह्मणांनी अस्पृश्यांचा किती अनन्वित छळ केला असेल, हे त्यावरून वाचकांनी जाणावे. अस्पृश्यांच्या छळाची संपूर्ण ऐतिहासिक लेखी माहिती मिळणे अशक्य आहे. कारण त्यांची नोंद कोण ठेवणार ? नोंद ठेवण्याचे यंत्र व तंत्र ब्राह्मणांच्या हातात आणि ब्राह्मण अस्पृश्यांना पशूपेक्षाहि हीन समजत होते. पशूंच्या छळांची नोंद नाही, मग पशूपेक्षा हीन लोकांच्या छळांची नोंद कोण ठेवतो ? तरी पण त्यावेळी जे छळांचे प्रकार अस्तित्वात होते त्याची वाच्यता व चर्चा दर पिढीत होणे अपरिहार्य होते. काही युरोपियन लोकांनी हे छळ पाहिलेले होते. अस्पृश्यांच्या या छळांची नोंद युरोपियन लेखकांनी केली व तिचा उपयोग हिंदी लेखक करू लागले. महार यांनी सकाळी ९ ते दुपारी ३ वाजण्याच्या काळात फिरू नये ; कारण त्यांच्या सावलीचा स्पृश्यांना विटाळ होईल. असा पेशवाईत दंडक होता, याची नोंद रसेल यांनी

---

[१] : लाड, पृ. ५.

आपल्या ग्रंथात (The Tribes and Castes of Central Provinces, London, 1916, P. 189, Vol. 4) केलेली आहे. या बाबतीत डॉ. घुर्ये यांनी तीच माहिती सविस्तर दिलेली आहे ती अशी–

" In the Maratha Country a Mahar-one of the untouchables-might not spit on the road lest a pure-caste Hindu be polluted by touching it with his foot, but had to carry an earthen pot, hung from his neck, in which to spit. Further he had to drag a thorny branch with him to wipe out his foot-prints and to lie at a distance prostrate on the ground if a Brahmin passed by, so that his foul shadow might not defile the holy Brahmin. " (Caste and Race in India, Pp. 72-73) '[1]

डॉ. द. पु. खानापूरकर यांनी महारांसंबंधी जी मते प्रदर्शित केलेली आहेत ती अशी :—

" सर्व अस्पृश्यांत हिंदुस्समाजाकडून जास्तीत जास्त हाल व अपमान झाले असतील तर ते महारांचे. पेशवाईच्या वेळेस यांच्यावर गळ्यात मडके बांधून फिरण्याची सक्ती होती व गावात जर ब्राह्मण समोर दिसला तर तो यांच्या छायेने अपवित्र होऊ नये म्हणून त्यांना जमिनीवर पालथे पडण्याचा हुकूम होता. इतकेच नव्हेतर जमिनीवर पडलेल्या यांच्या पावलांच्या खुणांनी ब्राह्मण अपवित्र होऊ नये म्हणून त्यांना काटेरी झुडूप स्वतःच्या मागे घेऊन हिंडावे लागे व त्या झुडुपाने आपल्या पावलांचा माग पुसून टाकावा लागे. महारांची दुसरी नावे अतिशुद्र व भुमिपुत्र (भूझ्या हे ओरिसामधील नाव आहे. त्याचा अर्थ पण भूमीचा मुलगा असाच होतो. हे साधर्म्य लक्षात घेण्याजोगे आहे.) या दोन्ही नावांवरून ते आदिवासी असावेत व आर्यांनी त्यांना आपणात मिसळल्यानंतर कायमचेच अस्पृश्य बनवले असावे. एन्थोवनच्या मताप्रमाणे यांच्यात जे निरनिराळे पन्नास विभाग आहेत ते सर्व आदिवासी जमातीचे भाग असावेत व ते भाग आर्यांच्या आक्रमणानंतर एकत्र होऊन आपणास महार या नावाने ओळखू लागले असावेत. कदाचित महाराष्ट्र हे नावही महारांवरून पडले असण्याचा संभव आहे. आजही हे आदिवासी जमातींच्या पुढाऱ्यांप्रमाणे आपणास नाक म्हणजे नाईक म्हणवतात. काहींच्या मते नाक हा नाग या शब्दाचा अपभ्रंश असून, वेदपुराणात नाग नावाचे जे लोक वर्णन केले आहेत ते हेच असावेत" (पा. ११८-१२९)–नवा महाराष्ट्र या पुस्तकातील ' दलित समाज ' हा लेख.[2]

"कोकणातील महार यांचे एकेकाळी स्वतंत्र राज्य होते. त्यांना आर्यादी लोकांनी जिंकून त्यांच्यावर इतक्या शरणागतीच्या अटी लादल्या की, त्यांना

---

[1] : खैरमोडे, खंड ५ वा ; पृ. २३५-२३६.

[2] : उद्‌धृत, खैरमोडे, खंड १ ला ; पृ. ५.

बंडाला प्रवृत्त होण्यास तिळभरही वाव मिळू नये. या ऐतिहासिक घटनांचे ऐतिहासिक ठसे म्हणजे महारांना कोकणातील गावांत फार मानाचे व महत्त्वाचे स्थान देण्यात आले. ते हजारो वर्षे टिकून राहिलेले आहे. महारांना दिलेले 'भूमिपुत्र' हे नाव कोकणात चालू आहे. गावची देवस्की महारांच्याच हातून पुरी करण्यात येते. महारांनी देवदेवतेला हाका मारून जागे करावे लागते. त्यांची काठी बसल्याशिवाय देवदेवतांच्या अंगात देवपण येत नाही. 'देवचार' म्हणून एक देवता कोकणात आहे. तिला शांत करण्यासाठी जो विधी करावा लागतो तो महाराला घोंगडी व अन्न दिल्याशिवाय पुरा होत नाही, आणि देवता संतुष्ट होत नाही. गावातील देवदेवतांपुढे गाऱ्हाणे घालावयाचे असले तर मराठे वगैरे स्पृश्य गावकऱ्यांना महारापुढे दाती तृण धरून विनवण्या कराव्या लागतात. आणि महारांनी देवदेवतांपुढे गाऱ्हाणी घातली तरच देवदेवता नवसाला पावतात, असा हजारो वर्षांचा रिवाज आहे. यावर सुशिक्षित व अशिक्षित कोकणस्थांचा विश्वास आहे.''[१]

'' पुना ऑब्झर्वर अँड सिव्हिल अँड मिलिटरी जर्नल '' या पत्रात शुक्रवार, तारीख १८ डिसेंबर १९०३ रोजी ' The Condition of the Mahars ' या शीर्षकाखाली एक अग्रलेख आलेला होता. त्यातही हेच प्रामुख्याने सांगितले होते की, पददलित दशेत दिवस काढणारे आजचे महार यांचे पूर्वज एकेकाळी राज्यकर्ते होते :

" According to Baden-Powell, the term " Maharashtra " is derived from the fact of the Mahar domination of Western India. This may or may not be true, but there is sufficent evidence to warrant the conclusion that they were once a people with their own king, their own laws, religion and social customs. In appearance they are able-bodied and muscular, many of them handsome, intelligent and quick to assimilate and possessing physical courage. Their women, many of them could have some pretensions to fine features and graceful forms, like the men can turn their hand to anything. " (The Life of Shivram Janba Kamble, p. 141.)"[2]



१ : उद्‌धृत, खैरमोडे, खंड ३ रा ; पृ. १५.

२ : उद्‌धृत, खैरमोडे, खंड १ ला ; पृ. ५-६.

# परिशिष्ट–९

## कोरेगावचा जयस्तंभ

' इंग्रजी अंमल हिंदुस्थानात सुरू करण्यास हिंदु लोकांनी इंग्रजांना जी मदत केली होती तिच्या अनेक पट मदत अस्पृश्यांनी केलेली होती. इंग्रजांच्या पलटणींपैकी बऱ्याच पलटणी अस्पृश्यांच्या होत्या. अर्काटच्या वेढ्यात अस्पृश्य शिपायांनी भाताचे पाणी पिऊन व इंग्रज शिपायांना भात खाण्यास देऊन अर्काटचा वेढा चार दिवस लढविला व किल्ला इंग्रजांना मिळवून दिला. मुंबईत ज्या पलटणी होत्या त्यांत महारांचा बराच भरणा असे. पेशवाईला धुळीस मिळविण्यास महार सैनिकांचा पहिला टोला कारणीभूत झाला. ता. १ जानेवारी १८१८ रोजी मुंबईचे नेटिव्ह इन्फ्रंट्रीतील ५०० लोक केवळ २५० बेशिस्त घोडेस्वार व २ तोफा (या मद्रासच्या २४ गोऱ्या गोलंदाजांच्या ताब्यात होत्या.) एवढ्या अल्प सैन्याच्या जोरावर कॅप्टन स्टॉटन (Staunton) याने पेशव्यांच्या २५,००० हून अधिक अशा प्रचंड सैन्याला तोंड देऊन कोरेगावचे जे रक्षण केले ते खरोखरच संस्मरणीय होय. यावेळी इंग्रजांच्या बाजूचे फक्त २७६ लोक पडले. सुप्रसिद्ध इतिहासकारक टॉड् या प्रसंगाचे हिंदी थॅर्मापिली असे वर्णन करतो. सदर विजयाच्या स्मरणार्थ कोरेगाव येथे एक दगडी विजयस्तंभ उभारण्यात आला आहे.' (-निबंधमाला, पा. १०७८). मुंबईची नेटिव्ह इन्फंट्री म्हणजे महार पायदळांची पलटण होय. महार सैनिकांनी पेशवाईला धुळीस मिळविले, याबद्दलचा कबुलीजबाब मध्य भागाचे कमिशनर मि. एल. जे. माऊंटफोर्ड यांनी अस्पृश्यांच्या उन्नतीबद्दलच्या ठरावावर मुंबई कायदे कौन्सिलात ५ नोव्हेंबर १९२० रोजी भाषण करताना दिलेला आहे. त्यांच्या भाषणाचा सारांश येणेप्रमाणे :

जॉन कंपनीचे जे सैन्य होते त्या सैन्यात महार लोकांचा बराचसा मोठा भरणा होता. कोरेगावला जो जयस्तंभ उभारलेला आहे तो महारांनी गाजविलेल्या पराक्रमाचे जयचिन्ह होय. पौवात्य देशात जे पराक्रमाचे प्रकार आतापर्यंत समजले जातात त्यात् कोरेगावचा महार पराक्रम सर्वश्रेष्ठ होय. खडकीची लढाई संपल्यानंतर कॅप्टन स्टॉटन हा कर्नल बर याला पुण्याजवळ ससैन्य मिळण्यासाठी खडकीहून निघाला व तो कोरेगावला थांबला. त्याचे पायदळ ८०० शिपायांचे होते. त्यात थोडे अरब होते. बाकीचे सर्व महार होते. अरब तोफखान्यावर होते. दुसरा बाजीराव याच्या नेतृत्वाखाली पेशव्यांचे सैन्य त्या बाजूला होते. त्याची व स्टॉटनच्या पायदळाची गाठ पडली. पेशव्याचे सैन्य

२५,००० होते. महार सैनिकांनी पेशव्यांच्या २५,००० लोकांना एक दिवस व एक रात्र जागच्या जागी थोपवून धरले. त्याला पुढे सरकू दिले नाही. शेवटी महार सैनिकांनी पेशव्यांच्या २५,००० सैनिकांचा धुव्वा उडवून दिला. महार हा कोणत्या दर्जाचा लढवय्या आहे याचा हा एक ऐतिहासिक पुरावा आहे. या लढवैय्येपणाबद्दल मुंबई सरकारला व हिंदुस्थान सरकारला महारांबद्दल अभिमान वाटतो व साम्राज्य सरकारच्या सैन्याची वाढ करण्याची वेळ येईल व गरज भासेल तेव्हा सरकार महारांची सैन्यभरती जरूर करेल.

(The Joint Memorandum of the Depressed India-Association, Bombay, and the Servants of Somavanshi Society, Bombay; presented to the Royal Statutory Commission, 1927-29, page 1) [१]

कोरेगाव येथे झालेल्या युद्धाचे सविस्तर वर्णन खालीलप्रमाणे.–

**कोरेगाव युद्ध**–" दुसरे बाजीराव पेशवे आणि इंग्रज यांचे मैत्रीचे संबंध फार दिवस टिकले नाहीत. त्यांच्यातील वैमनस्य कांही काळ धुमसत राहिले, आणि शेवटी १८१७ च्या नोव्हेंबरमध्ये त्याचा स्फोट झाला. पेशव्यांच्या सैन्याने इंग्रजांच्या पुण्यातील वकिलातीवर जेव्हा हल्ला केला तेव्हा वकिलातीचे संरक्षण करण्यात कर्नल बर यांनी खूप प्रयत्न केले पण पेशव्यांच्या प्रचंड सेनेपुढे प्रथम त्यांचे प्रयत्न निष्फळ झाले. नंतर इंग्रजांच्या माऱ्यापुढे पेशव्याचे सैन्य पुण्याच्या उत्तर दिशेकडे पळून गेले. बाजीरावाने सैन्याची नीट जमवाजमव करून पुनः एकदा कर्नल बर याच्या सैन्यावर (पुण्यातील इंग्रज वकिलातीवर) हल्ला केला. यावेळी सेकंड बटालियन फर्स्ट रेजिमेंट बॉम्बे नेटिव्ह इन्फंट्री, हिचा मुक्काम पुण्याच्या वायव्येस ३८ मैलावर असलेल्या शिरुर गांवात होता. तिचा प्रमुख कॅप्टन फ्रान्सिस स्टॉंटन हा होता. कर्नल बरला, पेशव्यांच्या प्रचंड सैन्याला दुसऱ्यांदा तोंड देणे अशक्य वाटल्यामुळे त्याने कॅप्टन स्टॉंटनला पुण्याच्या वकिलातीच्या संरक्षणाकरता मदतीस येण्याबद्दल तातडीने संदेश पाठविला. कॅप्टन स्टॉंटन शिरुरहून पुण्याकडे जाण्यास सेकंड बटालियनला घेऊन ३१ डिसेंबर १८१७ ला रात्रौ ८ वाजता निघाला. हिच्यात बहुसंख्य सैनिक महार होते. कॅप्टन स्टॉंटनबरोबर ५०० पायदळ, ३०० घोडदळ, ५ बटालियन ऑफिसर्स, २०६ पौंऊडर तोफा आणि त्या चालविणारे २४ ब्रिटिश सैनिक, एवढा लवाजमा होता. सुमारे २५ मैलाचा रात्री प्रवास केला. त्यानंतर ही बटालियन पहाटेस भीमा नदीच्या तीरावर आली. तेव्हा पेशव्यांचे प्रचंड सैन्य नदीच्या दुसऱ्या तीरावर लढाईस सज्ज असलेले दिसले. त्यांच्या सैन्यांत

---

१ : खैरमोडे, खंड, १ ला, पृ. १३०-१३१.

५ हजार पायदळ व २५ हजार घोडदळ होते. पेशव्यांच्या सैन्याने आपणाला खत्म केले तर कर्नल बरला ते खत्म करतील आणि हे पाहून मध्य हिंदुस्थानांतील शिंदे, होळकर व भोसले हे जनरल स्मिथला मोडून टाकतील, आणि यामुळे ब्रिटिश राज्याचा हिंदूस्थानातील पायाच उखडला जाईल, हे भविष्य इंग्रज लष्करी अधिकाऱ्यांना दिसत होते. म्हणून कॅप्टन स्टॉंटन पेशव्यांच्या सैन्याचा कसा पाडाव करता येईल याचा व्यूह रचीत होता. त्याने पेशव्यांच्या सैन्याला हुलकावण्या देऊन कोरेगांव खेड्यांत प्रवेश केला. या गावाला मातीचे कुसू होते. हे कुसू आणि गावातील घरे यामुळे पेशव्यांच्या घोडदळाला गावात शिरून लढाई करणे कठीण होते, हे स्टॉंटनने हेरून, गाव आपल्या ताब्यात घेतला, आणि भीमा नदीच्या किनाऱ्यावर आणि शिरूरला जाणाऱ्या रस्त्यावर, जेथून पेशव्यांच्या सैन्यावर अचूक मारा करता येईल अशा ठिकाणावर त्याने दोन तोफा डागल्या. गावाच्या मध्यभागी जी गढी होती तिच्यावर त्याने तोफ डागली नाही. त्यामुळे पेशव्यांचे सैन्य गावात शिरतांना त्यावर तोफेचे गोळे झाडून तो सैन्याचा ग्रामप्रवेश थांबवू शकला नाही. त्यामुळे गावातील चकमकीत त्याला आपले बरेचसे सैनिक गमवावे लागले. (कित्ता ५-६)

पेशव्यांच्या सैन्यांत अरब, गोसावी आणि मराठे यांचा भरणा होता. तेही चांगले लढवय्ये होते. त्यांच्या माऱ्यापुढे इंग्रज सैनिकांची अनेक वेळा कच खाल्ली. त्यांची झोप उडाली, तहानभूक हरपली आणि ते शत्रूला शरण जांऊ या म्हणून ओरडू लागले. लेफ्टनंट चिशोल्म आणि इतर अधिकारी स्टॉंटनला पुनः पुनः तेच सुचवू लागले. घनघोर युद्धांत तरुण अधिकारी लेफ्टनंट पॅटिन्सन आणि लेफ्टनंट चिशोल्म हे या लढाईत कामी आले. चिशोल्मच्या देहाचे शत्रूनी तुकडे तुकडे केले होते. त्याकडे लक्ष वेधवून, स्टॉंटन आपल्या सैनिकांना सांगत होता की तुम्ही जर शत्रूला शरण गेलात तर तुमचा किती छळ करतील हे तुम्ही या तुकडे करण्यावरून लक्षांत घ्या व प्राणपणाने लढा ; मरण पत्करा पण शरण जाऊ नका. मग इंग्रज सैनिकांनी निकराचे हल्ले चढविले. आणि १ जानेवारी १८१८ ला रात्री ९ वाजता पेशव्यांच्या सैन्याने पळ काढला. इंग्रज सैनिकांनी त्यांचा पाठलाग केला तो भीमा नदीपर्यंत. नदीतील पाणी पिऊन त्यांनी आपली २५ तासांची तहान भागविली. पेशव्यांच्या सैन्याला पळ काढावयास लावणारी जी प्रमुख तुकडी होती ती सर्व महार सैनिकांची होती. त्यांनी आपल्या ४० पट संख्येने असलेल्या पेशव्यांच्या सैन्याला पळवून लावले. हे महारांचे शौर्य पाहून बाकीच्या पेशव्याच्या सैन्याचा धीर खचला व सर्वच सैन्य पळू लागले. इंग्रजांच्या एकंदर ८३४ (सैनिक व अधिकारी) लढवय्यापैकी २७५ लढवय्ये मेले अगर जखमी झाले. आणि पेशव्याचे सुमारे ६०० लोक कामास आले.

कोरेगावच्या विजयाबद्दल भीमा नदीच्या तीरावर इंग्रजांनी विजयस्तंभ उभारला. त्याच्या एका बाजूस जखमी व कामास आलेल्यांची नावे इंग्रजी व मराठी भाषेत कोरली आहेत." [१]

"त्यात एकंदर २३ महार शिपायांपैकी २० ठार झाले व ३ जखमी झालेत. त्यांची नावे पुढीलप्रमाणे–१ सोमनाक कमलनाक नाईक, २ रामनाक येमनाक नाईक, ३ गोदनाक कोठेनाक, ४ रामनाक येसनाक, ५ भागनाक हरनाक, ६ अंबनाक काननाक, ७ गणनाक बाळनाक, ८ बळनाक कोंडनाक, ९रूपनाक लखनाक, १० वपनाक रामनाक, ११ विटनाक धामनाक, १२ राजनाक गणनाक, १३ वपनाक हरनाक, १४ रैनाक वाननाक, १५ गजनाक धर्मनाक, १६ देवनाक आननाक, १७ गोपाळनाक बाळनाक, १८ हरनाक हीरनाक, १९ जेटनाक ध्रैनाक, २० गणनाक लखनाक, पुढील ३ सैनिक जखमी झाले . . . . . २१ जाननाक हीरनाक, २२ भीकनाक रतननाक, २३ रतननाक धाननाक. "[२]

●●●

[१] : खैरमोडे, खंड, ९ वा, पृ. २१४-२१६.

[२] : गणवीर, पृ. २४७.

# परिशिष्ट–१०

## सहभोजनाचा मासला

ता. १६-४-२७ रोजी खंडू बोरीकर (मांग) मयत झाल्या कारणानें त्याचा १३ वा दिवस ता. २७-४-२७ रोजी रिपन रोड लोखंडी चाळ येथें साजरा करण्यांत आला. त्याच्या आप्तेष्टांनी गरिबीस अनुसरून ५०-६० मनुष्यांच्या भोजनाची सोय केली असून सदर प्रसंगीं त्या चाळीतील कांहीं महार बंधूसही जेवण्याचें आमंत्रण दिलें होते. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशीं कीं, ऐन वेळी महारबंधू जेवण्यास तयार होईनात. तरी पण रा. डी. बी. शिंदे व रा. आर. एच. आडांगळे हे दोनच सद्‌गृहस्थ जेवण्यास गेले व त्यांनी सर्व मातंगबंधू समवेत बंधुत्वाच्या नात्यानें सहभोजन केलें. परंतु तें जेवण घेऊन घरीं येतात न येतात तोंच चाळीतील कांहीं महार बंधूंनी आपल्या अकलेचे तारे तोडण्यास सुरवात केली. व त्यांना अनेक प्रकारच्या शिव्यांची लाखोली घालून जातींतून वाळीत टाकण्याची धमकी दिली. तरी त्या आमच्या महार बंधूंस आम्ही प्रेमपूर्वक असे विचारतों की, मराठ्यांच्या घरचे दोन दिवसाचे शिळें विटलेलें अन्न त्यांच्या पायां पडून मागून खायचे किंवा यदाकदाचित मराठ्यानें आमंत्रण दिलेंच तर लांब शेण मूत्राच्या उकिरड्यावर बसून कुत्र्यासारखें लांब फेकून दिलेल्या भाकरी खाणें त्यापेक्षां हें मानासन्मानानें जेवणें चांगलें नाही काय ? करितां आम्ही विनंति करितो की, ठिकठिकाणी अशीं सहभोजनें करून समाजोन्नतीचे श्रेय आपल्या पदरी पाडून घ्यावें.

आपले नम्र महार बंधू

**डी. बी. शिंदे,**

**आर. एच. आडांगळे.**

---

बहिष्कृत भारत, ता. ३ जून १९२७.

# परिशिष्ट—११

## डॉ. रवींद्रनाथ टागोर

**डॉ. रविंद्रनाथ टागोर** (१८६१-१९४१)—एक जगद्‌विख्यात कवी. इंग्रज सरकारने सर हा किताब दिला, परंतु जालियनवाला बाग येथील कत्तलीचा निषेध म्हणून १९१९ ला परत केला. बंगाली वाङ्‌मयात फार मोठी भर घातली. काव्य, नाटक, लघुकथा, कादंबरी, निबंध वगैरे वाङ्‌मयाच्या प्रांतात स्वतःचे एक नवीन वैशिष्ट्य निर्माण केले. त्यांना चित्रकलाही अवगत होती.

व्यावहारिक विषयाला आध्यात्मिक अस्तर लावून विशेष प्रकारचे गूढगुंजन करण्याकडे प्रवृत्ती फार. जडवादी पाश्चात्यांना त्यांनी आस्तिकवाद शिकविला व मानवी समतेचे तत्त्व पटवून दिले. प्राच्य व पाश्यात्य संस्कृती एकत्र झाल्या तरच जगाचा उद्धार होईल हा मंत्र त्यांनी दिला. त्यासाठी विश्वभारती विद्यापीठाची स्थापना केली. राजकारणात ते राष्ट्रीय पक्षाचे होते, मा. गांधींना त्यांचा पाठिंबा होता. स्वतंत्र भारताचे राष्ट्रगीत जनगणमनचे निर्माते. १९१३ मध्ये गीतांजली ह्या काव्यसंग्रहाला नोबल पारितोषिक मिळाले.

त्यांचे बौद्ध धम्माकडे आकर्षण होते, ते म्हणतात,

" It must be acknowledged by all that Buddhism is not the religion of worldly attachment. Yet, there is no parallel in Indian history to the development of art, science and commerce as took place during the period of the emergence of Buddhism and after.

The reason is that when the human spirit is liberated from the bondage of dead matter, all its faculties are stirred by delight to endeavour towards their full development. Spirit is at the root of all human faculties, for they represent the power of spirit and it is their nature to strive towards fullness. They never impair themselves by stifling man internally and externally.

We, therefore, find that during the Buddhist period India embraced the religion of self-renunciation in lcve and it found a social expression the like of which we are recently witnessing in Europe. In India the sick were provided with medicines and diet; veterinaries for treatment of animals were established; efforts for relieving the distress of all creatures were made in various ways. At that time, preceptors in numerous batches, staking their lives and comforts, crossed inaccessible regions and gladly bore, hardships for the salvation of foreigners and the uncivilised. In India then the spirit of love developing its own aspect of suffering initiated

the devotees into the lesson of powerful and noble manhood. This was the reason why India at that time was able to conquer with the aid of religion not only its own spirit but the world as well and at the same time unite by dint of its own spiritual force material and spiritual progress. The Christian civilization of Europe was then not even dreamt of. The rediance of the sacred mission of a life of hardships and selfless love is now obscured by artificiality and excess of emotions, but has it been extinguished?" *

जगातील सम्राटातील सर्वोच्च गणलेल्या सम्राट अशोकाचा मानवतावाद, रवींद्रनाथ टागोर खालीलप्रमाणे विशद करताना म्हणतात,

" Asoka, the greatest of the emperors among the world, got carved on rocks the words he desired should permanently remian for people to hear. He knew that the rocks would never wear away but would stand immobile on the roadside of eternity, reciting the same message to the wayfarers through endless ages. He gave the rocks speech to carry out this task.

Irrespective of ages, the rocks had borne his words. Where is Asoka gone, where is Pataliputra now, where are the glorious days of religiously awake India ? The rocks have been reiterating still today those few words in the foregotten script of an obsolete language. They have cried in the wilderness for long, long years in the forest. The noble words of Asoka also, like people bereft of speech, had tried to attract, by silent gestures, the attention of mankind, the Rajputs, the Pathans, the Mughals had travelled along this route, the words of the bargis, like quick flashes of lightening, had spread debacle far and wide, but none had heeded their silent gestures. There was a small island on the other side of the ocean whose existence Asoka had not dreamt of. At the time when Asoka's artisans had been inscribing his edicts on the rocks, the poor silvan people of the island had been sculpting their religious feelings on mounds of mute stone. Many thousands of year later, a foreign visitor from that island came and recovered his language from the coils of dumb signs in which time had so long enmeshed them. The will of soverign Asoka was fulfilled after so may centuries through the enterprise of a foreigner. His message was nothing more than this : however great a monarch might be, he must let even a way farer know what he wants or not, what he considers good and what he considers evil. His thought had been standing on the wayside for all these ages longing to find a refuge in the mind of every man. Towards that earnest yearning of the sovereign some of the passers-by had cast a glance and some had gone by unheeding.

However, what I intend to say is not that Asoka's edicts are literature but that they at least prove what the main urge of the human heart is. We

---

First Published in—

* : Yatrarpurbapatra (Pather Sanchaya), Tattwabodhini Patrika, Asarh, 1319.

build images, draw pictures, compose poems, errect stone temples-behind all these endeavours going on ceaselessly at home and abroad there is nothing but the prayer of one human heart to be immortalised within other human hearts. This striving for permanence is the dearest of human strivings." [*]

"Once in this India emperor Asoka devoted his imperial power to spread religion, to perform beneficial activities. We know how powerfully intoxicating royal power can be. Like a hungry fire, this power eagerly seeks to spread its fiery and greedy tongue from one home to another, from one village to another, from one country to another.

Asoka employed this royal power, hungry to consume the world, in the cause of welfare. He gave up a life of insatiable hedonism and embraced a life of timeless service. This was not necessary to rule the kingdom; this was not arming the country for war ; this was not conquest; nor expansion of commerce; this was the endless bounty of the spirit of altruism, which suddenly made the sovereign its vehicle, putting at once into shade the splendour of royalty and bringing the entire human society into the limelight. Countless great kingdoms of countless great monarchs have suffered devastation and have been razed to dust but the glorious emergence of the power of benevolence in Asoka has become our proud asset, and is breathing strength into us." [**]

"Wherever beauty attains its culmination, it discards its excess of ornaments and there invariably the flower transforms its excess of colour and fragrance into the more compact sweetness of the nature fruit. In this culminiation beauty becomes one with god.

One who has witnessed the union of beauty with good can never associate beauty with hedonism. The materials of such a man's life are usually plain and simple, this happens not because of one's deficiency in one's sence of beauty but because of its excellence. Where was the pleasure garden of Asoka? No sign of it at all can be found in his royal palace. But the stupa and the column built by Asoka are still standing near the roots of the Bodhibanyan tree in Buddhagaya. His works of art and craft are not negligible. At the very holy site where Lord Buddha had discovered the path of man's salvation from suffering, at the very site of the memorial of supreme good, Asoka set up beautiful works of art. He never paid such tributes of worship to his own pleasurers." [†]

It will be relevant to state in this connection that Rebindranath visited Buddagaya twice, in 1311 and in 1321, (B. S.) in the month of Aswin on both occasions, presumably during the puja vacation in Santiniketan Ashram.



* : Sahityer Samagri (Sahitya) Bangadarshan, Kartick, 1310.

** : Utsaver Din (Dharma), Bangadarshan, Magh, 1310.

† : Saundaryabodh (Sahitya) Bangadarshan, Pous 1313.
All the above extracts reprinted from, Asoka 2300, edited by Chowdhury, P. P. 9-10.

# परिशिष्ट–१२

## रा. मात्यांचा खोटेपणा

वि. वि. बहिष्कृत भारतकर्ते यांसी :–

तारीख ३ मे १९२७ रोजीं 'केसरी' मध्यें व 'नवाकाळ' मध्यें राजश्री माटे यांनीं सभा भरवून महाडसंबंधानें जी माहिती प्रसिद्ध केली आहे ती अगदी चुकीची आहे. राजश्री माटे यांनी आमच्या कुटुंबास मारलें नाहीं अशी जी माहिती प्रसिद्ध केली आहे ती खोटी आहे, आणि त्यांत जी माहिती प्रसिद्ध केली आहे ती रा. माटे यांनी सिद्ध करून दिली पाहिजे नाहीं तर त्यांच्यावर विनाकारण माझी व कुटुंबाची बेअब्रु केल्याबद्दल कायद्याप्रमाणे इलाज केला जाईल.

तारीख ८ मे १९२७ च्या 'ज्ञानप्रकाश' च्या अंकांत रा. पी. एन. राजभोज व रा. शांताराम पोतनीस यांनी जे लिहिलें तें अगदीं बरोबर आहे. वाचकांनीं गैरसमज करून घेऊं नये. हे आमचे अस्पृश्यतानिवारक म्हणवून घेणारे पुढारी पहा कशी आपली पगडी फिरवितात ! हें वरील गोष्टीवरून स्पष्ट दिसतें. उत्तर दिल्यास मीं जास्त खुलासा करीन.

आ.

**भानुदास गुंडोराव कांबळे**

सातारा प्रतापगड

●●●

पत्रव्यवहार : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# परिशिष्ट–१३

# पुणें

# मातंगपरिषदेची दुसरी बाजु

मे. रा. रा. दीनबंधु पत्राचे संपादक यांस :–कृ. सा. न. वि. वि. माझ्या पत्रास आपल्या येत्या अंकांत अवश्य स्थळ द्याल अशी आशा आहे. ता. ५-७-२७ रविवार दिवशीं मातंगपरिषद् भरविण्यात आली आणि त्या ठिकाणीं रा. रा. भोपटकर हे अध्यक्षस्थानी विराजमान झाले. त्या ठिकाणीं आमच्या नांवावर पोट भरणारे वायदंडे हे भटाच्या वतीनें चालून आमचा मातंगसमाज रसातळास जावा असा एक त्यांचा अंदाज दिसत आहे. तरी पण आमच्या मातंग वीरांनीं थोडक्यांत सावध राहून लोकांच्या भरंवशावर न रहातां, आपल्या पायावर उभे रहावें हें आद्य कर्तव्य होय.

वरील नमूद केलेली परिषद ही निव्वळ पॉलिशीवाईक होती असें त्यांच्या कर्तबगारीवरून उघड दिसून आले ; बाहेर गांवांहून आलेल्या वक्त्यांना बोलण्याची परवानगी न मिळतां, भटाच्या वतीनें जे चालणारे त्यांनाच मात्र बोलण्याची परवानगी असे व इतरांस दहा किंवा बारा मिनिटें, अशी अध्यक्षांनीं सूचना दिली होती. तरी पण जे कोणी चाहाते वि. डी. वायदंडे, रा. सकट यांना आमच्या मातंग सामाजांत, फुकटही विचारीत नाहींत, यांना जे कांहीं मायाच्या वतीनें फांटे फुटले ते निव्वळ बेगडी पॉलिशीचे असून मातंग लोकांना काळिमा फांसण्या जोगेच होत त्यावरूनच रा. रा. हिमतबहादूर सिताराम बाबाजी लांडगे यांनीं ठराव करून व त्यांच ठरावास अनुसरून एक गुपित गोष्ट सर्व मातंगांच्या निदर्शनास आणिलीच आहे. ती येणेप्रमाणे :–वरिष्ठांनीं आपल्या मातंग लोकांच्या वतीचें जीं जीं कार्ये साधून घ्यावयाची, ती तीं कार्ये मातंगांच्या वतीची साधण्यांत येतील अशी जीं भावनेचीं व नवलाचीं कौलें घालूं पहातात, त्यांची शाकारणी त्या नवलाच्या कालानें केली, तरी आपली जीं कांही गळकी घरें थोडी बहुत आहेत, त्यांहीपेक्षां जास्त गळतीं होऊन त्या गारठ्याच्या योगानें आपणांस निमोनिया रोग होऊन क्षयरोगावर गेल्यास डॉक्टर सुद्धां इलाज करावयास भीत असतात. तर आपण लोकांवर न विश्वासतां आपल्या हस्तें तीं शाकारून झाल्यास बरी म्हणजे असलेलें गळीत खात्रीनें बंद झाल्याशिवाय राहणार नाही.

आमचे विद्वान् रा. रा. डॉक्टर आंबेडकर यांच्या कार्याची गदा नकली वीरांचे मांडीवर बसल्याखेरीज राहणार नाहीं.

आपले नम्र,

१ सिताराम बाबाजी लांडगे.

२ जानो बाबाजी भिंगारदेव.

३ श्रीनाथ सदाशिव वैराठ.

४ तुकाराम लक्ष्मण ढकपाळ.

५ भिकाजी रामजी गायकवाड.

व इतर सर्व ('' दीनबंधु '')

---

पत्रव्यवहार : बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# परिशिष्ट–१४

## महारांवर अत्याचार

श्री. शिवराम गोपाळ जाधव, प्रचारक, बहिष्कृत हितकारिणी सभा, हे हल्लीं महाड तालुक्यांत उपदेश करीत फिरत आहेत. त्यांनी जें पत्र पाठविलें आहे त्याचा सारांश येणेंप्रमाणें :—(अ) मु. तुर्भे (बु.) येथील मराठे महार लोकांवर अत्याचार करण्याच्या धमक्या देतात कीं, मृतमांस खाल्लें नाहीं, आम्हाला जोहार केला नाहीं, अगर आमच्या भाकरी मागितल्या नाहींत, तर तुमच्या डोकीवर मडकी देऊन तुम्हांला गावांतून हाकलून देऊं. महाड परिषदेपासून येथील महारांत स्वाभिमान उत्पन्न झालेला आहे. तो स्पृश्य टांचेखालीं रगडूं पहात आहेत. गावांत फिरूं न देणें, दुकानांतील सामान विकत न देणें वगैरे उपायांनी स्पृश्य रहिवाशी महारांना त्रास देतात. याचप्रमाणें मु. पालें, मु. वडगांव, आसनपव येथें जुलूम होत असून महारांना शेतांतून रस्त्यांवरून जाऊं देत नाहींत. पांडुरंगदास देऊदास गोसावी (महार) याला ता. ४-६-२७ रोजी रावबाजी मराठ्यांनी बेदम मार दिला.

ठिकठिकाणी लहान मोठ्या प्रमाणांत महारांवर मराठ्यांचा जुलूम चालूं आहे. अस्पृश्यांना शाळा मोठ्या प्रमाणांत नाहींत.

सरकार वरील गोष्टींकडे लक्ष देईल काय ?

---

बहिष्कृत भारत, ता. १ जुलै १९२७.

# परिशिष्ट–१५

# मनुस्मृती

वास्तविक पाहाता असा कोणताही देश नाही जेथे धर्माने त्याच्या इतिहासात एवढी महत्त्वपूर्ण भूमिका वठविली नाही जितकी त्याने भारताच्या इतिहासात वठविली आहे. भारताचा इतिहास अधिक काहीही नसून तो केवळ बौद्ध धम्म आणि ब्राह्मणवाद या मधील मरणशील संघर्षाचा (Mortal Conflict) इतिहास आहे. या सत्याची एवढी अवहेलना केल्या गेली आहे की कोणीही याला त्वरीत स्वीकारणार नाही.

एका अन्य पुराव्यानुसार पुष्यामित्राने मौर्यांच्या विरुद्ध जी क्रांती केली तिचा मूळ उद्देश बौद्ध धम्माचा विनाश आणि त्याजागी ब्राह्मणवादाची स्थापना करणे हाच होता, जो विधि-संहिताच्या रूपाने मनुस्मृतीचा स्वीकार करण्याच्या राजाज्ञेने स्पष्ट होतो.

मनुस्मृतीला मूळ ईश्वरीय निर्मिती म्हटले आहे. हिला स्वयंभू (अर्थात ब्रह्मा) ने मनुला सांगितले आणि नंतर मनुने हिला मनुष्यांना सांगितले. हा वारसा मनुस्मृतीत केला आहे.

सर्वप्रथम हे लक्षात घेणे आवश्यक आहे की मनुस्मृती एक नवीन विधी-संहिता आहे जी पुष्यमित्राच्या शासन-काळात पहिल्यांदा प्रवर्तित केल्या गेली. मनुस्मृती मध्ये बौद्ध आणि बौद्ध धम्माच्या विनाशाच्या दृष्टीने स्पष्टपणे कायद्याच्या स्वरूपात व्यवस्था केली आहे. यावरून पुष्यमित्राचे नवीन शासन बौद्ध आणि बौद्ध धम्माच्या विरोधी होते हेच सिद्ध होते.[1]



---

[1] : Dr. Babasaheb Ambedkar Writings and Speeches , Vol. 3.

# परिशिष्ट–१६

## बहिष्कृत भारतावरील अभिप्राय

(१) **तरूण भारत**–तारीख ४-४-२७

बहिष्कृत भारत :–संपादक–डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, बार-ॲट-लॉ,, परळ, मुंबई. महाराष्ट्रांतील अस्पृश्य बांधवाची सेवा करण्याकरितां हें पाक्षिक सुरू करण्यांत आलेलें असून सदर पाक्षिकाचे संपादक परदेशांत उच्च शिक्षण संपादन करून आलेले एक अस्पृश्य सद्‌गृहस्थ आहेत व हें विशेषच भूषणीय आहे. पत्राची भाषा सुबोध व सदभिरुचीला धरून असल्यानें व विचार राष्ट्रीय स्वरुपाचे असल्यांनें पाक्षिक बऱ्याच श्रेष्ठ दर्जाचें आहे. केवळ अस्पृश्यांच्या उन्नतीकरितां अशा एखाद्या भारदस्त नियतकालिकाची उणीव होतीच. ही उणीव हें पाक्षिक चांगल्या प्रकारें भरून काढील यांत शंका नाहीं. वा. व. ३ रुपये.

(२) **प्रजापक्ष**–तारीख २४-४-२७

बहिष्कृत भारत :–बॅ. आंबेडकरांच्या संपादकत्वाखालीं सदर पाक्षिक रहीम बिल्डींग मुंबई येथें निघूं लागलें आहे. अस्पृश्य वर्गातर्फे झटणाऱ्या अशा एखाद्या स्वतंत्र पत्राची मोठी उणीव होती ती या पत्रानें भरून निघेल असें वाटतें. डॉ. आंबेडकर यांची लेखणी तडफदार असून तेजस्वी आहे. सत्यशोधकी तर्कटी वळणावर ती न जावो म्हणजे मिळविली. असो; आमच्या या नूतन बंधूचें आम्हीं मोठ्या प्रेमानें स्वागत करीत आहों. वार्षिक वर्गणी टपाल खर्चासह ३ रुपये.

(३) **परीक्षक**–तारीख २८-४-२७

बहिष्कृत भारत नांवाचें पाक्षिक वर्तमानपत्र नुकतेंच निघूं लागलें असून त्याचे दोन अंक प्रसिद्ध झाले आहेत. पत्राचे संपादक बॅरिस्टर डॉ. भीमराव रामजी आंबेडकर हे स्वतः आहेत. इतकें सांगितलें म्हणजे पत्राच्या योग्यतेबद्दल विशेष सांगण्याचे कारण नाहीं. बॅ. आंबेडकर हे चांगले विद्वान असून देशासंबंधीचे त्यांचे विचार फारच कळकळीचे आहेत. त्यांची भाषासरणी व विषयप्रतिपादन शैली वाचकांच्या मनावर परिणाम करणारी असते. युक्तिवाद सरळ, सडेतोड, व सभ्यतेचा अतिक्रम न होऊ देता करण्यांत येत असतो. अस्पृश्य मानलेल्या जातींना हिंदुसमाजांत समानता प्राप्त करून देऊन त्यांची उन्नती घडवून आणण्यास झटणें हा 'बहिष्कृत भारत' पत्राचा प्रमुख उद्देश आहे. हें पत्र बहिष्कृत वर्गासच नव्हे, तर इतर वर्गासहि भूषणभूत होईल अशी आम्हांस आशा आहे. 'बहिष्कृत भारत' हें तूर्त पाक्षिक असलेलें पत्र लवकरच साप्ताहिक होवो असें आम्ही इच्छितों.

(४) **निजाम विजय**–तारीख १२-४-२७

गेल्या तारीख तीन एप्रिल पासून मुंबई येथें अस्पृश्यांच्या उन्नतीकरितां बॅ. आंबेडकर यांच्या संपादकत्वाखालीं 'बहिष्कृत भारत' नांवानें एक पाक्षिक निघण्यास सुरवात झाली आहे. सदरहू नियतकालिकाचा पहिलाच अंक जो आमच्याकडे आला आहे त्यावरून पहातां पाक्षिकाचें धोरण कसें असणार याचा उलगडा होतो. पाक्षिकांतील कोणताही लेख वाचला असतां संपादकाच्या मनाची अंगीकृत कार्यांविषयींची तळमळ त्यांत स्पष्टपणें व्यक्त झालेली आढळते. हिंदुस्थानांतील अस्पृश्य समाजापुढें केवळ हिंदूतील वरिष्ठ जातीशीं झगडण्याचाच प्रश्न नसून ब्राह्मण वगैरे वरिष्ठ जातीशिवाय संस्कृतीनें त्यांच्याबरोबरीचे असतांनाहि त्यास हात अंतरावर ठेवूं पहाणारे ब्राह्मणेतर, स्वधर्मीयांची बऱ्यावाईट कोणत्याही रीतींनें संख्या वाढविण्याकरितां बद्धपरिकर झालेले मुसलमान व बाह्यात्कारी एका जातीच्या हितार्थ जपण्याचा आव आणतांनाच मनांतून ब्राह्मण, ब्राह्मणेतर, अस्पृश्य व मुसलमान इत्यादि सर्वांस एकच जात्यांत भरडून काढूं इच्छिणारें सरकार व सर्वांशींच त्यास झगडावें लागणार आहे. व ही गोष्ट संपादकाच्या ध्यानी असावी असें दिसतें. पत्रांतील लेखांची भाषा अत्यंत जोरदार, सडेतोड व केवळ निर्भेळ सत्याशिवाय कशाचीही दरकार न करणारी अशी आहे. व हेंच धोरण पत्रकर्ते जोपर्यंत कायम ठेवतील तोपर्यंत ते आपलें उद्दिष्ट सिद्धीस नेण्याचें यश खात्रीनें मिळवतील असें वाटतें. कालाच्या विचित्र करणीनें वरिष्ठ, कनिष्ठ किंवा अस्पृश्य अशा हिंदु जातींतील कमी अधिक प्रमाणानें कां होईना सर्वत्र समाजाची अधोगति झालेली आहे. परिस्थितीनें सर्वांच्याच नेत्रांत झणझणीत अंजन पडत आहे, व त्याचा परिणाम उशिरानें कां होईना पण दृष्टि निवळण्यांतच होईल याबद्दल शंका नाहीं. तरी आमच्या बंधूंनी विकारवश न होतां आपली चळवळ सडेतोडपणानें व केवळ आपले हक्क-खरेखुरे मानवी अधिकार-दृष्टीपुढें ठेवून चालवावी व कोणत्याहि परिस्थितींत परधर्मीयांच्या जाळ्यात न सांपडण्याची खबरदारी घ्यावी, व त्यांच्या पुढाऱ्यांनीं त्यास याच सरळ मार्गांनें न्यावें. पत्राचें आजचें धोरण पहातां तें आमच्या वरील विचाररणीला धरून राहील अशी आशा करण्यास जागा आहे. व म्हणूनच इतक्या कळकळीनें आम्ही सदरहू पत्राच्या चालकांचे अभिनंदन करतों. अस्पृश्यसमाज हा हिंदुसमाजाचा महत्त्वाचा अवयव आहे-नाहीं, खऱ्या हिंदु धर्माच्या भावी जीवनाचा तो पाया-आहे ही गोष्ट यापुढें तरी कोणी विसरूं नये.

(५) **गोब्रास**–तारीख ८-५-२७

'बहिष्कृत भारत' पाक्षिक पत्र. संपादक डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, बार-ॲट-लॉ, परळ, मुंबई. वा. व. ३ रुपये. स्वकीय समाजांत जागृति करून

इतर समाजांस त्यांचे दोष दाखवून आपल्या समाजाबद्दल सहानुभूति उत्पन्न करून घेण्याचा हा प्रयत्न स्तुत्य आहे. मात्र हजारों वर्षांच्या पूर्वीच्या स्मृतिकारांनी धर्माचे जे नियम घालून दिले त्यांना सैतानी वगैरे विशेषणें लावून किंवा कित्येक शतकांच्या रूढींची तटबंदी एकदम सुरुंगानें उडवून देण्याचा अट्टाहास करून बाचाबाची झाल्यास त्याचें सर्वस्वी खापर प्रतिपक्षावर फोडण्यानें इच्छित हेतु साधणें दुरापास्त आहे. आहार, विहार, राहणी, करणी, शिक्षण, सहवास इत्यादि सुधारणांनी ज्या गोष्टी साध्य होणाऱ्या आहेत किंवा कालाचे ओघानें आपोआप घडूनहि येत आहेत, त्या दुराग्रहाने व उतावळीनें केल्यास हिंदूंची जूट होण्याऐवजी फूटच वाढत जाईल. कालाप्रमाणें रूढी बदलल्या पाहिजेत, पण आततायीपणानें ती गोष्ट साध्य होणार नाहीं. हें नूतन भावंड शांततेनें समाजोन्नति करण्यांत यशस्वी होवो.

(६) **मौज**–तारीख १८-५-२७

बहिष्कृत भारत :–संपादक, डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, बार-ॲट-लॉ, यांच्या नेतृत्वाखालीं अस्पृश्योद्धारार्थ हें पाक्षिक निघत आहे. याचे आतांपर्यंत जे तीन अंक आमच्याकडे आले, यावरून हें पाक्षिक आपलें कार्य धडाडीनें करील असें वाटतें. विषयांची मांडणी वगैरे बरी असते. अस्पृश्यांचा हा दोस्त बहिष्कृत भारताचा उद्धार करील; अस्पृश्य व स्पृश्य यांनीं याला आश्रय द्यावा. वार्षिक व.ट.ह. सह ३ रुपये.

(७) **प्रबोध**–तारीख १५-५-२७

बहिष्कृत भारत :—(पाक्षिक परळ, मुंबई. सं. डॉ. आंबेडकर, बार. ॲट.लॉ, वा. व. ट. हं. सह ३ रु) सामाजिक किंवा राजकीय दुःखें जी असतील तीं वेशीवर टांगण्याला वर्तमानपत्र हें एक सुलभ साधन झालें आहे, ह्यांत शंका नाही. ह्या दृष्टीने अस्पृश्यांची दुःखें समाजापुढें ठेवण्याकरिता वरील पाक्षिकानें जो अवतार धारण केला आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों. हिंदुस्थानांत ज्या काळामध्यें औषधालाहि मुसलमान किंवा ख्रिस्ती नव्हता त्या काळांतील अस्पृश्यतेची गोष्ट एका प्रकारें वेगळी होती. पण आजच्या सारख्या काळामध्यें विधर्मी व गोमांसभक्त असे लोक स्पृश्य समजण्यांत येत असतां राम-कृष्णाला भजणारे व गाईलाहि पूज्य मानणारे असे स्वधर्मीयच लोक पुरातन कालाप्रमाणें अस्पृश्यच मानण्यांत यावे हा अन्याय ह्यापुढें चालू राहणें केव्हांहि इष्ट नाहीं.

मुसलमान व ख्रिस्ती हे स्पृश्य मानण्याला "बळी तो कान पिळी" ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्या शास्त्राचा आधार आहे ? दोघांनींहि आपलीं येथें राज्यें स्थापून आमचें कान पिळले म्हणूनच ते स्पृश्य ठरले ना ? मग अंत्यजांनीहि तसेंच करून

इतका अगदीं साधा सुविचार करण्याची अक्कल टाळक्यांत (मडक्यांत ?) असेल तेव्हां ना ? दुसरें असें कीं १००/१२५ गांवकरी मंडळी जमली असतां व त्यांपैकीं ३ माणसें उठून महारांना मारीत असतां इतरांनी गंमत पहावयाची हें आश्चर्य आहे ! परंतु जन्मल्यापासून " महार म्हणजे पशूपेक्षांहीं नीच," " महार म्हणजे जणू कांही माणूसच नव्हें " असलें बाळकडु वर्णाश्रमधर्मांनें पाजल्यामुळें व त्यावरच धष्टपुष्ट झाल्यानें महारांवर होत असलेल्या जूलूमाबद्दल पाषाणहृदयी गावकऱ्यांना काहींच वाटलें नाहीं यांत आश्चर्य नव्हे. परंतु दुःखांत सुख या न्यायानें महारावर होत असलेल्या या असह्य मारामुळें एक म्हातारा महार मूर्च्छा येऊन खालीं जमिनीवर पडलेला पाहून, थोड्या उशिरा कां होईना परंतु गांवचे श्री. गोपाळराव पाटील यांस कळवळा आला व आपल्या पुतण्यास (पोलीस पाटलास) ते बजावून म्हणाले कीं, " तू पोलीस पाटील असून तुझ्या समक्ष गांवच्या महारांना हे लोक बेदम मारीत असतां जर एकाद्याचा खून झाला तर तुला जबाबदार धरलें जाईल. तूं पहातोस काय ? " असें सांगितल्यानंतर पोलीस पाटलानें पंचनामा करून दुसरे दिवशीं ता. १६-७-१९२७ रोजीं पंचनामा समक्ष दिंडोरीस फौजदार हजर नसल्यानें हवालदाराजवळ दिल्याचें समजतें परंतु खेदाची गोष्ट ही कीं पोलिस खात्याकडून सुद्धां अद्यापि कांहींच चौकशी झालेली दिसत नाहीं.

अल्पसंख्यांक निरपराधी गरीब महारांवर या आंग्लाईच्या राज्यांतसुद्धां पुष्कळ ठिकाणीं मोंगलाईच्या पुनरावृत्त्या हरहमेशा चालू आहेत. तेव्हां या दोन वर्गाला असल्या जुलूमांतून वांचविण्यासाठी सरकारनें योग्य ती खबरदारी घ्यावी व आंग्लाई म्हणजे " मोंगलाई नव्हे " असें योग्य न्याय देऊन सिद्ध करून द्यावें अशी सरकारास नम्र विनंति आहे. तसेच अस्पृश्य समाजानेंसुद्धां असल्या जुलूमांतून सुटण्यासाठीं पुष्कळ दिवसांपासून हाडीमांसीं खिळलेल्या घातुक चालीरीती समूळ नाहींशा केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तसेंच अपापसांतील सर्व मतभेद विसरून असल्या जुलूमांचा प्रतिकार करण्यासाठीं, एकदिलानें सर्व अस्पृश्यांनीं सुसंघटित झाल्याशिवाय सध्याच्या काळांत तरणोपाय नाहीं येवढाच इशारा तूर्त पुरे.

आपला नम्र,

**भा. कृ. गायकवाड.**

●●●

---

बहिष्कृत भारत, ता. १२ आगष्ट १९२७.

# परिशिष्ट–२४

## महाड म्युनिसिपालिटीची पुच्छ प्रगति.

तारीख ४-८-१९२७ रोजीं महाड म्युनिसिपालिटीची सभा होऊन म्युनिसिपालिटीच्या मालकीच्या सार्वजनिक जागा पाणवठे वगैरे संबंधाचा एक ठराव पास करण्यांत आला. म्युनिसिपल सभासदांच्या प्रतिगामी धोरणाचा ज्यांना अनुभव आहे त्यांना त्यांत विचित्र आणि नवलाचें असें कांहींच वाटणार नाही ! परंतु आश्चर्याची गोष्ट इतकीच कीं श्री. वीरकर यांनीं स्वतः आपण उदार मतवादी असल्याचें इतर सभासदाना वारंवार बजाऊन व मी सुधारणेचा पुरस्कर्ता आहे अशी थाळी पिटून सदर ठराव सभेपुढें मांडला. ठरावाचा आशय असा कीं "१९२४ सालीं म्युनिसिपालिटीच्या मालकीचे सार्वजनिक पाणवठे वगैरे अस्पृश्यांसुद्धां सर्वांना खुलें असल्याचा झालेला ठराव सार्वजनिक शांततेच्या दृष्टीनें हानिकारक असल्यामुळें तसल्या सार्वजनिक ठिकाणीं अस्पृश्यांना बंदी करण्यांत यावी" श्री. वीरकर यांची उदारता आणि सुधारणा ती हीच ! ठरावाच्या समर्थनार्थ केलेल्या आपल्या भाषणांत श्री. वीरकर म्हणाले, 'अशिक्षित वर्गांतल्या लोकांना असली सुधारणा पटलेली नसल्यामुळें म्युनिसिपालिटीनें अशी सावधगिरी बाळगणें इष्ट आहे.' या मुद्यावर श्री. तुळजारामभाई यानीं अशा तऱ्हेची बंदी लादल्याबद्दल अर्ज अशिक्षित वर्गांकडून आलेला नसून सुशिक्षित-निदान अर्धशिक्षित ब्राह्मण, गुजर वगैरे लोकांकडूनच विशेषतः आल्याचे श्री. वीरकर व अध्यक्ष आणि सभासद यांच्या निदर्शनास आणलें. वकिलांना लाजविणाऱ्या या सडेतोड मुद्याला प्रत्युतर देणें श्री. वीरकर यांना शक्यच नसल्यामुळें "खासगी पाळ्या व्यक्तिशः खर्चानें बांधावयास भाग पाडणाऱ्या चौदार तळ्यासारखीं ठिकाणें अगोदर कायद्यानें सार्वजनिक तरी ठरतील की नाही." याबद्दल शंका प्रदर्शित केली. यावर अध्यक्षांनी सुचविलें की या शंकेचा विचार करण्याचें आज आपणांस कारण नाही. आज श्री. वीरकर स्पृष्यास्पृष्यांचा संबंध आला म्हणून तळें सार्वजनिक म्हणावयास तयार नाहींत. उद्यां आळी आळींचा आणि कुटुंबा-कुटुंबाचा संबंध आला तर विशिष्ट आळीचे अथवा क्रमानेंच विशिष्ट कुटुंबाचें तळें आहे असें प्रतिपादन करण्यास ते चुकणार नाहींत. विजय मराठा छापाच्या सभासदांच्या भेकड वृत्तीमुळें श्री. वीरकर यांच्या पदरीं यशाचा वाटा पडला. असला ठराव पास करून घेऊन श्री. वीरकर यांनीं ज्या म्युनिसिपालिटींत अनेक वर्षे अध्यक्षांचे वगैरे काम आपुलकीनें केलें त्या म्युनिसिपालिटीला जगाच्या

उपहासास पात्र करण्याचें पाप पदरीं जोडावें याबद्दल श्री. वीरकर यांना दोष न देतां कुणीही त्यांची कींवच करील ! ! ही श्री. वीरकरांची आणि त्याबरोबरच महाड म्युनिसिपालिटीची पुच्छ प्रगति नव्हे तर काय !

आतां असल्या ठरावामुळें सरकारी ग्रँट बंद केली जाते कीं काय असा प्रश्न आहे. आणि ती तशी बंद होत असली तर म्युनिसिपालिटीच्या येवढ्या मोठ्या नुकसानीबद्दल जबाबदार कोण ? याबद्दल कायद्याचा सल्ला श्री. वीरकर हे देतीलच.

आपला,

**श्री. गो. देशपांडे.**

●●●

बहिष्कृत भारत, ता. १२ आगष्ट १९२७.

# परिशिष्ट–२५

## मध्यप्रांत–वऱ्हाड हिंदु परिषद

### अध्यक्ष सर शंकरन् नायर यांचे भाषण

" मी हिंदू सभेचा सभासद नसतांही तुम्ही मला अध्यक्ष निवडून माझा मोठाच गौरव केला आहे. मी सभासद नसलों, तरी हिंदु सभेचें जें महत्त्वाचें कार्य आहे त्याला मात्र माझा पूर्ण पाठिंबा आहे.

### हिंदूसभा

कांही वर्षांपूर्वी मुसलमान लोकांत हिंदूप्रमाणें इंग्रजी शिक्षणाचा प्रसार झाला नव्हता, तेव्हा देशांत होणाऱ्या सुधारणांत आपण कोपऱ्यात पडून राहूं नये, म्हणून त्यांनीं आपला वेगळा संघ बनविला ; मुसलमान पुढाऱ्यांनी वाजवीपेक्षां जास्त जोरानें आपल्या हक्कांची मागणी सुरू केली. अर्थात, आपल्या हक्कसंरक्षणाची तरतूद केली तर त्याबद्दल त्यांना दोष देतां येत नाही. सरकारनें त्यांची मागणी मोठ्या खुषीनें मान्य केली. बंगालची फाळणी रद्द करा अशी जी बंगाली लोकांनी चळवळ चालविली, तिला विरोध करण्यासाठी प्रथम मुस्लिमलीग निघाली ! लॉर्ड मिंटो यांनीं मुसलमानांची मागणी मान्य केली व मोर्ले मिंटो सुधारणांत मुसलमानांच्या मागणीला प्रथम स्थान मिळालें. पुन्हा सुधारणांचा दुसरा हप्ता देण्याची वेळ आली तेव्हां, हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनी आपसांत

### लखनौचा करार

केला; व त्याला सरकारनें सुधारणायोजनेंत मान्यता दिली. यामुळें हिंदु-मुसलमानांचे भांडण थांबले. यापुढें म. गांधींची असहयोगाची चळवळ सुरू झाली. अर्थात् ती सद्धेतुमूलक होती. त्यांनीं खिलाफतीच्या चळवळीस महत्त्व देऊन दोन जातींचे ऐक्य करण्याची खटपट केली. तसें करितांना गांधींनी हिंदूंचे सर्व हक्क सोडून दिल्यासारखेंच केलें. ते किंवा त्यांचे सहकारी मुसलमान पुढारी यांना आपल्या कृत्यांचे परिणाम तेव्हां दिसून आले नाहींत "१ वर्षांत स्वराज्य मिळवून देतों" असें गांधी म्हणाले. तेवढ्यापुरती मुसलमानांनीं त्यांची अनत्याचाराची अट पाळली. पण इतक्यांत मुसलमान लोकांमध्ये

## पॅन–इस्लामी वृत्ति

(जगांत मुसलमान तेवढा एक ही भावना)

बळावली आणि अशिक्षित मुसलमान लोक आपले हक्क जबरीनें हिंदूंच्या माथीं मारूं लागले ; आणि मलबार व अन्यत्र भयंकर दंगेधोपे झाले. हा परिणाम पूर्वीच लक्षांत यावयास हवा होता. महायुद्ध सुरू होतांच तुर्की राष्ट्र इंग्रजांच्या विरुद्ध लढाईंत सामील झालें ; तेव्हां सरकारविरुद्ध खवळलेल्या मुसलमानांनी पंजाबांत हिंदु लोकांवर हल्ले चढविले ; आणि गांधींनीं असहयोगाची चळवळ सुरू केल्यावर त्या चळवळींत मुसलमान पुढारी सामील असतांही सरकारविरूद्ध खवळलेल्या मुसलमानांनीं हिंदूंच्या देवळांवर हल्ले करून त्यांचा विध्वंस केला ! तथापि, गांधींनीं मुसलमानांचे लाड चालूच ठेविले. त्याचा परिणाम असा झाला कीं, मुसलमान लोक आपल्या पुढाऱ्यांची फिकीर न करितां शेफारून त्यांनी भलभलत्याच मागण्या करण्यास सुरवात केली. तेव्हां अर्थातच हिंदु लोकांना त्यांचा राग आला व भीति वाटूं लागली. दोन्ही समाजांतील तेढ वाढत चालली ; मतभेद तीव्रतर झाले आणि आपले कांही चालत नाही, असें पाहून

### गांधीजींनीं राजकारण सोडलें।

पण, त्यांच्या चळवळीचे परिणाम कायमच राहिले. असहयोगी पक्ष व कांग्रेस यांनी शांतता व सलोखा यांच्यासाठी सतत ओरड व खटपट चालू ठेविली ; पण त्यांना हिंदू-मुसलमानांचे ऐक्य घडवून आणतां आले नाहीं, व यापुढेंहि घडवून आणणें अशक्य आहे. गांधीच्या पाठीमागून चित्तरंजनदास हे चळवळीचे पुढारी झाले. त्यांनींही सद्धेतुपूर्वक व स्वराज्याची चळवळ सुगम व्हावी म्हणून हिंदू-मुलसमानांचा एक करार घडवून आणला, पण, या करारानें बंगाल्यांत हिंदू-मुसलमानांची एकी होण्याऐवजीं परस्परांत वैरभाव मात्र वाढला ! या परिणामाचें वर्णन प्रो. रमेशचंद्र बानर्जी यांनीं 'वैदिक मॅगेझीन' मध्यें पुढीलप्रमाणें केलें आहे :–

### एकीच्या कराराचा परिणाम !

"दुबळ्या हिंदु समाजाला आपल्या बायकामुलांचे संरक्षण करितां येईनासें झालें, तेव्हां त्यांची जी हीन स्थिति झाली, तिचें वर्णन शब्दांनीं करणे अशक्य आहे. त्याची केवळ कल्पनाच करितां येईल, बंगालच्या हिंदूंची स्थिती आज तशी झाली आहे. एकीकडे आमचे देशभक्त पुढारी (बहुतेक हिंदूच) आपल्या भाषणांत

'स्वराज्य' व 'हिंदु-मुसलमानांची एकी' यांचा जोरदार शब्दांनी पुकारा करीत असतां दुसरीकडे मुसलमान गुंडांनी खेड्यापाड्यांत हिंदूच्या बायका पळविण्याचा सपाटा चालविला होता. उत्तर आणि पूर्व बंगाल्यांतील खेड्यांत त्यांचे हे प्रयत्न व्यवस्थित व संघटित रीतीनें सुरू होते. मोठमोठे पुढारी स्वराज्यावर व्याख्यानें देण्यांत चूर होते ; व मोठमोठे संपादक हिंदु-मुसलमानांच्या एकीवर लिहिण्यांत गुंतले होते. त्याचवेळी आमच्या आयाबहिणींचें पातिव्रत्य मुसलमान गुंडांच्या हवालीं करण्यांत आलें होते ! हिंदु तरुण मुली (विवाहित किंवा विधवा) किती हातोहात मुसलमान गुंड पळवून नेतात, याची कल्पना अगदीं अल्पकाळांत घडलेल्या अशा उदाहरणांची यादी आम्हीं पुढें देत आहों, त्यावरून करिता येईल.''

यापुढें अशा उदाहरणांची एक लांबलचक यादी देऊन प्रो. बानर्जी लिहितात :–

## गुंडांना अधिकाऱ्यांची फूस !

''असल्या पुष्कळ प्रकरणांत मुसलमान कामदारांनीं हिंदु मुली पळविणाऱ्या, त्यांच्यावर जबरदस्ती करणाऱ्या, त्यांचें पातिव्रत्य भ्रष्ट करणाऱ्या व खून करणाऱ्या गुन्हेगारास स्वतः आश्रय दिला आहे ! अशा स्थितीत पुढें दासबाबूंच्या कराराप्रमाणें जेव्हां शेंकडा ८० सरकारी अधिकाराच्या जागा मुसलमानांना (त्यांची पात्रापात्रता न पाहतांही) दिल्या जातील, तेव्हां दुबळ्या, असहाय व विस्कळित हिंदु समाजाची काय स्थिती होईल याची कल्पनाच करणें चांगलें !''

सारांश, स्वराज्यपक्ष किंवा गांधींचा असहयोग यांनीं आजपर्यंत असें धोरण स्वीकारिलें आहे कीं त्यांच्या हातून हिंदू-मुसलमानांचा समेट घडून येणें अशक्य आहे ; किंवा हिंदूंचे रक्षण होणें अशक्य आहे ! म्हणून, मुसलमानांच्या हितरक्षणासाठी जशी 'मुस्लीम लीग' तशी

## हिंदूंच्या रक्षणासाठी हिंदूसभा

अवश्य आहे अशी योजना झाल्यास कदाचित हिंदूसभा व मुस्लीम लीग यांच्यामध्यें वाटाघाट सुरु होऊन समेटही होईल. हें काम कांग्रेसपक्ष किंवा असहयोग करूं शकेल, हें संभवनीय नाहीं. त्यांच्या भरवशावर स्वस्थ राहतां येत नाहीं. तसेंच, हिंदू मुसलमानांच्या भांडणाचा प्रश्न लांबणीवर टाकणें किंवा त्याची उपेक्षा करणें हेंही योग्य नव्हें. जसजसा वेळ जाईल, तसतशी हिंदु मुसलमानांची फूट वाढतच आहे. कॉंग्रेसपक्षाचें म्हणणे असें कीं इंग्लंडची धोंड मानेवरून निघून आपणांस स्वराज्य मिळाले, तर मग हिंदू-मुसलमानांचे भांडण मागाहून मिटवितां येईल पण मुसलमानांचे म्हणणें थेट याच्या विरूद्ध ! मुस्लीम लीगनें जाहीर केलें की ''प्रथम आमच्या हितरक्षणाची तरतूद झाली पाहिजे ; ती होईपर्यंत आम्हांला स्वराज्याचा पुढचा हप्ता नको !'' मुसलमानांच्या या भाषेनंतर 'स्वराज्या' ची मागणी बंद पडली आहे. आणि आज

## मुसलमान सांगतील त्या अटी

गांधीपक्ष (उर्फ कांग्रेसपक्ष) बिनतक्रार स्वीकारावयास तयार झाला आहे. सारांश हिंदू-समाजाच्या हितरक्षणाचें काम कांग्रेसवाल्यांकडे सोंपविता येत नाहीं. देशांत शांतता व एकी हवी असेल, तर हिंदुस्थानांत मिश्र मतदार-मंडळे स्थापित झालीं पाहिजेत, असें हिंदूंचे म्हणणें होतें. अलीकडें कांहीं मुसलमान पुढाऱ्यांनीं कांहीं अटींवर मिश्र मतदारमंडळें कबूल करून हिंदू मुसलमानांचा सलोखा करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनीं घातलेल्या अटींची तपासणी किंवा चर्चा करण्यांत अर्थ नाहीं. कारण मिश्र मतदार मंडळे मुसलमान समाजाला नकोच आहेत ! तेव्हां 'स्वराज्यपक्ष' सरते शेवटीं मुसलमानांच्या आग्रहावरून स्वतंत्र मतदार मंडळेच मान्य करील व आणखी कांही वर्षे तरी हिंदूमुसलमानांतील वितुष्ट हल्लींसारखेंच कायम राहील, असा रंग दिसतो. तुम्हांला

## हिंदुसभा आणि कांग्रेस

त्यांच्या मनोवृत्तींतील फरक पहावयाचा असेल, तर मुसलमान पुढाऱ्यांनी घातलेल्या एका अटीकडे लक्ष द्या. सिंधप्रांतांत मुसलमानांचें बहुमत आहे म्हणून सिंधप्रांत हा निराळा प्रांत बनवावा, अशी मुसलमान पुढाऱ्यांची मागणी आहे, त्यावर कांग्रेस कमिटीनें काय ठराव पास केला आहे, तो पहा :–

"कांग्रेसनें यापूर्वीच मान्य केलेल्या भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाप्रमाणे प्रांतरचना करण्याची वेळ आतां आली आहे ; व म्हणून जो प्रांत तशी प्रांतरचना करून मागेल त्याची मागणी पूर्ण करण्याच्या कामास ताबडतोब आरंभ केला पाहिजे. आंध्र, सिंध व कर्नाटक यांचे स्वतंत्र प्रांत बनवून या योजनेचा श्रीगणेशा करण्यांत यावा." सिंध प्रांतांतील बहुसंख्य लोकसंख्या मुसलमानांची आहे ; आणि म्हणून त्यांनीं सिंध प्रांत स्वतंत्र करावा ही मागणी करणें अगदीं स्वाभाविक आहे. पण कांग्रेसनें भाषावार प्रांतरचनेचें सर्वसामान्य तत्त्व मान्य करण्यास देखील त्यांना भाग न पाडतांच ही त्यांची अट मान्य केली आणि असें करतांना त्यांनीं सिंधच्या हिंदु जनतेच्या मताची देखील दरकार केली नाहीं ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कोणत्याही एकासमाजाचें बहुमत निर्माण करण्यासाठीं स्वतंत्र प्रांत पाडण्याच्या योजनेचा हिंदु महासभेनें निषेध केला आहे आणि मला वाटतें महासभेच्या या निर्णयाबरहुकूम आपण देखील कांग्रेसची योजना बाजूस सारून सिंधच्या असहाय हिंदूंची पाठ राखणेंच अवश्य आहे.

## संघटन

आतां संघटनाचा विचार करूं. बंगाल सरकारच्या वार्षिक वृत्तांत असे उद्‌गार काढलेले आहेत :–

खिलाफतीच्या चळवळीनें मुसलमानांच्या विद्वेषी वृत्तींना चिथावणी देऊन, कायदा आणि सुव्यवस्था यांच्याविषयीं त्यांच्या मनांत बेपर्वाई उत्पन्न केली. खिलाफत खालसा झाल्यानंतर, सरकारवर राग काढणें अशक्य असल्यामुळें, धर्मवेडानें पिसाळलेले

## मुसलमान हिंदूंवरच उलटले !

त्यामुळें मलबार, पंजाब वगैरे प्रांतांत भयंकर दंगे झाले. खुद्द बंगालमध्यें या धर्मवेडाने असा कहर केला, हें मी एका स्वराज्यपक्षाच्या पत्राच्या शब्दांतच आपल्याला सांगतो. हिंदु स्त्रियांवरील अत्याचार ही बंगालमध्यें एक नित्याचीच बाब होऊन बसली आहे. पूर्वबंगाल व उत्तरबंगाल हे प्रांत गुंडांच्या अत्याचारांचें केंद्रस्थान होऊन बसलें असून, शेकडों स्त्रियां रोज त्यांच्या दुष्ट वासनेला बळी पडत आहेत. या अत्याचारांच्या सर्वच हकीकती वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतात, असें नाहीं. दुर्लौकिकाच्या व बेअब्रूच्या भीतींने बहुधा अत्याचारांना तोंड फुटत नाहीं. बंगाल मधील या अघोर गुंडगिरीविषयी सुमतीदेवी आपल्या 'फॉरवर्ड' मधील लेखांत म्हणतात :–

## बंगालमध्ये बोकाळलेली गुंडगिरी

"सरकार किंवा लोक यांची दहशत गुंडांना उरलेली नाहीं. ते आपले अत्याचार संघटित रीतीनें पार पाडतात. त्यांना शिक्षा होण्याचें भय उरलेलें नसल्यामुळें, आपला हा गुंडगिरीचा धंदा त्यांनी मजेनें चालविला आहे. बंगालमधील

## स्त्रिया इतक्या दुर्बळ आहेत

कीं त्यांना आपलें रक्षण करणें मुळींच शक्य होत नाहीं. व त्या गुंडांच्या पापवासनेला तत्क्षणींच बळी पडतात. पण, लोकांना आपल्या स्त्रियांच्या अब्रूची कांहीं चाड आहे कीं नाहीं ? त्यांच्या सभोंवती रोज स्त्रियांवर होत असलेले हे अत्याचार ते शांतपणाने पहातात ! आपल्या आया-बहिणींच्या अब्रूचे रोज निघत असलेले हे धिंडवडे पाहून, बंगाली लोकांचें

## अंत:करण विदीर्ण होत नाहीं काय ?

मला तर असें वाटतें कीं, त्यांची अंत:करणे मेलीं आहेत. स्त्रियांच्या डोळ्यांतून सतत पडणाऱ्या अश्रुधारांनी त्यांच्या अंत:करणाला द्रव येत नाहीं. त्यांच्या आया-बहिणींची हाक त्यांच्या कानावर जात नाहीं. माणुसकीला लाज आणणारे अत्याचार त्यांच्या स्त्रियांवर रोज होत आहेत पण या गुंडांचा प्रतिकार करावयाला कोणीहि पुढें येत नाहीं !''

अशी स्थिती कां व्हावी ? सरकारला एक जुटीनें शह देण्यासाठीं, आम्ही

## तुमच्या गुंडगिरीकडे दुर्लक्ष करूं

असा करारच मुसलमानांशीं गांधी व स्वराज्यपक्ष यांनी केलेला दिसतो. आणि, म्हणून हिंदू स्त्रियांवर हवे ते अत्याचार करण्याची मुसलमानांना मोकळीक मिळालेली दिसते ! गांधी व स्वराज्यपक्ष यांच्या दुष्ट धोरणांचा हा परिणाम आहे. या सर्व

## अनर्थाच्या मुळाशीं जातिभेद

आहे. श्री. रमेशचंद्र बानर्जी म्हणतात :–

''ज्या समाजांत जातिभेदामुळें हजारों तट पडले आहेत, त्या समाजाचें संघटन होणें, कधीं तरी शक्य आहे काय ? वाण्यावर गुंडानें चढाई केली, तर त्यांचें ब्राह्मणाला कांही वाटत नाही ! चांभारावर मुसलमान गुंडाने हल्ला केला, तर कायस्थ तो मुकाट्याने पहातो ! बंगालमध्यें हिंदु समाजांत अशी एकच जात आहे कीं, जी सुसंघटित रीतीनें आपल्या स्त्रियांवर झालेल्या हल्ल्यांचा प्रतीकार करते. या नामशुद्रांची

## बंगाली अंत्यजांची कामगिरी

अत्यंत स्पृहणीय आहे. त्यांनीं केवळ स्वत:च्याच जातीचें नव्हे, तर वरिष्ठ जातीच्या अब्रूचेंहि अनेक प्रसंगी संरक्षण केलें आहे. मुसलमानांच्या या अत्याचारांच्या सर्वंकष लाटेला जर या नामशुद्रांनी धैर्यानें आळा घातला नसता, तर बंगालमधील ब्राह्मण, कायस्थ वगैरे सर्व वरिष्ठ जाति त्या लाटेंत वाहून गेल्या असत्या. पण, हे नामशूद्र, हिंदु समाजाचे आणि

## हिंदुधर्माचे हे संरक्षक अस्पृश्य

समजले जातात !

बंगाल्यांतील या भयंकर परिस्थितीवरून आपल्या संघटनाच्या आवश्यकतेची कल्पना येईल. हीच स्थिती सामान्यत: इतरहि प्रांतातून आढळतें. म्हणून, हिंदूसभेनें संघटनांचे कार्य हातीं घेतले असून, हिंदू समाजांतील सर्व जातींनी, सर्व वर्गांनी हे अत्याचार आपल्याच जातीवर व वर्गावर होत आहेत अशा भावनेने त्यांचा एकजुटीनें प्रतिकार केला पाहिजे. हिंदुसभेनेंहि हीं

## संघटनाला नडणारी सर्व जातिबंधनें

झुगारून दिलीं पाहिजेत. या जातिभेदामुळें संघटन अशक्य झालें असून, कनिष्ठ जातींच्या मनात आपल्या हीन स्थितीचें वैषम्य सतत डाचत आहे. हिंदु समाजांतील कांहीं जातींत आजहि संकर (fusion) होणें शक्य आहे. पण, कांही जातींतील आचारादि भिन्नता इतकी विलक्षण आहे कीं, आजच त्यांचा संकर होणें शक्य नाहीं. सर्व जातींच्या संमिश्रणाचा व संघटनाचा हा प्रश्न जरी बिकट असला, तरी हिंदु सभेंने तो हळुहळू सोडविला पाहिजे. देशपरत्वें व जातिपरत्वें निरनिराळ्या उपायांचा अवलंब करावा लागेल. पण, हें कार्य यशस्वी करणें आंजहि शक्य आहे. मी स्वतः या बाबतींत आत्यंतिक मर्यादेपर्यंत जावयाला तयार आहे. सद्यःस्थितींत जाति बंधनांचे समर्थंन करणें सर्वथैव अशक्य आहे. चार वर्णांच्या लोकांपैकी कोणताच वर्ण स्वतःच्या कर्तव्याचें पालन करीत नाहीं.

## सर्वच वर्ण कर्तव्यच्युत झाले आहेत

अशा स्थितींत आपापल्या वांट्याला येणारी कर्तव्य मुळींच न करितां, श्रेष्ठतेच्या हक्कांचा एवढा अभिमान कां धरतां ? ब्राह्मणांचे वर्णगुरुत्व मानावयाला ब्राह्मणेतर आतां मुळींच तयार नाहींत. कनिष्ठ जाति यापुढें हीन दर्जा पत्करावयाला कबूल नाहींत. तुर्कस्तान हें हिंदु राष्ट्रांपेक्षा सुद्धा अधिक पुराणमतवादी राष्ट्र आहे. पण तुर्कस्थानांतील मुसलमानांनीं प्रगतीच्या आड येणारी सर्व

## धार्मिक बंधनें झुगारून दिलीं !

धर्म ही संस्था समाजाच्या उन्नतीसाठीं आहे. अर्थात, समाजोन्नतीला अपकारक अशीं जीं धार्मिक बंधने असतील, तीं परिस्थितीला अननुरुप आहेत असें समजून, त्यांचा बेलाशक त्याग केला पाहिजे. वरिष्ठ जातींनी आपल्या श्रेष्ठपणाचें स्तोम माजविल्याने संघटनेच्या कार्यांत अडथळे मात्र उत्पन्न होतील.

## शुद्धि

हिंदू धर्माने नाना प्रकारचें भेद निर्माण करून हिंदु समाजांत अनेक तट पाडले आहेत. सद्यःस्थितींत, हे जातिभेद पाळणें सर्वथैव अपायकारक आहे. पण, हीं जातिबंधने न पाळल्यास आज ग्रामण्य घातलें जाते ! उदाहरणार्थ, हलक्या जातींच्या वापरीत असलेल्या विहिरीचें पाणी प्याल्यामुळें, जात बाटून पुष्कळ लोक परधर्मांत गेले आहेत. तसेंच कांही लोकांचे धर्मांतर निव्वळ जुलमानें झालें आहे. अशा लोकांना पुन्हा स्वधर्मात घेणें अगदीं न्याय्य आहे.

ज्या स्त्रियांवर बलात्कार केले जातात अशा स्त्रियांना हिंदुसमाज जातिबाहेर टाकतो. अशा

### स्त्रिया नाईलाजाने वेश्या होतात.

किंवा धर्मांतर तरी करितात. इतकेंच नव्हे तर, त्यांच्या अब्रुचें रक्षण करावयाला असमर्थ असलेल्या हिंदुपेक्षां बलिष्ठ मुसलमानांचाच आश्रय करणें त्यांना इष्ट वाटतें ! दुर्देवाच्या तडाख्यांत सांपडलेल्या अशा हतभागी स्त्रियांना जर पुन्हां आपल्या कुटुंबात घ्यावयाला त्यांचा पति किंवा पिता तयार नसेल तर त्या दुर्देवी अबलानी खुशाल मुसलमानांच्या हात धरावा ! स्वतःच्या स्त्रियांचे रक्षण करावयाला असमर्थ असलेला असला हा अनुदार

### हिंदुधर्म नष्ट झालेला पुरवला !

आणि असला हिंदुसमाज स्वराज्यालाहि सर्वथैव अपात्र आहे. शुद्धीला जे विरोध करितात, त्यांना हिंदु समाजाच्या प्राचीन इतिहासाचें मुळींच ज्ञान नाहीं. बौद्ध धर्मांचा एका काळीं सर्व भारतानें स्वीकार केला होता. पुढें त्या सर्व बौद्धधर्मीयांना हिंदू करण्यांत आलें. दक्षिण हिंदुस्थानांत हजारों लोक खिस्ती झालेले होते. आणि खिस्ती व हिंदु या दोनहि समाजांत

### सर्रास बेटीव्यवहार होत असे

इतकेंच नव्हें, तर खिस्ती मुलगी आपल्या हिंदु नवऱ्याचें मन खिस्ती धर्माचा स्वीकार करावयाला वळवील अशा समजुतीनें खिस्ती धर्मगुरू मिश्र विवाहांना उत्तेजन देत. हे सर्व खिस्ती लोक हिंदु करून घेण्यांत आले. माझ्या एका इंग्रजी मित्रानें मला अशी सूचना केली कीं, मुसलमानांना क्षत्रिय समजून,

### हिंदूनीं मुसलमानांना आत्मसात केलें

तर हा बिकट प्रश्न सहज सुटेल. हिंदु धर्माची इतकी प्रगति भिन्न संस्कृतीच्या लोकांना आत्मसात केल्यानेंच झाली आहे. अर्थात शुद्धीची चळवळ सर्वथैव निरपवाद आहे.

### समतेच्या तत्त्वावर ऐक्याची उभारणी

हिंदु व मुसलमान यांचा सलोखा नुसत्या जाहीरनाम्यांनी होणार नाही, कृतींने, परस्परसहानुभूतीनें, परस्पर विश्वासानेंच होईल. ऐक्याची तळमळ दोनहि समाजांत तीव्रतेनें उत्पन्न झाल्याविना, समेट होणें अशक्य आहे. समतेच्या तत्त्वावर ऐक्य व्हावें, अशी इच्छा आज दिसत नाही. विषमता पतकरून मुसलमानांशी समेट करणें, म्हणजे दैन्याला आणि दुर्दशेला आमंत्रण देणेंच होय !"



बहिष्कृत भारत : ता. २ सप्टेंबर, १९२७.

# परिशिष्ट–२६

## ब्राह्मणेतर पक्ष

" मद्रास इलाख्यातील जस्टिस पक्षाप्रमाणे मुंबई इलाख्यातील ब्राह्मणेतर पक्षाला सत्ता काबीज करता आली नाही. कारण ब्राह्मणेतरांतील सुशिक्षितांचा अभाव. १९२१ ते १९३० च्या काळात ब्राह्मणेतरांत, विशेषतः मराठा व तत्सम जाती यांच्यात, बराच शिक्षणप्रसार झाला. त्याचा उपयोग सरकारी नोकऱ्या मिळविण्याकडे झाला. सामाजिक व शैक्षणिक बाबतीत सदर सुशिक्षितांनी भरीव कार्य केले, पण ते डोळ्यात भरण्यासारखे नव्हते. या पक्षात मराठा व मराठेतर हे प्रश्न उपस्थित झाले, ते काही स्वार्थसाधू पुढाऱ्यांच्या अदूर दृष्टिकोनामुळे. या ब्राह्मणेतर पक्षात अस्पृशांना जे स्थान होते ते त्रिशंकूचे. ब्राह्मणेतर पुढारी आणि कार्यकर्ते यांच्या मनावरील ब्राह्मणी वर्चस्व नष्ट झालेले लोक पक्षात होते. पण वेदादि धर्मशास्त्रांच्या प्रामाण्यावर यांचा विश्वास होता. ही शास्त्रे त्यांना वंद्य असल्यामुळे त्यातील वर्णाश्रमधर्म त्यांना उघडपणे मान्य होता आणि अस्पृश्यांची अस्पृश्यता गुप्तपणे मान्य होती. सत्यशोधक व ब्राह्मणेतर पक्ष यांचा कार्यक्रमात अस्पृश्यतानिवारण विषय होता, पण त्याची अंमलबजावणी ते प्रथमच्या काळात करीत नसत. पुढील काळात म्हणजे १९२१ ते १९२७ च्या काळात राजर्षि छत्रपती शाहू महाराज, सत्यशोधक समाज आणि ब्राह्मणेतर पक्ष यांच्या पुढे जे ध्येय होते ते हिंदु समाजातील ब्राह्मणांचे वर्चस्व नष्ट करावयाचे. हिंदूंतील जाती नष्ट कराव्यात असे ते मधून मधून बोलत तरी त्याबद्दल त्यांना फारशी ओढ नव्हती. आणि हिंदु समाज हा एकजात, एकसंघ असा समाज व्हावा याबद्दल त्यांचे विचार व कार्यक्रम नक्की नव्हते. १९२५-२६ च्या नंतरच्या काळात असे विचार आणि कार्यक्रम अस्तित्वात आले. "

" ब्राह्मणेतर चळवळीत पुढाकर घेणाऱ्या मराठ्यांनी जनसेवेचे तर खूप अवसान आणले होते. विशेषतः कै. राजर्षि शाहू छत्रपतींच्या अमदानीत सरकारी नोकऱ्यांचे भडाभड राजीनामे देऊन ब्राह्मणेतर चळवळीची स्वयंसेवा करण्यासाठी पुष्कळ मराठे वीर मी मी म्हणून मिशांवर पीळ भरीत पुढे सरसावले. कोणी वर्तमानपत्रे सुरू केली. कोणी संघ काढले. कोणी व्याख्यानांची धुमश्चक्री चालवली, कोणी ग्रंथमाला काढल्या. असा मारे एकच धडधडाट उडाला ! लोकांना वाटले की कोणी हे देवदूत अवचित आमच्या उद्धारासाठी अवतीर्ण झाले. शाहू महाराजांचा पाठिंबा जाताच मात्र हे सारे बहाद्दर खरेखुरे स्वतःची सेवा करणारे ठरल्याचे उघडकीस आले. कोणी कोल्हापूर दरबारचे मानकरी होऊन बसले. कोणाला ३० रुपये, कोणाला

५० रुपये असे लहानमोठे पगार मिळू लागले. कोणी तर प्रत्यक्ष नोकऱ्याच पटकावल्या. चळवळ राहिली चळवळीच्या ठिकाणी आणि हे आपल्या स्वार्थाच्या भजनी ! फुरसदीची चार-दोन व्याख्याने झोडायला मात्र केव्हाही ना नाही. आता तर काय ? उघडउघड सरकारी नोकऱ्या हेच ध्येय ठरले आहे. या ध्येयाच्या प्राप्तीसाठी मराठे पुढारी आज ब्राह्मणांविरूद्ध तर आदळआपट करीतच आहेत, पण खुद्द ब्राह्मणेतरांतीलच पुढारलेल्या अनेक जातींच्या नावाने खडे फोडून ' ब्राह्मणेतर चळवळ म्हणजे फक्त मराठा जातीची चळवळ ' असे नवीन भाष्य प्रचलित करीत आहेत. या साध्यासाठी ब्राह्मणेतर चळवळीच्या मूळ ध्येयाचे वाटोळे झाले तरी त्यांना आता पर्वा नाही. ब्राह्मणांना ज्या दुष्कर्मासाठी ते दोष देत आहेत त्याच दुष्कर्मात ते आता या चळवळीचा बळी देत आहेत. "

## ' ब्राह्मणेतर पक्षाची संघटना '

मुंबई इलाख्यातील ब्राह्मणेतर पक्षात मराठा-मराठेतर वाद माजून राहिला आहे. वादाचा परिणाम म्हणजे ब्राह्मणेतर पक्षात दुही माजून ब्राह्मणेतर चळवळ विस्कळीत होणार. असे होऊ नये म्हणून गेल्या महिन्यात श्री. राजाराम महाराज, कोल्हापूर ह्यांच्या मुंबई येथील राजवाड्यात ब्राह्मणेतर पुढाऱ्यांची सभा भरली होती. सभेत एकंदर परिस्थितीचा विचार करण्यासाठी व मराठा-मराठेतर वाद मिटविण्याचा उपाय सुचविण्यासाठी खालील सद्‌गृहस्थांची एक कमिटी नेमण्यात आली आहे. जूनअखेर ह्या कमिटीने आपला रिपोर्ट तयार करावयाचा आहे. 'कनिटीतील सद्‌गृहस्थांची नावे सर रघुनाथराव सबनीस, डॉ. आंबेडकर, श्री. आचरेकर, रा. ब. बोले, श्री. आसवले. ' (ब. भा. २९-३-१९२९).

असले अनेक प्रयत्न होऊनही ब्राह्मणेतर पक्षात एकी व संघटना होऊ शकली नाही. याची अनेक कारणे होती. "

१९१९ ते १९२९ च्या काळात महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर पक्षाबद्दल लोकप्रियतेची लाट उसळली व ओसरली. १९३० च्या एप्रिलमध्ये गांधीजींनी मिठाचा सत्याग्रह सुरू केला. त्या सत्याग्रहातून इतर सत्याग्रहांचा सर्व देशात असा काही वणवा पेटला की, त्यात सरकार व इतर राजकीय पक्ष बेचिराख होण्याच्या पंथाला लागले. ब्राह्मणेतर पक्षातील तरुण कार्यकर्ते व पुढारी काँग्रेसला मिळताच बहुजन समाज काँग्रेसला मिळाला आणि ब्राह्मणेतर पक्ष उपेक्षित अवस्थेत दिवस कंठू लागला. या पक्षात जोम उत्पन्न करण्याचे अनेकांनी अनेक प्रयत्न पुढील काळात केले. त्या प्रयत्नांपैकी मराठा लीगची स्थापना हा एक होय. नाव वेगळे, पण पक्ष तोच. पण याही प्रयत्नाला यश आले नाही. "[१]



---

[१] : खैरमोडे, खंड, ५ वा, पृ. २७६, २७७, ३०२, ३०४ आणि ३०७.

# परिशिष्ट–२७

## महारवतनासंबंधी कांहीं मननीय ठराव

१. स्वत:ची उन्नति करण्याच्या बाबतीत महार समाजाकडून चाललेल्या प्रयत्नांमध्यें महारकी वतन ही एक मोठी आडकाठी आहे अशी या परिषदेची खात्री झाल्यावरून तिचें पूर्ण विचारांती असें मत झालें आहे कीं, मुंबई इलाख्यांतील वतनदारासंबंधाच्या कायद्याच्या (The Bombay Hereditary Offices Act) १५ व्या कलमाला अनुसरून महारकीच्या वतनांचे मोबदल्यानें रूपांतर करण्यांत यावें. परिषदेचे असें मत असल्यामुळें तिची सरकारला अशी विनंती आहे कीं, ज्या महारांची वतनाच्या बंधनांतून स्वत:ची मोकळीक करून घेण्याची इच्छा असेल त्यांना तसे करण्याचा मार्ग मोकळा व्हावा. याकरितां, महारकीवतनाचें मोबदल्यानें रूपांतर करण्याच्या अटी सरकारनें शक्य तितक्या लवकर स्पष्ट कराव्या, उभय पक्षांना मान्य होणाऱ्या अटी निश्चित करण्याकरितां महार व सरकार यांच्या दरम्यान जी वाटाघाट व्हावी लागेल तिच्यामध्यें महारांच्या वतीने बोलणें करण्याचा अधिकार ही परिषद बहिष्कृत हितकारणी सभेला देत आहे.

२. वतनदार महारांना काळीपांढरीचे-बलुत्याचे व भाकरीचे हक्क यांच्या रूपाने त्यांच्या कामाचा मोबदला देण्याची जी वहिवाट आहे तीच महारसमाजाच्या असहाय व निकृष्ट स्थितीचें मूळ कारण आहे असें या परिषदेचें मत आहें. याकरितां परिषदेची सरकारला अशी आग्रहपूर्वक विनंति आहे कीं, महारवतनाबद्दलचें देणें बलूत्याचे ऐवजी नगदीच्या रूपानें जमीनमहसुलाबरोबर सरकारनें वसूल करावें आणि पाटील कुळकर्ण्यांच्या बाबतींत करण्यांत येतें त्याप्रमाणे महारांचा पगार सरकारी खजिन्यांतून देण्यात यावा.

३. वतनदार कामगारासंबंधाचा कायदा महारकीच्या वतनाला लागू करण्यांत आला आहे. त्या अर्थी सदहू कायद्याच्या चौथ्या कलमांत अंतर्भूत होणाऱ्या तेवढ्याच कामांच्या योग्य बजावणीबद्दल महारांना जबाबदार धरण्यांत आलें पाहिजे. म्हणून या परिषदेंचे पूर्ण विचारांती असें मत झालें आहे कीं, वतनी मुशाहिरा मिळण्याच्या बाबतींत महारांनी रयतेंचीं चालू वहिवाटीचीं कामें केलीं पाहिजेत अशी सदहू कायद्याच्या १८ व्या कलमामध्यें जी अट घालण्यांत आली आहे ती त्या कायद्याच्या उद्देशाच्या मर्यादेच्या पलीकडची असून त्या कायद्याच्या चौथ्या कलमाशी विसंगत अशी आहे. तरी सरकारने सदहू कायद्यांचे १८ वें कलम रद्द करावें, अशी या परिषदेची विनंति आहे.

४. महारांची नोकरीचीं कामें कोणती याविषयीं निश्चितपणा नसल्याकारणानें त्यांच्यावर सरकारी दुय्यम अधिकाऱ्यांकडून जो अनन्वित जुलूम करण्यांत येतो ; त्याचा बंदोबस्त व्हावा. या उद्देशानें या परिषदेची सरकारला अशी विनंती आहे कीं, वतनदार कामदारासंबंधाच्या कायद्याच्या ६९ व ८३ कलमांमध्ये दुरुस्ती करून महारांच्या नोकरीचीं कामें शक्य तितक्या लवकर निश्चित करावीं.

५. कित्येक ठिकाणीं, पूर्वजांनी वतनी जमिनी विकून टाकल्यामुळें व त्या परत मिळविण्याची मुदत टळून गेल्याकारणानें, महारांना मुशाहिऱ्यांच्या मोबदल्याखेरीज आपलीं कामें करावी लागतात. परंतु वतनदार कामदारांसंबंधाच्या कायद्याच्या अन्वयें दुसऱ्यांच्या हातीं गेलेल्या वतनदारांच्या जमिनी परत मिळविण्याचा जो अधिकार कलेक्टरला दिलेला आहे त्याला मुदतीची हरकत येऊं शकत नाही. तरी, कलेक्टरांनीं या अधिकाराचा उपयोग करून महारांना त्यांच्या जमिनी परत देववाव्या अशाविषयीं सरकारनें कलेक्टरांना सर्क्युलरें त्वरित पाठवावी, अशी या परिषदेची विनंति आहे.

६. गांवांत स्वच्छता ठेवणें हें महारांचे एक काम आहे असें ता. २८ जून १८८८ च्या नं. ४२७३ च्या सरकारी ठरावानें ठरविण्यांत आलें. परंतु वतनदार कामदारासंबंधाच्या कायद्याच्या चौथ्या कलमाशीं हा ठराव विसंगत आहे, तरी तो सरकारनें ताबडतोब रद्द करावा, अशी या परिषदेची आग्रहपुरःसर सूचना आहे.

७. महारांचा बलुत्याचा जो हक्क आहे तो गावांतील लोकांची खाजगी कामें करण्याचा मोबदला म्हणून आहे असें गृहीत धरण्याला कांही आधार नाही असें ता. ३ मे १८९९ च्या नं. ३०७४ च्या सरकारी ठरावामध्ये म्हटले आहे. महारांना त्यांच्या वतनाच्या मोबदल्यास लोकांची खाजगी कामें करावयास सांगण्याला कायद्याचा कांही आधार नाही, हें वतनदार कामदारांसंबंधाच्या कायद्याच्या चौथ्या कलमावरून व सदरील ठरावावरून स्पष्ट होते. तरी महारांना रयतेच्या खाजगी कामाच्या जबाबदारींतून मुक्त करणें अवश्य आहे. असें या परिषदेंचे मत आहे.

●●●

---

बहिष्कृत भारत : ता. २ सप्टेंबर, १९२७.

# परिशिष्ट–२८

## महार वतन आणि मुंबई सरकारचे धोरण

सन १८२७ च्या रेग्युलेशन नंबर ९ म्हणजे एल्फिन्स्टन कोडप्रमाणे कोणालाही आपले वतन वतनदार घराण्यातून बाहेर विकता अगर अन्य व्यवहारासाठी देता येत नसे. १८७४ चा वतन कायदा झाला ; व त्यामुळे रेग्युलेशन नं ९ निकामी झाले. या कायद्यासाठी दोन कमिशने नेमण्यात आली. त्यांनी जे निर्णय दिले ते तडजोड (Settlement) म्हणून समजण्यात आले ; पैकी गॉर्डन सेटल्मेंटमुळे हे वतन वतनदार घराण्यातून इतरत्र देता येत असे.

१८२७ च्या ९ व्या रेग्युलेशनने वतनदाराचे सर्व हक्क मान्य केले होते. १८७४ च्या कायद्यानें त्यातील बरेच हक्क कमी केले. इतर वतनदारांना सनदा देण्यात आल्या, पण महारांना सनदा दिल्या नाहीत. पुरातन बादशाही सनद मान्य करण्यात आली.

सन १९२० ते १९२३ च्या दरम्यान ज्ञा. श्रु. घोलप हे मुंबई कायदेमंडळाचे सरकार नियुक्त सभासद होते.

श्री. घोलप यांच्या प्रश्नावर माहिती–

महार हे सरकारचे फुल् टाईम व सॅलरीड् (पगारी) नोकर नाहीत. म्हणून त्यांची सरकारी नोकर या सदरात नोंद नाही. ( The Honourable Sir Ibrahim Rahimtulla, B. L. C. D. Vol. VIII. pp. 587 )

सरकारने महार वतनी जमिनी रयतांच्याच कराव्यात, अशा अर्थाचा ठराव श्री. घोलप यांनी १९ फेब्रुवारी १९२३ ला मांडला. तो सरकारतर्फे विरोध केल्यामुळे परत घेण्यात आला.

ता. २६-२-१९२३ च्या श्री. घोलपांच्या प्रश्नावर–

महारांना बेदरच्या बादशहाने मुंगी पैठण येथे ७९४ वर्षांपूर्वी ५२ हक्कांची सनद दिली होती. (इस. ११२९), ( Vol. VIII, pp. 370 )

महार हे फुल टाईम सरकारी नोकर आहेत ; व ते सरकारचे व गावाचे काम करतात. ( Vol. VIII, pp. 371 ).

महार वतन घाटमाथा व गुजराथमधील काही भागांत अस्तित्वात आहे, मुंबई इलाख्यात नाही, असे सरकारतर्फे दि. २६-२-१९२३ ला सांगण्यात आले ( Vol. VIII, pp. 373—74 ).

मध्य भागाच्या रेव्हेन्यू कमिशनरने सन १९१५ साली सर्क्युलर काढून कलेक्टरांना असे बजाविले की, महारांची संख्या कमी करणे किंवा वाढविणे, किंवा वतन कमी करणे; ही कामे परिस्थितीप्रमाणे कलेक्टरांनी करावीत. ( Vol. VIII, pp. 378—380 )

दि. ७-३-२५ : महारांना सरकारी नोकरांची खाजगी कामे करावी लागतात. ही पद्धत नष्ट करण्याबद्दल सरकार कोणता उपाय योजणार आहे, असा श्री. निकाळजे यांनी प्रश्न विचारला. ही पद्धत फार पुरातनकाळची आहे व ती सर्व ठिकाणी पहावयास मिळत नाही, ती बंद करण्यासाठी सरकारला उपाययोजना करणे जरूर वाटत नाही, असे सरकारतर्फे श्री. सी. व्ही. मेहता यांनी उत्तर दिले. ( Vol. XIV, pp. 801 )

या उत्तराला उद्देशून श्री. डब्ल्यू एस्. मुकादम यांनी प्रश्न विचारला की, ही पद्धती म्हणजे इं. पी. कोडच्या ३७४ कलमाप्रमाणे सरकारी अधिकारी गुन्हा करतात, असे सरकारला वाटत नाही काय ? त्यावर श्री. मेहता यांनी गुळमुळीत उत्तर देऊन वेळ मारून नेली. ( Mr. W. S. Mukadam—Will Government be pleased to state whether they consider this sort of forced labour a breach of section 374 of the I. P. C. ?

The Honourable Mr. C. V. Mehta—will this Honourable member Kindly enlighten me what is section 374 of I. P. C. ?

Mr. W. S. Mukadam—Forced labour.

The Honourable Mr. C. V. Mehta—I am afraid I cannot give any legal opinion. I have stated the facts. (pp. 801)

दि. २१-७-१९२५ : महारांनी आपल्या गावातून बाहेर जो सरकारी कागदपत्रांचा बोजा व इतर वस्तू डोकीवर वाहून न्याव्या लागतात, त्याची नोंद करण्यासाठी सरकार पाटील, कुलकर्ण्यांना एक चोपडी ठेवावयास का भाग पाडत नाही, असा श्री. निकाळजे यांनी प्रश्न विचारला असता, श्री. लल्लुभाई सामळदास यांनी सरकारतर्फे उत्तर दिले की याची सरकारला जरुरी भासत नाही. (Vol. XV, pp. 104.)

दि. १४-८-१९२५ : प्रत्येक गावातील महार कामगारांची कमीत कमी अशी जरूर तेवढीच संख्या मुक्रर करण्यात यावी आणि प्रत्येकाला दरमहा १५ रुपये पगार ठरवावा, त्याचप्रमाणे महारांच्या वतनी जमिनीला कर माफ असावा, अशा अर्थाचा ठराव श्री. निकाळजे यांनी मांडला. त्यावर चर्चा झाली. (Vol. XV. pp. 1383-96) हा ठराव सरकारने मंजूर केला तर सरकारला ५० लाख रुपये खर्च येईल, असे दक्षिण भागाचे कमिशनर मि. ए. जे. माऊंटफोर्ड यांनी सांगितले. हा

खर्च मध्यभागात ७२ लाख रुपयांचा येईल, असे मध्यभागाचे कमिशनर मि. जी डब्ल्यू. हॅच यांनी सांगितले. महार हे फार शूर, बुद्धिमान व राजनिष्ठ आहेत, असे त्यांनी उद्‌गार काढले. महसूलमंत्री श्री. लल्लूभाई मेहता यांनी असे सांगितले की, सरकार महारांची स्थिती सुधारण्यासाठी शक्य ते प्रयत्न करीत आहे. या ठरावामुळे सरकारला फार खर्च करावा लागेल व त्यामानाने फलप्राप्ती फारशी होणार नाही. हा ठराव मतास टाकला तेव्हा १५ विरुद्ध ३४ मते पडली. श्री. निकाळजे यांनी ठराव परत घेतला.

दि. १५-८-१९२५ : अस्पृश्य वर्गातील काही लोकांत गावातील मृत गुरे ओढून नेण्याची व त्यांचे मांस खाण्याची जी वहिवाट चालू आहे ती सरकारने कायद्याने बंद करावी, असा श्री. निकाळजे यांनी ठराव मांडला. तेव्हा सरकारतर्फे मि. एल.जी माउंटफोर्ड यांनी असे उत्तर दिले की, या लोकांना मृतमांसाहार व मृत जनावरांची कातडी नको असतील तर सरकार या ठरावाचा विचार करील. या ठरावावर चर्चा झाली आणि श्री. निकाळजे यांनी ठराव परत घेतला. ( Vol.XV, pp. 1539—40 )

दि. ४-११-१९२५ : वतनदार महारांना त्यांच्या वतनी जमिनीमध्ये व इतर गावकीमध्ये किती अडचणी व त्रास सहन करावा लागतो ते पाहण्याकरिता व निवारण करण्यासाठी कोणते उपाय योजावेत याबद्दल चौकशी करण्याकरिता सरकारने एक समिती नेमावी; अशा अर्थाचा ठराव श्री. निकाळजे यांनी मांडला. त्यावर खूप चर्चा झाली. ( Vol. XVI, pp. 739—41 )

या चर्चेला सर चुनिलाल मेहता यांनी सरकारतर्फे असे उत्तर दिले की, महारांच्या अडचणी जेव्हा जेव्हा सरकारच्या नजरेस येतात किंवा आणल्या जातात तेव्हा तेव्हा प्रान्त ऑफिसर, कलेक्टर व कमिशनर त्यात लक्ष घालून योग्य ते उपाय योजतात. महारांच्या वतनी जमिनी त्यांच्यापासून कोणी हिरावून घेऊ नयेत याबद्दलही हे अधिकारी दक्षता पाळतात. तेव्हा सरकार वतनी महारांना योग्य ते संरक्षण देत असते. म्हणून या ठरावाची जरूरी नाही. श्री. निकाळजे यांनी ठराव परत घेतला.

अस्पृश्यांची प्रगती घडवून आणण्यासाठी सरकारी धोरण कोणत्या कोणत्या बाबतीत सहानुभूतीचे व अडवणुकीचे होते, हे वरील त्रोटक माहितीवरून कळून येईल.[१]



[१] : खैरमोडे, खंड-२, पृष्ठ ३४-३७.

# परिशिष्ट–२९

## वतन कायद्याच्या दुरुस्तीचें बिल

### महार वतनाच्या दृष्टीनें वतन कायद्यांत अवश्य असलेल्या सुधारणांची डॉ. आंबेडकर यांनी तयार केलेली योजना

१८७४ सालीं वंशपरंपरेच्या हुद्यासंबंधाचा कायदा (The Bombay Hereditary offices Act, 1874) पसार करण्यात आला. ह्याला ' सन १८७४ चा मुंबईचा ॲक्ट ३ रा ' (The Bombay Act No. III of 1874) असे म्हणतात. साधारण लोकांमध्ये ' वतनाचा कायदा ' या नावाने हा कायदा प्रसिद्ध आहे. या कायद्यामध्यें शेवटची सुधारणा १९२३ साली करण्यांत आली. त्या कायद्यांत महार वतनदारास लागू असणाऱ्या कलमांत आणखी सुधारणा होण्याची शक्यता आहे. त्याकरितां हा दुरुस्तीचा खर्डा तयार करण्यांत आला असून त्यांतील मुख्य सुधारणेची कलमें पुढील प्रमाणें आहेत :–

(१) १८७४ च्या कायद्यांत कलम ९ रक्कम १ मध्ये ' वहिवाटदाराचा मेहनताना म्हणून लावून दिलेलें असेल किंवा नसेल ' असे शब्द आहेत, त्या ठिकाणी पुढील शब्द घालण्यांत यावे :–

" एखाद्या वंशपरंपरेच्या हुद्यासंबंधाचीं कामें करणाऱ्याबद्दल मेहनताना देण्याकरितां लावून दिलेलें असेल. "

(२) सध्याच्या कायद्यांतील ९ कलमानंतर पुढील जादा मजकूर जोडण्यांत आला :–

" **९ अ रक्कम १.** एकाद्या वंशपरंपरेच्या हुद्यासंबंधाचीं कामें करण्याकरिता वहिवाटदाराचा मेहनताना म्हणून एकादे वतन किंवा त्यांचे कांही उत्पन्न लावून दिलेलें असेल व तीं कामें करून घेण्याची वहिवाट बंद झालेली नसेल आणि हा कायदा अमलांत येण्याच्या पूर्वी तसें वतन अगर त्याचा भाग अथवा त्याच्या उत्पन्नाचा भाग कोणत्याही ब्रिटीश कोर्टाच्या हुकुमाच्या अगर हुकुमनाम्याच्याअन्वयें, परंतु कलेक्टरच्या संमतीवांचून व रेव्हिन्यू रेकार्डस्मध्यें मालकाचें नांव बदलल्या खेरीज, त्या वतनाचा वतनदार नसलेल्या एकाद्या माणसाच्या मालकींत किंवा फायदेदार कबज्यांत गेला असेल तर तो दुमाला रद्द असल्याचें

कलेक्टरनें जाहीर करावें आणि तें वतन अथवा त्याचा भाग अगर त्याच्या उत्पन्नाचा भाग तशा हुकुमाच्या तारखेपासून त्याच्यावर पूर्वी ज्याचा हक्क होता त्या वतनदाराच्या मालकीचा व्हावा असा हुकूम देऊन त्या वतनाचें उत्पन्न वसूल करून तें वतनदाराला द्यावें.

**रक्कम २.**–वतनाचा असा भाग जर जमीन असेल तर त्याचा कब्जा कलेक्टरने वतनदाराला तबदील करून द्यावा.

तथापि, ज्या बिनवतनदार इसमाकडून कब्जा काढून घेतला असेल त्याला कलेक्टर हे नुकसानभरपाई देऊं शकतील. नुकसानभरपाई देतांना कलेक्टरनें ज्या जमिनीचा कब्जा तबदील करण्याचा हुकूम देण्यांत आला असेल त्या जमिनींत बिनवतनदार इसमानें किती खर्च करून सुधारणा केली याचाच मुख्यत्वेंकरून विचार करावा.

कलेक्टर जो निकाल देईल तो कोर्टाच्या हुकूमनाम्याप्रमाणें समजण्यांत यावा आणि ज्या कोणत्या दिवाणी कोर्टाच्या अव्वल हद्दीत ती जमीन असेल त्या दिवाणी कोर्टाला त्या हुकूमनाम्याची अंमलबजावणी करतां येईल. मात्र अशा हुकूमनाम्याच्या अंमलबजावणीच्या बाबतींत वतनदाराला त्या रकमेची फेड हप्त्याहप्त्यांनीं करण्याचा हक्क असे. ''

(३) सध्यांच्या कायद्याच्या १८ कलमाला पुढील पुस्त्या जोडण्यांत याव्यांत :–

पुस्ती १. '' तथापि, ऐनजिनसी ऐवज घेण्याचा हक्क ही ज्या वतनदाराची मिळकत असेल त्यानें त्या हक्काचें नक्त ऐवज घेण्याच्या हक्कांत रूपांतर करून घेण्यासाठी कलेक्टरला अर्ज केल्यास कलेक्टरनें नक्त ऐवज मिळण्याच्या हक्कांमध्ये त्याच्या हक्कांचें रुपांतर करून द्यावें, आणि तो नक्त ऐवज जमीनमहसुलाबरोबर व जमीनमहसुलाचाच एक भाग म्हणून वसूल करण्यासाठी हुकूम द्यावा व तो सरकारी तिजोरीमधून हक्कदार व वतनदाराला देण्यांत यावा. ''

पुस्ती २. अशा रितीनें ज्या वतनदाराच्या हक्काचें नक्त ऐवजांत रूपांतर केलेलें असेल त्यानें या नक्त ऐवजांपैकी सरकारच्या नोकरीचा मोबदला म्हणून किती, तें जाहीर करण्यांत यावें, असा अर्ज कलेक्टरला केला तर कलेक्टरनें तसें जाहीर केलें पाहिजे.

पुस्ती ३. ज्या वतनदारानें वरीलप्रमाणें कलेक्टरनें जाहीर करण्याबद्दल मागणी केली असेल त्याला रयतेची चालू वहिवाटीची नोकरी करण्याचे नाकारण्याची मुभा राहील, आणि तसें त्यानें नाकारलें तर त्याच्या नोकरीचा मोबदला म्हणून नक्त ऐवजापैकीं जो भाग त्याला एरव्हीं द्यावयाचा तो वसूल करण्यांत येऊं नये किंवा त्याला अदा करूं नये.

(४) सध्यांच्या कायद्याचें कलम १५ रकम १ ला पुढील पुस्ती जोडण्यांत यावी :-

" तथापि, कनिष्ठ धारण करणाऱ्या गांवकी संबंधीच्या या कायद्याच्या ६३ कलमामध्यें अंतर्भूत होणाऱ्या एकाद्या वतनदारानें, आपल्या हुद्यासंबंधीचीं कामें करण्याबद्दल मेहनताना म्हणून त्यांच्या कबजांत वतनजमिनी असल्यास कलेक्टराला लेखी कामें करण्याच्या इच्छा दर्शविल्यास त्याला तशीं कामें करण्याच्या जबाबदारींतून कायमचें मोकळें करण्यात यावें आणि त्यानें तशा जमिनीवरील मामुलजुडी देण्याचें कबूल केल्यास त्या जमिनी आपल्या कबज्यांत ठेवण्याचा त्याला हक्क असावा. "

(५) कलम ८३ च्या जागीं खालील कलम घालण्यांत यावें :-

" ८३. हा कायदा पसार केल्यावर कलम १८ मध्यें निराळ्या प्रकारची तजवीज केली असेल तर तेवढा अपवाद ठेवून, कोणत्या वंशपरंपरागत हुद्यासंबंधीं कोणतीं कामें करावयाचीं तें निश्चित करणारे नियम सरकारनें तयार करावेत. मात्र अशा रितीनें केलेले नियम आणि त्यांमध्यें मागाहून करण्यांत आलेले फेरफार हे ते कायदेकौन्सिलच्या टेबलावर सभासदांच्या माहितीकरितां व कोणाला काहीं आक्षेप घ्यावयाचा असेल तर तसें करण्यास संधि मिळावी, याकरितां कमींत कमी पंधरा दिवस ठेवल्याशिवाय अमलांत येऊं नयेत. "



---

बहिष्कृत भारत : ता. ३० सप्टेंबर १९२७.

# परिशिष्ट–३०

## शुद्धीकरणाचें ढोंग

रा. रा. बहिष्कृत भारतकर्ते यास :—

नुकतेंच जुलै महिन्यांत शुद्ध करून घेण्यांत आलेले श्री. सदाशिवराव नायडू पुन्हा ता. ९-१०-२७ रोजीं सॅम्युअल नायडू (ख्रिश्चन) झाले. शुद्धी करून घेण्याचे पूर्वीपासून माझा आणि त्यांचा दाट परिचय होता. हिंदु समाजांत आम्हांस जें स्थान आहे त्याहून उच्च दर्जा ह्या शुद्धीकृतांना मिळूं शकेल. पण त्याहून अधिक अपेक्षा त्यांनी धरूं नये असे मीं त्यांना आरंभींच बजावले होते. तरी पण ते इतरांच्या भुलथापांना फसून जाऊन शुद्ध झाले व पुन्हां निराश होऊन माफी मागत होते तसे ख्रिश्चन झाले. त्यांची अशी आशा होती कीं, त्यांची जात पुन्हां त्यांना आपल्या जातींत मिसळून घेईल. हिंदु धर्माचे शास्त्रीपंडित त्यांना हिंदू धर्माचें ज्ञान करून देतील ; त्यांना हिंदु धर्माचीं देवळें मोकळीं रहातील व **रोटी-बेटी-लोटी** व्यवहाराच्या बाबतींत त्याना बरीच मुभा मिळेल. आरंभी ८/४ दिवस तसें घडलेंही, पण शुद्ध झाल्यानंतर हिंदु लोकही त्यांना जवळ करीनातसे झाले व ख्रिश्चन मित्रांनींही दूर लोटलें. अशा विचित्रावस्थेंत त्यांनीं २/३ महिने घालविले व हल्लीं ते पुन्हां ख्रिश्चन झाल्यामुळे ते आनंदांत आहेत.

ह्याप्रमाणें सोवळ्या हिंदु सभेच्या शुद्धीकरणाचें ढोंग उघड झालें. जोंपर्यंत ७ कोट अस्सल हिंदूंना अस्पृश्य मानून त्यांच्याशीं कोणताच व्यवहार करण्यांत येत नाही. व स्पृश्य हिंदूंतही अनेक जातीं असून त्यांचेंमध्यें रोटी-बेटी-लोटी बंदी असल्यामुळें खुल्या दिलानें व्यवहार होत नाहीं तोंपर्यंत बाटग्या शुद्धीकृत लोकांची अशीच गत व्हावयाची. आधीं संघटण व मग शुद्धी असेंच घडलें पाहिजे. दोन्ही एकाच वेळीं चालू शकणार नाहींत. हिंदु समाजांत प्रथम ख्रिश्चन, मुसलमान समाजाप्रमाणें समता उत्पन्न झाली पाहिजे. जोंपर्यंत समता उत्पन्न झाली नाहीं तोंपर्यंत तबलीघ व मिशनरी चळवळीस तोंड देऊ पहाणें मूर्खपणाचे होय. श्री. नायडूंच्या वरील उदाहरणावरून शुद्धी चळवळवाले प्रथम अस्पृश्यतानिवारण, जातिभेदविध्वंसन वगैरे उपायांनी संघटण करण्याचे मार्गास लागतील काय ? जोंपर्यत ते तसें करणार नाहींत तोंपर्यंत त्यांच्या शुद्धी चळवळीचें हंसें झाल्यांशिवाय

राहणार नाहीं व नाहक मिशनरी तबलीघ व त्यांची स्पर्धा मात्र वाढेल. पण हा सुविचार लक्षांत येण्यास स्वतःच्या उच्चपणाची घमेंडच आड येते त्याला करावें काय !

आपला,

**पांडुरंग नाथुजी राजभोज,**

२११, घोरपडे पेठ, पुणें.

## शुद्धिसमारंभ व ब्राह्मणेतरांचे कर्तव्य

रा. रा. बहिष्कृत संपादक यांस स. न. वि. वि. कृपा करून चार शब्द लिहिण्यास आपल्या पत्रांत जागा मिळेल अशी विनंति आहे.

नागपूर महाराजबाग जवळील धरमपेठ येथें बुधवार तारीख १९-१०-२७ रोजीं सकाळीं ८ वाजतां मारुतीच्या देवळांत येथील शेतकी कॉलेजांतील एक डिमॉनस्ट्रेटर, श्रीयुत एन. के. विश्वास यांना परत हिंदु धर्मात शुद्ध करून घेण्यांत आलें. त्यावेळीं अस्पृश्यता निवारणासंबंधानें डॉ. मुंजे यांचें भाषण झालें. मि. विश्वास हे हिंदी ख्रिस्ती होते, व त्यापूर्वी ते महार जातींतील होते. हिंदु धर्मांत परत आल्यावर ते पुन्हां महारच जातीचे झाले. अर्थात त्यांना व इतर महारांना देवळांत येण्याची आतां मोकळीक आहे कीं नाही ? असा डॉ. मुंजे यांना कांहीं महार मंडळीनीं सभेंत प्रश्न विचारला. व डॉ. मुंजे यांनी हरकत नाहीं असें सांगितलें. त्यानंतर तीन चार महार मंडळी नारळ घेऊन तेथील एका देवालयांत गेली व त्यांना कोणी हरकत घेतली नाहीं. त्यांनी देवांपुढें नारळ ठेवून नमस्कार केला . . . . दुसऱ्या दिवशीं सकाळी आणखी कांहीं महार मंडळी पूजेचें साहित्य व काकड आरतीचीं दिंडी घेऊन त्याच देवळांत जाऊं लागली, तेव्हां ब्राह्मणेतरांनी त्यांना प्रतिबंध केला, व एका महाराच्या हातांतील पूजेचें साहित्यहि विसकटून टाकण्यांत आलें. तंटा वाढण्याचा रंग दिसू लागतांच पोलिसांना खबर मिळाल्यामुळें पोलीस अधिकारी, पोलीस तुकडीसह त्या ठिकाणीं गेले, व त्यांनीं शांतताभंग न होऊं देण्याची तजवीज केली.

पोलीस बंदोबस्त वेळेवर झाला नसता तर महार आणि ब्राह्मणेतर यांच्यांत मारामारी होऊन एकमेकांचीं डोकीं फुटेपर्यंत पाळी आली असती, असें म्हणण्यास हरकत नाही. अस्पृश्य गणलेल्या वर्गात महार समाज हा जास्त जागृत झालेला व होत चाललेला आहे. व त्यांना पुरातन रूढीच्या स्थितींत दाबून ठेवणें, सध्या

सुधारणेच्या काळांत अस्पृश्यवर्ग कबूल करणार नाहीं. हें ब्राह्मणेतर वर्गांनीं लक्षात ठेवावें. नागपुरांत नांवानें लौकिकास आलेल्या "ब्राह्मणेतर संघाने" व त्याच्या पुरस्कर्त्यांनीं वेळींच सावध होऊन, ब्राह्मणेतरांतील अशिक्षित व अडाणी लोकांना जागृत करण्यास कर्तव्य बजावतील अशी आशा आहे.

अस्पृश्यता निवारण करण्यास जसा ब्राह्मण समाज तयार आहे, तसा ब्राह्मणेतर नाहीं. त्याचें कारण ब्राह्मणेतरांतील रानटीपणा हेंच होय.

आपला नम्र,

**धर्मदास मारुती नगरारे,**

इमामवाडा पेठ, नागपूर.

तारीख २७-१०-१९२७.

●●●

बहिष्कृत भारत : ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# परिशिष्ट–३१

## अस्पृश्य स्वच्छतेने राहतात हाच त्यांचा अपराध

### अस्पृश्यलोक परधर्म स्वीकारणार

रा. रा. दत्तात्रय रामचंद्र रारावीकर, अकोला यांस बि. बि. आठवले, अस्पृश्य समासेवक दहिदांडा यांजकडून विनंति मी कीं, मागे लासूर, ता. दर्यापूर येथील महार लोकांचा अर्ज ख्रिस्ती होणार आहेत म्हणून पाठविला होता. त्याची चौकशी अद्याप झाली नाहीं. लासूर येथील स्पृश्य हिंदूंनीं महारांस तकलीब देण्याचा ठराव केला म्हणून पुन्हा लासूरकर महार लोकांनी मला लिहिलें आहे. आमचे लोक शुद्धतेनें राहतात म्हणून स्पृश्य हिंदू असा जुलूम करितात. पण ते जर ख्रिस्ती बनले तर सर्व चाळे बंद पडतात. आपण आमच्या समाजाचे हितार्थ झटतां म्हणून आपणाकडे मी विनंती करितों कीं, लासूर मुक्कामीं होत असलेला अत्याचार दूर होण्याबद्दल व्यवस्था करा. लवकर व्यवस्था न झाल्यास व त्या लोकांनी जर परधर्म स्वीकारला तर माझेकडे कोणत्याही प्रकारें बोल राहणार नाहीं. माझेवर सुद्धां अशा प्रकारें अडचणी आल्या होत्या त्या मीं सहन केल्या. पोळ्याचे दिवशी पोलीस सब-इन्स्पेक्टरनें धोक्यानें मला कोंडून मारलें व अस्पृश्य जनतेचे सुधारणेंत आडकाठी आणली. दहिदांडा मुक्कामीं होत असलेल्या अस्पृश्य चळवळीस ही मोठी जबर जखम झाली आहे. मी प्रजापक्षाचे ता. २१-८-२७ चे अंकांत 'दाद लागेल काय' या मथळ्याखालीं लेख दिला म्हणून मला धोक्यानें स्टेशनमध्यें बोलावून मारलें. तेव्हां मी संपादक प्रजापक्ष यांचेकडे मोगलाई कीं आंग्लाई या सदराखालीं लेख प्रसिद्धीला पाठविला तो अद्याप प्रसिद्ध झाला नाहीं. काय गोम आहे हें समजत नाहीं. आपण मुंबईस जाणार आहांत असें समजल्यावरून आमचे खंबीर पुढारी रा. रा. डॉक्टर आंबेडकर यांना ही हकीकत कळवावी व सविस्तर माझे संबंधी हकीकत सांगून बहिष्कृत भारत नांवाचे पत्राचा मला वर्गणीदार बनविण्यास सूचना द्यावी. डाक्टर साहेब सर्व व्यवस्था करतील अशी आशा जाणून आपले मार्फत विनंती केली आहे. आपलें लक्ष आमचे समाजाची उन्नति करण्याकडे असून आमचेबद्दल आपण निर्भिडपणें कामगिरी करितां हा आमचे अस्पृश्य समाजावर आपला मोठा उपकार आहे. अशा प्रकारें काम करणारे निर्भिड महात्मे आमचे हिंदु धर्मात निपजोत अशी परमेश्वराजवळ विनंती आहे. कळावें, ता. २२-९-२७.

आपला,

**बळिराम भिवसन आठवले,**

महार समाजसेवक हिंदु दहिदांडा.

# आम्हांस मुसलमानी धर्मात घ्या

मे. अजमत मिया जहागीरदार साहेब बाळापूर यांजकडेस, विनंति कीं,. —आपण मुसलमानी धर्मांचे खरे जाणीक आहां असें पूर्ण समजल्यामुळें, मी एक बेधर्मी विनंति करतों की, मी हिंदु हिंदू म्हणून आजपर्यंत ओरड करीत होतें हें सर्व चूक आहे. असा अनुभवं आला. हिंदु धर्मांत उच्चनीचपणाची मूर्ख चाल नांदित आहे ; त्यामुळे मला माझा धर्म कोणता हे कळलें नाहीं. हिंदू म्हणावें तर जनावरापेक्षां नीच मानितात त्यामुळें हिंदुधर्म गलिच्छ दिसतो. ज्या धर्मात समतोलत्व नांदतें. तो धर्म मोठाच आहे अशी मागील इतिहास साक्ष देतो. पहिल्यापासून मुसलमानीं धर्माचें संशोधन केलें तर असें दिसून येतें कीं, आमचा अस्पृश्य समाज खरोखर मुसलमानी धर्माचा वंशज आहे. परंतु हिंदु लोकांतील काफर पुरुषांनीं अस्पृश्यांस भुलथाप देऊन आपल्या हिंदु धर्मांत ओढून, त्यांना निर्बुद्ध केलें आहे. एवढें मोठें घोर पाप हिंदु धर्म करीत आहे. आजकाल मुसलमानी धर्मांतून जे लोक हिंदुधर्म स्विकारीत आहेत ते खरोखर पापी आहेत. मुसलमानी धर्मांत समाज जागृती कमी आहे, म्हणूनच हिंदूधर्मांत भर पडत चालली आहे. आपण जर अशा आणीबाणीच्या वेळेस जाहीर रितींने एखाद्या अस्पृश्य मानलेल्या हिंदुस मुसलमानी धर्माची माहिती दिली नाहीं, तर अस्पृश्य हिंदूचे अस्पृश्यत्व दूर होणार नाहीं. तरी मला आपल्या धर्मांचीं तत्वें समाजावून देण्याकरितां आपले अध्यक्षतेखाली सभा भरवून मुसलमान बनविल्यास मी परमेश्वराजवळ आपले गूण सदोदीत गाईन ; व अशा प्रकारें आमचा अस्पृश्य मानलेला समाज मुसलमानी धर्मांत आणण्याचा प्रयत्न करीन. तरी या संबंधी आपलें मत व्यक्त करण्याबद्दल माझी विनंती आहे. कळावें हे विनंति ता. ४-८-१९२७.

आपला,

**सूर्यभान भिवसन महार,**

दहिहांडा., ता. अकोट*

सं. ब. भा—वरील दोन्ही पत्रें आमच्याकडे रा. रारावीकर यांच्यातर्फे प्रसीद्धिकरितां आली आहेत.



*जिल्हा अकोला (महाराष्ट्र)
बहिष्कृत भारत : ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# परिशिष्ट–३२
## राष्ट्रवीरावर नोटीस

श्रीयुत

**संपादक बहिष्कृत भारत यांसी—**

कृ. सा. ना. वि. वि.

राष्ट्रवीर पत्राच्या ता. ३० ऑगस्ट १९२७ च्या अंकांतील 'ब्राह्मण्य ठार मारिलें पाहिजे' व ता. १३ सप्टेंबर १९२७ च्या अंकांतल्या 'हा घ्या पुरावा' या स्फुटामधील **'पौरुष्यही हिसकावून घेतलें आहे'** हे दोन वाक्यप्रयोग इतःपर उपयोगांत न आणण्याबद्दल बेळगांवचे डि. मॅजिस्ट्रेट मि. मॉंटिथ यांनीं आम्हांस ताकीद दिली आहे. उपरोक्त दोनही लेखांचे उतारे आपल्या महितीसाठीं या लगत ठेविले आहेत. यावरून सदरहू ताकीद कशी अयोग्य व वर्तमानपत्राच्या स्वातंत्र्यावर गदा आणणारी आहे, हें आपल्या ध्यानीं येईलच. यास्तव असली अन्याय्य ताकीद मागें घेण्यास सरकारला भाग पाडणें हें आपलें कर्तव्य आहे. तरी हें कर्तव्य बजावून आपण व्यवहारबंधुत्व सांभाळाल, अशी मी आशा करितों. कळावें, लोभ असावा हि विनंती.

बेळगांव
ता. १२-१०-२७

**शामराव गोविंदराव देसाई**
संपादक–राष्ट्रवीर.

●●●

---

बहिष्कृत भारत : ता. ४ नोव्हेंबर १९२७.

# परिशिष्ट–३३

## राजर्षी छत्रपती शाहू

अस्पृश्यांच्या प्रगतीसाठी आणि त्यांची चळवळ विस्तृत करण्यासाठी ज्या वरिष्ठवर्गीय लोकांनी मनापासून प्रयत्न केले, त्यात कोल्हापूरचे राजर्षी श्रीछत्रपती शाहू महाराज हे अग्रगण्य होते. एवढेच नव्हे तर, महाराष्ट्रातील अस्पृश्यांच्या चळवळीस व्यापक व चिरायु स्वरूप जर कोणी दिले असेल, तर ते राजर्षींनी होय. राजर्षीचा जन्म ता. २६ जुलै १८७४ ला झाला. कोल्हापूर संस्थानच्या महाराणी आनंदीबाईसाहेब यांनी १७ मार्च १८८४ ला त्यांना दत्तक घेतले. ता. २ एप्रिल १८९४ ला ते गादीवर स्थानापन्न झाले. तेव्हा त्यांना आश्चर्याने थक्क करणारे व दुःखाने व्याकूळ करणारे असे जर कोणते दृश्य दिसले असेल तर ते म्हणजे संस्थानाच्या व स्थानिक स्वराज्याच्या खात्यांचा ब्राह्मण जातींच्या लोकांच्या हातून अनियंत्रितपणे चाललेला कारभार. ब्राह्मणेतर जातींतील लोक बोटांवर मोजण्याइतकेच होते. याचे कारण काय व ते कारण कसे दूर करावे याबद्दलचे विचार छत्रपतींच्या डोक्यांत एकसारखे घोळू लागले. ब्राह्मण जातीत शिक्षणप्रसार बराच झालेला होता. शिवाय पेशव्यांच्या कारकीर्दीपासून राज्यकारभाराच्या खात्यात ब्राह्मणांचे अढळ स्थान परंपरेने कायम होऊन बसलेले होते. ब्राह्मणेंतर वर्गांमध्ये शिक्षणप्रसार झालेला नव्हता व राज्यकारभाराच्या खात्यांमध्ये त्यांचा प्रवेश झालेला नव्हता. जो काय प्रवेश झालेला होता तो शिपाई, भालदार, चोपदार म्हणून. विचारांती छत्रपतींनी मनात असे ठाम ठरविले की, ब्राह्मणेतरांच्या हातात अधिकारसूत्रे आणून द्यावयाची तर त्यासाठी त्यांच्यात शिक्षणप्रसार जारी करून सुशिक्षित लोक तयार करावयाचे व त्यांना अधिकाराच्या व इतर पदांवर नेमावयाचे व त्यासाठी बहुजन समाजात जागृतीची जोरदार चळवळ चालवावयाची. त्याप्रमाणे छत्रपतींनी संस्थानात दौरे काढून शिक्षण- प्रसाराची व लोकजागृतीची चळवळ धुमधडाक्याने चालू केली.

ब्राह्मणेतर जातीतील हुशार विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देणे व ठिकठिकाणी वसतिगृहे चालू करून ती स्वतःच्या द्रव्यसाहाय्याने चालविणे हे भरीव कार्य छत्रपतींनी हाती घेतले. महार, मांग, ढोर, चांभार, मराठे, शिंपी, न्हावी, मुसलमान इत्यादी जातींतील मुले शिकून तयार झाल्यानंतर त्यांना संस्थानच्या निरनिराळ्या खात्यांमध्ये छत्रपतींने नेमले. काहींना वकिलांच्या सनदा दिल्या. याकरिता त्यांनी १९०२ पासून संस्थानातील अर्ध्या जागा मागासलेल्या

जातीकरिता राखून ठेवल्या. यामुळे नोकऱ्यांची मिरासदारी भोगत असलेल्या ब्राह्मणांना संस्थानांत नोकऱ्या मिळणे अशक्य झाले. शिवाय ब्राह्मणेतर समाजात स्वहक्काची जाणीव झाल्यामुळे दररोजच्या व्यवहारात आतापर्यंत असलेला ब्राह्मणांचा वरचष्मा कमी होऊ लागला. परिणामी ब्राह्मण छत्रपतींना शत्रू समजू लागले.

१९०० सालच्या कार्तिकी एकादशीच्या दिवशी महाराज सहपरिवार सुर्योदयापूर्वी पंचगंगेच्या स्थानास गेले, तेव्हा त्यांचा राजोपाध्ये उशिरा आला. महाराजांनी त्याला प्रथम स्नान करण्यास सांगितले तेव्हा तो म्हणाला, " मला थंडीमुळे पाणी गार लागते, शिवाय मला पुराणोक्त मंत्र म्हणावयाचे आहेत, तेव्हा मला शुचिर्भूत होण्याचे कारण नाही. " यावर महाराज संतापले व त्याला म्हणाले, " आम्ही स्नान करण्याच्या अगोदर तू स्नान करून तयार राहून आमच्या स्नानाच्या वेळी वेदोक्त मंत्र इतकी वर्षे म्हणत असे आणि आताच तुला हे काय वेड लागले ? " यावर ब्राह्मण म्हणाला, " महाराज, तुम्ही राजे असला तरी, शूद्र आहात व तुम्हाला वेदोक्त मंत्र ऐकण्याचा अधिकार नाही. तुम्ही फक्त पुराणोक्त मंत्र ऐकावेत व ते मी शुचिर्भूत न होता म्हणालो तरी त्याला शास्त्राची आडकाठी नाही. " राजोपाध्ये याची ही गर्विष्ठ चर्पटपंजरी ऐकून महाराज संतापाने थरथर कापू लागले. त्यांनी हिंदू धर्माचा त्याग करून आर्य धर्माचा स्वीकार केला.

वरील उदाहरण व इतर उदाहरणे लक्षात घेऊन वैदिक काळापासून आतापर्यंत ब्राह्मणांनी ब्राह्मणेतरांना धार्मिक बंधनांनी कसे जखडून टाकले व ती बंधने दूर करणे कसे आवश्यक आहे, याची महाराजांना पुरेपुर जाणीव पटली. याकरिता त्यांनी ' ११ जानेवारी १९११ रोजी ' महात्मा फुले यांच्या सत्यशोधक समाजाचे पुनरूज्जीवन केले. याच चळवळीतून पुढे सत्यशोधक तमासे निघाले. या विविध चळवळींना महाराज सढळ हातांनी द्रव्य देत असत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी त्यांचा १९१७ साली परिचय झाला. "त्यांनी डॉ. आंबेडकरांना ' मूकनायक ' पाक्षिक चालविण्याकरिता अडीच हजाराचा चेक दिला आणि हे पाक्षिक ३१ जानेवारी १९२० पासून सुरू केले. "[१]

डॉ. आंबेडकर करीत असलेल्या समाजोन्नतीच्या कार्याबद्दल माणगाव येथील २१/२२मार्च १९२० च्या परिषदेत आपल्या भावना व्यक्त करताना शाहू महाराज म्हणतात, " माझ्या राज्यातील बहिष्कृत प्रजाजनांनो, तुम्ही तुमचा खरा पुढारी

---

[१] : खैरमोडे, खंड-१, पृ. २२९-३३३.

शोधून काढला ह्याबद्दल मी तुमचे अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतो. माझी खात्री आहे की, डॉ. आंबेडकर हे तुमचा उद्धार केल्याशिवाय राहणार नाहीत. इतकेच नव्हे तर अशी एकवेळ येईल की, ते सर्व हिंदुस्थानचे पुढारी होतील, अशी माझी मनोदेवता मला सांगते. "[१]

स्त्रियांना क्रूरपणे वागविले जावू नये म्हणून त्यांनी कायदे केले. त्यातील "The Kolhapur State Divorce Act of 1919" हा प्रमुख होय. जर अस्पृश्यांना समतेने वागविले नाही तर प्रिन्सिपाल अगर खालच्या दर्जाच्या शिक्षक असो त्याला जाब द्यावा लागेल आणि खाजगी संस्थांना जी मदत मिळते ती काढून घेण्यात येईल असा आदेश ता. २३ आगस्ट १९१९ रोजी जारी केला.

'मानवी जीवनाविषयी अत्यंत सहानुभूती' हे शाहूंचे ब्रीदवाक्य होते.

'हिंदी राष्ट्राची स्थापना करण्यासाठी ब्राह्मणशाहीचा नायनाट करा' अशी त्यांची क्रांतिकारी घोषणा होती.

" शाहूंनी आपल्या दिव्य चक्षूंनी स्वातंत्र्य, समता, बंधुता व बुद्धिप्रामाण्य यांवर अधिष्ठित अशी नवीन प्रकारची समाजरचना भारतात स्थापना केल्या जाईल असे दृश्य पाहिले. कामगारांना अधिकार प्राप्ती झाली पाहिजे, अस्पृश्यतेचे निर्मूलन झाले पाहिजे, सामान्य मनुष्याचा ऐहिक दर्जा वाढला पाहिजे हे त्यांचे तत्त्वज्ञान भारताच्या राज्य घटनेत सामाजिक व आर्थिक लोकशाही स्थापण्याच्या ध्येयात समाविष्ट झालेले आहे. ते घटनेच्या मार्गदर्शक तत्त्वांशी निगडीत झालेले आहे. "[२]

महाराजांचे दिनांक ६ मे १९२२ रोजी मुंबईतील पन्हाळा लॉज, खेतवाडी येथे अकाली निधन झाले.

●●●

---

१ : खंड १८, भाग-१, पृ. ४.

२ : कीर, राजर्षी शाहू छत्रपती, पृ. ४३७, ५३२, ५३४, ५३६.

# परिशिष्ट–३४

## श्रीमन्महाराज छत्रपति साहेब सरकार करवीर यांचे सेवेशी

आज्ञाधारक सेवक समस्त वतनदार महार लोक रा. बस्तवाड, पेटा रायबाग, इ. करवीर यांचा नम्र अर्ज खालीं लिहिलेप्रमाणे :–

आम्हां महारलोकांस हिंदु समाजांतील आचारविचारांनीं, दुष्ट चालीरीतींनी आणि बंधनांनी अस्पृश्य ठरवून टाकलें ; आणि बहिष्कृत करून गांवाबाहेर राहणेस भाग पाडलें, यामुळें आमची सर्वतोपरी अत्यंत हानी झाली आहे. इतर सर्व समाजांत अनेक प्रकारें ज्ञानवृद्धी होत आहे. त्यांची सुधारणा चालू आहे. परंतु आम्ही मात्र सुधारणेस मुकलों व सुखास पारखे झालों ! आमच्यांत मनुष्यपणासुद्धां राहिला नाहीं. आम्ही अति निकृष्ट स्थितीस पोंचलों.

श्रीमन्महाराज छत्रपतींनीं आम्हांस ऊर्जित दशेस आणावें आणि आमची सुधारणा करावी म्हणून अनेक मार्गांनीं प्रयत्न चालविले आहेत ; आमचेसाठीं बोर्डिंगें काढलीं ; विद्या मंदिरें खुली केलीं ; कित्येकांना नोकऱ्या दिल्या ; आणि कांहींचा वकिलीसारख्या उच्च धंद्यांतही प्रवेश करविला आणि स्पृश्यास्पृश्यतेचा भेद बाजूस ठेवून सरकारांनी आम्हांस मुलाप्रमाणे ममतेनें वागविलें ! याबद्दल आमचा समाज हुजूरांस देवाप्रमाणें पूज्य मानीत आहे. आणि या औदार्याबद्दल पिढ्यानुपिढ्या हा समाज हुजूर चरणांचा ऋणी राहील !!

इतकें झालें तरी, आमच्या समाजाचे लोकसंख्येकडे दृष्टी दिली म्हणजे मन निराश होतें ! आणि काय करावें, तें सुचत नाही ! झालेली सुधारणा कांहींच नव्हे, असे वाटू लागतें !

हिंदु समाजांत वतनाची आवड फार. परंतु आमचें वतन व आमची वतनी नोकरी यांत आम्हांस भूषण वाटण्यासारखें कांहींच नाहीं. परंतु अंध परंपरेने नरकांतल्या किड्याप्रमाणें असलेही वतन आम्हांस प्रिय वाटत आहे ! या क्षुद्र वतनी नोकरींतून आम्हांस मुक्त करावें म्हणून हुजुरने एक वट हुकूम काढला आणि ठरविलें कीं १० एकर जमिनी मागे एक महार नोकर सरकारांनी घ्यावा. आणि बाकी सर्व महारांना नोकरीतून कमी करावें. परंतु या हुकमाने इष्ट हेतु साध्य होत नाहीं. कारण हल्लीं इतर सर्व महारांच्या कबज्यातील जमिनी जाणार आणि ते असंतुष्ट होणार. दुसरें सर्व जमिनी थोड्याशा महार लोकांत वाटल्या जाऊन

पुन्हां वतनी नोकरीचें जूं त्यांचे मागे राहणारच ! या क्षुद्र वतनी नोकरीचें लोढणें आमच्या गळ्यांत असेपर्यंत आमची दशा सुधारणे शक्य नाहीं. करितां ही वतनी नोकरीच अजिबात काढून टाकावी असें आमचें म्हणणे आहे.

सरकारांस आमची नम्र सूचना खालीं लिहिलेप्रमाणे :–

आजवर जमिनी ज्याजकडे जशा चालत आल्या आहेत ; तशाच त्याजकडे चालू ठेवाव्यात. कबजाची दिगरादिगर अगर फेरफार करूं नये. फक्त सर्व महारकी वतन ९ नंबराचे इनामपत्रकांतून काढून नमुना नंबर ५ च्या रयताव्यांत दाखल कराव्यात आणि दुसरी गोष्ट सर्व महार लोकांना वतनी नोकरींतून मुक्त करावें. सरकारची अगर रयतेची कसलीही वतनी नोकरीची जबाबदारी त्यांचेवर ठेवू नये.

या योगानें आम्हांस कांहींशी स्वतंत्रता मिळेल; इतर धंदे करण्यास चार पैसे मिळून सवडही होईल. यांत कोणाचें नुकसान नाहीं. अर्थातच असंतोषही नाहीं. आमची वतनी नोकरी म्हणजे गांवची वेठ बिगार करणे, लांकडे फोडणें, जनावरांची प्रेत वाहणें, आणि गांवचीं गलिच्छ कामें करणें. हीं कामें वतन कारणानें म्हणून आमचेवर लादली आहेत, तोपर्यंत आम्ही तसेच क्षुद्र राहणार. ती नोकरी नाहींशी झाली म्हणजे आम्हांस धंदेस्वातंत्र्य मिळेल. आणि निर्वाहाचे इतर उद्योग करतां येतील. आणि आमचेवरील क्षुद्रपणाचा आणि त्याबरोबर अस्पृश्यत्वाचाही डाग क्रमाक्रमानें नाहींसा होत जाईल.

आतां सरकारच्या नोकरीचा प्रश्न राहिला. त्यांचें उत्तर सोपें आहे. आमच्या जमिनी निवळ रयतावा झाल्यानें त्यांचा जो सारा सरकारांत जमा होईल; त्यांतून जरूरीप्रमाणें अवश्य तितके नोकर ठेवण्यास आणि वाटेल त्यांजकडून पैसा देऊन काम करून घेण्यास सरकारांस कांहीच अडचण नाहीं.

करिता सरकारपाशीं आमची प्रार्थना आहे कीं, आमचीं सर्व महारकी वतनें इनामांतून कमी करून रयताव्यांत दाखल करावींत. आणि सर्व महारांना वतनी नोकरींतून मुक्त करावेत. सेवेशी श्रुत होय ही विज्ञापना.

तारीख २७।७।१९२१ ई.
महार लोकांच्या सह्या

हु. ऑ. नं. १६३
राव. सा. हुजूर चिटणीस यासी
आज्ञा केली ऐसीजे–

ह्या महार लोकांनी आपखुषीने इनाम जमीन रयतावा करून मिळणेंबद्दल केलेला अर्ज हुजूर पसंत आहे. या लोकांना गुलामगिरींतून मुक्त करण्यास इनाम जमीन

रयतावा करून देणें हाच मार्ग उत्तम आहे. करितां सदर गांवच्या महारकी इनाम जमिनी इनामांतून कमी करून रैताव्यांत दाखल कराव्यात. सदर जमिनीवर कांही बाबी वगैरे बसलेल्या असल्यास त्या सर्व कमी करण्यात येत आहेत. या हुकमाचे आधारें महारांना रयताव्याचें पूर्ण हक्क देण्यात येत आहेत. त्यांच्याकडून कोणतीहीं नोकरी घेणेची नाहीं. ही आर्डर कोणत्याही ऑफिसांत तीन दिवसापेक्षां जास्त दिवस राहतां कामा नये. मामलेदार यांनी ऑर्डरचा अंमल केल्याबद्दल तात्काल रिपोर्ट करावा. जमीन ज्याचे ज्याचे ताब्यात आहे त्याचे त्याचेच ताब्यांत राहणेची आहे. कोणत्याही प्रकारें कबजा तबदील करणेचा नाही. कळावें.

रजपुतवाडी क्यांप सही—

ता. ५।८।१९२१ **शाहु छत्रपति**

## रावसाहेब हुजूर चिटणीस यांसी
## आज्ञा केली ऐसीजे

ज्या महार लोकांनी आपलीं वतनें रयताव्यांत दाखल करावींत म्हणून अर्ज केला असेल त्यांच्याकडून अर्जाच्या तारखेपासून नोकरी घेणेची नाहीं, त्यांचा वेठवरळा माफ करणेंत यावा. तराळ घस्त लोकांना वेठवरळा सांगणेचें नाही ; जर कोणी आपले मनगटाचे जोरावर सदर लोकांना वेठवरळा करणेस लावतील तर त्यांना नोकरींतून पेन्शन न देतां कमी केलें जाईल ; व वतनदार असलेस त्यास वतनांतूनही कमी केलें जाईल. याची दखलगिरी प्रत्येक गांवकामगारास द्यावी. याप्रमाणें जरूर तजवीज करावीं. कळावें.

शिरोळ क्यांप

ता. १५।७।१९२१ इ. **शाहु छत्रपति**

पहिल्यानें महार लोकांनीं वतनांचे राजीनामे दिले असतां पूर्वपरंपरेस अनुसरून कित्येक गांव कामगार व सरकारी नोकर महारांना जुलमाने कामें सांगत असत व वेठबिगार करवून घेत असत. म्हणून वरील ऑर्डर देणे हुजुरांस भाग पडलें. सदर हुकमाच्या छापील प्रति सर्व महार लोकांस मिळतील अशी तजवीज करणेत आली होती. सबब अवलोकनार्थ सदर फार्म पाठविला आहे.

**ब. ना. शिंगे**

●●●

---

बहिष्कृत भारत : ता. ४ नोव्हेंबर १९२७

# परिशिष्ट–३५

## .... अशा वेळी ब्राह्मणेतरांनी विरोध करावा शरमेची गोष्ट

**ब्राह्मण जोडणेशाहीच्या एकतर्फी निवडणूकीच्या दुराग्रहामुळें सभेंत विरोध उत्पन्न होऊन सभा उधळली.**

रा. रा. बहिष्कृत भारत कर्ते यांस :—

तारीख १७ नोव्हेंबर १९२७ रोजीं सायंकाळी ५ वाजतां येथील श्री. वीरेश्वराचे देवालयांत अखिल नागरीकांची सभा भरविण्याविषयीं सकाळी गुरवाकडून सर्वांना कळविण्यांत आलें होतें. ता. २६-१२-२७ रोजीं अस्पृश्य लोक येथील चवदार तळ्यावर जो सत्याग्रह करणार आहेत, त्याबद्दल विचार करावयाचा होता. सभेत सुमारें ७००।८०० लोक हजर होते. रा. रा. वामनराव जोशी वकील यांनी आरंभी सभा भरविण्याचा उद्देश सांगितला. तो असा की, अस्पृश्य लोक जो सत्याग्रह करणार आहेत त्या सत्याग्रहाला विरोध करण्याकरितां सर्व नागरिकांनीं ठराव पास करावा. व सभेचें अध्यक्षस्थान रा. रा. बाळं भटजी यांनी स्वीकारावें असें सुचविलें सभा भरविण्याचा उद्देश जाहीर केल्यावर सभेंत मतभेद झाला; व रा. रा. चुनीलाल मेहता यांनी सभेचा उद्देश केवळ असाच होता असें कळविण्यांत आलें नव्हतें, सत्याग्रहाबद्दल नुसता विचार करावयाचा आहे असेंच कळविलें होतें, असें सांगून रा. बाळं भटजी यांच्या अध्यक्षतेस विरोध केला. व याला रा. बापुराव जोशी यांनीं पाठिंबा दिला. रा. वामनराव जोशी यांच्या सूचनेस अनुमोदन न मिळतांच रा. वासुदेव ओक उठले; व त्यांनी विसंगत, हास्यास्पद व आतापर्यंत सभेच्या कोणत्याही नियमाला न धरून अशी उपसूचना केली कीं, सूचविलेल्या अध्यक्षांना कायदेशीरपणें काम करतां यावयाचें नाहीं म्हणून एक दुय्यम अध्यक्ष निवडावा व तें काम करण्याबद्दल रा. रा बंडोपंत जोशी (वकील) यांचे नांव सुचविलें. या त्यांच्या उपसुचनेमुळें तर सभेंत हंशा व गोंगाट उद्‌भवला; व उपसूचना करणारांची सभेंत टर उडाली. आश्चर्याची गोष्ट ही कीं, ही सूचना करणारे गृहस्थ येथील ब्राह्मणवर्गापैकीं, ज्यांना सभेचे नियम व शिस्त माहिती, व शाळेंत मास्तरांचे काम केलेले आहेत अशा वरिष्ठ ज्ञातींतील माणसांनेंच सभेंत शिस्त मोडली तेव्हां त्यांच्या अकलेची तारीफ काय करावी ? या त्यांच्या उपसूचनेस रा. रा. सुरेंद्रनाथ गोविंद टिपणीस यांनीं, व रा. रा. बापुराव जोशी यांनी हरकत घेतली. अध्यक्षस्थान श्री. पितांबर भाई गुजर यांनी स्वीकारावें असें

मि. सु. गो. टिपणीस यांनीं सुचविलें. परंतु पितांबर भाई यांनीं कांहीं कारणामुळें तें नाकारिलें. यानंतर सभेत बराच गोंधळ उपस्थित झाला. व अध्यक्षाच्या जागेकरिता ७।८ नांवें सुचविली. व त्याला पाठिंबेही मिळाले व विरोध जोराचा झाला. विरोधाचें मुख्य कारण हेंच होतें की, जो अध्यक्ष होईल त्यानें दोन्ही बाजूचें ऐकून घेण्याचें कबूल केल्याशिवाय अध्यक्षस्थान स्वीकारू नये. मोठी शरमेची व लांछनास्पद गोष्ट ही कीं, त्या सुचविलेल्या नावांपैकी एकही तशा रीतींनें सभा पार पाडण्याचे आश्वासन देऊन अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल करीना. वास्तविक पाहिलें तर सभा सर्व नागरिकांची ! नागरिकांत कांहीं अस्पृश्यांचे बाजूचे असणार व कांहीं विरोधी असणार. ठराव सर्वांच्या मतानें पास व्हावयाचा. अध्यक्षाला सभेचें काम व्यवस्थेशिर पार पाडावयाचें एवढेंच असते. असें असतां एकानेंही पुढें होऊन तयार व्हावयाचें नाहीं ही गोष्ट निंद्य होय ! या सुचविलेल्या नांवापैकी बहुतेक ब्राह्मण होते. त्यांपैकी एक गृहस्थ रा. धारप वकील हे होते. त्यांनी अरेरावीपणाचें धोरण स्वीकारून होत असलेल्या विरोधाची पर्वा न करितां अध्यक्षाच्या खुर्चीवर जाऊन बसले. तेव्हां लोकांनी विरोध केला. परंतु खुर्चीवर बसतांना ते म्हणाले की, मला सूचना आणून निवडिलें आहे व अनुमोदन मिळालें आहे. यावर पुन्हां कडक विरोध करण्यात आला. अगोदर अध्यक्षांनी आपली दोन्ही बाजूचीं मतें कशा स्वरूपाचीं आहेत हें सांगितल्याशिवाय अध्यक्षस्थान स्वीकारू नये. रा. धारप या गोष्टीला कबूली देईनात, व ते जरा दांडगाई व अरेरावी करूं लागलें पण जास्त विरोध झाल्यावर निरुपायास्तव खाली बसले. रा. धारप यांना एवढीच सूचना करण्यांत आली होती की, दोन्ही पक्षांचे ऐकून घ्यावयाचें, पण त्यांनी स्वीकारलेल्या एकतर्फी धोरणामुळें, असें अनुमान दिसलें की, ब्राह्मणशाहीचे एकतर्फी मत म्हणजे महाड येथील सर्व नागरिकांचे मत, असा त्याच्यावर शिक्कामोर्तब करून सरकारकडे कळवावयाचें; व ता. २५-१२-२७ रोजी होणाऱ्या सत्याग्रहाच्या विरूद्ध मनाईचा हुकूम मिळवावयाचा.

अशा रीतींने अध्यक्षस्थान कोणी स्वीकारीना व रा. रा. वामनराव जोशी (वकील) यांनी सांगितलें की, ही सभा सत्याग्रहाला विरोध करण्याकरितांच ठराव पास करावा म्हणून जमविण्यांत आली आहे, व याच्या विरूद्ध जे असतील त्यांनी सभा सोडून जावे. यावरहि कडक विरोध करण्यांत आला, व जनतेचें मत वरील महाशयाच्या सूचनेमुळें फारच प्रक्षुब्ध झालें. कारण आजची तरी सभा सर्व नागरिकांची आहे, व आजच्या सभेंत हजर असलेल्या थोड्या लोकांकडून कां होईना, जो ठराव होईल तो सर्वांनीं पास केलेला ठराव असें समजण्यांत येऊ नये,

अशी सूचना रा. रा. सु. गो. टिपणीस यांनी आणिलीं, व त्याप्रमाणे सभेत कोणीही उठलें नाही. हे जसें घटकाभर झाले तसें रा. रा. वामनराव जोशी हे आपला पराजय झाला असें पाहून खालीं बसलें, व पुनः असें सांगितलें कीं, आतांची सभा बरखास्त झालेलीं आहे, व पुढें या बाबतींत सभा भरविण्यांत येईल. यावर रा. टिपणीस यांनी सर्व लोकांस सांगितलें कीं, 'आतांची सभा बरखास्त झालेलीच आहे असें ज्या अर्थी सांगण्यात येत आहे त्याअर्थी पुन्हा पुढें होणाऱ्या सभेंत सर्व नागरिकांनीं परत हजर राहून ठराव पास किंवा नापास करण्याबद्दल जागृत असलें पाहिजे, व आपलें योग्यमत निदर्शनास आणून देण्याची खबरदारी घेतली पाहिजे.'

अशा रीतीनें दोन तास चाललेला हा गोंधळ, सभेंत कोणत्याही प्रकारचा निर्णय न लागतां रात्री ८ वाजतां खलास होऊन सभा बरखास्त झाली.

●●●

---

बहिष्कृत भारत : ता. २३ डिसेंबर १९२७.

# परिशिष्ट–३६

# जोतीराव फुले

पेशवाईचा अंत १८१८ साली झाल्यानंतर अवघ्या ९ वर्षांनंतर जोतीरावांचा जन्म चैत्र शु. ।।, शके १७४९ बुधवार ता. ११ एप्रिल १८२७ रोजी झाला. राजा राममोहन राय, बाळशास्त्री जांभेकर आदी ब्राह्मण मंडळी जितके इंग्रजी शिकले तितकेच शिक्षण जोतीरावांचे झाले होते आणि इंग्रजी शिक्षणाची जी शेवटची परीक्षा होती त्या परीक्षेत जोतीराव पहिल्या नंबरने पास झाले. त्यांना मराठी, इंग्रजी, उर्दू, कानडी, मद्रासी व गुजराथी अशा सहा भाषा येत होत्या, शिक्षण संपल्यानंतर त्यांनी समाजाची स्थिती माहीती करून अभ्यास करण्यासाठी मुंबई, नागपूर, कोल्हापूर या भागातील कित्येक खेड्यात फिरून कित्येक लोकांची ओळख करून घेतली.

शूद्रादिअतिशूद्रांचा अध:पात हा शिक्षणाच्या अभावी झाला याची त्यांना जाणीव झाली. त्यांनी, स्वत:च्या पत्नीला, सावित्रीबाईला शिकविले आणि त्यांना शिक्षिकेचा दर्जा प्राप्त करून दिला. १८४८ साली, मुलींसाठी आणि महार-मांग वगैरे अतिशूद्रांसाठी शाळा काढल्या. १ नोव्हेंबर १८५८ रोजी अनाथ बालबालिकाश्रम स्थापन केले. १८६३ साली आपल्या वाड्यात विधवांच्या गुप्त बाळंतपणाची सोय केली. २५ सप्टेंबर १८७३ रोजी शूद्रादिशूद्रांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. १८७७ साली भालेकरांच्या साह्याने 'दीनबंधु' पत्र सुरू केले. १८८२ साली हंटर कमिशनपुढे साक्ष देताना सरकारने शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचे करावे आणि शूद्रादिअतिशूद्रास त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात सरकारी नोकऱ्या द्याव्यात अशी सर्वात प्रथम आरक्षणाची मागणी केली. १८८५ साली हिंदू धर्माचा पुतळा करून कॉंग्रेसच्या अधिवेशनासमोर महार समाजाकडून जाळला. १८८७ साली अस्पृश्य समाजातील कार्यकर्ते निर्माण करण्यासाठी त्यांना सभेत कसे बोलावे हे शिकविले होते व त्यांना सभेत बोलायला लावीत. त्यांनी अंगिकारल्या जिवित कार्याची (मिशन) पावती म्हणून ११ मे १८८८ रोजी त्यांचा मुंबई कोळीवाड्यात आयोजित जंगी सभेत सत्कार करण्यात आला व त्यांना 'महात्मा' ही पदवी देण्यात आली. १८९० साली न्हावी लोकांची संघटना करून विधवांचे केशवपन करायचे नाही अशी घोषणा केली.

सत्यशोधक समाजाच्या ध्येयानुसार शूद्रास सदुपदेश व विद्याद्वारे त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधी ब्राह्मणांचे बनावटी व कार्यसाधक ग्रंथापासून त्यांना मुक्त करण्याकरिता जीवनविषयक सर्व क्षेत्रांशी संबंधीत अनेक ग्रंथांची रचना केली. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे ऐतिहासिक संशोधन करून वास्तविक स्थिती आणि शुद्रादिअतिशूद्रांनी कसे आपले कृतीशील जीवन व्यतीत करावे याबाबत प्रबोधनात्मक मांडणी केली आहे. त्यांनी ब्राह्मणी धर्माचा त्याग करून सार्वजनिक सत्य धर्माचा अंगिकार करण्याचे आवाहन केले आहे. सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक म्हणजे आदर्श व्यक्ति, समाज आणि राष्ट्र घडविण्यासाठी आवश्यक जीवन मूल्यांवर आधारित अमोल ठेवा आहे. या पुस्तकांत जी ३३ सत्यवर्तन करणाऱ्यांविषयी नियम दिले आहेत ते बौद्ध धम्मातील पायाभूत सिद्धांतावर आधारित आहेत. अशा या महापुरूषाचा मृत्यू "शके १८१२ कार्तिक शु.।। १५, तारीख २८ नोव्हेंबर १८९० इ. स. रोजी बुधवारी व पौर्णिमेस झाला. त्यांचा जन्मही बुधवारी व पौर्णिमेसच झाला."[१]

डॉ. बाबासाहेब आंबेडकर, म. फुले यांना आपले गुरू मानताना म्हणतात, "माझे तिसरे गुरू म्हणजे जोतीबा फुले होत. ब्राह्मणेतरांचे खरे गुरू तेच होत. शिंपी, कुंभार, कोळी, महार, मांग, चांभारांना माणुसकीचे धडे फुल्यांनीच दिले आणि शिकविले ....... कोणी कोठेही जावोत, पण आम्ही मात्र जोतीबांच्याच मार्गानी जाऊ. जोडीला कार्ल मार्क्स घेऊ किंवा दुसरे काही घेऊ पण जोतीबांचा मार्ग सोडणार नाही." [२] जर डॉ. आंबेडकरांनी म. फुल्यांना गुरू म्हणून घोषीत केले नसते तर आज त्यांच्या जीवन आणि कार्याला जे महत्त्वपूर्ण स्थान प्राप्त झाले आहे. कदाचित, ते प्राप्त झाले नसते, काळाच्या ओघात नष्ट झाले असते.



---

[१] : संदर्भ ग्रंथ (१) नरके, पृ. १७८-१८७ आणि (२) म. फुले समग्र वाङ्मय, सुधारित पाचवी आवृती.

[२] : खंड १८, भाग ३, पृ. ४०२.

# परिशिष्ट–३७

## कॅथरीन मेयो आणि ' मदर इंडिया ' ग्रंथ

कॅथरीन मेयो या अमेरिकन बाईचा जन्म अमेरिकेतील पेन्सिलव्हानिया राज्यात रिज्वे येथे १८६७ साली झाला. मॅसॅच्युसेटस राज्यातील बोस्टन आणि केंब्रिज येथे अत्यंत उच्चभ्रू शाळांत तिचे शिक्षण झाले. १८९० पासून तिचे लेख, कथा विविध मासिकातून व वृत्तपत्रातून येण्यास सुरुवात झाली. तिने १९२५ साली हिंदुस्थानला भेट दिली होती.

मिस कॅथरीन मेयोने लिहिलेले ' मदर इंडिया ' हे पुस्तक १९२७ च्या उन्हाळ्यामध्ये म्हणजेच सायमन कमिशनची नेमणूक जाहीर होण्यापूर्वी जवळजवळ सहा महिने अगोदर प्रसिद्ध झाले. या पुस्तकाने त्यावेळी प्रचंड खळबळ उडवून दिली होती.

हे पुस्तक प्रसिद्ध झाल्याबरोबर भारतीयांनी ताबडतोब त्याचा निषेध करण्यास सुरुवात केली. या पुस्तकातील टीकेला उत्तर देण्यासाठी एकामागून एक भराभर ग्रंथ प्रसिद्ध झाले. ते असे, मिस मेयोज ' मदर इंडिया ' ए रिजॉइंडर– के. नटराजन (मद्रास १९२८), फादर इंडिया–सी. एस्. रंगा अय्यर (लंडन १९२८); सिस्टर इंडिया–वर्ल्ड सिटिझन (मुंबई १९२८), अनहॅपी इंडिया–लाला लजपतराय (कलकत्ता १९२८), ए सन ऑफ मदर इंडिया आन्सर्स–धनगोपाला मुखर्जी (न्यूयॉर्क १९२८), इंडिया–इटस् कॅरेक्टर ए रिप्लाय टू ' मदर इंडिया '--जे. ए. चॅपमन (ऑक्सफर्ड १९२८) व ॲन इंग्लिशमन डिफेन्डस् मदर इंडिया–ए कंप्लीट रिप्लाय टू मदर इंडिया–अर्नेस्ट वूट (मद्रास १९२९).

' मदर इंडिया ' या पुस्तकाच्या सहा आवृत्या निघाल्या आहेत. आपले हे पुस्तक समर्पित करताना लेखिका म्हणते,

" To the peoples of India and to that Indian Field-Labourer who, once, by an act of humanity saved my life. "

या पुस्तकातील विचारावर जे वरीलप्रमाणे टीकेचे वादळ उठले त्याचे मूळ कारण तिने त्यात दर्शविलेले स्वतःचे अवलोकन होय.

Leaving the ancient roots of things, and coming down to the year A. D. 1926, we find the orthodox Hindu rule as to Untouchables to be roughly this :

Regarded as if sub-human, the tasks held basest are reserved for them; dishonour is associated with their name. Some are permitted to serve only as scavengers and removers of night soil; some, through the ignorance to which they are condemned, are loathsome in their habits; and to all of them the privilege of any sort of teaching is sternly denied. They may neither possess nor read the Hindu scriptures. No Brahman priest will minister to them; and, except in rarest instances, they may not enter a Hindu temple to whorship or pray. Their children may not come to the public schools. They may not draw water from the public wells; and if their habitation be in a region where water is scarce and sources far apart, this means, for them, not greater consideration from others, but greater suffering and greater toil.

They may not enter a court of justice; they may not enter a dispensary to get help for their sick; they may stop at no inn. In some provinces they may not even use the public road, and as labourers or agriculturists they are continually losers, in that they may not enter the shops or even pass through the streets where shops are, but must trust to a haphazard chain of hungry go-betweens to buy or sell their meagre wares. Some, in the abyss of their degradation, are permitted no work at all. These may sell nothing, not even their own labour. They may only beg. And even for that purpose they dare not use the road, but must stand far off, unseen, and cry out for alms from those who pass. If alms be given, it must be tossed on the ground, well away from the road, and when the giver is out of sight and the roads empty, then, and not till then, the watcher may creep up, snatch, and run.

Some, if not all, pollute, beyond caste men's use, any food upon which their shadow falls. Food, after such defilement, can only be destroyed.

Others, again exude ' distant pollution ' as an effluvium from their unhappy bodies. If one of these pressumes to approach and linger by a high-road, he must measure the distance to the high-road. If it be within two hundred yards, he must carefully place on the road a green leaf weighted down with a handful of earth, thereby indicating that he, the unclean, is within pollution distance of that point. The passing Brahman, seeing the signal, halts and shouts. The poor man forthwith takes to his heels, and only when he has fled far enough calls back, 'I am now two hundred yards away. Be pleased to pass. '

Still others—the Puliahs of the Malbar Coast—have been forbidden to build themselves huts, and permitted to construct for houses nothing better than a sort of leaf awning on poles, or nests in the crotches of big trees. These may approach no other type of humanity. Dubois recorded that, in his day, a Nair (high-caste Hindu) meeting a Puliah in the road, was entitle to stab the offender on the spot. * To-day the Nair would hesitate. But still, to-day, the Puliah may approach no caste man nearer than sixty or ninety feet. [1]

● ● ●

* : Hindu Manners, Customs and ceremonies, pp. 60-I. See also Three Voyages of Vasco de Gama, Gaspar Correa, Hakluyt Society, London, 1869, p. 155.

1 : Katherine Mayo, Mother India, P.p. 141—143.

# परिशिष्ट–३८

## श्रीधर टिळकांची आत्महत्त्या ?

दुनिया खास टिळक अंक, शनिवार, २-६-१९२८ पान ३ वर ' कै. श्रीधर बळवंत टिळक' (ले. डॉ. भीमराव आंबेडकर) हा बाबासाहेबांचा लेख याच अंकांत पान ३ वर प्रसिद्ध झाला होता. त्याच्या खाली जे लेख प्रसिद्ध झाले होते ते माहितीच्या दृष्टीने चांगले होते. त्यांतील काही महत्त्वाचे भाग येथे उद्‌धृत करीत आहोत.

## 'श्रीधर टिळकांची 'आत्महत्त्या' का कज्जेदलालांनी पाडलेला खून ?'

लेखक :–केशव सिताराम ठाकरे

गेल्या शुक्रवारी (२५-५-२८) सायंकाळी कै. टिळकांचे 'सु'पुत्र श्रीधरपंत यांनी पुणा एक्सप्रेसपुढे उडी टाकून आत्महत्त्या केल्याचे वृत्त शनिवारी संध्याकाळी मुंबईत व सर्व हिंदुस्थानात श्रुत झाले. . . . मी पुण्यास असताना त्यांचा माझा अलीकडे सतत एक वर्ष निकट परिचय होता. खासगी व्यावहारिक आणि सार्वजनिक शेकडो बाबतीत आम्ही खुल्या दिलाचे विचारविनिमय अनेक वेळा केलेले आहेत. आमच्या कित्येक बैठका सहा सहा तासहि चालत असत. 'चित्पावनद्वेष्टा' ठाकरे आणि 'चित्पावन टिळक' श्रीधरपंत ही जोडी एकत्र फिरावयाला निघाली असता, कित्येक पुणेरी

**गोडबोल्यांची तोंडे कडू जहर**

झालेली पाहून आम्ही दोघेही पोट धरधरून हसलो आहोत . . . ते टिळकांचे चिरंजीव असोत, गीतारहस्यांचे मर्मज्ञ असोत, विवेकवादी असोत, कोणीहि असोत. एक गोष्ट कधीहि दृष्टीआड करता येणार नाही की ते इतरांप्रमाणेच प्रवाहपतित संसारी मनुष्य होते; सिद्धपुरुष किंवा सर्वसंगपरित्यागी नव्हते. कै. टिळकांसारख्या मानधन प्रभूच्या उदरी जन्म घेऊन, या सिंहाच्या छाव्याला, बापाच्या मूर्खपणामुळे, आजुबाजूच्या कोल्ह्याकुत्र्याकडून जो निष्कारण सासुरवास व उपहास नित्य भोगावा लागत असे, त्यामुळे 'आम्हा टिळक बंधूंची स्थिती हॅम्लेट प्रमाणे करण्याचा हितशत्रूंनी विडा उचलला आहे' अशा अर्थाचे उद्‌गार श्रीधरपंत अलिकडे केवळ बोलतच असत असे नव्हे, तर तसे त्यांनी आपल्या एका लेखात स्पष्ट लिहिल्याचे मी वाचलेले आहे. अखेर श्रीधरपंताच्याच भाकिताप्रमाणे

त्यांना हॅम्लेटची दुर्दैवी भूमिका यथातथ्य वठविण्याचाच प्रसंग आला. श्रीमंत सकलगुणालंकृत राजमान्य राजेश्री नेन्याच्या विरुद्ध टिळक बंधूंनी दाखल केलेल्या दाव्याबद्दल मी सहज पृच्छा केली असता, श्रीधरपंत स्पष्ट म्हणाले, 'या एकाच दाव्याचे काय घेऊन बसलात? कितीक तरी आणखी भानगडी अजून चव्हाट्यावर यावयाच्या आहेत. त्या एक दोन वर्षांत फडशा पडण्याजोग्या नाहीत. टिळक बंधूंचे प्रकरण म्हणजे दुसरे ताईमहाराज प्रकरण आहे. माझ्या आयुष्याची २५ वर्षे या प्रकरणासाठी मी खास रिझर्व करून ठेविली आहेत. . . '

'. . . केसरी कंपू आणि बंधू यांच्यात ट्रस्ट आणि टिळकांचे बिल याबाबद चुरशीची कायदेबाजी उत्पन्न न होता, टिळक बंधू प्रच्छन्न सुधारक म्हणून ब्राह्मणेतरांच्या किंवा महार मांगादि अस्पृश्यांच्या चळवळींच्या अग्रभागी येऊन उभे राहते, किंवा समाज समता-संघाच्या सहभोजनाच्या खरकट्याच्या पत्रावळींनी सारा गायकवाडवाडा सावडून काढते, तर माझी बालंबाल खात्री आहे की, त्यांच्याबद्दल कसल्याहि प्रकारचा द्वेष, अनादर किंवा उपहास पुण्यात फारसा पिकता ना . . . . जीर्णमतवादी टिळकांचे मुलगे आगरकरांची मते प्रत्यक्ष आचरणात आणू लागले, तर तेवढ्यामुळे पुण्याच्या चित्पावनी हवेला टिळक बंधूविरुद्ध इतके खवळण्याचे वास्तविक काहीच कारण दिसत नाही. माटे नावाचे एक भट मास्तर मांगाशी सलगी करतात, म्हणून ते जर सनातनी ब्रह्माग्नीत सुक्या बोंबलाप्रमाणे भाजले जात नाहीत, तर टिळकबंधूंनी टिळक-दिवाणखान्यात महारमागांना सहभोजन दिले तर त्यात विशेष काय आहे? फार काय तर टिळकांची पोरे बाडगी निघाली एवढे म्हणून लोक गप्प बसते. अर्थात् टिळकबंधूविरुद्ध खुद्द गायकवाड वाड्यातच जो ज्वालामुखी धुमसू लागला, त्याचे कारण टिळकबंधूंचा सुधारकपणा नसून त्यांनी केसरी कंपूच्या कारस्थानावर सरकारदरबारी मारलेली बोंब, हेच होय, आणि श्रीधरपंतांच्या आत्महत्त्येचे मूळ शोधीत शोधीत गेला तर ते अखेर गायकवाडवाड्यात कज्जेदलालांनी भडकविलेल्या कायदेबाजीच्या यज्ञकुंडाच्या आसपासच कोठे तरी सापडले पाहिजे. पण इतका उपद्व्याप कशाला? भालाकारी टायपाचे आचरट माथेफिरू श्रीधरपंतांवर 'मानसिक वेडाच्या लहरी' चा 'आपल्या मृत आईस एका सोनेरी टोळीने छळल्याच्या भ्रामक समजुती' चा किंवा 'नवराबायकोंतील खटक्यां' चा हवा तो आरोप लादोत, पण श्रीधरपंतांनी आपले डोके विचार व विकार समतोल शांत ठेवून आपण आत्महत्त्येचा मार्ग का पत्करीत आहो, याचा लेखी खुलासा पुण्याचे कलेक्टर आणि काही इष्टमित्र यांना पत्रे पाठवून स्पष्ट केलेला आहे. . . .' (पा. ४-५)

## श्रीधर बळवंत टिळक

(लेखक–दिनकर शंकर जवळकर)

गेल्या गणपती उत्सवात जेव्हा केसरी कंपूचा बखेडा विशेष स्वरूपाचा झाला, गायकवाड वाड्यातील गणपतीपुढे अस्पृश्यांचा मेळा नेण्याचे जेव्हा टिळक बंधूंनी ठरविले त्या वेळचा प्रसंग अजून आमच्या दृष्टीसमोर दिसत आहे. श्रीधरपंतांनी अस्पृश्य मेळा नेण्याचा निर्धार केला होता. एक दिवस दुपारी आम्हाकडे जेध्यांच्याकडून सारखी बोलावण्यावर बोलावणी येऊ लागली ; आम्हाला कारण काहीच कळेना. जेधे यांचेकडे जाऊन पाहतो तो तेथे आमची वाट पहात श्रीधरपंत बसलेले! 'जेधे मॅन्शनमध्ये जवळकरांची वाट पहात टिळकांचा मुलगा बसला आहे' असे वाक्य त्यापूर्वी जर कोणी उच्चारले असते तर त्याला लोकांनी वेड्यात काढले असते. परंतु यावेळी श्रीधरपंत-टिळकांचे चिरंजीव श्रीधरपंत–ब्राह्मणेतर तत्त्वावर, सत्यशोधक चळवळीवर प्रेम करणारे बनले होते. अस्पृश्य मेळा वाड्यात नेण्यांचा त्यांनी आपला मनोदय व्यक्त केला त्याचवेळी जेध्यांच्या मारुतीच्या देवळातहि तोच मेळा आम्ही आत घेऊ असे श्री. जेधे यांनी कबूल केले. या वेळेपासूनच श्रीधरपतांच्या खऱ्या सार्वजनिक आयुष्याची सुरवात आहे. यानंतर त्यांनी अत्यंत धैर्याने अस्पृश्योद्धाराच्या चळवळीकडे आपले लक्ष घातले. समाज-समता-संघाची पुण्यात स्थापना करून आपल्या वाड्यात सहभोजन घडवून आणले. याला अजून पुरा महिनाहि लोटला नाही. श्रीधरपंतांचे कार्य यावेळी ऐन भराला आले होते. महाराष्ट्रातील प्रत्येक ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर श्रीधरपंतांच्या हालचालीकडे लक्ष लावून बसला होता. समाज-समता-संघाच्या सहभोजनाने भिक्षुकशाहीच्या भयंकर रोषास श्रीधरपंत पात्र झाले असतील, पण याच सहभोजनामुळे कोट्यावधी ब्राह्मणेतरांच्या प्रेमास पात्र झाले होते. . . . .' (पा. ५)

## रामभाऊंची मुलाखत

'प. वा. श्रीधरपंत उर्फ बापूसाहेब टिळक यांच्या हृदयद्रावक व शोकजनक निधनानंतर त्यांच्या आत्महत्त्येच्या कारणासंबंधाने पुणे शहरात ज्या काही नाना तऱ्हेच्या बाजारगप्पा प्रसृत झाल्या आहेत त्यासंबंधात नक्की माहिती मिळण्याकरिता काल ता. २८ रोजी ज्ञानप्रकाशाच्या खास प्रतिनिधींनी प. वा. श्रीधरपंतांचे वडील बंधू श्री. रामभाऊ टिळक यांची मुलाखत घेतली. तेव्हा रा. रामभाऊ म्हणाले 'पुण्यामुंबईतील काही प्रतिष्ठित पण खोडसाळ वृत्तपत्रकारांनी माझ्या बंधूच्या आत्महत्त्येसंबंधात ज्या काही बेजबाबदार हकीकती प्रसिद्ध केल्या आहेत त्याबद्दल

मला आश्चर्य वाटते. त्याचा तीव्र निषेध व इन्कार करणे हे माझे कर्तव्य आहे. समाजसमतासंघ स्थापन केल्याचा पश्चात्ताप झाल्यावरून श्रीधरपंतांनी आत्महत्त्या केली असे म्हणणे हे निव्वळ मूर्खपणाचे आहे. तो संघ स्थापन केल्याबद्दल त्यांना कधीही पश्चाताप वाटला नाही. उलटपक्षी, तो स्थापन झाल्या दिवसापासून त्यांना एक प्रकारचे समाधान वाटत होते. इतकेच नव्हे तर, सातारा, नगर, नाशिक वगैरे ठिकाणी त्या संघाच्या शाखा स्थापन करण्याचे खटपटीत ते होते. हा त्यांचा निर्धार त्यांनी माझेजवळ व रा. पां. ना. राजभोज वगैरे मित्रमंडळीजवळ कित्येक वेळा बोलूनही दाखविला होता. अशा स्थितीत त्यांच्या आत्महत्त्येचा संबंध समाज-समता संघाच्या स्थापनेशी लावणे यासारखा अप्रयोजकपणा दुसरा कोणताच नाही, असे म्हटले तरी चालेल. . . . .' (पा. ५)

## श्री. श्रीधरपंत टिळकांचा हृदयद्रावक मृत्यू

## समाज समता संघातर्फे दुखवट्याची सभा

कै. श्रीधरपंत बळवंत टिळक यांच्या अकाली अपघातजन्य मृत्यूमुळे दादर येथील समाज समता संघाने परळ येथील दामोदर हॉलमध्ये रविवार ता. २७-५-१९२८ रोजी रात्री ९ वाजता एक जाहीर दुखवट्याची सभा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली भरविली होती. सभागृह निरनिराळ्या पंथांच्या, जातींच्या आणि पक्षांच्या लोकांनी भरून गेले होते. आणि जिकडे तिकडे एक प्रकारची भीषण गंभीरता दिसत होती. प्रत्येकाचे मन श्रीधरपंताच्या आत्महत्त्येमुळे हळहळत होते. 'महाराष्ट्राचा एक तेजस्वी कार्यकर्ता तरूण समाजक्रांतिवीर मृत्यूमुखी पडला !' असा ध्वनि सर्व बाजूने उमटलेला स्पष्ट दिसत होता. सभेस श्री. केशवराव ठाकरे, वरेरकर, पी. आर. लेले, श्री. देवराव नाईक, श्री. सीतारामपंत बोले, श्री. जोगळेकर, आचार्य फासे, मे. प्रधानबंधू, श्री. कवळी, खांडके, कद्रेकर, जाधव, श्री. उत्तमराव कदम, गोपीनाथ प्रधान, सौ. मनोरमाबाई प्रधान वगैरे मंडळी प्रामुख्याने हजर होती. त्यातल्या त्यात अस्पृश्य वर्गाचा जमाव विशेष होता.

डॉ. आंबेडकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारल्यावर आपले प्रास्ताविक भाषण सुरु केले. ते म्हणाले–'कै. श्रीधरपंतांचा व माझा संबंध सख्ख्या भावापेक्षा अधिक जिव्हाळ्याचा होता. समाज समता संघाशी त्यांचा संबंध जुळून आल्यापासून त्यांच्याविषयी मला विशेष आपलेपणा वाटत असे. त्यांनी सामाजिक सुधारणेच्या कार्याला गति देण्याची जी धडाडी दाखविली तिची किंमत मला अधिक श्रेष्ठ प्रतीची वाटू लागली होती. जुने लोक, जुनी परंपरा आज बाजूला ठेवून आणि दूरवर

विचार करून पाहिले, आजच्या नवीन नवमतवादी पिढीचा विचार केला तर त्यात कै. श्रीधरपंत मोठ्या लोकमान्यतेस पात्र होते असे म्हटल्याशिवाय राहवत नाही. समाज समता संघाच्या चळवळीला मुद्दाम जाणूनबुंजून जे एक प्रकारचे निष्कारण छळावे असे हीन वृत्तीचे वातावरण हिंदुस्थानात उत्पन्न होत होते, त्याला टक्करच म्हणून की काय श्रीधरपंतांनी समाज समता संघाची शाखा प्रत्यक्ष आपल्या घरी-लोकमान्यांच्या गायकवाड वाड्यात-स्थापन करून जे अलौकिक धैर्य दाखविले ते खरोखर कौतुकास्पद होते.' नंतर डॉ. आंबेडकर यांनी कै. श्रीधरपंतांच्या आत्महत्त्येचा संबंध समाज समता संघाशी द्राविडी प्राणायामाने कित्येक लोक जोडीत आहेत त्यांना स्पष्ट उत्तरच की काय असे कै. श्रीधरपंतांचे शेवटचे डॉक्टरसाहेबांना आलेले पत्र त्यांनी वाचले. (पत्रातील मजकूर दुसरीकडे त्यांच्या स्वदस्तुरच्या पत्राचा फोटो ब्लॉक करून दिला आहे.) आणि ते पुढे म्हणाले की समाज समता संघावर जे आरोप करण्यात येत आहेंत ते किती फोल आहेत याची कल्पना त्यांच्या पत्रावरून सहज करता येईल. दोन्ही बाजूचा विचार केला तर संघाविषयी उठलेल्या पुणेरी कंड्यांत काही अर्थ नाही हे कळून येईल. ज्याचा सारा जन्म जुन्या पंरपरेत जुन्या विचारांच्या माणसात आणि आचारविचारात गेला तो त्या परिस्थितीला चिकटून न रहाता-ती घातुक परिस्थिती साफ बदलून टाकण्याकरिता-उदारमतवादी समाज समता संघाला आणि त्याच्या नवमतवादी तत्त्वाला सहाय्य करतो त्या त्याच्या धैर्याची आणि धडाडीची तारीफच केली पाहिजे. त्यांच्यासारखा तेजस्वी कार्यकर्ता पुरुष आपल्यातून अकाली काळाच्या भक्षी पडावा, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट होय !'

दुखवट्याच्या ठरावावर बोले, वरेरकर मामा. सौ. मनोरमाबाई प्रधान, पी. आर. लेले, ठाकरे, देवराव नाईक, द. वि. प्रधान आणि कद्रेकर यांनी भाषणे केली. (पा. ९)

दुनिया पत्राच्या दहाव्या पानावर श्रीधर टिळक यांची तीन पत्रे प्रसिद्ध करण्यात आली होती :–

**समाज समता संघाविषयी महत्त्वाची पत्रे**

GAIKWAR WÁDA
POONA CITY
2nd May 1928

Dear Mr. Pradhan,

Your letter of the 30th ult. I have no objection whatsoever to lend my Hall for the intercaste marriage arranged by you. I am glad you have

succeeded so far. I wonder what ceremonial the couple would like to go through, for the proper celebration of their matrimonial tie. The local priests are sure to boycott and excommunicate them. But true social reformers ought to brave any severe obtricism that their orthodox brethren may be pleased to hurl at them in their wrath by way of blind retaliation.

Yours Sincerely,

(Sd), S. B. Tilak,

POONA CITY

23-5-28

Dear Dr. Ambedkar,

Your telegram D/ 18th inst. reached me in time, I could not see Rajbhoj that day. I had already decided to leave Poona by Friday's night train but for another purpose, *viz*: to watch the proceedings of the All Parties Conference at Bombay. That conference was a poor show and a great disappointment to all visitors. So I returned to Poona on Monday morning. I read the account of Dapoli Conference in yesterday's paper and though I was unable to attend personally, must congratulate you upon its decisive success and the most imposing scenes described in papers. It certainly made a great advancement towards the right solution of the knotty problem of untouchability and the general impression left there about the work of the "Samaj Samata Sangha," must have been indelible.

Hoping you will please excuse me for my absence,

Yours Sincerely,

(Sd.) S. B. Tilak."

POONA CITY

6th May 1928.

Dear Dr. Ambedkar,

Your letter of the 2nd inst. duly to hand. From today's newspapers ज्ञानप्रकाश, विविधवृत्त, etc. you may have noted the bureaucratic attitude of the Maharashtra Provincial Conference towards the question of the removal of untouchability. Several delegates walked out of the conference in disgust and by way of protest when that resolution was high-handedly throttled down. The mean mindedness of those that were in power there and their unconstitutional tactics to suppress the resolution in the Subjects Committee as well as in the open session are sufficiently exposed in the statement published in today's Dnyan Prakasha over the

signatures of those that walked out of the Conference. The whole affair exasperating. The treatment meted out to Sri. Rajbhoj and other untouchable delegates was simply scandalous and intolerable ! We must now organise public meetings throughout Maharashtra to condemn this retrograde policy of the Conference. A letter-open letter or rather defiant letter of challenge from your pen to the Times of India or the press in general, will, I am sure, give the necessary lead in this direction.

The real reason why Babu Subhash Chandra Bose was brought from Bengal and sumptuously treated by the Brahmins of the Kesari School in Poona is because he is likely to be the Chairman of the Reception Committee of the forthcoming Indian National Congress to be held at Calcutta, and the responsivist Party, by their loud trumpeting of sham unity, is in fact manaeuvering from now to make sure that their leader Mr. N. C. Kelkar is elected President of the Calcutta Congress this year, without much opposition from the Kattars of Maharashtra. The object of electing Mr. S. M. Paranjpe to the chair and heaping all sorts of honour on him, was also to please the local Kattars, with a view to blunt their persistent opposition to Mr. Kelkar's summum bonum of life, *viz.* Congress Presidentship.

Such are our leaders and this is how they sacrifice the general good of their own countrymen, I mean the dumb millions for the pursuit of purely personal ambition.

I remain
Yours Sincerely,
(Sd.) S. B. Tilak

(दुनिया, शनिवार २-६-१९२८, पान १०)

दुनिया पत्राच्या १२-१३ पानांवर 'कै. श्रीधर बळवंत टिळक' या शीर्षकाखाली श्री. भा. वि. प्रधान, बी. ए., सेक्रेटरी, समाज समता संघ, दादर, यांचा लेख प्रसिद्ध झाला होता. संघाची शाखा पुण्यात उघडण्याची तारीख ८ एप्रिल १९२८ होती, त्या समारंभासाठी मुंबईहून ता. ७ एप्रिलच्या रात्रीच्या गाडीने डॉ. आंबेडकर, बापूसाहेब सहस्त्रबुद्धे, देवराव नाईक, द. वि. प्रधान, कद्रेकर, शिवतरकर, भंडारे व भा. वि. प्रधान हे पुण्याला गेले. त्यांचा मुक्काम श्रीधरपंताच्या घरी (गायकवाड वाडा) होता. रात्री संघ स्थापना, सहभोजन वगैरे कार्यक्रम झाले. श्रीधरपंतांच्या पत्नी सौभाग्यवती शांताबाई यांनी दोन ब्राह्मण स्त्रियांच्या सहाय्याने सहभोजनाचा

स्वयंपाक केला व पंतांनी पक्तींला पाने मांडली, जेवण वाढले आणि सर्वांना विडे दिले. स्वयंपाक चालू असता पंतांच्या घरातील विजेचे दिवे बंद पडले तेव्हा त्यांनी मेणबत्त्या, कंदील, गॅसच्या बत्त्या घरात पेटवून सर्व समारंभ अत्यंत उत्साहाने पार पाडला. या प्रमुख गोष्टीचा उल्लेख श्री. प्रधान यांच्या उपरिनिर्दिष्ट लेखात होता.[१]

● ● ●

१ : खैरमोडे, खंड ४, पृ. ४-११.

# परिशिष्ट–३९
## डिप्रेस्ड क्लासेस मिशन

" हिंदी लोकांना जादा राजकीय हक्क देण्याचे जाहीर केले तर हिंदी लोक आपल्या महायुद्धाला अंतःकरणपूर्वक साहाय्य करतील, हे चाणाक्ष ब्रिटिश मुत्सद्यांनी हेरले होते. म्हणून हिंदी लोकांना १९०९ सालात जे राजकीय हक्क दिले त्यापेक्षा जादा हक्क ब्रिटिश सरकार देणार आहे, अशी घोषणा करण्याचे ब्रिटिश प्रधानमंडळाने ठरविले. त्याप्रमाणे ही घोषणा ता. २० ऑगस्ट १९१७ रोजी पार्लमेंटमध्ये भारतमंत्री मॉंटेग्यू यांच्या तोंडून केली गेली. हिंदुस्थानातील राजकीय परिस्थितीचे प्रत्यक्ष अवलोकन करावे व मग हिंदी लोकांना कोणते राजकीय हक्क द्यावेत हे ठरवावे म्हणून भारतमंत्री मॉंटेग्यू हे हिंदुस्थानाच्या दौऱ्यावर आले. हिंदुस्थानचे व्हाईसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांच्यासमवेत ते हिंदुस्थानात फिरले. मॉंटेग्यू दौरा संपवून परत गेल्यानंतर पार्लमेंटने लॉर्ड साऊथबरो यांच्या अध्यक्षतेखाली मतदान (फ्रेंचाईज) कमिटी हिंदुस्थानात पाठविली. ही साऊथबरो कमिटी जेव्हा हिंदुस्थानातील प्रमुख भागात फिरून हिंदी लोकांच्या प्रतिनिधींच्या साक्षी गोळा करू लागली तेव्हा तिला असे दिसून आले की, सामाजिक व धार्मिक बाबतीत सनातनी वृत्ती दाखविणारे पण राजकीय बाबतीत क्रांतिकारक दृष्टी ठेवणारे राजकीय पुढारी हिंदी लोकांना होमरूल (स्वराज्य) हवे असे प्रतिपादू लागले. पण अस्पृश्यांना स्वतंत्र प्रतिनिधित्व न देता त्यांचे हितसंरक्षण उच्च वर्णीय हिंदू प्रतिनिधींच्या हाती सोपवावे, अशीही मते ते प्रतिपादू लागले. या मतांचा सूर शिंदे व चंदावरकर धरू लागले. ही परिस्थिती पाहून डॉ. आंबेडकरांना मनस्वी चीड आली. हे हिंदू लोक स्वतःच्या घरातील घाण साफ करून टाकायला अजून तयार नाहीत तर त्यांनी स्वराज्य का मागावे अशा अर्थाचे पत्र त्यांनी टाईम्सला लिहिले. ते पत्र १६ जानेवारी १९१९ च्या अंकात 'A Mahar on Home Rule,' या नावाने प्रसिद्ध झाले होते. ते पत्र 'A Mahar' (एक महार) या टोपणनावाने लिहिले होते.

साऊथबरो कमिटी मुंबई प्रांतात आली तेव्हा अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांची मागणी कमिटीपुढे मांडण्यासाठी विठ्ठल रामजी शिंदे आणि डॉ. भीमराव रामजी आंबेडकर यांना सरकारने निवडले. शिंदे हे डी. सी. मिशनचे जनरल सेक्रेटरी होते. १९०४ ते १९१८ पर्यंत त्यांच्या कामाचा बोलबाला चोहोंकडे झालेला होता. शिवाय नारायणराव चंदावरकर हे सरकारच्या विश्वासातील बडे गृहस्थ शिंद्यांच्या मिशनचे अध्यक्ष होते. तेव्हा शिंद्यांनी साऊथबरो कमिटीपुढे अस्पृश्यांच्या

राजकीय हितासंबंधी कैफियत मांडावी म्हणून सरकारकडून त्यांना आमंत्रण येणे अटळ होते. डॉ. आंबेडकर त्यावेळी सिडन्हॅम कॉलेजात प्रोफेसर होते. खुद्द अस्पृश्य वर्गातील एकाद्या व्यक्तीने कमिटीपुढे कैफियत सादर करावी, असे सरकार, चंदावरकर व शिंदे यांना वाटले नाही. हे वैगुण्य डॉ. आंबेडकरांच्या लक्षात आले. ते सरकारी नोकरीत होते तरी गर्व्हनर साहेबांशी पत्रव्यवहार करून त्यांनी साऊथबरो कमिटीपुढे साक्ष देण्यासाठी आपली निवड करून घेतली. शिंदे व डॉ. आंबेडकर यांनी आपापल्या कैफियती भिन्न दृष्टिकोनातून मांडल्या.

अस्पृश्यांना मतदानाचा हक्क पाहिजे, त्यांना निवडणुकीस उभे राहता यावे, त्यांच्या मतदारांना स्वतंत्र मतदारसंघ पाहिजेत, अस्पृश्यांचे अस्पृश्य प्रतिनिधी अस्पृश्य मतदारांनीच निवडले पाहिजेत आणि अस्पृश्यांच्या मतदारसंघात अस्पृश्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात जागा द्याव्यात, अशी डॉ. आंबेडकर यांनी अस्पृश्यांतर्फे साऊथबरो कमिटीपुढे साक्ष दिली. या बाबतीत त्यांनी आपली लेखी कैफियत सादर केली. त्यांनी त्या कैफियतीत साधार माहिती देऊन अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांची बाजू उत्तम रीतीने मांडली. वरील प्रकारचे राजकीय हक्क उपभोगण्यास जी लायकी पाहिजे ती सरकारने अस्पृश्यांची हीन व दीन अवस्था लक्षात घेऊन ठरवावी, असेही डॉ. आंबेडकरांनी सुचविले. डॉ. आंबेडकरांनी आपली कैफियत वर्तमानपत्राकडे पाठविली ; पण वर्तमानपत्रांनी तिची दखल घेतली नाही. अस्पृश्य वर्गातील लोकांनी आपल्या राजकीय हक्कांसाठी जाहीर सभा घ्याव्यात, असे डॉ. आंबेडकरांनी मुंबईतील समाजसेवकांना सुचविले. परंतु ह्यावेळी बहुतेक समाजसेवक शिंदे व सर नारायणराव चंदावरकर यांच्या सल्ला मसलतीने चळवळ करीत असत. भारतमंत्री माँटेग्यू हे हिंदुस्थानात दौऱ्यावर आले तेव्हा त्यांच्यापुढे अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांची मागणी मांडण्यासाठी चंदावरकर यांच्या प्रेरणेने काही अस्पृश्य समाजसेवकांनी एक शिष्टमंडळ नेण्याचे ठरविले. त्याप्रमाणे ते शिष्टमंडळ चंदावरकर यांच्याच नेतृत्वाखाली माँटेग्यू साहेब मुंबईत आले तेव्हा त्यांना भेटले. ही बाब लक्षात घेतली म्हणजे डॉ. आंबेडकरांच्या सूचनेप्रमाणे अस्पृश्यांनी राजकीय हक्कांसाठी जाहीर सभा स्वतंत्रपणे का भरविल्या नाहीत, हे स्पष्ट होईल. शिंद्यांनी आपल्या कैफियतीला लोकमत मिळावे म्हणून चळवळ केली. मि. ए. आर. बॅनर्जी, I. C. S. यांच्या अध्यक्षतेखाली अस्पृश्यांची एक जाहीर सभा बंगलोरमध्ये भरविण्यात आली, तिचा वृत्तांत 'टाईम्स ऑफ इंडिया' च्या ता. २ डिसेंबर १९१८ च्या अंकात (पा. १०) प्रसिद्ध झाला. सभेत शिंदे यांचे अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांबद्दल भाषण झाले. राष्ट्रीय हिताला बाधक अशी अस्पृश्यांसाठी राजकीय

हक्कांची मागणी आपण करणार नाही; परंतु अस्पृश्यांची सध्यांची स्थिती जोपर्यंत तशीच राहील तोपर्यंत जातीय पायावर राजकीय हक्क दिले पाहिजेत आणि हे हक्क मिळवून देण्यासाठी आपण प्रयत्न करीत राहू असे विचार शिंद्यांनी आपल्या भाषणात प्रदर्शित केले. आपल्या कैफियतीला जनमताचा पाठिंबा मिळविण्यासाठी शिंद्यांनी दौरा काढला.

कायदेमंडळे, म्युनिसिपालिट्या आणि लोकलबोर्ड यांत अस्पृश्यांचे प्रतिनिधी असले पाहिजेत, मुंबई कायदेमंडळात अस्पृश्यांसाठी किमानपक्षी पाच जागा (महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक, मुंबई शहर व सिंध यांना प्रत्येक एक) असाव्यात आणि जे अस्पृश्य सरकार–मंजूर प्राथमिक शाळांतून चौथी इयत्ता पास झालेले असतील आणि ज्यांचे वार्षिक उत्पन्न १४४ रु. असेल, अशांना मतदानाचा हक्क असावा, असा शिंद्यांच्या कैफियतीचा सारांश होता. शिंद्यांच्या कैफियतीबद्दल 'टाईम्स' पत्राने आपल्या २६ जानेवारी १९१९ च्या अंकात 'Current Topics' या सदरात एक स्फुट लिहिले होते. ते येणेप्रमाणे :

**The Depressed Classes**

" In a statement presented to Franchise Committee Mr. V. R. Shinde of the Depressed Classes Mission, proposes an extension of the Franchise to all those whose annual income is over Rs. 300 and who have read up to the Vernacular School Final Examination. In the case of the members of the Depressed Classes, he would have the franchise further lowered still. For the Depressed Classes, property qualification should be an annual income of Rs. 144, and the literary qualification the passing of the Fourth Vernacular Standard in any Primary School recognised by Government. And in order that the stigma of untouchability which in popular imagination, at present lies upon them, should be completely washed out as soon as possible, he argues that representatives of these classes should be admitted to Legislative Councils and Local Bodies for the purpose of voicing the feelings and safeguarding the interests of their classes. Mr. Shinde would have at least five seats reserved for Depressed Classes, one each for Karnatak, Maharashtra, Gujrat, Sind and Bombay City, supposing the Council is to consist of 150 members. The representatives of the Depressed Classes should be elected by those classes only to be specially formed on the franchise above mentioned."

शिंद्यांनी दिलेल्या साक्षीचा कमिटीने जर स्वीकार केला तर अस्पृश्य समाज आपल्या राजकीय हक्कांना मुकेल, कारण मतदानासाठी जी लायकी अस्पृश्यांसाठी शिंद्यांनी सुचविली होती ती अस्पृश्यांतील मूठभर लोकांमध्येही सापडणार नाही. आणि ती सापडलीच तर हे मूठभर लोक शिंद्यांच्या कच्छपी राहून शिंद्यांना अगर त्यांच्या हस्तकांना निवडून देतील व अस्पृश्यांच्या खऱ्या प्रतिनिधींना निवडून

घेण्याचा संभव राहणार नाही, ही परिस्थिती ओळखून डॉ. आंबेडकरांनी शिंद्यांची कैफियत अस्पृश्यांच्या हितांना बाधक आहे असे जाहीर करण्याचे ठरविले. अस्पृश्यांच्या राजकीय आकांक्षा काय आहेत याचा जाहीर खुलासा एखाद्या वजनदार गृहस्थाच्या नेतृत्वाखाली व्हावा म्हणून अस्पृश्यांची एक परिषद छत्रपती शाहू महाराज यांच्या अध्यक्षतेखाली घेण्याचे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे ही परिषद नागपूरला घेण्यात आली. या परिषदेत शिंद्यांच्या कैफियतीबद्दल अस्पृश्यांची नामंजुरी जाहीर करण्यात आली. या बद्दलची हकिगत श्री. सी. ना. शिवतरकर यांनी 'जनते' च्या १९३३ च्या खास अंकातील 'डॉ. आंबेडकरांच्या सहवासातले काही संस्मरणीय प्रसंग' या लेखात निवेदन केलेली आहे. ते लिहितात, ''सन १९२० सालच्या ता. ३०-३१ मे व जून रोजी नागपूर येथे पहिली अखिल भारतीय बहिष्कृत परिषद कै. शाहू छत्रपती यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या परिषदेस डॉ. आंबेडकरसाहेबांच्या बरोबर मेसर्स शि. जा. कांबळे, कदम, कै. गो. गो. कांबळे, ऐदाळे, भोबले वगैरे बरीच मंडळी महाराष्ट्रातून प्रतिनिधी म्हणून गेली होती. मीही त्यावेळी हजर होतो.

परिषदेच्या पहिल्या दिवसाचे काम संपल्यावर रात्रौ विषयनियामक कमिटीची बैठक बसली. त्यावेळी श्री. गवई यांनी डॉ. आंबेडकरांनी विषयनियामक कमिटीचे अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी सूचना आणली. तिला अनुमोदन मिळण्यापूर्वीच मी अशी उपसूचना मांडली की, विषयनियामक कमिटीचे अध्यक्ष स्थान, आपल्यातील बेळगावचे रावसाहेब पापण्णा हे वयाने व अनुभवाने ज्येष्ठ आहेत, तसेच ते सरकारमान्यही आहेत, करिता त्यांनी स्वीकारावे. या सूचनेस श्री. भटकर यांनी लागलीच अनुमोदन दिल्यावर ती सर्वानुमते पास झाली व पापण्णा साहेब मोठ्या आनंदाने स्थानापन्न झाले. त्यानंतर काही ठराव पास झाल्यावर डॉ. आंबेडकरसाहेब अध्यक्षांच्या परवानगीने म्हणाले की,

'' आपण येथे जमलेले सर्व प्रतिनिधी बहिष्कृत वर्गाची उन्नती होईल या दृष्टीने विचार करण्याच्या हेतूने जमलो आहो. म्हणून आपल्या लोकांच्या उन्नतीच्या आड येणारी व्यक्ती–मग ती बहिष्कृत वर्गातील असो किंवा उच्च वर्णीय हिंदूतील असो, तसेच एकादी संस्था असो,–पण ती आपल्या हिताच्या विरुद्ध एखादे कृत्य करीत असेल किंवा असे कृत्य तिने मागे केले असेल तर त्या गोष्टीचा आपण निषेध करावा की नाही ? ''

तेव्हा सगळे प्रतिनिधी एका आवाजाने म्हणाले की, '' अलबत ! आमच्या प्रगतीच्या आड येणारी कोणतीही व्यक्ती असो किंवा संस्था असो, तिचा आपण तीव्र निषेध केलाच पाहिजे.'' ही गोष्ट तुम्हा सर्वांना मान्य आहे काय, असे डॉ. आंबेडकरसाहेबांनी तीनतीनदा बजावून विचारले. त्यांनी माझ्याजवळून ' टाईम्स ' पत्राचा अंक घेऊन त्यात डी. सी. मिशन संस्थेने सरकारला लिहून

पाठविलेले स्टेटमेंट वाचून दाखविले. त्याचा परिणाम इतका झाला की, श्री. गवई व त्यांचे मदतगार लोक जागच्या जागी थिजले !

नंतर पुढील ठराव परिषदेत सर्वानुमते पास करण्यात आला. तो ठराव असा :

ठराव ३ रा : बहिष्कृत वर्गाचे सुधारलेल्या कौन्सिलात जे प्रतिनिधी घ्यावयाचे आहेत ते सरकारी नेमणुकीने किंवा त्यांच्यातील जातवार संस्थांतर्फे न घेता बहिष्कृतेतरांतर्फे कौन्सिलात निवडून गेलेल्या प्रतिनिधीमार्फत यावेत, अशी जी सूचना खास बहिष्कृत वर्गाच्या उन्नतीप्रीत्यर्थ स्थापन झालेल्या डिप्रेस्ड क्लास मिशनने केली होती, तीमुळे सर्व अस्पृश्य वर्गाचे मन अस्वस्थ झाले आहे. कारण बहिष्कृतेतर वर्गाच्या प्रतिनिधींना बहिष्कृत वर्गाचे प्रतिनिधी नियोजित करण्याचा जर अधिकार दिला तर ज्या चातुर्वर्ण्य व्यवस्थेमुळे बहिष्कृत वर्गाचे नष्टचर्य ओढवले आहे, ती चातुर्वर्ण्य व्यवस्था कायम करण्यास आमच्यातील जे लोक कबूल होतील, अशाच लोकांना प्रतिनिधी नेमण्यात येईल. त्याअर्थी या परिषदेचे असे ठाम मत आहे की, डिप्रेस्ड क्लास मिशनने (भारतीय निराश्रित साहय्यकरी मंडळीने) आपल्या आश्रितांचा असा उघडपणे द्रोह केल्यामुळे ती बहिष्कृत वर्गाच्या विश्वासास अपात्र झाली आहे.

" या ठरावावर पी. एन. भटकर, द्रविड, कदम वकील यांची भाषणे झाल्यावर गवई पुष्टी देतांना म्हणाले की, ' तुम्हाला (जहाल मवाळांना) जर नॉमिनेशन नको आहे तर आम्हालाच काय म्हणून असावे ? सरकारने आमचे प्रतिनिधी नेमावेत असे जरी मिशनने मागितले असते तरी बरे झाले असते ; परंतु जहाल मवाळांनी आमचे प्रतिनिधी नेमावेत अशी मागणी करणे म्हणजे आमचा द्रोह करणे नव्हे काय ? मिशनने जी आमच्या प्रतिनिधींची मागणी आम्हाला न विचारता केलेली आहे ती अगदी घातक आहे. यामुळे डिप्रेस्ड क्लास मिशनवरील आमचा विश्वास अजिबात उडाला आहे. ' या प्रसंगाने डॉ. आंबेडकर यांनी आपल्या विरुद्ध पक्षालाही आपल्या बाजूस कसे वळवून घेतले व अस्पृश्यांच्या हितशत्रूंचे दात त्यांच्या घशात कसे कोंबले हे दिसून येईल. "

साऊथबरो कमिटी मुंबईस आली तेव्हा विठ्ठलभाई पटेल (हे त्यावेळी मध्यवर्ति कायदे मंडळाचे सभासद होते आणि हिंदूतील मिश्र विवाह कायदेशीर समजावेत असे बिल मांडून ते विलक्षणपणे प्रसिद्धीस आले होते.) यांनी कमिटीपुढे साक्ष दिली. अस्पृश्यांच्या हिताबद्दल त्यांनी असे स्पष्ट मत दिले की, त्यांना स्वतंत्र मतदार संघ द्यावेत. (टाइम्स ऑफ इंडिया, २९-८-१९१८).

या कमिटीपुढे अनेक हिंदू पुढाऱ्यांच्या साक्षी झाल्या, पण त्यांनी अस्पृश्यांच्या राजकीय हक्कसंरक्षणाबद्दल दक्षता दाखविली नाही. " [१]



[१] : खैरमोडे, खंड १ ला, पृ. २४४-२४९.

# परिशिष्ट–४०

# हिंदी स्वातंत्र्य संघ

## बंगाल शाखेचा जाहिरनामा

## स्वातंत्र्य संघाचा कार्यक्रम

राजकीय–पूर्ण स्वातंत्र्य

सामाजिक—(१) जातीचें उच्चाटन–म्हणजे अस्पृश्यता निवारण; रस्तें व विहिरी यांचा सर्वांना पूर्ण उपभोग घेऊं देणें; देवळांत सर्वांना प्रवेश; सहभोजन; सहविवाह, (२) स्त्रियांचें स्वातंत्र्य–म्हणजे पडदा काढून टाकणें; स्त्रियांना सक्तीचें शिक्षण व शारीरिक शिक्षण देणें; विधवांना पुनर्विवाहास स्वातंत्र्य; स्त्री-पुरुषांना समान हक्क व स्त्रियांच्या हक्कांच्या कायद्याची दुरुस्ती, (३) बहुभार्यत्व नष्ट करणें; आंतर्प्रांतीय विवाहांना उत्तेजन; लग्नाची स्त्री-पुरुषांची वयोमर्यादा वाढविणें व लग्नाची किमान मर्यादा ठरविणें; कोणत्याही प्रकारचा हुंडा अगर वरदक्षिणा रद्द करणें, (४) वंशपरंपरा गुरू अगर भटजी होण्याचा हक्क नष्ट करणें; धंदेवाईक भिक्षुकांच्या मदती शिवाय ज्याची त्यानें धर्मकृत्यें करावीं अशाबद्दल उत्तेजन देणें.

आर्थिक .—मुख्य तत्त्वें–(अ) आर्थिक विषमता नष्ट करणें, (आ) संपत्तीची समान वाटणी, (इ) सर्वांना पुढें येण्यास सारखी संधी देणें, (ई) रहाणी (स्टँडर्ड ऑफ लाइफ) उच्च दर्जाची करणें.

कार्यक्रम—(१) मोठ्या प्रमाणावर यंत्रसहाय्यानें पदार्थांची निपज वाढविणें व गृहधंद्यांना उत्तेजन देणें, (२) महत्त्वाचे धंदे राष्ट्राच्या मालकीचें करणें, (३) रेल्वे, जहाजें व विमानें हीं राष्ट्राच्या मालकीचीं करणें, (४) कारखान्यांच्या व्यवस्थेंत आणि नोकरांच्या नेमणुका व बडतर्फी याबाबत मत देण्याचा कामगारांना अधिकार राहील, (५) त्यांना कारखान्यांतील नफ्याचा वाटा मिळावा, (६) संप किंवा ' लॉक आऊट ' ची जरूरी राहूं नये म्हणून मालक व मजूर यांचीं भांडणें मिटविण्यासाठी एक निःपक्षपाती तडजोडमंडळ नेमणें, (७) खासगी संपत्तीला कायद्यानें मर्यादा घालणें व वडिलोपार्जित संपत्तीवर कर लादणें, (८) सहकारी पेढ्यामार्फत कमी व्याजावर कर्ज पुरविणें, (९) फॅक्टरी कामगारांचा ८ तासांचा कामाचा दिवस करणें, (१०) बेकारी व म्हातारपणाचा मुशाहिरा सरकारनें द्यावा,

(११) आजारीपणा, बाळंतपण, रहाण्याला चाळी, सुटी, मजूर-बालकांना पाळणें, अन्न पुरविणें वगैरे, व इतर बाबतींत मजुरांना मदत करून त्यांची स्थिती सुधारणें, (१२) सर्वत्र जमीनधारा सारखा घेण्यांत यावा, (१३) जमीनधारा योग्य प्रमाणांतच घेण्याचें सरकारनें आश्वासन द्यावें, (१४) मालगुजारांना व जमीनदारांना भरपाई देऊन मालगुजारी व जमीनदारी नष्ट करणें, (१५) सरकारनें मध्यस्थी करून शेतकऱ्यांच्या सावकारांची भरपाई करून देऊन त्यांना कर्जमुक्त करणें.

## महाराष्ट्र शाखा

धोरण व कार्यक्रम.—१. स्वतंत्र हिंदुस्थानची "काँग्रेस" हीच मुख्य राजकीय सभा बनविण्यांत यावयाची असल्यामुळे देशांतील सर्व काँग्रेसच्या संस्थांवर संघाच्या सभासदांनीं आपला ताबा राखणें.

२. पांच वर्षांनंतर हिंदुस्थानचें स्वातंत्र्य जाहीर करणें व तें काँग्रेसच्या द्वारा जाहीर करणें, संघाची चळवळ तीव्रतेनें होण्याच्या दृष्टीनें अशी निश्चित कालमर्यादा घालणें जरूरीचें आहे.

३. या मधल्या कालांत सत्याग्रह, असहयोग, करबंदी व सार्वत्रिक संप इ. सर्व शांततायुक्त साधनांनी प्रत्यक्ष प्रतिकारात्मक चळवळ करण्याकरितां राष्ट्राची तयारी करणें.

४. पुढील विधायक कार्यक्रम अंमलांत आणल्यास राष्ट्राची स्वातंत्र्य युद्धाकरितां योग्य ती तयारी होईल :—(१) ज्ञातिहितवादाला सर्व बाजूनीं विरोध करणें, (२) राष्ट्रीय नागरिक-दल निर्माण करणें, (३) जाति व धर्म लक्षांत न घेतां सर्वांना नागरिकत्वाचे हक्क सारखेच उपभोगण्यास मिळतील अशी चळवळ करणें, (४) मजूर व शेतकरी यांची संघटना करणें, (५) राष्ट्रांतील मुख्य महत्त्वाचे धंदे व राष्ट्रीय संपत्युत्पादनाची साधनें यांचे राष्ट्रीयकरण करणें, (६) स्थानिक स्वराज्य संस्था ताब्यांत घेऊन त्यांना राष्ट्रीय स्वरुप देणें, (७) काँग्रेसचा विधायक कार्यक्रम अंमलांत आणणें व तसें करतांना खादी प्रसार व अस्पृश्यता निवारण यांवर विशेष भर देणें.

५. आशियाटिक राष्ट्रसंघांतील एक स्वतंत्र घटक अशी स्वतंत्र हिंदुस्थानास मान्यता मिळविण्याच्या हेतूनें व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या चळवळीबद्दल आशियाटिक राष्ट्रांची सहानुभूति मिळविण्याकरितां स्वातंत्र्यसंघाचें एक शिष्टमंडळ आशियाटिक राष्ट्रांत पाठवावें. तसेंच लवकरच काबूल येथें होणाऱ्या आशियाटिक राष्ट्रपरिषदेच्या बैठकीसही हजर राहण्याकरितां स्वातंत्र्यसंघातर्फे प्रतिनिधी पाठवावें.

घटना .—१. संघाचें नांव ' हिंदी स्वातंत्र्य संघ ' असें असावें.

२. काँग्रेसनें ठरविलेल्या सर्व भाषावार प्रांतात संघाच्या शाखा स्थापन करण्यांत याव्या. या प्रत्येक शाखेवर एक पगारी चिटणीस असावा. त्याचा पगार ७५ रु. पेक्षां कमी नसावा.

३. प्रांतिक शाखांनीं जिल्हा शाखा स्थापन करून त्या प्रांतिक शाखांना जोडून घ्याव्या.

४. प्रांतिक शाखांनीं प्रत्येक जिल्ह्याकरिता एक पगारी प्रचारक नेमावा. त्याचा पगार ५० रु. पेक्षां कमी नसावा.

५. प्रांतिक शाखेवरील सेक्रेटरी व जिल्ह्यांतील प्रचारक यांची नेमणूक करतांना त्यांनीं केलेल्या सार्वजनिक कामांचा विचार करण्यांत यावा.

६. पुढील वर्षी काय काम करावयाचे याचा विचार करण्याकरितां दरसाल जानेवारी महिन्यांत प्रांतिक शाखेच्या सभासदांची परिषद भरविण्यांत यावी व त्याच वेळीं प्रांतिक शाखेचे अध्यक्ष व कार्यकारी मंडळ यांची निवडणूक करण्यांत यावी.

७. वर्गणीच्या किंवा देणगीच्या रुपानें दरसाल संघाचा कार्यक्रम चालू ठेवण्याकरितां दोन लाख रुपये जमा करावे. हा सर्व राष्ट्रीय फंड संघाच्या मुख्य कचेरीच्या ताब्यांत असावा. प्रांतांप्रांतांतून तेथें चालू असलेल्या राष्ट्रीय चळवळींच्या जरूरीप्रमाणें त्यांना पैशाचा पुरवठा करण्यांत यावा.

● ● ●

---

बहिष्कृत भारत, ता. १६ नोव्हेंबर १९२८.

# परिशिष्ट–४१
# पं. जवाहरलाल मोतीलाल नेहरू

**पं. जवाहरलाल मोतीलाल नेहरू,** (१४ नोव्हेंबर १८८९–२७ मे १९६४) – भारतातील स्वातंत्र्यलढ्यातील एक थोर नेते, स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान व आंतरराष्ट्रीय दर्जाचे श्रेष्ठ मुत्सद्दी. त्यांचा जन्म अलाहाबाद येथे काश्मीरी ब्राह्मण कुटुंबात झाला. जवाहरलालांचे प्राथमिक शिक्षण घरीच उत्तम शिक्षकांकडून पार पडले. त्यामुळे जवाहरलाल यांच्या कोवळ्या मनावर काही काळ थिऑसॉफीचा प्रभाव होता. त्यांचे मन प्राचीन धर्मग्रंथांकडे आकृष्ट झाले. त्यांनी उपनिषदे, भगवद्‌गीता, महाभारत, रामायण यांचे वाचन केले. पंडितजींचे एकूण बालपण काहीशा संमिश्र सांस्कृतिक वातावरणात पार पडले; घरातील पश्चिमी वळणाची राहणी, आई व मावशी यांचे पारंपरिक संस्कार, उत्तर भारतीय उच्च वर्गांत टिकून राहिलेल्या खानदानी, मुस्लिम संस्कृतीचा प्रभाव आणि वडिलांकडून लाभलेला अनिष्ट सामाजिक रूढींबद्दलचा बंडखोरपणा इ. कारणांनी व आधुनिक पद्धतीच्या शिक्षणाने पंडितजींचे मन कोणत्याही एकान्तिक विचारधारेपासून अलिप्त राहिले व त्यास एक उदार सहिष्णू वळण लागले.

जवाहरलाल पुढील शिक्षणासाठी इंग्लंडला गेले (१९०५). इंग्लंडमधील हॅरो या प्रसिद्ध विद्यालयात दोन वर्षे शिक्षण घेऊन पुढे महाविद्यालयीन शिक्षणासाठी ट्रिनिटी महाविद्यालयात (केम्ब्रिज विद्यापीठ) ते दाखल झाले (१९०७). यावेळी भारतात बंग-भंग चळवळ जोरात होती. परदेशी मालावरील बहिष्कार, स्वदेशीचा पुरस्कार व सशस्त्र क्रांती हा केंब्रिज विद्यापीठातील भारतीय विद्यार्थ्यांचा एक चर्चेचा विषय होता. त्यावेळचे सारे विद्यार्थी लो. टिळक पक्षाचे म्हणजे जहाल राष्ट्रवादी होते. पंडितजीही त्याला अपवाद नव्हते. या सुमारास त्यांनी श्यामजी कृष्णवर्मा, गोपाल कृष्ण गोखले, बिपिनचंद्र पाल इ. राष्ट्रीय नेत्यांची भाषणे ऐकली. १९०५ च्या रूसो-जपानी युद्धाचा त्यांच्या मनावर परिणाम झाला. भूशास्त्र, रसायनशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र हे तीन विषय घेऊन ते दुसऱ्या वर्गात पदवी परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर त्यांनी बॅरिस्टरची परीक्षा दिली. त्यांच्या मनावर इंग्लंडमधील उदारमतवादाचाही खोल ठसा उमटला. फेबियन समाजवादी चळवळीकडे आणि इतर समाजवादी विचारांकडे ते आकृष्ट झाले.

जवाहरलाल १९१२ मध्ये शिक्षण संपवून भारतात परत आले. काही काळ वकिली करण्याचा त्यांनी प्रयत्न केला; पण त्यात त्यांचे मन रमले नाही. इंग्लंडमध्ये असतानाच त्यांना राजकारणात आस्था वाटू लागली होती. या काळात ८ फेब्रुवारी १९१६ मध्ये त्यांचा कमल कौल या दिल्लीतील स्वजातीय युवती बरोबर विवाह झाला. त्यांना दोन अपत्ये झाली. त्यांपैकी इंदिरा गांधी (१९१७) भारताच्या तिसऱ्या पंतप्रधान झाल्या, तर दुसरा मुलगा (१९२७) जन्मतः मरण पावला. कमला नेहरूंनी इतर कुटुंबियांबरोबर स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेतला. कारावासातील जीवन व क्षयरोग यांमुळे ऐन उमेदीत त्या मरण पावल्या (१९३६). लखनौ काँग्रेसच्या अधिवेशनात जवाहरलाल यांची गांधीजींशी पहिल्यांदा भेट झाली (१९१६). अन्यायाचा नुसता निषेध करून उपयोग नाही, तर त्याचा प्रतिकार केला पाहिजे आणि हा प्रतिकार अहिंसात्मक असला पाहिजे, या गांधींच्या सूत्राने ते त्यांच्याकडे विशेष आकर्षित झाले. ब्रिटिश सरकारशी लढताना भीती वा द्वेष यांना थारा देता कामा नये, हा गांधींजींचा दंडकही त्यांना पटला.

पंडितजींचा काँग्रेसशी घनिष्ठ संबंध १९१९ सालापासून आला. १९१९ मध्ये एका रात्री रेल्वेने प्रवास करीत असताना जवाहरलालांच्या डब्यातच जनरल डायर (जालियनवाला बागेतील हत्याकांड करणारा) बसला होता. त्याचे एकूण अत्याचारांविषयीचे रसभरित वर्णन जवाहरलालांनी ऐकले. ते ऐकून जवाहरलाल हादरले व तेथून पुढे ते कट्टर साम्राज्यविरोधी बंडखोर बनले. या हत्याकांडाची चौकशी करण्यासाठी काँग्रेसने जी बिन सरकारी चौकशी समिती नेमली होती, त्या समितीला पंडितजींनी साहाय्य केले. गांधीजींनी १९२१ मध्ये असहकाराची चळवळ सुरू करताच जवाहरलालना प्रथम अटक झाली. तुरुंगात जाण्याचा हा त्यांचा पहिलाच प्रसंग होता. तेव्हापासून त्यांच्या तुरुंगयात्रा सुरू झाल्या. पुढील २५ वर्षांत ते अनेक वेळा तुरुंगात गेले व एकूण पंधरा वर्षे त्यांनी तुरुंगात काढली. त्यांचा अखेरचा तुरुंगवास १९४२ च्या छोडो भारत चळवळीच्या वेळी घडला. त्या वेळी अहमदनगरच्या किल्ल्यात त्यांनी जवळजवळ तीन वर्षे काढली.

जवाहरलाल यूरोपमधून परत आले, त्या वेळी भारतात सायमन आयोगाविरोधी निदर्शनांची लाट उसळली होती. जवाहरलालांनी लखनौ येथे निदर्शनाचे नेतृत्व केले. पोलिसांनी त्यांच्यावरही लाठीमार केला. त्याचा परिणाम १९२९ च्या लाहोर येथे झालेल्या काँग्रेसच्या अध्यक्षपदी त्यांची निवड झाली. रावी नदीच्या तीरावर त्यांच्या नेतृत्वाखाली राष्ट्राने संपूर्ण स्वातंत्र्याची प्रतिज्ञा केली. या

संपूर्ण स्वातंत्र्याच्या प्रतिज्ञेची सांगता पंडितजींच्याच नेतृत्वाखाली १४ ऑगस्ट १९४७ रोजी रात्री १२ वाजता देशाने केली. इतिहासात असा अपूर्व योगायोग क्वचित आढळतो.

कॉंग्रेसने प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका लढविल्या (१९३६). मुख्यतः जवाहरलाल नेहरूंच्या तुफानी दौऱ्याने कॉंग्रेसला भरघोस यश मिळवून दिले. जवाहरलाल हे कॉंग्रेसला मते मिळवून देणारे जादूगारच ठरले. यावेळी यूरोपमध्ये फॅसिझम व नाझीवाद यांचा उदय झाला होता. स्पेनच्या लोकनियुक्त सरकारविरूद्ध जनरल फ्रँकोने हिटलर-मुसोलिनीच्या मदतीने बंड सुरू केले होते. त्यामुळे जवाहरलाल व्यथित झाले. फॅसिझम व नाझीवादाचे मानवतेला असलेले धोके त्यांनी बरोबर ओळखून भारतीय जनतेलाही सावध करण्याचे व शिक्षण देण्याचे कार्य केले. ते यूरोपच्या दौऱ्यावर गेले (१९३७). स्पॅनिश जनतेच्या युद्धात त्यांना भाग घ्यावयाचा होता; पण ते शक्य झाले नाही. इथिओपियावर मुसोलिनीने केलेल्या आक्रमणाविरूद्ध आपला तीव्र संताप व्यक्त करण्यासाठी त्यांनी रोमच्या विमानतळावर मिळालेले मुसोलिनीचे भेटीचे निमंत्रणही धुडकावून दिले. फॅसिझमविरोधी लढ्यात ब्रिटन व फ्रान्स या लोकशाही देशांच्या बाजूने भारत उभा राहील, मात्र तो स्वतंत्र भारत म्हणूनच असे सहकार्य करू शकेल, हे त्यांनी त्या वेळीच स्पष्ट केले होते.

जवाहरलाल नेहरू हे प्रथमपासून फाळणीचे कट्टर विरोधक होते. जिनांचा द्विराष्ट्र सिद्धांत त्याना मान्य नव्हता. विविधतेतून भारताची एकता व एकराष्ट्रीयत्व संपन्न झाले आहे, असा त्यांचा दृष्टिकोण होता; परंतु देशातील परिस्थिती लक्षात घेऊन त्यांनी व वल्लभभाई पटेल इत्यादींनी आपले हे मत बदलले व फाळणीला मान्यता दिली. अशा रीतीने देशाची फाळणी होऊन १५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वतंत्र भारताचा उदय झाला आणि जवाहरलाल हे स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान झाले. या पदावर ते आमरण राहिले.

३० जानेवारी १९४८ रोजी म. गांधींची हत्या झाली. या भीषण घटनेने जवाहरलालांना फार धक्का बसला. ' आपल्या जीवनातील प्रकाश हरपला ' असे करूण उद्‌गार त्यांनी काढले. पंतप्रधान म्हणून अठरा वर्षांच्या कारकीर्दीत पंडितजींची लोकप्रियता ओसरली नाही. अंतर्गत व आंतरराष्ट्रीय राजकारणात काही महत्त्वाचे उपक्रम त्यांनी केले. त्यांच्या कारकीर्दीत भारतीय संविधान तयार झाले व संसदीय लोकशाही शासनाची सुरुवात झाली. हिंदू कोड बिल मंजूर होऊन हिंदू महिलांना वारसा-घटस्फोटाचे हक्क मिळाले. संविधानात अस्पृश्यता नष्ट करण्याची तरतूद करण्यात आली. भारताला धर्मनिरपेक्ष राष्ट्र

म्हणून घोषित करण्यात आले. महिला, अस्पृश्य व अल्पसंख्यांक याना समान दर्जा आणि समान संधी उपलब्ध होऊन भारतीय नागरिक समान एकसंघ बनविण्याच्या दृष्टीने पुढे पाऊल टाकण्यात आले. नेहरूंच्याच पुढाकाराने नियोजन मंडळाची स्थापना होऊन भारतात आर्थिक नियोजनाचे युग सुरू झाले. पहिली व दुसरी अशा दोन पंचवार्षिक योजना त्यांच्या कारकीर्दीत पूर्ण झाल्या. या योजनांमुळे देशातील औद्योगिकीकरणाचा पाया घातला गेला. नेहरूंनी समाजवादी समाजरचनेचे ध्येय काँग्रेस पक्षाला दिले. त्यांनी संपूर्ण राष्ट्रीयीकरणाचे धोरण न स्वीकारता सार्वजनिक क्षेत्राप्रमाणे खाजगी क्षेत्रालाही उत्तेजन दिले.

शिक्षण व तंत्रज्ञानाच्या प्रसारासाठी त्यांनी देशात अनेक संशोधन संस्था व राष्ट्रीय प्रयोगशाळा स्थापन केल्या. अणुशक्तीच्या विकासात त्यांना विशेष आस्था होती. त्यांच्याच प्रोत्साहनाने अणुसंशोधन केंद्र भारतात स्थापन झाले. अणुशक्तीचा उपयोग शांततामय कार्यासाठी व्हावा, असे त्यांचे ठाम मत होते. भारताला अणुयुगात आणण्याचे श्रेय पंडितजींनाच द्यावे लागेल.

चीनने भारताचा अक्साई चीनचा प्रदेश व्यापण्यास १९५८ पासूनच सुरुवात केली होती. चीनच्या मैत्रीवर पंडितजींचा विश्वास होता; परंतु या प्रश्नावर पुष्कळ वाटाघाटी होऊन अखेर तडजोड झालीच नाही आणि १९६२ च्या ऑक्टोबरमध्ये चीनने भारतावर आक्रमण केले. पंडितजींना या घटनेचा फार मोठा धक्का बसला व त्यांची प्रकृतीही ढासळली. १९६३ साली त्यांना प्रथम मोठा आजार झाला व १९६४ च्या मे महिन्यात दिल्ली येथे त्यांचे देहावसन झाले.

नेहरूंचे ग्रंथलेखन इंग्रजीत असून ते कारागृहातच झालेले आहे. ग्लिम्प्सिस ऑफ द वर्ल्ड हिस्टरी (१९३९), जवाहरलाल नेहरू : ॲन ऑटोबायग्राफी (१९३६) व डिस्कव्हरी ऑफ इंडिया (१९४५) हे त्यांचे तीन ग्रंथ विशेष महत्त्वाचे मानले जातात. ग्लिम्प्सिस ऑफ द वर्ल्ड हिस्टरी आणि डिस्कव्हरी ऑफ इंडिया हे ग्रंथ त्यांनी कारागृहांत लिहिले. डिस्कव्हरी ऑफ इंडिया या ग्रंथात नेहरूंनी अतिप्राचीन काळापासून सद्यःस्थितीपर्यंतचा संगतवार इतिहास संक्षिप्तपणे मांडलेला असून भारताच्या इतिहासातील प्रेरणांचे धागेदोरे जुळवून त्यांची तात्त्विक पार्श्वभूमी काय आहे, याचा शोध घेतला आहे. त्यातून भविष्यकाळ घडविण्याचे मार्गदर्शन लाभावे हा हेतू दिसतो; म्हणजे इतिहास कसा घडवावा यासंबंधीचे मार्गदर्शन शोधणे, हे या ग्रंथामागील उद्दिष्ट आहे. ऐतिहासिक घटनांची व व्यक्तींची शोधक चिकित्सा त्यात आढळते. या ग्रंथाचा पूर्वार्ध ब्रिटिशपूर्व कालखंडाचे ऐतिहासिक विवेचन हा आहे व उत्तरार्धात इंग्रजी अंमल, जागतिक अधिभौतिक व वैचारिक क्रांती, दोन महायुद्धे, भारतीय-आर्थिक व राजकीय आंदोलने, काँग्रेसची वृद्धी, टिळक, गांधी, टागोर वगैरेंची थोरवी व कार्य,

हिंदु-मुसलमान यांची दुही, समाजवादाचा उदय, स्वातंत्र्याची इष्टता व अपरिहार्यता, सामाजिक पुनर्रचना, राष्ट्रीय नियोजनव्यवस्था, धर्म, तत्त्वज्ञान, भौतिकशास्त्रे इ. अनेक विषयांचे तात्त्विक व ऐतिहासिक विवेचन केलेले आहे.

देशातील ' भारतरत्न ' हा सर्वोच्च पुरस्कार देऊन १९५५ मध्ये त्यांचा सत्कार करण्यात आला. आफ्रो-आशियाई देशांचे स्वातंत्र्य व संघटना, अलिप्ततावादाचे धोरण आणि पंचशील तत्त्व यांचा पुरस्कार करून त्यांनी आंतरराष्ट्रीय सामंजस्य व शांतता यांसाठी अविरत प्रयत्न केले. त्यांची कृतज्ञतापूर्वक दखल घेण्यासाठी भारत सरकारतर्फे आंतरराष्ट्रीय सामंजस्य व शांतता यांसाठी नेहरू पुरस्काराची योजना कार्यान्वित करण्यात आली. नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वात अगदी पहिल्यापासून आदर्शवाद व वास्तवता यांच्यातील द्वंद्व कायम राहिले. त्यांच्या सगळ्या कर्तृत्वाची मीमांसा या द्वंद्वांच्या आधारेही केली जाणे शक्य आहे; तथापि राष्ट्रीय दृष्टीने पाहता, महात्मा गांधींनी आपला वारस निवडून पंडितजीच्या कर्तृत्वावर जो विश्वास प्रकट केला होता, तो पंडितजींनी आपल्या कर्तृत्वाने सार्थ असल्याचे सिद्ध केले यात संदेह नाही. ' [१]

भारताने आपली राजमुद्रा आणि ध्वजावर अनुक्रमे अशोक स्तंभ व अशोक चक्र यांचा स्वीकार केला. पं. जवाहरलाल नेहरू भारतीय दृष्टीकोणातून यांचे औचित्य दर्शविताना ता. २२ जुलै १९४७ रोजी संविधान सभेत म्हणतात,

" ......... Now because I have mentioned the name of Asoka I should like you to think that the Asokan period in Indian history was essentially an international period of Indian history. It was not a narrowly national period. It was a period when India's ambassadors went abroad to far countries and went abroad not in the way of an Empire and imperialism but an ambassadors of peace and culture and good will. (*Cheers*).

Therefore this Flag that I have the honour to present to you is not, I hope and trust, a Flag of Empire, a Flag of Imperialism, a Flag of domination over anybody, but a Flag of freedom not only for ourselves, but a symbol of freedom to all people who may see it. (*Cheers*) and wherever it may go and I hope it will go far, not only where Indians dwell as our ambassadors and ministers but across the far seas where it may be carried by Indian ships, whereever it may go it will bring a message, I hope, of freedom to those people, a message of comradeship, a message that India wants to be friends with every country of the world and India wants to help any people who seek freedom *(hear, hear).* "

*(From the proceeding of the constituent Assembly to commemorate the 50th year of Indian Independence.)* [1]



---

[१] : मराठी विश्वकोश : पृ. ९४७–९५१.

[1] : Chowdhury, Asoka 2300.

# परिशिष्ट–४२

# डॉ. आंबेडकर यांचे वतन बिल

# आणि त्याची कलमे

"मुंबईचे गव्हर्नर यांच्या कायदे-कौन्सिलच्या, तारीख १९ माहे मार्च सन १९२८ च्या सभेंत जो आक्टाचा मसुदा पुढें मांडण्यास डॉ. बी. आर. आंबेडकर, एम. एल. सी. यांस परवानगी देण्यांत आली होती व ज्याचे पहिले वाचन मुंबईच्या कायदे-कौन्सिलांत पास झाले आहे व ज्याचे दुसरे आणि तिसरे वाचन व्हावयाचे आहे त्या आक्टाचा मसुद्याचे मराठी भाषांतर ता. ७ जून १९२८ च्या सरकारी ग्याझेटांत प्रसीद्ध झाले आहे. त्याचा उतारा आमच्या वाचकांच्या माहितीसाठी आम्ही खाली देत आहोत.

## सन १९२८ चा मुंबईचा आक्टाचा मसुदा नंबर १२ वा

सन १८७४ चा वंशपरंपरेचे हुद्याविषयींचा मुंबईचा आक्ट आणखी सुधारण्याबाबत आक्टाचा मसुदा.

ज्याअर्थी, वंशपरंपरेचे हुद्याविषयीचा मुंबईचा आक्ट यापुढें सांगितलेल्या रीतीनें सुधारणें इष्ट आहे ; आणि ज्याअर्थी हिंदुस्थान सरकारसंबंधी आक्टाच्या ८०-क कलमाअन्वयेंची आलीजा गव्हर्नर यांची आगाऊ मंजुरी मिळालेली आहे ; त्याअर्थी, यावरून खालीं लिहिल्याप्रमाणें कायदा ठरविण्यांत येत आहे :–

१. या आक्टास सन १९२८ चा वंशपरंपरेचे हुद्याविषयींचा मुंबईचा आक्ट सुधारण्याबाबत आक्ट असें म्हणावें.

२. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट ३ रा याच्या ९ व्या कलमाची सुधारणा.—९ व्या कलमाच्या (१) ल्या रक्कमेंत " वहिवाटदाराचा मेहनताना म्हणून लावून दिलेले असेल किंवा नसेल " या मजकुराच्या बदला " वहिवाटदाराचा मेहनताना म्हणून लावून दिलेलें नसेल " हा मजकूर दाखल करावा ;

३. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट तिसरा यांत नवीन कलम ९ अ दाखल करणें.—९ व्या कलमानंतर, पुढील मजकूर दाखल करावा, तो येणेंप्रमाणे :—

" ९ अ. (१) कोणतेंहि वतन किंवा त्याचा कोणताहि भाग किंवा वहिवाटदाराचा मेहनताना म्हणून लावून दिलेलें त्याचें कोणतेंहि उत्पन्न, त्याच वतनाचा वतनदार नाहीं अशा कोणत्याही मनुष्याच्या मालकींत किंवा कायदेदार कबज्यांत कोणत्याही ब्रिटीश कोर्टाच्या हुकुमनाम्याखेरीज किंवा हुकुमाखेरीज किंवा तो बजावल्याखेरीज

इतर रीतीने व कलेक्टराचे मंजुरीवांचून व रेव्हेन्यू. दप्तरांत मालकी त्याचे नावावर दाखल झाल्यावाचून, सन १८७४ चा वंशपरंपरेचे हुद्याविषयींचा मुंबईचा आक्ट अंमलांत येण्याचे तारखेपूर्वी गेलें असेल तेव्हां कलेक्टरानें सदरहू प्रकारचा दुमाला रद्दबातल आहे असा ठराव केला पाहिजे व त्याने त्या वतनावर किंवा त्याच्या कोणत्याही भागावर किंवा त्याच्या कोणत्याही उत्पन्नावर ज्या वतनदाराचा पूर्वी हक्क होता त्या वतनदाराचें तें वतन किंवा वतनाचा तो भाग किंवा वतनाचें तें उत्पन्न अशा हुकुमाचे तारखेपासून होईल असा हुकुम केला पाहिजे व त्याप्रमाणें त्याचें कोणतेंहि उत्पन्न वसूल करून सदरहू प्रकारचे वतनदारास दिलें पाहिजे.

(२) जर वतनाचा सदरहू प्रकारचा भाग जमीन असेल, तर, कलेक्टरनें, ती जमीन वतनदाराकडे तबदील करण्याबद्दल हुकूम केला पाहिजे. ''

४. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट ३ रा याच्या १५ व्या कलमाची सुधारणा.––कलम १५ रक्कम १ यास पुढील विशेष ठराव ज्यास्त जोडावा, तो येणेप्रमाणें :––

'' मात्र असें ठरविण्यांत येत आहे, कीं, या आक्टाच्या ६३ व्या कलमाच्या अर्थाप्रमाणें वंशपरंपरेचा हुद्दा धारण करणाऱ्या, वतनी जमिनी कबज्यांत असलेल्या वारचा वतनदारांच्या संबंध समूहाच्या किंवा त्यांच्यातील बहुसंख्य लोकांच्या, अशी नोकरी करण्याच्या आपल्या पात्रतेपासून निरंतर मुक्त केलें जाणें–जर अशी मुक्त केलें जाण्याविषयींची त्यांची इच्छा कलेक्टराकडे लेखी अर्जी करून कळविण्यात येईल तर––मर्जीवर असलें पाहिजे, व जर अशा जमिनीवरील सर्व्हेची पूर्ण आकारणी भरण्याचे ते कबूल करतील तर त्यांस त्यांनी धारण केलेल्या जमिनी कबज्यांत ठेवण्याचें चालू ठेवण्याचा हक्क असला पाहिजे. ''

५. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट ३ रा याच्या १९ व्या कलमाची सुधारणा.––१९ व्या कलमांतून '' व ती नक्त किंवा ऐनजिनसी द्यावी हें ठरविण्याचा '' हे शब्द गाळावे.

६. सन १८७४ चा मुंबई आक्ट ३ रा यांत नविन कलमें १९-अ, १९-ब, १९-क, व १९-ड ही दाखल करणें.––१९ व्या कलमानंतर, पुढील कलमें दाखल करावीं, ती येणेंप्रमाणें :––

१९-अ. ज्यांची वतनी मिळकत म्हणजे ऐनजिनसी वसूल करण्याचा हक्क ही असते असा वारचा वतनदारांचा संबंध समूह किंवा त्यांच्यातील बहुसंख्य लोक, जेव्हां अशा हक्काचें पैशाच्या पट्टीच्या रूपांत रूपांतर करण्याबद्दल कलेक्टराकडे अर्जी करतील, तेव्हां कलेक्टरानें, त्याचें, त्याबरोबरीच्या पैशाच्या पट्टीच्या रूपांत रूपांतर केलें पाहिजे.

१९-ब. जेव्हां अशा प्रकारच्या ऐनजिनसी वसूल करण्याच्या हक्काचें त्याबरोबरीच्या पैशाच्या पट्टीच्या रूपांत रूपांतर करण्यांत आलें असेल, तेव्हां सबंध असलेल्या वारचा वतनदारांच्या संबंध समूहास किंवा त्यांच्यांतील बहुसंख्य लोकांस, तो, तो देण्यास जे पात्र असतील त्यांजकडून वसूल करून घेण्याबद्दल कलेक्टराकडे अर्जी करण्याचा अधिकार आहे. नंतर कलेक्टरानें तो जमीन महसुलाबरोबर व त्याचा भाग म्हणून वसूल केला पाहिजे, व त्याबाबद हक्कदार असलेल्या त्या वतनदारांस सरकारी तिजोरीतून तो देण्याबद्दल फर्माविलें पाहिजे.

१९-क. जेव्हां ऐनजिनसी वसूल करण्याचा असा हक्क, रयत व सरकार या दोघांचीहि नोकरी करण्याबद्दल संयुक्त मोबदला समजण्यांत येत असेल अशा बाबतींत, ऐनजिनसी वसूल करण्याबद्दलच्या ज्यांच्या हक्कांचें पैशाच्या पट्टींत रूपांतर करण्यांत आलें असेल अशा वारच्या वतनदारांच्या सबंध समूहास किंवा त्यांच्यातील बहुसंख्य लोकांस, सदरहू पैशाच्या पट्टीपैकीं, सरकारची नोकरी करण्याबद्दल त्यांस किती पट्टी येणें आहे व रयतांची नोकरी करण्याबद्दल त्यांस किती पट्टी येणें आहे तें ठरविण्याबाबत कलेक्टराकडे अर्जी करण्याचा अधिकार आहे. नंतर कलेक्टराने अशा प्रकारचा निवाडा दिला पाहिजे, व त्याचा निकाल अखेरचा समजला पाहिजे.

१९-ड–१९-क. कलमांत उल्लेख केल्या प्रकारच्या निवाड्यासाठीं ज्यांनी अर्जी केली असेल अशा, वारच्या वतनदारांच्या सबंध समूहाच्या किंवा त्यांच्यातील बहुसंख्य इसमांच्या, रयतांची कोणतीही नोकरी करण्याचे नाकारणें, मर्जीवर असलें पाहिजे. मात्र या बाबतीतील आपला निर्णय त्यांनी कलेक्टरास लेखी कळविलेला असला पाहिजे. अशाप्रकारें मर्जीप्रमाणे नोकरी करण्याचें नाकारल्याचे बाबतींत, अशाप्रकारें मर्जी चालविणारे (नोकरी करण्याचें नाकारणारे) वतनदार रयतांची नोकरी करण्याबद्दल त्यांस येणें असलेल्या पैशाच्या पट्टीच्या तेवढ्या भागास मुकतील.

७. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट ३ रा याच्या २१ व्या कलमाची सुधारणा.—२१ व्या कलमांतील ' त्या मुदतीचे ' या शब्दांच्या ऐवजी, ' त्या दहा वर्षांहून जास्त नाहीं अशा मुदतीचे ' हे शब्द दाखल करावे.

८. सन १८७४ चा मुंबईचा आक्ट ३ रा याच्या ८३ व्या कलमाची सुधारणा.—८३ व्या कलमाच्या बदला पुढील कलम दाखल करावें, तें येणेंप्रमाणे :—

" ८३. हा आक्ट पास झाल्यानंतर, ५८ वे कलमांत इतर रीतीचा ठराव केला आहे तो खेरीज करून, सरकारनें, कोणत्याहि वंशपरंपरेच्या हुद्याचीं जीं कर्तव्यकर्मे असतील तीं निर्दिष्ट करणाऱ्या कानू केल्या पाहिजेत.

मात्र असें ठरविण्यांत येत आहे, कीं अशा रीतीनें केलेल्या कानू, त्या मुंबईच्या कायदे-कौन्सिलच्या पुढील बैठकीच्या अगोदर एक महिना मुंबई सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध करण्यांत आलेल्या असल्याशिवाय अंमलांत येतां कामा नयेत, व त्या, सदरहू कौन्सिलच्या, त्याच्या पुढील बैठकींत मांडलेल्या ठरावाने रद्द केल्या जाण्यास किंवा दुरुस्त केल्या जाण्यास पात्र असतील. ''

## हेतु व कारणें यांचें निरूपण

या आक्टाच्या मसुद्यांचे हेतु पुढीलप्रमाणें आहेत :—

१. वहिवाटदार वतनदारांच्या मेहनताऱ्याबाबद अधिक चांगली तजवीज करणें.

२. कनिष्ठ दर्ज्याच्या वंशपरंपरेच्या गांवकामगारांच्या वतनांचा बदला करण्यास परवानगी देणें.

३. बलुत्याचे पैशाच्या पट्टीत रूपांतर करण्याबाबद ठराव करणें.

४. कनिष्ठ दर्जाचें वतन धारण करणारांस, रयतांची चाकरी करण्याच्या पात्रतेपासून आपणां स्वतःस मुक्त करू देणें.

५. वहिवाटदार वतनदारांची कर्तव्यकर्मे निश्चित करणें.'' [१]

● ● ●

[१] : बहिष्कृत भारत : ता. ७ डिसेंबर १९२८.

# परिशिष्ट–४३

## जंगली जातीं

**मुंबई इलाख्यांतील अस्पृश्य व जंगली जातींची चौकशी करण्यासाठीं कमिटी.**

मुंबई कौन्सिलच्या गेल्या अधिवेशनांत पास झालेल्या डॉ. सोलंकी यांच्या ठरावानुसार मुंबई इलाख्यांतील अस्पृश्य व भिल्ल, गोंड वगैरे जंगली जाती यांच्या सामाजिक, सांपत्तिक व शिक्षणविषयक गाऱ्हाण्यांची चौकशी करण्यासाठी खालील कमिटी मुंबई सरकारनें नेमली आहे.

अध्यक्ष :–मि. ओ. एच्. बी. स्टार्ट, आय्. सी. एस्.

सभासद :–रा. सा. जे. के. मेहता.

'' डॉ. पी. जी. सोलंकी

'' डॉ. भिमराव आंबेडकर

'' श्री. एल्. एम्. देशपांडे

'' श्री. पंडिताप्पा चिकोडी

'' मेजर बू फूट, मुक्तीफौज, मुंबई

'' श्री. अमृतलाल ठक्कर

'' श्री. एन्. ए. थोरात

'' श्री. डी. ए. जानवेकर

कमिटीच्या चौकशींचें काम ता. १५ पासून सुरूं झालें. कमिटीनें आपला रिपोर्ट एक वर्षाचे आंत करावयाचा आहे.

या कमिटीकडे कोणाला कांहीं सूचना पाठवायच्या झाल्यास, त्या डॉ. आंबेडकरांकडे पाठवाव्या, म्हणजे त्यांची योग्य ती व्यवस्था होईल.



---

बहिष्कृत भारत : ता. ७ डिसेंबर १९२८.

# परिशिष्ट–४४

## नाशिक जिल्हा हिंदु समाज समता संघ.

या संघाची स्थापना विजयादशमीच्या दिवशीं झाली असून, तिचे उद्देश खालीलप्रमाणें आहेत.

(१) स्पृश्य व अस्पृश्य यांमध्यें जुन्या रूढीस अनुसरून जो भेदाभेद मानला जातो, तो दूर करणें.

(२) अस्पृश्य लोक हे हिंदूच असल्यामुळें हिंदूंचे सर्व हक्क त्यांना आहेत, असें लोकांचे नजरेस आणून देणें.

(३) शक्य ती खटपट करून, त्यांस समसमान दर्जा प्राप्त करून देऊन, असलेली असमानता नाहींशी करणें.

वरील उद्देश पार पाडण्याकरितां संघाच्या सभासदांनी सध्यां खालील कामें पार पाडण्याचें योजिलें आहे.

(१) भंगी आळींत असलेल्या भंग्याचे देवळांत निदान महिन्यांतून एकदा तरी सर्व हिंदूंनी एकत्र प्रार्थना करणे.

(२) वारंवार सहभोजनांचे कार्यक्रम घडवून आणणें.

(३) जिल्ह्यांतील सर्व शाळा, देवालयें, व इतर सार्वजनिक संस्थांमध्ये समाजाची समता राहील अशा तऱ्हेने खटपट करणें.

**संघाची घटना.**

अध्यक्ष :–श्री. आर. जे. वैद्य.

उपाध्यक्ष :–श्री. के. एस्. दिक्षित.

सेक्रेटरी :–श्री. जी. व्ही. पोतनीस.

" श्री. भा. कृ. गायकवाड.

खजिनदार :–श्री. व्ही. पी. साठये.



बहिष्कृत भारत : ता. ७ डिसेंबर १९२८.

# परिशिष्ट–४५
# बळीचे बलाढ्य सुराज्य फसवून का घेतले ?

बळी राजा आणि वामन यांच्या विषयी ज्ञानकोषात खालीलप्रमाणे माहिती दिली आहे :

" वामन—चालू मन्वंतरात सातच्या पर्यायांतील त्रेतायुगात कश्यपापासून आदितीच्या ठायी झालेल्या विष्णुचा अवतार."[१]

"बलि—प्रल्हादपुत्र विरोचनाचा मुलगा हा इंद्रपदासाठी शंभरावा यज्ञ करीत असतां विष्णूनें वामनाचें रूप घेऊन याच्या जवळून त्रिपाद भूमीचें दान मिळविलें व यास पाताळात घातलें. हा सप्तचिरंजीवा पैकी एक आहे."[२]

वरील वामनाच्या तथाकथित कृतीचे सद्सद्विवेक बुद्धीने विचक्षणा करताना महात्मा फुले स्वतःच प्रश्न उपस्थित करून त्याची उत्तरे खालीलप्रमाणे देतात :

**धों.**—तर मग आदिनारायणानें बळीस पाताळी घालण्याकरितां वामनाचा अवतार घेंतला. त्या वामनानें भिकाऱ्याचें सोंग घेऊन बळीराजास फसवून,त्यापासून तीन पाउलें पृथ्वी मागून घेतली. नंतर त्यांनें भिकाऱ्याचें सोंग टाकून इतका मोठा अगडबंब मनुष्य बनला कीं, त्यानें एकंदर सर्व पृथ्वी आणि आकाश आपल्या दोन्हीं पाऊलांत आटवून बळीराजास विचारलें की आतां मीं तिसरे पाऊल कोठे ठेवावें ? नंतर बळीराजानें लाचार होऊन त्या अगडबंब्यास असें उत्तर दिलें कीं, तू आतां आपले तिसरें पाऊल माज्या मस्तकावर ठेव. असें म्हणतांच त्या बंब्यानें बळीराजाच्या मस्तकावर आपलें तिसरें पाऊल ठेवून बळीस पाताळी घालून आपला करार पुरा करून घेतला, असें त्याचे उपाध्यांनी भागवत वगैरे इतिहासांत लिहून ठेविलें आहे, तें सर्व तुमच्या या हकीकतीवरून खोटें आहे असें सिद्ध होतें. तर याविषयीं तुमचा काय अभिप्राय आहे तो कळूं द्या.

**जो.**—आतां यावरून तूंच विचार करून पहा कीं, जेव्हां त्या बंब्याने आपल्या दोन पावलांत एकंदर सर्व पृथ्वी आणि आकाश आटविलें, तेंव्हा त्या बंब्याच्या पहिल्या पावलाखालीं कित्येक गावें चेंगरून लयास गेलीं असतींल, नाहीं बरें?

---

[१] : श्री. व्यं. केतकर, महाराष्ट्रीय ज्ञानकोष, भाग २० वा. पृ. १४८.

[२] : तत्रैव, भाग १८ वा. पृ. ४६.

दुसरें असें कीं, त्या बंब्याने जेव्हां आपले दुसरे पाऊल आकाशांत ठेवितेवेळीं तेथें अतिशय दाटी झाल्यामुळे कित्येक ताऱ्यांचा एकमेकांवर आदळून चुराडा झाला असेल कीं नाहीं बरें! तिसरें असें कीं, त्या बंब्यानें आपल्या दुसऱ्या पावलांत जर सर्व आकाश आटविलें तर त्याचें कंबरेपासून वरचें धड कोठें राहिले असावे? कारण मनुष्यांचें दुसरे पाऊल फार झालें तर त्यांच्या बेंबटापर्यंत ऊंच आकाशांत पोहचूं शकतें. यावरून त्या बंब्याचें कंबरेपासून त्यांच्या मस्तकापर्यंत आकाश उरलें असेल, त्यात अथवा त्या बंब्याने आपल्याच माथ्यावर आपलें तिसरें पाऊल ठेवून आपला करार पुरा करून घेण्यांचे एकिकडेस ठेवून त्याने केवळ दगेबाजी करून आपलें तिसरें पाऊल बळीराजाच्या मस्तकावर ठेवून त्याला पाताळीं घातलें, हें कसें ?

**धों.**—काय तो बंब्या आदिनारायणाचा अवतार ना? आणि त्याच्यानें अशी ढळढळीत दगलबाजी कशी करवली? अशा लबाडास आदिनारायणाचा अवतार म्हणणाऱ्या इतिहासकर्त्यास धिःक्कार असो. कारण त्यांच्याच लेखांवरून वामन हा कपटी, घातकी आणि कृतघ्न होता; असें सिद्ध होतें, की ज्यानें आपल्या दात्यास कपटानें पाताळीं घातलें.

**जो.**—चवथें असें कीं, त्या बंब्याचें डोकें जेव्हां आकाशापलीकडेस स्वर्गात ऊंच गेलें असेल, तेंव्हां त्यास तेथून बळीस फारच मोठ्यानें ओरडून विचारावें लागलें असेल कीं, आता माझ्या दोन पावलांतच एकंदर सर्व पृथ्वी आणि आकाश आटलें, यास्तव आतां मीं माझें तिसरें पाऊल कोठे ठेवून आपली कबुलायत पुरी करून घ्यावी ? कारण आकाशांतील त्या बंब्याचें मुख आणि पृथ्वीवरील बळीराजा यांमध्ये अनंत कोसांचें अंतर पडलें असेंल; आणि त्यापैकी रशियन, फ्रेंच, इंग्लिश आणि अमेरिकन वगैरे लोकांपैकी एकाही मनुष्यांस त्या भाषणापैकी एक शब्दसुद्धा ऐकूं गेला नाहीं, हें कसे? व त्याप्रमाणें पृथ्वीवरील मानव बळीराजानें त्या बंब्यास उत्तर दिलें कीं, तूं आपलें तिसरें पाऊल माझ्या मस्तकावर ठेव. हें तरी त्या बंब्यास कसें ऐकू गेलें असेल ? कारण, बळी कांही त्यासारिखा विचित्र प्राणी बनला नव्हता. पाचवें असें कीं, त्या बंब्याच्या भारानें ही पृथ्वी रसातळात गेली नाही, हे मोठें आश्चर्य होय.

**धों.**—नाहीं तर आपण हे दिवस कोठून पाहिले असते बरें? त्या बंब्यानें काय काय खाऊन आपला जीव वांचविला असेल ? अहो, तो बंब्या मेला असेल तेव्हा त्याच्या त्या अगडबंब मढ्यास स्मशानांत नेण्याकरितां चौघे खांदेकरी तरी कोठून मिळाले असतील? कदाचित त्यास जागच्या जागींच लाकडे रचून जाळलें असेल म्हणावें, तर त्यास जाळण्यापुरतीं लांकडें किंवा गोंवऱ्या तरी कोठून मिळाल्या

असतील ? बरें तसल्या मढ्यास जाळण्यापुरतीं लांकडें मिळालीं नसतील म्हणावें तर त्याचा जागचें जागींच कोल्ह्याकुत्रांनीं खाऊन भंडारा केला असेल काय? सारांश, भागवत वगैरे सर्व ग्रंथांवरून जर सदरीं लिहिलेल्या शंकांचे निवारण होत नाहीं, तर उपाध्यांनीं मागाहून संधी पाहून एकंदर सर्व मूळच्या दंतकथांवरून हे सर्व ग्रंथ केले असावेत असें सिद्ध होतें.

**जो.**—बाबा! तूं तें भागवत एक वेळ वाचून पहा, म्हणजे तुला त्यापेक्षां इसापनीति बरी वाटूं लागेल.

महात्मा फुले यांनी धर्मग्रंथात जे बळी आणि वामन यांच्या विषयी अंधश्रध्दायुक्त कथानक दर्शविले आहे त्याचे वरील प्रमाणे मुद्देसूद आणि वैज्ञानिक दृष्ट्या खंडण करताना वामनाने बळीच्या राज्यावर जे आकस्मिकरित्या आक्रमण केले त्याचे वर्णन केले आहे. ते म्हणतात,

'बळीच्या राज्यात संपुर्ण महाराष्ट्र आणि अयोध्या जवळ काशीक्षेत्राचे आसपास असलेले क्षेत्रे समाविष्ट होते. वामन आपल्या सर्व फौजेसहित बळीच्या राज्यांत एकदम शिरून तो बळीच्या मुख्य राजधानी जवळ येऊन भिडला. बळीला वामनाने केलेल्या आकस्मिक आक्रमणाची कल्पना नसल्यामुळे तो भाद्रपद वद्य प्रतिपदेपासून वद्य अमावस्ये पावेतो आपल्या तुटपुंज्या फौजेसहित लढला. त्याला आपल्या सर्व खंडातील फौजा युद्धासाठी बोलविण्यास वेळ सुद्धा मिळाला नाही. परिणामी आश्विन शुद्ध अष्टमीस रात्री बळी राजाचा पराजय झाला. बळी रणांगणी पडल्यावर बाणासुराने वामनाशी एक दिवसभर हालिशीं हाल देऊन मोठ्या निकराने लढला. नंतर त्याने आश्विन शुद्ध नवमीस रात्री आपली उरलेली फौज बरोबर घेऊन पळून गेला.

बाणासुराचे लोक आश्विन शुद्ध दशमीस रात्री आपल्या घरोघर गेले, तेव्हां त्यांच्या स्त्रियांनी पुढें दुसरा बळी येऊन देवाचें राज्य स्थापिल, याविषयी भविष्य जाणून त्यांनी आपल्या उंबऱ्यात उभ्या राहून त्यांस ओंवाळून अशा म्हणाल्या कीं, '' इडापिडा (द्विजांचा अधिकार) जावो आणि बळीचें राज्य येवो.'' त्या दिवसापासून आजदिवसपर्यंत शेंकडों वर्षांची वर्षे लोटली, तथापि बळीच्या राज्यांतील कित्येक भागांमध्ये क्षत्रीय वंशांच्या स्त्रियांनी दरवर्षी आश्विन शुद्ध दसमीस संध्याकाळी आपापल्या पतीस व पुत्रास ओवाळून पुढें येणाऱ्या बळींचे राज्य यावे म्हणून इच्छिण्याचे अद्याप सोडिले नाही.

मागाहून बळीराजाने बोलावलेले सरदार आपापल्या फौजा घेऊन आश्विन शुद्ध चतुर्दशीस बाणासुरास येऊन मिळतांच बळीच्या राज्यातील एकंदर सर्व विप्र आपले जीव घेऊन वामनाकडे पळून गेले. त्याने आपल्या एकंदर सर्व विप्रांस

जमा करून पुढें बाणासुरापासून आपला बचाव कसा करून घ्यावा म्हणून आश्विन शुद्ध पौर्णिमेस (कुजागरी) सर्व रात्रभर जागर फांसे टाकीत बसला. नंतर बाणासुराने वामनावर एकदम हल्ला करून त्याचा अगदी मोड करून त्याजवळचें सर्व लुटून घेतले. नंतर त्यास त्यांच्या सर्व लोकांसहित प्रथमतः त्याने आपल्या मुलुखांतून जरजर करून हिमालय पर्वतावर हाकलून दिले.

यावरून येथील एकंदर सर्व आबालवृध्द स्त्रियांस जो काय आनंद झाला की त्यांनी कार्तिक शुद्ध द्वितियेस आपापल्या बांधवांस यथाशक्ति भोजन घालून तृप्त केल्यानंतर त्यांनी त्यांस ओवाळून "इडा पीडा जावो आणि बळीचे राज्य येवो " अशी त्या येणाऱ्या बळीची आठवण दिली.[१]

पद्मपुराणात बळी विषयी खालील प्रमाणे उल्लेख आहे.

बलिनमि महादैत्यो देवारिरपराजतः ।
धर्मेणयश साचैवप्रजा संरक्षणेच ।।
तस्मिन् शासति राज्यंतु त्रैलोक्या हतकष्टकम् ।
नारयो व्याधयोवाडपि नाधयोया कथं च न ।।
अनावृष्टिरधर्मो वा नास्ति शब्दो न दुर्जनः ।
स्वप्ने ऽ पि नैव दृश्यते बलौ राज्य प्रशासति ।।

अर्थात, बळी नावाचा महादैत्य हा देवांचा शत्रु व तो अपराजेय होता. धर्म, यश व प्रजा रक्षणात तो अत्यंत सतर्क होता. बळीच्या राज्यात कुणालाही दुःख नव्हते, कुणी कुणाचा शत्रू नव्हता, कुणाला कशाची चिंता नव्हती. त्याच्या शासन काळात तिन्ही लोकांचे दुःख, कष्ट दूर झाले होते. त्याच्या राज्यात पाण्याची कमतरता नव्हती, गुंडगिरी, बदमाशी नव्हती आणि स्वप्नात देखील असे प्रकार कुणाला दिसत नव्हते.

वैदिक धर्म खंड (भाग-१) या पुस्तकात संस्कृतचे ब्राह्मण विद्वान श्री. दा. सातवळेकर यांनी भागवत पुराणाच्या आधारे लिहिलेल्या 'वामनावताराचा संदेश' या प्रकणात बळी विषयी म्हटले आहे.—

> बळीच्या राज्यात कोणास उघड त्रास होत नव्हता. सर्वांना सारखा न्याय मिळत होता. कोणताही असूर पूर्वीप्रमाणे आर्यदिका ला हाणमार करत नव्हता.

---

[१] : महात्मा फुले : समग्र वाङ्मय, सुधारित पाचवी आवृत्ती–२८-११-१९९१ पृ. १५०–१५५.

हे सर्व असूनही बळीचा द्वेष इथले आर्यवादी आजही करतात तो का? कारण बळी हा आर्य वंशीय नव्हता. तो असूर होता. त्याच्या राज्यांत समानता होती. आर्य ब्राह्मणांनाही खायला प्यायला कमी नव्हते. तथापि 'ऐश्वर्य, यश व जागा या देवांना वा आर्यांना न मिळता त्या सर्व दैत्यांना मिळत असत.' भौतिक सुखापेक्षाही सत्तास्थाने महत्त्वाची आहेत आणि त्याशिवाय सुख कुचकामाचे असा वामनाने बळीचा पराजय करून संदेश दिला.

बळीचे राज्य सुराज्य होते यात शंका नाही. पण स्वराज्याच्या बद्दल ते कोणीही स्वीकारणार नाही व कोणाही समंजस माणसाने ते तसे स्वीकारू नये, हे मोठे तत्त्व वामनावताराने सांगितले म्हणून जग असे पर्यंत सर्व राजनीतिज्ञ-पुरुष वामनाचे गोडवे गातील यात शंका नाही.''[१]

● ● ●

---

[१] : उद्घृत : समतेसाठी बहुजन संघर्ष, विशेषांक १९८६.

# परिशिष्ट–४६
# श्रीक्षेत्र काशी येथील ब्राह्मण महासंमेलनापुढे चर्चेसाठी आलेली प्रश्नावली व तिचीं धर्मगुरूंनी दिलेलीं निर्णयात्मक उत्तरे

श्रीक्षेत्र काशी येथे भरलेले अखिल भारत ब्राह्मण महासंमेलनापुढें आलेली प्रश्नावली व तिला धर्मगुरूंनी दिलेलीं उत्तरे यांचें मराठी भाषांतर पत्रकरूपानें नुकतेंच प्रसिद्ध झालें असून त्याखाली रा. रंगाचार्य रेड्डी, गोपाळ शंकर दंडगांवकर, रंगनाथ शास्त्री नाशीककर, विश्वास बळंवत डावरे, विष्णू नारायण मवाळ, विद्याधर कृष्णाजी शहरकर व त्र्यंबक नरहर श्रीगोंदेकर यांच्या सह्या आहेत. ही मंडळी पुणें येथील विद्वत्सभा व शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन महाराष्ट्रीय ब्राह्मणसभा या संस्थांचे प्रतिनिधी म्हणून काशी येथील संमेलनास हजर होती. ही प्रश्नोत्तरें लोकांच्या माहितीसाठी पुढे दिलीं आहेत. त्यावरून काशीच्या या ब्राह्मण महासंमेलनाचें स्वरूप सर्वांना कळून येईलच. प्रश्नोत्तरे पुढीलप्रमाणे आहेत :—

**प्रश्न**

१. स्त्रियांच्या व पुरुषांच्या विवाहकालाची मर्यादा कोठपासून कोठपर्यंत शास्त्रसंमत आहे ?

२. स्त्रीला ऋतु प्राप्त झाल्यानंतर होणारा विवाह हा मुख्य का गौण का आपद्धर्म म्हणून समाजावयाचा ?

३. चालू परिस्थितीस व शास्त्रास अनुसरून विवाहकालमर्यादेचें नियमन (कायदा) करणें किती वयापर्यंत योग्य होईल ?

४. कन्येस ऋतु प्राप्त झाला असतां वृषलीत्व सांगणाऱ्या वचनांचा आशय काय ?

५. ब्राह्मणादिजातीमध्यें पोटजातींत परस्पर विवाह संबंध होणें शास्त्रसंमत आहे किंवा नाहीं ?

६. धर्मज्ञ कोण व ते कशा प्रकारचे धर्मपरिवर्तन करूं शकतांत ? ( काय संकोचस्वरूपाचें अथवा प्रवृत्तिस्वरूपाचे ? )

७. विधवाविवाह व विवाहसंबंधपरित्याग शास्त्रदृष्ट्या योग्य आहे कीं अयोग्य आहे कीं निंद्य आहे ?

८. अस्पृश्य वर्गांचे हें जातितः आहे कीं कर्मतः आहे ?

९. म्लेंच्छ व अंत्यज यांचा स्पर्श, सभेत प्रवेश, विहिरीचें पाणी घेणें व देवळांत प्रवेश या गोष्टींत इतरांपेक्षां तारतम्य राखणें योग्य कीं अयोग्य ? जर तें योग्य असेल तर तें कोणत्या प्रकारचें राखावें ?

१०. भागवतधर्मदीक्षा ही (याच जन्मीं) उच्च जातीला प्राप्त करून देणारी आहे कीं नाहीं ?

११. यवनादि जाति ह्या काय कर्मांने झाल्या आहेत अथवा जन्मानें झाल्या आहेत ?

१२. भागवतधर्मदीक्षेविषयीं जातिविशेष हा प्रतिबंधक आहे कीं नाही ?

१३. शूलपाणि वगैरे ग्रंथकारांच्या व्यवस्थेप्रमाणें देवलस्मृतीचें प्रामाण्य स्वीकारावें कीं नाहीं ?

१४. म्लेंच्छसंसर्गानें येणाऱ्या प्रायश्चित मर्यादा किती कालपर्यंत ?

१५. एक संवत्सरपर्यंत म्लेंच्छाशीं संसर्ग करणाऱ्याच्या व त्यापेक्षां अधिक काल सर्व प्रकारच्या म्लेंच्छांबरोवर संसर्ग करणाऱ्यांच्या प्रायश्चिताविषयीं व व्यवहाराविषयीं सारखेपणा आहे कां कांही भिन्नता आहे ?

१६. व्रात्यसंस्कार किती पिढ्यापर्यंत शास्त्रानें करितां येतो ?

१७. जाति ही या जन्मांतील कर्मानें प्राप्त होतें व ती अनिश्चित असते कां जन्मानें प्राप्त होते व निश्चित असते ?

## उत्तरे

१-३. स्त्रियांच्या विवाहविषयीं गर्भस्थितीपासून आठवें वर्ष हा मुख्य काल होय. नववें व दहावें वर्ष हा मध्यम काल. नंतर ऋतुदर्शनापर्यंत गौण काल आणि ऋतुदर्शनानंतरचा काल सर्व प्रकारें निंद्य होय.

२. चालूं परिस्थितीला अनुसरूनहि आठ वर्षापासून तों ऋतुदर्शन होईपर्यंत स्त्रियांचा विवाह करूं नये असा कायदा करणें सर्वथा अयोग्य होय.

४. वृषलीत्वबोधक वचनांचें तात्पर्य धर्मकार्यानर्हत्त्वविषयीं समजावें (ता. २०/११/२८ च्या केसरींत प्रायश्चित्तानेंहि त्याची निवृत्ति होत नाहीं, असें छापलें आहे तें निर्मूल आहे. )

५. पोटजातींत परस्पर विवाह करणें हें निंद्य होय.

६. धर्मज्ञ मन्वादिक होत. ते सुद्धां स्वतंत्रपणें धर्मपरिवर्तन करण्यास समर्थ नाहींत.

७. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांतील विधवाविवाह व विवाहसंबंध-परित्याग ह्या गोष्टीं सर्व प्रकारें निषिद्ध होत.

८. म्लेंछ, चांडाल इत्यादिकांचें अस्पृश्यत्व हें जातितः होय व त्यांच्यांत समाविष्ट झालेल्यांचें कर्मामुळें होय.

९. धर्मदृष्टींनें पाहिलें तर प्रस्तुतच्या म्लेंछांना व चांडालांना अस्पृश्यत्व, देऊळ, सभा वगैरेत प्रवेशानर्हत्व व त्यांच्या पात्रांनी स्पृष्ट झालेल्या कूपोदकांचें अग्राह्यत्व या गोष्टी शास्त्रानें सर्वथा सांगितल्या आहेत. या शास्त्रांज्ञांचें रक्षण करणें अवश्य आहे.

१०. मंत्रग्रहणादिस्वरूपी भागवतदीक्षा ही या जन्मामध्यें उत्कृष्ट जातीची प्राप्ति करून देणारी नसते.

११. यवनादि जाति ह्या जन्मानेंच सिद्ध आहेत.

१२. ओंकाररहित अशा कांहीं नाममंत्रांविषयीं जातिविशेष प्रतिबंध नाहीं. (याला सर्व आचार्यांची संमति आहे.) कांहीं विशिष्ट धर्मविषयक जे मंत्र आहेत ते सोडून अन्यत्र [ जातिविशेष हा ] प्रतिबंधक आहेच. [ तेङ्गल संप्रदायी श्रीवैष्णवांचें असें मत आहे. ]

१३. शूलपाणि यानें स्वीकारलेल्या व्यवस्थेप्रमाणें देवलस्मृतीला प्रामाण्य मानण्याविषयीं कांहीं बाधक नाहीं.

१४. बलात्कारानें दास्य करावयास लावलेल्या पुरुषास तीन वर्षेपर्यंत म्लेंछाचा संसर्ग घडेल तर मन्वादिकांनी सांगितलेल्या व्यवस्थेप्रमाणें प्रायश्चित्तानें शुद्धि होते ही गोष्ट सर्व निबंधकारांना मान्य आहे. इच्छेनें म्लेंच्छस्त्रीबरोबर एकवार संग घडेल तर पातित्व येतें. एका पात्रांत भोजन करणें असा विशेष संसर्ग स्वेच्छेनें चोविस वेळां घडेल तरीही पातित्यच येते. एका पंक्तीत बसून भोजनादिक स्वेच्छेनें केलें तर एक वर्षानें पतित होतो.

१५. वर सांगितलेल्या अवधीनंतर प्रायश्चित केलें तरी अव्यवहार्यता असते. याचप्रमाणे वर सांगितल्याप्रमाणेंच संसर्ग घडेल तर विदेशाहून (विलायतेहून) परत आलेल्याविषयीं (समजावें.).

१६. व्रात्यसंस्कार हा तीन पुरुषांपर्यंत (बाप, मुलगा, नातु व पणतु येथपर्यंत) प्रशस्त आहें.

१७. चातुर्वर्ण्य हें जन्मानें सिद्ध आहे, तें या जन्मातील कर्मांनीं सिद्ध होणारें नव्हें,

●●●

---

बहिष्कृत भारत : ता. २१ डिसेंबर १९२८.

# परिशिष्ट–४७
# पेरियार रामास्वामी नायकर

पेरियार अिरोड व्यकंट रामास्वामी नायकर (१८७९–१९७४).—मद्रास अिलाख्यातील ऱ्हारोट गावी गर्भश्रीमंत ब्राह्मणेत्तर घराण्यात जन्म. अंधश्रद्धा, धार्मिक थोतांड, जातिभेद, अस्पृश्यता याबद्दल तीव्र नापसंती. स्त्रीच्या गळ्यातील मंगळसूत्र म्हणजे पातिव्रत्याचे लक्षण ही मुर्खपणाची वेडगळ कल्पना म्हणून स्वतःच्या पत्नीच्या गळ्यातील मंगळसूत्र काढून फेकले होते. स्वातंत्र्य चळवळीत म. गांधीबरोबर भाग घेतला. अस्पृश्यांच्या हक्कासाठी वैकम सत्याग्रह केला. कॉंग्रेस ब्राह्मणधार्जिणी म्हणून कॉंग्रेसचा त्याग, द्रविड कझगम पक्षाची स्थापना. देव, धर्म, रूढी, परंपरा, पुराणे ह्या साऱ्या गोष्टी खालच्या लोकांना दडपण टाकण्यासाठी ब्राह्मणांनी निर्माण केल्या म्हणून तीव्र ब्राह्मण विरोधी. द्रविड संकृती आर्य संकृतीपेक्षा भिन्न म्हणून तामिळनाडूची वेगळी मागणी केली.

त्यांनी लिहिलेल्या 'The Ramayan—A True Reading' या प्रसिद्ध पुस्तकावर अनेकदा बंदी आणण्याचे प्रयत्न झाले.

त्यांचे खालील विचार त्याची क्रांतिकारकता प्रदर्शित करतात :—

" •इंग्लंड मध्ये अतिशूद्र किंवा अस्पृश्य नाही, रशियात वर्णाश्रमधर्म किंवा दैववाद नाही. अमेरिकेत कुणी ब्रह्माच्या मुखातून तर कुणी त्याच्या पायातून जन्म पावत नाही. या देशातील लोक बुद्धीमान व शहाणे आहेत. ते स्वाभिमान विकत नाही. आपणच पाशवी देव धर्म कल्पनाचे बळी का व्हावे ? देव, धर्म जर आपल्या नाशाचे कारण असेल तर त्याला नष्ट करा. मनुस्मृती, गीता वा इतर कोणतेही पुराण आपल्या नाशाला कारणीभूत असतील तर त्यांनाही आग लावा, ते जर देवळे, सण असतील तर त्यांचा बहिष्कार करा. शेवटी, जर राजकारण त्यासाठी कारणीभूत असेल तर तसे स्पष्टपणे जाहीर करा.

**•हिंदू अडाणीपणा**

•हिंदुला आपल्या धर्माबद्दल सविस्तर ज्ञान आहे का ? तो केव्हा आणि कुणी सुरू केला हे माहित आहे का ? आपण सारासार (Rational) विवेक करत असू तर आपणास हिंदुधर्माची गरज आहे का ?

•काही जण म्हणतात हिंदुधर्म हा वैदिक धर्म आहे. तसे असेल तर वेद कुठे आहेत? मी त्यांना पाहू शकतो का? मी ते वाचू शकतो का? तुम्ही म्हणत असाल की तुम्ही वेदांना स्पर्शू नका वा पाहू नका तर तुम्ही ते जोरात वाचा म्हणजे मी

ऐकू शकेल. मी म्हणतो हिंदुत्व ही एक प्रचंड ढोंगबाजी आहे. याउप्पर आम्ही हिंदुधर्मा बरोबर मुर्ख बनून राहू इच्छित नाही. या धर्माने आजपावेतो आमचे खूप काही नासवले आहे. त्याने आमचा बुद्धीनाश केला आहे. आमचे सत्व हरण केले आहे.

•या धर्माने आमचे भवितव्य बुडवले, आम्हाला हजारो प्रकारात विभाजित केले. नीच व श्रेष्ठ ठरवण्या करता धर्माची गरज आहे का ? शत्रुचा द्वेष निर्माण करणारा धर्म आम्हाला नको आहे. अर्थशून्य, निरूपयोगी आणि लोकांच्या प्रगतीच्या आड येणारा असे हिंदुधर्माचे स्वरूप असतांना आम्ही त्यात का राहावे? वेडगळपणा, अनैतिक, ढोंगबाजी यांची चलती होती त्याकाळी हिंदू धर्माची उत्पति झाली आहे. आम्ही आज त्या पाशवी काळात नाही. आणि त्या धर्माला चिकटून राहू शकत नाही. माणसाला धर्माची गरजच असेलतर त्यात आधुनिक युगाला साजेशी सुधारणा करायला हवी. धर्म ही आवश्यक बाब नाही. माणूस स्वतः अनुभव व शहाणपणाच्या आधारावर आपले जीवण बनवू शकतो. हिंदू धर्म ही एक विकृती आहे. तो कुठल्याही अर्थाने आपल्या उपयोगाचा नाही.

**•प्रत्येक जातीला संख्या प्रमाणात राखीव जागा**

•मला वाटते प्रत्येक जाती-जमातीला तिच्या लोकसंख्येच्या प्रमाणात राखीव जागा द्यायला हव्यात. एखादी जात तिच्या लोकसंख्या प्रमाणापेक्षा १ टक्का देखील जास्त जागा घेत असेल तर सरकारने अशा वेळी कारवाई करायला हवी. हा एका जातीने दुसऱ्या जातीच्या अधिकारावर अधिक्रमण करण्याचा प्रकार आहे. या ठिकाणी कायदा आड यायला हवा. नाहीतर पुढारलेले आणखी पुढे जातील व मागास आणखी मागे जातील. स्वातंत्र्यानंतर ब्राह्मणांना जास्त जागा मिळायला लागल्या आहेत. त्यांची झपाट्याने प्रगती होते आहे. इंग्रजाच्या काळी आय.सी.एस. परीक्षा लंडणमध्ये होई. सर्व खर्च सरकार करत असे आणि त्यामुळे ब्राह्मण सहज पास होत.

•८७ टक्के जनता वंचित ठेवणे ही लोकशाही आहे का? ३ टक्के लोकांचा एकाधिकार असणे हा न्याय आहे का? आपल्या हक्कासाठी झगडणे चूक कसे? आम्हाला न्याय हवा इज्जत हवी आहे. आमचा वाटा हवा आहे. आम्ही हे सर्व मागतो तेव्हा कुणाला राग येण्याचे कारण काय ?

•आम्हाला अंगभर कपडा मिळत नाही. राहायला घर नाही. शाळांची वानवा आहे. जगण्याची निश्चिती नाही. चोऱ्या, दरोडे, खून, कलम १४४ हे

तर सततच असतात. हे सर्व असताना आज स्वराज्य आहे हे कसे मानावे ? आम्हाला असे स्वराज्य पाहिजे जिथे कुणी शूद्र असणार नाही. कसल्याही प्रकारचे शोषण असणार नाही. आम्हाला हवे आहे ते असे स्वराज्य.

•जे स्वतः स्वाभिमान, अस्मिता, प्रतिष्ठा यांची पर्वा करत नाही ते राष्ट्रवादाच्या कल्पनेला बळी पडतात. देश खराखुरा स्वतंत्र व्हायचा असेल तर धर्म, सत्ता व सरकार यात क्रांतीकारी बदल व्हायला पाहिजे. ही दृष्टी असल्याशिवाय राजकारणावरील टीका उपयोगाची नाही. आंधळे हल्ले आपल्याला ध्येयाप्रत नेत नाहीत.''[१]

●●●

[१] : चौधरी, पेरियर ई. व्ही. रामस्वामी :
जीवन व विचार पृ. १२-१३.

# व्यक्ती, संस्था, कार्य – सूची

**अस्पृश्यता निवारणाचा जाहीरनामा** :—मुंबई येथे सयाजीराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २३ मार्च १९१८ रोजी अखिल भारतीय अस्पृश्यतानिवारक परिषद भरली होती. तीत सभेचा मुख्य ठराव बॅ. जयकर यानी मांडला होता. तो असा—'निकृष्ट वर्गावर लादलेली अस्पृश्यता यापुढे ताबडतोब काढून टाकण्यात यावी आणि या कार्यासाठी प्रत्येक प्रांतातील वजनदार व विचारी कार्यकर्त्या पुढाऱ्यांनी एक अस्पृश्यतानिवारक जाहीरनामा काढून निकृष्ट वर्गास शाळा, दवाखाने, न्यायकचेऱ्या, सार्वजनिक खर्चाने चालविलेल्या सर्व सार्वजनिक संस्थांत तसेच विहिरी, तळे, म्युनिसिपालिटीचे नळ अशा सार्वजनिक पाणवठ्यांस, व्यवहाराची व करमणुकीची ठिकाणे व देवालया सारख्या सार्वजनिक ठिकाणी कोणत्याही प्रकारे प्रतिबंध न राहता पूर्ण मोकळीक करून द्यावी असे ह्या परिषदेचे मत आहे.' ह्या परिषदेला लो. टिळकसुद्धा उपस्थित होते. परिषदेतील ह्या जाहीरनाम्याचा मसुदा नंतर तयार करण्यात आला व त्याच्या शेकडो छापील प्रती प्रांतोप्रांती पुढाऱ्यांकडे सह्यांसाठी पाठविण्यात आल्या. त्या मसुद्याखाली जाड्या टाईपात अशी टीप होती की, " मी खाली सही करणार ठरावातल्या अटी स्वतः अक्षरशः पाळीन आणी मी स्वतः हरप्रयत्न करून दुसऱ्याकडूनही त्या पाळल्या जातील असे प्रयत्न सतत करीन." ह्या जाहीरनाम्यावर सही करण्यास लो. टिळकांनी नकार दर्शविला होता.

**अस्पृश्यतेविरूद्ध ठराव** :—१९१७ साली मिसेस् ॲनी बेझंट यांच्या अध्यक्षतेखाली कलकत्त्याला राष्ट्रीय सभेचे वार्षिक अधिवेशन भरले होते. त्या अधिवेशनात मद्रासचे मि. जी. ए. नटेसन यांनी एक ठराव मांडला होता तोच हा अस्पृश्यतेबद्दलचा ठराव होय. तो असा—" This congress urges upon the people of India the necessity, justice and righteousness of removing all disabilities imposed by custom upon the Depressed Classes the disabilities being of a most vexatious and oppressive character, subjecting those classes to considerable hardship and inconvenience." या ठरावाला मुंबईचे भुलाभाई देसाई, मलाबारचे रामा अय्यर आणि दिल्लीचे आसफ अली यांनी पाठिंबा दिला होता.

**आगरकर, गोपाळराव गणेश** (१८५६–१८९५) :—आधुनिक महाराष्ट्राचे आद्य समाजसुधारक. नामवंत मराठी निबंधकार. दारिद्र्याशी टक्कर देऊन १८८० साली एम्.ए. झाले व चिपळूणकरांनी काढलेल्या न्यू इग्लिश स्कूलात प्रवेश घेऊन स्वदेश सेवेची दीक्षा घेतली. केसरी–मराठा वृत्तपत्रे १८८१ मध्ये सुरू झाल्यावर

केसरीचे संपादकत्व आगरकरांकडे दिले गेले. ' आधी राजकीय की आधी सामाजिक ' या वादात टिळकांशी मतभेद होऊन सुधारणावादी आगरकरांनी १८८८ साली दसऱ्याच्या दिवशी ' सुधारक ' नावाचे वृत्तपत्र सुरु केले 'इष्ट असेल ते बोलणार व शक्य असेल तर ते करणार 'ह्या सुधारकी बाण्यामुळे त्यांच्या बाबतीत खुनाच्या धमक्या, जिवंतपणी प्रेतयात्रा वगैरे प्रकार झाले, परंतु लोकसेवेचे सुधारकी व्रत सुटले नाही. त्यांचे सुधारकातील व केसरीतील लेख प्रसिद्ध आहेत.

**उदगावकर, डॉ.** :—हिंदुमहासभेचे निष्ठावंत कार्यकर्ते. मुंबई हिंदुसभेचे सरचिटणीस. मुंबईच्या श्रद्धानंद अनाथ हिंदू महिलाश्रमाची अनेक वर्षे धुरा सांभाळली. हिंदुत्वाचे कट्टर अभिमानी.

**एकनाथ** :—(१५२१–१५९९) ज्ञानेश्वरानंतर व त्यांच्या खालोखाल योग्यतेचा हा संतकवी महाराष्ट्रात अत्यंत प्रिय आहे. वारकरी पंथात ज्ञानेश्वरी खालोखाल नाथांच्या भागवताला पूज्य मानले जाते. जन्म पैठण येथे व मृत्यूही तेथेच. देवगिरीचा जनार्दनपंत हा दत्तोपासक साधु यांच्या गुरू चतुःश्लोकी भागवतावरची टीका, भागवत एकादशस्कंध, रामायण, रुक्मिणी–स्वयंवर व अनेक आख्यानके व पदे यांनी रचली. त्यांची विशेष महत्त्वाची कामगिरी म्हणजे दुर्लभ व दुर्बोध झालेल्या ज्ञानेश्वरीची शुद्ध आवृती तयार करणे. हीच आवृत्ती आज लोकापुंढे आहे. यांची भारुडे ही रसाळ व रूपकात्मक आहे.

**करंदीकर, जनार्दन सखाराम** :—(१८७५–१९५९) शिक्षक, संशोधक, ज्योतिषशास्त्रज्ञ व संपादक. १९१५ मध्ये पुण्याच्या केसरीचे दुय्यम संपादक. १० जानेवारी १९३१ पासून प्रमुख संपादक, केसरी–मराठा संस्थेचे विश्वस्त टिळक, केळकरांच्या राजकीय विचारसरणीचे जाणकार पुरस्कर्ते. हिंदुत्वनिष्ठ. जगातील क्रांतिकारक युद्ध, कौटिलीय अर्थशास्त्र (मराठी भाषांतर), हिंदुत्ववाद, गीता तत्त्वमंजरी इत्यादी ग्रंथांचे कर्ते. कॉंग्रेस, लोकशाही स्वराज्य पक्ष व नंतर हिंदू महासभा यांचे सभासद म्हणून कार्य.

**कर्झन, लॉर्ड** :—( १८९५–१९०५ ) एक अत्यंत हुषार, तडफदार परंतु साम्राज्यवादी व लष्करशाही प्रवृत्तीचा व्हाईसरॉय. याच्या कारकीर्दिला लो. टिळकांनी औरंगजेबाच्या कारकीर्दिची उपमा केसरीत दिली होती. उद्दाम व कडवी वृत्ती, मनुष्यस्वभावासंबंधीचे अनुदार धोरण, साम्राज्यशाहीची अनिवार हाव, लष्करी सामर्थ्याचा अमर्याद अहंकार आणि जित लोकांच्या प्रतिकारसामर्थ्यासंबंधी अत्यंत तुच्छताबुद्धी. तरी पण पुराणवस्तु संरक्षणाचा कायदा पास करुन, जुन्या वस्तु, इमारती, स्तंभ वगैरेंचे संरक्षण करण्यासाठी त्याचप्रमाणे या बाबतीत नवीन शोध करण्यासाठी योग्य अधिकाऱ्यांची नेमणूक करून त्याने भारतावर उपकारच केले.

**काणे, पांडुरंग वामन** (१८८०–१९७२) :—संस्कृत भाषेतील महापंडित. धर्मशास्त्राचा इतिहास इंग्रजी भाषेत तीन खंडात लिहिला व मोठी कीर्ती संपादन केली. सरकारने त्यांना 'महामहोपाध्याय' या पदवीने गौरविले. संस्कृत पंडित म्हणून जगातील विद्वानात ख्याती.

**कुळकर्णी लीलामृत** :—'दीनमित्र' कार मुकुंदराव गणपतराव पाटील यांनी खेडे गावातील शहेनहशहा सुलतान ब्राह्मण कुळकर्णी याच्या गुलामगिरीतून गांवच्या बहुजन समाजाची मुक्तता व्हावी व त्यासाठी प्रचार व्हावा, म्हणून 'कुळकर्णी–लीलामृत' हे ओवीबद्ध पुस्तक १९१३ साली लिहिले. ते विठ्ठल पिराजी डोणे यांनी पुस्तकरूपाने फिरून प्रसिद्ध केले. रा. भास्करराव जाधव यांनी त्यास प्रस्तावना लिहिली.

**कोल्हटकर, अच्युत बळवंत** :—(१८७९–१९३१) अर्वाचीन मराठी भाषेतील ललित, सुलभ व विविध प्रकारच्या लेखनशैलीचे आद्य प्रवर्तक. एक लोकप्रिय वृत्तपत्रकार. वृत्तपत्रचालविणे हाच अखेरपर्यंत व्यवसाय. विविध नावांची आठ वृत्तपत्रे चालवून शेवटी संदेशकार म्हणूनच प्रसिद्ध. चुलते बळवंतराव यांनी पालण पोषण केले म्हणून स्वतः अच्युत बळवंत म्हणवीत. वडिलांचे नाव वामनराव. आपली आग्रही मते आकर्षक व सुबोध लिखाणाने बहुजनसमाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत नेऊन भिडवीत. लालित्यपूर्ण लिखाण असले तरी त्यात उपरोध, उपहास व विरोध यांचा विलक्षण रीतीने समन्वय करणे हे त्यांचे लेखनवैशिष्ट्य. वृत्तीने सडेतोड म्हणून सुरुवातीस जहाल टिळकभक्त असूनही केसरीशी मतभेद झाल्याने खुद्द टिळकांवरही घसरण्यास कमी केले नाही. 'लो. टिळक बाळंतीण झाले' हा त्यातलाच प्रकार. परिणामी ते अप्रिय झाले.

**खर्ड्याची लढाई** :—ता. १७ मार्च १७९५ रोजी नानासाहेब फडणीस यांच्या नेतृत्वाखाली सर्व मराठे सरदार एकत्र येऊन निजामाशी खर्डे येथे मोठी लढाई होऊन त्यात मराठ्यांचा जय झाला. नाना फडणीसांच्या कारस्थानाचा तो परमोच्च बिंदु व हिंदुस्थानच्या इतिहासातील एक संस्मरणीय टप्पा होय. मराठ्यांचे सर्व गुण, तसेच हिंदूंचे सर्व अवगुण या युद्धात दृष्टीस पडतात. खर्डे हे गाव जामखेड तालुक्याच्या अगदी पश्चिम सीमेवर असून लढाईला खर्ड्याचे नाव मिळाले असले तरी युद्धातील मुख्य चकमक खर्ड्याच्या नैर्ऋत्येस खर नदीपलीकडे असलेल्या सात मैलांवरील एका टेकडावर झाली. ही टेकडी आता रणटेकडी या नावाने प्रख्यात आहे.

**गाडगीळ, नरहर विष्णु** :—(१८९६–१९६६) पुढारी, मंत्री व लेखक. जन्म राजपुतान्यात मल्हारगड येथे, शिक्षण नीमच, मुंबई, बडोदे व पुणे येथे. काही काळ वकिली, त्यानंतर स्वातंत्र्य चळवळीत भाग. पुणे जिल्हा काँग्रेस कमिटीचे कार्यवाह, नंतर महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष. स्वातंत्र्यानंतर स्वतंत्र भारताच्या पहिल्या मंत्रीमंडळात समावेश. पुढे पंजाबचे राज्यपाल. मराठी व हिंदी भाषेतून विविध पुस्तके लिहिली. हिदी अंदाजपत्रके, ग्यानबाचे अर्थशास्त्र, राज्यशास्त्रविचार, कायदेमंडळातील सहा वर्षे, अनगड मोती, स्मृतिशेष, कांही मोहरा काही मोती ही काही पुस्तके. पुणे पर्वती सत्याग्रहात अस्पृश्यांबरोबर सहभाग.

**खान-मालिनी विवाह** :—प्रसिद्ध गाढे संस्कृत पंडित, प्राच्यविद्याविशारद व पुराणवस्तुसंशोधक डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या ज्येष्ठ कन्या शांताबाई यांची मुलगी कु. मालिनीबाई पाणंदीकर, बी. ए., बी. टी. या सारस्वत हिंदू मुलीचा विवाह गुलाबखान बशिरुद्दीनखान, बी. ए., बी. टी. या मुसलमान गृहस्थाशी नोंदणी पद्धतीने पुण्यास २४ जून १९२७ रोजी झाला. ह्या विवाहास एक साक्षीदार म्हणून ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या जर्मन पत्नी शीलवतीबाई केतकर ह्या उपस्थित होत्या. एक सुशिक्षित ब्राह्मण मुलगी एका मुसलमान युवकाशी आंतरधर्मीय विवाह करणार असल्याची अत्यंत खळबळजनक माहिती सर्वप्रथम डॉ. केतकरांनी ' पुणे समाचार ' ह्या आपल्या दैनिकाच्या १ जून १९२७ च्या पहिल्याच अंकात प्रसिद्ध केली होती. ही प्रक्षोभक वार्ता आदल्या संध्याकाळी त्यावेळचे वार्ताहर श्री. रा. टिकेकर यांनी डॉ. केतकरांना आणून दिली होती. ' पुणे समाचारा 'त मात्र वधुवरांच्या नावाचा उल्लेख केला नव्हता. ह्या विवाहावर खूप टीका झाली. अच्युत बळवंत कोल्हटकारांनी आपल्या ' चाबुकस्वारा 'त मालिनीचे नाव सुरुवातीस दडवून ठेवल्याबद्दल डॉ. केतकरांची 'लांडा कोल्हा' वगैरे म्हणून खूप संभावना केली. सनातन्यांच्या टीका लक्षात घेऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सुद्धा 'बहिष्कृत भारताच्या' १२ ऑगस्ट १९२७ च्या अंकात ' ढोंगीपणा, माथेफिरूपणा व गैरमुत्सद्दीपणा ' ह्या नावाचा अग्रलेख ह्या संदर्भात लिहिला. पहा, लेख क्रमांक ५७, पृ. २३७.

**खिलाफत** :— पहिल्या महायुद्धाच्या वेळी तुर्कस्थान जर्मनीच्या बाजूने ब्रिटीश साम्राज्याशी लढत होते. हिंदुस्थानातील मुसलमान लोकांना यावेळी ब्रिटीश साम्राज्याच्या बाजूने तुर्कस्थानाविरुद्ध लढण्याचा प्रसंग आला. यावेळी आम्ही हे युद्ध तुर्कस्थानचे आशियातील साम्राज्य हिरावून घेण्यासाठी करीत नाही आणि मुसलमानांच्या धर्मक्षेत्रावरील खलिफाची म्हणजे तुर्की सुलतानाची सत्ता

नष्ट करणार नाही. अशी आश्वासने ब्रिटीश मुत्सद्यांनी दिलेली होती. ही आश्वासने खरी करावयाची तर मेसोपोटेमिया, अरबस्तान, सीरीया, पॅलेस्टाईन या सर्वांवर असलेली खलिफाची धर्मसत्ता व राजसत्ता यांना धक्का लावता आला नसता. पण महायुद्धानंतर ब्रिटीश व फ्रेंच मुत्सद्यांनी पॅलेस्टाईन, सीरिया, मेसोपोटेमिया, अरबस्तान वगैरे सर्व देशातील तुर्कस्थानचे साम्राज्य नष्ट केले व अशा रीतीने ब्रिटिशांनी हिंदी मुसलमानांचा विश्वासघात केला होता, त्यांच्या धर्मभावनांवर आघात केला होता. त्यामुळे भारतात ब्रिटिशांविरुद्ध मुसलमानांनी जी चळवळ सुरू केली तिला खिलाफत चळवळ असे म्हणतात.

मुसलमानांच्या खिलापतीवरील इंग्रजांचा अन्याय दूर करण्यासाठी १ ऑगस्ट १९२० पासून म. गांधींनी असहकारितेची चळवळ आरंभ केली होती.

**गोखले, गोपाळ कृष्ण** :—( १८६६–१९१५ ) हिंदुस्थानचे सुप्रसिद्ध राजकारणी पुढारी, इंग्रजी भाषेतील प्रसिद्ध वक्ते व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी या संस्थेचे संस्थापक. जन्म चिपळूण तालुक्यातील ताम्हण्मळा येथे. कोल्हापूर व मुंबई येथे शिक्षण. १९०२ पर्यंत डेक्कन एज्यूकेशन सोसायटीचे आजीव सभासद व फर्ग्युसन कॉलेजमध्ये गणित, इंग्रजी, अर्थशास्त्र व इतिहास या विषयाचे प्राध्यापक. १८८७ मध्ये पुणे सार्वजनिक सभेचे चिटणीस, १८८८ मध्ये 'सुधारक' या इंग्रजी-मराठी साप्ताहिकाचे संपादक. १८९५ साली पुणे येथे भरलेल्या राष्ट्रसभेचे हे स्थानिक चिटणीस होते व १९०४ साली राष्ट्रसभेचे जोड-चिटणीस होते. १८९७ साली हे पुण्याच्या डेक्कन सभेचे प्रतिनिधी म्हणून हिंदुस्थानच्या जमाखर्चाची तपासणी करण्यासाठी नेमलेल्या वेल्बी कमिशनपुढे साक्ष देण्यासाठी इंग्लंडला गेले. १९०० मध्ये मुंबई प्रांतिक कौन्सिलमध्ये. १९०२ पासून पुढे अखेरपर्यंत वरिष्ठ कायदेमंडळात. १९०४ मध्ये ब्रिटिश सरकारने सी. आर. ई. ही पदवी देऊन गौरव केला. आदर्श शिस्तीला धरून वागणारे नेमस्त म्हणूनच यांची ख्याती. यांचे सार्वजनिक जीवन निष्ठामय व त्यागपूर्ण होते. हे न्या. रानडे यांना गुरू मानीत.

**घोरपडे, वा. न. उपाख्य दादासाहेब** :—डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या चळवळीतील एक समर्पित व्यक्ती होते. १९३२ मध्ये पूना पॅक्ट झाला त्यावेळी वामनराव घोरपडे हे तेथील हायस्कूलवर हेडमास्तर होते. पुढे ते विदर्भातील वर्धा येथे वास्तवास आले. ते १९५७ मध्ये वर्धा येथून लोकसभेसाठी उभे होते. सामाजिक उत्थानासाठी सतत कार्यशील राहिले. वर्धा जिल्हापरिषदेचे मुखपत्र 'विकास वार्ता' याचे मुख्य संपादक म्हणून त्यांनी कार्य केले. विकास

वार्ता या मासिकातून त्यांनी अनेक विचार प्रवर्तक लेख लिहिले. विशेषतः महात्मा फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या चळवळीसंबंधी त्यांनी शेकडो भाषणे दिली. ते उत्कृष्ट वक्ते होते. तसेच तळमळीचे कार्यकर्ते होते. जीवनाच्या शेवट पर्यंत त्यांनी म. फुले व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा प्रचार व प्रसार केला.

१९५४ ला भंडारा येथील लोकसभेच्या पोट निवडणूकीसाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर उभे होते. पुलगांवला सभेसाठी डॉ. बाबासाहेब वर्धा येथे आले असतांना त्यांनी वामनराव घोरपडेंना भेटण्याची इच्छा व्यक्त केली. श्री. वामनरावांना डॉ. बाबा साहेबांचा निरोप मिळताच त्यांना भेटावयास गेले. ही भेट मोठीच अविस्मरणीय होती. हा घडलेला भेटीचा प्रसंग श्री वामनराव घोरपडेंनी आपल्या स्मृति मंजुषेत जीवनभर जपून ठेवला होता. या भेटीमुळे त्यांना मोठे कृतार्थ वाटत होते.

**चित्तरंजन दास, देशबंधु** :—( १८७०–१९२५ ) बंगालमधील सुप्रसिद्ध वकील, कवी, वर्तमानपत्रकार व राजकारणी पुढारी. जन्म कलकत्ता येथे वैद्य नावाच्या ज्ञातीत झाला. कलकत्ता येथे शिक्षण घेऊन (१८९०) आय. सी. एस. साठी इंग्लडला रवाना आणि बॅरिस्टर होऊन परत आले (१८९२). तेथील वास्तव्यात दादाभाई नौरोजी यांच्या हाऊस ऑफ कॉमन्समधील उमेदवारीस पाठिंबा देण्याकरिता यांनी अनेक राजकीय व्याख्याने दिली. परत आल्यावर कलकत्ता येथे वकिली. हे राजकारणी म्हणून हिंदुस्थानात विख्यात असले तरी बंगाली भाषेत, बंगाली भाषेतील उत्कृष्ट कवी म्हणूनच लोक यांना विशेष ओळखतात. यांचे ' सागर संगीत ' हे काव्य फारच प्रसिद्ध होते. ' नारायण ' नावाचे बंगाली मासिक किती तरी वर्षे यांनी सतत चालविले. त्यात साहित्य व वैष्णव यासंबंधी विशेष चर्चा असे. यामुळेच १९१५ साली बंगाली साहित्य सम्मेलनाचे अध्यक्षपद यांना देण्यात आले. १९०६ साली सुरू झालेल्या ' वंदे मातरम् ' या इंग्रजी पत्राचे एक संस्थापक व संपादक मंडळापैकी एक. ' वंदे मातरम् 'चे संपादक बाबू अरविंद घोष यांच्यावरील राजद्रोहाच्या खटल्यात यांच्या वकिली कौशल्याचा प्रत्यय प्रथम आला. माणिकतोळा बाग कटाच्या खटल्यात तर राष्ट्रीय वकील म्हणून भारतभर प्रसिद्धी. हे प्रथम १९०६ साली राष्ट्रसभेत आले. असहकारितेच्या जाहीरनाम्याप्रमाणे आपल्या मोठ्या प्राप्तीच्या वकिलीचा त्याग केला आणि आपली सर्व संपत्ती मेडिकल कॉलेज व स्त्रियांचा दवाखाना याकरिता देऊन टाकली. याच वेळी लोक यांना ' देशबंधु ' या गौरवदर्शक नावाने संबोधू लागले. डाक्का येथे ' राष्ट्रीय विद्यापीठा 'ची स्थापना.

**चित्रे, अनंतराव विनायक** :—जातीने कायस्थ प्रभु. महाड सत्याग्रह परिषदेची सारी जबाबदारी त्यांच्यावरचं सोपविली गेली होती. महाडच्या पहिल्या परिषदेत दिनांक २० मार्च १९२७ ला चवदार तळ्यावर जाऊन पाणी पिण्याचा ठराव त्यांनीच मांडला होता.

**चिपळूणकर, विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री** (१८५०–१८८२) :—मराठी भाषेचे शिवाजी म्हणून प्रसिद्ध. जाज्वल्य हिंदुनिष्ठ, हिंदू संस्कृती, स्वदेश, स्वभाषा व स्वधर्म याचे कट्टर अभिमानी. हिंदी लोकांचा ओढा पाश्चात्य लोकांच्या अंधानुकरणाकडे लागलेला पाहून त्यांना परावृत्त करण्यासाठी निबंधमालेची स्थापना. त्याचप्रमाणे न्यू इंग्लिश स्कूल, चित्रशाळा व किताबखाना यांची स्थापना. टिळक, आगरकर व इतरांच्या सहकार्याने केसरी व मराठा वृत्तपत्रे सुरू केली. सामाजिक सुधारणाबाबतीत प्रतिगामी धोरण. त्यामुळे लोकहितवादीवर सडकून टीका.

**चैतन्य** :—सन १४८६ मध्ये या महात्म्याचा जन्म झाला. याने बंगाल व ओरिसा या प्रांतामध्ये वैष्णवमताचा प्रसार केला. जगन्नाथाच्या पुढे सर्व लोक सारखे आहेत असे याचे मत होते. याच्या समतेच्या उदार वैष्णवमतापुढे याला सर्व लोक विष्णूचा अवतारच मानीत असत. हिंदूतील सर्व जातीचे व मुसलमानी धर्माचे लोकही याचे शिष्य झालेले होते. मनुष्य कोणत्याही जातीत उत्पन्न झालेला असला तरी हरकत नाही. परमेश्वर भक्तीने त्यांची – सर्वांची – सारखीच शुद्धी होते. परमेश्वराजवळ जातिभेद नाही व स्पर्शास्पर्शभेदहि नाही, असे त्यांचे स्पष्ट मत होते.

**जवळकर, दिनकरराव शंकरराव** ( १८९८–१९३२ ) :—ब्राह्मणेतर पुढारी, सत्यशोधक समाजाचे कट्टर पुरस्कर्ते. मॅट्रिकपर्यंत शिक्षण. त्यांनी कोल्हापूरला ' तरुण मराठा ' हे पत्र चालविले, पत्राची भाषा सडेतोड, तिखट व भडक असे, ब्राह्मण हे लक्ष्य असे. तथापि, बहुजन समाजातील ब्राह्मणधार्जिण्या व प्रतिगामी लोकांवरही त्यांची लेखणी तुटून पडे. पुण्याच्या ' विजयी मराठ्या 'त ' भवानी तलवार ' या टोपण नावाने ' तलवारीचे वार ' सनातन्यांवर करीत. त्यांच्या ' देशाचे दुष्मन ' ह्या पुस्तकाने खूप खळबळ माजविली होती. बाबासाहेब आंबेडकरांची ह्या पुस्तकावर अशी प्रतिक्रिया होती की, ' It is a good book written in a bad taste. '

**जाधव, एम. के.** :—संस्कृत घेऊन बी. ए. ऑनर्सची पदवी धारण करणारे पहिले महार तरूण. पदवीदान सभारंभासाठी बाबासाहेब आंबेडकरांनी आपला वकिलीचा काळा झगा त्यांना दिला होता. त्यांना बाबासाहेबांच्या प्रयत्नामुळेच

विजापूर जिल्ह्यात प्रांत ऑफिसर म्हणून १९२७ साली सरकारी हुद्याची जागा मिळू शकली. सरकारी मोठ्या हुद्यावर नेमले गेलेले पहिले अस्पृश्य गृहस्थ म्हणून त्यांच्याकडे मान जातो.

**जाधव, भास्करराव** :—" राजर्षि छत्रपति शाहु महाराज यांच्या ब्राह्मणी वर्चस्व नष्ट करण्याऱ्या चळवळीतून ब्राह्मणेतर पक्ष मद्रास व मुंबई इलाख्यांत उत्पन्न झाला. मद्रासच्या ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी प्रथम सर शंकरन् नायर व नंतर इतर लोक झाले. त्यांचा ब्राह्मणेतर पक्ष इतका प्रबळ झाला की त्याला जस्टिस पार्टी हे नाव धारण करून मद्रासमध्ये राज्यकारभार हाती घेता आला. त्याचे कारण, मद्रासमध्ये ब्राह्मणेतरांत शिक्षणप्रसार फार झालेला होता. मुंबई इलाख्यात ब्राह्मणेतर पक्षाचे प्रथमचे पुढारी श्री. भास्करराव विठोजीराव जाधव व नंतर दुसरे होते.

भास्कररावांचा जन्म १७-६-१८६७ ला नागाव, तालुका अलिबाग, जिल्हा कुलाबा येथे झाला. त्यांना विद्यार्जनासाठी अत्यंत त्रास सोसावा लागला व कष्ट करावे लागले. ते एल्फिन्स्टन हायस्कूलमधून जून १८८८ मध्ये मॅट्रिकची परीक्षा पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. संस्कृतची जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलरशिप, तीन गुण कमी पडल्यामुळे त्यांना मिळाली नाही. सरकारची १५ रुपयांची व डेक्कन मराठा असोसिएशनची १५ रुपयांची अशा दोन शिष्यवृत्त्या मिळवून त्यांनी आपला कॉलेजमधील अभ्यास (वुइल्सन व एल्फिन्स्टन) पुरा केला. ते १८९२ मध्ये बी. ए. ची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. ते १८९३ व १८९४ मध्ये एल्फिन्स्टन कॉलेजात दक्षिण फेलो (संस्कृत) होते. ते १८९४ साली एम्. ए. झाले. ब्राह्मणेतर समाजातून इतक्या नेत्रदीपक प्रकाशाने चमकणाऱ्या बुद्धिमान तरुणाकडे बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव महाराज व कोल्हापूरचे श्रीमंत शाहू महाराज यांचे लक्ष वेधले. श्रीमंत सयाजीरावांच्या प्रेमळ जाळ्यात ते अडकू शकले नाहीत, पण श्रीमंत शाहू महाराजांनी त्यांच्या सभोवती असे जाळे टाकले की त्यातून त्यांना निसटता आले नाही. ते १८९५ च्या जुलैपासून कोल्हापूरच्या नोकरीत रूजू झाले. ते १८९७ साली एल्.एल्. बी. झाले.

कोल्हापूरचे वातावरण म्हणजे सामाजिक व धार्मिक सुधारणावादी. श्री. भास्करराव जाधव हे याच विचारांचे असल्यामुळे ते आंतरजातीय विवाहाचे पुरस्कर्ते होते. प्रिं. गोविंद चिमाजी भाटे (ब्राह्मण) यांनी मराठ्याच्या मुलीशी विवाह करण्याचे ठरविले तेव्हा भास्कररावांनी विवाहात सदर मुलीचे कन्यादान केले.

१९१९–१९३० च्या राजकीय चळवळीत ब्राह्मणेतर पक्ष जनतेपुढे आला व विसर्जन पावला. त्या पक्षाचे पुढारीपण काही काळ भास्कररावांनी केले. १९२३-२९ च्या काळात ते मुंबई सरकारचे मंत्री झाले होते. ते प्रथम मंत्री झाले तेव्हा ब्राह्मणेतर पक्षाबद्दल द्वेष बाळगणाऱ्या वृत्तपत्रांनी व लोकांनी भास्कररावांवर टीकेचा, उपहासाचा व कुचेष्टांचा नुसता वर्षाव केला.

भास्करराव १९३० च्या निवडणुकीत मध्यवर्ती विधिमंडळात निवडून आले. पण १९३७ च्या निवडणुकीत ते पराभूत झाले.

भास्कररावांच्या स्वार्थी पुढारीपणामुळे ब्राह्मणेत्तर पक्षाचा ऱ्हास झाला व त्यातील बहुजन समाज १९३० साली कॉंग्रेसमध्ये सामील झाला, असा एक त्यांच्यावर लोकापवाद आहे व तो अनेक लेखक आणि वक्ते यांनी केलेला आहे. त्यांच्या नेतृत्वामुळे बहुजन समाजात विशेष नेत्रदीपक कार्य झाले नसले तरी सर्वसाधारण जागृतीची बीजे बहुजन समाजात त्यांच्याच काळात पेरली गेली हे कोणताही समंजस माणूस मान्य करील.

अस्पृश्यांच्या प्रगतीसाठी भास्कररावांनी कोल्हापूरात अगर मुंबई इलाख्यात स्वतंत्रपणे असे कार्य केलेले नाही. उलट काही अंशी त्यांचा अस्पृश्यांपेक्षा मराठ्यांकडे फार ओढा होता असे १९२६-२९ च्या काळात अस्पृश्यांतील समाजसेवक सभेतून व खाजगीत बोलत असत.

भास्करराव २६-६-१९५० रोजी वयाच्या ८३ व्या वर्षी कोल्हापूर येथे दिवंगत झाले. (रामायणावर नवा प्रकाश, जीवनवृत्त, पा. ७–७२)''[१]

**जेधे, केशवराव मारुतीराव** (१८९६–१९५९) :—सुरुवातीच्या कारकीर्दीत ब्राह्मणेतर पक्षात असलेले सत्यशोधक समाजाचे कट्टर पुरस्कर्ते, पुढे कॉंग्रेसचे पुढारी. १९२३ मध्ये 'तरुण मराठा पक्षा' ची स्थापना व 'शिवस्मारक' साप्ताहिकाची सुरुवात. १९२४ मध्ये 'मजूर ' नावाच्या दैनिकाची सुरुवात. दिनकरराव जवळकरांच्या सोबतीने मुंबईत 'कैवारी ' नावाच्या साप्ताहिकाची सुरुवात. पुढे दोघात वितुष्ट. मुंबई इलाखा शेतकरी परिषदेचे प्रवर्तक. १९३३ मध्ये हरिजन सेवक संघाच्या पुणे शाखेचे अध्यक्ष. १९३५ मध्ये कॉंग्रेसतर्फे मध्यवर्ती असेंब्लीत निवड. काही काळ महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष. पुढे कॉंग्रेस सोडून बहुजनपक्षाची स्थापना व शेतकरी, कामकरी लोकांची संघटना.

---

[१] : खैरमोडे, खंड ५ वा, पृ. २७५–२७६.

**जोशी, विनायक चिंतामण** :—सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक व विनोदी लेखक, चिमणराव व गुंड्याभाऊ हे त्यांचे दोन विनोदी मानसपुत्र. विनोदी साहित्याचे दालन श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनंतर समृद्ध करणारे जोशी, पाली भाषेचे बडोदे महाविद्यालयात प्राध्यापक होते. ' जातकातील निवडक गोष्टी ', 'बुद्ध, संप्रदाय व शिकवण ' वगैरे बौद्धधर्मावरील ग्रंथही त्यांनी लिहिले.

**जोशी, पुरूषोत्तम प्रभाकर** :—महाडचे रहिवासी, लो. टिळकांचे निःसीम भक्त, व्यायामाचे शौकीन त्यामुळे महाड येथे लो. टिळकाच्या नावे तालीमखान्याची सुरवात, हिंदुसभेचे निष्ठावान कार्यकर्ते.

**टिपणीस, सुरेन्द्रनाथ गोविंद** (१८९८–१९७८) :—नानासाहेब टिपणीस म्हणून प्रसिद्ध, साक्रेटिसाचे चरित्र, कौटिलीय अर्थशास्त्राचे पहिले मराठी भाषांतर इत्यादी ग्रंथांचे कर्ते व केवळ मॅट्रिक असून एलफिन्स्टन कॉलेजात मराठीचे पहिले प्राध्यापक झालेले गोविंद गोपाळ टिपणीस यांचे हे पुत्र. सुरेन्द्रनाथ टिपणीस महाड म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष असता चवदार तळे अस्पृश्यासाठी मुक्त केले गेले होते. बाबासाहेबांशी घनिष्ट संबंध, पिपल एज्युकेशन सोसायटीचे काही वर्षे उपाध्यक्ष.

**टिळक, लो. बाळ गंगाधर** (१८५६–१९२०) :—स्वराज्याच्या चळवळीचे अध्वर्यु. त्यामुळे 'भारतीय असंतोषाचे जनक ' म्हणून इंग्रजांनी लावलेले दूषण हेच भूषण ठरले. धुरंधर राजकीय नेते म्हणून जसे प्रसिद्ध तसेच झुंझार पत्रकार, उत्कृष्ट निबंधकार, व्यासंगी ग्रंथकार व विद्वान संशोधक म्हणून प्रसिद्धी. केसरी, मराठा ही वृत्तपत्रे काढली. गीतारहस्य, आर्यांचे मूळ निवासस्थान, वगैरे ग्रंथांची निर्मिती. 'आधी राजकीय सुधारणा की आधी सामाजिक सुधारणा ' या वादातील 'आधी राजकीय सुधारणा ' या मताचे प्रखर पुरस्कर्ते म्हणून सामाजिक सुधारकांशी बरेचदा विरोध.

**डिप्रेस्ड इंडिया असोसिएशन** :—साऊथबरो कमिशनपुढे नागपूर येथे ११ डिसेंबर १९१८ रोजी श्री. ग. आ. गवई यांची जी साक्ष झाली, त्याच्या छापील वृत्तांतात 'डिप्रेस्ड इंडिया असोसिएशन ' बद्दल पुढील माहिती आढळते . . . " He (Gavai) was the secretary of the Depressed India Association which had been started to safeguard the interest of the depressed classes with head quarters at Amravati. It contained 500 members from Berar, the Central Provinces and the Bombay Presidency. There was a member's subscription of 8 Anna, a year

and there were branches in Bombay and Poona." तर गवई यांच्या चरित्रात श्री. ना. रा. शेंडे म्हणतात, " १९१८ साली ' डिप्रेस्ड इंडिया असोसिएशन ' म्हणजे ' बहिष्कृत भारत समाज ' ही संस्था नागपूर येथे प्रातिनिधिक स्वरुपात स्थापन झाली, त्यावेळी नानासाहेब गवई, हे संस्थेचे सूत्रचालक होते. या संस्थेची पहिली कार्यकारी शाखा ता. १२ जानेवारी १९१८ रोजी धोबी तलाव, मुंबई येथे कै. रामजी लक्ष्मण सांगवकर यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आली . . . . . . . सन १९२५ ते १९२७ सालचे दरम्यान मुंबईचे माजी मुख्यमंत्री कै. बाळासाहेब खेर, सर चिमनलाल सेटलवाड, सर पुरुषोत्तमदास ठाकोरदास, बॅ. जहांगीर वगैरे थोर गृहस्थ या संस्थेला अध्यक्ष लाभले होते." (ग. आ. गवई : व्यक्ति आणि कार्य, लेखक—ना. रा. शेंडे, पा. ४६).

' विदर्भातील दलित चळवळीचा इतिहास ' या पुस्तकाचे कर्ते श्री. हि. ल. कोसारे पुढील माहिती देतात. 'डिप्रेस्ड इंडिया असोसिएशन ' अर्थात 'बहिष्कृत भारत समाज ' ही संस्था नागपुरला १९२२ साली स्थापन करण्यात आली. ह्या संस्थेचे प्रेसिडेंट जॉर्ज पी. डिक, सी. आय. ई. एम. एल. सी ; व्हाईस प्रेसिडेंट केशवराव जाणुजी खंडारे, सेक्रेटरी गणेश आकाजी गवई, एम. एल. सी. आणि सदस्य ॲड. सी. बी. पारेख, एम. एल. सी., पी. एन. भटकर, रामचंद्र डोमाजी वासनिक, किसन फागुजी बंदसोडे, दामोदर मुरारी खापर्डे, विठोबा चिंधुजी फुलमाळी, लक्ष्मण श्रावण भटकर, अंतुजी नाभाजी मडकवारे हे होते. (पा. ११५, १२२).

**तेलंग, न्या. काशिनाथ त्र्यंबक** (१८५०–१८९३) :—संस्कृतादि आर्य व कन्नड भाषा, वैदिक, जैन व बौद्ध तत्त्वज्ञान यांचे अभ्यासक व संशोधक. मुंबई येथे हायकोर्टात न्यायमूर्ती म्हणून महत्त्वाचे कार्य केले. १८८५ साली स्थापन झालेल्या इंडियन कॉंग्रेसच्या स्थापनेमध्ये वाटा. १८८५ ते १८८९ पर्यंत कॉंग्रेसचे सेक्रेटरी म्हणून काम केले. शास्त्र व रूढी यांच्या "बलाबलाविषयी विचार" व "सामाजिक विषयासंबंधी तडजोड " हे निबंध प्रसिद्ध आहेत. इ. स. १८८९ साली झालेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे अध्यक्ष.

**दाते, शंकर रामचन्द्र** (१८९८) :—लोकसंग्रह दैनिकात संपादकीय विभागात लेखन. मुद्रण कलेत मूलगामी संशोधन. मोनो टाईप यंत्रावर देवनागरी लिपी बसविली. १९२४-३० च्या कालावधीत पुणे हिंदुसभेचे कार्यवाह, नंतर महाराष्ट्र हिंदुसभेचे व त्यानंतर अखिल भारतीय हिंदुसभेचे कार्यवाह, नंतर अखिल भारतीय हिंदुसभेचे उपाध्यक्ष. १९४०–५५ मध्ये दैनिक काळचे संपादक. 'महाराष्ट्र हिंदुसभेच्या कार्याचा इतिहास ' लिहून काढला आहे.

**दिवेकर, महादेवशास्त्री** :—गाढे पंडित, हिंदु समाज, धर्म व संस्कृतीचे अभिमानी. वाई येथे हिंदुसमाजोद्धारक संस्थेची स्थापना. आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष, सनातन धर्म, हिंदू संस्कृती इत्यादी ग्रंथांचे लेखक. अस्पृश्यांच्या चळवळीसंबंधी बाबासाहेबांची नोव्हेंबर १९२९ मध्ये मुलाखत त्यांनी घेतली होती.

**देशमुख, लोकहितवादी गोपाळराव हरि** (१८२३-१८९२) :—अव्वल इंग्रजीतील एक मान्यवर पुढारी व लेखक. नोकरीत न्यायाधिशाच्या जागेपर्यंत चढले व सरकार दरबारी रावबहादुरकीही मिळविली. भाऊ महाजन यांच्या मुंबई येथील 'प्रभाकर' या वृत्तपत्रातून 'लोकहितवादी' या टोपण नावाने त्यांनी १८४८ पासून 'शतपत्रे' लिहिण्यास सुरूवात केली. तत्कालीन ब्राह्मणांची अवनती, पुराणातील वेडेचार, सनातनी, प्रगतिविन्मुख, बुरसलेली डोकी यांवर त्यांनी सपाटून मारा केला. लोकहितवादी म्हणूनच पुढे ते नावाजले गेले. त्यांनी विविध विषयावर ग्रंथसंपदा निर्माण केली. लोकहितवादी यांच्या शतपत्रांचे पुनर्मुद्रण 'बहिष्कृत भारत' च्या दि. ७ डिसेंबर १९२८ पासून बाबासाहेबांनी सुरू केले. पुनर्मुद्रणाचा हा असा पहिलाच प्रयत्न होता.

**धनुर्दास** :—त्रिचनापल्ली जवळ असलेल्या उरस्युर गावी धनुर्दास नावाचा शूद्र राहत असे. त्याला त्याच्या स्त्रीसह पंचसंस्कार करून श्रीरामानुजाचार्यांनी आपला शिष्य करून घेतले.

**धारिया, शंकर विठ्ठल** :—पुरोगामी, सुधारक मताचे महाड येथील व्यापारी. मुंबईतील ख्यातनाम बॅरिस्टर का. शं. धारिया यांचे वडील.

**नंदी, महाराज मुनिंद्रचंद्र** :—कासीम बझार येथील मीरत विभागाचे सरसुभे सुविख्यात महाराजा मुनिंद्रचंद्र नंदी.

**नाईक, देवराव विष्णु** :—जातीनें गोवर्धन ब्राह्मण गृहस्थ. मुंबईत 'संजीवनी' नावाचे मासिक व 'ब्राह्मण–ब्राह्मणेतर' नावाचे पाक्षिक चालविले होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मार्गदर्शखाली निघणाऱ्या 'समता' ह्या पाक्षिकाचे ते संपादक होते. त्याचप्रमाणे २४ नोव्हेंबर १९३० ला सुरू झालेल्या 'जनता' ह्या पाक्षिकाचे व नंतर रूपांतरित झालेल्या साप्ताहिकाचे काही वर्षे संपादक होते.

**नागनाक, सेटी बिन** :—महाराष्ट्राच्या पुरातन ग्रामसंस्थेत अस्पृश्य मानलेल्या जातीचे महत्त्व होते. त्यातल्या त्यात महार जात महाराष्ट्रात मुख्य बलुतेदार म्हणूनच नव्हें तर वतनदार म्हणून नांदत होती, ह्यासंबंधी काही पुरावे आढळतात. त्या इतरांनी कालवशात बळकावल्या. अशा वतनाचा वाद माजला असता, अव्वल मराठेशाहीत कोणते तरी दिव्य करून आपला हक्क

दिवाणात शाबीत करावयाचा रिवाज असे. भारत -इतिहास-मंडळाचे सप्तम-संमेलन वृत्त पान ५४ वर संशोधक शंकर ना. जोशी वाईकर ह्यांनी पुढील महत्त्वाच्या एका महजराचा शोध लावल्यासंबंधाचे स्पष्टीकरण प्रसिद्ध झाले आहे.

" मौजे नागेवाडी प्रांत वाई येथील कदीम पाटीलकी मूळची महाराची छत्रपती राजारामाचे वेळी सेटी बिन नागनाक महार हा पाटील होता. त्याने नागेवाडी येथील नागवडसिद्ध ह्या देवाची पूजा करून राहण्याकरिता धांडेघर व गौडाली येथील मोरोजी व चिंतामणी हे दोन गुरव आणिले. हे दोन गुरव येऊन राहिल्यानंतर त्यानी पाटलाशी 'मारेचुरे' करून त्याची पाटीलकी बळकावली. तेव्हा सदर पाटलाने गुरवाविरूद्ध परशरामपंत प्रतिनिधीकडे फिर्याद केली. प्रतिनिधीनी गुरवास बोलावले, पण ते आले नाहीत. तेव्हा प्रतिनिधींनी सिवधडे ह्यास (म्हणजे नागेवाडी जवळील गावाचे मुकादमास) विचारले. त्यांनी पाटीलकीचे वतन महारांचेच, गुरवांनी देवे पुजून असावे; पाटीलकीस त्यांचा अर्थाअर्थी संबंध नाही असा महार पाटलाचे बाजूचा निकाल दिला. उभयता गुरवांनी पुनःछत्रपतीकडे फिर्याद नेली. त्या वेळी छत्रपती रांगण्यास होते. तेव्हा ही पाटीलकीची फिर्याद पुनःआलेली पाहून राजारामांनी महारास धार दिव्य करण्यास सांगितले. म्हणजे मोगलांनी घेतलेला वैराटगड †(हा वाईजवळ आहे) स्वराज्यास जोडून द्यावा व पाटिलकीचे वतन अनुभवाने असा निकाल दिला. त्या वेळी मोगलांनी एक एक किल्ला घेऊन पुढे जावे व मागून मराठ्यांनी ते ते किल्ले स्वराज्यास जोडावे असे चालू होते. अशातला वैराटगड हा नागेवाडीच्या महारांनी मोगलांशी लढून घेतला व पाटीलकीचे वतन मिळविले. ह्या पाटीलकीचे वतनाबद्दल नागेवाडीच्या गुरवा–महारांमध्ये तीन वेळा फिर्यादी झाल्या. तीनही वेळा महारांचेच वतन ठरले. शेवटी फिर्याद शके १६७४ मार्गशीर्ष शु. ४ इ. स. १७५३ डिसेंबर, ता. ९ रोजी होऊन अखेर निकाल झाला" [भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न–महर्षी वि. रा. शिंदे, महाराष्ट्र शासन.–१९७६, पा. १५३].

**नामदेव महाराज** :—(१२७०–१३५०) महाराष्ट्रातील सगुणोपासनाप्रधान भागवतधर्माचा आद्य प्रवर्तक, संत प्रचारक व कवि. याच्या पूर्वजाचे मूळ

---

†मोगलांच्या ताब्यातून वैराटगड हा किल्ला जिंकण्यासाठी खुद्द राजाराम महाराजांनी सेटी बिन नागनाक महाराची नेमणूक केली. थोड्याशा महार सैनिकांच्या सहाय्याने त्याने मोगलांच्या प्रचंड सेनेला किल्ल्यातून पळवून लावले व तो वैराटगड किल्ला मराठी साम्राज्यात सामील करून दिला.

ठिकाण श्रीक्षेत्र कऱ्हाडनजीक कृष्णातीरी असलेले नरसी ब्राह्मणी हे गाव. यांचे पूर्वज जातीने शिंपी होते व ते शिंप्याचा अगर कापड विकण्याचा धंदा करीत. दामाशेटीस गोणाबाईचे पोटी हे पुत्ररत्न इ. स. १२७० रविवारी सूर्योदय समयी पंढरपूर मुक्कामी झाले. यांच्या घरात विठ्ठलभक्ती मूळचीच होती व त्यामुळेच याची मातापितरे पंढरपुरास राहत. १२ व्या वर्षी गोविंदशेट सौदागरकर याची मुलगी राजाई हिच्याबरोबर विवाह. याला नारायण, विठा, महादा व गोंदा अशी मुले झाली. १२९१ मध्ये ज्ञानेश्वरांची कीर्ती ऐकून आळंदीस आला व गुरूपदेशाकरिता विसोबा खेचर चाटी (यजुर्वेदी ब्राह्मण) याजकडे रवानगी. नंतर संतमंडळासह हा तीर्थयात्रेस निघाला. त्यावेळी वय २२. यात्रा करीत असताना ठिकठिकणी याने वसाहती स्थापन केल्या. पंजाबात बहोरदास, जयदेव, जाल्होन व लद्धा यांनी याच्या मताचा पुरस्कार केला. जाल्होन नामदेवाबरोबर महाराष्ट्रात आला तर उलट तारापुरचा केशव या महाराष्ट्रीय वारकऱ्यास पंजाबात कार्य करण्यास पाठविले.

ते जातिव्यवस्थेला मानीत नव्हते. त्यांनी सर्व जाती व वर्णाच्या लोकांना आपले अनुयायी बनविले. त्यांचा मृत्यु इ. स. १३५० मध्ये झाला.

**नायर, सर शंकरन्** (१८५७–१९३४) :—मद्रासकडील एक हिंदी पुढारी. वकिली करीत असताना मद्रास हायकोर्टाचे न्यायधीश झाले. मद्रास कायदेमंडळात अनेक वर्षे सभासद. अमरावती येथे भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष. मद्रास सामाजिक परिषदेचे अध्यक्ष. 'मद्रास लॉ जर्नल', 'मद्रास रिव्ह्यु' ह्या मासिकांचे व 'मद्रास स्टॅंडर्ड ' या दैनिकाचे संस्थापक व काही काळ संपादक. १९१५ ते १९१९ मध्ये व्हॉईसरायच्या कार्यकारी मंडळाचे सभासद. १९२८ मध्ये सायमन कमिशनबरोबरच्या लेजिस्लेटिव्ह कमिटीचे अध्यक्ष. 'गांधी व अराजकता' ह्या इंग्रजी पुस्तकाचे कर्ते. स्वतंत्र वृत्ती, स्डेतोड बोलणे व लिहिणे.

**निकाळजे** :—पूर्ण नाव रामचन्द्र सटवाजी निकाळजे. डिप्रेस्ड इंडिया असोसिएशन या संस्थेचे अध्यक्ष १९२३ ते १९२६ च्या दरम्यान मुंबई कायदेमंडळाचे सरकारनियुक्त सभास्द होते.

**नेपोलियन बोनापार्ट** (१७६९–१८२१) :—फ्रान्सचा बादशहा. जगविख्यात योद्धा, रणपटू , लोकोपयोगी कायदे करणारा बादशहा. याचे 'नेपोलियन कोड' प्रसिद्ध आहे. जन्म १५ आगस्ट १७६९ रोजी, कॉर्सिया बेटातील अजाशिओ गावी.

वडिलांचे नाव चार्लस् आणि आईचे लिटेशिया. नेपोलियनच्या जन्मापूर्वी कॉर्सिकाचे फ्रेंचांशी स्वातंत्र्ययुद्ध चालू होते. ही झुंज साठ वर्ष चालून अखेरीस फ्रेंचाचा त्यात जय झाला. नेपोलियनच्या आई-वडिलांनी या स्वातंत्र्ययुद्धात फ्रेंचाविरूद्ध भाग घेतला होता. त्यानंतर पंधरा दिवसांनीच नेपोलियनचा जन्म झाला. नेपोलियनचे वडिल वकिलीचा व्यवसाय करीत. त्याचे कुळ खानदानी होते. नेपोलियनचे शिक्षण बीनच्या शाळेत व पुढे लष्करी शाळेत झाले. याच वेळेस पॅरिस क्रांतीने पेटून निघाले व राज्यक्रांती होऊन २-१२-१८०४ रोजी नेपोलियन बहुमताने फ्रान्सचा बादशहा झाला. १८१५ च्या वाटर्लू येथील लढाईत पराभव होऊन शेवटी त्याची रवानगी सेंट हेलिना बेटावर झाली. व तेथेच मुत्यू. त्याचा पराभव करणाऱ्या ड्युक ऑफ वेलिंग्टनने त्याच्याविषयी म्हटलय–''नेपोलियनची रणांगणावरची उपस्थिती चाळीस हजार फौजेच्या तोडीची होती, एवढा तो रणपटू व रणशूर होता ! ''

**परमानंद, भाई** (१८७४–१९४७).—पंजाबमधील आर्यसमाजाचे एक निष्ठावंत पुढारी. गदर कटात सामील असल्याच्या आरोपावरून देहांताची शिक्षा. पण ती कमी होऊन जन्मठेप व हद्दपारीची शिक्षा. दोन महिने अन्नसत्याग्रह केल्यावर सुटका. १९३३ साली अजमेर येथील अखिल भारतीय हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष. 'जातपात तोडक मंडळा' चे संस्थापक. सुधारणावादी व पुरोगामी विचारसरणी. हिंदुस्थानचा इतिहास व आत्मचरित्र लिहिले.

**परांजपे, डॉ. रघुनाथ पुरूषोत्तम** (१८७६) :—एक महाराष्ट्रीय विद्वान व शिक्षणतज्ज्ञ. जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील मुर्डी या गावी, शिक्षण मराठा हायस्कूल (मुंबई), फर्ग्युसन कॉलेज (पुणे) व सेन्ट जॉन्स कॉलेज (केंब्रिज) येथे झाले. हिंदुस्थानातील सर्व परिक्षात हे पहिले आले होते. सरकारी शिष्यवृत्ती मिळून इंग्लडला गेले. १८९९ साली केम्ब्रिजला पहिल्या दोन सिनियर रँग्लडरपैकी एक. १९०२-२४ पर्यंत फर्ग्युसन कॉलेजचे प्रिंसिपॉल व गणिताचे प्राध्यापक म्हणून काम केले. १९१६-२३ व १९२६ साली मुंबई विश्वविद्यालयातर्फे कायदेमडळात सभासद म्हणून निवडून गेले. याचे आधी १९१३ साली हे मुंबई कायदेमंडळात सरकारनियुक्त सभासद होते. त्यावेळी हे तेथील शिक्षणमंत्री झाले (१९२१-२३, १९२६). १९२७ साली यांची भारतमंत्र्याच्या इंडिया कौन्सिलचे सभासद म्हणून लंडन येथे नेमणूक. १९३५ च्या फेब्रुवारीत हे हिंदुस्थानात परत आले व पुनः फर्ग्युसन कॉलेजात प्राध्यापकाचे काम

करू लागले. लखनौ युनिव्हर्सिटीचे व्हाईस चान्सलर झाले (१९३५). १९५६ पासून पुणे विद्यापीठाचे कुलगुरू. हे राजकारणात प्रागतिक पक्षाचे असून यांना लिबरल फेडरेशनच्या अध्यक्षपदाचा मान प्राप्त झाला. हे बुद्धिवादी समाजसुधारक असून निर्भयपणे आपल्या मताच्या प्रतिपादनाबद्दल आणि ती मते व्यवहारात आणण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. यांचे ग्रंथ–Gopal Krishna Gokhale, The Crux of the Indian problem, Religion and the Indian Problem, Rationalism in Practice.

**पाणंदीकर, गोपाळराव व्यंकटेश** :—डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर व पुनर्विवाहाचे पुरस्कर्ते. ह्यांची पत्नी १८८१ ला मृत्यू पावली होती. पत्नीच्या निधनानंतर आपणास विधवाविवाह कर्तव्य आहे असे आपले मनोगत न्यायमूर्ती रानडे, शंकरराव पंडित व मामा परमानंद यांना कळविले होते. सुधारक म्हणविणारे पुढारी स्वतःच्या बाबतीत पुढाकार घेत नाहीत ही टीका केली जात असे. ह्याची प्रचीती पाहावी म्हणून गोपळराव पाणंदीकरांनी डॉ. भांडारकरांच्या विधवा कन्येस पत्राने मागणी घातली. भांडारकर कसोटीस उतरले व ११ मे १८९१ रोजी खंडाळा येथे गोपाळराव पाणंदीकर व शांताबाई यांचा पुनर्विवाह झाला.

गोपाळराव पाणंदीकर व डॉ. भांडारकर यांची विधवा कन्या शांताबाई यांचा पुनर्विवाह हा महाराष्ट्रातील पहिला पुनर्विवाह नव्हे. पहिला महाराष्ट्रीय पुनर्विवाह ८ मार्च १८६० रोजी सारस्वत जातीतील रघुनाथ जनार्दन भांडारकर व विधवा नर्मदाबाई ह्यांच्यात झाला. ही दोघे मुंबईला एकाच शाळेत शिकत असत. ग्रामण्याच्या भयाने ह्यांनी आपला विवाह पुण्यात उरकला. रघुनाथ भांडारकर यांची प्रथम पत्नी मात्र हयात होती.

**पालये, पांडुरंग भास्करशास्त्री :** हिंदुधर्मशास्त्रांवरील एक अधिकारी व्यक्ती. जन्माने ब्राह्मण परंतु सनातनी वृत्तीचा लवलेशही नाही. दलितांबद्दल व बाबासाहेबांबद्दल खूप प्रेम. त्यांचा संबंध बाबासाहेबांशी शेवटपर्यंत टिकून राहिला. अत्यंत पुरोगामी व सुधारणावादी अशी व्यक्ती.

**पांगारकर, ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र** (१८७२–१९४१) :—संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक, मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे चिकित्सक लेखक, उत्तम वक्ते व रसाळ प्रवचनकार म्हणून प्रसिद्ध. १९०७ मध्ये 'मुमुक्षू' हे साप्ताहिक सुरु केले. पुढे ते मासिक झाले. २५ वर्षे त्याचे त्यांनी संपादन केले. भक्तिमार्गप्रदीप, मोरोपंत चरित्र आणि काव्यविवेचन, एकनाथचरित्र, ज्ञानेश्वरचरित्र आणि ग्रंथविवेचन, श्री. तुकाराम चरित्र, मुक्तेश्वर चरित्र आणि काव्यविवेचन आणि मराठी वाङ्मयाचा इतिहास (तीन खंडात) ह्या ग्रंथांची निर्मिती. 'चरित्रचंद्र' हे आत्मचरित्र.

**प्रार्थना समाज** :—१७ डिसेंबर १८६६ रोजी प्रसिद्ध व्याकरणकार रा. ब. दादोबा पांडुरंग यांचे बंधु डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खड यांच्या घरी एकूण ११ गृहस्थांची (डॉ. तर्खड, बोडसे, शिरगावकर, संजगिरी, वागळे, भागवत, परमानंद, मानकर, पडवळ, चोळकर, नवरंगे) एक सभा होऊन जातिभेद, बालविवाह, विधवाविवाह, अशासारख्या सामाजिक गोष्टीवर भर न देता, परमार्थसाधनेकडेच विशेष लक्ष देणारा नवापंथ स्थापन करण्याचे ठरून त्याप्रमाणे फाल्गुन वद्य ११, शके १७८८ रविवार, ३१ मार्च १८६७ रोजी ' पापमोचनी ' च्या सुमुहूर्तावर परमहंससभेचे '' प्रार्थनासमाज '' हे प्रकट स्वरूप प्रकट झाले. या दिवशी आनंदाश्रम स्वामी नामाचे एक बंगाली गृहस्थ आशीर्वाद देण्यास हजर होते. पावभक्षण विधीसारखा क्षोभकारक प्रवेश विधी ठेवला नव्हता. सुरवातीची सभासद संख्या फक्त २५ होती. हे सभासद सर्वच परमहंससभेचे जुने सभासद होते. १८५० साली परमहंससभा या नावाची रामचंद्र बाळकृष्ण (जयकर) यांनी मुंबईस एक गुप्त संस्था स्थापन केली होती. दादोबा पांडुरंग हे त्या सभेचे मुंबईतील प्रमुख होते. या सभेचे कार्य गुप्त रीतीने चाले. या सभेचे सभासद म्हणजे मुख्यतः इंग्रजी शिकणारे सुमारे सोळा वर्षाचे तरुण असत. परमहंससभेचे मुख्य उद्देश होते, विधवाविवाह ज्या जातीमध्ये चालू नाही तेथे तो चालू करणे, जातिभेद मोडणे आणि जगाचा चालक अशा एकाच परमेश्वराची पूजा करणे. या सभेचे विधी म्हणजे, प्रत्येक सभेच्या सुरुवातीस व अखेरीस प्रार्थना म्हणत व त्या मराठीत असत. एखाद्या माणसाला परमहंसमंडळीत प्रवेश द्यावयाचा असला म्हणजे एकदोन सभासद त्याला आधी ठराविक जागी व वेळी बोलावीत आणि पोर्तुगिज बेकरीतून पाव आणून तो बरोबर एकत्र खात. या कसोटीस तो उतरला म्हणजे अमूक माणसाने जात मोडली असे प्रमुखाला कळवीत. नंतर पुढच्या सभेस त्याला हजर करीत व त्याला सभेची उद्दिष्टे मान्य आहेत की काय हे विचारून त्याचे होकारार्थी उत्तर आल्यावर त्याच्या हातावर पाणी ओतीत व ते जमिनीवर सोडावयास सांगत. जातिभेद व इतर धार्मिक खुळचट समजुतींचा त्याग केल्याचे ते लक्षण होते. त्याच्या निष्ठेची पुन्हा प्रचीती पाहण्याकरिता पुन्हा पाव आणून त्याच्या फाका करीत व सर्व सभासद ते खात. परमहंससभेच्या शाखा पुणे, सातारा, अहमदनगर वगैरे ठिकाणी होत्या. या परमहंससभेचे सभासद डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर, बाबा पदमनजी, नारायण रघुनाथ विजयकर, भिकोबा लक्ष्मण, सखाराम लक्ष्मण, लक्ष्मणशास्त्री हळवे, सखारामशास्त्री, बाळ भास्कर शिंत्रे, मदन श्रीकृष्ण, इ. होते. हेच पुढे प्रार्थना समाजाचेही सभासद होते. १८७४ साली प्रार्थना समाजाचे प्रार्थनागृह उभे राहिले. प्रार्थना समाजाच्या नेतृत्वाखाली ' सुबोध पत्रिका ' हे साप्ताहिक मामा परमानंद यांनी चालू केले. ता. ४ मे १८७३ रोजी पहिला आठ पानी अंक निघाला.

**ब्राह्मणेतर चळवळ** :—दक्षिण हिंदुस्थानात १९१६ च्या नोव्हेंबरमध्ये स्थापन झालेल्या पिपल्स असोसिएशनने आरंभिली होती. ह्या संस्थेचे पुढारी होते डॉ. टी. अेम्. नायर आणि पी. त्यागराज चेट्टी. ह्या चळवळीचा मुख्य हेतू होता ब्राह्मण समाजाच्या उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या राजकीय सत्तेला पायबंद घालणे. मद्रास इलाख्यात ब्राह्मणेतरांची संख्या एका ब्राह्मणास २२ ब्राह्मणेतर अशा प्रमाणात होती. शिक्षण, धार्मिक अधिसत्ता, आर्थिक सत्ता, राजकीय वजन व सामाजिक प्रतिष्ठा ह्यामुळे मद्रास इलाख्यात ब्राह्मण वर्ग प्रबळ व प्रतिष्ठित बनला होता.

**बुद्ध, गौतम** (इ. पू. ५६३–४८३) :—नेपाळच्या दक्षिणेस तराईच्या मैदानात रोहिणी नदीच्या तीरावर कपिलवस्तु येथील शाक्य वंशीय राजा शुद्धोदन यांचा हा पुत्र. जन्म लुंबिनी. मूळनाव सिद्धार्थ परंतु गौत्रनाम गौतम म्हणून सिद्धार्थ गौतम या नावाने प्रसिद्ध. इ. पू. ५२८ मध्ये बुद्धत्व प्राप्ति आणि धम्मचक्रप्रर्वतन. प्रत्येक व्यक्तिची आणि समाजाची जडणघडण सदाचाराद्वारे व्हावी म्हणून त्यांचा धम्माचा केंद्र बिंदू सदाचार. याकरिता त्यांनी पंचशील, मध्यम मार्ग एवढेच नव्हे तर प्रत्येक व्यक्तिला बुद्धत्व प्राप्ति करता यावे म्हणून दहा पारमितांच्या मार्गांची शिकवणूक दिली. स्वातंत्र्य, समता, बन्धुत्व यावर अधिष्ठित व्यक्ति आणि मानवजात निर्माण व्हावी म्हणून भिख्खू आणि स्वतः त्यांनी वरील सर्वच मूल्यांचा प्रभावीपणे प्रचार आणि प्रसार केला. जात, वर्ण अथवा वंश श्रेष्ठत्वाचा कठोरपणे विरोध केला. ' प्रतीत्य समुत्पाद ' हा विज्ञानावर आधारित सिद्धांत मांडला. लोकशाहीचे कट्टर पुरस्कर्ते म्हणून प्रत्यक्षात भिख्खू संघाचे नियम लोकशाहीवर आधारित केले. जगात दुःख आहे आणि दुःखाचे निवारण करून प्रत्येक व्यक्ति निर्वाण प्राप्त करु शकतो याकरिता सामान्य जनाकरिता अष्टांगीक मार्गाची शिकवणूक दिली. ' सत्य हे सत्य म्हणूनच ओळखा, असत्य हे असत्य म्हणूनच ओळखा ' हा व्यक्ति विकासाचा, सम्यक दृष्टी प्राप्त करण्याचा मूळ सिद्धांत दिला. त्यांच्या हयातीत वैदिक धर्म नष्ट झाला आणि जम्बुद्विपातील (भारत) संपूर्ण समाजाने (स्त्रियांनी सुद्धा) बौद्ध धम्माचा स्वीकार केला.

ब्राह्मण वर्गाचे यामुळे सर्वक्षेत्रिय प्रभुत्व नष्ट झाल्याने इ. पू. १८५ मध्ये सम्राट अशोकाचा नातू सम्राट बृहदत्ताचा त्याचाच सेनापती ब्राह्मण पुण्यमित्रशृंगाने शिताफीने खून केला आणि त्याने आणि त्यापुढे ब्राह्मण वर्गाने बौद्ध धम्माविरुद्ध प्रतिक्रांती सुरू ठेवली. ती भारतातून बौद्ध धम्माचे पूर्णपणे उच्चाटन होईपर्यंत म्हणजे इ. स. १४०० पर्यंत सुरू होती. परंतु सम्राट अशोकाने ६४००० धम्मदूत

जगात पाठविल्यामुळे जगातील बहुतांश देशात बौद्ध धम्म आहे किंवा त्याची विचारधारा अनुसरल्या जात आहे. सद्यःस्थितीत जगाच्या विनाशाला केवळ बुद्धाचे तत्त्वज्ञानच वाचवू शकते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी भारतातून उच्चाटन केलेल्या बौद्ध धम्माची पुनर्स्थापना अशोक विजयादशमी दिनी १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर येथे धम्मचक्रप्रवर्तन करून केली आहे. त्यांचा ' बुद्ध आणि त्यांचा धम्म ' हा ग्रंथ, भगवान बुद्धाच्या जीवन आणि कार्यावरील अमोल ठेवा आहे.

**बोले, रा. ब. सीतारामं केशवराव** (१८६९–१९६१) :—एक सामाजिक कार्यकर्ते. कामगार, अस्पृश्य व मागासवर्गीय बहुजनसमाजाच्या हितासाठी अनेक लोकोपयोगी कार्ये. भंडारी जातीत पालशेत गावी जन्म. मॅट्रिकनंतर समाजकार्यासाठी वाहून घेतले. १२ जानेवारी १८८० रोजी ' कित्ते भंडारी ऐक्यवर्धकमंडळी ' ची स्थापना. १९११ च्या ऑक्टोबर महिन्यात ' जस्टिस ' ऑफ दि पीस ' (J. P.) चा बहुमान भंडारी जमातीत सर्वप्रथम. १९१८ च्या नोव्हेंबरमध्ये ' पीपल्स युनियन ' किंवा ' लोकसंघ ' या राजकीय संस्थेची स्थापना. १९२० मध्ये विधीमंडळात निवडून आल्यावर अनेक लोकोपयोगी कार्ये. ४ ऑगष्ट १९२३ ला अस्पृश्यांसाठी सार्वजनिक ठिकाणे मुक्त असावीत ह्या अर्थाचा ठराव विधीमंडळात पास करून घेतला. १६ फेब्रुवारी १९२५ ला ' नवयुग ' साप्ताहिकाची सुरुवात केली. १ मार्च १९२९ रोजी ' रावबहादूर ' ही पदवी मिळाली. डॉ. आंबेडकरांनी स्थापना केलेल्या ' पीपल्स एज्युकेशन सोसायटी 'च्या कार्यकारी मंडळाचे सभासदही होते.

**बोल्शेव्हिजम** :—रशियातील सोशल डेमोक्रॅटिक पार्टीची परिषद १९०२–३ साली ब्रुसेल्स व लंडन येथे भरली होती. तेथे जहाल व मवाळ असे दोन पक्ष पडून जहाल पक्षास बहुमत मिळाले. त्यावरून या पक्षाला ' बोल्शेव्हिकी ' म्हणजे बहुमतवाला पक्ष व मवाळ पक्षास ' मेन्शेव्हिकी ' म्हणजे अल्पमतवाला पक्ष असे नाव मिळाले. या दोनही पक्षांची चळवळ कमी अधिक प्रमाणात पुढे चालू होतीच. १९१७ च्या आक्टोबरमध्ये बोल्शेव्हिक पक्षाने राज्यक्रांती करुन रशियात मजुरांची सत्ता स्थापण केली. बोल्शेव्हिक पक्षाने राज्यक्रांती केली म्हणून रशियन सरकारास ' बोल्शेव्हिक ' सरकार असेही म्हणतात. आणि या सरकारची जी राजकीय व आर्थिक तत्त्वे आहेत त्यास मूळ पक्षाच्या नावावरून ' बोल्शेव्हिझम् ' असे नाव रूढ झाले आहे.

**बोस, बाबू सुभाषचंद्र** (१८९७–?) :—एक क्रांतिकारक श्रेष्ठ पुढारी व स्वतंत्र्य हिंदी फौजेचे नेताजी. शिक्षण कलकत्ता व केंब्रिज येथे. १९२२ ते २४ साली

कलकत्त्यातील 'फारवर्ड' या पत्राचे व्यवस्थापक. १९२६ मध्ये बंगालच्या कायदे कौन्सिलात सभासद. १९२७ मध्ये सायमन कमिशनवरील बहिष्कारात भाग. अनेकवेळा तुरुंगवास. त्रिपुरा काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्ष. Indian Struggle या ग्रंथाची निर्मिती. दुसरे महायुद्ध १९४१ मध्ये चालू असताना एकाएकी हिंदुस्थानातून अदृश्य. जपानमध्ये जाऊन १९४३ साली स्वतंत्र हिंदुस्थानच्या तात्पुरत्या सरकारच्या स्थापनेची घोषणा. हिंदुस्थानच्या मुक्तीसाठी आझाद हिंद सेनेची उभारणी. सिंगापूरहून येत असता विमान अपघात व त्यात ठार झाल्याची वदंता.

**भांडारकर, डॉ. रामकृष्ण गोपाळ** (१८३७–१९२५) :—गाढे संस्कृत पंडित, प्राच्यविद्याविशारद व पुराणवस्तुसंशोधक. गार्टिजन या जर्मन युनिव्हर्सिटीकडून १८८५ मध्ये व कलकत्ता या युनिव्हर्सिटीकडून १९०८ मध्ये पीएच्.डी. ही पदवी तसेच मुंबई व एर्डिबरो ह्या दोन विद्यापीठांकडून एल्एल्.डी. चा बहुमान. १९११ मध्ये दिल्ली दरबारच्या प्रसंगी 'सर' (के. सी. आय. इ.) हा किताब. प्रार्थना समाजाचे एक मोठे आधारस्तंभ. त्यांची रक्षा पुण्याच्या प्रार्थना समाजात स्तूप बांधून ठेवली आहे.

**भोपटकर, भास्कर बळवंत** (१८७४–१९४८) :—' भालाकार ' भोपटकर म्हणून प्रसिद्ध. नामांकित वकील व उत्तम वक्ते. टिळकांचे कट्टर अनुयायी. हिंदू धर्म व संस्कृतीचे कट्टर पुरस्कर्ते. वृत्तीने सनातनी. म्हणून सामाजिक सुधारणांना विरोध. स्वमताच्या प्रसारार्थ गुढीपाडव्याच्या दिवशी ५ एप्रिल १९०५ ला ' भाला ' नावाच्या वृत्तपत्राची सुरुवात. सहा वर्षे चालून ते पुढे १४ वर्षे बंद राहिले. पुन्हा २०-४-१९२५ ला सुरू होऊन २९-८-१९३५ पर्यंत चालले. ह्या ' भाला ' वृत्तपत्रातून भोपटकरांनी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवर अत्यंत शिवराळ भाषेतून टीका केली.

**भोसले, नारायण धनाजी** :—हे डिप्रेस्ड इंडिया असोसिएशनचे चिटणीस म्हणून मुंबईत सामाजिक चळवळ करीत होते. १९२३ च्या नंतरच्या काळात डॉ. आंबेडकरांना सार्वजनिक आयुष्यात ज्या अनेक लोकांशी वाकडेपणा पत्करावा लागला, त्यापैकी भोसले हे एक गृहस्थ होत. त्यांच्याशी डॉ. आंबेडकरांचा वाकडेपणा येण्याची जी अनेक कारणे होती त्यापैकी शिवतरकरांच्या विरुद्ध अनेक लोक अनेक प्रकारच्या कागाळ्या करीत. पण बाबासाहेब नेहमी शिवतरकरांची बाजू घेत. बाबासाहेब व भोसले यांनी परस्परांवर वर्तमानपत्रातून टीका केल्या आणि कोर्टात खटले भरले. डॉ. आंबेडकर हे आपले उच्च शिक्षण आटोपून

भारताला येण्यापूर्वी त्यांचा सत्कार करण्यासाठी ' डॉ. आंबेडकर मानपत्र फंड ' स्थापन करण्यात आले होते. त्याचे चिटणीस श्री. ना. ध. भोसले होते. परंतु बाबासाहेबांनी मानपत्र घेण्याचे नाकारले.

**मध्वाचार्य** (शके ११९७–११९८) :—द्वैतमताचा प्रस्थापक. कर्नाटक प्रांतात उडुपीजवळील रजतपीठ गावी जन्म. बापाचे नाव मध्वगेह व आईचे वेदवेदी. अनंतेश्वराच्या उपासनेमुळे झाला म्हणून त्याचे नाव वासुदेव ठेवले. गुरूचे नाव अच्युतप्रेक्ष्याचार्य. वेदाध्ययन संपल्याबरोबर संन्यासाश्रम स्वीकारला. तेव्हाचे नाव पूर्णप्रज्ञ. वेदान्तशास्त्राचे स्वतंत्र बुद्धीने अध्ययन. त्यातील प्राविण्याने गुरूने त्याचे आनंदतीर्थ नाव ठेविले. सर्व हिंदुस्थानभर संचार करून अद्वैतादि निरनिराळ्या विरोधी मतांच्या आचार्यांबरोबर वाद करून विजय मिळविला. उडुपी येथे त्याने कृष्णमूर्तीची स्थापना. स्वमताच्या स्थापनेसाठी ब्रह्मसुत्रावर, गीतेवर व इतर काही उपनिषदांवर भाष्ये लिहिली. यांचे प्रसिद्ध शिष्य पद्मनाभतीर्थ, नरहरितीर्थ, माधवतीर्थ, व अक्षोभ्यतीर्थ हे चौघे होत. द्वैत म्हणजे भेद. यांच्या मते स्वतंत्र व अस्वतंत्र अशी दोन तत्त्वे आहेत. भगवान विष्णु हा स्वतंत्र असून तो सर्व सद्‌गुणांनी मंडित व दोषरहित आहे, तदितर सर्व अस्वंतत्र आहेत. जीवेश्वर भेद, जडेश्वर भेद, जीवाजीवभेद, जीवजडभेद, व जडाजडभेद, असे पाच प्रकारचे भेद मानले आहे.

**महावीर, पार्श्वनाथ** :—हे बुद्धाच्या समकालिन होते. सिद्धार्थ गौतमाच्या जन्माच्या अगोदर १५ वर्षे महावीर हे नव्या धर्माचा उपदेश जनतेत करू लागले. तो धर्म जैन-धर्म म्हणून प्रसिद्धीस आला. जैन व बौद्ध धम्म यांच्या अगोदर आर्य धर्म किंवा वैदिक धर्म चालू होता. या धर्माचा (वैदिक) पाया यज्ञयागावर उभारलेला होता व त्या यज्ञयागांना उचलून धरणारे वैदिक वाङ्‌मय (वेद, ब्राह्मणे, उपनिषदे, आरण्यके आणि श्रुति व स्मृति) ब्राह्मणांनी तयार केलेले होते. यज्ञयागांना उपसर्ग शेतकऱ्यांना व बहुजन समाजाला होई. यामुळे सामान्य जनता नागवली जाई. या परिस्थितीचा संताप महावीर व बुद्ध यांना आला आणि यज्ञयागात जी पशुहत्त्या होई त्यावर हल्ला चढविण्यासाठी अहिंसा तत्त्वाचा उपदेश सुरू केला. महावीराने अहिंसा तत्त्वाला आपल्या धर्माचा मुलाधार निर्धारित केला.

**मॅक्डोनल्ड रॅम्से** (१८६६–१९३७) :—ब्रिटीश मुत्सद्दी, पहिला मजूर पंतप्रधान आणि ब्रिटीश मजूर पक्षाचा संस्थापक. स्कॉटलंडच्या पूर्व किनाऱ्यालगतच्या लुसीमाऊथ गावी जन्म. हा घरकाम करणाऱ्या नोकराणीचा अनौरस पुत्र. याचे वडील जरी शेतीवरील मजूर असले तरी त्यांनी कधीही ही कामे केली

नाहीत. रॅम्से यांचे शिक्षण १२ व्या वर्षीच संपुष्टात आले. तो प्रथम ब्रिस्टोल नंतर लंडनला आला. ब्रिस्टोलला प्रथम त्याने सोशॅलिस्ट संघटनेशी संपर्क साधला. लंडनमध्ये तो ' सायकलिस्ट टूरिंग क्लब ' मध्ये नोकरीला होता. पुढे १८८८ मध्ये क्रांतिवादी राजकारणी थॉमस लो यांच्याकडे चिटणीसाचे काम केले व वृत्तपत्रकाराचेही काम करू लागला. १८९४ मध्ये तो प्रसिद्ध फेबियन सोसायटीचा तसेच नवीनच स्थापन झालेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचा सभासद झाला. व लौकरच त्याने वक्ता म्हणून प्रसिद्धी मिळविली. २२ जानेवरी १९२४ रोजी ते पहिले मजूर पंतप्रधान म्हणून निवडून आले. अनेक ग्रंथांची रचना केली.

**माटे, श्रीपाद महादेव** (१८६६–१९५७) :—अस्पृश्योद्धाराविषयी झटत असल्याचे दर्शविणारे ब्राह्मण गृहस्थ. त्यामुळे महार माटे मास्तर म्हणून प्रसिद्ध. पुणे हिंदुमहासभेच्या कार्यकारी मंडळाचे १९२४-३० या काळात सभासद. प्रभावी वक्ते व एक मराठी साहित्यिक. अस्पृश्यांचा प्रश्न, उपेक्षितांचे अंतरंग, हिंदुसमाजदर्शन, विवेकमंडन इत्यादी पुस्तके लिहिली.

**मालवीय, पं. मदनमोहन** (१८६१–१९४६) :—एक हिंदू पुढारी. जन्म प्रयाग येथे. १८८४ मध्ये उच्च शिक्षण पूर्ण. साहित्यसेवेत व जनसेवेत रुची. वैदिक साहित्याचा गाढा अभ्यास. विविध वृत्तपत्रांचे संपादन. काशी येथील हिंदु विश्वविद्यालयाचे संस्थापक. शेवटपर्यंत त्याचे उपकुलगुरू. चारदा राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष. अखिल भारतीय हिंदू महासभेचे तीनदा अध्यक्ष, धार्मिक व सामाजिक बाबतीत आर्यसमाजाचे कट्टर विरोधी, बरेचसे सनातनी, सर्व कर्मकांड, रीतीरिवाज, मूर्तिपूजा वगैरे हिंदू धर्माची अभिन्न अंगे आहेत हा विश्वास.

**मि. मॉन्टफर्ड** :—दक्षिण भागाचे कमिश्नर मि. ए. जे. मॉन्टफर्ड. दि. १४-८-१९२५ रोजी, प्रत्येक गावातील महार कामगारांची कमीत कमी अशी जरूर तेवढीच संख्या मुक्रर करण्यात यावी आणि प्रत्येकाला दरमहा १५ रुपये पगार ठरवावा, त्याचप्रमाणे महारांच्या वतनी जमिनीला कर माफ करावा. अशा अर्थाचा ठराव श्री. निकाळजे यांनी मांडला. त्यावर चर्चा झाली. ( Vol. xv, pp. 1383-96 ) हा ठराव सरकारने मंजूर केला तर सरकारला ५० लाख रु. खर्च येईल, असे दक्षिण भागाचे कमिश्नर मि. ए.जे. मॉन्टफर्ड यांनी सांगितले. हा खर्च मध्यभागात ७२ लक्ष रुपयाचा येईल, असे मध्यभागाचे कमिश्नर मि. जी. डब्लू. हॅच यांनी सांगितले. महार हे फार शूर, बुद्धिमान, व राजनिष्ठ आहेत, असे त्यांनी उद्गार काढले. महसूलमंत्री श्री. लल्लुभाई मेहता यांनी असे सांगितले

की, सरकार महारांची स्थिती सुधारण्यासाठी शक्य ते प्रयत्न करीत आहे. या ठरावामुळे सरकारला फार खर्च करावा लागेल व त्या मानाने फलप्राप्ती फारशी होणार नाही. हा ठराव मतास टाकला तेव्हा १५ विरुद्ध ३४ मते पडली. श्री. निकाळजे यांनी ठराव परत घेतला.

( डॉ. भी. रा. आंबेडकर : द्वितीय खंड – चां. भ. खैरमोडे, पा. ३५. )

**मॉंटफर्ड सुधारणा कायदा** म्हणून प्रसिद्ध. १९१९ साली तो मंजूर करण्यात आला मात्र अंमलबजावणी १९२० साली. या कायद्यानुसार हिंदुस्थानात दुहेरी राज्यव्यवस्था (Dyarchy) अंमलात आली. राखीव व सोपीव असे प्रांतिक राज्यकारभाराचे दोन भाग पाडून शिक्षण, आरोग्य, शेती व अबकारी खाती लोकनियुक्त मंत्र्यांच्या हाती सोपविली गेली परंतु मुलकी, न्याय, पोलीस, तुरुंग अशी खाती राखीव ठेवली गेली. मध्यवर्ती सरकारात हिंदी लोकांना अधिकाराच्या जागा जवळ जवळ काहीच नव्हत्या. सैन्य, पैसा, परराष्ट्रसंबंध, रेल्वे, व्यापार व कायदा हे सर्व इंग्रजांच्या ताब्यात होते.

**मिंटो, लॉर्ड गिल्बर्ट जॉन** (१८४५–१९१०) :—हिंदुस्थानचे व्हाईसरॉय. केंब्रिज येथे येऊन शिक्षण घेऊन बी. ए. झाले. लॉर्ड कर्झननंतर व्हाईसराय म्हणून भारतात आले. बंगालच्या फाळणीमुळे देशात अराजक चळवळ वाढली, त्याला तोंड देण्याकरिता यांनी मुद्रण नियंत्रणाचा कायदा केला. लो. टिळकांसारखे लोक तुरुंगात गेले. यांनी मोर्ले-मिंटो सुधारणा जाहीर करुन कायदेमंडळाची वाढ, प्रतिनिधित्व, शिफारसवजा ठराव करण्याचा व उपप्रश्न विचारण्याचा अधिकार, कार्यकारी मंडळात बिनसरकारी माणसांचा प्रवेश वगैरे गोष्टी केल्या.

**मुस्लिम लीग** :—राष्ट्रीय चळवळीच्या दडपणाखाली हिंदी लोकांना काही प्रमाणात राजकीय हक्क देण्यास इंग्रज सरकार जेव्हा प्रवृत्त झाले, तेव्हा त्या सत्तेत भरपूर वाटा मिळविण्यासाठी मुसलमानांनाही स्वतंत्र राजकीय संघटनेची गरज भासू लागली. ऑक्टोबर १९०६ मध्ये आगाखानांच्या नेतृत्वाखाली मुस्लिम शिष्टमंडळाने लॉर्ड मिंटो यांची भेट घेऊन मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदार संघाची मागणी केली. त्यानंतर व्हाईसरॉयसाहेबांच्या प्रोत्साहनाने व शिष्टमंडळातील पुढाऱ्यांच्या प्रयत्नाने १९०६ सालच्या अखेरीस मुस्लिम लीगचा जन्म झाला. सुरवातीच्या लीगमध्ये मोठेमोठे जमीनदार व सरकारी अधिकारी यांचे प्राबल्य असून बहुतेक पुरोगामी कार्यकर्ते व विचारवंत तिच्यापासून अलिप्त होते. पुढे १९१३ साली लीगची पुनर्घटना होऊन आगाखान, अमीर अली यासारखे जुने पुढारी मागे पडले आणि राजनिष्ठेला बाध न आणता स्वराज्याचे हक्क मिळविण्याची लीगने घोषणा केली पण पुढे ही भावना नष्ट झाली.

**मुंडले, महादेव सिताराम** :—वऱ्हाडातील मोर्शी जिल्हा अमरावती, या गावातील एक वकील. सुधारक वृत्तीचे गृहस्थ. अस्पृश्यता व जातिभेद विरोधी, पुरोगामी विचारसरणी.

**राजभोज, पांडुरंग नत्थूजी** (१९०५–१९८४) :—नासिक जिल्ह्यात चर्मकार जातीत जन्म. धुळे येथे शिक्षण. १९२५ मध्ये सरकारी नौकरीत प्रवेश. सामाजिक व राजकीय कार्यात सहभाग. विविध संस्थांचे सभासद. कॉंग्रेस पक्ष व आंबेडकर पक्ष अशी बरेचदा धरसोड. १९३२ च्या डॉ. आंबेडकर व म. गांधी यांच्यात झालेल्या पुणे करारात यांचीही सही. ' दलितबंधू ' हे मराठी व ' इंडियन स्टेटस् ' हे इंग्रजी साप्ताहिक चालविले. नंतर ' समता ' हे नियतकालिक चालवित होते. एम. एल. सी. असून अखिल भारतीय बौद्ध सभेचे अध्यक्ष होते. एके काळी बाबासाहेबांच्या धर्मांतराला विरोध करणारे राजभोज बौद्धधर्म स्वीकारून बुद्धानुयायी झाले होते.

**राजा, एम्. सी.** (१८८३–१९४३) :—मद्रास येथील अस्पृश्यांचे पुढारी. शिक्षण मद्रास येथील ख्रिश्चन कॉलेजात. सरकारच्या विविध समित्यावर सभासद. सायमन कमिशनच्या मध्यवर्ती सल्लागार समितीत एक सभासद. अनेक परिषदांचे अध्यक्षपद भूषविले. अखिल भारतीय हरिजन सभेचे ते अध्यक्ष होते तसेच अखिल भारतीय हिंदुमहासभेचे उपाध्यक्षही होते. गोलमेज परिषदेचे एक सभासद म्हणून लंडनला गेले होते. डॉ. आंबेडकरांच्या विरोधात संयुक्त मतदार संघाच्या मागणीस पाठिंबा देऊन राजा-मुंजे करार घडवून आणला होता. यांना रावबहादूर हा बहुमान इंग्रज सरकारने दिला होता.

**राजा राममोहन राय** (१७७२–१८३३) :—हिंदू धर्माचे पहिले सुधारक. त्यांनी ब्राह्मो समाज २० ऑगष्ट १८२८ रोजी स्थापन केला. ख्रिस्ती धर्माच्या प्रार्थना, भजन इत्यादि भक्ति प्रदर्शक कार्ये ज्या पद्धतीने चालत त्या पद्धतीने ब्राह्मो समाज आपली धार्मिक कार्ये चालवू लागला. या समाजाने आपल्या धर्माचा प्रसार उच्च वर्णीय हिंदुमध्येच केला व तोहि फार अल्प प्रमाणात. अस्पृश्यांकडे प्रथमतः त्यांचे लक्ष खेचले गेले नाही. त्यांनी जगातील सर्व धर्मांचा तौलनिक अभ्यास करून एकेश्वरवादाच्या निष्कर्षाला आले. सामाजिक सुधारणेचे पुरस्कर्ते. सतीची चाल बंद करण्यास सरकारला महत्त्वाचे सहाय्य केले. १८३० साली इंग्लंडला गेले. १८३३ साली तिकडेच वारले.

**रामानंद, आचार्य** :—हे आचार्य श्रीरामानुजाचार्यांपासून पाचवे आचार्य होत. १३ व्या शतकाच्या अखेरीस किंवा १४ व्या शतकाच्या प्रारंभी यांनी वैष्णवधर्माला

हिंदुस्थानच्या राष्ट्रीय धर्माचे स्वरूप आणलेले होते. यांचा मठ जरी बनारसमध्ये होता तथापि यांनी चहूकडे संचार करुन वैष्णवपंथाचा प्रसार केला. हीन मानलेल्या जातीतूनच यांनी आपले मुख्य बारा शिष्य केले होते. त्यापैकी एक चांभार, दुसरा न्हावी, तिसरा कोष्टी जातीचा होता. सर्व जातीच्या लोकांना यांच्या मठांमध्ये येण्याला परवानगी होती. या मठामध्ये या काळी स्पर्शास्पर्श नव्हता.

**रायनाक महार** :—पूर्ण नाव रायबा जानबा गायकवाड. परंतु रायनाक नावानेच इतिहासात ओळखला जातो. हा रायगडच्या पायथ्याशी असलेल्या पाचाडचा रहिवाशी. रायनाकचे वंशज अजूनही इथे राहतात. तो अत्यंत शूर होता. या रायनाकची समाधी इतिहासप्रसिद्ध रायगड किल्ल्याच्या ऐन टकमक टोकाखाली आहे. श्री. द. ग. कुळकर्णी ह्यांनी जुलै १९३३ च्या किर्लोस्कर मासिकात (पान ७२३) वर रायनाकाच्या संदर्भात मासलेवाईक माहिती दिली आहे. ती येणेप्रमाणे :—"डाव्या बाजूस टकमक टोक आहे. याला आज 'रायनाक' टोक म्हणतात. पेशवाईच्या अखेरच्या काळात हा अभेद्य किल्ला सर करण्याची गुरूकिल्ली पाचाडच्या रायनाक नावाच्या महाराने इंग्रजांना सांगितली आणि इंग्रजांनी त्याप्रमाणे जगदीश्वराच्या उजव्या हातच्या डोंगरावरून तोफा डागून अत्यंत बिकट जागी असलेल्या मराठ्यांचा दारूखाना उडविला. धूर्त इंग्रजांनी रायनाकला पुढे ह्याच टोकावरून खाली लोटून दिले, म्हणून त्यांच्या नावाने ते आज ओळखले जात आहे."

परंतु या म्हणण्याला दंतकथेशिवाय कोणताही ऐतिहासिक पुरावा नाही. या संदर्भात कुलाबा जिल्ह्याचे सुप्रसिद्ध इतिहास संशोधक कै. शां. वि. आवळसकर म्हणतात, "रायगड प्रकरणी रायनाक महाराचे नाव बदनाम झाले आहे. त्याबाबत इंग्रज ग्रंथकार इतके मुग्ध आहेत की, त्याच्या फितुरीचा मागमूस त्यातून अस्पष्ट स्वरूपातही लागू शकत नाही, तेव्हा रायनाकाच्या फितुरीचा ऐकीव गाजावाजा आहे, तो सर्वश्री निराधार आहे. उलट रायनाक फितुर नव्हता असे सिद्ध करू पाहणारे कागद डॉ. आंबेडकरास उपलब्ध झाले होते. ते कागद जर पुढे आले तर रायनाकाच्या बाबतीत काही मजकूर वाचकापुढे येईल व १४० वर्षावर ज्याच्या नावाला काळीमा लागला त्याचे नाव उज्वल होईल."

या संदर्भात प्रा. झुंबरलाल कांबळे यानी अधिक माहिती मिळविण्याचा प्रयत्न करून ती 'अस्मितादर्श' त्रैमासिकाच्या मे-जून ७७ च्या अंकात दिली. ती महत्त्वपूर्ण असून ती येणेप्रमाणे :—" रायनाकाचा कडेलोट टकमक टोकावरून झाला, हे खरे. पण तो इंग्रजांनी केला नाही! पेशव्यांनी केला !! रायनाकाबरोबर आणखी एका माणसाला देहदंडाची शिक्षा दिली. त्यांचे नाव

तुळशी शेडगा. ही माहीती महाडचे सुरेन्द्रनाथ गोविंद उर्फ नानासाहेब टिपणीस आणि पिपल एज्यूकेशन सोसायटीचे कार्यवाह घनःश्याम तळवटकर यांनी दिली. त्यांचे म्हणणे असे की, या संदर्भात उखडे (जि. पुणे) येथील पोतनीसाकडे काही ऐतिहासिक कागदपत्रे होती. ती नानासाहेबांनी बाबासाहेब आंबेडकरांना दिली. बाबासाहेबांनी नंतर 'जनते'त 'रायगडचा रायनाक महार' हा लेख लिहिला...... रायनाकाचा कडेलोट केला पण तो फितूर झाला म्हणून नव्हे. त्याने इमानेइतबारे धन्याची चाकरी केली म्हणून ! जीवाची बाजी लावून रायगडचे संरक्षण करण्याचा प्रयत्न केला म्हणून !!

संभाजीचा पुत्र शाहू गादीवर आल्यानंतर १७३४ मध्ये रायगड ताब्यात घेतला व तालुक्याचा कारभार यशवंत महादेव पोतनीसाकडे दिला. हे महाड येथे राहत. या पोतनीसातर्फे गडाचा लष्करी कारभार कारखानीस सांभाळीत. त्यांचे मूळ नाव गुप्ते. ते महाराजांच्या गडावरील १८ कारखान्याचे अधिकारी होते. १५-१२-१७७२ ला शाहूचा मृत्यू झाल्यानंतर राज्याचा सर्व कारभार पेशव्याकडे आला. 'शाहूच्या मृत्यूनंतर वारस रामराजा याने इ. स. १७७२ ला रायगडचा हवालदार यशवंत मोरे यास रायगड ही तख्ताची जागा जकीऱ्यासुद्धा पेशव्याच्या स्वाधीन करावी' परंतु पोतनीसाने त्यास नकार दिला. पेशव्यांनी अपाजी हरी यास सैन्य देऊन रायगडच्या मोहिमेवर पाठविले. अपाजीने १८ मार्च १७७३ रोजी रायगड ताब्यात घेतला. या युद्धात पोतनीसांच्या वतीने खंडेराव मोरेश्वर लढला. याच युद्धात रायनाक महार लढला असावा. किल्ल्याच्या संरक्षणासाठी पोतनीसातर्फे त्याची नेमणूक कारखानीसांनी केली होती. पेशव्याचा जय झाल्यावर, छत्रपतीचे निशान हाती लागू नये म्हणून रायनाकाने त्याचे प्राणपणाने जतन करून घेऊन तो पोतनीसांकडे गेला. सैनिकांनी तेथे पोतनीस, रायनाक व तुळशी शेडगा यास पकडून पेशव्यांच्या स्वाधीन केले. रायनाक महार आपल्या मालकाच्या इमानदारीसाठी शेवटच्या क्षणापर्यंत लढला, हे पेशव्यांना सहन न होऊन, रायगडावर कैद करून आणले आणि टकमक टोकावरून त्याचा कडेलोट केला. यावरून रायनाक हा फितूर नव्हता.

**राष्ट्रीय सभा** :—मुंबई इलाख्यातील एक अधिकारी सर विल्यस् वेडरबर्न, १८७० ते १८७९ या काळात हिंदुस्थान सरकारच्या गृहमंत्र्याचे चिटणीस ॲलन ऑक्टेव्हिअन ह्युम आणि बंगालमधील सर हेन्री कॉटन यांच्यासारखे एक सेवानिवृत ब्रिटिश अधिकारी आणि दादाभाई, रानडे, बॅनर्जी, बोस, तेलंग वगैरे हिंदी राष्ट्रीय पुढारी यांच्या सहकार्याने साम्राज्यनिष्ठेच्या पायावर आणि सनदशीर

चळवळीच्या आधारावर हिंदी राष्ट्रीय सभेची स्थापना इ. स. १८८५ च्या २८ डिसेंबर रोजी मुंबईस करण्यात आली. १८८४ मध्ये मि. ह्यूम ह्यांच्या धुरीणत्वाखाली 'इंडियन नॅशनल युनियन' या संस्थेची स्थापना झाली होती. या संस्थेमार्फत पुण्यात १८८५ च्या डिसेंबर मध्ये एक परिषद भरविण्याचे ठरविले. या परिषदेने १८८५ च्या एप्रिलमध्ये एक जाहीर पत्रक काढले–''इंडियन नॅशनल युनियनची एक परिषद ता. २५ डिसेंबर ते ३१ डिसेंबर पर्यंत पुणे येथे भरविण्यात येईल. या परिषदेस बंगाल, मुम्बई, मद्रास या प्रांतातील सर्व भागातील इंग्रजी भाषा उत्तम प्रकारे जाणणारे राजकीय पुढारी प्रतिनिधी म्हणून उपस्थित राहतील. या परिषदेचे प्रत्यक्ष दोन हेतू असतील—(१) राष्ट्रीय प्रगतीच्या कार्यात अत्यंत कळकळीने भाग घेणारांचा परस्परांशी परिचय व्हावा आणि (२) पुढील साली हाती घ्यावयाच्या राजकीय कार्याची चर्चा करून ती कार्य निश्चित करण्यात यावीत. अप्रत्यक्षरीत्या ही परिषद म्हणजे हिंदी लोकाचे पार्लमेंटचे बीजच होईल. . . . '' अशा प्रकारे सर्व तयारी चालू असता आयत्या वेळी पुण्यास महामारीची साथ उद्भवल्यामुळे हे अधिवेशन मुंबईस भरविण्यात आले.

**रोहिदास, संत** :—जन्म १५ फेब्रुवारी १३९८ मध्ये चवर वंशात, रविवार माघ पौर्णिमेला काशी जवळ गोवर्धनपूर येथे झाला. काहींच्या मते त्यांचा जन्म मांडूर, माडुगडिह या गावी झाला, त्यांना पंजाबी भाषेत रैदास अथवा रेयीदास, हिंदीमध्ये रैदास अथवा रविदास, राजस्थानी मध्ये रोहिदास, बंगालमध्ये रूईदास किंवा रुयदास आणि मराठी मध्ये रोहिदास अथवा रोहितदास अशा नावाने संबोधिले जाते.

वयाच्या १२ व्या वर्षांपासून त्यांचे आध्यात्मिक गोष्टीकडे आकर्षण होते. परंपरागत चालत ठेवलेल्या अन्याय, अत्याचार व शोषणाच्या विरोधात ते भक्कमपणे उभे राहिले. ते आपले कुटुंब स्वतः कष्ट करून चालवित होते आणि बाकीचा वेळ सभाजामध्ये जागृती निर्माण करण्याकरिता घालवीत होते. त्यांच्या विचार धारेचे मूलभूत सूत्र, समाजामध्ये स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व रुजवून जातिजातीत विभाजित समाजाला संघटित करणे एक जिनसी समाज निर्माण करणे, हेच होते. त्यांच्या विचारधारेचा प्रभाव सामान्य लोकावरच नव्हे तर चितोड राजघराण्यातील राणी मीराबाई, सपना वीर, पीपाजी महाराज, दिल्लीचा सुलतान सिकंदर शाह लोधी यांच्या सारख्यावर झाला आणि त्यांनी त्यांचे शिष्यत्व पत्करले.

त्यांच्या नावाने रोहिदासी अथवा रविदासी पंथाला प्रारंभ झाला. उत्तर भारतात 'रविदासी पंथ' असे समजले जाते. त्यातील खालील जाति-उपजातीतील लोकांना रविदास पंथीय म्हणून स्थान आहे. त्यात रोहिदास, रामदासिया, दास, जटिया, रैदास, रायदास, लडिया, लुनिया, जाटव, धसिया, कुरील, चर्मकार, संखवार, अहिरवार, जैसवार, सतनामी, रामनामी, कठाना, साकेत, सिलावट, भावी, कबीर पंथी, मोची, चौधरी, दोहरे, रैगर, महोबिया, चढार, चोषण, लोमोड, बेंरहा, सिंधु, सुर्यवंशी, चांदोर अशा अनेक जाती आहेत.

गुरु नानक आणि गुरू कबीर हे रविदासांचे समकालीन होते. शीख धर्मामध्ये मूर्तीपूजा नाही. त्यात मानवतेला प्रमुख स्थान आहे. त्यामुळे संताच्या दोह्यांना 'गुरुबाणी' मध्ये गुरुवचनांना पवित्रतेचे आणि श्रध्देचे स्थान दिले आहे. शीख धर्माच्या 'गुरूग्रंथ साहिब' या पवित्र ग्रंथात गुरू रविदासांची ४० पदे समाविष्ट केलेली आहेत.

ते म्हणतात,

''ब्राह्मण, खतरी, वैस, सूद 'रविदास' जनमते नांहि ।
जौ चाहइ सुबरन कउ, पावई करमन मांहि ।।

(रविदास दर्शन, दोहा–१२३)

(कोणी मनुष्य जन्मापासून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र ठरत नाही. उच्च कर्मापासून उच्च वर्ण प्राप्त होतो.)

''राग द्वेष कूं छांडि कर, निहकरम करहु रे मीत ।
सुख दुख सम रहिं थिर रंहि, 'रविदास' सदा मन जीत ।।

(रविदास दर्शन, दोहा–११३)

(तू राग, द्वेष न करता निष्काम भावनेने कर्म करत राहशील तर सुख आणि दुःखात तुझे मन नेहमीच स्थिर राहील.)

**रौलत बिल** :—१९१९ च्या जानेवारीत रौलट ॲक्ट या नावाने दोन कायदे हिंदुस्थान सरकारने पास केले होते. यास काळे कायदे असेही म्हणतात. पहिले महायुद्ध संपल्यानंतर 'डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट' हा कायदा आपोआप रद्द होणार होता. तेव्हा देशातील गुप्त कटाच्या क्रांतिकारक चळवळीचा निःपात करता यावा म्हणून हे कायदे सरकारने केलेले होते. या कायद्यामुळे कोणत्याही आरोपीस त्याच्यावरील आरोपाची शाबिती सामान्य न्यायासनापुढे उघड चौकशीअंती झाल्याखेरीज शिक्षा होऊ नये. या मूलभूत नागरिक हक्कावर गदा येऊन हिंदी नागरिकांचे जीवित व वित्त यांच्या सुरक्षिततेस धोका येणार होता.

**लाला लजपतराय** (१८६५–१९२८) :—एक नावाजलेले हिंदी पुढारी. पंजाबमधील वैश्य जातीत जन्म. सामाजिक व राजकीय क्षेत्रात फार मोठी कामगिरी. त्यामुळे पंजाबमधील प्रमुख नेता म्हणून नावलौकिक. समाजसुधारक, शिक्षणतज्ञ, हिंदी भाषा प्रेमी, सफल लेखक व प्रभावी वक्ता म्हणून प्रसिद्ध. मॅझिनी, गॅरिबॉल्डी, शिवाजी, कृष्ण, दयानंद इत्यादी चरित्रांचे लेखक. शेवटचे पुस्तक ' दुखी भारत '. हे मिस मेयोच्या ' मदर अिंडिया ' ह्या ग्रंथाला उत्तर म्हणून लिहिले. सायमन कमिशनवर बहिष्कारासाठी उभारलेल्या आंदोलनात पोलिसांच्या लाठीचा तडाखा लागून मृत्यू.

**लिंकन, अब्राहम** (१८०९–१८६५) :—अमेरिकेचे सोळावे अध्यक्ष, रॉकस्प्रिंग येथे १२ फेब्रुवारी १८०९ रोजी जन्म झाला. १८१८ मध्ये आई वारली व बापाने दुसरे लग्न केले. सावत्र आईमुळे चांगले वळण लागले. घरीच पुस्तकी व शारीरिक शिक्षण मिळाले. २१ व्या वर्षी फेरीवाल्याची नोकरी पत्करून, कायद्याचा अभ्यास केला. १८३२ साली वरील नोकरी सुटून, त्याच सुमारास सुरू झालेल्या ब्लॅक हॉक इंडियन युद्धातील सैन्यात कॅप्टनचा हुद्दा. प्रतिनिधी सभेत निवडून येण्याचा त्यांचा प्रयत्न फसला. तेव्हा तो दुकानदारी करू लागला. त्यात कर्ज झाले. १८३४ मध्ये इलिनॉईसच्या प्रतिनिधीसभेचा सभासद म्हणून निवडून आला. मतदानाचा हक्क, कर देणाऱ्या किंवा शस्त्र धरणाऱ्या सर्व स्त्री-पुरुषांना असावा ह्या मताचा तो होता. गुलामगिरी पद्धतीच्या पूर्ण विरुद्ध होता.[१]

"न्यू ऑर्लिन्स शहर पाहण्यास गेला असताना एका निग्रो तरुणीचा जाहीर लिलाव चालल्याचे भयानक दृश्य तेथे त्याच्या दृष्टीस पडले. तिला विकत घेऊ इच्छिणाऱ्या लोकांनी तिची जी विटंबना चालविली होती, ती बघून काळजात कुणी तरी सुरी खुपसावी, असे त्याला दुःख झाले. त्याने आपले डोळे झाकून घेतले आणि संतापाने तळमळत उद्‌गारला 'मला जर कधी संधी मिळाली तर ह्या राक्षसी गुलामगिरीच्या टाळक्यावर हातोडा घालून मी तिचा चेंदामेंदा करून टाकील."

"ज्या राष्ट्रात वैचारिक यादवी आहे, ते राष्ट्र कोलमडून पडलेच पाहिजे. अर्धे गुलाम आणि अर्धे स्वतंत्र अशा स्वरुपात ते राष्ट्र टिकू शकणार नाही." असे त्याचे स्पष्ट मत होते. तो लोकशाही विषयी म्हणतो, "गुलामगिरी आणि मालकशाही नष्ट करणे याचेच नाव लोकशाही."[२]

---

[१] : गुणवीर, पृ. ३५०-३५२.

[२] : आचार्य अत्रे, ही ईश्वराची दया.

स्वतःच काँग्रेसमध्ये कोलंबियातील गुलामांची पद्धत बंद करण्याचे बिल आणले. १८४६ मध्ये राष्ट्रप्रतिनिधी सभेत निवडून आला. त्यावेळी सुरु असलेल्या मेक्सिकन युद्धाच्या विरुद्ध होता. १८३६ मध्ये वकिलीची सनद मिळविली. १८४९–१८५४ मध्ये फक्त वकिली केली. १८५४ मध्ये युनायटेड स्टेट्सच्या प्रतिनिधी सभेत निवडून आला व १८६१ साली राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून आला. १८६४ मध्ये पुन्हा राष्ट्राध्यक्ष म्हणून निर्वाचन. ता. १४ एप्रिल १८६५ रोजी नाट्यगृहात खेळ पाहत असता जॉन बून नावाच्या नटाने खून केला.[१]

**वल्लभाचार्य** (१४७९–१५३१) :—पुष्टीमार्गाचा संस्थापक. तेलगु प्रांतातील कांकरव येथील लक्ष्मणभट्ट नावाच्या कृष्णयजुर्वेदी तेलंगी ब्राह्मणाचा हा मुलगा. आईचे नाव एलमागार. वल्लभाने काही दिवस वृंदावनास व काही दिवस मथुरेस वस्ती केली. या सुमारास गोवर्धन पर्वतावर देवदमन (श्रीनाथजी) या नावाने गोपाळकृष्ण प्रगट झाले असे सांगतात. 'त्या ठिकाणी येऊन माझे दर्शन घे, ' असे वल्लभास स्वप्नात सांगितल्यावर तेथे जाऊन श्रीनाथजीचे दर्शन घेतले. नंतर वल्लभाने पुष्टिमार्गाची स्थापना केली व श्रीनाथजी या नावानी प्रसिद्ध असलेल्या कृष्णाच्या विशिष्ट अवताराशी आपल्या पंथाची सांगड घातली. वल्लभाच्या पूर्वीच्या काळी होऊन गेलेला ग्रंथाकार विष्णुस्वामिन् याचा व वल्लभाचा वेदान्तविषयक सिद्धान्त एकच आहे. तो असा–आदिपुरुष अगर आत्मा एकटा असल्यामुळे त्यास बरे वाटेना, नाना रुपे धारण करावी अशी त्यास इच्छा झाली, त्या प्रमाणे तो स्वतःच अचेतन सृष्टी, जीव (जीवत्मा) व अन्तर्यामिन आत्मा झाला. ''यथा सुदीप्तात्पावकाद्विष्फुलिङ्गाः सहस्त्रशः प्रभवन्ते सरूपाः तथा'' याप्रमाणे सर्व उत्पन्न झाले असून त्याचेच अंश होत. संस्कृत भाषेत अनेक ग्रंथरचना. प्रमुख–वेदान्तसूत्र-अणूभाष्य, सुबोधिनी व तत्वदीप निबंध.

**वाकसकर, विनायक सदाशिव** :—बडोदे येथील प्रसिद्ध इतिहाससंशोधक, जातीने कायस्थ प्रभु. ' अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रे ' वगैरे ग्रंथांचे लेखक.

**वेदान्त** :—उपनिषदांत सांगितलेले तत्वज्ञान ते वेदान्त. शंकराचार्यप्रणीत अद्वैतास वेदान्त म्हणून सर्वसामान्यतः संबोधितात. जीव व ब्रह्म एक आहे, जग हा केवळ भास आहे असे अद्वैत सांगतो, तर मध्वाचार्यासारखे द्वैतवादी जीवात्मा व परमात्मा भिन्न मानतात व जग सत्य आहे असे मांडतात. शुद्धाद्वैती वल्लभाचार्य जीव, जगत व परमात्मा यांचे ऐक्य मानून ब्रह्माला मायेची बाधा लागू देत नाहीत. विशिष्टाद्वैतवादी (उदा. रामानुजाचार्य) जीव, जगत् व ईश्वर ही वेगवेगळी व खरी समजतात. जीव–जगतृईश्वराचे शरीर आहे असे ते कल्पितात.

---

[१]: गणवीर पृ. ३५२.

**वैष्णवपंथ अथवा भागवत पंथ** :—''हिंदुस्थानातील एक प्रमुख धर्मसंप्रदाय. विष्णुदेवतेला निरनिराळ्या स्वरुपात भजणारा हा संप्रदाय असल्यामुळे याला वैष्णवपंथ म्हणतात. ब्राह्मण काळी विष्णुदेवतेला विशेष प्राधान्य येत होते. पुढे महाभारतकाळी व पुराणकाळी विष्णु म्हणजेच परब्रह्म असे मानण्यात येऊ लागले. वैष्णव संप्रदाय हा मूळ भक्तिप्रधान एकेश्वरी धर्म होय. हा एकान्तिक धर्म ईश्वराचे अस्तित्व मानणारा होता. या धर्माच्या बुडाशी वासुदेव कृष्णाने सांगितलेली भगवद्‌गीता ही होती. कालांतराने या धर्माला सांप्रदायिक स्वरूप प्राप्त होऊन हा धर्म पांचरात्र अगर भागवत या नावाने संबोधण्यात येऊ लागला. वैष्णव संप्रदायात नारायणीय धर्मातील तत्त्वज्ञान, वासुदेव भक्ती व विष्णूची परब्रह्म या नात्याने उपासना, यांचा अंतर्भाव होऊ लागला. अभीर नावाच्या जातीने बालकृष्णाच्या लीला व गोपीशी होणारे त्याचे विलास या दोन गोष्टीची, या धर्मात भर पडली. श्रीशंकराचार्यानी आपल्या अद्वैत मताचा प्रसार हिंदुस्थानात केल्यावर या पंथाला धक्का बसला. पण पुढे रामानुजाचार्यांनी वैष्णव धर्माचे पुनरुज्जीवन केले. त्याच सुमारास उत्तर भारतात निम्बार्कानेही वैष्णव संप्रदायाच्या पुनरुद्धार्थ कसून प्रयत्न केला.''[१]

''या साधुसंतांचा पंथ भागवत किंवा वैष्णव पंथ म्हणून प्रसिद्धीला आला. भक्ती व समानता हा त्या पंथाचा मंत्र. तो मंत्र सफल करावयाचा तर शंकराचार्याची विचारप्रणाली खोडून काढली पाहिजे, असे ज्या भागवतांना वाटले त्यांत रामानुजाचार्य (शके ९३८) आणि मध्वाचार्य (शके १११९–११९८) हे पहिले होत. या दोघांच्या विचारसरणीचे लोण वल्लभाचार्य (शके १४०१–१४५३) यांनी पुढे नेले. भागवत धर्माची चळवळ पुढील काळात बहुजन समाजात पसरली. त्याचे श्रेय पुढील काळातील साधुसंतांना आहे. त्यातील प्रमुख साधुसंत रामानंद (१४ वे शतक), चैतन्य (इ. स. १४८५–१५३३), कबीर (१५ वे शतक), चोखामेळा, नामदेव, एकनाथ (१५३२–९९ इ. स.) तुळसीदास (१५३३–१६२४), गोरा कुंभार, सेना न्हावी, रविदास चांभार, नरसी मेहता, मीराबाई, नानक (१४६९–१५३९ इ. स.), तुकाराम हे होत. त्यांनी भागवत पंथाची भगवी पताका भारत देशाच्या निरनिराळ्या प्रदेशात नाचवली. संतांनी मानवातील विषमतेविरूद्ध म्हणजे जातिभेदाविरूद्ध जोराचे बंड उभारले व ते भक्तिमार्गातील सर्व आध्यात्मिक उपायांनी लढविले. परंतु जातीजातींतील भेद

१ : गणवीर, पृ. २२४.

मुळासकट नष्ट करण्याचे यश त्याना लाभले नाही. याचे कारण हिंदु धर्मातील पुनर्जन्म, मायावाद, अवतार, कर्मवाद, इत्यादी शिकवणुकीची जनतेवर पडलेली छाप. ही छाप साधुसंतांच्याही मनावर बसलेली होती. व तीमुळे ते जातिभेद नष्ट करण्याच्या कार्यात यशस्वी झाले नाहीत."

"भागवत धर्माच्या चळवळीतील साधुसंतांनी ब्राह्मणी हिंदू धर्माची स्तुती गावयाला सुरवात केली. वेदप्रामाण्य, ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व, ब्राह्मणेतरांचे हीनत्व, माया, पुनर्जन्म इत्यादी कल्पना यांचा त्यानी उदो-उदो केला. परमेश्वर एक, सर्व मानवप्राणी एक वगैरे समतेच्या कल्पना जरी ते चळवळीत प्रसृत करीत असत तरी ते चातुर्वर्ण्याला धक्का न लागू देता समाजसमता प्रस्थापित करण्यास उद्युक्त झाले होते. कथाकीर्तनात, अभंगात, भारुडात साधुसंत समतेच्या कल्पना सांगतात; पण प्रत्यक्ष आचरणात तो ब्राह्मण म्हणून श्रेष्ठ व तो महार म्हणून अस्पृश्य अशी त्यांची वागण्याची रीत होती. एवढेच नव्हे तर एखादा ब्राह्मणेतर साधू वा संत भक्तिमार्गात शिरोमणी जरी ठरला तरी तो अब्राह्मण जातीचा म्हणूनच त्याला वागविण्यात येई. चोखामेळा, रविदास, नंद, तिरुमल्लुवर, इत्यादी अस्पृश्य संतांची चरित्रे याच कथांनी भरलेली आहेत. परमेश्वर हा सर्व मानवांचा बाप, सर्व मानव ही त्याची मुले, सर्व मानव हे परस्परांचे बहीण-भाऊ अशी उदात्त शिकवण आपल्या अभंगातून देणारे संत आपल्या अंभंगांत असेही मान्य करीत की, ब्राह्मण श्रेष्ठ व वंदनीय असेच मानले पाहिजेत; आणि ब्राह्मणेतर कितीही थोर झाला तरी त्याला ब्राह्मणाने समानतेने वागवू नये, अशी रामदासांची शिकवण होती. ब्राह्मणांनी ब्राह्मणेतराला आपले गुरू करू नये असा अलिखित नियम होता व तो सर्व संत पाळीत असत." [१]

**शंकराचार्य** (इ. स. ७८०–८१२) :—इ. स. ७८० मध्ये केरळ उर्फ मलबार प्रांतात नंबुद्री जातीच्या ब्राह्मण कुलात जन्म. वडील लहानपणीच निवर्तल्यामुळे पालनपोषण त्यांच्या मातुश्रीने केले. अलौकिक बुद्धिमत्तेच्या जोरावर थोडक्याच अवधीत त्यांनी आपले अध्ययन संपविले व संन्यास घेण्याचा निश्चय करून विंध्याद्रीच्या आसपास आले. तेथे त्यांनी सांख्यकारिकांवर भाष्य करणारे प्रसिद्ध पुरूष गौडापादाचार्य यांचे पट्टशिष्य गोविंदाचार्य यांचेपासून गुरुपदेश घेऊन संन्यास दीक्षा घेतली. नंतर तेथेच वेदाध्ययन करून ते काशीस गेले.

अशा रीतीने सर्वत्र संचार करून वयाच्या अवघ्या बत्तीसाव्या वर्षी आपला अवतार समाप्त केला.

---

[१] : खैरमोडे, खंड १ ला, पृ. ११६, ११८.

जनतेने त्यांना जगद्गुरू ही पदवी दिली. त्यांनी केलेली कामगिरी म्हणजे बौद्ध धर्माकडील जनतेच्या वृत्तीचा कल फिरवून त्यांची वैदिक धर्मावर निष्ठा बसविणे ही होती. अद्वैतवादाचे पुरस्कर्ते. सर्व विश्वातील अंतिम सत्ता व सत्य ब्रह्म आहे ! जग हे ब्रह्माच्या तुलनेने मिथ्या व आभासात्मक आहे. जीवाचे मूळ स्वरूप म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहे. जीव आणि ब्रह्म एकच आहे. त्यांच्यात अद्वैत आहे. ब्रह्म हे सत्चित् आनंदमय आहे. या ब्रह्मज्ञानाने मोक्षप्राप्ती होते.

शंकराचार्यांनी आपल्या मतांचा उपदेश अखंड चालू राहण्याची व्यवस्था दक्षिणेस श्रृंगेरी, पश्चिमेस द्वारका, पूर्वेस पुरी व उत्तरेस बद्रिकेश्वर येथे धर्मपीठांची स्थापना केली.

**शंकराचार्य, डॉ. लिंगेश महाभागवत कुर्तकोटी** (१८७९–१९६७) :—जन्म धारवाड जिल्ह्यातील कुर्तकोटी गावी, वतनदार कुळकर्णी घराण्यात. कर्नाटकातील पद्धतीप्रमाणे गावाचे नाव हेच आडनाव. म्हणून त्या नावाने प्रसिद्ध. संस्कृतचे पंडित व गाढे अभ्यासक. ' दि हार्ट ऑफ भगवद्गीता ' या प्रबंधावर ओरिअेंटल युनिव्हर्सिटी ऑफ वाशिंग्टनकडून पीएच.डी.. लो. टिळकांच्या सल्ल्यावरुन संन्यास. ३ जून १९१७ ला कोल्हापूरच्या संकेश्वर पीठावर शंकराचार्य म्हणून अभिषेक. संस्कृत, अिंग्रजी, मराठी व कानडी या भाषांवर प्रभुत्व, त्यामुळे अस्खलित वक्तृत्व. चतुर तसेच महत्वाकांक्षी. धर्मकारणापेक्षा राजकारणात लुडबूड करण्याची सवय. शाहू महाराजांनी कोल्हापूर संस्थानातील कुळकर्णी वतने जप्त केल्याच्या वादावरुन संकेश्वर पीठ सोडून नाशिक येथील पंचवटी येथे वास्तव्य. अनेक इंग्रजी ग्रंथ लिहिले. शुद्धिकरणासाठी खूप प्रयत्नशील राहिले. नाशिक येथेच समाधिस्थ झाले.

**शिदनाक महार** :—" सातारा जिल्ह्यात तासगाव तालुक्यात कळंबी म्हणून एक गाव आहे, तेथला हा वतनदार महार. औरंगजेबाचे हातून संभाजी मारला गेल्यावर पुढे जी महाराष्ट्रात बंडाळी माजली, ती २५-३० वर्षे चालूच होती. त्यावेळी शिदनाकाने महार लोकांचे एक पथक उभारून धामधूम केली. शाहूस जे लहानमोठे सरदार मिळाले त्यांत हा शिदनाकही मिळाला. शाहूस राज्यप्राप्ती झाल्यावर ज्यांनी त्यास मदत केली, त्या सर्वास त्याने त्यांच्या योग्यतेप्रमाणे देणग्या दिल्या. त्यावेळी शिदनाक ह्यास कळंबी गाव इनाम दिला. ह्या शिदनाकचा नातू त्याच्याच नावाचा होता, तो खर्ड्याच्या लढाईत होता. खर्ड्याच्या मैदानावर जेव्हा मराठ्यांच्या फौजेचा तळ पडला

तेव्हा सरदार आपआपल्या लोकांसह मिसली प्रमाणे उतरले. शिदनाकाच्या गोटात आसपास दुसऱ्या ब्राह्मण व मराठा सरदारांचे गोट होते. पेशवाईत सोवळ्याओवळ्याचा विचार बराच वाढत चालला होता, त्यामुळे कित्येकांनी सवाई माधवराव कचेरीच्या डेऱ्यात बसले असता, विनंती केली की, महारांचा गोट मध्येच आहे तो बाजूस काढावा. पेशव्यांनी विनंती ऐकून आपल्या बाजूस बसलेल्या हिरोजी पाटणकर नावाच्या वयोवृद्ध सरदाराकडे पाहिले. तेव्हा तो मराठा बोलला की ही जेवणाची पंगत नव्हे, म्हणून मध्येच महाराचा गोट असल्यास हरकत नाही. ही तरवार धरणाऱ्या शूरांची पंगत आहे. येथे जातीचा विचार नाही. ' ज्यांची तलवार खंबीर तो हंबीर ' . . . . पुढे लढाई चालू झाली. परशुराम भाऊवर पठाणांनी मोठी गर्दी करून भाऊस घोड्यावरून खाली आणिले. त्यावेळी मराठे व पठाण ह्यांची जी चकमक झाली तीत शिदनाकाने अप्रतिम शौर्य दाखविले. त्याची पटवर्धन मंडळीने मोठी तारीफ केली. पेशवाई बुडाल्यावरही हा शिदनाक बरीच वर्षे होता. चिंतामणराव अप्पा सांगलीकर दुखण्याने फार आजारी असता, त्यांच्या भेटीस हा गेला होता. तेव्हा त्यांनी मोठ्या समारंभाने ह्याची मुलाखत घेतली. " ( भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न – वि. रा. शिंदे, पान १५७–१५८. )

**शांताबाई** :—प. लो. डॉ. रामकृष्ण गोपाल भांडारकर यांची जेष्ठ कन्या शांताबाई. हिचा प्रथम विवाह डॉ. भाऊ दाजी यांचे धाकटे चिरंजीव द्वारकानाथ यांच्याशी झाला होता. पण ते १८७५ साली मृत्यु पावले व शांताबाई विधवा झाल्या.

**शिवतरकर, सीताराम नामदेव** :—चर्मकार समाजातील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जवळचे सहकारी. बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापन केलेल्या ' बहिष्कृत हितकारिणी सभा ' या संस्थेचे जनरल सेक्रेटरी.

**श्रद्धानंद, स्वामी** (१८५६–१९२६) :—मूळ नाव लाला मुन्शीराम. पंजाबमधील तळवन या गावी जन्म. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. स्वामी दयानंद सरस्वतींच्या व्याख्यानाचा परिणाम होऊन १८८५ साली आर्य समाजाची दीक्षा. लाहोर येथे वकिली करीत असता ' सद्धर्मप्रचारक ' साप्ताहिकास सुरुवात. प्रथम उर्दूत व नंतर हिंदीत. त्यातून स्त्री-शिक्षण, विधवा-विवाह, अनाथ संरक्षण यावर मतप्रदर्शन. प्राचीन पद्धतीवर १९०९ च्या मार्चमध्ये गुरुकुलाची स्थापना. धर्मांतरित लोकांच्या शुद्धिकार्यासाठी खूप धडपड. १९१७ च्या एप्रिलमध्ये संन्यास.

**श्रीरामानुजाचार्य** :—विशिष्टाद्वैत पंथाचे आद्य प्रवर्तक. जन्म इ. स. १०१६-१७ च्या दरम्यान. तरुणपणी तो काचीपुर येथे राहत असून अद्वैतवादी ' यादवप्रकाश ' यांचा तो शिष्य होता. परंतु ओढा वैष्णव मताकडे. पुढे आळवारांच्या प्रबंधाचे अध्ययन केले. यमुनाचार्यांच्या मागून गादीवर आल्यावर तो त्रिचनापल्लीजवळ श्रीरंगम् येथे राहिला व तेथेच आपल्या आयुष्यातील मुख्य कार्य केले. उतारवयात चोल राजाकडून छळ. रामानुजाचार्यांनी वेदांतसार, वेदार्थसंग्रह, वेदान्तदीप, ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता यावरील भाष्ये इतकी ग्रंथरचना केली. त्यांनी ब्रह्मसूत्रे व उपनिषदे यांचा आधार घेऊन, जीवात्मा अगर चित्, निर्जीव जग अगर अचित् व परमात्मा अगर ईश्वर ही तीन तत्त्वे शाश्वत होत हा सिद्धान्त मांडला.

**सकट के. के.** :—बेताचे शिक्षण असलेले पुण्यातील मातंग समाजाचे पुढारी. पुणे हिंदू महासभेच्या पहिल्या कार्यकारिणीतील एक सभासद. महार जातीविषयी काहीसा आकस व अविश्वास म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अनुयायीत्व कधीच स्वीकारले नाही एवढेच नव्हे तर विरोध केला.

**सहस्त्रबुद्धे, गंगाधर निळकंठ** :—जातीने ब्राह्मण. महाडच्या सत्याग्रह परिषदेत दि. २५ डिसेंबर १९२७ ला मनुस्मृती दहनाचा ठराव मांडून ह्यांच्याच हस्ते बाबासाहेब आंबेडकरांनी मनुस्मृतीचे दहन करविले होते. जनता ह्या साप्ताहिकाचे काही वर्षे संपादक राहिले होते.

**सामाजिक परिषद** :—राजकीय प्रगतीसारखेच सामाजिक सुधारणासंबंधी काँग्रेसच्या अधिवेशनात विचारविनिगम व ठराव करण्यात यावेत असा दृष्टिकोन असणारे काही गृहस्थ होते. त्यांनी असा विचार मांडला व काँग्रेसच्या सूत्रधारांनी तो मान्य केला. १८८७ च्या डिसेंबरमध्ये काँग्रेसचे अधिवेशन मद्रासला भरले, तेव्हा त्यात सामाजिक परिषद पहिल्यांदा भरविण्यात आली. या परिषदेचे अध्यक्ष राजा सर टी. माधवराव हे होते. १८८७ पासून १८९४ पर्यंत या परिषदा काँग्रेसच्या मंडपात भरविण्यात आल्या. १८९५ चे अधिवेशन भरविण्याचे ठरले तेव्हा सामाजिक परिषदेचे अधिवेशन काँग्रेसच्या मंडपात भरू द्यावयाचे नाही, असा पुण्यातील जीर्णमतवाद्यांनी चंग बांधला. सामाजिक परिषदेच्या मंडपाला आग लावू अशा धमक्या दिल्या. त्यामुळे सालाबादाप्रमाणे काँग्रेसच्या मंडपात सामाजिक परिषद न भरता ती पोलीस संरक्षणात वेगळी भरविली गेली. तेव्हापासून सामाजिक परिषदा वेगळ्याच भरविल्या जाऊ लागल्या.

**सायमन कमिशन** :—हिंदुस्थानच्या शासनपद्धतीत व १९१९ च्या मॉंटेग्युचेम्सफोर्ड सुधारणा कायद्यात कोणते फेरफार करणे आवश्यक आहे, याविषयी पार्लमेंटला शिफारशी करण्यासाठी, इंग्लंडातील हुजुर पक्षाचे पंतप्रधान स्टॅनले बाल्डविन यांनी ता. २६।११।१९२७ रोजी सर जॉन सायमन यांच्या अध्यक्षतेखाली एका कमिशनची नेमणूक केली, तेच सायमन कमिशन होय. या कमिशनचे सहाही सभासद इंग्रज होते, त्यावर एकाही हिंदी माणसाची नेमणूक करण्यात आली नव्हती म्हणून हिंदुस्थानातील सर्व राजकीय पक्षांनी या कमिशनवर बहिष्कार टाकला होता. सायमन मंडळाला त्याच्या कार्यात सहकार्य देण्यास केंद्र सरकारने एक अखिल भारतीय समिती नेमली होती. शिवाय मंडळासंगे कामकाज करण्यासाठी प्रत्येक विधिमंडळाने आपापली समिती नेमली होती. मुंबई प्रांतिक समितीवर ३ ऑगस्ट १९२८ रोजी इतर सभासदांबरोबर डॉ. आंबेडकरांचीही निवड झाली. त्यांनी मंडळाला पूर्ण सहकार्य केले आणि आपली साक्ष सुद्धा दिली.

**सेवासदन सोसायटी** :—श्री. गोपाळ कृष्ण उर्फ बाबासाहेब देवधर, सी. आय्. ई., एम्. ए. यांनी ह्या संस्थेची पुण्यास २।११।१९०९ रोजी स्थापना केली. आरंभी ही संस्था मुंबईच्या सेवासदनाची शाखा म्हणून सुरू झाली. पुढे ती १२।१०।१९१७ रोजी पूर्णपणे स्वतंत्र झाली. श्री. देवधर हे येथील लष्करामध्ये १८९२ साली खिश्चन मिशनरी संस्थेमार्फत चालविलेल्या अँग्लोव्हर्न्याक्युलर शाळेचे मुख्याध्यापक होते. मिशनरी मंडळीची स्त्रीशिक्षणाविषयीची आस्था पाहून त्यांना तसलेच कार्य करण्याची स्फूर्ती झालीं. स्त्रियांना शिक्षण देऊन स्वावलंबी बनवावे व तेच कार्य पुढेही तसेच चालू ठेवावे याकरिता स्त्रीशिक्षणाचे कार्य चालविणारी एखादी संस्था असण्याची त्यांची मनीषा जोराने पुढे येऊ लागली. सन १९०६ मध्ये श्री. देवधर हे प्लेगची आपत्ती निवारण्याची खटपट करीत होते. स्त्री-वर्गाला मदत करण्यासाठी एक स्त्री स्वयंसेविका दल स्थापन केले. त्यात सर्व जातीच्या, धर्माच्या स्त्रिया होत्या. त्यात रमाबाई रानडे, अन्नपूर्णाबाई आपटे, जानकीबाई भट, सीताबाई परांजपे, सीताबाई डुकले, मिस् सोराबजी, मिस् हिराबाई पदमजी आणि सीताबाई भांडारकर ह्या प्रमुख होत्या. पुढे ह्याच स्त्रीमंडळाचे रूपांतर सेवासदन सोसायटीत झाले. आरंभीचा वर्ग प्रौढ विधवा स्त्रियांचाच असून त्यात प्राथमिक शिक्षण दिले जाई. पुढे सर्व प्रकारच्या स्त्रियांकरिता विविध प्रकारच्या शिक्षणाची व्यवस्था केली. आरंभी फक्त १५ विद्यार्थिनी होत्या. यांच्या शाखा – अहमदनगर, नाशिक, सोलापूर, बारामती, अलिबाग, नागपूर, सातारा, ग्वाल्हेर, मुंबई येथे गिरगाव, दादर, फोर्ट या ठिकाणी.

**सेन, केशवचन्द्र** (१८३८-१८८४) :—बंगाली ब्राह्मणेतर जातीत जन्म. शेजारी राहणाऱ्या पंडित राजवल्लभ नावाच्या पंतोजीने दिलेल्या ब्राह्मसमाजासंबंधीच्या पुस्तकाच्या परिणामाने १८५० साली ब्राह्मसमाजाची दीक्षा. ब्राह्म-समाजाचे प्रमुख देवेन्द्रनाथ ठाकूर यांच्याबरोबर विशेष सहवास. देवेन्द्रनाथांच्या अनुग्रहाने १८६२ साली ब्राह्मसमाजाचे आचार्य व ब्रह्मानंद ही पदवी. देवेन्द्रनाथ जुन्या आचाराविचाराचे, जातीभेद, जानवे वगैरे पाळणारे म्हणून मतभेद होऊन नवब्राह्मसमाजाची स्थापना. इंग्लंडात जाऊन आल्यावर समाजसुधारणेकरिता अनेक संस्था स्थापन केल्या. सुधारणावादी केशवचंद्रांनी आपल्या १३ वर्षाच्या अल्पवयीन मुलीचा विवाह सुमारे १६ वर्षाच्या कुचबिहाराच्या महाराजाशी केला तेव्हा मात्र त्यांच्या समाजात त्यांच्यावर खूप टीका झाली. ख्रिस्ती, मुसलमान, पारशी व हिंदु या सर्वांना एकत्र आणणारा 'नवविधानध्वजारोपण' नावाचा संस्कार सुरू केला होता. त्यात ख्रिस्ती संस्कार जास्त होते.

**सोशल सर्व्हिस लीग** :—नारायण मल्हार जोशी, कामगार नेते, यांनी १९११ च्या मार्च महिन्यात सर नारायण चंदावरकर, डॉ. भालचंद्र भाटवडेकर, कृष्णलाल जव्हेरी, बी. एन्. मोतीवाला, जी. के. पारेख व टी. अे. कुळकर्णी ह्यांच्या प्रोत्साहनाने व सहकार्याने कामगारांची आर्थिक परिस्थिती, त्यांची राहणी, त्यांचे आरोग्य, त्यांचे व त्यांच्या मुलांचे शिक्षण ह्यांची पाहणी करून त्यांच्या कल्याणाच्या दृष्टीने त्यांना सहाय्य करण्यासाठी 'सोशल सर्व्हिस लीग' ह्या संस्थेची स्थापना मुंबईत केली.

**सोळंकी, डॉ. पुरुषोत्तम गोविंदजी** :—मुंबईत दि. १९-१२-१८७६ ला जन्म. वडील व्यापारी म्हणून आर्थिक स्थिती बरी. एल्. अ‍ॅण्ड एम्. एस्. ची परीक्षा पास करून मुंबईत प्रॅक्टीस सुरू केली. स्पृश्य समाजातून एकही पेशंट मिळाला नाही. सौराष्ट्र व गुजरात येथील छोट्या मोठ्या संस्थानात नोकरीस लागले. जात 'रजपूत' असल्याचा बहाणा करावा लागला. अस्पृश्य असल्याचे ऊघड होताच मुंबईला पुन्हा परत. डॉक्टरकीची प्रॅक्टीस सुरू करण्यासाठी हिंदू धर्म सोडून मुसलमान किंवा ख्रिस्ती धर्माचा स्वीकार योग्य असा निर्णय घेतला. एका अमेरिकन मिशनऱ्याच्या भेटीमुळे ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याचे निश्चित होऊन सेंट अँड्र्यूज चर्च, आग्रीपाडा येथे त्यांनी दि. ११-४-१९२५ ला बाप्तिस्मा घेतला. प्रांतिक कौन्सिलात सरकार नियुक्त सभासद म्हणून नेमल्याची घोषणा १९२६ च्या डिसेंबर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात केली गेली होती. त्यांच्यासोबत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना सुद्धा नियुक्त केले गेले होते.

**हिंदु महासभा** :—मुस्लिम संघाच्या स्थापनेनंतर, प्रतिक्रिया म्हणून हिंदु सभेचा जन्म झाला. १९०९ साली पंजाबमध्ये, मुसलमानांच्या दंग्यांना तोंड देण्यासाठी व हिंदूंना समर्थ करण्यासाठी, पहिली प्रांतीय परिषद भरून तिच्यातून पंजाब हिंदुसभेचा जन्म झाला. हळुहळु इतर प्रांतातही तिच्या विचारसरणीचा प्रसार होऊ लागला. १९१५ साली हरद्वार येथे अखिल भारतीय हिंदु महासभेचे पहिले अधिवेशन भरले. " अखिल हिंदू समाज एकजीव करण्यासाठी त्यातील सर्व अंगोपांगांना सुसंघटित करणे आणि हिंदू व इतर जाती यांच्यामध्ये सद्‌भावना उत्पन्न करून त्यांच्याशी मित्रत्वाने वागणे " हे हिंदु महासभेचे ध्येय होते. राष्ट्रसभेच्या मंडपात हिंदुमहासभेची अधिवेशने भरत आणि राष्ट्रसभेचे मोठमोठे हिंदू व मुसलमान पुढारी त्यांना हजरही राहात. लाला लजपतराय, पंडित मदनमोहन मालवीय इ. अव्वल दर्जाचे पुढारी उत्साहाने भाग घेत.

●●●

# आधारभूत वाङ्मय सूची

## ग्रंथ-मराठी


आचार्य अत्रे, प्रल्हाद केशव; ही ईश्वराची दया.

आंबेडकर; डॉ. बाबासाहेब चरित्र-साधने प्रकाशन समिती, महाराष्ट्र शासन, खंड-१८ (धम्मचक्रप्रवर्तन दिन—१५ ऑक्टोबर २००२).

कीर, धनंजय; डॉ. बाबासाहेब आंबेडकर; पॉप्युलर प्रकाशन मुंबई (पुनर्मुद्रण-१९९१).

खैरमोडे, चांगदेव भवानराव; डॉ. भीमराव रामजी आंबेडकर चरित्र खंड-१ १ (आवृत्ती-चौथी, ऑक्टोबर १९९२); २ (आवृत्ती द्वितीय, १४ ऑक्टोबर १९९१) ३ (आवृत्ती द्वितीय, डिसेंबर १९९०); ४ (आवृत्ती द्वितीय, एप्रिल १९८९); ५ (आवृत्ती द्वितीय, ऑक्टोबर १९८८); ९ (आवृत्ती प्रथम १९८७)—श्रीमती द्वारका चांगदेव खैरमोडे, १४७-अ, हिंदू कॉलनी, मुंबई-४४० ०१४.

चौधरी, नागेश; पेरियर ई. व्ही. रामस्वामी; जीवन व विचार; बहुजन संघर्ष समिती, रहाटे कॉलनी, वर्धा रोड, नागपूर-२२ (प्रथमावृत्ती).

गणवीर, रत्नाकर; डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारतातील अग्रलेख, रत्नमित्रा प्रकाशन, जुन्या पोष्ट ऑफीस मागे, बेझनबाग, नागपूर-४४० ००४, (द्वितीयावृत्ती, १४ ऑक्टोबर १९८५.)

'बहिष्कृत भारता 'तील डॉ. आंबेडकरांचे स्फुट लेख; रत्नमित्रा प्रकाशन, आर. बी. ४, ९९६ बी, सी-रोड, ४० बंगला, भुसावळ, जि. जळगाव, (प्रथमावृत्ती, १८ मे १९८१ बुद्ध पौर्णिमा).

घोडेश्वार, प्रा. देविदास; दलितांचे शिक्षण; प्रदीप गायकवाड, सचिव, समता प्रकाशन, समता सैनिक दल, डॉ. आंबेडकर कॉलनी, नागपूर ४४० ०१७. (१० मार्च १९९४).

नरके, हरी; आम्ही पाहिलेले फुले; महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती, महाराष्ट्र शासन; (६ जून १९९३).

मराठी विश्वकोश, संपादक तर्कतिर्थ लक्ष्मण शास्त्री जोशी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोशनिर्मिती मंडळ, मुंबई ४०० ००१.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, महात्मा फुले समग्र वाङ्मय; संपादक-यशवंत दिनकर फडके; (सुधारित आवृत्ती-पाचवी, २८-११-१९९१).

महाराष्ट्रीय ज्ञानकोश—संपादक-केतकर.

लाड, रामचंद्र नारायण; मराठ्यांचे दासीपुत्र अर्थात पायपोस किंमतीचे पेशवे, पुणे (ता. १० नोव्हेंबर १९२७).

संत, ज. गो; परि भाव नोहे डोंगा (श्रीसंत चोखामेळा चरित्र), डॉ. आंबेडकर अभ्यास मंडळ, चंद्रपूर (महाराष्ट्र).

## English

Ambedkar, Dr. Babasaheb; Writings and Speeches, Vol. 2 (14-4-1982), 3 (14-4-1987), 4 (2-10-1987), 17 (4-10-2003); Dr. Babasaheb Ambedkar Source Material Publication Committee, Govt. of Maharashtra, Mumbai 400 032.

Chowdhury, Hemendu Bikash; Asoka 2300, (Jagajjyoti : Asoka Commemoration Volume 1997 AD/2541 B. E.), Baudha Dharmankur Sabha (The Bengal Buddhist Association) I, Buddhist-Temple Steet Culcutta 700 012.

Mayo, Katherine; Mother India, Jonathan Cape 30 Bedford Square London (First Published in MCMXXVII—Sixth impression MCMXXVII)

## विशेषांक

जनता खास अंक १९३३–संस्थापक डॉ. भी. रा. आंबेडकर; संपादक–भास्कर रघुनाथ कद्रेकर, कामाठीपुरा, मुंबई-८.

जीवन ज्योत–पद्मश्री दादासाहेब गायकवाड गौरव अंक, ऑक्टोबर १९६८; संपादक-बा. रा. जगताप आणि एल. एस. जाधव.

६८६, गंगावाडी, रविवार पेठ, नासिक-१.

प्रबुद्ध भारत.–संस्थापक–डॉ. भी. रा. आंबेडकर, संपादक–भा. र. कद्रेकर. दादासाहेब गायकवाड पष्ठ्यपूर्ति गौरव विशेषांक, बुद्ध भूषण प्रिंटिंग प्रेस, गोकुलदास पास्ता रोड, दादर, मुंबई-१४.

बहुजन संघर्ष विशेषांक-१९८६, संपादक नागेश चौधरी, उधोजी बिल्डिंग, रहाटे कॉलनी, वर्धा रोड, नागपूर ४४० ०२२.

## नियतकालीके

केसरी

दुनिया.

बहिष्कृत भारत, संपादक–डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, बार-ॲट-ला; रहिम बिल्डिंग, पोयबावडी, परेल-मुंबई.

मूकनायक, संपादक–डॉ. भीमराव रामजी आंबेडकर, बार-ॲट-ला; १४, हरारवाला बिल्डिंग, पोयबावडी, परेल, मुंबई.

● ● ●

# संदर्भ सूची

–एन. जी.कांबळे,
आय. पी. एस. (निवृत्त)

## १ : विषय सूची

### अ ते अं

## क



## ख



## ग

## ध

## न



## प

फ



ब

## भ



## म

**महार आणि त्यांचे वतन–**

### य



### र

## ल



## व

## श

**शिक्षण-**

## ह



## क्ष

# २. वर्ग सूची

## (वंश, वर्ण, धर्म, पंथ, जाती, संस्कृती, सांप्रदाय इत्यादी विषयक)

### अ ते अं

## क



## ख

ग



च



ज



ड



ढ



त



द

## ध



## न



## प



## फ



## ब

## भ



## म

## श



## स

## ह

# ३. व्यक्तिनाम सूची

## अ ते अं



## क

## ख



## ग



## घ



## च

## ज



## ट



## ठ

## ड



## ढ



## त



## थ



## द



## ध



## न

## प



## फ

## ब



## भ



## म

## य



## र

## ल



## व



## श

### स



### ह



### ज्ञ

# ४. संस्था, परिषदा आणि चळवळ–सूची

## अ ते अं



## क



## ख



## ग



## च



## ज



## ट

### ड



### त



### द



### न



### प



### ब



### म

## ह

# ५. वृत्तपत्रांची सूची

## अ ते अं



## क



## ग



## च



## ज



## ट



## ड



## त



## द



## न

### प



### ब



### भ



### म



### र



### ल



### व



### श

## स



## ह



## ज्ञ

# ६. स्थळ सूची

## अ ते अं



## क



## ख



## ग



## च



## ज

ट



ड



त



द



न



प



ब

# शुद्धीपत्रक

| पृष्ठ क्रमांक (१) | परिच्छेद क्रमांक (२) | ओळ (३) | च्या ऐवजी (४) | असे वाचावे (५) |
|---|---|---|---|---|
| ५७ | २ | ७ | समार्थ्य | सामर्थ्य |
| १२५ | २ | १० | आह्मांसहि | आम्हांसहि |
| १३५ | २ | ५ | बील | दील |
| १३९ | २ | २४ | आह्माला | आम्हाला |
| १५३ | २ | ११ | सभा* | सभा |
| १५४ | २ | ५ | लीग* | लीग |
| १६४ | २ | ११ | कुपण | कुंपण |
| १६६ | २ | १ | मुलसमानांतील | मुसलमानांतील |
| १७९ | १ | ७ | दंन | दोन |
| ३१४ | १ | १ | सत्याग्र | सत्याग्रह |
| ३३३ | १ | १५ | असपृश्य | अस्पृश्य |
| ३४२ | १ | ३ | प्रमाणिक | प्रामाणिक |
| ३४३ | १ | ४ | बाईच्या | वाईच्या |
| ३५९ | १ | २० | ब्रीत | ब्रीद |
| ४४४ | १ | २ | डॉ. ए. स. | डॉ. ए. एस्. |
| ४४५ | २ | १ | मेथो | मेयो |



शामुना--डब्ल्यू-२०७३-उवतंशिमंमु-३-२०१६-२,०००-पीआर८*

**खंड-१४** (दोन भागात)
हिंदु कोड बिल (आवृत्ती संपली )
**खंड-१५**
कायदेमंत्री डॉ.आंबेडकर (आवृत्ती संपली )
**खंड-१६**
पाली व्याकरण आणि शब्दकोश
(आवृत्ती संपली )
**खंड-१७**
डॉ.आंबेडकर यांची सामाजिक क्रांती - भाग १ ते ३
रुपये ३७५/-
**खंड-१८(मराठी)**
डॉ.बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे - भाग १ ते ३
रुपये ३००/-
**खंड १९ (मराठी)**
डॉ. आंबेडकर यांची पत्रकारिता १९२०-१९२८
रुपये २००/-

---

**इतर प्रकाशित खंड**
**खंड-१ (इंग्रजी)**
आंबेडकरी चळवळीच्या इतिहासाची साधने.
(आवृत्ती संपली )
**खंड-२ (मराठी)**
डॉ.बाबासाहेब आंबेडकरांचे बहिष्कृत भारत आणि
मूकनायक (आवृत्ती संपली )

---

वरील उपलब्ध ग्रंथांची विक्री शासन मुद्रण लेखन सामग्री आणि प्रकाशन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या खालील बुक डेपोंमधून केली जाते.

१) शासकीय मध्यवर्ती ग्रंथागार, नेताजी सुभाष रोड , चर्नी रोड रेल्वे स्टेशनजवळ, मुंबई - ४०० ००४.
२) शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथागार, जी.पी.ओ. जवळ, पुणे स्टेशन, पुणे- ४११ ००१.
३) शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, सिव्हील लाईन्स, नागपूर- ४४० ००१.
४) शासकीय ग्रंथागार, शहागंज, गांधी चौकाजवळ, औरंगाबाद- ४३१ ००१.
५) कोल्हापूर बुक डेपो

वाचकांनी सदर ग्रंथ खरेदीसाठी व ग्रंथ पोस्टाने मागवायचे असल्यास डाकखर्च इ.चौकशीसाठी वरील ठिकाणी परस्पर संपर्क साधावा. व्ही.पी.ची पद्धत नाही. ग्रंथांच्या किंमतीची आणि डाकखर्चाची रक्कम मनीऑर्डर अथवा डिमांड ड्राफ्टद्वारे वरील पत्त्यावर पाठवून सदर ग्रंथ मागवता येतील.

आमच्या या बहिष्कृत लोकांवर होत असलेल्या व पुढे होणाऱ्या अन्यायावर उपाययोजना सुचविण्यास, तसेच त्यांची भावी उन्नती व तिचे मार्ग यांच्या खऱ्या स्वरूपाची चर्चा होण्यास वर्तमानपत्रासारखी अन्य भूमीच नाही. परंतु मुंबई इलाख्यात निघत असलेल्या वृत्तपत्रांकडे न्याहाळून पाहिले असता असे दिसून येईल की, त्यातील बरीचशी पत्रे विशिष्ट जातीचे हितसंबंध पाहणारी आहेत. इतर जातीच्या हिताची त्यांना पर्वा नसते. इतकेच नव्हे तर केव्हा केव्हा त्यांना अहितकारक असेही त्यातून प्रलाप निघतात.

अशा वृत्तपत्रकारांना आमचा एवढाच इशारा आहे की, कोणतीही एखादी जात अवनत झाली तर तिच्या अवनतीचा चटका इतर जातींना बसल्याशिवाय राहणार नाही. समाज ही एक नौका आहे व ज्याप्रमाणे आगबोटीत बसून प्रवास करणाऱ्या उतारूने जाणूनबुजून इतरांचे नुकसान करावे म्हणून किंवा त्यांची त्रेधा कशी उडते ही गमत पाहण्यासाठी म्हणा, किंवा आपल्या विनाशक स्वभावामुळे म्हणा, जर का इतरांच्या खोलीस छिद्र पाडले तर सर्व आगबोटीबरोबर त्यालाही, आधी नाही तरी मागाहून का होईना जलसमाधी ही घ्यावी लागणार आहे. त्याचप्रमाणे एका जातीचे नुकसान केल्याने, प्रत्यक्ष नव्हे तरी अप्रत्यक्षपणे तरी नुकसान करणाऱ्या जातीचेही नुकसान होणार आहे, यात बिलकुल शंका नाही. म्हणून स्वहितसाधू पत्रांनी इतरांचे नुकसान करुन आपले हित कर[illegible] मूर्खाचे लक्षण शिकू नये.